सारितां निराळी । लोटांगणतळीं हारपती ॥२॥ दुजें नाहीं तेथें बळ कोणासाठीं । आणीक ते आटी विचाराची ॥३॥ तुका म्हणे उंच वाढे उंचपणें । ठेंगणीं लवणें जैसीं तैसीं ॥४॥

४१. दुर्जनासि करी साहे । तोही लाहे दंड हे ॥१॥ शिंदळीचा कुंटणी वाटा । संग खोटा खोट्याचा ॥२॥ येर येरा कांचणी भेटे । आगी उठे तेथूनी ॥३॥ तुका म्हणे कापूं नाकें । पुढें आणिकें शिकविती ॥४॥

४२. वृत्ति भूमि राज्य द्रव्य उपार्जिती । जाणा त्या निश्चिती देव नाहीं ॥१॥ भाडेकरी वाहे पाठीवरी भार । अंतरींचें सार लाभ नाहीं ॥२॥ देवपुजेवरी ठेवूनियां मन । पाषाणा पाषाण पूजी लोभें ॥३॥ तुका म्हणे फळ चिंतिती आदर । लाघव हे चार शिंदळीचे ॥४॥

४३. पवित्र सोंवळीं । एक तींच भूमंडळीं ॥१॥ ज्यांचा आवडता देव । अखंडित प्रेमभाव ॥२॥ तींच भाग्यवंतें । सरतीं पुरतीं धनवित्तें ॥३॥ तुका म्हणे देवा । त्यांची केली पावे सेवा ॥४॥

४४. आशाबद्ध जन । काय जाणे नारायण ॥१॥ करी इंद्रियांची सेवा । पाहे आवडीचा हेवा ॥२॥ भ्रमलें चावळे । तैसें उचित न कळे ॥३॥ तुका म्हणे विषें । अन्न नाशियेलें जैसें ॥४॥

४५. ढेकरें जेवण दिसे साचें । नाहीं तरि काचें कुंथाकुंथी ॥१॥ हेही बोल तेही बोल । कोरडें फोल रुचीविण ॥२॥ गव्हांचिया होती परी । फके वरी खाऊं नये ॥३॥ तुका म्हणे असे हातींचें कांकण । तयासी दर्पण विल्हाळक ॥४॥

४६. करावी ते पूजा मनेंचि उत्तम । लौकिकाचें काम काय असे ॥१॥ कळावें तयासी कळे अंतरींचें । कारण ते साचें साच अंगीं ॥२॥ अतिशयाअंतीं लाभ किंवा घात । फळ देतें चित्त बीजाऐसें ॥३॥ तुका म्हणे जेणें राहे समाधान । ऐसें तें भजन पार पावी ॥४॥

४७. नव्हे आराणूक संसारा हातीं । सर्वकाळ चित्तीं हाचि धंदा ॥१॥ देवधर्म सांदीं पडिले सकळ । विषयीं गोंधळ गाजतसे ॥२॥ रात्रंदिवस न पुरे कुटुंबीं समाधान । दुर्लभ दर्शन ईश्वराचें ॥३॥ तुका म्हणे आत्महत्यारे घातकी । थोर होते चुकी नारायणीं ॥४॥

४८. स्मशान ते भूमी प्रेतरूप जन । सेवाभक्तिहीन ग्रामवासी ॥१॥ भरतील पोटें श्वानाचिया परी । वस्ति दिली घरीं यमदूतां ॥२॥ अपूज्य लिंग तेथें अतित ने घे थारा । ऐसी वस्ती चोरां कंटकांची ॥३॥ तुका म्हणे नाहीं ठावी तीथ मती । यमाची निश्चिती कुळवाडी ॥४॥

४९. एकादशी व्रत सोमवार न करिती । कोण त्यांची गति होईल नेणों ॥१॥ काय करूं बहु वाटे तळमळ । आंधळीं सकळ बहिर्मुख ॥२॥ हरिहरासीं नाहीं बोटभर वाती । कोण त्यांची गति होईल नेणों ॥३॥ तुका म्हणे नाहीं नारायणीं प्रीति । कोण त्यांची गति होईल नेणों ॥४॥

५०. आहाकटा त्याचे करिती पितर । वंशीं दुराचार पुत्र झाला ॥१॥ गळेचि ना गर्भ

नव्हेचि कां वांज । माता त्याची लाजलावा पापी ॥२॥ परपीडे परद्वारीं सावधान । सादरचि मन अभाग्याचें ॥३॥ न मिळतां निंदा चाहडी उपवास । संग्रहावे दोष सकळही ॥४॥ परउपकार पुण्य त्या वावडें । विषाचें तें किडें दुग्धीं मरे ॥५॥ तुका म्हणे विटाळाचीच तो मूर्ति । दया क्षमा शांति नातळे त्या ॥६॥

५१. श्वान शीघ्र कोपी । आपणा घातकर पापी ॥१॥ नाहीं भीड आणिक धीर । उपदेश न जिरे क्षीर ॥२॥ माणसांसि भुंके । विजातीनें घ्यावे थुंके ॥३॥ तुका म्हणे चित्त । मळिण करा रे फजित ॥४॥

५२. देखोनि हरखली अंड । पुत्र झाला म्हणे रांड । तंव तो जाला भांड । चाहाड चोरटा शिंदळ ॥१॥ जाय तिकडे पीडी लोकां । जोडी भांडवल थुंका । थोर झाला चुका । वर कां नाहीं घातली ॥३॥ भूमि कांपे त्याच्या भारें । कुंभपाकाचीं शरीरें । बोले निष्ठुर उत्तरें । पापदृष्टि मळिण चित्त ॥३॥ दुराचारी तो चांडाळ । पाप सांगातें विटाळ । तुका म्हणे खळ । म्हणोनियां निषिद्ध तो ॥४॥

५३. नेणें गाणें कंठ नाहीं हा सुस्वर । घालूं तुज भार पांडुरंगा ॥१॥ नेणें राग वेळ काळ घात मात । तुझे पायीं चित्त ठेवीं देवा ॥२॥ तुका म्हणे मज चाड नाहीं जना । तुज नारायणावांचूनियां ॥३॥

५४. माझी पाठ करा कवी । उट लावी दारोदार ॥१॥ तंव तया पारखी सिव । लाजे ठाव सांडितां ॥२॥ उष्टावळी करूनि जमा । कुंथुनि प्रेमा आणितसे ॥३॥ तुका म्हणे बाहेरमुदी । आहाच गोविंदीं न सरती ॥४॥

५५. उपाधीच्या नांवे घेतला शिंतोडा । नेदूं आतां पीडा आतळों ते ॥१॥ काशासाठी हात भरूनि धुवावे । चालतिया गोवे मारगासि ॥२॥ कांहीं नाहीं देवें करूनि ठेविलें । असे तें आपुलें ते ते ठायीं ॥३॥ तुका म्हणे जेव्हां गेला अहंकार । तेव्हां आपपर बोळविले ॥४॥

५६. योगाचे ते भाग्य क्षमा । आधीं दमा इंद्रियें ॥१॥ अवघीं भाग्यें येती घरा । देव सोयरा जालिया ॥२॥ मिरासीचें म्हूण सेत । नाहीं देत पीक उगे ॥३॥ तुका म्हणे उचित जाणा । उगीं सिणा काशाला ॥४॥

५७. न ये नेत्रां जळ । नाहीं अंतरीं कळकळ ॥१॥ तों हे चावटीचे बोल । जन रंजवणें फोल ॥२॥ न फळे उत्तर । नाहीं स्वामी जों सादर ॥३॥ तुका म्हणे भेटी । जंव नाहीं दृष्टादृष्टी ॥४॥

५८. बाईल सवासिण आई । आपण पितरांचे ठायीं ॥१॥ थोर वेच जाला नष्टा । अवघ्या अपसव्य चेष्टा ॥२॥ विषयांचे चर्वणीं । केली आयुष्याची गाळणी ॥३॥ तुका म्हणे लंडा । नाहीं दया देव धोंडा ॥४॥

५९. दानें कांपे हात । नावडे तेविशीं मात ॥१॥ कधी चावटीचे बोल । हिंग क्षीर मिथ्या फोल ॥२॥ नव जाती पाय । तीर्था म्हणे वेचूं काय ॥३॥ तुका म्हणे मनीं नाहीं । न ये आकारातें कांहीं ॥४॥

६०. वळितें जें गाई । त्यासी फार लागे काई ॥१॥ निवे भावाचे उत्तरीं । भलते एके धणीवरी ॥२॥ न लगती प्रकार । कांहीं मनाचा आदर ॥३॥ सांडी थोरपणा । तुका म्हणे सवें दीना ॥४॥

६१. मैत्र केला महाबळी । कामा न ये अंतकाळीं ॥१॥ आधीं घे रे रामनाम । सामा भरीं हा उत्तम । नाहीं तरी यम । दांत खातो करकरा ॥२॥ धन मिळविलें कोडी । काळ घेतल्या न सोडी ॥३॥ कामा न ये हा परिवार । सैन्य लोक बहु फार ॥४॥ तंववरी तुमचें बळ । जंव आला नाहीं काळ ॥५॥ तुका म्हणे बापा । चुकवी चौऱ्याशींच्या खेपा ॥६॥

६२. सुख पाहतां जवापाडें । दुःख पर्वताएवढें ॥१॥ धरीं धरीं आठवण । मानी संतांचें वचन ॥२॥ नेलें रात्रीनें तें अर्ध । बाळपण जराव्याध ॥३॥ तुका म्हणे पुढा । घाणा जुंतीतसी मूढा ॥४॥

६३. कानडीनें केला मऱ्हाटा भ्रतार । एकाचें उत्तर एका न ये ॥१॥ तैसें मज नको करूं कमळापति । देईं या संगति सज्जनांची ॥२॥ तिनें पाचारिलें इल बा म्हणोन । येरु पळे आण झाली आतां ॥३॥ तुका म्हणे येरा येरा जें विच्छिन्न । तेथें वाढे शीण सुखा पोटीं ॥४॥

६४. बोलायाचा त्यासीं । नको संबंध मानसीं ॥१॥ जया घडली संतनिंदा । तुज विसरूनि गोविंदा ॥२॥ जळो त्याचें तोंड । नको दृष्टीपुढें भांड ॥३॥ तुका म्हणे देवा । तया दुरी मज ठेवा ॥४॥

६५. तीळ जाळिले तांदुळ । काम क्रोध तैसेचि खळ ॥१॥ कां रे शिणलासी वाउगा । न भजतां पांडुरंगा ॥२॥ मानदंभ पोटासाठीं । केली अक्षरांची आटी ॥३॥ तप करूनि तीर्थाटण । वाढविला अभिमान ॥४॥ वांटिलें तें धन । केली अहंता जतन ॥५॥ तुका म्हणे चुकलें वर्म । केला अवघाचि अधर्म ॥६॥

६६. संसाराच्या तापें तापलों मी देवा । करितां या सेवा कुटुंबाची ॥२॥ म्हणऊनि तुझे आठविले पाय । ये वो माझे माय पांडुरंगे ॥२॥ बहुतां जन्मींचा झालों भारवाही । सुटिजे हें नाहीं वर्म ठावें ॥३॥ वेढियेलों चोरीं अंतर्बाह्यात्कारीं । कणव न करी कोणी माझी ॥४॥ बहु पांगविलों बहु नागविलों । बहु दीस झालों कासाविस ॥५॥ तुका म्हणे आतां धांव घालीं वेगीं । ब्रीदें तुझें जगीं दीनानाथा ॥६॥

६७. भक्तऋणी देव बोलती पुराणें । निर्धार वचनें साच खरीं ॥१॥ मागें काय जाणों आइकिली वार्ता । कबिरा सातें जातां घड्या वांटी ॥२॥ माघारिया धन आणिलें

घरासी । ने घे केला त्यासी त्याग तेणें ॥३॥ नामदेवाचिया घरासी आणिलें । तेणें लुटियेलें द्विजां हातीं ॥४॥ प्रत्यक्षासी काय द्यावें हे प्रमाण । एकोबाचें ऋण फेडियलें ॥५॥ बीज दळोनियां केली आराधना । लागे नारायणा पेरणें तें ॥६॥ तुका म्हणे ऐसा नाहीं ज्या निर्धार । नाडेल साचार तोचि एक ॥७॥

६८. भोगे घडे त्याग । त्यागें अंगा येती भोग ॥१॥ ऐसें उफराटें वर्म । धर्माअंगींच अधर्म ॥२॥ देव अंतरे तें पाप । कोठे उगवा संकल्प ॥३॥ तुका म्हणे भीड खोटी । लाभ विचाराचे पोटीं ॥४॥

६९. भोरप्याने सोंग पालटिलें वरी । बक ध्यान धरी मत्स्या जैसें ॥१॥ टिळे माळा मैंद मुद्रा लावी अंगीं । देखो नेदी जगीं फांसे जैसे ॥२॥ ढीवर या मत्स्या चारा घाली जैसा । भीतरील फांसा कळों नेदी ॥३॥ खाटीक हा स्नेहवादें पशु पाळी । कापावया नळी तयासाठीं ॥४॥ तुका म्हणे तैसा भला मी लोकांत । परि तूं कृपावंत पांडुरंगा ॥५॥

७०. गेली वीरसरी । मग त्यासी रांड मारी ॥१॥ मग नये तैसी सत्ता । गेली मागील आणितां ॥२॥ भंगलिया चित्ता । न ये काशाने सांधितां ॥३॥ तुका म्हणे धीर । भंगलिया पाठीं कीर ॥४॥

७१. युक्ताहार न लगे आणिक साधनें । अल्प नारायणें दाखविलें ॥१॥ कलियुगामाजी करावें कीर्तन । तेणें नारायण देईल भेटी ॥२॥ न लगे लौकिक सांडावा वेव्हार । घ्यावें वनांतर भस्म दंड ॥३॥ तुका म्हणे मज आणिक उपाव । दिसती ते वाव नामेंविण ॥४॥

७२. कंठीं कृष्णमणी । नाहीं अशुभ ते वाणी ॥१॥ हो कां नर अथवा नारी । रांड तयें नांवें खरीं ॥२॥ नाहीं हातीं दान । शूरपणाचें कांकण ॥३॥ वाळियेलीं संतीं । केली बोडोनि फजिती ॥४॥ तुका म्हणे ताळा । नाहीं त्याची अवकळा ॥५॥

७३. माया ब्रह्म ऐसें म्हणती धर्मठक । आपणासरिसे लोक नागविले ॥१॥ विषयीं लंपट शिकवी कुविद्या । मनामागें नांद्या होऊनि फिरे ॥२॥ करुनी खातां पाक जिरे सुरण राई । करितां अतित्याई दुःख पावे ॥३॥ औषध द्यावया चाळविलें बाळा । दावूनियां गुळा दृष्टीपुढें ॥४॥ तरावया आधीं शोधा वेदवाणी । वांझट बोलणीं वारा त्याचीं ॥५॥ तुका म्हणे जयां पिंडाचें पाळण । न घडे नारायण भेटे तयां ॥६॥

७४. मृगजळ दिसे साचपणा ऐसें । खोटियाचें पिसें ऊर फोडी ॥१॥ जाणोनि कां करा आपुलाले घात । विचारा रे हित लवलाहीं ॥२॥ संचित सांगातीं बोळवण सवें । आचरलें द्यावें फळ तेणें ॥३॥ तुका म्हणे शेखीं स्मशान तें वरी । संबंध गोवरी आगीसवें ॥४॥

७५. गौळियाचीं ताकपीरें । कोण पोरें चांगलीं ॥१॥ येवढा त्यांचा छंद देवा । काय सेवा भक्ती ते ॥२॥ काय उपास पडिले होते । कण्याभोंवते विदुराच्या ॥३॥ तुका म्हणे

कुब्जा दासी । रूपरासी हीनकळा ॥४॥

७६. आतां तरी पुढें हाचि उपदेश । नका करूं नाश आयुष्याचा ॥१॥ सकळांच्या पायां माझें दंडवत । आपुलालें चित्त शुद्ध करा ॥२॥ हित तें करावें देवाचें चिंतन । करूनियां मन एकविध ॥३॥ तुका म्हणे लाभ होय तो व्यापार । करा काय फार शिकवावें ॥४॥

७७. भक्ताविण देवा । कैचें रूप घडे सेवा ॥१॥ शोभविलें येर येरां । सोनें एके ठायीं हिरा ॥२॥ देवाविण भक्ता । कोण देतें निष्कामता ॥३॥ तुका म्हणे बाळ । माता जैसें स्नेहजाळ ॥४॥

७८. विश्वाचा जनिता । म्हणे यशोदेसी माता ॥१॥ ऐसा भक्ताचा अंकीत । लागे तैसी लावी प्रीत ॥२॥ निष्काम निराळा । गोपी लावियेल्या चाळा ॥३॥ तुका म्हणे आलें । रूपा अव्यक्त चांगलें ॥४॥

७९. काय दिनकरा । कोंबड्यानें केला खरा ॥१॥ कां हो ऐसा संत ठेवा । भार माझे माथां देवा ॥२॥ आडविलें दासी । तरी कां मरती उपवासी ॥३॥ तुका म्हणे हातीं । कळा सकळ अनंतीं ॥४॥

८०. जेवितांही धरी । नाक हागतियेपरी ॥१॥ ऐसियाचा करी चाळा । आपुलीच अवकळा ॥२॥ सांडावें मांडावें । काय ऐसें नाहीं ठावें ॥३॥ तुका म्हणे करी । ताक दुधा एकीसरी ॥४॥

८१. हो कां पुत्र पत्नी बंधु । त्यांचा तोडावा संबंधु ॥१॥ कळों आलें खट्याळसें । शिवों नये लिंपो दोषें ॥२॥ फोडावें मडकें । मेले लेखीं घायें एके ॥३॥ तुका म्हणे त्यागें - । विण चुकीजेना भोगें ॥४॥

८२. व्याल्याविण करी शोभनतांतडी । चार ते गधडी करीतसे ॥१॥ कासया पाल्हाळ आणिकांचे देखी । सांगतां नव्हे सुखी साखरेसी ॥२॥ कुंथाच्या ढेंकरें न देवेल पुष्टी । रूप दावी कष्टी मळिण वरी ॥३॥ तुका म्हणे अरे वाचाळ हो ऐका । अनुभवेंविण नका वाव घेऊं ॥४॥

८२. जेणें घडे नारायणीं अंतराय । होत बाप माय वर्जावीं तीं ॥१॥ येर प्रिया पुत्र धना कोण लेखा । करिती ती दुःखा पात्र शत्रु ॥२॥ प्रल्हादें जनक बिभीषणें बंधु । राज्य माता निंदु भरतें केली ॥३॥ तुका म्हणे सर्व धर्म हरीचे पाय । आणीक उपाय दुःखमूळ ॥४॥

८४. मान अपमान गोवे । अवघे गुंडूनी ठेवावे ॥१॥ हेंचि देवाचें दर्शन । सदा राहे समाधान ॥२॥ शांतीची वसती । तेथें खुंटे काळगती ॥३॥ आली ऊर्मी साहे । तुका म्हणें थोडे आहे ॥४॥

८५. थोडें आहे थोडें आहे । चित्त साह्य जालिया ॥१॥ हर्षामर्ष नाहीं अंगीं । पांडुरंगीं सरले ते ॥२॥ अवघ्या साधनांचे सार । न लगे फार शोधावें ॥३॥ तुका म्हणे लटिकें पाहे । सांडी देह अभिमान ॥४॥

८६. आतां उघडी डोळे । जरी अद्यापि न कळे । तरी मातेचिया खोळे । दगड आला पोटासी ॥१॥ मनुष्यदेह ऐसा निध । साधील तें साधे सिद्ध । करूनि प्रबोध । संत पार उतरले

॥२॥ नाव चंद्रभागे तीरीं । उभी पुंडलिकाचे द्वारीं । कट धरूनियां करीं । उभाउभीं पालवी ॥३॥ तुका म्हणें फुकासाठीं । पायीं घातलिया मिठी । होतो उठाउठी । लवकरीच उतार ॥४॥

८७. न करीं रे संग राहें रे निश्चळ । लागों नेदी मळ ममतेचा ॥१॥ या नांव अद्वैत खरें ब्रह्मज्ञान । अनुभवावांचून बडबड ते ॥२॥ इंद्रियांचा जय वासनेचा क्षय । संकल्पाही न ये वरी मन ॥३॥ तुका म्हणे न ये जाणीव अंतरा । अंतरीं या थारा आनंदाचा ॥४॥

८८. पंढरीचा महिमा । देतां आणीक उपमा ॥१॥ ऐसा ठाव नाहीं कोठें । देव उभाउभीं भेटे ॥२॥ आहेति सकळ । तीर्थें काळें देती फळ ॥३॥ तुका म्हणे पेठ । भूमिवरी हें वैकुंठ ॥४॥

८९. तीर्थी धोंडा पाणी । देव रोकडा सज्जनीं ॥१॥ मिळालिया संतसंग । समर्पिता भले अंग ॥२॥ तीर्थी भाव फळे । येथें अनाड तें वळे ॥३॥ तुका म्हणे पाप । गेलें गेल्या फळे ताप ॥४॥

९०. घेऊनियां चक्र गदा । हाचि धंदा करीतो ॥१॥ भक्त राखे पायापासीं । दुर्जनासी संहारी ॥२॥ अव्यक्त तें आकारलें । रूपा आलें गुणवंत ॥३॥ तुका म्हणे पुरवी इच्छा । जया तैसा विठ्ठल ॥४॥

९१. देखोनि पुराणिकाची दाढी । रडे स्फुंदे नाक ओढी ॥१॥ प्रेम खरें दिसे जना । भिन्न अंतरीं भावना ॥२॥ आवरितां नावरे । खूर आठवी नेवरे ॥३॥ बोलों नये मुखा वाटां । म्हणे होता ब्याचा तोटा ॥४॥ दोन्ही सिंगें चारी पाय । खुणा दावी म्हणे होय ॥५॥ मना आणितां बोकड । मेला त्याची चरफड ॥६॥ होता भाव पोटीं । मुखा आलासे शेवटीं ॥७॥ तुका म्हणे कुडें । कळों येतें तें रोकडें ॥८॥

९२. दुर्जनाची गंधी विष्ठेचिये परी । देखोनियां दूरी व्हावें तया ॥१॥ आइका हो तुम्ही मात हे सज्जन । करूं संघष्टन नये बोलों ॥३॥ दुर्जनाचे अंगीं अखंड विटाळ । वाणी रजस्वला स्त्रवे तैसी ॥३॥ दुर्जनाचें भय धरावें त्यापरी । पिसाळल्यावरी धांवे श्वान ॥४॥ दुर्जनाचा भला नव्हे अंगसंग । बोलिलासे त्याग देशाचा त्या ॥५॥ तुका म्हणे किती सांगावें पृथक । अंग कुंभीपाक दुर्जनाचें ॥६॥

९३. अतिवादी नव्हे शुद्ध या बीजाचा । ओळखा जातीचा अंत्यज वो ॥१॥ वेद श्रुति नाहीं ग्रंथ ज्या प्रमाण । श्रेष्ठाचें वचन न मनी जो ॥२॥ तुका म्हणे मद्यपानाचें मिष्टान्न । तैसा तो दुर्जन शिवों नये ॥३॥

९४. शब्दां नाहीं धीर । ज्याची बुद्धि नाहीं स्थिर ॥१॥ त्याचें न व्हावें दर्शन । खळा पंगती भोजन ॥२॥ संतांसी जो निंदी । अधम लोभासाठीं वंदी ॥३॥ तुका म्हणे पोटीं । भाव आणीक जया ओंठीं ॥४॥

९५. चोरें चोरातें करावा उपदेश । आपुला अभ्यास असेल तो ॥१॥ शिंदळीच्या मागें

वेचितां पाउलें । होईल आपुलें तिच्या ऐसें ॥२॥ तुका म्हणे भितो पुढिलिया दत्ता । म्हणऊनि चिंता उपजली ॥३॥

९६. मांडवाच्या दारा । पुढें आणिला म्हातारा ॥१॥ म्हणे नवरी आणा रांड । जाळा नवऱ्याचें तोंड ॥२॥ समय न कळे । काय उपयोगीं ये वेळे ॥३॥ तुका म्हणे खरा । येथूनियां दूर करा ॥४॥

९७. कांही नित्यनेमाविण । अन्न खाय तो श्वान । वायां मनुष्यपण । भार वाहे तो वृषभ ॥१॥ त्याचा होय भूमी भार । नेणें जातीचा आचार । झाला दावेदार । भोगावी अघोर पितरांसी ॥२॥ अखंड अशुभ वाणी । खरें न बोले स्वप्नीं । पापी तयाहुनी । नाहीं आणीक दुसरा ॥३॥ पोट पोसी एकला । भूतीं दया नाहीं ज्याला । पाठीं लागे आल्या । अतिताचे द्वारेशीं ॥४॥ कांहीं संतांचें पूजन । न घडे तीर्थांचें भ्रमण । यमाचा आंदण । शीण थोर पावेल ॥५॥ तुका म्हणे त्यांनीं । मनुष्यपणा केली हानी । देवा विसरूनि । गेलीं म्हणती मी माझें ॥६॥

९८. कन्या गौ करी कथेचा विकरा । चांडाळ तो खरा तया नांवें ॥१॥ गुण अवगुण हे दोन्ही प्रमाण । यातिशीं कारण नाहीं देवा ॥२॥ आशाबद्ध नये करूं तें करिती । तुका म्हणे जाती नरकामधीं ॥३॥

९९. हरिहरां भेद । नाहीं करूं नये वाद ॥१॥ एक एकाचे हृदयीं । गोडी साखरेच्या ठायीं ॥२॥ भेदकासी नाड । एक वेलांटीच आड ॥३॥ उजवे वाम भाग । तुका म्हणे एकचि अंग ॥४॥

१००. वक्त्या आधीं मान । गंध अक्षता पूजन । श्रोता यति झाला जाण । तरी त्या नाहीं उचित ॥१॥ शीर सर्वांगा प्रमाण । यथाविधि कर चरण । धर्माचें पाळण । सकळीं सत्य करावें ॥२॥ पट्ट पुत्र सांभाळी । पिता त्याची आज्ञा पाळी । प्रमाण सकळीं । ते मर्यादा करावी ॥३॥ वरासनीं पाषाण । तो न मानावा सामान्य । येर उपकरणें । सोनियाचीं परी नीच ॥४॥ सोनियाचा पैंजण । मुगुटमणि केला हीण । जयाचें कारण । तया ठायीं अळंकार ॥५॥ सेवका स्वामीसाठीं मान । त्याचें नाम त्याचें धन । तुका म्हणे जाण । तुम्ही संत यदर्थीं ॥६॥

१०१. घरी रांड पोरें मरती उपवासीं । सांगे लोकांपासीं थोरपण ॥१॥ नेऊनियां घरा दाखवावें काय । काळतोंडा जाय चुकवूनि ॥२॥ तुका म्हणे आम्ही जाणों त्या प्रमाण । ठकावे हे जन तैसें नव्हों ॥३॥

१०२. जोहार जी मायबाप जोहार । सारा साधावया आलों वेसकर ॥१॥ मागील पुढील करा झाडा । नाहीं तरी खोडा घालिती जी ॥२॥ फांकूं नका रुजू झालियावांचून । सांगा जी कोण धरती धण्या ॥३॥ आजी मायबाप करा तडातोडी । उद्यां कोण घडी राहेना हो ॥४॥ तुका म्हणे कांही न चले ते बोली । अखेर ते सालीं झाडा देती ॥५॥

१०३. येऊं द्या जी कांहीं वेसकरास । आंतून बाहेर वोजेचा घास ॥१॥ जो यावें तों हातचि

रिता नाहीं । कधीं तरी कांहीं द्यावें घ्यावें ॥२॥ तुका म्हणे उद्यां लावीन मनेरा । जे हे दारोदाराभोंवतीं फिरा ॥३॥

१०४. देती घेती परज गेली । घर खालीं करोनियां ॥१॥ धांवणियाचे न पडे हातीं । खादली राती काळोखी ॥२॥ अवघियांचें अवघें नेलें । कांहीं ठेविलें नाहीं मागें ॥३॥ सोंगें संपादुनि दाविला भाव । गेला आधीं माव वरि होती ॥४॥ घराकडे पाहूं नयेसेंचि जालें । अमानत केलें दिवाणांत ॥५॥ आतां तुका कोणा न लगेचि हातीं । जाली ते निश्चिंती बोलों नये ॥६॥

१०५. शुकसनकादिकीं उभारिला बाहो । परिक्षिती लाहो दिसां सातां ॥१॥ उठाउठीं करी स्मरणाचा धांवा । धरवत देवा नाहीं धीर ॥२॥ त्वरा झाली गरुडा टाकियेलें मागें । द्रौपदीच्या लागें नारायणें ॥३॥ तुका म्हणे करी बहुत तांतडी । प्रेमाची आवडी लोभा पूर ॥४॥

१०६. बोलिलों तें कांहीं तुमचिया हिता । वचन नेणतां क्षमा कीजे ॥१॥ वाट दावी तया न लगे रुसावें । अतित्याई जीवें नाश पावे ॥२॥ निंब दिला रोग तुटावा अंतरीं । पोंभाळिता वरी आंत चरे ॥३॥ तुका म्हणे हित देखण्यासी कळे । पडती आंधळे कूपामाजी ॥४॥

१०७. माकडें मुठीसी धरिले फुटाणे । गुंतले ते नेणे हात तेथें ॥१॥ काय तो तयाचा लेखावा अन्याय । हित नेणे काय आपुलें तें ॥२॥ शुकें नळिकेशीं गोवियेले पाय । विसरोनि जाय पक्ष दोन्ही ॥३॥ तुका म्हणे एक ऐसे पशु जीव । न चले उपाव कांहीं तेथें ॥४॥

१०८. हरि तूं निष्ठुर निर्गुण । नाहीं माया बहु कठिण । नव्हे तें करिसी आन । कवणें नाहीं केलें तें ॥१॥ घेऊनि हरिश्चंद्राचें वैभव । राज्य घोडे भाग्य सर्व । पुत्र पत्नी जीव । डोंबाघरीं वोपविलीं ॥२॥ नळदमयंतीचा वियोग । विघडिला त्यांचा संग । ऐसें जाणे जग । पुराणेंही बोलती ॥३॥ राजा शिबी चक्रवर्ती । कृपाळु दयाळु भूतीं । तुळविलें अंतीं । तुळें मांस तयाचें ॥४॥ कर्ण भिडतां समरंगणीं । बाणीं व्यापियेला रणीं । मागसी पाडोनी । तेथें दात तयाचे ॥५॥ बळी सर्वस्वें उदार । जेणें उभारिला कर । करूनि काहार । तो पाताळीं घातला ॥६॥ श्रियाळाच्या घरीं । धरणें मांडिलें मुरारी । मारविलें करीं । त्याचें बाळ त्या हातीं ॥७॥ तुज भावें जे भजती । त्यांच्या संसारा हे गति । ठाव नाहीं रे पुढती । तुका म्हणे करिसी तें ॥८॥

१०९. बाळ बापा म्हणे काका । तरि कां निपराध पारिखा ॥१॥ जैसा तैसा भाव गोड । पुरवी कोड विठ्ठल ॥२॥ साखरेसी म्हणतां धोंडा । तरि कां तोंडा न रुचे ॥३॥ तुका म्हणे आरुष बोल । नव्हे फोल आहाच ॥४॥

११०. चाल केलासी मोकळा । बोल विठ्ठल वेळोवेळां ॥१॥ तुज पापचि नाहीं ऐसें । नाम घेतां जवळी वसे ॥२॥ पंच पातकांच्या कोडी । नामें जळतां नलगे घडी ॥३॥ केलीं मागें नको राहों । तुज जमान आम्ही आहों ॥४॥ करीं तुजसी करवती । आणिक नामें घेऊं

किती ॥५॥ तुका म्हणे काळा । रीघ नाहीं निघती ज्वाळा ॥६॥

१११. वित्तीं नाहीं तें जवळी असोनि काय । वत्स सांडी माय तेणें न्यायें ॥१॥ प्रीतीचा तो वायु गोड लागे मात । जरी जाय चित्त मिळोनियां ॥२॥ तुका म्हणे अवघें फिकें भावाविण । मीठ नाहीं अन्न तेणें न्यायें ॥३॥

११२. काय काशी करिती गंगा । भीतरीं चांगा नाहीं तो ॥१॥ अधणीं कुचर बाहेर तैसा । नये रसा पाकासी ॥२॥ काय टिळे करिती माळा । भाव खळा नाहीं त्या ॥३॥ तुका म्हणे प्रेमेंविण । अवघा शीण बोले भुंके ॥४॥

११३. शिंदळा साल्याचा नाहीं हा विश्वास । बाईल तो त्यास न विसंबे ॥१॥ दुष्ट बुद्धि चोरी करी निरंतर । तो म्हणे इतर लोक तैसे ॥२॥ तुका म्हणे जया चित्तीं जे वासना । तयाची भावना तयापरी ॥३॥

११४. अनुसरे तो अमर झाला । अंतरला संसार ॥१॥ न देखती गर्भवास । कधीं दास विष्णूचे ॥२॥ विसंबेना माता बाळा । तैसा लळा पाळावा ॥३॥ त्रिभुवनीं ज्याची सत्ता । तो रक्षिता झालिया ॥४॥

११५. आतां केशीराजा हेचि विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसे ॥१॥ देह असो माझा भलतिये ठायीं । चित्त तुझ्या पायीं असों द्यावें ॥२॥ काळाचें खंडण घडावें चिंतन । तनमनधन विन्मुखता ॥३॥ कफवातपित्त देह अवसानीं । ठेवावी वारूनि दुरितें हीं ॥४॥ सावध तों माझीं इंद्रियें सकळ । दिली एक वेळ हाक आधीं ॥५॥ तुका म्हणे तूं या सकळाचा जनिता । येथें ऐक्यता सकळांसी ॥६॥

११६. चित्त तें चिंतन कल्पनेची धांव । जे जे वाढे हाव इंद्रियांची ॥१॥ हात पाव दिसे शरीर चालतां । नांवें भेद सत्ता जीवाची ते ॥२॥ रवीचिये अंगीं प्रकाश सकळां । वचनें निराळा भेद दिला ॥३॥ तुका म्हणे माप वचनाच्या अंगीं । सौख्य काय रंगीं निवडावें ॥४॥

११७. बोलोनियां काय दावूं । तुम्ही जीऊ जगाचे ॥१॥ हेचि आतां माझी सेवा । चिंतन देवा करितों ॥२॥ विरक्तासी देह तुच्छ । नाहीं आस काशाची ॥३॥ तुका म्हणे पायापाशीं । येईन ऐसी वासना ॥४॥

११८. धाकुट्याच्या मुखीं घांस घाली माता । वरी करी सत्ता शहाणिया ॥१॥ ऐसें जाणपणें पडिलें अंतर । वाढे तों तों थोर अंतराय ॥२॥ दोन्ही उभयतां आपणचि व्याली । आवडीची चाली भिन्न भिन्न ॥३॥ तुका म्हणे अंगापासूनि निराळें । निवडिलें बळें रडतें स्तनी ॥४॥

११९. उपदेश तो भलत्या हातीं । झाला चित्तीं धरावा ॥१॥ नये जाऊ पात्रावरी । कवटी सार नारळी ॥२॥ स्त्री पुत्र बंदीजन । नारायण स्मरविती ॥३॥ तुका म्हणे रत्नसार ।

परि उपकार चिंधीचे ॥४॥

१२०. देवाचे म्हणोनी देवीं अनादर । हें मोठें आश्चर्य वाटतसे ॥१॥ आतां येरा जना म्हणावें तें काई । जया भार डोई संसाराचा ॥२॥ त्यजुनी संसार अभिमान सांठा । जुलूम हा मोठा दिसतसे ॥३॥ तुका म्हणे आळस करूनियां साहे । बळें कैसें पाहे वांयां जाती ॥४॥

१२१. संतांचे गुणदोष आणितां या मना । केलिया उगाणा सुकृताचा ॥१॥ पिळोनियां पाहे पुण्याचा परिमळ । चिरोनि केळी केळ गाढव तो ॥२॥ तुका म्हणे गंगे अग्नीसि विटाळ । लावी तो चांडाळ दुःख पावे ॥३॥

१२२. चुंबळीशीं करी चुंबळीचा संग । अंगीं वसे रंग क्रियाहीन ॥१॥ बीजाऐसें फळ दावी परिपाकीं । परिमळ लौकिकीं जातीऐसा ॥२॥ माकडाच्या गळां रत्न कुळांगना । सांडूनियां सुना बिदी धुंडी ॥३॥ तुका म्हणे ऐसा व्याली ते गाढवी । फजिती ते व्हावी आहे पुढें ॥४॥

१२३. सांपडला संदीं । मग बळिया पडे बंदीं ॥१॥ ऐसी कोणी वाहे वेळ । हातीं काळाच्या सकळ ॥२॥ दाता मागे दान । जाय याचका शरण ॥३॥ तुका म्हणे नेणां । काय सांगों नारायणा ॥४॥

१२४. सर्प विंचू दिसे । धन अभाग्या कोळसे ॥१॥ आला डोळ्यांसि कवळ । तेणें मळलें उजळ ॥२॥ अंगाचे भोवंडी । भोय झाडें फिरती धोंडी ॥३॥ तुका म्हणे नाड । पाप ठाके हिताआड ॥४॥

१२५. न देखोनि कांहीं । म्यां पाहिलें सकळही ॥१॥ जालों अवघियांपरी । मी हें माझें ठेलें दुरी ॥२॥ न घेतां घेतलें । हात पाय उसंतिलें ॥३॥ खादलें न खातां । रसना रस झाली घेतां ॥४॥ न बोलोनि बोलें । केलें प्रगट झांकिलें ॥५॥ नाइकिलें कानीं । तुका म्हणे आलें मनीं ॥६॥

१२६. शरणागत जालों । तेणें मीपणा मुकलों ॥१॥ आतां दिल्याचीच वाट । पाहों नाहीं खटपट ॥२॥ नलगे उचित । कांहीं पाहावें संचित ॥३॥ तुका म्हणे सेवा । माने तैसी करूं देवा ॥४॥

१२७. काखे कडासन आड पडे । खडबड खडबड हुसकलें ॥१॥ दाद करा दाद करा । फजितखोरा लाज नाहीं ॥२॥ अवघा झाला राम राम । कोणी कर्म आचरेना ॥३॥ हरिदासांच्या पडती पायां । म्हणती तयां नागवावें ॥४॥ दोहीं ठायीं फजित झाले । पारणें केलें अवकळा ॥५॥ तुका म्हणे नाश केला । विटंबिला वेश जेणें ॥६॥

१२८. कुटुंबाचा केला त्याग । नाहीं राग जंव गेला ॥१॥ भजन तें वोंगळवाणें । नरका जाणें चुकेना ॥२॥ अक्षराची केली आटी । जरी पोटीं संतनिंदा ॥३॥ तुका म्हणे मागें पाय । तया जाय स्थळासी ॥४॥

१२९. तारतिम वरि तोंडाच पुरतें । अंतरा हें येतें अंतरींचें ॥१॥ ऐसी काय बरी दिसे ठकाठकी । दिसतें लौकिकीं सत्या ऐसें ॥२॥ भोजनांत द्यावें विष कालवूनि । मोह चाळवणीं मारावया ॥३॥ तुका म्हणे मैंद देखों नेदी कुडें । आदराचें पुढें सोंग दावी ॥४॥

१३०. ब्रह्मनिष्ठ काडी । जरी जीवा नांवें मोडी ॥१॥ तया घडली गुरुहत्या । गेला उपदेश तो मिथ्या ॥२॥ सांगितलें कानीं । रूप आपलें वाखाणी ॥३॥ भूतांच्या मत्सरें । ब्रह्मज्ञान नेलें चोरें ॥४॥ शिकल्या सांगे गोष्टी । भेद क्रोध वाहे पोटीं ॥५॥ निंदास्तुति स्तवनीं । तुका म्हणे वेंची वाणी ॥६॥

१३१. इहलोकींचा हा देह । देव इच्छिताती पाहें ॥१॥ धन्य आम्ही जन्मा आलों । दास विठोबाचे झालों ॥२॥ आयुष्याच्या साधनें । सच्चिदानंद पदवी घेणें ॥३॥ तुका म्हणे पावटणी । करूं स्वर्गाची निशाणी ॥४॥

१३२. पंडित वाचक जरी झाला पुरता । तरी कृष्णकथा ऐके भावें । क्षीर तुपा साखरे झालिया भेटी । तैसी पडे मिठी गोडपणें ॥१॥ जाणोनियां लाभ घेईं हा पदरीं । गोड गोडावरी सेवीं बापा । जाणिवेचें मूळ उपडोनि खोड । जरी तुज चाड आहे तुझी ॥२॥ नाना परिमळद्रव्यउपचार । अंगी उटी सार चंदनाची । जेविलियाविण शून्य ते शृंगार । तैसी गोडी हरिकथेविण ॥३॥ ज्याकारणें वेदश्रुति हीं पुराणें । तेंचि विठ्ठलनाणें तिष्ठे कथे । तुका म्हणे येर दगडाची पेवें । खळखळीचें अवघें मूळ तेथें ॥४॥

१३३. आणिकांच्या कापिती माना । निष्ठुरपणा पार नाहीं ॥१॥ करिती बेटे उसणवारी । यमपुरीं भोगावया ॥२॥ सेंदराचें दैवत केलें । नवस बोले तयासी ॥३॥ तुका म्हणे नाचती पोरें । खोडितां येरें अंग दुःखे ॥४॥

१३४. गंधर्व अग्नि सोम भोगिती कुमारी । कोठें चराचरीं त्याग केला ॥१॥ गायत्री स्वमुखें भक्षितसे मळ । मिळाल्या वोहोळ गंगाओघ ॥२॥ कागाचिये विष्ठे जन्म पिंपळासि । पांडवकुळासि पाहतां दोष ॥३॥ शकुंतला सूत कर्ण शृंगी व्यास । यांच्या नामें नाश पातकांसि ॥४॥ गणिका अजामेळ कुब्जा तो विदुर । पाहापां विचार पिंगळेचा ॥५॥ वाल्हा विश्वामित्र वसिष्ठ नारद । यांचें पूर्व शुद्ध काय आहे ॥६॥ न व्हावीं तीं कर्में जालीं नरनारी । अनुतापें हरी स्मरतां मुक्त ॥७॥ तुका म्हणे पूर्व नाठवी श्रीहरी । मूळ जो उच्चारी नरक त्यासी ॥८॥

१३५. सोनियाचें ताट क्षीरीनें भरिलें । भक्षावया दिलें श्वानालागीं ॥१॥ मुक्ताफळहार खरासि घातला । कस्तुरी सुकराला चोजविली ॥२॥ वेदपरायण बधिरा सांगे ज्ञान । तयाची ते खूण काय जाणे ॥३॥ तुका म्हणे ज्याचें तोचि एक जाणे । भक्तीचें महिमान साधु जाणे ॥४॥

१३६. ऐसा हा लौकिक कदा राखवेना । पतितपावना देवराया ॥१॥ संसार करितां म्हणती हा

दोषी । टाकितां आळसी पोटपोसा ॥२॥ आचार करितां म्हणती हा पसारा । न करितां नरा निंदिताती ॥३॥ संतसंग करितां म्हणती हा उपदेशी । येरा अभाग्यासी ज्ञान नाहीं ॥४॥ धन नाहीं त्यासी ठायींचा करंटा । समर्थासि ताठा करिताती ॥५॥ बहु बोलों जातां म्हणती हा वाचाळ । न बोलतां सकळ म्हणती गर्वी ॥६॥ भेटिसि नवजातां म्हणती हा निष्ठूर । येतां जातां घर बुडविलें ॥७॥ लग्न करूं जातां म्हणती हा मातला । न करितां जाला नपुंसक ॥८॥ निपुत्रिका म्हणती पहा हो चांडाळ । पातकाचें मूळ पोरवडा ॥९॥ लोक जैसा ओक धरितां धरवेना । अभक्ता जिरे ना संतसंग ॥१०॥ तुका म्हणे आतां आइका वचन । त्यजुनियां जन भक्ति करा ॥११॥

१३७. धर्म रक्षावयासाठीं । करणें आटी आम्हासि ॥१॥ वाचा बोलों वेदनीती । करूं संतीं केलें तें ॥२॥ न बाणतां स्थिति अंगीं । कर्म त्यागी लंड तो ॥३॥ तुका म्हणे अधम त्यासी । भक्ति दूषी हरीची ॥४॥

१३८. चवदा भुवनें जयाचिये पोटीं । तोचि आम्हीं कंठीं सांठविला ॥१॥ काय एक उणें आमुचिये घरीं । वोळंगती द्वारीं रिद्धिसिद्धी ॥२॥ असुर जयानें घातले तोडरीं । आम्हांसि तो जोडी कर दोन्ही ॥३॥ रूप रेखा नहीं जयासी आकार । आम्हीं तो साकार भक्तीं केला ॥४॥ अनंत ब्रह्मांडें जयाचिये अंगीं । समान तो मुंगी आम्हासाठीं ॥५॥ तुका म्हणे आम्ही देवाहूनी बळी । जालों हे निराळीं ठेवुनि आशा ॥६॥

१३९. केला मातीचा पशुपति । परि मातीसी काय महती । शिवपूजा शिवासि पावे । माती मातीमाजी सामावे ॥१॥ तैसे पूजिती आम्हां संत । पूजा घेतो भगवंत । आम्ही किंकर संतांचे दास । संत पदवी नको आम्हांस ॥२॥ केला पाषाणाचा विष्णु । परी पाषाण नव्हे विष्णु । विष्णुपूजा विष्णुसि अर्पे । पाषाण राहे पाषाणरूपें ॥३॥ केली कांशाची जगदंबा । परि कांसे नव्हे अंबा । पूजा अंबेची अंबेला घेणें । कांसे राहे कांसेंपणें ॥४॥ ब्रह्मानंद पूर्णामाजी । तुका म्हणे केली कांजी । ज्याची पूजा तेणेंचि घेणें । आम्हा पाषाणरूप राहणें ॥५॥

१४०. ते माझे सोयरे सज्जन सांगाती । पाय आठविती विठोबाचे ॥१॥ येरा मान विधिपाळणापुरते । देवाचीं तीं भूतें म्हणोनियां ॥२॥ सर्वभावें झालों वैष्णवांचा दास । करीन त्यांची आस उच्छिष्टाची॥३॥ तुका म्हणे जैसे आवडती हरिदास । तैसी नाहीं आस आणिकांची ॥४॥

१४१. दया तिचें नांव भूतांचें पाळण । आणिक निर्दळण कंटकांचें ॥१॥ धर्मनीतीचा हा ऐकावा वेव्हार । निवडिलें सार असार तें ॥२॥ पाप त्याचें नांव न विचारितां नीत । भलतेंचि उन्मत्त करी सदा ॥३॥ तुका म्हणे धर्म रक्षावयासाठीं । देवासही आटी जन्म घेणें ॥४॥

१४२. करावें गोमटें । बाळा माते तैं उमटे ॥१॥ आपुलिया जीवाहुनी । असे वाल्हें

तें जननी ॥२॥ वियोग तो तिस । त्याच्या उपचारें विष ॥३॥ तुका म्हणे पाय । डोळा सुखावे त्या न्यायें ॥४॥

१४३. कन्या सासुऱ्यासी जाये । मागें परतोनि पाहे ॥१॥ तैसें जालें माझ्या जिवा । केव्हां भेटसी केशवा ॥२॥ चुकलिया माय । बाळ हुरू हुरू पाहे ॥३॥ जीवनावेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी ॥४॥

१४४. हातीं होन दाविति बेणा । करिती लेंकीची धारणा ॥१॥ ऐसे धर्म झाले कलीं । पुण्य रंक पाप बळी ॥२॥ सांडिले आचार । द्विज चाहाड झाले चोर ॥३॥ टिळे लपविती पातडी । लेती विजार कातडीं ॥४॥ बैसोनियां तक्तां । अन्योविण पिडिती लोकां ॥५॥ मुदबख लिहिणें । तेल तूप साबण केणें ॥६॥ नीचाचे चाकर । चुकलिया खाती मार ॥७॥ राजा प्रजा पीडी । क्षेत्री दुश्चितासी तोडी ॥८॥ वैश्यशूद्रादिक । हे तों सहज नीच लोक ॥९॥ अवघे बाह्य रंग । आंत हिरवें वरी सोंग ॥१०॥ तुका म्हणे देवा । काय निद्रा केली धांवा ॥११॥

१४५. साळंकृत कन्यादान । पृथ्वीदानाच्या समान ॥१॥ परि तें न कळे या मूढा । येईल कळों भोग पुढां ॥२॥ आचरतां कर्म । भरे पोट राहे धर्म ॥३॥ सत्या देव साहे । ऐसें करूनियां पाहें ॥४॥ अन्न मान धन । हें तों प्रारब्धाआधीन ॥५॥ तुका म्हणे सोसे । सुख आतां पुढें नासे ॥६॥

१४६. दिवट्या वाद्य लावूनि खाणे । करूनि मंडण दिली हातीं ॥१॥ नवरा नेईल नवरी घरा । पूजन वरा पाद्याचें ॥२॥ गौरविली विहिण व्यावी । घडिलें कांहीं ठेवूं नका ॥३॥ करूं द्यावें व्हावें बरें । ठायींचें कोरे न कळेचि ॥४॥ वऱ्हाडियांचे लागे पाठीं । जैसी उटी कातेली ॥५॥ तुका म्हणे जोडिला थुंका । पुढें नरका सामग्री ॥६॥

१४७. ब्रह्महत्या मारिल्या गाई । आणीक काई पाप केलें ॥१॥ ऐका जेणें विलिकी कन्या । पवाडे त्या सुण्याचे ॥२॥ नरमांस खादली भाडी । हाका हाडी म्हणोनी ॥३॥ अवघें पाप केलें तेणें । जेणें सोनें अभिळासिलें ॥४॥ उच्चारितां मज तें पाप । जिव्हे कांप सुटतसे ॥५॥ तुका म्हणे कोरान्न रांड । बेटा भांड मागेना कां ॥६॥

१४८. याचा कोणी करी पक्ष । तोही त्याशीं समतुल्य ॥१॥ फुकासाठीं पावे दुःखाचा विभाग । पूर्वजाशीं लाग निरयदंडीं ॥२॥ ऐके राजा न करी दंड । जरि या लंड दुष्टासी ॥३॥ तुका म्हणे त्याचें अन्न । मद्यपानाचे समान ॥४॥

१४९. कपट कांही एक । नेणें भुलवावयाचे लोक ॥१॥ तुमचें करितों कीर्तन । गातों उत्तम ते गुण ॥२॥ दाऊं नेणें जडाबुटी । चमत्कार उठाउठी ॥३॥ नाहीं शिष्यशाखा । सांगों अयाचित लोकां ॥४॥ नव्हें मठपति । नाहीं चाहुरांची वृत्ति ॥५॥ नाहीं देवार्चन । असे मांडिलें दुकान ॥६॥

नाहीं वेताळ प्रसन्न । कांहीं सांगों खाणखूण ॥७॥ नव्हे पुराणिक । करणें सांगणें आणीक ॥८॥ नाहीं जाळीत भणदीं । उदो म्हणोनि आनंदी ॥९॥ नेणें वाद घटा पटा । करितां पंडित करंटा ॥१०॥ नाहीं हालवीत माळ । भोवतें मेळवूनि गबाळ ॥११॥ आगमीचें नेणें । कुडें स्तंभन मोहन उच्चाटण ॥१२॥ नोहे त्यांच्या ऐसा । तुका निरयवासी पिसा ॥१३॥

१५०. रडोनिया मान । कोण मागतां भूषण ॥१॥ देवें दिलें तरी गोड । राहे रुचि आणि कोड ॥२॥ लावितां लावणी । विके भीके केज्या दानी ॥३॥ तुका म्हणे धीरा । विण कैसा होतो हिरा ॥४॥

१५१. पूज्या एकासनीं आसनीं आसन । बैसतां गमन मातेशीं तें ॥१॥ सांगतों ते धर्म नीतीचे संकेत । सावधान हित व्हावें तरी ॥२॥ संता ठाया ठाव पूजनाची इच्छा । जीवनींच वळसा सांपडला ॥३॥ तुका म्हणे एकाएकीं वरासन । दुजें तेथें भिन्न अशोभ तें ॥४॥

१५२. जेणें मुखें स्तवी । तेंचि निंदेपाठीं लावीं ॥१॥ ऐसी अधमाची याती । लोपी सोनें खाय माती ॥२॥ गुदद्वारावाटे । मिष्टान्नाचा नरक लोटे ॥३॥ विंचु लाभेविण । तुका म्हणे वाहे शीण ॥४॥

१५३. अधमाची यारी । रंग पतंगाचे परी ॥१॥ विटे न लगतां क्षण । मोल जाय वांयांविण ॥२॥ सर्पाचिया परी । विषें भरला कल्हारीं ॥३॥ तुका म्हणे देवा । मज झणी ऐसे दावा ॥४॥

१५४. आणिकाची स्तुति आम्हां ब्रह्महत्या । एकावांचूनि त्या पांडुरंगा ॥१॥ आम्हां विष्णुदासां एकविध भाव । न म्हणों या देव आणिकासी ॥२॥ शतखंड माझी होईल रसना । जरी या वचना पालटेन ॥३॥ तुका म्हणे मज आणिका संकल्पें । अवघींच पापें घडतील ॥४॥

१५५. तान्हेल्याची धणी । फिटे गंगा नव्हे उणी ॥१॥ माझे मनोरथ सिद्धी । पाववावे कृपानिधि ॥२॥ तूं तों उदाराचा राणा । माझी अल्पचि वासना ॥३॥ कृपादृष्टीं पाहें । तुका म्हणे होई साहे ॥४॥

१५६. संतांचा अतिक्रम । देव पूजा तो अधर्म ॥१॥ येती दगड तैसे वरी । मंत्रपुष्प देवाशिरीं ॥२॥ अतीतासी गाळी । देवा नैवेद्यासी पोळी ॥३॥ तुका म्हणे देवा । ताडन भेदकाची सेवा ॥४॥

१५७. करणें तें देवा । हेचि एक पावे सेवा ॥१॥ अवघें घडे येणें सांग । भक्त देवाचें तें अंग ॥२॥ हेंचि एक वर्म । काय बोलिला तो धर्म ॥३॥ तुका म्हणे खरें । खरें त्रिवाचा उत्तरें ॥४॥

१५८. मागें नेणपणें घडलें तें क्षमा । आतां देतों सीमा करूनियां ॥१॥ परनारीचें जया घडेल गमन । दावीतो वदन जननीरत ॥२॥ उपदेशावरी मन नाहीं हातीं । तो आम्हां पुढती पाहूं नये ॥३॥ तुका म्हणे साक्षी असों द्यावें मन । घातली ते आण पाळावया ॥४॥

१५९. आणिकाच्या घातें । ज्यांची निवतील चित्तें ॥१॥ तेचि ओळखावे पापी । निरयवासी शीघ्रकोपी ॥२॥ जो कान पसरोनी । ऐके वदे दुष्ट वाणी ॥३॥ तुका म्हणे भांडा । धीर नाहीं ज्याच्या तोंडा ॥४॥

१६०. केली सीताशुद्धि । मूळ रामायणा आधीं ॥१॥ ऐसा प्रतापी गहन । सकळ भक्तांचें भूषण ॥२॥ जाऊनी पाताळा । केली देवीची अवकळा ॥३॥ राम लक्षुमण । नेले आणिले चोरून ॥४॥ जोडूनियां कर । उभा सन्मुख समोर ॥५॥ तुका म्हणे जपें । वायुसुता जातीं पापें ॥६॥

१६१. काम बांदवडी । काळ घातला तोडरी ॥१॥ तया माझे दंडवत । कपिकुळीं हनुमंत ॥२॥ शरीर वज्रा ऐसें । कवळी ब्रह्मांड जो पुच्छें ॥३॥ रामाच्या सेवका । शरण आलों म्हणे तुका ॥४॥

१६२. हनुमंत महाबळी । रावणाची दाढी जाळी ॥१॥ तया माझा नमस्कार । वारंवार निरंतर ॥२॥ करोनी उड्डाण । केलें लंकेचें शोधन ॥३॥ जाळियली लंका । धन्य धन्य म्हणे तुका ॥४॥

१६३. शरण शरण जी हनुमंता । तुज आलों रामदूता ॥१॥ काय भक्तीच्या त्या वाटा । मज दावाव्या सुभटा ॥२॥ शूर आणि धीर । स्वामिकाजीं तूं सादर ॥३॥ तुका म्हणे रुद्रा । अंजनीचिया कुमरा ॥४॥

१६४. धिग जिणें तो बाईले आधीन । परलोक मान नाहीं दोन्ही ॥१॥ धिग जिणें ज्याचें लोभावरी मन । अतीत पूजन घडेचि ना ॥२॥ धिग जिणें आळस निद्रा जया फार । अमित आहार अघोरिया ॥३॥ धिग जिणें नाहीं विवेक वैराग्य । झुरे मनालागीं साधुपणा ॥४॥ तुका म्हणे धिग ऐसे जाले लोक । निंदक वादक नरका जाती ॥५॥

१६५. अरे हें देह व्यर्थ जावें । ऐसें जरी तुज व्हावें । द्यूत कर्म मनोभावें । सारीपाट खेळावा ॥१॥ मग कैचें हरिचें नाम । निजलिया जागा राम । जन्मोजन्मींचा अधम । दुःख थोर साधिलें ॥२॥ विषयसुखाचा लंपट । दासीगमनीं अतिधीट । तया तेचि वाट । अधोगती जावया ॥३॥ अणीक एक कोड । नरका जावयाची चाड । तरी संतनिंदा गोड । करी कवतुकें सदा ॥४॥ तुका म्हणे ऐसें । मना लावी रामपिसें । नाहीं तरी आलिया सायासें । फुकट जासी ठकोनी ॥५॥

१६६. अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव । प्रतिमा तो देव कैसा नव्हे ॥१॥ नाहीं भाव तया सांगावें तें किती । आपुलाल्या मती पाखांडिया ॥२॥ जया भावे संत बोलिले वचन । नाहीं अनुमोदन शाब्दिकांसि ॥३॥ तुका म्हणे संतीं भाव केला बळी । न कळतां खळी दूषिला देव ॥४॥

१६७. एक तटस्थ मानसीं । एक सहजचि आळसी ॥१॥ दोन्ही दिसती सारखीं । वर्म जाणे तो पारखी ॥२॥ एक ध्यानीं करिती जप । एक बैसुनि घेती झोंप ॥३॥ एका

सर्वस्वाचा त्याग । एका पोटासाठीं जोग ॥४॥ एका भक्ति पोटासाठीं । एका देवासवें गांठी ॥५॥ वर्म पोटीं एका । फळें दोन सांगे तुका ॥६॥

१६८. काय कळे बाळा । बाप सदैव दुबळा ॥१॥ आहे नाहीं हें न कळे । हातीं काय कोण्या वेळे ॥२॥ देखिलें तें दृष्टी । मागे घालूनियां मिठी ॥३॥ तुका म्हणे भावें । माझें मज समजावें ॥४॥

१६९. भजन घाली भोगावरी । अकर्तव्य मनीं धरी ॥१॥ धिग त्याचें साधुपण । विटाळूनी वर्ते मन ॥२॥ नाहीं वैराग्याचा लेश । अर्थचाड जीवीं आस ॥३॥ हें ना तैसें जालें । तुका म्हणे वायां गेलें ॥४॥

१७०. एकादशीस अन्न पान । जे नर करिती भोजन । श्वानविष्टेसमान । अधम जन ते एक ॥१॥ ऐका व्रताचें महिमान । नेमें आचरती जन । गाती ऐकती हरिकीर्तन । ते समान विष्णूशीं ॥२॥ अशुद्ध विटाळसीचें खळ । विडा भक्षितां तांबूल । सांपडे सबळ । काळाहातीं न सुटे ॥३॥ सेज बाज विलास भोग । करिती कामिनीचा संग । तया जोडे क्षयरोग । जन्मव्याधी बळिवंत ॥४॥ आपण न वजे हरिकीर्तना । आणिकां वारी जातां कोणा । त्याच्या पापें जाणा । ठेंगणा तो महा मेरु ॥५॥ तया दंडी यमदूत । जाले तयाचे अंकित । तुका म्हणे व्रत । एकादशी चुकलिया ॥६॥

१७१. करवितां व्रत अर्थ पुण्य लाभे । मोडवितां दोघें नरका जाती ॥१॥ शुद्ध बुद्धि होय दोघां एक मान । चोरासवें कोण जीवें राखे ॥२॥ आपुलें देउनी आपुलाचि घात । न करावा थीत जाणोनियां ॥३॥ देऊनियां वेच धाडी वाराणसी । नेदावें चोरासि चंद्रबळ ॥४॥ तुका म्हणे तप तीर्थ व्रत याग । भक्ति हे मार्ग मोडूं नये ॥५॥

१७२. इनामाची भरली पेंठ । वाहाती दाट मारग ॥१॥ अवघेचि येती वाण । अवघे शकुन लाभाचे ॥२॥ अडचणी केल्या दुरी । देण्या उरी घेण्याच्या ॥३॥ तुका म्हणे जोडी जाली । ते आपुली आपणा ॥४॥

१७३. वेदाचें गव्हर न कळे पाठकां । अधिकार लोकां नाहीं येरा ॥१॥ विठोबाचें नाम सुलभ सोपारें । तारी एकसरें भवसिंधु ॥२॥ जाणत्या असाध्य मंत्र तंत्र काळ । येर तो सकळ मूढ लोक ॥३॥ तुका म्हणे विधिनिषेध लोपला । उच्छेद या झाला मारगाचा ॥४॥

१७४. विधीनें सेवन । विषयत्यागातें समान ॥१॥ मुख्य धर्म देव चित्तीं । आदि अवसानीं अंतीं ॥२॥ बहु अतिशय खोटा । तर्कें होती बहु वाटा ॥३॥ तुका म्हणे भावें । कृपा करीजेते देवें ॥४॥

१७५. येथींचिया अलंकारें । काय खरें पूजन ॥१॥ वैकुंठींच्या लावूं वाटा । सर्व

सांठा ते ठायीं ॥२॥ येथींचिया नाशिवंतें । काय रितें चाळवूं ॥३॥ तुका म्हणे वैष्णवजन । माझे गण समुदाय ॥४॥

१७६. उजळावया आलों वाटा । खरा खोटा निवाडा ॥१॥ बोलविले बोलें बोल । धनी विठ्ठल सन्निध ॥२॥ तरी मनीं नाहीं शंका । बळें एका स्वामीच्या ॥३॥ तुका म्हणे नये आम्हां । पुढें कामा गाबाळ ॥४॥

१७७. बोलावें तें धर्मा मिळे । बरें डोळे उघडूनी ॥१॥ काशासाठीं खावें शेण । जेणें जन थुंके तें ॥२॥ दुजें ऐसें कोण बळी । जें या जाळी अग्नीसी ॥३॥ तुका म्हणे शूर रणीं । गांढें मनीं बुरबुरी ॥४॥

१७८. बरें देवा कुणबी केलों । नाहीं तरि दंभें असतों मेलों ॥१॥ भलें केलें देवराया । नाचे तुका लागे पायां ॥२॥ विद्या असती कांहीं । तरी पडतों अपायीं ॥३॥ सेवा चुकतों संतांची । हेचि नागवण फुकाची ॥४॥ गर्व होता ताठा । जातों यमपंथें वाटा ॥५॥ तुका म्हणे थोरपणें । नरक होती अभिमानें ॥६॥

१७९. दाता नारायण । स्वयें भोगितां आपण ॥१॥ आतां काय उरलें वाचे । पुढें शब्द बोलायाचे ॥२॥ देखती जे डोळे । रूप आपुलें तें खेळे ॥३॥ तुका म्हणे नाद । जाला अवघा गोविंद ॥४॥

१८०. कृपा करुनि देवा । मज साच तें दाखवा ॥१॥ तुम्ही दयावंत कैसे । कीर्ति जगामाजी वसे ॥२॥ पाहोनियां डोळां । हातीं ओढवाल काळा ॥३॥ तुका म्हणे देवा । माझा करावा कुढावा ॥४॥

१८१. ठायींची ओळखी । येईल टाकूं टाका सुखी ॥१॥ तुमचें जाईल इमान । माझे कपाळीं पतन ॥२॥ ठेविला तो ठेवा । अभिळाशे बुडवावा ॥३॥ मनीं न विचारा । तुका म्हणे हे दातारा ॥४॥

१८२. तुझें वर्म ठावें । माझ्या पाडियेलें भावें ॥१॥ रूप कासवीचे परी । धरूनि राहिलों अंतरीं ॥२॥ नेदी होऊं तुटी । मेळवीन दृष्टादृष्टी ॥३॥ तुका म्हणे देवा । चिंतन हे तुझी सेवा ॥४॥

१८३. गहूं एकजाती । परी त्या पाधाणी नासिती ॥१॥ वर्म जाणावें तें सार । कोठें काय थोडें फार ॥२॥ कमाईचें सार । जाती दाविती प्रकार ॥३॥ तुका म्हणे मोल । गुणा मिथ्या फिके बोल ॥४॥

१८४. पुण्यवंत व्हावें । घेतां सज्जनांचीं नांवें ॥१॥ नेघे माझी वाचा तुटी । महालाभ फुकासाठीं ॥२॥ विश्रांतीचा ठाव । पायीं संतांचिया भाव ॥३॥ तुका म्हणे पापें । जाती संतांचिया जपें ॥४॥

१८५. देव होईजेत देवाचे संगती । पतन पंगती जगाचिया ॥१॥ दोहींकडे दोन्ही वाहातील वाटा । करितील सांठा आपुलाला ॥२॥ दुखविले परी नाहीं वरिजिता । आला तोचि चित्ता भाग वरी ॥३॥ तुका म्हणे अंगीं आवडीचें बळ । उपदेश मूळ बीजपात्र ॥४॥

१८६. शोधिसील मूळें । त्याचें करीसी वाटोळें ॥१॥ ऐसे संतांचे बोभाट । तुझे बहु झाले तंट ॥२॥ लौकिका बाहेरी । घाली रोखी जया धरी ॥३॥ तुका म्हणे गुण । तुझा लागलिया शून्य ॥४॥

१८७. वैद्य वांचविती जीवा । तरी कोण ध्यातें देवा ॥१॥ काय जाणो कैसी परी । प्रारब्ध तें ठेवी उरी ॥२॥ अंगीं दैवत संचरे । मग तेथे काय उरे ॥३॥ नवसें कन्यापुत्र होती । तरि कां करणें लागे पती ॥४॥ जाणे हा विचार । स्वामी तुकयाचा दातार ॥५॥

१८८. मार्गी बहुत । याचि गेले साधुसंत ॥१॥ नका जाऊं आडरानें । ऐसीं गर्जती पुराणें ॥२॥ चोखाळिल्या वाटा । न लगे पुसाव्या धोपटा ॥३॥ झळकती पताका । गरुड टके म्हणे तुका ॥४॥

१८९. कार्तिकीचा सोहळा । चला जाऊं पाहूं डोळां । आलें वैकुंठ जवळां । सन्निध पंढरीये ॥१॥ पीक पिकलें घुमरी । प्रेम न समाये अंबरीं । अवघी मातली पंढरी । घरोघरीं सुकाळ ॥२॥ चालती स्थिर स्थिर । गरुड टकयांचे भार । गर्जती गंभीर । टाळ श्रुति मृदंग ॥३॥ मिळालिया भद्रजाती । कैशा आनंदें डुल्लती । शूर उठावती । एक एक आगळे ॥४॥ नामामृत कल्लोळ । वृंदें कोंदलीं सकळ । आलें वैष्णवदळ । कळिकाळ कांपती ॥५॥ आस करिती ब्रह्मादिक । देखुनि वाळवंटींचें सुख । धन्य धन्य मृत्युलोक । म्हणती भाग्याचे कैसे ॥६॥ मरण मुक्ति वाराणसी । पितृऋण गया नासी । उधार नाहीं पंढरीसी । पायापाशीं विठोबाच्या ॥७॥ तुका म्हणे आतां । काय करणें आम्हां चिंता । सकळ सिद्धींचा दाता । तो सर्वथा नुपेक्षी ॥८॥

१९० जया दोषां परिहार । नाहीं नाहीं धुंडितां शास्त्र । ते हरती अपार । पंढरपूर देखिलिया ॥१॥ धन्य धन्य भीमातीर । चंद्रभागा सरोवर । पद्मतीर्थी विठ्ठल वीर । क्रीडास्थळ वेणुनाद ॥२॥ सकळ तीर्थांचें माहेर । भूवैकुंठ निर्विकार । नामाचा गजर । असुरकाळ कांपती ॥३॥ नाहीं उपमा द्यावया । सम तुल्य आणिका ठाया । धन्य भाग्य जया । जे पंढरपुर देखती ॥४॥ उपजोनी संसारीं । एक वेळ पाहें पां पंढरी । महा दोषां कैंची उरी । देवभक्त देखिलिया ॥५॥ ऐसी विष्णूची नगरी । चतुर्भुज नर नारी । सुदर्शन घरटी करी । रीघ न पुरे कळिकाळा ॥६॥ तें सुख वर्णावया गति । एवढी कैंची मज मति । जे पंढरपुरा जाती । ते पावती वैकुंठ ॥७॥ तुका म्हणे या शब्दाचा । जया विश्वास नाहीं साचा । तो अधम जन्मांतरिंचा । जया पंढरी नावडे ॥८॥

१९१. एक नेणतां नाडलीं । एका जाणिवेची भुली ॥१॥ बोलों नेणें मुकें । वेडे वाचाळ काय

निकें ॥२॥ दोहीं सवानाड। विहीर एकीकडे आड ॥३॥ तुका म्हणे कर्म। तुझें कळों नेदी वर्म ॥४॥

१९२. म्हणवितों दास। मज एवढीच आस ॥१॥ परी तें अंगीं नाहीं वर्म। करीं आपला तूं धर्म ॥२॥ बडबडितो तोंडें। रितें भावेविण धेंडें ॥३॥ तुका म्हणे बरा। दावूं जाणतों पसारा ॥४॥

१९३. पूजा समाधान । अतिशय वाढे सीण ॥१॥ हें तों जाणां तुम्ही संत । आहे बोलिली ती नीत ॥२॥ पहिलें पाहिजे तें केलें । सहज प्रसंगीं घडलें ॥३॥ तुका म्हणे माथा । पायीं माझा तुम्हां संतां ॥४॥

१९४. स्वप्नींचिया गोष्टी। मज धरिलें होतें वेठी। जालिया सेवटीं। जागे लटिकें सकळ ॥१॥ वायां भाकिली करुणा। मूळ पावावया शीणा। राव रंक राणा। कैच्या स्थानावरी आहे ॥२॥ सोसिलें तें अंगें। खरें होतें नव्हतां जागें। अनुभवही सांगे। दुःखें डोळे उघडीले ॥३॥ तुका म्हणे संतीं। सावचित केलें अंतीं। नाहीं तरि होती। टाळी बैसोनि राहिली ॥४॥

१९५. आसुरी स्वभाव निर्दय अंतर । मानसीं निष्ठुर अतिवादी ॥१॥ याति कुळ येथें असे अप्रमाण । गुणाचें कारण असे अंगीं ॥२॥ काळेंकुट पितळ सोनें शुद्ध रंग । अंगाचेंच अंग साक्षी देतें ॥३॥ तुका म्हणे बरी जातीसवें भेटी । नवनीत पोटीं सांठविलें ॥४॥

१९६. वासुगीच्या वनीं सीता शोक करी। कांहो अंतरलें रघुनाथ दुरी। येउनि गुंफेमाजी दुष्टें केली चोरी। कांहो मज आणिलें अवघड लंकापुरी ॥१॥ सांग वो त्रीजटे सखिये ऐसी मात। देईल कां नेदी भेटी रघुनाथ। मन उताविळ जाला दुरी पंथ। राहों न सकें प्राण माझा कुडी आंत ॥२॥ काय दुष्ट आचरण होते म्यां केलें । तीर्थ व्रत होतें कवणाचें भंगिलें । गाईवत्सा पत्नीपुरुषा विघडिलें । न कळे वो संचित चरण अंतरले ॥३॥ नाडियेलें आशा मृगकांतिसोनें । धाडिले रघुनाथा पाठिलागे तेणें । उल्लंघिली आज्ञा माव काय मी जाणें । देखुनी सुनाट घेउनि आलें सुनें ॥४॥ नाहीं मूळ मारग लागे आणीक सोय। एकाविण नामें रघुनाथाच्या माय। उपटी पक्षिया एक देउनी पाय। उदकवेढ्यामध्यें तेथें चाले काय ॥५॥ जनकाची नंदिनी दुःखें ग्लांती थोरी । चुकली कुरंगिणी मेळा तैशा परी । संबोखी त्रीजटा स्थिर स्थिर वो करी। येईल तुकयास्वामी राम लंकापुरी ॥६॥

१९७. विट नेघे ऐसें रांधा । जेणें बाधा उपजे ना ॥१॥ तरीच तें गोड राहे । निरें पाहे स्वयंभ ॥२॥ आणिका गुणां पोटीं वाव। दावी भाव आपुला ॥३॥ तुका म्हणे शुद्ध जाती। ते मागुती परतेना ॥४॥

१९८. नव्हतों सावचित्त । तेणें अंतरलें हित ॥१॥ पडिला नामाचा विसर । वाढविला संवसार ॥२॥ लटिक्याचे पुरीं । गेलों वाहोनियां दुरीं ॥३॥ तुका म्हणे नाव । आम्हां सांपडला भाव ॥४॥

१९९. अन्नाच्या परिमळें जरि जाय भूक । तरि कां हे पाक घरोघरीं ॥१॥ आपुलालें तुम्ही करा रे स्वहित । वाचे स्मरा नित्य राम राम ॥२॥ देखोनि जीवन जरि जाय ताहान । तरि कां सांठवण घरोघरीं ॥३॥ देखोनियां छाया सुख न पवीजे । जंव न बैसीजे तया तळीं ॥४॥ हित तरी होय गातां आइकतां । जरि राहे चित्ता दृढ भाव ॥५॥ तुका म्हणे होसी भावेंचि तूं मुक्त । काय करिसी युक्त जाणिवेची ॥६॥

२००. काय उणें आम्हां विठोबाचे पायीं । नाहीं ऐसें काई येथें एक ॥१॥ तें हें भोंवतालें ठायीं वांटूं मन । बराडी करून दारोदारीं ॥२॥ कोण बळी माझ्या विठोबावेगळा । आणीक आगळा दुजा सांगा ॥३॥ तुका म्हणे मोक्ष विठोबाचे गांवीं । फुकाचीं लुटावीं भांडारें तीं ॥४॥

२०१. सेवितों हा रस वांटितों आणिकां । घ्यारे होऊं नका रानभरी ॥१॥ विटेवरी ज्याचीं पाउलें समान । तोचि एक दानशूर दाता ॥२॥ मनाचे संकल्प पाववील सिद्धी । जरी राहे बुद्धी याचे पायीं ॥३॥ तुका म्हणे मज धाडिलें निरोपा । मारग हा सोपा सुखरूप ॥४॥

२०२. ऐसे ऐसियानें भेटती ते साधु । ज्याच्या दर्शनें तुटे भवबंधू । जे कां सच्चिदानंदीं नित्यानंदु । जे कां मोक्षसिद्धी तीर्थ वंदू रे ॥१॥ भाव सर्व कारण मूळ बंदु । सदा समबुद्धि नास्तिक्य भेदु । भूतकृपा मोडी द्वेषकंदु । शत्रु मित्र पुत्र समकरीं बंधु रे ॥२॥ मन बुद्धि काया वाचा शुद्ध करी । रूप सर्वत्र देखोनि नमस्कारीं । लघुत्व सर्व भावें अंगीकारीं । सांडी मांडी मीतूंपण ऐसी थोरी रे ॥३॥ अर्थकामचाड नाहीं चित्ता । मानामान मोह माया मिथ्या । वर्ते समाधानी जाणोनि नेणता । साधु भेट देती तया अवचिता रे ॥४॥ मनीं दृढ धरीं विश्वास । नाहीं सांडीमांडीचा सायास । साधुदर्शन नित्यकाळ त्यास । तुका म्हणे जो विटला जाणीवेस रे ॥५॥

२०३. भवसागर तरतां । कां रे करीतसां चिंता । पैल उभा दाता । कटीं कर ठेवूनियां ॥१॥ त्याचे पायीं घाला मिठी । मोल ने घे जगजेठी । भावा एकासाठीं । खांदां वाहे आपुल्या ॥२॥ सुखें करावा संसार । न संडावें दोन्ही वार । दया क्षमा घर । चोजवित येतील ॥३॥ भुक्तिमुक्तीची चिंता । दैन्य नाहीं दरिद्रता । तुका म्हणे दाता । पांडुरंग वोळगिल्या ॥४॥

२०४. जें कां रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुले ॥१॥ तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥२॥ मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनाचें चित्त ॥३॥ ज्यासि आपंगिता नाहीं । त्यासि धरी जो हृदयीं ॥४॥ दया करणें जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥५॥ तुका म्हणे सांगूं किती । त्याचि भगवंताच्या मूर्ती ॥६॥

२०५. याजसाठीं भक्ति । जगीं रूढवावया ख्यातिं ॥१॥ नाहीं तरी कोठें दुजें । आहे बोलावया सहजें ॥२॥ गौरवावयासाठीं । स्वामिसेवेची कसोटी ॥३॥ तुका म्हणे अळंकारा । देवभक्त लोकीं खरा ॥४॥

२०६. अमंगळ वाणी । नये आइकों ते कानीं ॥१॥ जो हे दूषी हरिची कथा । त्यासि क्षयरोगच्यथा ॥२॥ याति वर्ण श्रेष्ठ । परि तो चांडाळ पापिष्ठ ॥३॥ तुका म्हणे पाप । माय न आवडे ज्या बाप ॥४॥

२०७. कैसा सिंदळीचा । नव्हे ऐसी ज्याची वाचा ॥१॥ वाचे नुच्चारी गोविंदा । सदा करी परनिंदा ॥२॥ कैसा निरयगांवा । जाऊन पवे विसांवा ॥३॥ तुका म्हणे दंड । कैसा न पवे तो लंड ॥४॥

२०८. गर्भाचें धारण । तिनें वागविला शिण ॥१॥ व्याली कुऱ्हाडीचा दांडा । वर न घालीच तोंडा ॥२॥ उपजला काळ । कुळा लाविला विटाळ ॥३॥ तुका म्हणे जाय । नरका अभक्ताची माय ॥४॥

२०९. पतनासि नेती । तिचा खोटा स्नेह प्रीती ॥१॥ विधिपुरतें कारण । बहू वारावें वचन ॥२॥ सर्वस्वासि नाडी । ऐसी लाघवाची वेडी ॥३॥ तुका म्हणे दुरीं । राखतां हे तेचि बरी ॥४॥

२१०. देव आड आला । तो मी भोगितो उगला । अवघा निवारिला । शीण शुभअशुभाचा ॥१॥ जीवशिवाचे भातुकें । केलें क्रीडाया कौतुकें । कैचीं येथें लोकें । हा आभास अनित्य ॥२॥ विष्णुमय खरें जग । येथें लागतसे लाग । वांटिले विभाग । वर्णधर्म हा खेळ ॥३॥ अवघी एकाचीच वीण । तेथें कैचें भिन्नाभिन्न । वेदपुरुष नारायण । तेणें केला निवाडा ॥४॥ प्रसादाचा रस । तुका लाधला सौरस । पायापाशीं वास । निकट नव्हे निराळा ॥५॥

२११. आचरणा ठाव । नाहीं अंगीं स्वतां भाव ॥१॥ करवी आणिकांचे घात । खोडी काढूनि पंडित ॥२॥ श्वानाचिया परी । मिष्टान्नासि विटाळ करी ॥३॥ तुका म्हणे ऐसा । सटवेचि ना पांचा दिसां ॥४॥

२१२. ध्यानीं योगीराज बैसले कपाटीं । लागे पाटोवाटीं तयांचिया ॥१॥ ताहान भूक त्यांचें राखे शीत उष्ण । जाले उदासीन देहभावें ॥२॥ कोण सखें तयां आणीक सोयरें । असे त्यां दुसरें हरीविण ॥३॥ कोण सुख त्यांच्या जीवासि आनंद । नाहीं राज्यमद घडी तयां ॥४॥ तुका म्हणे विष अमृतासमान । कृपा नारायण करितां होय ॥५॥

२१३. न व्हावें तें जालें देखियेले पाय । आतां फिरूं काय मागें देवा ॥१॥ बहुत दिस होतों करीत हे आस । तें आलें सायास फळ आजि ॥२॥ कोठवरी जिणे संसाराची आशा । उगवूं हा फांसा एथूनियां ॥३॥ बुडाले तयांचा मूळ ना मारग । लागला तो लाग सांडूनियां ॥४॥ पुढें उल्लंघितां दुःखाचे डोंगर । नाहीं अंतपार गर्भवासा ॥५॥ तुका म्हणे कास धरीन पीतांबरीं । तूं भवसागरीं तारूं देवा ॥६॥

२१४. वैकुंठा जावया तपाचे सायास । लागे जीवा नाश करणें बहु ॥१॥ तया

पुंडलिकें केला उपकार । फेडावया भार पृथ्वीचा ॥२॥ तुका म्हणे केली सोपी पायवाट । पंढरी वैकुंठ भूमीवरी ॥३॥

२१५. शोकें शोक वाढे । हिमतीचे धीर गाढे ॥१॥ येथें केलें नव्हे काई । लंडीपण खोटें भाई ॥२॥ करिती होया होय । परी नव्हे कोणी साह्य ॥३॥ तुका म्हणे घडी । साधिलिया एक थोडी ॥४॥

२१६. म्हणउनि खेळ मांडियेला ऐसा । नाहीं कोणी दिशा वर्जीयली ॥१॥ माझिया गोतें हें वसलें सकळ । न देखिजे मूळ विटाळाचें ॥२॥ करूनि ओळखी दिली एकसरें । न देखों दुसरें विषमासी ॥३॥ तुका म्हणे नाहीं काळापाशीं गोवा । स्थिति मति देवावांचूनियां ॥४॥

२१७. वैष्णव तो जया । अवघी देवावरी माया ॥१॥ नाहीं आणीक प्रमाण । तन धन तृण जन ॥२॥ पडतां जड भारी । नेमा न टळे निर्धारीं ॥३॥ तुका म्हणे याती । हो कां तयाची भलती ॥४॥

२१८. करोत तपादि साधनें । कोणी साधोत गोरांजनें ॥१॥ आम्ही न वजों तया वाटा । नाचूं पंढरीचोहटां ॥२॥ पावोत आत्मस्थिति । कोणी म्हणोत उत्तम मुक्ति ॥३॥ तुका म्हणे छंद । आम्हा हरिच्या दासां निंद्य ॥४॥

२१९. देव सखा जरी । जग अवघें कृपा करी ॥१॥ ऐसा असोनि अनुभव । कासाविस होती जीव ॥२॥ देवाची जतन । तया बाधूं न शके अग्न ॥३॥ तुका म्हणे हरी । प्रल्हादासि यत्न करी ॥४॥

२२०. भले म्हणवितां संतांचे सेवक । आइत्याची भीक सुखरूप ॥१॥ ठसावितां बहु लागती सायास । चुकल्या घडे नाश अल्प वर्म ॥२॥ पाकसिद्धी लागे संचित आइतें । घडतां सोई तें तेव्हां गोड ॥३॥ तुका म्हणे बऱ्या सांगतांचि गोष्टी । रणभूमि दृष्टी न पडतां ॥४॥

२२१. संतसमागम एखादिये परी । व्हावें त्यांचे द्वारीं श्वानयाती ॥१॥ तेथे रामनाम होईल श्रवण । घडेल भोजन उच्छिष्टाचें ॥२॥ कामारीं बटीक सेवेचा सेवक । दीनपणें रंक तेथें भले ॥३॥ तुका म्हणे सर्व सुख त्या संगती । घडेल पंगती संतांचिया ॥४॥

२२२. वाघाचा कलभूत दिसे वाघाऐसा । परी नाहीं दशा साच अंगीं ॥१॥ बाहेरील रंग निवडी कसोटी । संघटणें भेटी आपेआप ॥२॥ शिकविलें तैसें नाचावें माकडें । न चले त्यापुढें युक्ति कांहीं ॥३॥ तुका म्हणे करी लटिक्याचा सांठा । फजित तो खोटा शीघ्र होय ॥४॥

२२३. सिंदळीचे सोइरे चोराचीया दया । तेही जाणा तया संवसर्गी ॥१॥ फुकासाठीं भोगे दु:खाचा तो वांटा । उभारोनि कांटा वाटेवरी ॥२॥ सर्प पोसूनियां दुधाचाही नास । केलें थीतां विष अमृताचें ॥३॥ तुका म्हणे त्यासी न करितां दंडन । पुढिल्या खंडन नव्हे दोषा ॥४॥

२२४. तेणें सुखें माझें निवविलें अंग । विठ्ठल हें जग देखियेलें ॥१॥ कवतुकें करुणा भाकीतसें लाडें । आवडी बोबडें बोलोनियां ॥२॥ मज नाहीं दशा अंतरीं दुःखाची । भावना भेदाची सर्व गेली ॥३॥ तुका म्हणे सुख जालें माझ्या जीवा । रंगलों केशवा तुझ्या रंगें ॥४॥

२२५. विठ्ठल सोयरा सज्जन विसांवा । जाइन त्याच्या गांवा भेटावया ॥१॥ शीण भाग त्यासी सांगेन आपुला । तो माझा बापुला सर्व जाणे ॥२॥ माय माउलिया बंधुवर्ग जाणा । भाकीन करुणा सकळिकांसी ॥३॥ संत महंत सिद्ध महानुभाव मुनि । जीवभाव जाऊनि सांगेन त्या ॥४॥ माझिये माहेरीं सुखा काय उणें । नलगे येणें जाणें तुका म्हणे ॥५॥

२२६. ध्याइन तुझें रूप गाइन तुझें नाम । आन न करी काम जिव्हामुखें ॥१॥ पाहिन तुझे पाय ठेवीन मी डोई । पृथक तें कांहीं न करीं आन ॥२॥ तुझेचि गुणवाद आइकेन कानीं । आणिकांची वाणी पुरे आतां ॥३॥ करिन सेवा करें चालेन मी पायीं । आणीक न वजे ठायीं तुजविण ॥४॥ तुका म्हणे जीव ठेवीन मी पायीं । आणीक ते कांहीं देऊं कवणा ॥५॥

२२७. माझें चित्त तुझे पायीं । राहे ऐसें करीं कांहीं । धरोनियां बाहीं । भव हा तारीं दातारा ॥१॥ चतुरा तूं शिरोमणि । गुणलावण्याची खाणी । मुगुट सकळां मणि । धन्य तूंचि विठोबा ॥२॥ करीं तिमिरांचा नाश । उदयो होउनि प्रकाश । तोडीं आशापाश । करीं वास हृदयीं ॥३॥ पाहें गुंतलों नेणतां । माझी असो तुम्हा चिंता । तुका ठेवी माथा । पायीं आतां राखावें ॥४॥

२२८. आमुचें उचित हेचि उपकार । आपुलाचि भार घालूं तुज ॥१॥ भूक लागलिया भोजनाची आळी । पांघुरण काळीं शीताचिये ॥२॥ जेणें काळीं उठी मनाची आवडी । तेचि मागों घडी आवडे तें ॥३॥ दुःख येवो नेदी आमुचिया घरा । चक्र करी फेरा भोंवताला ॥४॥ तुका म्हणे नाहीं मुक्तीसवें चाड । हेंचि आम्हां गोड जन्म घेतां ॥५॥

२२९. मी दास तयाचा जया चाड नाहीं । सुख दुःख दोहां विरहित जो ॥१॥ राहिलासे उभा भींवरेचे तीरीं । कट दोहीं करीं धरोनियां ॥२॥ नवल काय तरी पाचारितां पावे । न त्वरित धांवे भक्तिकाजें ॥३॥ सर्व भार माझा त्यासी आहे चिंता । तोचि माझा दाता स्वहिताचा ॥४॥ तुका म्हणे त्यास गाईन मी गीतीं । आणीक तें चित्तीं न धरीं कांहीं ॥५॥

२३०. यासी कोणी म्हणे निंदेचीं उत्तरें । नागवला खरें तोचि एक ॥१॥ आड वाटे जातां लावी नीट सोई । धर्मनीती तेही ऐसी आहे ॥२॥ नाइकतां सुखें करावें ताडण । पाप नाहीं पुण्य असे फार ॥३॥ जन्म व्याधि फार चुकतील दुःखें । खंडावा हा सुखें मान त्याचा ॥४॥ तुका म्हणे निंब दीधल्यावांचून । अंतरींचा शीण कैसा जाय ॥५॥

२३१. निवडे जेवण शेवटीच्या घांसें । होय त्याच्या ऐसें सकळही ॥१॥ न पाहिजे जाला बुद्धीचा पालट । केली खटपट जाय वांयां ॥२॥ संपादिलें व्हावें धरिलें तें सोंग । विटंबना व्यंग

पडिलिया ॥३॥ तुका म्हणे वर्म नेणतां जो रांधी । पाववी ते बुद्धि अवकळा ॥४॥

२३२. दिली हाक मनें नव्हतें जतन । वेगळाले गुण धांव घेती ॥१॥ काम क्रोध मद मत्सर अहंकार । निंदा हिंसा फार माया तृष्णा ॥२॥ इंद्रियांचे भार फिरतील चोर । खाणें घ्यावया घर फोडूं पाहे ॥३॥ माझा तेथें कांहीं न चले पराक्रम । आहे त्याचें वर्म तुझे हातीं ॥४॥ तुका म्हणे आतां करितो उपाय । जेणें तुझे पाय आतुडती ॥५॥

२३३. कृष्ण माझी माता कृष्ण माझा पिता । बहिणी बंधु चुलता कृष्ण माझा ॥१॥ कृष्ण माझा गुरु कृष्ण माझा तारूं । उतरी पैलतीरू भवनदीचा ॥२॥ कृष्ण माझें मन कृष्ण माझें जन । सोइरा सज्जन कृष्ण माझा ॥३॥ तुका म्हणे माझा श्रीकृष्ण विसांवा । वाटे न करावा परता जीवा ॥४॥

२३४. जातो वाराणसी । निरवी गाई घोडे म्हैसी ॥१॥ गेलों येतों नाहीं ऐसा । सत्य मानारे भरंवसा ॥२॥ नका काढूं माझीं पेवें । तुम्ही वरळा भूस खावें ॥३॥ भिकारियाचे पाठीं । तुम्ही घेउनि लागा काठी ॥४॥ सांगाल जेवाया ब्राह्मण । तरी कापाल माझी मान ॥५॥ वोकलिया वोका । म्यां खर्चिला नाहीं रुका ॥६॥ तुम्हीं खावें ताकपाणी । जतन करा माझें लोणी ॥७॥ नाहीं माझे मनीं । पोरें रांडा नागवणी ॥८॥ तुका म्हणे नष्ट । होतें तैसें बोले स्पष्ट ॥९॥

२३५. कास घालोनि बळकट । झालों कळिकाळावरी नीट । केली पायवाट । भवसिंधूवरूनि ॥१॥ या रे या रे लहान थोर । याति भलती नारीनर । करावा विचार । न लगे चिंता कोणासी ॥२॥ कामी गुंतले रिकामे । जपी तपी येथें जमे । लाविले दमामे । मुक्त आणि मुमुक्षा ॥३॥ एकंदर शिक्का । पाठविला येहीलोका । आलों म्हणे तुका । मी नामाचा धारक ॥४॥

२३६. आम्ही वैकुंठवासी । आलों याचि कारणासी । बोलिले जे ऋषी । साच भावें वर्ताया ॥१॥ झाडू संतांचे मारग । आडरानें भरलें जग । उच्छिष्टाचा भाग । शेष उरला तो सेवूं ॥२॥ अर्थ लोपलीं पुराणें । नाश केला शब्दज्ञानें । विषयलोभी मने । साधन हें बुडविलें ॥३॥ पिटूं भक्तीचा डांगोरा । कळिकाळासी दरारा । तुका म्हणे करा । जयजयकार आनंदे ॥४॥

२३७. बळियाचे अंकित । आम्ही जालों बळिवंत ॥१॥ लाताळिला संसार । केला षडऊर्मीचा मार ॥२॥ जन तन धन । केले तृणाही समान ॥३॥ तुका म्हणे आतां । आम्ही मुक्तीचिया माथा ॥४॥

२३८. मृत्युलोकीं आम्हां आवडती परी । नाहीं एका हरिनामेंविण ॥१॥ विटलें हे चित्त प्रपंचापासूनि । वमन तें मनीं बैसलेसें ॥२॥ सोनें रूपें आम्हां मृत्तिकेसमान । माणिक पाषाण खडे जैसे ॥३॥ तुका म्हणे तैशा दिसतील नारी । रिसाचियापरी आम्हांपुढें ॥४॥

२३९. स्त्रियांचा तो संग नको नारायणा । काष्ठा या पाषाणा मृत्तिकेच्या ॥१॥ नाठवे हा

देव न घडे भजन । लांचावलें मन आवरेना ॥२॥ दृष्टिमुखें मरण इंद्रियांच्या द्वारें । लावण्य तें खरें दुःखमूळ ॥३॥ तुका म्हणे जरी अग्नि जाला साधु । तरी पडे बाधूं संघष्टणें ॥४॥

२४०. पराविया नारी रखुमाई समान । हें गेलें नेमून ठायींचेंचि ॥१॥ जाईं वो तूं माते न करीं सायास । आम्ही विष्णुदास तैसे नव्हों ॥२॥ न साहावे मज तुझें हें पतन । नको हें वचन दुष्ट वदों ॥३॥ तुका म्हणे तुज पाहिजे भ्रतार । तरी काय नर थोडे जाले ॥४॥

२४१. भक्तिप्रतिपाळे दीन वो वत्सले । विठ्ठले कृपाळे होसी माये ॥१॥ पडिला विसर माझा काय गुणें । कपाळ हें उणें काय करूं ॥२॥ तुका म्हणे माझें जाळूनि संचित । करीं वो उचित भेट देईं ॥३॥

२४२. तुजविण मज कोण वो सोयरें । आणीक दुसरें पांडुरंगा ॥१॥ लागलीसे आस पाहातुसें वास । रात्री वो दिवस लेखीं बोटीं ॥२॥ काम गोड मज न लगे हा धंदा । तुका म्हणे सदा हेंचि ध्यान ॥३॥

२४३. पढियें तें आम्हीं तुजपाशीं मागावें । जीवींचें सांगावें हितगुज ॥१॥ पाळशील लळे दीन वो वत्सले । विठ्ठले कृपाळे जननिये ॥२॥ जीव भाव तुझ्या ठेवियेला पायीं । तूंचि सर्वा ठायीं एक आम्हां ॥३॥ दुजियाचा संग लागों नेदीं वारा । नाहीं जात घरा आणिकाच्या ॥४॥ सर्वसत्ता एकी आहे तुजपाशीं । ठावें आहे देसी मागेन तें ॥५॥ म्हणउनि पुढें मांडियेली आळी । थिंकोनियां चोळी डोळे तुका ॥६॥

२४४. कोण पर्वकाळ पहासील तीथ । होतें माझें चित्त कासावीस ॥१॥ पाठवीं भातुकें प्रेरी झडकरी । नको राखों उरी पांडुरंगा ॥२॥ न धरावा कोप मजवरी कांहीं । अवगुणी अन्यायी म्हणोनियां ॥३॥ काय रडवीसी नेणतिया पोरा । जाणतिया थोराचिया परी ॥४॥ काय उभी कर ठेवूनियां कटीं । बुझावी धाकुटीं लडिवाळें ॥५॥ तुका म्हणे आतां पदरासी पिळा । घालोनि निराळा नव्हे मग ॥६॥

२४५. कां हो देवा कांहीं न बोलाचि गोष्टी । कां मज हिंपुटी करीतसा ॥१॥ कंठीं प्राण पाहे वचनाची वास । तों दिसे उदास धरिलें ऐसें ॥२॥ येणें काळें बुंथी घेतलीसे खोळ । कां नये विटाळ होऊं माझा ॥३॥ लाज वाटे मज म्हणवितां देवाचा । न पुससी फुकाचा तुका म्हणे ॥४॥

२४६. उचित तें काय जाणावें दुर्बळें । थोरिवेचें काळें तोंड देवा ॥१॥ देतों हाका कोणी नाइकती द्वारीं । ओस कोणी घरीं नाहीं ऐसें ॥२॥ आलिया अतीता शब्दें समाधान । करितां वचन काय वेंचे ॥३॥ तुका म्हणे तुम्हां साजे हें श्रीहरी । आम्ही निलाजिरीं नाहीं ऐसीं ॥४॥

२४७. आम्ही मागों ऐसें नाहीं तुजपाशीं । जरी तूं भीतोसी पांडुरंगा ॥१॥ पाहें विचारूनि आहे तुज ठावें । आम्हीं धालों नांवें तुझ्या एका ॥२॥ ऋद्धिसिद्धि तुझें मुख्य भांडवल । हें तों

आम्हां फोल भक्तीपुढें ॥३॥ तुका म्हणे जाऊं वैकुंठा चालत । बैसोनि निवांत सुख भोगूं ॥४॥

२४८. न लगे हें मज तुझें ब्रह्मज्ञान । गोजिरें सगुण रूप पुरे ॥१॥ लागला उशीर पतितपावना । विसरोनि वचना गेलासि या ॥२॥ जाळोनि संसार बैसलों अंगणीं । तुझें नाहीं मनीं मानसीं हें ॥३॥ तुका म्हणे नको रागेजूं विठ्ठला । उठीं देईं मला भेटी आतां ॥४॥

२४९. कुमुदिनी काय जाणे तो परिमळ । भ्रमर सकळ भोगीतसे ॥१॥ तैसें तुज ठावें नाहीं तुझें नाम । आम्हीच तें प्रेमसुख जाणों ॥२॥ माते तृण बाळा दुधाची ते गोडी । ज्याची नये जोडी त्यासी कामा ॥३॥ तुका म्हणे मुक्ताफळ शिंपीपोटीं । नाहीं त्याची भेटी भोग तिये ॥४॥

२५०. काय सांगों तुझ्या चरणीच्या सुखा । अनुभव ठाउका नाहीं तुज ॥१॥ बोलतां हें कैसें वाटें खरेपण । अमृताचे गुण अमृतासी ॥२॥ आम्ही एकएका ग्वाही मायपुतें । जाणों तें निरुतें सुख दोघें ॥३॥ तुका म्हणे आम्हां मोक्षाचा कांटाळा । कां तुम्ही गोपाळा नेणां ऐसें ॥४॥

२५१. देखोनियां तुझ्या रूपाचा आकार । उभा कटीं कर ठेवूनियां ॥१॥ तेणें माझ्या चित्ता जालें समाधान । वाटतें चरण न सोडावे ॥२॥ मुखें गातों गीत वाजवितां टाळी । नाचतों राउळीं प्रेमसुखें ॥३॥ तुका म्हणे केलें तुझ्या नामापुढें । तुच्छ हें बापुडें सकळही ॥४॥

२५२. आतां येणेंविण नाहीं मज चाड । कोण बडबड करी वांयां ॥१॥ सुख तेंचि दुःख पुण्य पाप खरें । हें तों आम्हां बरें कळों आलें ॥२॥ तुका म्हणे वाचा वाहिली अनंता । बोलायाचें आतां काम नाहीं ॥३॥

२५३. बोलों अबोलणें मरोनियां जिणें । असोनि नसणें जनीं आम्हां ॥१॥ भोगी त्याग जाला संगीच असंग । तोडियेले लाग माग दोन्ही ॥२॥ तुका म्हणे नव्हें दिसतों मी तैसा । पुसणें तें पुसा पांडुरंगा ॥३॥

२५४. अधिकार तैसा दावियेला मार्ग । चालतां हें मग कळों येतें ॥१॥ जाळूं नये नाव पावलेनि पार । मागील आधार बहुतांचा ॥२॥ तुका म्हणे रोग वैद्याचे अंगीं । नाहीं करी जगीं उपकार ॥३॥

२५५. संवसार तीहीं केला पाठमोरा । नाहीं द्रव्यदारा जयां चित्तीं ॥१॥ शुभाशुभ नाहीं हर्षामर्ष अंगीं । जनार्दन जगीं होउनि ठेला ॥२॥ तुका म्हणे देह दिला एकसरें । जयासि दुसरें नाहीं मग ॥३॥

२५६. देहबुद्धि वसे लोभ जयां चित्तीं । आपुले जाणती परावे जे ॥१॥ तयासि चालतां पाहिजे सिदोरी । दुःख पावे करी असत्य तो ॥२॥ तुका म्हणे धर्म रक्षायाकारणें । छाया इच्छी उन्हें तापला तो ॥३॥

२५७. काळें खादला हा अवघा आकार । उत्पत्ति संहार घडामोडी ॥१॥ बीज तो

अंकुर आच्छादिला पोटीं । अनंता सेवटीं एकाचिया ॥२॥ तुका म्हणे शब्दें व्यापिलें आकाश । गुढार हें तैसें कळों नये ॥३॥

२५८. आणीक या काळें न चले उपाय । धरावे ते पाय विठोबाचे ॥१॥ अवघेंचि पुण्य असे तया पोटीं । अवघिया तुटी होय पापा ॥२॥ अवघें मोकळें अवघिया काळें । उद्धरती कुळें नरनारी ॥३॥ काळ वेळ नाहीं गर्भवासदु:खें । उच्चारितां मुखें नाम एक ॥४॥ तुका म्हणे कांहीं न लगे सांडावें । सांगतसें भावें घेती तयां ॥५॥

२५९. न मिळो खावया न वाढो संतान । परि हा नारायण कृपा करो ॥१॥ ऐसी माझी वाचा मज उपदेशी । आणीक लोकांसी हेंचि सांगे ॥२॥ विटंबो शरीर होत कां विपत्ती । परि राहो चित्तीं नारायण ॥३॥ तुका म्हणे नाशिवंत हें सकळ । आठवी गोपाळ तेंचि हित ॥४॥

२६०. पिंड पोसावे हें अधमाचें ज्ञान । विलास मिष्टान्न करूनियां ॥१॥ शरीर रक्षावें हा धर्म बोलती । काय असे हातीं तयाचिया ॥२॥ क्षणभंगुर हें जाय न कळतां । ग्रास गिळी सत्ता नाहीं हातीं ॥३॥ कर्वतिला देह कापियेलें मांस । गेले वनवासा शुकादिक ॥४॥ तुका म्हणे राज्य करितां जनक । अग्नीमाजी एक पाव जळे ॥५॥

२६१. जरी माझी कोणी कापितील मान । तरी नको आन वदों जिव्हे ॥१॥ सकळां इंद्रियां हे माझी विनंती । नका होऊं परतीं पांडुरंगा ॥२॥ आणिकांची मात नाइकावी कानीं । आणिकां नयनीं न पाहावें ॥३॥ चित्ततुवां पायीं रहावें अखंडित । होउनी निश्चित एकविध ॥४॥ चाला पाय हात हेंचि काम करा । माझ्या नमस्कारा विठोबासी ॥५॥ तुका म्हणे तुम्हां भय काय करी । आमुचा कैवारी नारायण ॥६॥

२६२. करिसी तें देवा करीं माझें सुखें । परी मी त्यासी मुखें न म्हणे संत ॥१॥ जया राज्य द्रव्य करणें उपार्जना । वश दंभमाना इच्छे जाले ॥२॥ जग देव परी निवडीन निराळे । ज्ञानाचे आंधळे भारवाही ॥३॥ तुका म्हणे भय न धरी मानसीं । ऐसियाचे विशीं करितां दंड ॥४॥

२६३. म्हणविती ऐसे आइकतों संत । न देखिजे होत डोळां कोणीं ॥१॥ ऐसियांचा कोण मानितो विश्वास । निवडे तो रस घाईंडाईं ॥२॥ पर्जन्याचे काळीं वोहोळाचे नद । ओसरतां बुंद न थारेचि ॥३॥ हिऱ्याऐशा गारा दिसती दुरोन । तुका म्हणे घण न भेटे तों ॥४॥

२६४. अतिवादी लावी । एकाबोट सोंग दावी ॥१॥ त्याचा बहुरूपी नट । नव्हे वैष्णव तो चाट ॥२॥ प्रतिपादी वाळी । एका पुजी एका छळी ॥३॥ तुका म्हणे नाहीं । भूतदया ज्याचेठायीं ॥४॥

२६५. पोटाचे ते नट पाहों नये छंद । विषयाचे भेद विषयरूप ॥१॥ अर्थी परमार्थ कैसा घडों सके । चित्त लोभी भीके सोंग वायां ॥२॥ देवाचें चरित्र दाखविती लीळा । लाघवाच्या

कळा मोहावया ॥३॥ तुका म्हणे चित्तीं राहे अभिलास । दोघां नरकवास सारिखाचि ॥४॥

२६६. भुंकती तीं द्यावीं भुंकों । आपण नये त्यांचें शिकों ॥१॥ भाविकांनीं दुर्जनाचें । कांहीं मानूं नये साचें ॥२॥ होईल तैसें बळ । फजीत करावे ते खळ ॥३॥ तुका म्हणे त्याचें । पाप नाहीं ताडणाचें ॥४॥

२६७. जप करितां राग । आला जवळी तो मांग ॥१॥ नको भोंवतालें जगीं । पाहों जवळी राख अंगीं ॥२॥ कुड्याचे संगती । सदा भोजन पंगती ॥३॥ तुका म्हणे ब्रह्म । साधी विरहित कर्म ॥४॥

२६८. कां रे माझा तुज नये कळवळा । असोनि जवळा हृदयस्था ॥१॥ अगा नारायणा निष्ठुरा निर्गुणा । केला शोक नेणां कंठस्फोट ॥२॥ कां हें चित्त नाहीं पावत विश्रांती । इंद्रियांची गति खुंटेचि ना ॥३॥ तुका म्हणे कां हो धरियला कोप । सरलें नेणों पाप पांडुरंगा ॥४॥

२६९. दीनानाथा तुझीं ब्रीदें चराचर । घेशील कैवार शरणागता ॥१॥ पुराणीं जे तुझे गर्जती पवाडे । ते आम्हां रोकडे कळों आले ॥२॥ आपुल्या दासाचें न साहासी उणें । उभा त्याकारणें राहिलासी ॥३॥ चक्र गदा हातीं आयुधें अपार । न्यून तेथें पुरें करूं धांवे ॥४॥ तुका म्हणे तुज भक्तीचें कारण । करावया पूर्ण अवतार ॥५॥

२७०. वर्णूं महिमा ऐसी नाहीं मज वाचा । न बोलवे साचा पार तुझा ॥१॥ ठायींची ही काया ठेविली चरणीं । आतां ओंवाळुनि काय सांडूं ॥२॥ नाहीं भाव ऐसा करूं तुझी सेवा । जीव वाहूं देवा तोही तुझा ॥३॥ मज माझें कांहीं न दिसे पाहतां । जें तुज अनंता समर्पावें ॥४॥ तुका म्हणे आतां नाहीं मज थार । तुझे उपकार फेडावया ॥५॥

२७१. नाहीं सुख मज नलगे हा मान । न राहे हे जन काय करूं ॥१॥ देह उपचारें पोळतसे अंग । विषातुल्य चांग मिष्टान्न तें ॥२॥ नाइकवे स्तुति वाणीतां थोरीव । होतो माझा जीव कासावीस ॥३॥ तुज पावे ऐसी सांग कांहीं कळा । नको मृगजळा गोवूं मज ॥४॥ तुका म्हणे आतां करी माझें हित । काढावें जळत आगींतुनी ॥५॥

२७२. फिरंगी वाखर लोखंडाचे विळे । परि ते निराळे गुणामोल ॥१॥ पायरी प्रतिमा एकचि पाषाण । परि तें महिमान वेगळेंचि ॥२॥ तुका म्हणे तैसा नव्हतील परी । संत जना सरी सारखिया ॥३॥

२७३. कांहीच मी नव्हें कोणिये गांवींचा । एकटा ठायींचा ठायीं एक ॥१॥ नाहीं जात कोठें येत फिरोनियां । अवघेंचि वायांविण बोल ॥२॥ नाहीं मज कोणी आपुलें दुसरें । कोणाचा मी खरें कांहीं नव्हे ॥३॥ नाहीं आम्हां ज्यावें मरावें लागत । आहों अखंडित जैसे तैसे ॥४॥ तुका म्हणे नाम रूप नाहीं आम्हां । वेगळा या कर्मा अकर्मासी ॥५॥

२७४. न देखवे डोळां ऐसा हा आकांत । परपीडे चित्त दुःखी होतें ॥१॥ काय तुम्ही येथें नसालसें जालें । आम्हीं न देखिलें पाहिजे हें ॥२॥ परचक्र कोठें हरिदासांच्या वासे । न देखिजे तद्देशे राहातिया ॥३॥ तुका म्हणे माझी लाजविली सेवा । हीनपणें देवा जिणें जालें ॥४॥

२७५. काय म्यां मानावें हरिकथेचें फळ । तरिजे सकळ जनी ऐसे ॥१॥ उच्छेद तो असे हा गे आरंभला । रोकडें विठ्ठला परचक्र ॥२॥ पापाविण नाहीं पाप येत पुढें । साक्षीसी रोकडे साक्ष आलें ॥३॥ तुका म्हणे जेथें वसतील दास । तेथें तुझा वास कैसा आतां ॥४॥

२७६. भीत नाहीं आतां आपुल्या मरणा । दुःख होतें जनां न देखवे ॥१॥ आमची तो जाती ऐसी परंपरा । कां तुम्ही दातारा नेणां ऐसी ॥२॥ भजनीं विक्षेप तेंचि पैं मरण । न वजावा तो क्षण एक वायां ॥३॥ तुका म्हणे नाहीं आघाताचा वारा । ते स्थळीं दातारा ठाव मागें ॥४॥

२७७. कोण जाणे कोणा घडे उपासना । कोण या वचना प्रतिपावे ॥१॥ आतां माझा श्रोता वक्ता तूंचि देवा । करावी ते सेवा तुझीच म्यां ॥२॥ कुशळ चतुर येथें न पवती । करितील रिती तर्क मतें ॥३॥ तुका म्हणे केणें जालें एके घरीं । मज आणि हरी तुम्हां गांठी ॥४॥

२७८. आमुचा विनोद तें जगा मरण । करिती भावहीन देखोवेखीं ॥१॥ न कळे सतत हिताचा विचार । तेही दारोदार खाती फेरे ॥२॥ वंदिले वंदावे निंदिले निंदावे । एक गेले जावें त्याचि वाटा ॥३॥ तुका म्हणे कोणी नाइके सांगतां । होती यमदूता वरपडे ॥४॥

२७९. दीप घेऊनियां धुंडिती अंधार । भेटे हा विचार अघटित ॥१॥ विष्णुदास आम्ही न भिओं कळिकाळा । भुलों मृगजळा न घडे तें ॥२॥ उधळितां माती रविकळा मळे । हें कैसें न कळे भाग्यहीना ॥३॥ तुका म्हणे तृणें झांके हुताशन । हें तंव वचन वाउगेंचि ॥४॥

२८०. नटनाट्य अवघें संपादिलें सोंग । भेद दाऊं रंग न पालटे ॥१॥ मांडियेला खेळ कौतुकें बहुरूप । आपुलें स्वरूप जाणतसों ॥२॥ स्फटिकाची शिळा उपाधि न मिळे । भाव दावी पिंवळे लाल संगें ॥३॥ तुका म्हणे आम्ही या जनाविरहित । होउनि निश्चित क्रीडा करूं ॥४॥

२८१. तुजविण वाणीं आणिकाची थोरी । तरी माझी हरी जिव्हा झडो ॥१॥ तुजविण चित्ता नावडे आणीक । तरी हा मस्तक भंगो माझा ॥२॥ नेत्रीं आणिकासी पाहीन आवडी । जातु तेचि घडी चांडाळ हे ॥३॥ कथामृतपान न करिती श्रवण । काय प्रयोजन मग यांचें ॥४॥ तुका म्हणे काय वांचून कारण । तुज एक क्षण विसंबतां ॥५॥

२८२. भाव धरी तया तारील पाषाण । दुर्जना सज्जन काय करी ॥१॥ करितां नव्हे नीट श्वानाचें हें पुंस । खापरा परीस काय करी ॥२॥ निंबाचिया झाडा साखरेचें आळें । बीज तैसी फळें येती तया ॥३॥ तुका म्हणे वज्र भंगे एक वेळ । कठीण हा खळ तयाहूनी ॥४॥

२८३. इच्छावें तें जवळी आलें । काय बोलें कारण ॥१॥ नामरूपीं पडिली गांठी । अवघ्या गोष्टी सरल्या ॥२॥ मुकियाचे परी जीवीं । साकर जेवीं खादली ॥३॥ तुका म्हणे काय बोलों । आतां भलें मौन्यची ॥४॥

२८४. साधनें तरी हींच दोन्ही । जरी कोणी साधील ॥१॥ परद्रव्य परनारी । याचा धरी विटाळ ॥२॥ देव भाग्य घरा येती । संपत्ती त्या सकळा ॥३॥ तुका म्हणे तें शरीर । घर भांडार देवाचें ॥४॥

२८५. आम्हासाठीं अवतार । मत्स्यकूर्मादि सूकर ॥१॥ मोहें धांव घाली पान्हा । नांव घेतां पंढरीराणा ॥२॥ कोठें न दिसे पाहतां । उडी घाली अवचिता ॥३॥ सुख ठेवी आम्हासाठीं । दुःख आपणची घोंटी ॥४॥ आम्हां घाली पाठीकडे । आपण कळिकाळाशीं भिडे ॥५॥ तुका म्हणे कृपानिधी । आम्हां उतरीं नावेमधीं ॥६॥

२८६. रवि रश्मिकळा । नये काढितां निराळा ॥१॥ तैसा आम्हां जाला भाव । अंगीं जडोनि ठेला देव ॥२॥ गोडी साखरेपासुनी । कैसी निवडिती दोन्हीं ॥३॥ तुका म्हणे नाद उठी । विरोनि जाय नभा पोटीं ॥४॥

२८७. थोडें परी निरें । अविट तें घ्यावें खरें ॥१॥ घ्यावें जेणें नये तुटी । बीज वाढे बीजा पोटीं ॥२॥ चित्त ठेवीं ग्वाही । उपचारें चाड नाहीं ॥३॥ आपुलें तें हित फार । तुका म्हणे खरें सार ॥४॥

२८८. अवघे देव साध । परी या अवगुणांचा बाध ॥१॥ म्हणउनी नव्हे सरी । राहे एका एक दुरी ॥२॥ ऊंस कांदा एक आळां । स्वाद गोडीचा निराळा ॥३॥ तुका म्हणे नव्हे सरी । विष अमृताची परी ॥४॥

२८९. शांतीपरतें नाहीं सुख । येर अवघेंचि दुःख ॥१॥ म्हणउनी शांति धरा । उतराल पैल तीरा ॥२॥ खवळलिया कामक्रोधीं । अंगीं भरती आधिव्याधी ॥३॥ तुका म्हणे त्रिविध ताप । मग जाती आपेंआप ॥४॥

२९०. गोडपणें जैसा गुळ । तैसा देव जाला सकळ ॥१॥ आतां भजों कवणे परी । देव सबाह्य अंतरीं ॥२॥ उदका वेगळा । नव्हे तरंग निराळा ॥३॥ हेम अळंकार नामीं । तुका म्हणे तैसे आम्ही ॥४॥

२९१. परमेष्ठिपदा । तुच्छ मानिती सर्वदा ॥१॥ हेंचि ज्याचें धन । सदा हरीचें चिंतन ॥२॥ इंद्रपदादिक भोग । भोग नव्हे तो भवरोग ॥३॥ सार्वभौमराज्य । त्यासि कांहीं नाहीं काज ॥४॥ पातळींचें अधिपत्य । तें तों मानिती विपत्य ॥५॥ योगसिद्धिसार । त्यासि वाटे तें असार ॥६॥ मोक्षायेवढें सुख । सुख नव्हे तेंचि दुःख ॥७॥ तुका म्हणे हरीविण । त्यासि

वाटे अवघा सिण ॥८॥

२९२. मोहोऱ्याच्या संगें । सुत नव्हे आगीजोगें ॥१॥ नाहीं तरी त्याचें भक्ष । काय सांगणें ते साक्ष ॥२॥ स्वामीचिया अंगें । रूप नव्हे कोणाजोगें ॥३॥ तुका म्हणे खोडी । देवमणी नेदिती दडी ॥४॥

२९३. मजसवें नको चेष्टा । नव्हे साळी कांहीं कोष्टा ॥१॥ बैस सांडोनि दिमाख । जाय काळें करीं मुख ॥२॥ येथें न सरे चार । हीण आणीक व्यापार ॥३॥ तुका विष्णुदास । रस जाणतो नीरस ॥४॥

२९४. भाव देवाचें उचित । भाव तोचि भगवंत ॥१॥ धन्यधन्य शुद्ध जाती । संदेह कैंचा तेथें चित्तीं ॥२॥ बहुत बराडी । देवावरी ते आवडी ॥३॥ तुका म्हणे हे रोकडे । लाभ अधिकारी चोखडे ॥४॥

२९५. गौरव गौरवापुरतें । फळ सत्याचें संकल्पें ॥१॥ कठिण योगाहुनी क्षेम । वोकलिया होतो श्रम ॥२॥ पावलें मरे सिवेपाशीं । क्लेश उतरती क्लेशीं ॥३॥ तुका म्हणे बहु आणी । कठिण निघालिया रणीं ॥४॥

२९६. न संडी अवगुण । वर्मे मानीतसे सिण ॥१॥ भोग देतां करिती काई । फुटतां यमदंडें डोई ॥२॥ पापपुण्याझाडा । देतां तेथें मोठी पीडा ॥३॥ तुका म्हणे बोला । माझ्या सिणती विठ्ठला ॥४॥

२९७. पावे ऐसा नाश । अवघियां दिला त्रास ॥१॥ अविटाचा केला संग । सर्व भोगी पांडुरंग ॥२॥ आइताच पाक । संयोगाचा सकळिक ॥३॥ तुका म्हणे धणी । सीमा राहिली होउनी ॥४॥

२९८. दुर्बळ हे अवघे जन । नारायणीं विन्मुख ॥१॥ सांडोनियां हात जाती । पात्र होती दंडासी ॥२॥ सिदोरी तें पापपुण्य । सवें सिण भिकेचा ॥३॥ तुका म्हणे पडिला वाहो । कैसा पाहो लटिक्याचा ॥४॥

२९९. वाजतील तुरें । येणें आनंदें गजरें ॥१॥ जिंकोनियां अहंकार । पावटणी केलें शिर ॥२॥ काळा नाहीं वाव । पराश्रमा कोठें ठाव ॥३॥ तुका म्हणे आतां । सोपें वैकुंठासी जातां ॥४॥

३००. झाड कल्पतरू । न करी याचकीं आव्हेरु ॥१॥ तुम्ही सर्वी सर्वोत्तम । ऐसे विसरतां धर्म ॥२॥ परिसा तुमचें देणें । तो त्या जागे अभिमानें ॥३॥ गाऱ्हाण्यानें तुका । गर्जे मारुनियां हाका ॥४॥

३०१. वसवावें घर । देवें बरें निरंतर ॥१॥ संग आसनीं शयनीं । घडे भोजनीं गमनीं ॥२॥ संकल्प विकल्प । मावळोनि पुण्यपाप ॥३॥ तुका म्हणे काळ । अवघा गोविंदीं सुकाळ ॥४॥

३०२. येथील हा ठसा । गेला पडोनियां ऐसा ॥१॥ धरीं देवाचा अबोला । त्यासि तेचि

सवे त्याला ॥२॥ नाहीं पहावें लागत । एकाएकींच तें रितें ॥३॥ तुका म्हणे जन । तयामध्यें एवढें भिन्न ॥४॥

३०३. करितां देवार्चन । घरा आले संतजन ॥१॥ देव सारावे परते । संत पूजावे आरते ॥२॥ शाळिग्राम विष्णुमूर्ती । संत हो का भलते याती ॥३॥ तुका म्हणे संधी । अधिक वैष्णवांची मांदी ॥४॥

३०४. ज्याची खरी सेवा । त्याच्या भय काय जीवा ॥१॥ करितां स्वामीसवें वाद । अधिक अधिक आनंद ॥२॥ असावा तो धर्म । मग साहों जातें वर्म ॥३॥ वदे वागदेवी । तुका विठ्ठली गौरवी ॥४॥

३०५. देवें जीव धाला । संसार तो कडू झाला ॥१॥ तेचि येताती ढेंकर । आनंदाचे हरिहर ॥२॥ वेधी आणिकांस । ऐसा जया अंगीं कस ॥३॥ तुका म्हणे भूक । येणें न लगे आणीक ॥४॥

३०६. नाम साराचेंही सार । शरणागत यमकिंकर ॥१॥ उत्तमा उत्तम । वाचे बोला पुरुषोत्तम ॥२॥ नाम जपतां चंद्रमौळी । नामें तरला वाल्हाकोळी ॥३॥ तुका म्हणे वर्णूं काय । तारक विठोबाचे पाय ॥४॥

३०७. गातों भाव नाहीं अंगीं । भूषण करावया जगीं ॥१॥ परि तूं पतितपावन । करीं साच हें वचन ॥२॥ मुखें म्हणवितों दास । चित्तीं माया लोभ आस ॥३॥ तुका म्हणे दावीं वेष । तैसा अंतरीं नाहीं लेश ॥४॥

३०८. द्रव्य असतां धर्म न करी । नागवला राजद्वारीं ॥१॥ माय त्यासि व्याली जेव्हां । रांड सटवी नव्हती तेव्हा ॥२॥ कथाकाळीं निद्रा लागे । कामीं श्वानापरी जागे ॥३॥ भोग स्त्रियेसि देतां लाजे । वस्त्र दासीचें घेउनि निजे ॥४॥ तुका म्हणे जाण । नर गाढवाहुनी हीन ॥५॥

३०९. मुखें बोले ब्रह्मज्ञान । मनीं धन आणि मान ॥१॥ ऐशियाची करितां सेवा । काय सुख होय जीवा ॥२॥ पोटासाठीं संत । झाले कलींत बहुत ॥३॥ विरळा ऐसा कोणी । तुका त्यासि लोटांगणीं ॥४॥

३१०. एक वेळ प्रायश्चित्त । केलें चित्त मुंडण ॥१॥ अहंकारा नांवें दोष । त्याचें वोस पाडिले ॥२॥ अनुतापें स्नानविधि । यज्ञ सिद्धि देहहोम ॥३॥ जीवशिवा होता चुका । तेथें तुका विनटला ॥४॥

३११. त्रैलोक्य पाळितां उबगला नाहीं । आमुचें त्या काई असेल ओझें ॥१॥ पाषाणाचे पोटी बैसला दर्दुर । तया मुखीं चारा कोणी घाली ॥२॥ पक्षी अजगर न करी संचित । तयासी अनंत प्रतिपाळी ॥३॥ तुका म्हणे तया भार घातलिया । उपेक्षीना दयासिंधु माझा ॥४॥

३१२. करा नारायणा । माझ्या दुःखाची खंडणा ॥१॥ वृत्ति राखा पायांपाशीं । वस्ती धरूनि मानसीं ॥२॥ पाळोनियां लळा । आतां पाववावें फळा ॥३॥ तुका म्हणे दीन । त्याचा हरतिया सीण ॥४॥

३१३. दोष पळती कीर्तनें । तुझ्या नामसंकीर्तनें ॥१॥ हें कां करूं आदरिलें । खोटें वचन आपुलें ॥२॥ तुम्ही पापा भीतां । आम्हां उपजावया चिंता ॥३॥ तुका म्हणे सेवा । कळिकाळा जिंकी देवा ॥४॥

३१४. मी तों दीनाहूनि दीन । माझा तुज अभिमान ॥१॥ मी तों आलों शरणागत । माझें करावें स्वहित ॥२॥ दीनानाथा कृपाळुवा । सांभाळावें आपुल्या नांवा ॥३॥ तुका म्हणे आतां । भलें नव्हे मोकलितां ॥४॥

३१५. नाहीं दुकाळलों अन्ना । परि या मान जनार्दना ॥१॥ देव केला सकळसाक्षी । काळीं आणि शुद्धपक्षीं ॥२॥ भोगीं भोगविता । बाळासवें तोचि पिता ॥३॥ कर्म अकर्म जळालें । प्रौढ तुका तें उरलें ॥४॥

३१६. काय खावें आतां कोणीकडे जावें । गांवांत रहावें कोण्या बळें ॥१॥ कोपला पाटील गांवींचे हे लोक । आतां घाली भीक कोण मज ॥२॥ आतां येणें चवी सांडिली म्हणती । निवाडा करिती दिवाणांत ॥३॥ भले लोकीं याची सांगितली मात । केला माझा घात दुर्बळाचा ॥४॥ तुका म्हणे याचा संग नव्हे भला । शोधीत विठ्ठला जाऊं आतां ॥५॥

३१७. संत मागे पाणी नेदी एक चूळी । दासीस आंघोळी ठेवी पाणी ॥१॥ संतांसी देखोनी होय पाठीमोरा । दासीचिया पोरा चुंबन देतो ॥२॥ संतांसी देखोनि करितो टवाळ्या । भावें धुतो चोळ्या दासीचिया ॥३॥ तुका म्हणे त्याच्या तोंडावरी थुंका । जातो यमलोका भोगावया ॥४॥

३१८. आशाबद्ध वक्ता । धाक श्रोतयाच्या चित्ता ॥१॥ गातो तेंचि नाहीं ठावें । तोंड वासी कांहीं द्यावें ॥२॥ जालें लोभाचें मांजर । पोट भरी दारोदार ॥३॥ वायां गेलें तें भजन । उभयतां लोभी मन ॥४॥ बहिरमुख एके ठायीं । तैसें जालें तया दोहीं ॥५॥ माप आणी गोणी । तुका म्हणे रितीं दोन्हीं ॥६॥

३१९. विठ्ठला रे तूं उदाराचा राव । विठ्ठला तूं जीव जगाचा या ॥१॥ विठ्ठला रे तूं उदाराचा रासी । विठ्ठला तुजपाशीं सकळ सिद्धी ॥२॥ विठ्ठला रे तुझें नाम बहू गोड । विठ्ठला तूं कोड पुरविसी ॥३॥ विठ्ठला रे तुझें श्रीमुख चांगलें । विठ्ठला लागलें ध्यान मनीं ॥४॥ विठ्ठला रे वाचे बोला बहुरस । विठ्ठला रे सोस घेतला जीवें ॥५॥ विठ्ठला रे शोक करीतसे तुका । विठ्ठला तूं ये का झडकरी ॥६॥

३२०. बाहिर पडिलों आपुल्या कर्तव्यें । संसारासि जीवें वेटाळिलों ॥१॥ एकामध्यें एक

नाहीं मिळों येत । ताक नवनीत निवडिलें ॥२॥ जालीं दोनी नामें एकाचि मथनीं । दुसरिया गुणीं वेगळालीं ॥३॥ तुका म्हणे दाखविलीं मुक्ताफळीं । शिंपलेचि स्वस्थळीं खुंटलिया ॥४॥

३२१. बरवा बरवा बरवा देवा तूं । जीवाहूनि आवडसी जीवा रे देवा तूं ॥१॥ पाहतां वदन संतुष्ट वचन । आले आइकतां गुण रे देवा ॥२॥ अष्ट अंगें तनु त्रिविध ताप गेला सीण । वर्णितां लक्षण रे देवा ॥३॥ मन जालें उन्मन अनुपम्य गहन । तुकयाबंधु म्हणे महिमा नेणे रे ॥४॥

३२२. सोयरिया करी पाहुणेर बरा । कांडितो ठोमरा संतांलागीं ॥१॥ गाईसी देखोनी बदबदा मारी । घोड्याची चाकरी गोड लागे ॥२॥ फुलेंपानें वेश्येसी नेतसे उदंड । देऊं नेदी खांड ब्राह्मणासी ॥३॥ बाइलेच्या गोता आवडिनें पोसी । मातापितयांसी दवडुनी ॥४॥ तुका म्हणे त्याच्या थुंका तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥५॥

३२३. सोलीव जें सुख अतिसुखाहुनी । उभें तें अंगणीं वैष्णवांच्या ॥१॥ वृंदावन सडे चौक रंगमाळा । नाच तो सोहोळा देखोनियां ॥२॥ भूषणमंडित सदा सर्वकाळ । मुद्रा आणि माळ तुळसी कंठीं ॥३॥ नामवोघ मुखीं अमृताचें सार । मस्तक पवित्र सहित रजें ॥४॥ तुका म्हणे मोक्ष भक्ताचिया मना । नये हे वासना त्याची करी ॥५॥

३२४. तीर्थें केलीं कोटीवरी । नाही देखिली पंढरी ॥१॥ जळो त्याचें जालेंपण । न देखेचि समचरण ॥२॥ योग याग अनंत केले । नाहीं समचरण देखिले ॥३॥ तुका म्हणे विठ्ठलपायीं । अनंत तीर्थें घडलीं पाहीं ॥४॥

३२५. कोणतें कारण राहिलें यामुळें । जें म्यां तुज बळें कष्टवावें ॥१॥ नाहीं जात जीव होत नाहीं हानी । सहज तें मनीं आठवलें ॥२॥ नाहीं कांहीं चिंता मरत उपवासी । अथवा त्या म्हैसी गाई व्हाव्या ॥३॥ हें तों तुज कळों येतसे अंतरीं । लापणीक वरी साच भाव ॥४॥ तुका म्हणे देवा नाशिवंतासाठीं । पायांसवें तुटी करिती तुझ्या ॥५॥

३२६. आविसाचिये आशा गळ गिळी मासा । फुटोनियां घसा मरण पावे ॥१॥ मरणाचे वेळे करी तळमळ । आठवी कृपाळ तये वेळीं ॥२॥ अंतकाळीं ज्याच्या नाम आलें मुखा । तुका म्हणे सुखा पार नाहीं ॥३॥

३२७. तुजवरी ज्याचें मन । दर्शन दे त्याचें ॥१॥ कैसा जाती शुद्ध भाव । हात पाव ना वृत्ती ॥२॥ अवघियांचा करुनि मेळा । तुज डोळां रोखिलें ॥३॥ तुका म्हणे तुज आड । लपोनि कोड दावी देवा ॥४॥

३२८. विश्वव्यापी माया । तिणें झाकुळली छाया ॥१॥ सत्य गेलें भोळ्यावरी । अविद्येची चाली थोरी ॥२॥ आपुलेंचि मन । करी आपणा बंधन ॥३॥ तुका म्हणे देवा ।

तुम्ही कोडीं हीं उगवा ॥४॥

३२९. पोटीं जन्मती रोग । तरि कां म्हणावें आप्तवर्ग ॥१॥ रानीं वसती औषधी । तरि कां म्हणाव्या निपराधी ॥२॥ तैसें शरीराचें नातें । तुका म्हणे सर्व आप्तें ॥३॥

३३०. नव्हे शब्द एक देशी । सांडी गिवशी कोणाला ॥१॥ जाली माझी वैखरी । विश्वंभरी व्यापक ॥२॥ मोकलिलें जावें बाणें । भाता जेणें वाहिला ॥३॥ आतां येथें कैंचा तुका । बोले सिक्का स्वामीचा ॥४॥

३३१. गायनाचे रंगीं । शक्ति अद्भुत हे अंगीं ॥१॥ हें तों देणें तुमचें देवा । घ्यावी अखंडित सेवा ॥२॥ अंगीं प्रेमाचें भरतें । नेघे उतार चढतें ॥३॥ तुका म्हणे वाणी । प्रेम अमृताची खाणी ॥४॥

३३२. माप म्हणे मी मवितें । भरी धणी ठेवी रितें ॥१॥ देवा अभिमान नको । माझें ठायीं देऊं सकों ॥२॥ देशीं चाले सिक्का । रितें कोण लेखी रंका ॥३॥ हातीं सूत्रदोरी । तुका म्हणे त्याची थोरी ॥४॥

३३३. कोण सांगायास । गेलें होतें देशोदेश ॥१॥ जालें वाऱ्या हातीं माप । समर्थ तो माझा बाप ॥२॥ कोणाची हे सत्ता । जाली वाचा वदविता ॥३॥ तुका म्हणे या निश्चयें । माझें निरसलें भय ॥४॥

३३४. सकळांच्या पायां माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥१॥ अहो श्रोते वक्ते सकळही जन । बरें पारखून बांधा गांठी ॥२॥ फोडिले भांडार धन्याचा हा माल । तेथें मी हमाल भारवाही ॥३॥ तुका म्हणे चाली जाली चहूं देशीं । उतरला कसीं खरा माल ॥४॥

३३५. कोण त्याचा पार पाववे धुंडितां । पुढें विचारितां विश्वंभरा ॥१॥ अणुरेणु सूक्ष्मस्थूळा पार नाहीं । श्रुती नेती त्याही खुंटलिया ॥२॥ फळांत कीटक येवढें आकाश । ऐसीं तरुवरास अनेक किती ॥३॥ दाविलें अनंतें अर्जुनासी पोटीं । आणिक त्या सृष्टि कृष्णलोक ॥४॥ तुका म्हणे लागा संतांचिये कासे । ठाव घेतां कैसे वांचा जीवें ॥५॥

३३६. जें जें कांही करितों देवा । तें तें सेवा समर्पे ॥१॥ भेद नाहीं सर्वात्मना । नारायणा तुज मज ॥२॥ आम्हीं दुजें नेणों कोणा । हेंचि मना मन साक्ष ॥३॥ तुका म्हणे जगन्नाथा । हें अन्यथा नव्हें कीं ॥४॥

३३७. स्तुति करूं तरी नव्हेचि या वेदा । तेथें माझा धंदा कोणीकडे ॥१॥ परी हे वैखरी गोडावली सुखें । रसना रस मुखें इच्छीतसे ॥२॥ रूप वर्णावया कोठें पुरें मती । रोमीं होती जाती ब्रह्मांडें हीं ॥३॥ तुका म्हणे तूंचि ऐसा एक साचा । ऐसी तंव वाचा जाली नाहीं ॥४॥

३३८. तुज वर्णी ऐसा तुजविण नाहीं । दुजा कोणी तीहीं त्रिभुवनीं ॥१॥ सहस्त्रमुखें शेष

सिणला बापुडा । चिरलिया धडा जिव्हा त्याच्या ॥२॥ अव्यक्ता अलक्षा अपारा आनंदा । निर्गुणा सच्चिदानंदा नारायणा ॥३॥ रूप नाम घेसी आपुल्या स्वइच्छा । होसी भाव तैसा त्याकारणें ॥४॥ तुका म्हणे जरी दाविसी आपणा । तरिच नारायणा कळों येसी ॥५॥

३३९. पूर आला आनंदाचा । लाटा उसळती प्रेमाच्या ॥१॥ बांधूं विठ्ठलसांगडी । पोहुनि जाऊं पैल थडी । अवघे जन गडी । घाला उडी भाईनो ॥२॥ हें तों नाहीं सर्वकाळ । अमूप आनंदाचें जळ ॥३॥ तुका म्हणे थोरा पुण्यें । ओघ आला पंथें येणें ॥४॥

३४०. आणीक दुसरें मज नाहीं आतां । नेमिलें या चित्तापासुनियां ॥१॥ पांडुरंग ध्यानीं पांडुरंग मनीं । जागृतीं स्वप्नीं पांडुरंग ॥२॥ पडिलें वळण इंद्रियां सकळा । भाव तो निराळा नाहीं दुजा ॥३॥ तुका म्हणे नेत्रीं केली ओळखण । तटस्थ हें ध्यान विटेवरी ॥४॥

३४१. आतां मी अनन्य येथें अधिकारी । होइन कोणे परी नेणों देवा ॥१॥ पुराणींचा अर्थ आणितां मनास । होय कासावीस जीव माझा ॥२॥ इंद्रियांचीं आम्ही पांगिलों अंकित । त्याचे रंगी चित्त रंगलेंसें ॥३॥ येकाचेंही मज न घडे दमन । अवघीं नेमून कैसीं राखों ॥४॥ तुका म्हणे जरी मोकलिसी आतां । तरी मी अनंता वायां गेलों ॥५॥

३४२. लक्षूनियां योगी पाहाती आभास । तें दिसे आम्हांस दृष्टीपुढें ॥१॥ कर दोनी कटी राहिलासे उभा । सांवळी हे प्रभा अंगकांती ॥२॥ व्यापूनि वेगळें राहिलेंसें दुरी । सकळा अंतरीं निर्विकार ॥३॥ रूप नाहीं रेखा नामही जयासी । आपुल्या मानसीं शिव ध्याय ॥४॥ अंत नाहीं पार वर्णा नाहीं थार । कुळ याति शिर हस्त पाद ॥५॥ अचेत चेतलें भक्तीचिया सुखें । आपुल्या कौतुकें तुका म्हणे ॥६॥

३४३. कैसें करूं ध्यान कैसा पाहों तुज । वर्म दावी मज याचकासी ॥१॥ कैसी भक्ति करूं सांग तुझी सेवा । कोण्या भावें देवा आतुडसी ॥२॥ कैसी कीर्ति वाणूं कैसा लक्षा आणूं । जाणूं हा कवणू कैसा तुज ॥३॥ कैसा गाऊं गीतीं कैसा ध्याऊं चित्तीं । कैसी स्थिति मती दावीं मज ॥४॥ तुका म्हणे जैसें दास केलें देवा । तैसें हें अनुभवा आणीं मज ॥५॥

३४४. निगमाचें वन । नका शोधूं करूं सीण ॥१॥ या रे गौळियाचे घरीं । बांधलें तें दावें वरी ॥२॥ पीडलेती भ्रमें । वाटा न कळतां वर्में ॥३॥ तुका म्हणे भार । माथा टाका अहंकार ॥४॥

३४५. मन वोळी मना । बुद्धि बुद्धि क्षणक्षणां ॥१॥ मीच मज राखण जालों । ज्यानें तेथेंचि धरिलों ॥२॥ जें जें जेथें उठीं । तें तें तया हातें खुंटी ॥३॥ भांजणी खांजणी । तुका साक्ष उरला दोन्ही ॥४॥

३४६. ब्रह्म न लिंपे त्या मळें । कर्म अकर्माविगळें ॥१॥ तोचि एक तया जाणे । पावे अनुभविलें खुणें ॥२॥ शौच अशौचाचे संधी । तन आळा तनामधीं ॥३॥ पापपुण्या

नाहीं ठाव । तुका म्हणे सहज भाव ॥४॥

३४७. काय दरा करील वन । समाधान नाहीं जंव ॥१॥ तरी काय तेथें असतीं थोडीं । काय जोडी तयांसी ॥२॥ रिघतां धांवा पेंवामधीं । जोडे सिद्धि ते ठायीं ॥३॥ काय भस्म करील राख । अंतर पाख नाहीं तों ॥४॥ वर्णआश्रमाचे धर्म । जाती श्रम जालिया ॥५॥ तुका म्हणे सोंग पाश । निरसे आस तें हित ॥६॥

३४८. तेंहीं नव्हे जें करितां कांहीं । ध्याता ध्यायी तेंही नव्हे ॥१॥ तेंही नव्हे जें जाणवी जना । वाटे मना तेंही नव्हे ॥२॥ त्रास मानिजे कांटाळा । अशुभ वाचाळा तेंही नव्हे ॥३॥ तेंही नव्हे जें भोवतीं भोंवे । नागवें धांवे तेंही नव्हे ॥४॥ तुका म्हणे एकचि आहे । सहजि पाहें सहज ॥५॥

३४९. बोल बोलतां वाटे सोपें । करणी करितां टीर कांपे ॥१॥ नव्हे वैराग्य सोपारें । मज बोलतां न वाटे खरें ॥२॥ विष खावें ग्रासोग्रासीं । धन्य तोचि एक सोसी ॥३॥ तुका म्हणे करूनि दावी । त्याचे पाय माझे जीवीं ॥४॥

३५०. होईन भिकारी । पंढरीचा वारकरी ॥१॥ हाचि माझा नेम धर्म । मुखीं विठोबाचें नाम ॥२॥ हेचि माझी उपासना । लागेन संतांच्या चरणा ॥३॥ तुका म्हणे देवा । हेचि माझी भोळी सेवा ॥४॥

३५१. सांठविला हरि । जींहीं हृदयमंदिरीं ॥१॥ त्यांची सरली येरझार । जाला सफळ व्यवहार ॥२॥ हरी आला हाता । मग कैंचीं भय चिंता ॥३॥ तुका म्हणे हरी । कांहीं उरों नेदी उरी ॥४॥

३५२. मोक्ष तुमचा देवा । तुम्ही दुर्लभ तो ठेवा ॥१॥ मज भक्तीची आवडी । नाहीं अंतरीं ते गोडी ॥२॥ आपल्या प्रकारा । करा जतन दातारा ॥३॥ तुका म्हणे भेटी । पुरे एकचि शेवटीं ॥४॥

३५३. नामपाठ मुक्ताफळांच्या वोबणी । हें सुख सगुणीं अभिनव ॥१॥ तरी आम्हीं जालों उदास निर्गुणा । भक्तांचिया मना मोक्ष नये ॥२॥ द्यावें घ्यावें ऐसा येथें उरे भाव । जाय ठाया ठाव पुसोनियां ॥३॥ तुका म्हणे आतां अभयदान करा । म्हणा विश्वंभरा दिलें ऐसें ॥४॥

३५४. भवसिंधूचें काय कोडें । दावी वाट चाले पुढें ॥१॥ तारूं भला पांडुरंग । पाय भिजों नेदी अंग ॥२॥ मागें उतरिले बहुत । पैल तिरीं साधुसंत ॥३॥ तुका म्हणे लागवेगें । जाऊं तयाचिया मागें ॥४॥

३५५. नाहीं साजत हा मोठा । मज अळंकार खोटा ॥१॥ असें तुमचा रजरेण । संतापायींची वाहाण ॥२॥ नाहीं स्वरूपीं ओळखी । भक्तिभाव करीं देखीं ॥३॥ नाहीं शून्याकारीं । क्षर ओळखी अक्षरीं ॥४॥ नाहीं विवेक या ठायीं । आत्मा अनात्मा तें

काई ॥५॥ कांहीं नव्हे तुका । पायां पडेन हें ऐका ॥६॥

३५६. सत्य साचें खरें । नाम विठोबाचें बरें ॥१॥ येणें तुटती बंधनें । उभयलोकीं कीर्ति जेणें ॥२॥ भाव ज्याचे गांठी । त्यासी लाभ उठाउठी ॥३॥ तुका म्हणे भोळा । जिंकूं जाणे कळिकाळा ॥४॥

३५७. सत्य तो आवडे । विकल्पानें भाव उडे ॥१॥ आम्ही तुमच्या कृपादानें । जाणों शुद्ध मंद सोनें ॥२॥ आला भोग अंगा । न लावूं उशीर त्या त्यागा ॥३॥ तुका म्हणे देवा । अंजन ते तुझी सेवा ॥४॥

३५८. करावे चिंतन । तेंचि बरें न भेटून ॥१॥ बरवा अंगीं राहे भाव । तंग तोचि जाणा देव ॥२॥ दर्शनाची उरी । अवस्थाचि अंग धरी ॥३॥ तुका म्हणे मन । तेथें सकळ कारण ॥४॥

३५९. जें जें जेथें पावे । तें तें समर्पावें सेवे ॥१॥ सहज पूजा याचि नांवें । गळित अभिमान व्हावें ॥२॥ अवघें भोगिता गोसावी । आदीं अवसानीं जीवीं ॥३॥ तुका म्हणे सिण । न धरितां नव्हे भिन्न ॥४॥

३६०. नसे तरी मनीं नसो । परी वाचे तरी वसो ॥१॥ देह पडो या चिंतनीं । विठ्ठलनामसंकीर्तनीं ॥२॥ दंभस्फोट भलत्या भावें । मज हरिजन म्हणवावें ॥३॥ तुका म्हणे काळांतरीं । मज सांभाळील हरी ॥४॥

३६१. नये जरी कांहीं । तरी भलतेंचि वाहीं ॥१॥ म्हणविल्या दास । कोणी न धरी वेठीस ॥२॥ समर्थाच्या नांवें । भलतैसें विकावें ॥३॥ तुका म्हणे सत्ता । वरी असे त्या बहुतां ॥४॥

३६२. न संडवे अन्न । मज न सेववे वन ॥१॥ म्हणउनी नारायणा । कींव भाकितों करुणा ॥२॥ नाहीं अधिकार । कांहीं घोकाया अक्षर ॥३॥ तुका म्हणे थोडें । आयुष्य अवघेंचि कोडें ॥४॥

३६३. एकाची उत्तरें । गोड अमृत मधुरें ॥१॥ ऐशा देवाच्या विभूती । भिन्न प्रारब्धाची गती ॥२॥ एकाचीं वचनें । कटु अत्यंत तीक्षणें ॥३॥ प्रकाराचे तीन । तुका म्हणे केले जन ॥४॥

३६४. वचनें ही नाड । न बोलतें मुकें खोड ॥१॥ दोहीं वेगळें तें हित । बोली अबोलणी नीत ॥२॥ अंधार प्रकाशी । जाय दिवस पावे निशी ॥३॥ बीज पृथिवीच्या पोटीं । तुका म्हणे दावी दृष्टी ॥४॥

३६५. विचारावांचून । न पविजे समाधान ॥१॥ देह त्रिगुणांचा बांधा । माजी नाहीं गुण सुधा ॥२॥ देवाचिये चाडे । देवा द्यावें जें जें घडे ॥३॥ तुका म्हणे होतें । बहु गोमटें उचितें ॥४॥

३६६. तुटे भवरोग । संचितक्रियमाणभोग ॥१॥ ऐसें विठोबाचें नाम । उच्चारितां खंडे जन्म ॥२॥ वसों न सके पाप । जाय त्रिविध तो ताप ॥३॥ तुका म्हणे माया । होय दासी

लागे पायां ॥४॥

३६७. मुसावलें अंग । रंगीं मेळविला रंग ॥१॥ एकीं एक दृढ जालें । मुळा आपुलिया आलें ॥२॥ सागरीं थेंबुटा । पडिल्या निवडे कोण्या वाटा ॥३॥ तुका म्हणे नवें । नव्हे जाणावें हें देवें ॥४॥

३६८. अनुतापें दोष । जाय न लगतां निमिष ॥१॥ परि तो राहे विसावला । आदीं अवसानीं भला ॥२॥ हेंचि प्रायश्चित्त । अनुतापीं न्हाय चित्त ॥३॥ तुका म्हणे पापा । शिवों नये अनुतापा ॥४॥

३६९. चहूं आश्रमांचे धर्म । न राखतां जोडे कर्म ॥२॥ तैसी नव्हे भोळी सेवा । एक भावचि कारण देवा ॥२॥ तपें इंद्रियां आघात । क्षण एक वाताहात ॥३॥ मंत्र चळे थोडा । तरि धडचि होय वेडा ॥४॥ व्रत करितां सांग । तरी एक चुकतां भंग ॥५॥ धर्माधर्मा सत्वचि कारण । नाहीं तरी केला सिण ॥६॥ भूतदयेसि आघात । उंचनीच पाहे चित्त ॥७॥ तुका म्हणे दुजें । विधिनिषेधाचें ओझें ॥८॥

३७०. सोडिला संसार । माया तयावरि फार ॥१॥ धांवे चाले मागें मागें । सुखदुःख साहे अंगें ॥२॥ यानें घ्यावें नाम । तीसी करणें त्याचें काम ॥३॥ तुका म्हणे भोळी । विठ्ठलकृपेची कोंवळी ॥४॥

३७१. बैसूं खेळूं जेवूं । तेथें नाम तुझें गाऊं ॥१॥ रामकृष्णनाममाळा । घालूं ओवुनियां गळां ॥२॥ विश्वास हा धरूं । नाम बळकट करूं ॥३॥ तुका म्हणे आतां । आम्हां जीवन शरणागतां ॥४॥

३७२. पाठीं पोटीं देव । कैचा हरिदासां भेव ॥१॥ करा आनंदें कीर्तन । नका आशंकित मन ॥२॥ एथें कोठें काळ । करील देवापाशीं बळ ॥३॥ तुका म्हणे धनी । सपुरता काय वाणी ॥४॥

३७३. मनोमय पूजा । हेचि पढियें केशीराजा ॥१॥ घेतो कल्पनेचे भोग । न मानिती बाह्य रंग ॥२॥ अंतरींचे जाणे । आदिवर्तमान खुणें ॥३॥ तुका म्हणे कुडें । कोठें सरे त्याच्या पुढें ॥४॥

३७४. जाणे भक्तीचा जिव्हाळा । तोचि दैवाचा पुतळा ॥१॥ आणिक नये माझ्या मना । हो का पंडित शाहाणा ॥२॥ नामरूपीं जडलें चित्त । त्याचा दास मी अंकित ॥३॥ तुका म्हणे नवविध । भक्ति जाणे तोचि शुद्ध ॥४॥

३७५. याजसाठीं वनांतरा । जातों सांडुनिया घरा ॥१॥ माझें दिठावेल प्रेम । बुद्धि होईल निष्काम ॥२॥ अद्वैताची वाणी । नाहीं ऐकत मी कानीं ॥३॥ तुका म्हणे अहंब्रह्म । आड येऊं नेदीं भ्रम ॥४॥

३७६. बुडतां आवरीं । मज भवाचे सागरीं ॥१॥ नको मानूं भार । पाहों दोषांचे डोंगर ॥२॥

आहे तें सांभाळीं । तुझी कैसी ब्रीदावळी ॥३॥ तुका म्हणे दोषी । मी तों पातकाची राशी ॥४॥

३७७. अक्षई तें झालें । आता न मोडे रचिलें ॥१॥ पाया पडिला खोले ठायीं । तेथें पुढें चाली नाहीं ॥२॥ होतें विखुरलें । ताळा जमे झडती आलें ॥३॥ तुका म्हणे बोली । पुढें कुंठितचि जाली ॥४॥

३७८. न मनावी चिंता । कांहीं माझेविशीं आतां ॥१॥ ज्याणें लौकिक हा केला । तो हा निवारिता भला ॥२॥ माझे इच्छे काय । होणार ते एके ठाय ॥३॥ सुखा आणि दुःखा । म्हणे वेगळा मी तुका ॥४॥

३७९. तुझे थोर थोर । भक्त करिती विचार ॥१॥ जपतपादि साधनें । मज चिंतवेना मनें ॥२॥ करुणावचनें । म्यां भाकावीं तुम्हां दीनें ॥३॥ तुका म्हणे घेईं । माझें थोडें फार ठायीं ॥४॥

३८०. लावूनि काहाळा । सुखें करितों सोहळा ॥१॥ सादावीत गेलों जना । भय नाहीं सत्य जाणा ॥२॥ गातां नाचतां विनोदें । टाळघागरियांच्या छंदें ॥३॥ तुका म्हणे भेव । नाहीं पुढें येतो देव ॥४॥

३८१. मुक्त कासया म्हणावें । बंधन तें नाहीं ठावें ॥१॥ सुखें करितों कीर्तन । भय विसरलें मन ॥२॥ देखिजेना नास । घालूं कोणावरी कास ॥३॥ तुका म्हणे साह्य । देवा आहे तैसा आहे ॥४॥

३८२. ओनाम्याच्या काळें । खडे मांडविले बाळें ॥१॥ तेंचि पुढें पुढें काई । मग लागलिया सोई ॥२॥ रज्जु सर्प होता । तोंवरीच न कळतां ॥३॥ तुका म्हणे साचें । भय नाहीं बागुलाचें ॥४॥

३८३. आतां पुढें धरी । माझे आठव वैखरी ॥१॥ नको बडबडूं भांडे । कांहीं वाउगें तें रांडे ॥२॥ विठ्ठल विठ्ठल । ऐसे सांडोनियां बोल ॥३॥ तुका म्हणे आण । तुज स्वामीची हे जाण ॥४॥

३८४. काय नव्हे करितां तुज । आतां राखे माझी लाज ॥१॥ मी तो अपराधाची रासी । शिखा अंगुष्ठ तोपाशीं ॥२॥ त्राहे त्राहे त्राहे । मज कृपादृष्टि पाहे ॥३॥ तुका म्हणे देवा । सत्य घ्यावी आतां सेवा ॥४॥

३८५. वंदीन मी भूतें । आतां अवघींच समस्तें ॥१॥ तुमची करीन भावना । पदोपदीं नारायणा ॥२॥ गाळुनियां भेद । प्रमाण तो ऐसा वेद ॥३॥ तुका म्हणे मग । नव्हे दुजियाचा संग ॥४॥

३८६. पूज्या पूज्यमान । कथे उभे हरिजन ॥१॥ ज्याची कीर्ती वाखाणिती । तेथें ओतली ते मूर्ती ॥२॥ देहाचा विसर । केला आनंदें संचार ॥३॥ गेला अभिमान । लाज बोळविला मान ॥४॥ शोक मोह चिंता । यांची नेणती ते वार्ता ॥५॥ तुका म्हणे सखे । विठोबाचि ते सारिखे ॥६॥

३८७. भाव तैसें फळ । न चले देवापाशीं बळ ॥१॥ धांवे जातीपाशीं जाती । खूण येरयेरां चित्तीं ॥२॥ हिरा हिरकणी । काढी आतुनि आइरणीं ॥३॥ तुका म्हणे केलें । मन शुद्ध हें चांगलें ॥४॥

३८८. वरि वरि बोला रस । कथी ज्ञाना माजी फोस ॥१॥ ऐसे लटिके जे ठक । तयां इह ना परलोक ॥२॥ परिसे एक सांगे । अंगा धुळीही न लगे ॥३॥ तुका म्हणे हाडें । कुतऱ्या लाविले झगडे ॥४॥

३८९. हेचि तुझी पूजा । आतां करीन केशीराजा ॥१॥ अवघीं तुझींच हीं पदें । नमस्कारीन अभेदें ॥२॥ न वर्जित दिशा । जाय तेथेंचि सरिसा ॥३॥ नव्हे एकदेशी । तुका म्हणे गुणदोषी ॥४॥

३९०. आपुलें तों काहीं । येथें सांगिजेसें नाहीं ॥१॥ परि हे वाणी वायचळे । छंद करवितें बरळे ॥२॥ पंचमहाभूतांचा हा मेळा । देह सत्यत्वें निराळा ॥३॥ तुका म्हणे भुली । इच्या उफराट्या चाली ॥४॥

३९१. विठ्ठल नावाडा फुकाचा । आळविल्या साठीं वाचा ॥१॥ कटीं कर जैसे तैसे । उभा राहिला न बैसे ॥२॥ न पाहे सिदोरी । जाती कुळ न विचारी ॥३॥ तुका म्हणे भेटीं । हाक देतां उठाउठी ॥४॥

३९२. कृपावंत किती । दीन बहु आवडती ॥१॥ त्यांचा भार वाहे माथां । करी योगक्षेमचिंता ॥२॥ भुलों नेदी वाट । करीं धरूनि दावीं नीट ॥३॥ तुका म्हणे जीवें । अनुसरल्या एक भावें ॥४॥

३९३. नेणती वेद श्रुति कोणी । आम्हां भाविकावांचुनी ॥१॥ रूप आवडे आम्हांसी । तैसा जोडी हृषीकेशी ॥२॥ आम्हा भावें बळिवंत । तुज घालूं हृदयांत ॥३॥ तुका म्हणे तुज धाक । देतां पावसील हाक ॥४॥

३९४. मन गुंतलें लूलया । जाय धांवोनि त्या ठाया ॥१॥ मागें परतवी तो बळी । शूर एक भूमंडळीं ॥२॥ येऊनियां घाली घाला । नेणों काय होईल तुला ॥३॥ तुका म्हणे येणें । बहु नाडिले शाहाणे ॥४॥

३९५. घेईं घेईं माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥१॥ तुम्ही घ्यारे डोळे सुख । पाहा विठोबाचें मुख ॥२॥ तुम्ही आइकारे कान । माझ्या विठोबाचे गुण ॥३॥ मना तेथें धांव घेईं । राहें विठोबाचें पायीं ॥४॥ तुका म्हणे जीवा । नको सोडूं या केशवा ॥५॥

३९६. धणी न पुरे गुण गातां । रूप दृष्टी न्याहाळितां ॥१॥ बरवा बरवा पांडुरंग । कांति सांवळी सुरंग ॥२॥ सकळ मंगळाचें सार । मुख सिद्धीचें भांडार ॥३॥ तुका म्हणे

सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥४॥

३९७. जरी मी पतित नव्हतों देवा । तरी तूं पावन कैंचा तेव्हां ॥१॥ म्हणोनि माझें नाम आधीं । मग तूं पावन कृपानिधी ॥२॥ लोहो महिमान परिसा । नाहीं तरी दगड जैसा ॥३॥ तुका म्हणे याचकभावें । कल्पतरु मान पावे ॥४॥

३९८. एक भाव चित्तीं । तरी न लगे कांहीं युक्ति ॥१॥ कळों आलें जीवें । मज माझियाचि भावें ॥२॥ आठवचि पुरे । सुख अवघें मोहरें ॥३॥ तुका म्हणे मन । पूजा इच्छी नारायण ॥४॥

३९९. मज संतांचा आधार । तूं एकलें निर्विकार ॥१॥ पाहा विचारूनी देवा । नको आम्हांसवें दावा ॥२॥ तुज बोल न बोलवे । आम्हां भांडायाची सवे ॥३॥ तुका म्हणे तरी । ऐक्यभावें नुरे उरी ॥४॥

४००. तुज मागणें तें देवा । आम्हां तुझी चरणसेवा ॥१॥ आन नेघों देसी तरी । रिद्धि सिद्धि मुक्ति चारी ॥२॥ संतसंगति सर्वकाळ । थोर प्रेमाचा सुकाळ ॥३॥ तुका म्हणे नाम । तेणें पुरे माझे काम ॥४॥

४०१. तुझा शरणागत । जन्मोजन्मींचा अंकित ॥१॥ आणीक नेणें कांहीं हेवा । तुजवांचूनि केशवा ॥२॥ हेंचि माझें गाणें । तुझें नामसंकीर्तन ॥३॥ तुझ्या नामाची भूषणें । तुका म्हणे ल्यालों लेणें ॥४॥

४०२. उतरलों पार । सत्य झाला हा निर्धार ॥१॥ तुझें नाम धरिलें कंठीं । केली संसाराची तुटी ॥२॥ आतां नव्हे बाधा । कोणेविशीं कांहीं कदा ॥३॥ तुका म्हणे कांहीं । आतां उरलें ऐसें नाहीं ॥४॥

४०३. क्रियामतिहीन । एक मी गा तुझे दीन ॥१॥ देवा करावा सांभाळ । वारीं माझी तळमळ ॥२॥ नको माझे ठायीं । गुणदोष घालूं कांहीं ॥३॥ अपराधाच्या कोटी । तुका म्हणे घाला पोटीं ॥४॥

४०४. नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण ॥१॥ तैसें चित्त शुद्ध नाहीं । तेथें बोध करील काई ॥२॥ वृक्ष न धरी पुष्पफळ । काय करील वसंतकाळ ॥३॥ वांझा न होती लेंकुरें । काय करावें भ्रतारें ॥४॥ नपुंसका पुरुषासी । काय करील बाइल त्यासी ॥५॥ प्राण गेलिया शरीर । काय करील वेव्हार ॥६॥ तुका म्हणे जीवनेंविण । पीक नव्हे नव्हे जाण ॥७॥

४०५. नवां नवसांचीं । जालों तुम्हासी वाणीचीं ॥१॥ कोण तुझें नाम घेतें । देवा पिंडदान देतें ॥२॥ कोण होतें मागें पुढें । दुजें बोलाया रोकडें ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगा । कोणा घेतासि वोसंगा ॥४॥

४०६. एका बीजा केला नास । मग भोगिले कणीस ॥१॥ कळे सकळां हा भाव ।

लहानथोरांवरी जीव ॥२॥ लाभ नाहीं फुकासाठीं । केल्याविण जीवासाठीं ॥३॥ तुका म्हणे रणीं । जीव देतां लाभ दुणी ॥४॥

४०७. आयुष्य गेलें वायांविण । थोर झाली नागवण ॥१॥ आतां धावाधाव करी । काय पाहातोसि हरी ॥२॥ माझे तुझे याचि गती । दिवस गेले तोंडीं माती ॥३॥ मन वाव घेऊं नेदी । बुडवूं पाहे भवनदी ॥४॥ पडला विषयाचा घाला । तेणें नागविलें मला ॥५॥ शरण आलों आतां धावें । तुका म्हणे मज पावें ॥६॥

४०८. सोसोनि विपत्ती । जोडी दिली तुझे हातीं ॥१॥ त्याचा हाचि उपकार । अंती आम्हाशीं वेव्हार ॥२॥ नामरूपा केला ठाव । तुज कोण म्हणतें देव ॥३॥ तुका म्हणे हरी । तुज ठाव दिला घरीं ॥४॥

४०९. आपुलें मागतां । काय नाहीं आम्हां सत्ता ॥१॥ परि या लौकिकाकारणें । उरी ठेविलें बोलणें ॥२॥ येचि आतां घडी । करूं बैसो तेची फडी ॥३॥ तुका म्हणे करितों तुला । ठाव नाहींसा विठ्ठला ॥४॥

४१०. असो आतां किती । तुज यावें काकुलती ॥१॥ माझें प्रारब्ध हें गाढें । तूं बापुडें तयापुढें ॥२॥ सोडवीन आतां । ब्रीद तुझें पंढरीनाथा ॥३॥ तुका म्हणे बळी । तो गांढ्याचे कान पिळी ॥४॥

४११. काय नव्हे केलें । एका चिंतितां विठ्ठलें ॥१॥ सर्व साधनांचें सार । भवसिंधु उतरी पार ॥२॥ योगयागतपें । केलीं तयानें अमुपें ॥३॥ तुका म्हणे जपा । मंत्र तीअक्षरी सोपा ॥४॥

४१२. हो कां दुराचारी । वाचे नाम जो उच्चारी ॥१॥ त्याचा दास मी अंकित । कायावाचामनेंसहित ॥२॥ नसो भाव चित्तीं । हरिचे गुण गातां गीतीं ॥३॥ करी अनाचार । वाचे हरिनामउच्चार ॥४॥ हो कां भलतें कुळ । शुचि अथवा चांडाळ ॥५॥ म्हणवी हरिचा दास । तुका म्हणे धन्य त्यास ॥६॥

४१३. हाकेसरिसी उडी । घालूनियां स्तंभ फोडी ॥१॥ ऐसी कृपावंत कोण । माझे विठाईवांचून ॥२॥ करितां आठव । धांवोनियां घाली कव ॥३॥ तुका म्हणे गीतीं गातां । नामें द्यावी सायुज्यता ॥४॥

४१४. लोहचुंबकाच्या बळें । उभें राहिलें निराळें ॥१॥ तैसा तूंचि आम्हाठायीं । खेळतोसी अंतर्बाहीं ॥२॥ भक्ष अग्नीचा तो दोरा । त्यासि वांचवी मोहरा ॥३॥ तुका म्हणे अधीलपणें । नेली लांकडें चंदनें ॥४॥

४१५. डोई वाढवूनि केश । भूतें आणिती अंगास ॥१॥ तरी ते नव्हती संतजन । तेथें नाहीं आत्मखुण ॥२॥ मेळवूनि नरनारी । शकुन सांगे नानापरी ॥३॥ तुका म्हणे

मैंद । नाहीं त्यापासीं गोविंद ॥४॥

४१६. गाढवाचें घोडें । आम्हीं करूं दृष्टीपुढें ॥१॥ चघळी वाहाणा । माघारिया बांडा सुणा ॥२॥ सोंगसंपादणी । तरी करूं शुद्ध वाणी ॥३॥ तुका म्हणे खळ । करूं समयीं निर्मळ ॥४॥

४१७. बाप मेला न कळतां । नव्हती संसाराची चिंता ॥१॥ विठो तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज ॥२॥ बाइल मेली मुक्त जाली । देवें माया सोडविली ॥३॥ पोर मेलें बरें जालें । देवें मायेविरहित केलें ॥४॥ माता मेली मज देखतां । तुका म्हणे हरली चिंता ॥५॥

४१८. नलगे मरावें । ऐसा ठाव दिला देवें ॥१॥ माझ्या उपकारासाठीं । वागविला म्हूण कंठीं ॥२॥ घरीं दिला ठाव । अवघा सकळही वाव ॥३॥ तुका म्हणे एके ठायीं । केलें माझें तुझें नाहीं ॥४॥

४१९. नाहीं लाग माग । न देखेंसें जालें जग ॥१॥ आतां बैसोनियां खावें । दिलें आइतें या देवें ॥२॥ निवारिलें भय । नाहीं दुसऱ्याची सोय ॥३॥ तुका म्हणे कांहीं । बोलायाचें काम नाहीं ॥४॥

४२०. तुझा दास मज म्हणती अंकित । अवघे सकळिक लहान थोर ॥१॥ हेंचि आतां लागें करावें जतन । तुझें थोरपण तुज देवा ॥२॥ होउनी निर्भर राहिलों निश्चिंत । पावनपतित नाम तुझें ॥३॥ करितां तुज होय डोंगराची राई । न लगतां कांहीं पात्या पातें ॥४॥ तुका म्हणे तुज काय तें अशक्य । तारितां मशक मज दीना ॥५॥

४२१. आम्ही ज्याचे दास । त्याचा पंढरिये वास ॥१॥ तो हा देवांचाही देव । काय कळिकाळाचा भेव ॥२॥ वेद जया गाती । श्रुति म्हणती नेति नेति ॥३॥ तुका म्हणे निज । रूपडें हें तत्त्वबीज ॥४॥

४२२. भक्तवत्सल दीनानाथ । तिहीं लोकीं ज्याची मात ॥१॥ तो हा पुंडलिकासाठीं । आला उभा वाळवंटीं ॥२॥ गर्भवास धरी । अंऋषीचा कैवारी ॥३॥ सकळां देवां अधिष्ठान । एका मंत्रासी कारण ॥४॥ तुका म्हणे ध्यानीं । ज्यासि ध्यातो शूळपाणी ॥५॥

४२३. फटकळ देव्हारा फटकळ अंगारा । फटकळ विचारा चाळविलें ॥१॥ फटकळ तो देव फटकळ तो भक्त । करवितो घात आणिका जीवा ॥२॥ तुका म्हणे अवघें फटकळ हें जिणें । अनुभवि ये खुणें जाणतील ॥३॥

४२४. नेत्राची वासना । तुज पाहावें नारायणा ॥१॥ करीं याचें समाधान । काय पहातोसी अनुमान ॥२॥ भेटावें पंढरीराया । हेंचि इच्छिताती बाह्या ॥३॥ जावें पंढरीसी । हेंचि ध्यान या मनासी ॥४॥ चित्त म्हणे पायीं । तुझे राहीन निश्चयीं ॥५॥ म्हणे बंधु तुकयाचा । देवा भाव पुरवीं याचा ॥६॥

४२५. जेणें तुज आलें रूप आणि नांव । पतित हें दैव तुझें आम्ही ॥१॥ नाहीं तरी तुज कोण हो पुसतें । निराकारी तेथें एकाएकीं ॥२॥ अंधारें ते दीपा आणियेली शोभा । माणिकासीं प्रभा कोंदणाची ॥३॥ धन्वंतरी रोगें आणिला उजेडा । सुखी काय चाडा जाणावें त्या ॥४॥ अमृतासी मोल विषाचिया गुणें । पितळ तरी सोनें उंच नीच ॥५॥ तुका म्हणे आम्ही असोनियां जाण । तुज देवपण आणियेलें ॥६॥

४२६. सुख वाटे येचि ठायीं । बहु पायीं संतांचे ॥१॥ म्हणऊनि केला वास । नाहीं नास ये ठायीं ॥२॥ न करवे हाली चाली । निवारली चिंता हे ॥३॥ तुका म्हणे निवे तनु । रजकणु लागतां ॥४॥

४२७. देउनियां कपाट । कोण काळ राखों वाट ॥१॥ काय येईल तें शिरीं । आज्ञा धरोनियां करीं ॥२॥ करूं कळे ऐसी मात । किंवा राखावा एकांत ॥३॥ तुका म्हणे जागों । किंवा कोणा नेदूं वागों ॥४॥

४२८. मायबापापुढें लेंकराची आळी । आणीक हे पाळी कोण लळे ॥१॥ सांभाळा जी माझीं विषमें अनंता । जवळी असतां अव्हेरू कां ॥२॥ आणिकांची चाले सत्ता आम्हावरी । तुमची ते थोरी काय मग ॥३॥ तुका म्हणे आलों दुरोनि जवळी । आतां टाळाटाळी करूं नये ॥४॥

४२९. योग तप याचि नांवें । गळित व्हावें अभिमानें ॥१॥ करणें तें हेंचि करा । सत्य बरा व्यापार ॥२॥ तरि खंडें येरझार । नेघे भार देहाचा ॥३॥ तुका म्हणे मानामान । हे बंधन नसावें ॥४॥

४३०. करी संध्यास्नान । वारी खाऊनियां अन्न ॥१॥ तया नाहीं लाभहानी । आदा वेंचाचिये मानीं ॥२॥ मजुराचें धन । विळा दोरचि जतन ॥३॥ तुका म्हणे नाहीं । अधिरासी देव कांहीं ॥४॥

४३१. वाखर घेउनि आले । त्यासी तरवारे नेहाले ॥१॥ नव्हे आपुलें उचित । करुनि टाकावें फजित ॥२॥ अंगुळिया मोडी । त्यासी काय सिलें घोडीं ॥३॥ नपुंसकासाठीं । तुका म्हणे नलगे जेठी ॥४॥

४३२. प्रेमसूत्र दोरी । नेतो तिकडे जातो हरी ॥१॥ मनेंसहित वाचा काया । अवघे दिलें पंढरीराया ॥२॥ सत्ता सकळ तया हातीं । माझी कींव काकुळती ॥३॥ तुका म्हणे ठेवी तैसें । आम्हीं राहों त्याचे इच्छे ॥४॥

४३३. पाववील ठाया । पांडुरंग चिंतिलिया ॥१॥ त्यासी चिंतिलिया मनीं । चित्ता करी गंवसणी ॥२॥ पावावया फळ । अंगीं असावें हें बळ ॥३॥ तुका म्हणे तईं । सिद्धि वोळगती पायीं ॥४॥

४३४. धन्य भावशीळ । ज्याचें हृदय निर्मळ ॥१॥ पूजी प्रतिमेचे देव । संत म्हणती तेथें भाव ॥२॥ विधिनिषेध नेणती । एक निष्ठा धरुनी चित्तीं ॥३॥ तुका म्हणे तैसें देवा । होणें लागे त्याच्या भावा ॥४॥

४३५. आधींच आळशी । वरी गुरूचा उपदेशी ॥१॥ मग त्या कैंची आडकाठी । विधिनिषेधाची भेटी ॥२॥ नाचरवे धर्म । न करवे विधिकर्म ॥३॥ तुका म्हणे ते गाढव । घेती मनासवें धांव ॥४॥

४३६. नाचे टाळी पिटी । प्रेमें अंग धरणीं लोटी ॥१॥ माझे सखे ते सज्जन । भोळे भाविक हरिजन ॥२॥ न धरिती लाज । नाहीं जानसवें काज ॥३॥ तुका म्हणे दाटे । कंठ, नेत्रीं जळ लोटे ॥४॥

४३७. कथा करोनियां दावी प्रेमकळा । अंतरीं जिव्हाळा कुकर्माचा ॥१॥ तुळसी खोवी कानीं दर्भ खोवी शेंडी । लटिकी धरी बोंडी नासिकाची ॥२॥ टिळे टोपी माळा देवाचें गवाळें । वागवी ओंगळ पोटासाठीं ॥३॥ गोसाव्याच्या रूपें हेरी परनारी । तयाचे अंतरीं काम लोभ ॥४॥ कीर्तनाचे वेळीं रडे पडे लोळे । प्रेमेविण डोळे गळताती ॥५॥ तुका म्हणे ऐसे मावेचे मइंद । त्यापाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥६॥

४३८. पाखांड्यांनीं पाठी पुरविला दुमाला । तेथें मी विठ्ठला काय बोलों ॥१॥ कांद्याचा खाणार चोजवी कस्तुरी । आपण भिकारी अर्थ नेणे ॥२॥ न कळे तें मज पुसती छळूनी । लागतां चरणीं न सोडिती ॥३॥ तुझ्या पायांविण दुजें नेणें कांहीं । तूंचि सर्वांठायीं एक मज ॥४॥ तुका म्हणे खीळ पडो त्याच्या तोंडा । किती बोलों भांडा वादकासीं ॥५॥

४३९. कलियुगीं कवित्व करिती पाषांड । कुशळ हे भांड बहु जाले ॥१॥ द्रव्य दारा चित्तीं प्रजांची आवडी । मुखें बडबडी कोरडेंचि ॥२॥ दंभ करी सोंग मानावया जग । मुखें बोले त्याग मनीं नाहीं ॥३॥ वेदाज्ञे करोनि न करिती स्वहित । न होती अलिप्त देहाहुनी ॥४॥ तुका म्हणे दंड साहील यमाचे । न करी जो वाचे बोले तैसें ॥५॥

४४०. विषयाचें सुख एथें वाटे गोड । पुढें अवघड यमदंड ॥१॥ मारिती तोडिती झोडिती निष्ठुर। यमाचे किंकर बहुसाल ॥२॥ असिपत्र तरुवर खैराचे इंगळ । निघतील ज्वाळ तैलपाकीं ॥३॥ तप्तभूमीवरी चालविती पायीं । अग्निस्तंभ बाहीं कवटाळविती ॥४॥ म्हणऊनि तुका येतो काकुलती । पुरे यातायाती गर्भवास ॥५॥

४४१. अल्प माझी मती । म्हणोनि येतो काकुलती ॥१॥ आतां दाखवा दाखवा । तुमचीं पाउलें केशवा ॥२॥ धीर माझ्या मना । नाहीं नाहीं नारायणा ॥३॥ तुका म्हणे दया । मज करा अभागिया ॥४॥

४४२. वाटुली पाहतां सिणले डोळुले । दाविसी पाउलें कैं वो डोळां ॥१॥ तूं माय माउली कृपेची साउली । विठ्ठले पाहिली वास तुझी ॥२॥ कां बा मोकलिलें कोणा निरविलें । कठिण कैसें झालें हृदय तुझें ॥३॥ तुका म्हणे माझ्या आसावल्या बाह्या । तुज क्षेम द्याया पांडुरंगा ॥४॥

४४३. देह हा सादर पाहावा निश्चित । सर्व सुख एथें नाम आहे ॥१॥ ब्रह्म जें देखणें द्वैत जेव्हां गेलें । शरीर तें जालें ब्रह्मरूप ॥२॥ यजन याजन तप व्रतें करिती । विकल्पें नागविती शुद्ध पुण्या ॥३॥ तुका म्हणे सर्व सुख एथें आहे । भ्रांति दूर पाहें टाकुनियां ॥४॥

४४४. तुझे वर्णूं गुण ऐसी नाहीं मती । राहिल्या त्या श्रुती मौनपणें ॥१॥ मौनपणें वाचा थोंटावल्या चारी । ऐसें तुझें हरी रूप आहे ॥२॥ रूप तुझें ऐसें डोळां न देखवे । जेथें हे झकवे ब्रह्मादिक ॥३॥ ब्रह्मादिक देवा कर्मांची कचाटी । म्हणोनि आटाटी फार त्यांसी ॥४॥ तुका म्हणे तुझें गुण नाम रूप । आहेसी अमुप वाणूं काई ॥५॥

४४५. मनवाचातीत तुझें हें स्वरूप । म्हणोनियां माप भक्ति केलें ॥१॥ भक्तीचिया मापें मोजितों अनंता । इतरानें तत्वतां न मोजवे ॥२॥ योग याग तपें देहाचिया योगें । ज्ञानाचिया लागें न सांपडसी ॥३॥ तुका म्हणे आम्ही भोळ्या भावें सेवा । घ्यावी जी केशवा करितों ऐसी ॥४॥

४४६. जंववरी नाहीं देखिली पंढरी । वर्णिसील थोरी वैकुंठींची ॥१॥ मोक्षसिद्धि तेथें हिंडे दारोदारीं । होऊनी कामारी दीनरूप ॥२॥ वृंदावन सडे चौक रंगमाळा । अभिनव सोहळा घरोघरीं ॥३॥ नामघोष कथापुराणकीर्तनी । ओविया कांडणीं पांडुरंग ॥४॥ सर्व सुख तेथें असे सर्वकाळ । ब्रह्म तें केवळ नांदतसे ॥५॥ तुका म्हणे जें न साधे सायासें । प्रत्यक्ष तें दिसे विटेवरी ॥६॥

४४७. दुःख वाटे ऐसी ऐकोनियां गोष्टी । जेणे घडे तुटी तुझ्या पायीं ॥१॥ येतो कळवळा देखोनियां घात । करितों फजित नाइकती ॥२॥ काय करूं देवा ऐसी नाहीं शक्ति । दंडुनि पुढती वाटे लावूं ॥३॥ तुका म्हणे मज दावूं नको ऐसे । दृष्टीपुढें पिसे पांडुरंगा ॥४॥

४४८. सूकरासी विष्ठा माने सावकाश । मिष्टान्नाची त्यास काय गोडी ॥१॥ तेवीं अभक्तासी आवडे पाखांड । न लगे त्या गोड परमार्थ ॥२॥ श्वानासी भोजन दिलें पंचामृत । तरी त्याचें चित्त हाडावरी ॥३॥ तुका म्हणे सर्पा पाजिलीया क्षीर । वमितां विखार विष जालें ॥४॥

४४९. रासभ धुतला महा तीर्थामाजी । नव्हे जैसा तेजी शामकर्ण ॥१॥ तेवीं खळा काय केल्या उपदेश । नव्हेचि मानस शुद्ध त्याचें ॥२॥ सर्पासी पाजिलें शर्करापीयूष । अंतरींचें विष जाऊं नेणे ॥३॥ तुका म्हणे श्वाना क्षिरीचें भोजन । सवेंचि वमन जेवीं तया ॥४॥

४५०. जेवीं नवज्वरें तापलें शरीर । लागे तया क्षीर विषातुल्य ॥१॥ तेवीं परमार्थ जीहीं दुराविला । तयालागीं झाला सन्निपात ॥२॥ कामीन जयाच्या जाहाली नेत्रासी । देखे तो

चंद्रासी पीतवर्ण ॥३॥ तुका म्हणे मद्यपानाची आवडी । न रुचे त्या गोडी नवनीताची ॥४॥

४५१. आतां असो मना अभक्ताची कथा । न होईं दुश्चिता हरिनामीं ॥१॥ नये त्याची कदा गोष्टी करूं मात । जिव्हे प्रायश्चित्त त्याच्या नांवें ॥२॥ प्रभातें न घ्यावें नांव माकडाचें । तैसें अभक्ताचें सर्वकाळ ॥३॥ तुका म्हणे आतां आठवूं मंगळ । जेणें सर्वकाळ सुखरूप ॥४॥

४५२. नाम आठवितां सद्गदित कंठीं । प्रेम वाढे पोटीं ऐसें करीं ॥१॥ रोमांच जीवन आनंदाश्रु नेत्रीं । अष्टांग ही गात्रीं प्रेम तुझें ॥२॥ सर्वही शरीर वेंचों या कीर्तनीं । गाऊं निशिदिनीं नाम तुझें ॥३॥ तुका म्हणे दुजें न करीं कल्पांतीं । सर्वदा विश्रांति संतांपायीं ॥४॥

४५३. जननी हे जाणे बाळकाचें वर्म । सुख दुःख धर्म जें जें कांहीं ॥१॥ अंधापुढें जेणें दिधला आधार । त्याचा हा विचार तोचि जाणे ॥२॥ शरणागता जेणें घातलें पाठीशीं । तो जाणे तेविशीं राखों तया ॥३॥ कासे लागे तया न लगती सायास । पोहोणार त्यास पार पावी ॥४॥ तुका म्हणे जीव विठ्ठलाचे हातीं । दिला त्याची गति तोचि जाणे ॥५॥

४५४. नका वांटूं मन विधिनिषेधासी । स्मरावा मानसीं पांडुरंग ॥१॥ खादलिया अन्ना मासी बोळों नये । अवघेंचि जाय एका घांसें ॥२॥ जोडी होते परी ते बहु कठीण । करितां जतन सांभाळावें ॥३॥ तुका म्हणे येथें न मना विषाद । निंबेंविण व्याध तुटों नये ॥४॥

४५५. नको होऊं देऊं भावी अभावना । याचि नांवे जाणा बहु दोष ॥१॥ मेघवृष्टि येथें होते अनिवार । जिव्हाळ्या उखर लाभ नाड ॥२॥ उत्तम विभागें कनिष्ठाची इच्छा । कल्पतरु तैसा फळे त्यासी ॥३॥ तुका म्हणे जिणें बहु थोडें आहे । आपुलिया पाहें पुढें बरें ॥४॥

४५६. त्याग तंव मज न वजतां केला । काहींच विठ्ठला मनांतूनि ॥१॥ भागलिया आला उबग सहज । न धरितां काज जालें मनीं ॥२॥ देह जड जालें ऋणाच्या आभारें । केलें संवसारें कासावीस ॥३॥ तुका म्हणे गेला आळस किळस । अकर्तव्य दोष निवारले ॥४॥

४५७. मढें झांकुनियां करिती पेरणी । कुणबियाची वाणी लवलाहो ॥१॥ तयापरी करीं स्वहित आपुलें । जयासी फावलें नरदेह ॥२॥ ओटीच्या परिस मुठीचें तें वाढे । यापरि कैवाडें स्वहिताचें ॥३॥ नाहीं काळसत्ता आपुलिये हातीं । जाणते हे गुंती उगविती ॥४॥ तुका म्हणे पाहें आपुली सूचना । करि तो शाहाणा मृत्युलोकीं ॥५॥

४५८. राजा चाले तेथें वैभव सांगा तें । हें काय लागतें सांगावें त्या ॥१॥ कोणी कोणा तेथें न मानिजे फुका । कृपेविण एका देवाचिया ॥२॥ शृंगारिलें नाहीं तगों येत वरि । उमटे लौकरि जैसें तैसें ॥३॥ तुका म्हणे घरीं वसे नारायण । कृपेचि ते खूण दिसों येते ॥४॥

४५९. वत्स पळे धेनु धांवे पाठी लागे । प्रीतीचा तो अंगें आविर्भाव ॥१॥ शिकविलें काय

येईल कारणा । सूत्र ओढी मना आणिकाच्या ॥२॥ सांडिलें त नाहीं घेत मेळविता । म्हणऊनि लाता मागें सारी ॥३॥ तुका म्हणे आग्रह करावा न लगे । सांगतसे हा गे अनुभव ॥४॥

४६०. देवाच्या संबंधें विश्वचि सोयरें । सूत्र ओढे दोरें एका एक ॥१॥ आहाच हें नव्हे बिटायासारिखें । जीव जीवनी देखें सामावलें ॥२॥ आणिकाचें सुख दुःख उमटे अंतरीं । एथील इतरीं तेणें न्यावें ॥३॥ तुका म्हणे ठसावलें शुद्ध जाती । शोभाचि पुढती विशेषता ॥४॥

४६१. अवघा वेंचलों इंद्रियांचे ओढी । जालें ते ते घडी निरोपिलें ॥१॥ असावा जी ठावा सेवेसी विचार । आपुला म्यां भार उतरिला ॥२॥ कायावाचा मनें तोचि निजध्यास । एथें जालों ओस भक्तिभावें ॥३॥ तुका म्हणे करूं येईल धांवणें । तरि नारायणें सांभाळावें ॥४॥

४६२. राहों आतां हेंचि ध्यान । डोळां मन लंपट ॥१॥ कोंडकोंडुनि धरीन जीवें । देहभावें पूजीन ॥२॥ होईल येणें कळसा आलें । स्थिरावलें अंतरीं ॥३॥ तुका म्हणे गोजिरिया । विठोबाच्या पायां पडों द्या ॥४॥

४६३. आदि मध्य अंत दाखविलें दीपें । हा तों आपणापें यत्न बरा ॥१॥ दास्यत्वें दाविलें धन्याचें भांडार । तों तों नव्हे सार एथुनियां ॥२॥ उपायानें सोस नासला सकळ । सत्ते सत्ताबळ अंगा आलें ॥३॥ तुका म्हणे दृष्टी सकळांचे शिरीं । वचनेंचि करी बैसोनियां ॥४॥

४६४. सांठविला वाण । पैस घातला दुकान ॥१॥ जें ज्या पाहिजे जे काळीं । आहे सिद्धचि जवळी ॥२॥ निवडिलें साचें । उत्तममध्यमकनिष्ठाचें ॥३॥ तुका बैसला दुकानीं । दावी मोलाऐसी वाणी ॥४॥

४६५. अवगुण तों कोणीं नाहीं प्रतिष्ठिले । मागें होत आले शिष्टाचार ॥१॥ दुर्बळाच्या नांवें पिटावा डांगोरा । हा तो नव्हें बरा सत्यवाद ॥२॥ मद्य आणि मधु एकरासी नांवें । तरि कां तें खावें आधारें त्या ॥३॥ तुका म्हणे माझा उच्छिष्ट प्रसाद । निवडी भेदाभेद दृष्टिन्यायें ॥४॥

४६६. लागलिया मुख स्तना । घाली पान्हा माउली ॥१॥ उभयतां आवडी लाड । कोडें कोड पुरतसे ॥२॥ मेळवितां अंगें अंग । प्रेमरंग वाढतो ॥३॥ तुका म्हणे जड भारी । अवघें शिरीं जननीचे ॥४॥

४६७. भूतीं भगवंत । हा तों जाणतों संकेत ॥१॥ भारी मोकलितो बाण । ज्याचा त्यासी कळे गुण ॥२॥ करावा उपदेश । निवडोनि तरि दोष ॥३॥ तुका म्हणे वाटे । चुकतां आडरानें कांटे ॥४॥

४६८. आम्हां हें कौतुक जगा द्यावी नीत । करावे फजित चुकती ते ॥१॥ कासयाचा बाध एकाच्या निरोपें । काय व्हावें कोपें जगाचिया ॥२॥ अविद्येचा येथें कोठें परिश्रम । रामकृष्णनाम ऐसे बाण ॥३॥ तुका म्हणे येथें खऱ्याचा विकरा । न सरती येरा खोट्या परी ॥४॥

४६९. दर्पणासी नकटें लाजे । शुद्ध खिजे देखोनि ॥१॥ ऐसें अवगुणांचे बाधें । दिसे

सुधे विपरीत ॥२॥ अंधळ्यासी काय हिरा । गाराचि तो सारिखा ॥३॥ तुका म्हणे भुंके सुणें । ठाया नेणे ठाव तो ॥४॥

४७०. नावडे तरि कां येतील हे भांड । घेउनियां तोंड काळें येथें ॥१॥ नासोनियां जाय रस या संगती । खळाचे पंगती नारायणा ॥२॥ तोंडावाटे नर्क काढी अमंगळ । मिष्टान्ना विटाळ करी सुणें ॥३॥ तुका म्हणे नाहीं संताची मर्यादा । निंदे तोचि निंदा मायझवा ॥४॥

४७१. लेकरा आइतें पित्याचें जतन । दावी निजधन सर्व जोडी ॥१॥ त्यापरि आमुचा जालासे सांभाळ । देखिलाची काळ नाहीं आड ॥२॥ भुकेचे सन्निध वसे स्तनपान । उपायाची भिन्न चिंता नाहीं ॥३॥ आळवूनि तुका उभा पैलथडी । घातली या उडी पांडुरंगें ॥४॥

४७२. शुद्धचर्या हें संतांचें पूजन । लागतचि धन नाहीं वित्त ॥१॥ सगुणाचे सोई सगुण विश्रांति । आपणचि येती चोजवीत ॥२॥ कीर्तनींच वोळे कृपेचा वोस । दुरीपणें वास सन्निधता ॥३॥ तुका म्हणे वर्म सांगतों सवेगें । मन लावा लागें स्वहिताच्या ॥४॥

४७३. जीवींचें जाणावें या नांवें आवडी । हेकड तें ओढी अमंगळ ॥१॥ चित्ताच्या संकोचें कांहीं च न घडे । अतिशयें वेडे चार तेचि ॥२॥ काळाविण कांहीं नाहीं रुचों येत । करूनि संकेत ठेवियेला ॥३॥ तुका म्हणे कळे वचनें चांचणी । काय बोलवूनि वेळोवेळां ॥४॥

४७४. कामातुर चवी सांडी । बरळ तोंडीं बरळें ॥१॥ रंगलें तें अंगीं दावी । विष देववी आसडे ॥२॥ धनसोसें लागे वेड । ते बडबड शमेना ॥३॥ तुका म्हणे व्यसनें दोन्ही । नर्कखाणी भोगावया ॥४॥

४७५. कृष्णांजनें जाले सोज्वल लोचन । तेणें दिले वाण निवडुनी ॥१॥ निरोपाच्या मापें करी लडबड । त्याचें तेणें गोड नारायणें ॥२॥ भाग्यवंताघरीं करितां विश्वासें । कार्य त्यासरिसें होईजेतें ॥३॥ तुका म्हणे पोट भरे बऱ्या बोजा । निज ठाव निजा निजस्थानीं ॥४॥

४७६. मैंद आला पंढरीस । हातीं घेउनि प्रेमपाश ॥१॥ पुढें नाडियेलें जग । नेतो लागों नेदीं माग ॥२॥ उभारोनि बाहे । दृष्टादृष्टी वेधिताहे ॥३॥ वैकुंठीहुनि पेणें । केलें पंढरीकारणें ॥४॥ पुंडलिकें थारा । देउनि आणिलें या चोरा ॥५॥ तुका म्हणे चला । तुम्ही आम्ही धरूं त्याला ॥६॥

४७७. भांडवी माउली कवतुकें बाळा । आपणा सकळां साक्षित्वेसीं ॥१॥ माझी माझी म्हणे एकाएका मारी । हें तों नाहीं दुरी उभयतां ॥२॥ तुझें थोडें भातें माझें बहु फार । छंद करकर वाद मिथ्या ॥३॥ तुका म्हणे एके ठायीं आहे वर्म । हेंचि होय श्रम निवारितें ॥४॥

४७८. लटिकियाच्या आशा । होतों पडिलों वोळसा । होउनियां दोषां । पात्र मिथ्या अभिमानें ॥१॥ बरवी उघडली दृष्टी । नाहीं तरी होतों कष्टी । आक्रंदते सृष्टी । मात्र या चेष्टांनीं ॥२॥ मरणाची नाहीं शुद्धी । लोभीं प्रवर्तली बुद्धी । परती तों कधीं । घडेचि ना माघारीं

॥३॥ सांचवूनि मरे धन । लावी पोरांसी भांडण । नाहीं नारायण । तुका म्हणे स्मरला ॥४॥

४७९. जवळी मुखापाशीं । असतां नेघे अहर्निशीं ॥१॥ भवनिर्दाळण नाम । विठ्ठल विठ्ठल नासी काम ॥२॥ सुखाचें शेजार । करूं कां नावडे घर ॥३॥ तुका म्हणे ठेवा । कां हा न करीच बरवा ॥४॥

४८०. बरवें देशाउर जालों । काय बोलें बोलावें ॥१॥ लाभें लाभ दुणावला । जीव धाला दर्शनें ॥२॥ भाग्ये जाली संतभेटी । आवडी पोटीं होती ते ॥३॥ तुका म्हणे श्रम केला । अवघा आला फळासी ॥४॥

४८१. सांगतां हें नये सुख । कीर्ती मुख न पुरे ॥१॥ आवडीनें सेवन करूं । जीवींचें धरूं जीवींच ॥२॥ उपमा या देतां लाभा । काशा शोभा सारिखी ॥३॥ तुका म्हणे नुचलीं डोई । ठेविली पायीं संतांचे ॥४॥

४८२. आपुलाला लाहो करूं । केणें भरूं हा विठ्ठल ॥१॥ भाग्यें पावलों या ठाया । आतां काया कुरवंडी ॥२॥ पुढती कोठें घडे ऐसें । बहुतां दिसें फावलें ॥३॥ तुका म्हणे जाली जोडी । चरण घडी न विसंबें ॥४॥

४८३. उजळलें भाग्य आतां । अवघी चिंता वारली ॥१॥ संतदर्शनें हा लाभ । पद्मनाभ जोडला ॥२॥ संपुष्ट हें हृदयपेटी । करूनि पोटीं सांठवूं ॥३॥ तुका म्हणे होता ठेवा । तो या भावा सांपडला ॥४॥

४८४. आम्हांसी आपुलें नावडे संचित । चरफडे चित्त कळवळ्यानें ॥१॥ न कळतां जाला खोळंबा मारगा । जगीं जालों जगा बहुरूपी ॥२॥ कळों आलें बरे उघडले डोळे । कर्णधार मिळे तरि बरें ॥३॥ तुका म्हणे व्हाल ऐकत करुणा । तरि नारायणा उडी घाला ॥४॥

४८५. बरगासाठीं खादलें शेण । मिळतां अन्न न संडी ॥१॥ फजित तो केला लाहे । ताडण साहे गौरव ॥२॥ ओढाळाची ओंगळ ओढी । उगी खोडी नवजाय ॥३॥ तुका फजीत करी बुच्या । विसरे कुच्या खोडी तेणें ॥४॥

४८६. धांव घालीं आई । आतां पाहातीस काई ॥१॥ धीर नाहीं माझे पोटीं । जालों वियोगें हिंपुटीं ॥२॥ करावें सीतळ । बहु जाली हळहळ ॥३॥ तुका म्हणे डोई । कई ठेवीन हे पायीं ॥४॥

४८७. तुम्हां ठावा होता देवा । माझे अंतरींचा हेवा ॥१॥ होती काशानें सुटका । तरि हे वैकुंठनायका ॥२॥ नसतें सांभाळिलें । जरि तुम्हीं आश्वासिलें ॥३॥ तुका म्हणे कृपाळुवा । बरवा केला सावाधावा ॥४॥

४८८. देऊं ते उपमा । आवडीनें पुरुषोत्तमा ॥१॥ पाहतां काशा तूं सारिखा । तिहीं लोकांच्या जनका ॥२॥ आरुष हे वाणी । गोड करूनि देतां कानीं ॥३॥ आवडीनें खेळे ।

तुका पुरवावे सोहळे ॥४॥

४८९. दर्शनाची आस । आतां न साहे उदास ॥१॥ जीव आला पायांपाशीं । येथें असें कलिवरेसीं ॥२॥ कांहींच नाठवे । ठायीं बैसलें नुठवे ॥३॥ जीव असतां पायीं । तुका ठकावला ठायीं ॥४॥

४९०. भोगावरि आम्हीं घातला पाषाण । मरणा मरण आणियेलें ॥१॥ विश्व तूं व्यापक काय मी निराळा । काशासाठीं बळा येऊं आतां ॥२॥ काय सारूनियां काढावें बाहेरी । आणूनि भीतरी काय ठेवूं ॥३॥ केला तरि उरे वादच कोरडा । बळें घ्यावी पीडा स्वप्नींची ते ॥४॥ अवघेचि वाण आले तुम्हां घरा । मजुरी मजुरा रोजकीर्दी ॥५॥ तुका म्हणे कांहीं नेणें लाभ हानी । असेल तो धनी राखो वाडा ॥६॥

४९१. कां हो एथें काळ आला आम्हां आड । तुम्हांपाशीं नाड करावया ॥१॥ कां हो विचाराचें पडिलें सांकडें । काय ऐसें कोडें उपजलें ॥२॥ कां हो उपजेना द्यावी ऐसी भेटी । काय द्वैत पोटीं धरिलें देवा ॥३॥ पाप फार किंवा जालासी दुर्बळ । मागिल तें बळ नाहीं आतां ॥४॥ काय जालें देणें निघालें दिवाळें । कीं बांधलासि बळें ऋणेंपायीं ॥५॥ तुका म्हणे कां रे ऐसी केली गोवी । तुझी माझी ठेवी निवडुनी ॥६॥

४९२. काय देह घालूं करवती कर्मरी । टाकूं या भितरीं अग्नीमाजी ॥१॥ काय सेवूं वन शीतउष्ण तहान । साहों कीं मोहन धरुनी बैसों ॥२॥ काय लावूं अंगीं भस्म उधळण । हिंडूं देश कोण खुंट चीरा ॥३॥ काय त्यजूं अन्न करूं मी उपवास । काय करूं नास जीवित्वाचा ॥४॥ तुका म्हणे काय करावा उपाव । ऐसा देई भाव पांडुरंगा ॥५॥

४९३. दंभें कीर्ति पोटभरे मानीजन । स्वहित कारण नव्हे कांहीं ॥१॥ अंतरती तुझे पाय मज दुरी । धरितां हे थोरी जाणिवेची ॥२॥ पिंडाच्या पाळणें धांवती विकार । आहे दावेदार मजमाजी ॥३॥ कैसा करूं घात आपुला आपण । धरूनि गुमान लोकलाज ॥४॥ तुका म्हणे मज दावीं तो सोहळा । देखें पाय डोळां तुझे देवा ॥५॥

४९४. धिग जिणें ज्याचा स्वामी हीन वर । मरण तें बरें भलें मग ॥१॥ आइकाजी देवा ऐसी आहे नीत । काय तें उचित सांभाळावें ॥२॥ देशोदेशीं धाक जयाच्या उत्तरें । तयाचें कुतरें परि भलें ॥३॥ तुका म्हणे हें कां सुचलें उत्तर । जाणोनि अंतर ओळखावें ॥४॥

४९५. आतां गाऊं तुज ओविया मंगळी । करूं गदारोळी हरिकथा ॥१॥ होसि निवारिता आमुचें सकळ । भय तळमळ पापपुण्य ॥२॥ भोगिले ते भोग लावूं तुझे अंगीं । अलिप्त या जगीं होउनि राहों ॥३॥ तुका म्हणे आम्ही लाडिकीं लेंकरें । न राहों अंतरें पायांविण ॥४॥

४९६. सर्व सुखें आजी एथेंचि वोळलीं । संतांचीं देखिलीं चरणांबुजें ॥१॥ सर्वकाळ

होतों आठवित मनीं । फिटली ते धणी येणें काळें ॥२॥ तुका म्हणे वाचा राहिली कुंठित । पुढें जालें चित्त समाधान ॥३॥

४९७. विठ्ठल सोयरा सज्जन सांगती । विठ्ठल या चित्तीं बैसलासे ॥१॥ विठ्ठलें हें अंग व्यापिली ते काया । विठ्ठल हे छाया माझी मज ॥२॥ बैसला विठ्ठल जिव्हेचिया माथां । न वदे अन्यथा आन दुजें ॥३॥ सकळां इंद्रियां मन हें प्रधान । तें ही करी ध्यान विठोबाचें ॥४॥ तुका म्हणे या हो विठ्ठलासी आतां । नये विसंबतां माझें मज ॥५॥

४९८. होय होय वारकरी । पाहें पाहें रे पंढरी ॥१॥ काय करावीं साधनें । फळ अवघेंचि येणें ॥२॥ अभिमान नुरे । कोड अवघेंचि पुरे ॥३॥ तुका म्हणे डोळां । विठो बैसला सांवळा ॥४॥

४९९. पंढरीसी जाय । तो विसरे बापमाय ॥१॥ अवघा होय पांडुरंग । राहे धरूनियां अंग ॥२॥ न लगे धन मान । देहभावें उदासीन ॥३॥ तुका म्हणे मळ । नासी तत्काळ तें स्थळ ॥४॥

५००. बळें बाह्यात्कारें संपादिलें सोंग । नाहीं जाला त्याग अंतरींचा ॥१॥ ऐसें येतें नित्य माझ्या अनुभवा । मानसी हा ठावा समाचार ॥२॥ जागृतीचा नाहीं अनुभव स्वप्नीं । जातो विसरूनि सकळ ही ॥३॥ प्रपंचाबाहेरी नाहीं आलें चित्त । केले करी नित्य वेवसाव ॥४॥ तुका म्हणे मज बहुरुप्याचि परी । जालें सोंग वरी आंत तैसें ॥५॥

५०१. म्हणवितों दास ते नाहीं करणीं । आंत वरी दोन्ही भिन्न भाव ॥१॥ गातों नाचतों तें दाखवितों जना । प्रेम नारायणा नाहीं अंगीं ॥२॥ पाविजे तें वर्म न कळेचि कांहीं । बुडालों या डोहीं दंभाचिया ॥३॥ भांडवल काळें हातोहातीं नेलें । माप या लागलें आयुष्यासि ॥४॥ तुका म्हणे वांयां गेलों ऐसा दिसें । होईल या हांसें लौकिकाचें ॥५॥

५०२. न कळे तों काय करावा उपाव । जेणें राहे भाव तुझ्या पायीं ॥१॥ येऊनियां वास करिसी हृदयीं । ऐसें घडे कईं कासयानें ॥२॥ साच भावें तुझें चिंतन मानसीं । राहे हें करिसी कैं गा देवा ॥३॥ लटिकें हें माझें करूनियां दुरी । साच तूं अंतरीं येउनि राहें ॥४॥ तुका म्हणे मज राखावें पतिता । आपुलिया सत्ता पांडुरंगा ॥५॥

५०३. चिंतिलें तें मनिंचें जाणे । पुरवी खुणे अंतरींचें ॥१॥ रात्री न कळे दिवस न कळे । अंगीं खेळे दैवत हें ॥२॥ नवसियाचे पुरवी नवस । भोगी त्यास भिन्न नाहीं ॥३॥ तुका म्हणे समचि देणें । समचरणीं उभा असे ॥४॥

५०४. उद्धाराचा संदेह नाहीं । याच्या कांहीं सेवकां ॥१॥ पांडुरंग अभिमानी । जीवदानी कोंवसा ॥२॥ बुडतां जळीं जळतां आगीं । ते प्रसंगीं राखावें ॥३॥ तुका म्हणे आम्हांसाठीं । कृपा पोटीं वागवी ॥४॥

५०५. माय ते विरक्ति न कळेचि आम्हां । जाणों एका नामा विठोबाच्या ॥१॥ नाचेन

मी सुखें वैष्णवांचे मेळीं । दिंडी टाळघोळी आनंदें या ॥२॥ शांति क्षमा दया ते मी काय जाणें । विठ्ठलकीर्तनें वांचूनियां ॥३॥ कासया एकांत सेवूं तया वना । आनंदें या जनामाजी असो ॥४॥ कासया उदास होऊं देहावरी । अमृतसागरीं बुडोनियां ॥५॥ तुका म्हणे मज असे हा भरवसा । विठ्ठल सरसा चालतसे ॥६॥

५०६. जेथें वैष्णवाचा वास । धन्य भूमी पुण्य देश ॥१॥ दोष नाहीं ओखदासी । दूत सांगे यमापाशीं ॥२॥ गरुडटकयांच्या भारें । भूमि गर्जे जयजयकारें ॥३॥ सहज तया जना छंद । वाचे गोविंद गोविंद ॥४॥ तुळसीवनें रंगमाळा । अवघा वैकुंठ सोहळा ॥५॥ तुका म्हणे भेणें । काळ नये तेणें रानें ॥६॥

५०७. माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव । आपणचि देव होय गुरु ॥१॥ पडियें देहभाव पुरवी वासना । अंतीं तें आपणापाशीं न्यावें ॥२॥ मागें पुढें उभा राहे सांभाळित । आलिया आघात निवारावे ॥३॥ योगक्षेम त्याचें जाणे जडभारी । वाट दावी करीं धरूनियां ॥४॥ तुका म्हणे नाहीं विश्वास ज्या मनीं । पाहावें पुराणीं विचारूनी ॥५॥

५०८. सकळ धर्म मज विठोबाचें नाम । आणीक तें वर्म नेणें कांहीं ॥१॥ काय जाणों संतां निरविलें देवें । करिती या भावें कृपा मज ॥२॥ तुका म्हणे माझा कोण अधिकार । तो मज विचार कळों यावा ॥३॥

५०९. उदंड शाहाणे होती तर्कवंत । परि नेणवेचि अंत विठोबाचा ॥१॥ उदंडा अक्षरां करोत भरोवरी । परि नेणवेचि थोरी विठोबाची ॥२॥ तुका म्हणे नाहीं भोळेपणाविण । जाणीव ते शीण रितें माप ॥३॥

५१०. आधारावांचुनी । काय सांगसील काहाणी ॥१॥ ठावा नाहीं पंढरीराव । तोंवरी अवघेंचि वाव ॥२॥ मानिताहे कोण । तुझें कोरडें ब्रह्मज्ञान ॥३॥ तुका म्हणे ठेवा । जाणपण एक सवा ॥४॥

५११. अनाथाची तुम्हां दया । पंढरीराया येतसे ॥१॥ ऐसी ऐकोनियां कीर्ति । बहु विश्रांति पावलों ॥२॥ अनाथाच्या धांवा घरा । नामें करा कुडावा ॥३॥ तुका म्हणे सवघड हित । ठेवूं चित्त पायांपें ॥४॥

५१२. येथें नाहीं उरों आले अवतार । येर ते पामर जीव किती ॥१॥ विषयांचे झणी व्हाल लोलिंगत । चेवलिया अंत न लगे मग ॥२॥ वाहोनियां भार कुंथसील ओझें । नव्हे तेंचि माझें थीता त्याग ॥३॥ तुका म्हणे कैसी नाहीं त्याची लाज । संतीं केशीराज साधियेला ॥४॥

५१३. हींच त्याचीं पंचभूतें । जीवन भातें प्रेमाचें ॥१॥ कळवळा धरिला संतीं । ते निगुती कैवाड ॥२॥ हाच काळ वर्तमान । समाधान ही संपत्ती ॥३॥ तुका म्हणे दिवसरातीं ।

हेंचि खाती अन्न ते ॥४॥

५१४. दीप न देखे अंधारा । आतां हेंचि करा जतन ॥१॥ नारायण नारायण । गांठी धन बळकट ॥२॥ चिंतामणीपाशीं चिंता । तत्वता ही न येल ॥३॥ तुका म्हणे उभयलोकीं । हेचि निकी सामग्री ॥४॥

५१५. धन्य काळ संतभेटी । पायीं मिठी पडली तो ॥१॥ संदेहाची सुटली गांठी । जालों पोटीं शीतळ ॥२॥ भवनदीचा जाला तारा । या उत्तरा प्रसादें ॥३॥ तुका म्हणे मंगळ आतां । कोण दाता याहुनि ॥४॥

५१६. दिनरजनीं हाचि धंदा । गोविंदाचे पवाडे ॥१॥ संकल्पिला देह देवा । सकळ हेवा तेठायीं ॥२॥ नाहीं अवसान घडी । सकळ जोडी इंद्रिया ॥३॥ कीर्ति मुखें गर्जे तुका । करी लोकां सावध ॥४॥

५१७. खरें नानवट निक्षेपीचें जुनें । काढिलें ठेवणें समर्थाचें ॥१॥ मजुराच्या हातें मापाचा उकल । मी तों येथें फोल सत्ता त्याची ॥२॥ कुल्लाळाच्या हातें घटाच्या उत्पत्ति । पाठवी त्या जाती पाकस्थळा ॥३॥ तुका म्हणे जीवन तें नारायणीं । प्रभा ते किरणीं प्रकाशाची ॥४॥

५१८. गंगेचिया अंतेविण काय चाड । आपुलें तें कोड तृषेपाशीं ॥१॥ विठ्ठल हे मूर्ति साजिरी सुंदर । घालूं निरंतर हृदयपुटीं ॥२॥ कारण ते असे नवनीतापाशीं । गबाळ तें सोसी येर कोण ॥३॥ बाळाचे सोईतें घांस घाली माता । अट्टाहास चिंता नाहीं तया ॥४॥ गाऊं नाचूं करूं आनंदसोहळा । भावचि वेगळा नाहीं आतां ॥५॥ तुका म्हणे अवघें जालें एकमय । परलोकींची काय चाड आतां ॥६॥

५१९. स्त्रीपुत्रादिकीं राहिला आदर । विषयीं पडिभर अतिशय ॥१॥ आतां सोडवणें धांवा नारायणा । मज हे वासना अनावर ॥२॥ येउनियां आड ठाके लोकलाज । तों हें दिसे काज अंतरलें ॥३॥ तुका म्हणे आम्हां जेथें जेथें गोवा । तेथें तुम्हीं देवा सांभाळावें ॥४॥

५२०. पडिलों भोवणीं । होतों बहु चिंतवणी ॥१॥ होतों चुकलों मारग । लाहो केला लागवेग ॥२॥ इंद्रियाचे संदी । होतों सांपडलों बंदी ॥३॥ तुका म्हणे बरें जालें । विठ्ठलसें वाचे आलें ॥४॥

५२१. बरें जालें आलीं ज्याच्या त्याच्या घरा । चुकला पान्हेरा ओढाळांचा ॥१॥ बहु केलें दुःखी त्याचिया सांभाळें । आतां तोंड काळें तेणें लोभें ॥२॥ त्याचिया अन्यायें भोगा माझें अंग । सकळही लाग घ्यावा लागे ॥३॥ नाहीं कोठें स्थिर राहों दिलें क्षण । आजिवरी शिण पावलों तो ॥४॥ वेगळाल्या खोडी केली तडातोडी । सांगावया घडी नाहीं सुख ॥५॥ निरवूनि तुका चालिला गोवारें । देवापाशीं भार सांडवूनि ॥६॥

५२२. न करावी आतां पोटासाठी चिंता । आहे त्या संचिता माप लावूं ॥१॥ दृष्टि ते घालावी परमार्थाठायीं । क्षुल्लका उपायीं शीण जाला ॥२॥ येथें तंव नाहीं घेइजेसें सवें । कांहीं नये जीवें वेचों मिथ्या ॥३॥ खंडणेंचि नव्हे उद्वेग वेरझारीं । बापुडे संसारीं सदा असों ॥४॥ शेवटा पाववी नावेचें बैसणें । भुजाबळें कोणें कष्टी व्हावें ॥५॥ तुका म्हणे आतां सकळाचें सार । करावा व्यापार तरी ऐसा ॥६॥

५२३. आमुच्या हें आलें भागा । जिव्हार या जगाचें ॥१॥ धरूनियां ठेलों जिवें । बळकट भावें एकविध ॥२॥ आणूनियां केला रूपा । उभा सोपा जवळी ॥३॥ तुका म्हणे अंकित केला । खालीं आला वचनें ॥४॥

५२४. खरें भांडवल सांपडलें गांठी । जेणें नये तुटी उदिमासी ॥१॥ सवंगाचें केणें सांपडलें घरीं । भरूनि वैखरी सांठविलें ॥२॥ घेतां देतां लाभ होतसे सकळां । सदैवां दुर्बळा भाव तैसा ॥३॥ फडा आलिया तो न वजे निरास । जरि कांहीं त्यास न कळतां ॥४॥ तुका म्हणे आतां जालीसे निश्चिंती । आणीक तें चित्तीं न धरूं दुजें ॥५॥

५२५. पदोपदीं दिलें अंग । जालें सांग कारण ॥१॥ रुधवूनि ठेलों ठाव । जागा वाव सकळ ॥२॥ पुढती चाली मना लाहो । वाढे देहो संतोष ॥३॥ तुका म्हणे क्षरभागीं । जालों जगीं व्यापक ॥४॥

५२६. निवडुनि दिलें नवनीत । संचित ते भोगीते ॥१॥ आतां पुढें भाव सार । जीवना थोर पाहावया ॥२॥ पारखियाचे पडिलें हातीं । चांचपती आंधळीं ॥३॥ तुका म्हणे सेवन घडे । त्यासी जोडे लाभ हा ॥४॥

५२७. उचित न कळे इंद्रियाचे ओढी । मुखें बडबडी शिकलें तें ॥१॥ आपण जाऊन न्यावें नरकास । बळें बेताळीस कुळें जग ॥२॥ अबोलणें बोले डोळे झांकुनियां । बडबडी वांयां दंभासाठीं ॥३॥ तुका म्हणे आम्ही तेथील पारखी । नाचे देखोवेखीं जाणों खरें ॥४॥

५२८. एक मन तुझ्या अवघ्या भांडवला । वांटितां तें तुला येईल कैसें ॥१॥ म्हणउनि दृढ धरीं पांडुरंग । देहा लावीं संग प्रारब्धाचा ॥२॥ आणिका संकल्पा नको गोऊं मन । तरीच कारण साध्य होय ॥३॥ तुका म्हणे ऐसें जाणावें उचित । तरी सहज स्थित येईल कळों ॥४॥

५२९. गावे म्हणउनि गीत । धरुनि राहे तैसें चित्त ॥१॥ हेंचि थोर अवघड आहे । अन्न देखोनि भूक राहे ॥२॥ ऐकावी म्हूण कथा । राहे तैसें धरुनि चित्ता ॥३॥ तुका म्हणे धणी । नव्हे जेविल्यावांचूनि ॥४॥

५३०. कळेल हे खुण । तरि दावी नारायण ॥१॥ सत्य संतांपाशीं राहे । येरां भय आड आहे ॥२॥ अणुचिया ऐसें । असे भरलें प्रकाशें ॥३॥ इंद्रियांचे धनी । ते हे जाती समजूनि

॥४॥ तर्क कुतर्क वाटा । नागवण घटापटा ॥५॥ तुका म्हणे ल्यावें । डोळां अंजन बरवें ॥६॥

५३१. जातो न येतिया वाटा । काय निरवितो करंटा ॥१॥ कैसा जालासे बेश्रम । लाज नाहीं न म्हणे राम ॥२॥ पाहे वैरियाकडे । डोळे वासुनियां रडे ॥३॥ बांधुनियां यमा हातीं । दिला नाहीं त्याची खंती ॥४॥ नाहीं यांपें काम । ऐसें जाणे तो अधम ॥५॥ अझुन तरी मुका । कां रे जालासि म्हणे तुका ॥६॥

५३२. वांटा घेईं लवकरि । मागें अंतरसी दूरी । केली भरोवरी । सार नेती आणीक ॥१॥ ऐसीं भांबावलीं किती । काय जाणों नेणों किती । समय नेणती । माथां भार वाहोनी ॥२॥ नाहीं सरलें तोंवरी । धांव घेईं वेग करीं । घेतलें पदरीं । फावलें तें आपुलें ॥३॥ फटलंडी म्हणे तुका । एक न साहावे धक्का । तरिच या सुखा । मग कैसा पावसी ॥४॥

५३३. चालावा पंथ तों पाविजे त्या ठाया । ऐकलिया वांया वारता त्या ॥१॥ ऐका जी वोजे पडतसें पायां । भावचि ते जाया वाट नव्हे ॥२॥ व्याली कुमारीचा अनुभवें अनुभव । सांगतां तो भाव येत नाहीं ॥३॥ तुका म्हणे येथें पाहिजे आरालें । बिंबीं निवळलें तरि भासे ॥४॥

५३४. काय नाहीं लवत झाडें । विसरें वेडें देहभाव ॥१॥ जया न फळे उपदेश । धस ऐसें त्या नांव ॥२॥ काय नाहीं असत जड । दगड तो अबोलणा ॥३॥ तुका म्हणे कुचर दाणा । तैसा म्हणा डेंग हा ॥४॥

५३५. देखीचा दिमाख शिकोनियां दावी । हिऱ्याऐसी केवीं गारगोटी ॥१॥ मर्यादा ते जाणे अरे अभागिया । देवाच्या ऐसिया सकळ मूर्ति ॥२॥ काय पडिलासी लटिक्याचे भरी । वोंवाळुनि थोरी परती सांडीं ॥३॥ तुका म्हणे पुढें दिसतसे घात । करितों फजित म्हणउनि ॥४॥

५३६. संसाराचा माथां भार । कांहीं पर न ठेवीं ॥१॥ भक्तीची ते जाती ऐसी । सर्वस्वासी मुकावें ॥२॥ भिक्षा आणि वेवसाव । काला करी तो गाढव ॥३॥ करुनि वस्ती बाजारीं । म्हणवी कासया निस्पृही ॥४॥ प्रसादा आडुनि कवी । केलें तूप पाणी तेवीं ॥५॥ तुका म्हणे होईं शूर । किंवा निसुर मजूर ॥६॥

५३७. तेज्या इशारती । तट्टा फोकावरी घेती ॥१॥ काय सांगावें त्याहुनि । ऐका रे धरा मनीं ॥२॥ नव्हे भांडखोर । धरूं ओढुनि पदर ॥३॥ तुका म्हणे तोंड । काळें करा खाली मुंड ॥४॥

५३८. मागें संतीं होतें जें जें सांगितलें । तें येऊं लागलें अनुभवा ॥१॥ आचारभ्रष्ट होती लोक कली । पुण्य क्षीण बळी जालें पाप ॥२॥ वर्णधर्म कोणी न धरी विटाळ । घालिती गोंधळ एके ठायीं ॥३॥ वेदाचे पाठक सेवितील मद्य । न देखति भेद विषयीं भांड ॥४॥ तुका म्हणे किती करावे फजित । तेचि छंद नित्य बहु होती ॥५॥

५३९. अक्षरांचा श्रम केला । फळा आला तेणें तो ॥१॥ अवघियाचा तळ धरी । जीवा

उरी नुरवुनी ॥२॥ फळलें तें लवे भारें । पिक खरें आलें तईं ॥३॥ तुका म्हणे हा गे देव । पुढें भाव सारावा ॥४॥

५४०. उचित जाणावें मुख्य धर्म आधीं । चित्त शुद्ध बुद्धी ठायीं स्थीर ॥१॥ न घालावी धांव मनाचिये ओढी । वचनीं आवडी संतांचिये ॥२॥ अंतरी या राहे वचनाचा विश्वास । न लगे उपदेश तुका म्हणे ॥३॥

५४१. जीवन्मुक्त ज्ञानी जरि जाले पावन । त्यजावा दुर्जन संग तिहीं ॥१॥ बहुत अन्न विष मोहरीच्या मानें । अवघेंचि तेणें विष होय ॥२॥ तुका म्हणे जेणें आपुलें स्वहित । तैसी करा नीत विचारुनि ॥३॥

५४२. द्रव्याचा तों आम्ही धरितों विटाळ । तया पाठी काळ लाग करीं ॥१॥ करोनिया हेंचि राहिलों जीवन । एक नारायण नाम ऐसें ॥२॥ तुका म्हणे हेंचि करुनि जतन । आलिया ही दान याचकासी ॥३॥

५४३. द्रव्याचिया मागें कळिकाळाचा लाग । म्हणोनियां संग खोटा त्याचा ॥१॥ निरयाचें मूळ घालुनियां मागें । मांडिली प्रसंगें कथा पुढें ॥२॥ आजिच्या प्रसंगें हाचि लाभ घ्यावा । पुढील भार देवावरी घाला ॥३॥ प्रारब्ध कांहीं न पालटे सोसें । तृष्णेचें हें पिसें वायांविण ॥४॥ तुका म्हणे घेई राहे ऐसें धन । सादर श्रवण करोनियां ॥५॥

५४४. रडे अळंकार दैन्याचिये कांती । उत्तमा विपत्तिसंग घडे ॥१॥ एकाविण एक अशोभ दातारा । कृपेच्या सागरा पांडुरंगा ॥२॥ रांधूं नेणें तया पुढील आइतें । केलें तें सोइतें वांयां जाय ॥३॥ तुका म्हणे चिंतामणि शेळी गळां । पावे अवकळा म्हणउनि ॥४॥

५४५. दुःखाचे डोंगर लागती सोसावे । ऐसें तंव ठावें सकळांसीं ॥१॥ कांहीं न करिती विचार हिताचा । न करिती वाचा नामघोष ॥२॥ भोगें कळों येती मागिल ते जन्म । उत्तम मध्यम कनिष्ठ ते ॥३॥ तुका म्हणे येथें झांकितील डोळे । भोग देते वेळे येईल कळों ॥४॥

५४६. सदैव तुम्हां अवघें आहे । हातपाय चालाया ॥१॥ मुखीं वाणी कानीं कीर्ति । डोळे मूर्ति देखावया ॥२॥ अंध बहिर ठकलीं किती । मुकीं होती पांगुळ ॥३॥ घरा आगी लावुनि जागा । न पळे तो गा वांचेना ॥४॥ तुका म्हणे जागा हिता । कांहीं आतां आपुल्या ॥५॥

५४७. ऐसे पुढती मिळतां आतां । नाहीं सत्ता स्वतंत्र ॥१॥ म्हणउनि फावलें तें घ्यावें । नाम गावें आवडी ॥२॥ संचित प्रारब्ध गाढें । धांवे पुढें क्रियमाण ॥३॥ तुका म्हणे घुबडा ऐसें । जन्म सरिसें शुकराचें ॥४॥

५४८. सर्वविशीं माझा त्रासलासे जीव । आतां कोण भाव निवडूं एक ॥१॥ संसाराची मज न साहेचि वार्ता । आणीक म्हणतां माझें कोणी ॥२॥ देहसुख कांहीं बोलिले उपचार ।

विष तें आदर बंध वाटे ॥३॥ उपाधि दाटणी प्रतिष्ठा गौरव । होय माझा जीव कासावीस ॥४॥ तुका म्हणे कांहीं आणीक न साहे । आवडती पाय वैष्णवाचे ॥५॥

५४९. आणीक कांहीं या उत्तराचें काज । नाहीं आतां मज बोलावया ॥१॥ भिन्न हे भावना स्वभाव । नव्हे कांहीं देव एकविध ॥२॥ गुण दोष कोणें निवडावे धर्म । कोण जाणे कर्म अकर्म तें ॥३॥ तरि भलें आतां न करावा संग । दुःखाचे प्रसंग तोडावया ॥४॥ तुका म्हणे गुण गाईं या देवाचे । घेईं माझे वाचे हेचि धणी ॥५॥

५५०. आपुला विचार करीन जीवाशीं । काय या जनाशीं चाड मज ॥१॥ आपलें स्वहित जाणती सकळ । निरोधितां बळें दुःख वाटे ॥२॥ आइको नाइको कथा कोणी तरी । जाऊनियां घरीं निजो सुखें ॥३॥ माझी कोण वोज जाला हा शेवट । देखोनियां वाट आणिकां लागे ॥४॥ तुका म्हणें भाकूं आपुली करुणा । जयाची वासना तया फळे ॥५॥

५५१. ध्याईं अंतरिंच्या सुखें । काय बडबड वाचा मुखें ॥१॥ विधिनिषेध ऊर फोडी । जंव नाहीं अनुभवगोडी ॥२॥ वाढे तळमळ उभयतां । नाहीं देखिलें अनुभवितां ॥३॥ आपुल्याला मतें पिसें । परि तें आहे जैसें तैसें ॥४॥ साधनाची सिद्धि । मौन करा स्थिर बुद्धि ॥५॥ तुका म्हणे वादें । वांयां गेली ब्रह्मवृंदें ॥६॥

५५२. कुशळ गुंतले निषेधा । वादी प्रवर्तले वादा ॥१॥ कैसीं ठकलीं बापुडीं । दंभविषयांचे सांकडीं ॥२॥ भूस उपणुनि केलें काय । हारपलें दोन्ही ठाय ॥३॥ तुका म्हणे लागे हातां । काय मथिलें घुसळितां ॥४॥

५५३. संतांची उच्छिष्टें बोलतों उत्तरें । काय म्यां गंव्हारें जाणावें हें ॥१॥ विठ्ठलाचें नाम घेतां नये शुद्ध । तेथें मज बोध काय कळे ॥२॥ करितों कवित्व बोबड्या उत्तरीं । झणी मजवरी कोप धरा ॥३॥ काय माझी याती नेणा हा विचार । काय मी तें फार बोलों नेणें ॥४॥ तुका म्हणे मज बोलवितो देव । अर्थ गुह्य भाव तोचि जाणे ॥५॥

५५४. चंदनाच्या वासें धरितील नाक । नावडे कनक न घडे हें ॥१॥ साकरेची गोडी सारिखी सकळां । थोरां मोठ्यां बाळां धाकुटियां ॥२॥ तुका म्हणे माझें चित्त शुद्ध होतें । तरि कां निंदिते जन मज ॥३॥

५५५. तुज ऐसा कोण उदाराचा रासी । आपुलेंचि देसी पद दासा ॥१॥ शुद्ध हीन कांहीं न पाहासी कुळ । करिसी निर्मळ वास देहीं ॥२॥ भावें हें कदान्न खासी त्याचे घरीं । अभक्ताच्या परी नावडती ॥३॥ नवजासी जेथें दुरी दवडितां । न येसी जो चित्ता योगियांच्या ॥४॥ तुका म्हणे ऐसीं ब्रीदें तुझीं खरीं । बोलतील चारी वेद मुखें ॥५॥

५५६. तरि कां नेणते होते मागें ऋषी । तीहीं या जनासी दुराविलें ॥१॥ वोळगती जया

अष्टमादि सिद्धी । ते या जनबुद्धी नातळती ॥२॥ कंदमुळें पाला धातूच्या पोषणा । खाती वास रानांतरीं केला ॥३॥ लावुनियां नेत्र उगेचि बैसले । न बोलत ठेले मौन्यरूप ॥४॥ तुका म्हणे ऐसें करीं माझ्या चित्ता । दुरावीं अनंता जन दुरी ॥५॥

५५७. कोणाच्या आधारें करूं मी विचार । कोण देईल धीर माझ्या जीवा ॥१॥ शास्त्रज्ञ पंडित नव्हें मी वाचक । यातिशुद्ध एक ठाव नाहीं ॥२॥ कलियुगीं बहु कुशळ हे जन । छळितील गुण तुझे गातां ॥३॥ मज हा संदेह झाला दोहीं सवा । भजन करूं देवा किंवा नको ॥४॥ तुका म्हणे आतां दुरावितां जन । किंवा हें मरण भलें दोन्ही ॥५॥

५५८. काय उणें जालें तुज समर्थासी । ऐशा मजपाशीं कोण दोष ॥१॥ जो तूं माझा न करिसी अंगीकार । सांगेन वेव्हार संतांमधीं ॥२॥ तुजविण रत आणिकाचे ठायीं । ऐसें कोण ग्वाही दावीं मज ॥३॥ तुका म्हणे काय धरुनी गुमान । सांग उगवून पांडुरंगा ॥४॥

५५९. काय करूं आन दैवतें । एकाविण पंढरीनाथें ॥१॥ सरिता मिळाली सागरीं । आणिकां नांवा कैची उरी ॥२॥ अनेक दीपिका प्रकाश। सूर्य उगवतां नाश ॥३॥ तुका म्हणे नेणें दुजें । एकाविण पंढरीराजें ॥४॥

५६०. काय करूं कर्माकर्म । बरें सांपडलें वर्म ॥१॥ होसी नामाच सारिखा । समजाविली नाहीं लेखा ॥२॥ नाहीं वेचावेच जाला । उरला आहेसी संचला ॥३॥ तुका म्हणे माझें । काय होईल तुम्हां ओझें ॥४॥

५६१. एकी केली हातोफळी । ठाया बळी पावले ॥१॥ आम्ही दैवा शक्तिहीनें । भाखूं तेणें करुणा ॥२॥ पावटणी केला काळ । जया बळ होतें तें ॥३॥ तुका म्हणे वीर्यावीर । संतधीर समुद्र ॥४॥

५६२. पुढिलाचें इच्छी फळ । नाहीं बळ तें अंगीं ॥१॥ संत गेले तया ठाया । देवराया पाववीं ॥२॥ ज्येष्ठांची कां आम्हां जोडी । परवडी न लभों ॥३॥ तुका म्हणे करीं कोड । पुरवीं लाड आमुचा ॥४॥

५६३. कैवल्याच्या तुम्हां घरीं । रासी हरी उदंडा ॥१॥ मजसाठीं कां जी वाणी । नव्हे धणी विभागा ॥२॥ सर्वां गुणीं सपुरता । ऐसा पिता असोनि ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगा । जालों सांगा सन्मुख ॥४॥

५६४. आपुलाल्या तुम्ही रूपासी समजा । कासया वरजा आरसिया ॥१॥ हें तों नव्हे देहबुद्धीचें कारण। होइल नारायणें दान केलें ॥२॥ बब्रुचिया बाणें वर्मासि स्पर्शावें। हें तों नाहीं ठावें मोकलित्या ॥३॥ तुका म्हणे बहु मुख या वचना । सत्याविण जाणा चाली नाहीं ॥४॥

५६५. न मनावी चिंता तुम्ही संतजनीं । हिरा स्फटिकमणी केंवि होय ॥१॥ पडिला प्रसंग

स्थळा त्या सारिखा । देखिला पारिखा भाव कांहीं ॥२॥ बहुतांसी भय एकाचिया दंडें । बहुत या तोंडें वचनासी ॥३॥ तुका म्हणे नाहीं वैखरीं बासर । करावया चार वेडे वेडे ॥४॥

५६६. यथाविधि पूजा करी । सामोग्री तो वरी हे नाहीं ॥१॥ आतां माझा सर्व भार । तूं दातार चालविता ॥२॥ मंगळ तें तुम्ही जाणा । नारायणा काय तें ॥३॥ तुला म्हणे समर्पिला । तुज विठ्ठला देहभाव ॥४॥

५६७. भवसिंधूचें हेंचि तारूं । मज विचारू पाहतां ॥१॥ चित्तीं तुझे धरिन पाय । सुख काय तें तेथें ॥२॥ माझ्या खुणा मनापाशीं । तें या रसीं बुडालें ॥३॥ तुका म्हणे वर्म आलें । हातां भलें हें माझ्या ॥४॥

५६८. पाहतां श्रीमुख सुखावलें सुख । डोळियांची भूक न वजे माझ्या ॥१॥ जिव्हे गोड तीन अक्षरांचा रस । अमृत जयास फिकें पुढें ॥२॥ श्रवणाची वाट चोखाळली शुद्ध । गेले भेदाभेद निवारोनी ॥३॥ महामळें मन होतें जें गादलें । शुद्ध चोखाळलें स्फटिक जैसें ॥४॥ तुका म्हणे माझ्या जीवाचें जीवन । विठ्ठल निधान सांपडलें ॥५॥

५६९. हाचि परमानंद आळंगीन बाहीं । क्षेम देतां ठायीं द्वैत तुटे ॥१॥ बोलायासि मात मन निवे हर्षें चित्त । दुणी वाढे प्रीत प्रेमसुख ॥२॥ जनांत भूषण वैकुंठीं सरतां । फावलें स्वहिता सर्वभावें ॥३॥ तुटला वेव्हार माया लोकाचार । समूळ संसार पारुषला ॥४॥ तुका म्हणे तो हा विठ्ठलचि व्हावा । आणिक या जीवा चाड नाहीं ॥५॥

५७०. आमुची कृपाळू तूं होसी माउली । विठ्ठले साउली शरणागता ॥१॥ प्रेमपान्हा स्तनीं सदा सर्वकाळ । दृष्टि हे निर्मळ अमृताची ॥२॥ भूक तहान दुःख वाटों नेदी शीण । अंतरींचा गुण जाणोनियां ॥३॥ आशा तृष्णा माया चिंता दवडी दुरी । ठाव आम्हां करीं खेळावया ॥४॥ तुका म्हणे लावी संतांचा सांगात । तेथें न पवे हात कळिकाळाचा ॥५॥

५७१. जेथें जावें तेथें कपाळ सरिसें । लाभ तो विशेष संतसंगें ॥१॥ पूर्वपुण्यें जरि होतीं सानुकूळ । अंतरायमूळ नुपजे तेथें ॥२॥ भाग्य तरी नव्हे धन पुत्र दारा । निकट वास बरा संतापायीं ॥३॥ तुका म्हणे हेचि करावी मिरासी । बळी संतापाशीं द्यावा जीव ॥४॥

५७२. आतां कांहीं सोस न करीं आणीक । धरीन तें एक हेंचि दृढ ॥१॥ जेणें भवसिंधु उतरिजे पार । तुटे हा दुस्तर गर्भवास ॥२॥ जोडीन ते आतां देवाचे चरण । अविनाश धन परमार्थ ॥३॥ तुका म्हणे बरा जोडला हा देह । मनुष्यपण इहलोकां आलें ॥४॥

५७३. जतन करीन जीवें । शुद्ध भावें करूनी ॥१॥ विठ्ठल विठ्ठल हें धन । जीवन अंतकाळींचें ॥२॥ वर्दळ हें संचित सारूं । बरवा करूं उदिम हा ॥३॥ तुका म्हणे हृदय पोटीं । ये संपुटीं सांठवूं ॥४॥

५७४. एवढा प्रभू भावें । तेणें संपुष्टीं रहावें ॥१॥ होय भक्तीं केला तैसा । पुरवी धरावी ते इच्छा ॥२॥ एवढा जगदानी । मागे तुळसीदळ पाणी ॥३॥ आला नांवारूपा । तुका म्हणे झाला सोपा ॥४॥

५७५. भाग्य ऐसी जाली जोडी । आतां घडी न विसंबे ॥१॥ विटेवरी समचरण । संतीं खूण सांगितली ॥२॥ अवघें आतां काम सारूं । हाचि करूं कैवाड ॥३॥ तुका म्हणे खंडूं खेपा । पुढें पापापुण्याच्या ॥४॥

५७६. पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण । आम्हां नारायण तैशापरी ॥१॥ सर्वभावें लोभ्या आवडे हें धन । आम्हां नारायण तैशापरी ॥२॥ तुका म्हणे एकविध झालें मन । विठ्ठलावांचून नेणें दुजें ॥३॥

५७७. विठ्ठल गीतीं गावा विठ्ठल चित्तीं ध्यावा । विठ्ठल उभा पहावा विटेवरी ॥१॥ अनाथाचा बंधु विठ्ठल कृपासिंधु । तोडी भवबंधु यमपाश ॥२॥ तोचि शरणागतां विठ्ठल मुक्तिदाता । विठ्ठल या संतांसमागमें ॥३॥ विठ्ठल गुणनिधि विठ्ठल सर्व सिद्धि । लागली समाधि विठ्ठल नामें ॥४॥ विठ्ठलाचें नाम घेतां जालें सुख । गोडावलें मुख तुका म्हणे ॥५॥

५७८. विठो सांपडावया हातीं । ठावी झाली एक गती । न धरी भय चित्तीं । बळ किती तयाचें ॥१॥ लागे आपणचि हातीं । कींव भाकावी काकुलती । करी मग चित्तीं । असेल तें तयाचे ॥२॥ एकलिया भावबळें । कैं सांपडें तो काळें । वैष्णवाच्या मेळें । उभा ठाके हांकेसी ॥३॥ बांधा माझिया जीवासी । तुका म्हणे प्रेमपाशीं । न सोडी तयासी । सर्वस्वासी उदार ॥४॥

५७९. वाट वैकुंठीं पाहाती । भक्त कैं पां येथें येती । तयां जन्ममरणखंति । नाहीं चित्तीं परलोक ॥१॥ धन्य धन्य हरिचे दास । तया सुलभ गर्भवास । ब्रह्मादिक करिती आस । तीर्थें वास भेटीची ॥२॥ कथा श्रवण व्हावयास । यमधर्मा थोर आस । पाहे रात्रंदिवस । वाट कर जोडोनी ॥३॥ रिद्धिसिद्धी न पाचारितां । त्या धुंडिती हरिभक्ता । मोक्षसायुज्यता । वाट पाहे भक्ताची ॥४॥ असती जेथें उभे ठेले । सदा प्रेमसुखें धाले । आणीकही उद्धरिले । महादोषी चांडाळ ॥५॥ सकळ करिती त्याची आस । सर्वभावें ते उदास । धन्य भाग्य त्यास । तुका म्हणे दर्शनें ॥६॥

५८०. सोनें दावी वरी तांबें तयापोटीं । खरियाचेसाठीं विकूं पाहे ॥१॥ पारखी तो जाणे तयाचे जीवींचें । निवडी दोहींचें वेगळालें ॥२॥ क्षीरा नीरा कैसें होय एकपण । स्वादी तोचि भिन्न भिन्न काढी ॥३॥ तुका म्हणे थीता आपणचि खोटा । अपमान मोठा पावईल ॥४॥

५८१. फोडूनि सांगडी बांधली माजासी । पैल थडी कैसी पावे सहजीं ॥१॥ आपला घात आपणचि करी । आणिकां सांगतां नाइके तरी ॥२॥ भुकेभेणें विष घेऊं पाहें आतां । आपलाचि घात करूं पाहे ॥३॥ तुका म्हणे एक चालतील पुढें । तयासी वांकडें जातां ठके ॥४॥

५८२. उपकारासाठीं केले हे उपाय । येणेंविण काय चाड आम्हां ॥१॥ बुडतां हे जन न देखवे डोळां । येतो कळवळा म्हणउनि ॥२॥ तुका म्हणे माझे देखतिल डोळे । भोग देते वेळे येईल कळों ॥३॥

५८३. आठवे देव तो करावा उपाव । येर त्यजीं वाव खटपटा ॥१॥ होईं बा जागा होईं बा जागा । वाउगा कां गा सिणसील ॥२॥ जाणिवेच्या भारें भवाचिये डोहीं । बुडसी तों कईं निघसि ना ॥३॥ तुका म्हणे देवा पावसील भावें । जाणतां तें ठावें कांहीं नव्हे ॥४॥

५८४. माझ्या मुखावाटा नयो हे वचन । व्हावें हें संतान द्रव्य कोणा ॥१॥ फुकाचा विभाग पतन दुःखासी । दोहींमुळें त्यासी तेंचि साधे ॥२॥ नाइकावी निंदा स्तुति माझ्या कानें । सादर या मनें होऊनियां ॥३॥ तुका म्हणे देव असाध्य यामुळें । आशामोहजाळीं गुंतलिया ॥४॥

५८५. चित्त ग्वाही तेथें लौकिकाचें काई । स्वहित तें ठायीं आपणापें ॥१॥ मनासी विचार तोचि साच भाव । व्यापक हा देव अंतर्बाहीं ॥२॥ शुद्ध भावा न लगे सुचावा परिहार । उमटे साचार आणिके ठायीं ॥३॥ भोगित्यासी काज अंतरींचें गोड । बाहिरल्या चाड नाहीं रंगें ॥४॥ तुका म्हणे भाव शुद्ध हें कारण । भाट नारायण होईल त्याचा ॥५॥

५८६. नव्हती माझे बोल । अवघें करितो विठ्ठल ॥१॥ कांही न धरावी खंती । हित होइल धरा चित्तीं ॥२॥ खोटी ते अहंता । वाट टाकिली सांगतां ॥३॥ ज्याचें तोचि जाणे । मी मापाडें तुका म्हणे ॥४॥

५८७. वासनेच्या मुखीं आदळूनि भीतें । निर्वाहापुरतें कारण तें ॥१॥ या नांव अंतरा आला नारायण । चित्तसमाधान खूण त्याची ॥२॥ सर्वकाळ हाचि करणें विचार । विवेकीं सादर आत्मत्वाचे ॥३॥ तुका म्हणे जों जों भजनासी बळे । अंगें तों तों कळे सन्निधता ॥४॥

५८८. चिंतनें अचिंत राहिलों निश्चळ । तेंचि किती काळ वाढवावें ॥१॥ अबोल्याचा काळ आतां ऐशावरी । वचनाची उरी उरली नाहीं ॥२॥ करूं आला तो तो केला लवलाहो । उरोंचि संदेहो दिला नाहीं ॥३॥ तुका म्हणे मोहो परतेचि ना मागें । म्हणउनि त्यागें त्याग झाला ॥४॥

५८९. निर्गुणाचे ध्यावें गुणासी दर्शन । एकाएकीं भिन्न भेद घडे ॥१॥ तुम्हां आम्हां आतां न पडे यावरी । आहों तेंचि बरी जेथें तेथें ॥२॥ आपणापासुनि नसावें अंतर । वेचिलें उत्तर म्हणउनि ॥३॥ तुका म्हणे अंगा आली कठिणता । आमच्या अनंता तुम्हा ऐसी ॥४॥

५९०. तुजचि पासाव जालोंसे निर्माण । असावें तें भिन्न कासयानें ॥१॥ पाहावा जी ठायीं करूनि विचार । न्यून कोठें फार असेचि ना ॥२॥ ठेविलिये ठायीं आज्ञेचें पाळण । करूनि जतन राहिलोंसें ॥३॥ तुका म्हणे आतां बोलतसें स्पष्ट । जालों क्रियानष्ट तुम्हा ऐसा ॥४॥

५९१. प्रीतिभंग माझा केला पांडुरंगा । भक्तिरस सांगा कां जी तुम्ही ॥१॥ म्हणउनि कांहीं

न ठेवींची उरी। आलों वर्मावरी एकाएकीं ॥२॥ न देखोंचि कांहीं परती माघारी। उरली ते उरी नाहीं मुळीं ॥३॥ तुका म्हणे आला अंतरासी खंड। तरि माझें तोंड खवळिलें ॥४॥

५९२. लटिका देव म्हणतां ऐसा। संदेहसा वाटतसे ॥१॥ ऐसें आलें अनुभवा। मजही सेवा करितां ॥२॥ शून्याकारी बहु मोळा। भेंडोळा हे पवाडे ॥३॥ तुका म्हणे ताळी नाहीं। एके ठायीं चपळत्वें ॥४॥

५९३. जैशासाठीं तैसें व्हावें। हें बरवें कळलेंसें ॥१॥ उदास तुं नारायणा। मीही म्हणा तुम्हीच ॥२॥ ठका महाठका जोडा। हे धडफुडा लागासी ॥३॥ एकांगीच भांडे तुका। नाहीं धोका जीवित्वें ॥४॥

५९४. बहुतां रीति काकुलती। आलों चित्तीं न धराच ॥१॥ आतां काशासाठीं देवा। मिथ्या हेवा वाढवूं ॥२॥ तुम्हां आम्हां झाली तुटी। आतां भेटी चिंतनें ॥३॥ तुका म्हणे लाजिरवाणें। अधीर जिणें इच्छेचें ॥४॥

५९५. आश्चर्य तें एक जालें। मना आलें माझिया ॥१॥ मढ्यापाशीं करुणा केली। तैसी गेली वृथा हे ॥२॥ न यावा तो कैसा राग। खोटें मग देखोनि ॥३॥ तुका म्हणे कैंचा बोला। शोध विठ्ठला माझिया ॥४॥

५९६. मागायाची नाहीं इच्छा। जो मी ऐसा संकोचूं ॥१॥ लटकियाची न करूं स्तुति। इच्छा चित्तीं धरूनि ॥२॥ हिशोबें तें आलें घ्यावें। तें तों ठावें सकळांसी ॥३॥ तुका म्हणे स्वामि सेवा। येथें देवा काशाची ॥४॥

५९७. पावटणीं पडणें पायां। उद्धार वांया काशाचा ॥१॥ घडेल तें भेटीसवें। दिसेल बरवें सकळां हें ॥२॥ न घडतां दृष्टादृष्टी। काय गोष्टी कोरड्या ॥३॥ अबोल्यानें असे तुका। अंतर एका साक्षी तें ॥४॥

५९८. अभयाचें स्थळ। तें हें एक अचळ ॥१॥ तरि धरिला विश्वास। ठेलों होउनियां दास ॥२॥ पुरली आवडी। पायीं लागलीसे गोडी ॥३॥ तुका म्हणे कंठीं नाम। अंगीं भरलें सप्रेम ॥४॥

५९९. संदेह निरसे तरि रुचिकर। फिक्यासी आदर चवी नाहीं ॥१॥ आता नको मज खोट्यानें फटवूं। कोठें येऊं जाऊं वेळोवेळां ॥२॥ गेला तरी काय जीवाचें सांकडें। वांचउनि पुढें काय काज ॥३॥ तुका म्हणे कसीं निवडा जी बरें। केली तैसी पोरें आळी पायीं ॥४॥

६००. वदे वाणी परि दुर्लभ अनुभवो। चालिचाची वाहो बहुतेक ॥१॥ आम्ही ऐसें कैसें राहावें निश्चळ। पाठिलागा काळ जिंकितसे ॥२॥ वाढवितां पोट दंभाचे पसारे। येतील माघारे मुदला तोटे ॥३॥ तुका म्हणे बरें जागविता मना। तुमच्या नारायणा अभय करें ॥४॥

६०१. उगेंचि हें मन राहातें निश्चळ। तरि कां तळमळ साठ होती ॥१॥ काय तुमचीं नेणों

कवतुक विंदानें । सर्वोत्तमपणें खेळतसां ॥२॥ नानाछंदें आम्हां नाचवावें जीवां । वाढवाव्या हांवा भलत्यापुढें ॥३॥ तुका म्हणे तुम्ही आपुली प्रतिष्ठा । वाढावया चेष्टा करीतसां ॥४॥

६०२. आम्ही बळकट जालों फिराउनि । तुमच्या वचनीं तुम्हां गोवूं ॥१॥ जालें तेव्हां जालें मागील तें मागें । आतां वर्म लागें ठावें जालें ॥२॥ तोडावया अवघ्या चेष्टांचा संबंध । शुद्ध त्यासी शुद्ध बुद्ध व्हावें ॥३॥ तुका म्हणे आम्हां आत्मत्वाची सोय । आपणचि होय तैसाचि तूं ॥४॥

६०३. तुम्ही साच नुपेक्षाल हा भरंवसा । मज जाणतसां अधीरसें ॥१॥ कासया घातला लांबणी उद्धार । ठेवा करकर वारूनियां ॥२॥ सुटों नये ऐसें कळलें निरुतें । कां घ्यावें मागुतें आळवुनि ॥३॥ तुका म्हणे तुम्ही सभाग्य जी देवा । माझा तुम्हां केवा काय आला ॥४॥

६०४. तुम्हां होइल देवा पडिला विसर । आम्हीं तें उत्तर यत्न केलें ॥१॥ पतितपावन ब्रीदें मिरविसी । याचा काय देसी झाडा सांग ॥२॥ आहाच मी नव्हें अर्थाचें भुकेलें । भलत्या एका बोलें वारेन तें ॥३॥ तुका म्हणे देह देईन सांडणें । सहित अभिमानें ओवाळूनि ॥४॥

६०५. जडलों अंगाअंगीं । मग ठेवीं ये प्रसंगीं । कांही उरी जगीं । लोकीं आहे पुरती ॥१॥ ठेवीं निवारूनि आधीं । अवकाश तोचि बुद्धी । सांपडली संधी । मग बळ कोणासी ॥२॥ गळा बांधीन पायीं । हालों नेदीं ठायींचे ठायीं । निवाड तो तईं । अवकळा केलिया ॥३॥ तुका म्हणे ठावे । आम्हा असां जी बरवे । बोभाटाची सवे । मुळींहुनी विठोबा ॥४॥

६०६. आम्हीं शक्तिहीनें । कैसे कराल तें नेणें । लिगाडाच्या गुणें । खोळंबला राहिलों ॥१॥ माझें मज देईं देवा । असे ठेविला तो ठेवा । नाहीं करीत हेवा । कांहीं अधीक आगळा ॥२॥ नाहीं गळां पडलों झोंड । तुमचें तेंचि माझें तोंड । चौघा चार खंड । लांबणी हे अनुचित ॥३॥ नाहीं येत बळा । आतां तुम्हासी गोपाळा । तुका म्हणे गळा । उगवा पायां लागतों ॥४॥

६०७. काय कृपेविण घालावें सांकडें । निश्चिंती निवाडें कोण्या एका ॥१॥ आहों तैसीं पुढें असों दीनपणें । वेंचुनि वचनें करुणेचीं ॥२॥ धरूनि भय आतां काय वाहों चिंता । काय करूं आतां आप्तपण ॥३॥ तुका म्हणे आम्ही भावहीन जीव । म्हणउनी देव दुरे दूर ॥४॥

६०८. नाहीं उल्लंघिलें कोणाचें वचन । मज कां नारायण दुरी झाला ॥१॥ आशंकित मनें करीं आळवण । नाहीं समाधान निश्चिंतीचें ॥२॥ दासाचा विसर हें तों अनुचित । असे सर्व नीत पायांपाशीं ॥३॥ तुका म्हणे तुम्हां लाज येत नाहीं । आम्हां चिंताडोहीं बुडवितां ॥४॥

६०९. जीव जायवरी सांडी करी माता । हें तों आश्चर्यता बाळकाची ॥१॥ दुर्बळ कीं नाहीं आइकत कानीं । काय नारायणीं न्यून झालें ॥२॥ क्षणक्षणा माझा नेघावा सांभाळ । अभाग्याचा काळ ऐसा आला ॥३॥ तुका म्हणे नाहीं वचनासी रुचि । फलकट वेंचि तें तें होय ॥४॥

६१०. म्हणउनी दास नव्हे ऐसा जालों । अनुभवें बोलों स्वामीपुढें ॥१॥ कां नाहीं वचन प्रतिउत्तराचें । मीच माझ्या वेचें अट्टाहासें ॥२॥ कासयानें गोडी उपजावा विश्वास । प्रीती कांहीं रस वांचुनियां ॥३॥ तुका म्हणे अगा चतुराशिरोमणी । विचारावें मनीं केशीराजा ॥४॥

६११. काय आम्हीं आतां पोटचि भरावें । जग चाळवावें भक्त म्हूण ॥१॥ ऐसा तरि एक सांगा जी विचार । बहु होतों फार कासावीस ॥२॥ काय कवित्वाची घालूनियां रूढी । करूं जोडाजोडी अक्षरांची ॥३॥ तुका म्हणे काय गुंफोनि दुकाना । राहों नारायणा करुनि घात ॥४॥

६१२. वर्म तरी आम्हां दावा । काय देवा जाणें मी ॥१॥ बहुतां रंगीं हीन जालों । तरि आलों शरण ॥२॥ द्याल जरि तुम्ही धीर । होईल स्थिर मन ठायीं ॥३॥ तुका म्हणे सत्ताबळें । लडिवाळें राखावी ॥४॥

६१३. सांगों देवा नेणा काय । बोलाची आवडी ॥१॥ वांयां मज चुकुर करा । विश्वंभरा विनोदें ॥२॥ आवडीच्या करा ऐसें । अंतर्वासें जाणतसा ॥३॥ तुका म्हणे समाधानें । होईन मनें मोकळा ॥४॥

६१४. निर्धाराचें अवघें गोड । वाटे कोड कौतुक ॥१॥ बैसलिया भाव पायीं । बरा तईं नाचेन ॥२॥ स्वामी कळे सावधान । तरि मन उल्हासे ॥३॥ तुका म्हणे आश्वासावें । प्रेम द्यावें विठ्ठलें ॥४॥

६१५. जाली तडातोडी । अवघीं पडिलों उघडीं ॥१॥ नव्हों कोणाचीच कांहीं । तुझे भरलिया वाहीं ॥२॥ पारुषला संवसार । मोडली बैसण्याची थार ॥३॥ आतां म्हणे तुका । देवा अंतरें राखों नका ॥४॥

६१६. आधार तो व्हावा । ऐसी आस करी देवा ॥१॥ तुम्हांपाशीं काय उणें । काय वेचे समाधानें ॥२॥ सेवेच्या अभिळासें । मन बहु जालें पिसें ॥३॥ अरे भक्तपराधीना । तुका म्हणे नारायणा ॥४॥

६१७. तुमचा तुम्हीं केला गोवा । आतां चुकवितां देवा ॥१॥ कैसें सरे चाळवणें । केलें काशाला शाहाणें ॥२॥ कासया हो रूपा । नांवा आलेति गा बापा ॥३॥ तुका म्हणे आतां । न सरे हवाले घालितां ॥४॥

६१८. माझी भक्ती भोळी । एकविध भावबळी ॥१॥ मी कां पडेन निराळा । ऐसा सांडूनि सोहळा ॥२॥ आतां अनारिसा । तेथें न व्हावें सहसा ॥३॥ तुका म्हणे जोडुनि पाय । पुढें उगा उभा राहें ॥४॥

६१९. आहे तरि सत्ता । ऐशा करितों वारता ॥१॥ अंगसंगाचीं उत्तरें । सलगीसेवन लेंकुरें ॥२॥ तरी निकटवासें । असो आशंकेच्या नासें ॥३॥ तुका म्हणे रुची । येथें भिन्नता कैंची ॥४॥

६२०. काळ सारावा चिंतनें । एकांतवासीं गंगास्नानें । देवाचे पूजनें । प्रदक्षणा तुळसीच्या ॥१॥ युक्त आहार विहार । नेम इंद्रियांसी सार । नसावी बासर । निद्रा बहु भाषण ॥२॥ परमार्थ महाधन । जोडी देवाचे चरण । व्हावया जतन । हे उपाय लाभाचे ॥३॥ देह समर्पिजे देवा । भार कांहीच न घ्यावा । होईल आघवा । तुका म्हणे आनंद ॥४॥

६२१. मऊ मेणाहून आम्ही विष्णुदास । कठीण वज्रास भेदूं ऐसे ॥१॥ मेले जीत असों निजोनियां जागे । जो जो जें जें मागे तें तें देऊं ॥२॥ भले तरी देऊं गांडीची लंगोटी । नाठाळाचे काठी देऊं माथां ॥३॥ मायबापाहूनि बहु मायावंत । करूं घातपात शत्रुहूनि ॥४॥ अमृत तें काय गोड आम्हांपुढें । विष तें बापुडें कडू किती ॥५॥ तुका म्हणे आम्ही अवघेचि गोड । ज्याचें पुरे कोड त्याचेपरि ॥६॥

६२२. गाढवाचें ताने । पालटतें क्षणक्षणें ॥१॥ तैसे अधमाचे गुण । एकविध नाहीं मन ॥२॥ उपजतां बरें दिसे । रूप वाढतां तें नासे ॥३॥ तुका म्हणे भुंकते वेळे । वेळ अवेळ न कळे ॥४॥

६२३. विटाळ तो परद्रव्य परनारी । येथुनि जो दुरी तों सोंवळा ॥१॥ गद्य पद्य कांहीं न धरावी उपाधी । स्वाधीनचि बुद्धि करुनी ठेवा ॥२॥ विचाराचें कांहीं करारे स्वहित । पापपुण्यातीत भांडवल ॥३॥ तुका म्हणे न लगे जावें वनांतरा । विश्व विश्वंभरा सारिखेंचि ॥४॥

६२४. कल्पतरु रुया नव्हती बाभुळा । पुरविती फळा इच्छितिया ॥१॥ उदंड त्या गाई म्हैसी आणि शेळ्या । परि त्या निराळ्या कामधेनु ॥२॥ तुका म्हणे देव दाखविल दृष्टी । तयासवें भेटी थोर पुण्य ॥३॥

६२५. जळो तैसा प्रेम रंग । जाय भुलोनि पतंग ॥१॥ सासुसाठीं रडे सून । भाव अंतरींचा भिन्न ॥२॥ मैंद मुखींचा कोंवळा । भाव अंतरीं निराळा ॥३॥ जैसी वृंदावनकांती । उत्तम धरूं नये हातीं ॥४॥ बक ध्यान धरी । दावी सोंग मत्स्य मारी ॥५॥ तुका म्हणे सर्प डुले । तैसा कथेमाजी खुले ॥६॥

६२६. वेशा नाहीं बोल अवगुणा दूषिलें । ऐशा बोला भले झणीं क्षोभा ॥१॥ कोण नेणे अन्न जीवाचें जीवन । विष मेळवण विष होय ॥२॥ सोनें शुद्ध नेणें कोण हा विचार । डांकें हीनवर केलें त्यासी ॥३॥ याती शुद्ध परि अधम लक्षण । वांयां गेलें तेणें सोंग हित ॥४॥ तुका म्हणे शूर तोचि पावे मान । आणीक मंडण भार वाही ॥५॥

६२७. अणुरेणुया थोकडा । तुका आकाशा एवढा ॥१॥ गिळुनी सांडिलें कळिवर । भवभ्रमाचा आकार ॥२॥ सांडिलीं त्रिपुटी । दीप उजळला घटीं ॥३॥ तुका म्हणे आतां । उरलों उपकारा पुरता ॥४॥

६२८. धन्य आजि दिन । जालें संतांचें दर्शन ॥१॥ जाली पापातापा तुटी । दैन्य गेलें उठाउठीं ॥२॥ जालें समाधान । पायीं विसावलें मन ॥३॥ तुका म्हणे आले घरा । तोचि दिवाळी दसरा ॥४॥

६२९. हेंचि माझें धन । तुमचें वंदावें चरण ॥१॥ येणें भाग्यें असो जीत । एवढें समर्पूनी चित्त ॥२॥ सांभाळिलें देवा । मज अनाथा जी जीवा ॥३॥ जोडुनियां कर । तुका विनवितो किंकर ॥४॥

६३०. फजितखोरा मना किती तुज सांगों । नको कोणा लागों मागें मागें ॥१॥ स्नेहवादें दुःख जडलेंसे अंगीं । निष्ठुर हें जगीं प्रेमसुख ॥२॥ निंदास्तुति कोणी करो दया माया । न धरीं चाड या सुखदुःखा ॥३॥ योगीराज कां रे न राहाती बैसोनि । एकिये आसनीं याचि गुणें ॥४॥ तुका म्हणे मना पाहें विचारून । होईं रे कठिण वज्राऐसें ॥५॥

६३१. जळो माझी ऐसी बुद्धी । मज घाली तुजमधीं । आवडी हे विधि । निषेधींच चांगली ॥१॥ तूं स्वामी मी सेवक । उंच पद नीच एक । ऐसें करावें कौतुक । नको करूं खंडणा ॥२॥ जळ न खाती जळा । वृक्ष आपुलिया फळा । भोक्ता तो निराळा । तेणें गोडी निवडिली ॥३॥ हिरा शोभला कोंदणें । अळंकारीं मिरवीं सोनें । एक असतां तेणें । काय दुजें जाणावें ॥४॥ उष्णें छाये सुख वाटे । बाळे माते पान्हा फुटे । एका एक भेटे । कोण सुखे ते काळीं ॥५॥ तुका म्हणे हित । हेंचि मानी माझें चित्त । नव्हें आतां मुक्त । ऐसा झाला भरंवसा ॥६॥

६३२. मनीं वसे त्याचें आवडे उत्तर । वाटे समाचार घ्यावा ऐसें ॥१॥ जातीचें तें झुरे येरयेरासाठीं । वियोगेंही तुटी नेघे कधीं ॥२॥ भेटीची अपेक्षा वारता आदर । पुसे नव्हे धीर मागुतालें ॥३॥ तुका म्हणे माझ्या जीवाचें जीवन । सोइरे हरिजन प्राणसखे ॥४॥

६३३. नव्हे आराणूक परि मनीं वाहे । होइल त्या साहे पांडुरंग ॥१॥ पंढरीसि जावें उद्वेग मानसीं । धरिल्या पावसी संदेह नाहीं ॥२॥ नसो बळ देह असो पराधीन । परि हें चिंतन टाकों नको ॥३॥ तुका म्हणे देह पडो या चिंतनें । पुढें लागे येणें याजसाठीं ॥४॥

६३४. कोठें देवा आलें अंगा थोरपण । बरें होतें दीन होतों तरी ॥१॥ साधन ते सेवा संतांची उत्तम । आवडीनें नाम गाईन तें ॥२॥ न पुसतें कोणी कोठेंही असतां । समाधान चित्ताचिया सुखें ॥३॥ तुका म्हणे जन अव्हेरितें मज । तरी केशीराज सांभाळितां ॥४॥

६३५. चतुर मी जालों आपुल्या भोंवता । भावेंवीण रिता स्फुंद अंगीं ॥१॥ आतां पुढें वायां जावें हें तें काईं । कामक्रोधें ठायीं वास केला ॥२॥ गुणदोष आले जगाचे अंतरा । भूताच्या मत्सरावरी बुद्धि ॥३॥ तुका म्हणे करूं उपदेश लोकां । नाहीं जालों एका परता दोषा ॥४॥

६३६. धन्य ते संसारीं । दयावंत जे अंतरीं ॥१॥ येथें उपकारासाठीं । आलें घर ज्यां वैकुंठीं ॥२॥ लटिकें वचन । नाहीं देहीं उदासीन ॥३॥ मधुरा वाणी होटीं । तुका म्हणे वाव पोटीं ॥४॥

६३७. कांडिल्या कुटिल्या होतो मांडा । अळसें धोंडा पडतसे ॥१॥ राग नको धरूं मनीं । गांडमणी सांगतों ॥२॥ तरटापुढें बरे नाचे । सुते काचें मुसळ ॥३॥ तुका म्हणे काठी सार । करी फार शाहाणें ॥४॥

६३८. कळों येतें तरि कां नव्हे । पडती गोवे भ्रमाचे ॥१॥ जाणतांचि होतो घात । परिसा मात देवा हे ॥२॥ आंविसासाठीं फासा मान । पाडी धनइच्छा ते ॥३॥ तुका म्हणे होणार खोटें । कर्म मोठें बळिवंत ॥४॥

६३९. मोकळें मन रसाळ वाणी । याचि गुणीं संपन्न ॥१॥ लक्ष्मी ते ऐशा नांवें । भाग्यें ज्यावें तरि त्यांनीं ॥२॥ नमन ते नम्रता अंगीं । नेघे रंगीं पालट ॥३॥ तुका म्हणे त्याच्या नांवें । घेतां व्हावें संतोषी ॥४॥

६४०. शेवटींची विनवणी । संतजनीं परिसावी ॥१॥ विसर तो न पडावा । माझा देवा तुम्हांसी ॥२॥ पुढें फार बोलों कायी । अवघें पायीं विदित ॥३॥ तुका म्हणे पडिलों पायां । करा छाया कृपेची ॥४॥

६४१. करितों कवित्व म्हणाल हें कोणी । नव्हे माझी वाणी पदरींची ॥१॥ माझीये युक्तीचा नव्हे हा प्रकार । मज विश्वंभर बोलवितो ॥२॥ काय मी पामर जाणें अर्थभेद । वदवी गोविंद तेंचि वदें ॥३॥ मिमित्त मापासी बैसविलों आहें । मी तो कांही नव्हे स्वामिसत्ता ॥४॥ तुका म्हणे आहें पाईकची खरा । वागवितों मुद्रा नामाची हे ॥५॥

६४२. आम्ही गावें तुम्हीं कोणीं कांहीं न म्हणावें । ऐसें तंव आम्हां सांगितलें नाहीं देवें ॥१॥ म्हणा रामनाम टाळी वाजवा हातें । नाचा डोला प्रेमें आपुलिया स्वहितें ॥२॥ सहज घडे तया आळस करणें तें काई । अग्नीचें भातुकें हात पाळितां कां पायीं ॥३॥ येथें नाहीं लाज भक्तिभाव लौकिक । हांसे तया घडे ब्रह्महत्या पातक ॥४॥ जया जैसा भाव निरोपण करावा । येथें नाहीं चाड ताल विताल या देवा ॥५॥ सदैव ज्या कथाकाळीं घडे श्रवण । तुका म्हणे येर जन्मा आले ते पाषाण ॥६॥

६४३. देव घ्या कोणी देव घ्या कोणी । आइता आला घर पुसोनी ॥१॥ देव नलगे देव नलगे । सांठवणाचें रुधले जागे ॥२॥ देव मंदला देव मंदला । भाव बुडाला काय करूं ॥३॥ देव घ्या फुका देव घ्या फुका । नलगे रुका मोल कांहीं ॥४॥ दुबळा तुका भावेंवीण । उधारा देव घेतला ऋण ॥५॥

६४४. विष्णुमय सर्व वैष्णवांसी ठावें । येरांनीं वहावें भार माथां ॥१॥ साधन संकट सर्वांलागीं शीण । व्हावा लागे क्षीण अहंभाव ॥२॥ भाव हा कठिण वज्र हें भेदवे । परि न छेदवे मायाजाळ ॥३॥ तुका म्हणे वर्म भजनेंचि सांपडे । येरासी तों पडे वोस दिशा ॥४॥

६४५. कीर्तनाची गोडी। देव निवडी आपण ॥१॥ कोणी व्हारे अधिकारी। त्यासी हरि देईल ॥२॥ अंगीं वैराग्याचें बळ। साही खळ जिणावे ॥३॥ उरेल ना उरी। तुका करी बोभाट ॥४॥

६४६. कायावाचामन ठेविलें गहाण । घेतलें तुझें रिण जोडीलागीं ॥१॥ अवघें आलें आंत पोटा पडिलें थीत । सारूनि निश्चिंत जालों देवा ॥२॥ द्यावयासी आतां नाहीं तोळा मासा । आधील मवेशा तुज ठावी ॥३॥ तुझ्या रिणें गेले बहुते बांधोनि । जाले मजहूनि थोर थोर ॥४॥ तुका म्हणे तुझे खतीं जें गुंतलें । करूनी आपुलें घेईं देवा ॥५॥

६४७. आलें भरा केणें। येरझार चुके जेणें ॥१॥ उभें केलें विटेवरी। पेठ इनाम पंढरी ॥२॥ वाहाती मारग। अवघें मोहोरलें जग ॥३॥ तुका म्हणे माप। खरें आणा माझे बाप ॥४॥

६४८. लक्ष्मीवल्लभा । दीनानाथा पद्मनाभा ॥१॥ सुख वसे तुझे पायीं । मज ठेवीं तेचि ठायीं ॥२॥ माझी अल्प हे वासना । तूं तो उदाराचा राणा ॥३॥ तुका म्हणे भोगें । पीडा केली धांव वेगें ॥४॥

६४९. करीं ऐसें जागें। वेळोवेळां पायां लागें ॥१॥ प्रेमें झोंबे कंठीं। देह धरणिये लोटीं ॥२॥ राहो लोकाचार। पडो अवघा विसर ॥३॥ तुका म्हणे ध्यावें। तुज व्यभिचारभावें ॥४॥

६५०. टाळ दिंडी हातीं । वैकुंठींचे ते सांगाती ॥१॥ जाल तरी कोणी जा गा । करा सिदोरी ते वेगा ॥२॥ जाती सादावीत । तेथें असों द्यावें चित्त ॥३॥ तुका म्हणे बोल । जाती बोलत विठ्ठल ॥४॥

६५१. वांयां जातों देवा । नेणें भक्ती करूं सेवा ॥१॥ आतां जोडोनियां हात । उभा राहिलों निवांत ॥२॥ करावें तें काय । न कळे अवलोकितों पाय ॥३॥ तुका म्हणे दान । दिलें पदरीं घेईन ॥४॥

६५२. जिवींचा जिव्हाळा । पाहों आपुलिया डोळां ॥१॥ आम्हां विठ्ठल एक देव । येर अवघेचि वाव ॥२॥ पुंडलिकाचे पाठीं । उभा हात ठेवुनि कटीं ॥३॥ तुका म्हणे चित्तीं । वाहूं रखुमाईचा पती ॥४॥

६५३. जीव खादला दैवतें। माझा येणें महाभूतें। झोंबलें निरुतें। कांहीं करितां न सुटे ॥१॥ आतां करूं काय। न करितां उपाय। तुम्हां आम्हां सये। विघडाविघड केली ॥२॥ बोलतां दुश्चिती। मी वो पडियलें भ्रांती। आठव हा चित्तीं। न ये म्हणतां मी माझें ॥३॥ भलतेंचि चावळे। जना अवघिया वेगळे। नाठवती बाळें। आपपर सारिखें ॥४॥ नका बोलो सये। मज वचन न साहे। बैसाल त्या राहें। उग्या वाचा खुंटोनी ॥५॥ तुम्हां आम्हां भेटी। नाहीं जाली जीवेंसाठीं। तुका म्हणे दृष्टी। पाहा जवळी आहे तों ॥६॥

६५४. माझें आराधन । पंढरपुरींचें निधान ॥१॥ तया एकाविण दुजें । कांहीं नेणें

पंढरीराजें ॥२॥ दास विठ्ठलाचा । अंकित अंकिला ठायींचा ॥३॥ तुका म्हणे आतां । नव्हे पालट सर्वथा ॥४॥

६५५. आतां आम्हां हेंचि काम । वाचे गाऊं तुझें नाम । वाहुनियां टाळी प्रेम । सुखें आनंदें नाचावें ॥१॥ अवघी जाली आराणूक । मागें पुढें सकळिक । त्रिपुटीचें दुःख । प्रारब्ध सारिलें ॥२॥ गोदातटे निर्मळें । देव देवांचीं देउळें । संत महंत मेळें । दिवस जाय सुखाचा ॥३॥ तुका म्हणे पंढरीनाथा । आणिक नाहीं मज चिंता । योगक्षेम माथां । भार तुझ्या घातला ॥४॥

६५६. चोरटें सुनें मारिलें टाळे । केऊं करी परि न संडी चाळे ॥१॥ ऐसे एक दुराचारी गा देवा । आपुलिया जीवा घात करी ॥२॥ नाक गेलें तरि लाज ना विचार । हिंडे फजितखोर दारोदारीं ॥३॥ तुका म्हणे कर्म बळिवंत गाढें । नेदी तया पुढें मागें सरो ॥४॥

६५७. मुनि मुक्त जाले भेणें गर्भवासा । आम्हां विष्णुदासां सुलभ तो ॥१॥ अवघाचि संसार केला ब्रह्मरूप । विठ्ठलस्वरूप म्हणोनियां ॥२॥ पुराणीं उपदेश साधन उद्धट । आम्हां सोपी वाट वैकुंठींची ॥३॥ तुका म्हणे जनां सकळांसहित । घेऊं अखंडित प्रेमसुख ॥४॥

६५८. न करावी स्तुति माझी संतजनीं । होईल या वचनीं अभिमान ॥१॥ भारें भवनदी नुतरवे पार । दुरावती दूर तुमचे पाय ॥२॥ तुका म्हणे गर्व पुरवील पाठी । होईल माझ्या तुटी विठोबाची ॥३॥

६५९. तुमचिये दासीचा दास करूनि ठेवा । आशीर्वाद द्यावा हाचि मज ॥१॥ नवविधा काय बोलली जे भक्ती । द्यावी माझ्या हातीं संतजनीं ॥२॥ तुका म्हणे तुमच्या पायांच्या आधारें । उतरेन खरें भवनदी ॥३॥

६६०. चोरटे काचे निघाले चोरी । आपलें तैसें पारखें घरीं ॥१॥ नाहीं नफा नागवे आपण । गमाविले कान हात पाय ॥२॥ बुद्धिहीन नये कांहींचि कारणा । तयासवें जाणा तेंचि सुख ॥३॥ तुका म्हणे नाहीं ठाउकें वर्म । तयासी तें कर्म वोढवलें ॥४॥

६६१. समर्थाचें बाळ केविलवाणें दिसे । तरी कोणा हांसे जन देवा ॥१॥ अवगुणी जरी जालें तें वोंगळ । करावा सांभाळ लागे त्याचा ॥२॥ तुका म्हणे तैसा मी एक पतित । परि मुद्रांकित जालों तुझा ॥३॥

६६२. गाढवाचे अंगीं चंदनाची उटी । राखेसवें भेटी केली तेणें ॥१॥ सहज गुण जयाचिये देहीं । पालट तो कांहीं नव्हे तया ॥२॥ माकडाचे गळां मोलाचा मणी । घातला चावुनी थुंकोनि टाकी ॥३॥ तुका म्हणे खळा नावडे हित । अविद्या वाढवित आपुलें मतें ॥४॥

६६३. नेणें सुणें चोर पाहुणा मागता । देखून भलता भुंकतसे ॥१॥ शिकविलें कांहीं न चलती तया । बोलियेले वांयां बोल जाती ॥२॥ क्षीर ओकुनियां खाय अमंगळ । आपुलीं तें

ढाळ जाऊं नेदी ॥३॥ वंदूं निंदूं काय अभक्त दुराचार । खळाचा विचार तुका म्हणे ॥४॥

६६४. जन मानवलें वरी बाह्यात्कारीं । तैसा मी अंतरीं नाहीं जालों ॥१॥ म्हणउनी पंढरिनाथा वाटतसे चिंता । प्रगट बोलतां लाज वाटे ॥२॥ संतां ब्रह्मरूप झालें अवघें जन । ते माझे अवगुण न देखती ॥३॥ तुका म्हणे मी तों आपणासी ठावा । आहें बरा देवा जैसा तैसा ॥४॥

६६५. काम क्रोध माझे जीताती शरीरीं । कोवळें तें वरी बोलतसें ॥१॥ कैसा सरता जालों तुझ्या पायीं । पांडुरंगा कांहीं न कळे हें ॥२॥ पुराणींची ग्वाही वदतील संत । तैसें नाहीं चित्त शुद्ध झालें ॥३॥ तुका म्हणे मज आणुनि अनुभवा । दाखवीं हें देवा साच खरें ॥४॥

६६६. स्तुति करिजेसा नाहीं अधिकार । न कळे विचार योग्यतेचा ॥१॥ तुमचें मी दास संतांचें दुर्बळ । करूनि सांभाळ राखा पायीं ॥२॥ राम कृष्ण हरी मंत्र उच्चारणा । आवडी चरणां विठोबाच्या ॥३॥ तुका म्हणे तुमचें सेवितों उच्छिष्ट । क्षमा करा धीट होउनीयां ॥४॥

६६७. बहु दूरवरी । वेठी ओझें होतें शिरीं ॥१॥ आतां उतरला भार । तुम्हीं केला अंगीकार ॥२॥ बहु काकुलती । आलों असें मागें किती ॥३॥ तुका म्हणे देवा । आजि सफल झाली सेवा ॥४॥

६६८. बुद्धीचा पालट धरा र कांहीं । मागुता हा नाहीं मनुष्यदेह ॥१॥ आपुल्या हिताचे न होती सायास । गृहदारा आस धनवित्त ॥२॥ अवचित निधान लागलें हें हातीं । भोगावी विपत्ति गर्भवास ॥३॥ यावें जावें पुढें ऐसेंचि कारण । भोगावें पतन नरकवास ॥४॥ तुका म्हणे धरीं आठव या देहीं । नाहीं तरि कांहीं बरें नव्हे ॥५॥

६६९. आम्हीं पतितांनीं घालावें सांकडें । तुम्हां लागे कोडें उगवणें ॥१॥ आचरतां दोष न धरूं सांभाळ । निवाड उकल तुम्हां हातीं ॥२॥ न घेतां कवडी करावा कुढावा । पाचारितां देवा नामासाठीं ॥३॥ दयासिंधु नाम पतितपावन । हें आम्हां वचन सांपडलें ॥४॥ तुका म्हणे करूं अन्यायाच्या कोटी । कृपावंत पोटीं तुम्ही देवा ॥५॥

६७०. जो भक्तांचा विसावा । उभा पाचारितो धांवा ॥१॥ हातीं प्रेमाचें भातुकें । मुखीं घाली कवतुकें ॥२॥ भवसिंधु सुखें । उतरी कासे लावूनि ॥३॥ थोर भक्ताची आस । पाहे भोंवताली वास ॥४॥ तुका म्हणे कृपादानी । फेडी आवडीची धणी ॥५॥

६७१. अखंड जया तुझी प्रीति । मज दे तयाची संगति । मग मी कमळापति । तुज बा नाणीं कांटाळा ॥१॥ पडोन राहेन तये ठायीं । उगाचि संतांचिये पायीं । न मगें न करीं कांहीं । तुझी आण गा विठोबा ॥२॥ तुम्ही आम्ही पीडों जेणें । दोन्ही वारती एकानें । बैसलों धरणें । हाका देत दाराशीं ॥३॥ तुका म्हणे या बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला । न पाहिजे केला । अवघा माझा आव्हेर ॥४॥

६७२. पुनित केलें विष्णुदासीं । संगें आपुलिया दोषी ॥१॥ कोण पाहे तयांकडे । वीर

विठ्ठलाचे गाढे । अशुभ त्यांपुढें । शुभ होऊनियां ठाके ॥२॥ प्रेमसुखाचिया रासी । पाप नाहीं ओखदासी ॥३॥ तुका म्हणे त्यांनीं । केली वैकुंठ मेदिनी ॥४॥

६७३. जन देव तरी पायाचि पडावें । त्याचिया स्वभावें चाड नाहीं ॥१॥ अग्नीचें सौजन्य शीतनिवारण । पालवीं बांधोन नेतां नये ॥२॥ तुका म्हणे विंचू सर्प नारायण । वंदावे दुरोन शिवों नये ॥३॥

६७४. भूत भविष्य कळों यावें वर्तमान । हे तों भाग्यहीन त्याची जोडी ॥१॥ आम्हीं विष्णुदासीं देव ध्यावा चित्तें । होणार तें होतें प्रारब्धेंचि ॥२॥ जगरूढीसाठी घातला दुकान । जातो नारायण अंतरोनि ॥३॥ तुका म्हणे हा हो प्रपंच गाढा । थोरली ते पीडा रिद्धिसिद्धि ॥४॥

६७५. सर्प भुलोन गुंतला नादा । गारुडियें फांदा घातलासे । हिंडवुनि पोट भरी दारोदारीं । कोंडुनि पेटारी असे रया ॥१॥ तैसी परी मज जाली पांडुरंगा । गुंतलों तो मी गा सोडवीं आतां । माझें मज कांहीं न चलेसें जालें । कृपा हे तुज न करितां ॥२॥ आविसें मीन लावियला गळीं । भक्ष हो गिळी म्हणूनियां । काढूनि बाहेरी प्राण घेऊं पाहे । तेथें बाप माये कवण रया ॥३॥ पक्षी पिलयां पातलें आशा । देखोनियां फांसा गुंते बळें । मरण सायासें नेणें धांवोनि वोरसे । जीवित्वा नास जालीं बाळें ॥४॥ गोडपणें मासी लिगाडीं गुंतली । सांपडे फडाफडी अधिकाधिक । तुका म्हणे प्राण घेतला आशा । पंढरीनिवासा धांव घालीं ॥५॥

६७६. यातिहीन मज काय तो अभिमान । मानी तुज जन नारायण ॥१॥ काय सुख मज तयाची हे खंती । आपुलाला घेती गुणभाव ॥२॥ द्रव्यामुळें माथां वाहियेली चिंधी । होन जयामधीं होता गांठीं ॥३॥ तुका म्हणे जन वंदितो वेगळा । मजसी दुर्बळा काय चाड ॥४॥

६७७. शीतळ साउली आमुची माउली । विठाई वोळली प्रेमपान्हा ॥१॥ जाऊनि वोसंगा निघेन वोरस । लागेल तें इच्छे पीइन वरी ॥२॥ कृपा तनु माझी सांभाळी दुभोनि । अमृतसंजीवनी लोटलीसे ॥३॥ आनंदाचा ठाव नाहीं माझे चित्तीं । सागर तो किती उपमेसी ॥४॥ सैर जाय पडे तयेसी सांकडें । सांभाळित पुढें मागें आसे ॥५॥ तुका म्हणे चिंता कैसी ते मी नेणें । लडिवाळ तान्हे विठाईचें ॥६॥

६७८. सुटायाचा कांहीं करितों उपाय । तों हे देखें पाय गोवियेले ॥१॥ ऐसिया दुःखाचे सांपडलों संदी । हारपली बुद्धि बळ माझें ॥२॥ प्रारब्ध क्रियमाण संचिताचे । वोढत ठायींचे आले साचे ॥३॥ विधिनिषेधाचे सांपडलों चेपे । एक एका लोपे निवडेना ॥४॥ सारावें तें वाढे त्याचियाची अंगें । तृष्णेचिया संगे दुःखी जालों ॥५॥ तुका म्हणे आतां करीं सोडवण । सर्वशक्तिहीन जालों देवा ॥६॥

६७९. भय वाटे पर । न सुटे हा संसार ॥१॥ ऐसा पडिलों काचणीं । करीं धांवा म्हणउनि

॥२॥ विचारितां कांहीं । तों हें मन हातीं नाहीं ॥३॥ तुका म्हणे देवा । येथें न पुरे रिघावा ॥४॥

६८०. येगा येगा पांडुरंगा । घेई उचलूनि वोसंगा ॥१॥ ऐसी असोनियां वेसी । दिसतों मी परदेसी ॥२॥ उगवूनि गोवा । सोडवूनि न्यावें देवा ॥३॥ तुज आड कांहीं । बळ करी ऐसें नाहीं ॥४॥ तुका म्हणे हृषीकेशी । काय उशीर लाविलासी ॥५॥

६८१. माझी विठ्ठल माउली । प्रेमपान्हा पान्हाइली ॥१॥ कुर्वाळूनि लावी स्तनीं । न वजे दुरी जवळूनि ॥२॥ केली पुरवी आळी । नव्हे निष्ठुर कोंवळी ॥३॥ तुका म्हणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ॥४॥

६८२.आम्ही उतराई । भाव निरोपोनि पायीं ॥१॥ तुम्ही पुरवावी आळी । करावी ते लडिवाळीं ॥२॥ आमचा हा नेम । तुम्हां उचित हा धर्म ॥३॥ तुका म्हणे देवा । जाणों सांगितली सेवा ॥४॥

६८३. केलें पाप जेणें दिलें अनुमोदन । दोघांसि पतन सारिखेंचि ॥१॥ विष नवनीता विष करी संगें । दुर्जनाच्या त्यागें सर्व हित ॥२॥ देखिलें ओढाळ निघालिया सेता । टाळावें निमित्ता थैक म्हूण ॥३॥ तुका म्हणे जोडे केल्याविण कर्म । देखतां तो श्रम न मानितां ॥४॥

६८४. विठ्ठल गीतीं विठ्ठल चित्तीं । विठ्ठल विश्रांति भोग जया ॥१॥ विठ्ठल आसनीं विठ्ठल शयनीं । विठ्ठल भोजनीं ग्रासोग्रासीं ॥२॥ विठ्ठल जागृति स्वप्नसुषुप्ती । आन दुजें नेणती विठ्ठलाविण ॥३॥ भूषण अळंकार सुखाचे प्रकार । विठ्ठल निर्धार जयां नरां ॥४॥ तुका म्हणे तेही विठ्ठलचि झाले । संकल्प मुराले दुजेपणें ॥५॥

६८५. संतांचें सुख झालें या देवा । म्हणउनि सेवा करी त्यांची ॥१॥ तेथें माझा काय कोण तो विचार । वर्णावया पार महिमा त्यांचा ॥२॥ निर्गुण आकार झाला गुणवंत । घाली दंडवत पूजोनियां ॥३॥ तीर्थें त्यांची इच्छा करिती नित्यकाळ । व्हावया निर्मळ आपणांसी ॥४॥ अष्ट महा सिद्धींचा कोण आला पाड । वागों नेदी आड कोणी तया ॥५॥ तुका म्हणे ते हे बळिया शिरोमणी । राहिले चरणीं निकटवासें ॥६॥

६८६. जो मानी तो देईल काई । न मानी तो नेईल काई ॥१॥ आम्हां विठ्ठल सर्वभूतीं । राहो चित्तीं भलतैसा ॥२॥ साध्य न तें जना काई । जल्पे वांयांविण ठायीं ॥३॥ वंदीं निंदीं तुज तो गा । तुका म्हणे पांडुरंगा ॥४॥

६८७. भावबळें कैसा झालासी लहान । मागें संतीं ध्यान वर्णियेले ॥१॥ तें मज उचित करूनियां देवा । दाखवीं केशवा मायबापा ॥२॥ पाहोनियां डोळां बोलेन मी गोष्टी । आळिंगूनि मिठी देईन पायीं ॥३॥ चरणीं दृष्टि उभा राहेन समोर । जोडोनियां कर पुढें दोन्ही ॥४॥ तुका म्हणे उत्कंठित हे वासना । पुरवीं नारायणा आर्त माझें ॥५॥

६८८. कृपाळु म्हणोनि बोलती पुराणें । निर्धार वचनें याचीं मज ॥१॥ आणीक उपाय नेणेंचि मी कांहीं । तुझें वर्म ठायीं पडे तैसें ॥२॥ नये धड कांहीं बोलतां वचन । रिघालों शरण सर्व भावें ॥३॥ कृपा करिसी तरि थोडें तुज काम । माझा तरि श्रम बहु हरे ॥४॥ तुका म्हणे मज दाखवीं श्रीमुख । हरेल या भूक डोळियाची ॥५॥

६८९. सर्वभावें आलों तुजचि शरण । कायावाचामनसहित देवा ॥१॥ आणीक दूसरें नये माझ्या मना । राहिली वासना तुझ्या पायीं ॥२॥ माझिये जीवींचे कांहीं जडभारी । तुजविण वारी कोण दुजें ॥३॥ तुझे आम्ही दास आमुचा तूं ऋणी । चालत दूरुनी आलें मागें ॥४॥ तुका म्हणे आतां घेतलें धरणें । हिशोबाकारणें भेट देईं ॥५॥

६९०. कईं मात माझे ऐकती कान । बोलतां वचन संतां मुखीं ॥१॥ केला पांडुरंगें तुझा अंगीकार । मग होईल धीर माझ्या जीवा ॥२॥ म्हणउनि मुख अवलोकितों पाय । हेचि मज आहे थोरी आशा ॥३॥ माझिया मनाचा हाचि पैं विश्वास । न करीं सायास साधनांचें ॥४॥ तुका म्हणे मज होईल भरंवसा । तरलों मी ऐसा साच भावें ॥५॥

६९१. दोन्ही हात ठेवुनि कटीं । उभा भीवरेच्या तटीं । कष्टलासी साठीं । भक्तिकाजें विठ्ठला ॥१॥ भागलासी मायबापा । बहु श्रम केल्या खेपा । आम्हालागीं सोपा । दैत्या काळ कृतांत ॥२॥ होतासी क्षीरसागरीं । मही दाटली असुरीं । म्हणोनियां घरीं । गौळियाचे अवतार ॥३॥ केला पुंडलिकें गोवा । तुज पंढरीसि देवा । तुका म्हणे भावा- । साठीं हातीं सांपडसी ॥४॥

६९२. गोड झालें पोट धालें । अवचिता वाचे आलें । म्हणतां पाप गेलें । विठ्ठलसें वाचेसी ॥१॥ सत्य माना रे सकळ । उद्धरिला अजामेळ । महापातकी चांडाळ । नामासाठीं आपुलिया ॥२॥ चित्त पावलें आनंदा । सुखसमाधीतें सदा । म्हणतां गोविंदा । वेळोवेळां वाचेसी ॥३॥ हें जाणती अनुभवी । जया चाड तो चोजवी । तुका म्हणे दावी । रूप तेंचि अरूप ॥४॥

६९३. रवि दीप हिरा दाविती देखणें । अदृश्य दर्शनें संतांचिया ॥१॥ त्यांचा महिमा काय वर्णूं मी पामर । न कळे तो साचार ब्रह्मादिकां २॥ तापली चंदन निववितो कुडी । त्रिगुण तो काढी संतसंग ॥३॥ मायबापें पिंड पाळियेला माया । जन्ममरण जाया संतसंग ॥४॥ संतांच्या वचनें वारी जन्मदुःख । मिष्टान्न तें भूकनिवारण ॥५॥ तुका म्हणे जवळी न पाचारितां जावें । संतचरणीं भावें रिघावया ॥६॥

६९४. हरि हरि तुम्हीं म्हणारे सकळ । तेणें मायाजाळ तुटईल ॥१॥ आणिक नका कांहीं गाबाळाचे भरी । पडों येते थोरी नागवण ॥२॥ भावें तुळसीदळ पाणी जोडा हात । म्हणावें पतित वेळोवेळां ॥३॥ तुका म्हणे हा तंव कृपेचा सागर । नामासाठीं पार पावतील ॥४॥

६९५. गांठोळीस धन भाकावी करुणा । दावूनि सज्जना कींव पीडी ॥१॥ नाठेळाची भक्ति

कुचराचें बळ । कोरडें वोंगळ मार खाय ॥२॥ सांडोव्यासी घाली देवाची करंडी । विल्हाळ त्या धोंडी पूजा दावी ॥३॥ तुका म्हणे ऐसे माकडाचे छंद । अवघे धिंदधिंद सिंदळीचे ॥४॥

६९६. ऐसे कुळीं पुत्र होती । बुडविती पूर्वजां ॥१॥ चाहाडी चोरी भांडवला । वांटा आला भागासी ॥२॥ त्याचियानें दुःखी मही । भार तेही न साहे ॥३॥ तुका म्हणे ग्रामपशु । केला नाशु आयुष्या ॥४॥

६९७. आतां जागा रे भाई जागा रे । चोर निजल्या नाडूनि भाग रे ॥१॥ कैसें असोनि ठाउकें नेणां । दुःख पावाल पुढिले पेणा ॥२॥ आतां नका रे भाई नका रे । आहे गांठीं तें लुटवूं लोकां रे ॥३॥ तुका म्हणे एकाच्या घायें । कां रे जाणोनि न धरा भय ॥४॥

६९८. मुद्दल जतन जालें । मग लाभाचें काय आलें ॥१॥ घरीं देउनि अंतर गांठी । राखा पारख्यां न सुटे मिठी ॥२॥ घाला पडे थोडेंच वाटे । काम मैंदाचे चपेटे ॥३॥ तुका म्हणे वरदळ खोटें । फांसे अंतरिंच्या कपटें ॥४॥

६९९. मज अंगाच्या अनुभवें । कांहीं वाईट बरें ठावें ॥१॥ जालों देहींचा देखणा । नये मागें पुढेंही मना ॥२॥ वोस वसती ठावी । परि हे चाली दुःख पावी ॥३॥ तुका म्हणे घेऊं देवा । सवें करूनि बोळावा ॥४॥

७००. पाववावें ठाया । असे सवें बोलों तया ॥१॥ भावा ऐसी क्रिया राखे । खोट्या खोटेपणें वाखे ॥२॥ न ठेवूं अंतर । कांहीं भेदाचा पदर ॥३॥ तुका म्हणे जीवें भावें । सत्या मानविजे देवें ॥४॥

७०१. माझा पहा अनुभव । केला देव आपुला ॥१॥ बोलविलें तेंचि द्यावें । उत्तर व्हावें ते काळीं ॥२॥ सोडिलिया जग निंद । मग गोविंद म्हणियारा ॥३॥ तुका म्हणे धीर केला । तेणें याला गोंविलें ॥४॥

७०२. मोल देऊनियां सांठवावे दोष । नटाचे ते वेष पाहोनियां ॥१॥ हरिदासां मुखें हरिकथाकीर्तन । तेथें पुण्यापुण्य विशेषता ॥२॥ हरितील वस्त्रें गोपिकाच्या वेषें । पाप त्या सरिसें मात्रागमन ॥३॥ तुका म्हणे पाहा ऐसे झाले जन । सेवाभक्तिहीन रसीं गोडी ॥४॥

७०३. विठोबा विसांविया विसांविया । पडों देईं पायां ॥१॥ बहु खेद क्षीण । आलों सोसुनियां वन ॥२॥ बहुतां काकुलती । आलों सोसिली फजिती ॥३॥ केली तुजसाठीं । तुका म्हणे येवढी आटी ॥४॥

७०४. कां गा धर्म केला । असोन सत्तेचा आपुला ॥१॥ उभाउभीं पाय जोडीं । आतां फांको नेदीं घडी ॥२॥ नको सांडूं ठाव । आतां घेऊं नेदीं वाव ॥३॥ तुका म्हणे इच्छा । तैसा करीन सरसा ॥४॥

**७०५. तुमची तों भेटी नव्हे ऐसी झाली । कोरडीच बोली ब्रह्मज्ञान ॥१॥ आतां न बोलावें ऐसें वाटे देवा । संग न करावा कोणासवें ॥२॥ तुम्हां मिमित्यासी सांपडलें अंग । नेदावा हा संग विचारिलें ॥३॥ तुका म्हणे माझी राहिली वासना । आवडी दर्शनाचीच होती ॥४॥**

**७०६. आहे तेंचि आम्ही मागों तुजपाशीं । नव्हों तुज ऐसीं क्रियानष्ट ॥१॥ न बोलावें तेंचि वर्म बरें दिसे । प्रकट ते कैसे गुण करूं ॥२॥ एका ऐसा एका द्यावयाचा मोळा । कां तुम्हा गोपाळा नाहीं ऐसा ॥३॥ तुका म्हणे लोकां नाहीं कळों आलें । करावें आपुलें जतन तों ॥४॥**

**७०७. आम्हीं याची केली सांडी । कोठें तोंडीं लागावें ॥१॥ आहे तैसें असो आतां । चिंतें चिंता वाढते ॥२॥ बोलिल्याचा मानी शीण । भिन्न भिन्न राहावें ॥३॥ तुका म्हणे आम्हापाशीं । धीरा ऐसी जतन ॥४॥**

**७०८. आम्हांपाशीं याचें बळ । कोण काळवरी तों ॥१॥ धरूनि ठेलों जीवेंसाठीं । होय भेटी तोंवरि ॥२॥ लागलों ते न फिरें पाठीं । पडिल्या गांठी वांचूनि ॥३॥ तुका म्हणे अवकाश । तुमच्या ऐसें व्हावया ॥४॥**

**७०९. बोलिलेंचि बोलें पडपडताळूनि । उपजत मनीं नाहीं शंका ॥१॥ बहुताची माय बहुत कृपाळ । साहोनि कोल्हाळ बुझाविसी ॥२॥ बहुताच्या भावें वांटिसी भातुकें । बहु कवतुकें खेळविसी ॥३॥ तुका म्हणे ऐसें जाणतसों वर्म । करणें तों श्रम न वजे वांयां ॥४॥**

**७१०. कोठें भोग उरला आतां । आठवितां तुज मज ॥१॥ आड कांहीं नये दुजें । फळ बीजें आणिलें ॥२॥ उद्वेग तो वांयांविण । कैंचा शीण चिंतनें ॥३॥ तुका म्हणे गेला भ्रम । तुमच्या धर्म पायाचा ॥४॥**

**७११. संसार तो कोण लेखे । आम्हां सखे हरिजन ॥१॥ काळ ब्रह्मानंदें सरे । आवडी उरे संचली ॥२॥ स्वप्नीं तेही नाहीं चिंता । रात्री जातां दिवस ॥३॥ तुका म्हणे ब्रह्मरसें । होय सरिसें भोजन ॥४॥**

**७१२. येईं गा विठ्ठला येईं गा विठ्ठला । प्राण हा फुटला आळविता ॥१॥ पडियेलों वनीं थोर चिंतवनीं । उशीर कां अझूनि लावियेला ॥२॥ काय तुज नाहीं लौकिकाची शंका । आपुल्या बाळका मोकलितां ॥३॥ तुका म्हणे बहु खंती वाटे जीवा । धरियेलें देवा दुरी दिसे ॥४॥**

**७१३. आपुलें गांवींचें न देखेसें झालें । परदेशी एकलें किती कंठूं ॥१॥ म्हणउनि पाहें मूळ येतां वाटे । जीवलग भेटे कोणी तरी ॥२॥ पाहतां अवघ्या दिसतील दिशा । सकळही वोसा दृष्टीपुढें ॥३॥ तुका म्हणे कोणी न सांगे वारता । तुझी वाटे चिंता पांडुरंगा ॥४॥**

**७१४. जन तरी देखें गुंतले प्रपंचें । स्मरण तें त्याचें त्यासी नाहीं ॥१॥ म्हणउनि मागें परतलें मन । घालणीचें रान देखोनियां ॥२॥ इंद्रियांचा गाजे गोंधळ ये ठायीं । फोडीतसे**

डोई अहंकार ॥३॥ तुका म्हणे देवा वासनेच्या आटें । केलीं तळपटें बहुतांचीं ॥४॥

७१५. धांवे त्यासी फावे । दुजे उगवूनि गोवे ॥१॥ घ्यावें भरूनियां घर । मग नाहीं येरझार ॥२॥ धणी उभें केलें । पुंडलिकें या उगलें ॥३॥ तुका म्हणे ठसा । गेला पडोनियां ऐसा ॥४॥

७१६. लहानपण देगा देवा । मुंगी साखरेचा रवा ॥१॥ ऐरावत रत्न थोर । त्यासी अंकुशाचा मार ॥२॥ ज्याचे अंगीं मोठेपण । तया यातना कठिण ॥३॥ तुका म्हणे जाण । व्हावें लहानाहुनि लहान ॥४॥

७१७. नीचपण बरवें देवा । न चले कोणाचाही दावा ॥१॥ महापुरें झाडें जाती । तेथें लव्हाळे राहती ॥२॥ येतां सिंधूच्या लहरी । नम्र होतां जाती वरी ॥३॥ तुका म्हणे कळ । पाय धरिल्या न चले बळ ॥४॥

७१८. उष्ट्या पत्रावळी करूनियां गोळा । दाखविती कळा कवित्वाची ॥१॥ ऐसे जे पातकी ते नरकीं पचती । जोंवरीं भ्रमती चंद्रसूर्य ॥२॥ तुका म्हणे एका नारायणा ध्याईं । वरकडा वाही शोक असे ॥३॥

७१९. आवडीच्या मतें करिती भोजना । भोग नारायणा म्हणती केला ॥१॥ अवघा देव म्हणे वेगळें तें काई । अर्थासाठीं डोई फोडूं पाहे ॥२॥ लाजे कमंडलु धरिता भोपळा । आणीक थीगळा प्रावरणासी ॥३॥ शाला गडवे धातुद्रव्यइच्छा चित्तीं । नैश्चर्य बोलती अवघें मुखें ॥४॥ तुका म्हणे त्यास देवा नाहीं भेटी । ऐसे कल्पकोटी जन्म घेतां ॥५॥

७२०. म्हणवितां हरिदास कां रे नाहीं लाज । दीनासी महाराज म्हणसी हीना ॥१॥ काय ऐसें पोट न भरेसें झालें । हालविसी कुले सभेमाजी ॥२॥ तुका म्हणे पोटें केली विटंबना । दीन झाला जना कींव भाकी ॥३॥

७२१. रिद्धिसिद्धि दासी कामधेनु घरीं । परि नाहीं भाकरी भक्षावया ॥१॥ लोडें बालिस्तें पलंग सुपत्ति । परि नाहीं लंगोटी नेसावया ॥२॥ पुसाल तरि आम्हां वैकुंठींचा वास । परि नाहीं राह्यास ठाव कोठें ॥३॥ तुका म्हणे आम्ही राजे त्रैलोक्याचे । परि नाहीं कोणाचें उणें पुरें ॥४॥

७२२. घरोघरीं अवघें झालें ब्रह्मज्ञान । परि मेळवण बहु माजी ॥१॥ निरें कोणापाशीं होय एक रज । तरि द्या रे मज दुर्बळासी ॥२॥ आशा तृष्णा माया कालवूनि दोन्ही । दंभ तो दुरोनि दिसतसे ॥३॥ काम क्रोध लोभ शिणवी बहुत । मेळवूनि आंत काळकूट ॥४॥ निंदा अहंकार द्वेष बहु फार । माजी वरी धूर सारीयला ॥५॥ तुका म्हणे तेथें कांहीं हातां नये । आयुष्य मोलें जाये वायांविण ॥६॥

७२३. अवघ्या भूतांचें केलें संतर्पण । अवघीच दान दिली भूमि ॥१॥ अवघाचि काळ दिनरात्रशुद्धि । साधियेला विधि पर्वकाळ ॥२॥ अवघींच तीर्थें व्रतें केले याग ।

अवघेंचि सांग झालें कर्म ॥३॥ अवघेंचि फळ आलें आम्हां हातां । अवघेंचि अनंता समर्पिलें ॥४॥ तुका म्हणे आतां बोलों अबोलणें । कायावाचामनें उरलों नाहीं ॥५॥

७२४. महुरा ऐसीं फळें नाहीं । आलीं कांहीं गळती । पक्वदशे येती थोडीं । नास आढी वेचे तों ॥१॥ विरळा पावे विरळा पावें । अवघड गोवे शेवटीचे ॥२॥ उंच नीच परिवार देवी । धन्या ठावी चाकरी । झळके तेथें पावे आणी । ऐसे क्षणी बहु थोडे ॥३॥ पावेल तो पैल थडी । म्हणों गडी आपुला । तुका म्हणे उभाऱ्यानें । खरें कोण मानितसे ॥४॥

७२५. अवघ्या उपचारा । एक मनचि दातारा ॥१॥ घ्यावी घ्यावी माझी सेवा । दीन दुर्बळाची देवा ॥२॥ अवघियाचा ठाव । पायांवरी जीवभाव ॥३॥ चित्ताचें आसन । तुका करितो कीर्तन ॥४॥

७२६. आळी सलगी पायांपाशीं । होईल तैसी करीन ॥१॥ आणीक आम्हीं कोठें जावें । येथें जीवें वेचलों ॥२॥ अवघ्या निरोपणा भाव । हाचि ठाव उरलासे ॥३॥ तुका म्हणे पाळी लळे । कृपाळुवे विठ्ठले ॥४॥

७२७. देह आणि देहसंबंधें निंदावीं । इतरें वंदावीं श्वानशूकरें ॥१॥ येणें नांवें झाला मी माझ्याचा झाडा । मोह नांवे खोडा गर्भवास ॥२॥ गृह आणि वित्त स्वदेहा विटावें । इतरा भेटावें श्वापदाझाडां ॥३॥ तुका म्हणे मी हें माझें न यो वाचे । येणें नांवें साचे साधुजन ॥४॥

७२८. देवाचिये माथां घालुनियां भार । सांडीं कलेवर ओंवाळूनि ॥१॥ नाथिला हा छंद अभिमान अंगीं । निमित्याचे वेगीं सारीं ओझें ॥२॥ करुणावचनीं लाहो एकसरें । नेदावें दुसरें आड येऊं ॥३॥ तुका म्हणे सांडीं लटिक्याचा संग । आनंद तो मग प्रगटेल ॥४॥

७२९. देह नव्हे मी हे सरे । उरला उरे विठ्ठल ॥१॥ म्हणऊनि लाहो करा । काळ सारा चिंतनें ॥२॥ पाळणाचीं नाहीं चिंता । ठाव रिता देवाचा ॥३॥ तुका म्हणे जीवासाटीं । देव पोटीं पडेल ॥४॥

७३०. पृथक मी सांगों किती । धर्म नीती सकळां ॥१॥ अवघियांचा एक ठाव । शुद्ध भाव विठ्ठलीं ॥२॥ क्षराअक्षराचा भाग । करा लाग पंढरीये ॥३॥ तुका म्हणे आगमींचें । मथिलें साचें नवनीत ॥४॥

७३१. पुण्यविकरा तें मातेचें गमन । भाडी ऐसें धन विटाळ तो ॥१॥ आत्महत्यारा हा विषयांचा लोभी । म्हणावें तें नाभी करवी दंड ॥२॥ नागवला अल्प लोभाचिये साठीं । घेऊनि कांचवटि परिस दिला ॥३॥ तुका म्हणे हात झाडिलें परत्रीं । श्रम तोचि श्रोत्रीं ठेवी केली ॥४॥

७३२. अंतरींचे ध्यान । मुख्य या नांवें पूजन ॥१॥ उपाधि तें अवघें पाप । गोड निरसतां संकल्प ॥२॥ आज्ञा पाळावी हा धर्म । जाणते हो जाणा वर्म ॥३॥ तुका म्हणे

वृत्ति । अविट हे सहज स्थिति ॥४॥

७३३. मूळ कारण सत्ता । नाहीं मिळत उचिता ॥१॥ घडे कासयानें सेवा । सांग ब्रह्मांडाच्या जीवा ॥२॥ सागर सागरीं । सामावेसी कैंची थोरी ॥३॥ तुका म्हणे भावें । शरण म्हणवितां बरवें ॥४॥

७३४. बरवी नामावळी । तुझी महादोषा होळी ॥१॥ जालें आम्हांसी जीवन । धणीवरी हें सेवन ॥२॥ सोपें आणि गोड । किती अमृताही वाढ ॥३॥ तुका म्हणे अच्युता । आमुचा कल्पतरु दाता ॥४॥

७३५. तृषाकाळीं उदक भेटी । पडे मिठी आवडीची ॥१॥ ऐसियाचा हो कां संग । जिवलग संतांचा ॥२॥ मिष्टान्नाचा योग भुके । म्हणतां चुके पुरेसें ॥३॥ तुका म्हणे माते बाळा । कळवळा भेटीचा ॥४॥

७३६. कुचराचें श्रवण । गुणदोषावरी मन ॥१॥ असोनियां नसे कथे । मूर्ख अभागी तें तेथें ॥२॥ निरर्थक कारणीं । कान डोळे वेची वाणी ॥३॥ पापाचे सांगाती । तोंडीं ओढाळांचे माती ॥४॥ हिताचिया नांवें । वोस पडिले देहभावें ॥५॥ फजित करूनि सोडी । तुका करी बोडाबोडी ॥६॥

७३७. जग तरि आम्हां देव । परि हे निंदितों स्वभाव ॥१॥ येतो हिताचा कळवळा । पडती हातीं म्हणुनी काळा ॥२॥ नाहीं कोणी सखा। आम्हां निपराध पारिखा ॥३॥ उपक्रमें वदे । तुका वर्मासी तें भेदे ॥४॥

७३८. सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं । टाळ दिंडी हातीं घेउनि नाचा ॥१॥ समाधीचें सुख सांडा ओंवाळूनी । ऐसा या कीर्तनीं ब्रह्मरस ॥२॥ पुढती घडे चढतें सेवन आगळें । भक्तिभाग्य बळें निर्भरता ॥३॥ उपजोंचि नये संदेह चित्तासी । मुक्ति चारी दासी हरिदासांच्या ॥४॥ तुका म्हणे मन पावोनि विश्रांती । त्रिविध नासती ताप क्षणें ॥५॥

७३९. गंगा न देखे विटाळ । तेंचि रांजणी ही जळ ॥१॥ अल्प महदा नव्हे सरी । विटाळ तो भेद धरी ॥२॥ काय खंडिली भूमिका । वर्णा पायरि कां लोकां ॥३॥ तुका म्हणे आगीविण । बीज वेगळें तों भिन्न ॥४॥

७४०. देवा वरिल भार । कादूं नये कांहीं पर ॥१॥ तहान भुके आठवण । घडे तें बरें चिंतन ॥२॥ देखावी निश्चिंती । तोंचि अंतर श्रीपती ॥३॥ वैभव सकळ । तुका मानितो विटाळ ॥४॥

७४१. थुंकोनियां मान । दंभ करितो कीर्तन ॥१॥ जालों उदासीन देहीं । एकाविण चाड नाहीं ॥२॥ अर्थ अनर्थासारिखा । करूनि ठेविला पारिखा ॥३॥ उपाधि वेगळा । तुका राहिला सोंवळा ॥४॥

७४२. काय ह्याचें घ्यावे। नित्य नित्य कोणें गावें॥१॥ केलें हरिकथेनें वांज। अंतरोनि जाते निज॥२॥ काम संसार। अंतरीं हे कर कर॥३॥ तुका म्हणे हेंड। ऐसे मानिती ते लंड॥४॥

७४३. वदे साक्षत्वेंसी वाणी। नारायणीं मिश्रित॥१॥ नलगे कांहीं चाचपावें। जातो भावें पेरीत॥२॥ भांडार त्या दातियाचें। मी कैचें ये ठायीं॥३॥ सादावीत जातो तुका। येथें एकाएकीं तो॥४॥

७४४. ऐसी जिव्हा निकी। विठ्ठल विठ्ठल कां न घोकी॥१॥ जेणें पाविजे उद्धार। तेथें राखावें अंतर॥२॥ गुंफोनि चावटी। तेथे कोण लाभ भेटी॥३॥ तुका म्हणे काळ। देवाविण अमंगळ॥४॥

७४५. साजे अळंकार। तरि भोगितां भ्रतार॥१॥ व्यभिचारीचा टाकमटिका। उपहास होती लोकां॥२॥ शूरत्वाची वाणी। रूप मिरवे मंडणीं॥३॥ तुका म्हणे जिणें। शर्तीविण लाजिरवाणें॥४॥

७४६. मानामान किती। तुझ्या क्षुल्लक संपत्ती॥१॥ जा रे चाळवीं बापुडीं। कोण धरितील ती गोडी॥२॥ रिद्धिसिद्धि देसी। आम्ही चुंभळीं नव्हों तैसीं॥३॥ तुका म्हणे ठका। ऐसें नागविलें लोकां॥४॥

७४७. पाहातोसी काय। आतां पुढें करीं पाय॥१॥ वरि ठेवूं दे मस्तक। ठेलों जोडोनि हस्तक॥२॥ बरवें करीं सम। नको भंगों देऊं प्रेम॥३॥ तुका म्हणे चला। पुढती सामोरे विठ्ठला॥४॥

७४८. भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास। गेलें आशापाश निवारूनि॥१॥ विषय तो त्यांचा झाला नारायण। नावडे जन धन माता पिता॥२॥ निर्वाणीं गोविंद असे मागेंपुढे। कांहींच सांकडें पडों नेदी॥३॥ तुका म्हणे सत्य कर्मा व्हावे साह्य। घातलिया भय नर्का जाणें॥४॥

७४९. तोंचि हीं क्षुल्लकें सखीं सहोदरें। नाहीं विश्वंभरें वोळखी तों॥१॥ नारायण विश्वंभर विश्वपिता। प्रमाण तो होतां सकळ मिथ्या॥२॥ रवि नुगवे तों दीपिकांचें काज। प्रकाशें तें तेज सहज लोपे॥३॥ तुका म्हणे देहसंबंधें संचितें। कारण निरुतें नारायणीं॥४॥

७५०. यज्ञ भूतांच्या पाळणा। भेद कारिय कारणा। पावावया उपासना। ब्रह्मस्थानीं प्रस्थान॥१॥ एक परी पडिलें भागीं। फळ बीजाचिये अंगी। धन्य तोचि जगीं। आदि अंत सांभाळी॥२॥ अवश्यक तो शेवट। येर अवघी खटपट। चालों जाणें वाट। ऐसा विरळा एखादा॥३॥ तुका होवोनि निराळा। क्षरा अक्षरा वेगळा। पाहे निगमकळा। बोले विठ्ठलप्रसादें॥४॥

७५१. वेदपुरुष तरि नेती कां वचन । निवडूनि भिन्न दाखविलें ॥१॥ तुझीं वर्में तूंचि दावूनि अनंता । होतोसी नेणता कोण्या गुणें ॥२॥ यज्ञाचा भोक्ता तरि कां नव्हे सांग । उणें पडतां अंग क्षोभ घडे ॥३॥ वससील तूं या भूतांचे अंतरीं । तरि कां भेद हरी दावियेला ॥४॥ तपतीर्थाटणें तुझी मूर्तिदान । तरि कां अभिमान आड येतो ॥५॥ आतां क्षमा कीजे विनवितो तुका । देऊनियां हाका उभा द्वारीं ॥६॥

७५२. जळे माझी काया लागला वोणवा । धांवरे केशवा मायबापा ॥१॥ पेटली सकळ कांति रोमावळी । नावरे हे होळी दहन जालें ॥२॥ फुटोनियां दोन्ही भाग होऊं पाहे । पाहातोसी काय हृदय माझें ॥३॥ घेउनी जीवन धांवें लवलाहीं । कवणाचें कांहीं न चले येथें ॥४॥ तुका म्हणे माझी तूं होसी जननी । आणीक निर्वाणीं कोण राखे ॥५॥

७५३. नामदेवें केलें स्वप्नामाजी जागें । सवें पांडुरंगें येऊनियां ॥१॥ सांगितलें काम करावे कवित्व । वाउगें निमित्य बोलों नको ॥२॥ माप टाकी सळे धरिली विठ्ठलें । थापटोनी केलें सावधान ॥३॥ प्रमाणाची संख्या सांगे शत कोटी । उरले ते शेवटीं लावी तुका ॥४॥

७५४. द्याल ठाव तरी राहेन संगती । संतांचे पंगती पायांपाशीं ॥१॥ आवडीचा ठाव आलोंसें टाकून । आतां उदासीन न धरावें ॥२॥ शेवटील स्थळ नीच माझी वृत्ति । आधारें विश्रांती पावईन ॥३॥ नामदेवापायीं तुकया स्वप्नीं भेटी । प्रसाद हा पोटीं राहिलासे ॥४॥

७५५. अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड । काय त्यासी रांड प्रसवली ॥१॥ वैष्णव चांभार धन्य त्याची माता । शुद्ध उभयतां कुळ याती ॥२॥ ऐसा हा निवाडा झालासे पुराणीं । नव्हे माझी वाणी पदरींची ॥३॥ तुका म्हणे आगी लागो थोरपणा । दृष्टि त्या दुर्जना न पडो माझी ॥४॥

७५६. त्रिपुटीच्या योगें । कांहीं नव्हे कोणाजोगें । एक जातां लागे । एक पाठी लागतें ॥१॥ मागें पुढें अवघा काळ । पळों नये न चले बळ । करितां कोल्हाळ । कृपें खांदा हरि वाहे ॥२॥ पापपुण्यात्म्याच्या शक्ती । असती योजिल्या श्रीपती । यावें काकुलती । तेथें सत्तानायका ॥३॥ तुका उभा पैल थडी । तरि हे प्रकार निवडी । घातल्या सांगडी । ताफे पेटे हाकारी ॥४॥

७५७. देखण्याच्या तीन जाती । वेठी वार्ता अत्यंती ॥१॥ जैसा भाव तैसें फळ । स्वातीतोय एक जळ ॥२॥ पाहे सांगे आणि जेवी । अंतर महदंतर तेवीं ॥३॥ तुका म्हणे हिरा । पारखियां मूढां गारा ॥४॥

७५८. अनुभवें अनुभव अवघाचि साधिला । तरि स्थिरावला मन ठायीं ॥१॥ पिटूनियां मुसे आला अळंकार । दग्ध तें असार होऊनियां ॥२॥ एकचि उरलें कायावाचामना । आनंद भुवनामाजी त्रयीं ॥३॥ तुका म्हणे आम्हीं जिंकिला संसार । होऊनि किंकर विठोबाचे ॥४॥

७५९. ऐसिया संपत्ती आम्हां संवसारीं । भोगाचिया परि काय सांगों ॥१॥ काम तो

कामना भोगीतसे देवा । आलिंगनें हेवा चरणचुंबीं ॥२॥ शांतीच्या संयोगें निरसला ताप । दुसरें तें पाप भेदबुद्धि ॥३॥ तुका म्हणे पाहें तिकडें सारिखें । आपुलें पारिखें निरसलें ॥४॥

७६०. राम राज्य राम प्रजा लोकपाळ । एकचि सकळ दुजें नाहीं ॥१॥ मंगळावांचूनि उमटेना वाणी । अखंडचि खाणी एकी रासी ॥२॥ मोडलें हें स्वामी ठायाठाव सेवा । वाढवावा हेवा कोणा अंगें ॥३॥ तुका म्हणे अवघें दुमदुमिलें देवें । उरलें तें गावें हेंचि आतां ॥४॥

७६१. निवडोनि बाण काढिले निराळे । प्रमाण डोहळे यावरि ते ॥१॥ जयाचा विभाग तयासीच फळे । देखणें निराळें कौतुकासी ॥२॥ शूर तो ओळखे घायडायहात । येरां होईल मात सांगायाची ॥३॥ तुका म्हणे माझी केवळ ते वाणी । केला निजस्थानीं जानवसा ॥४॥

७६२. याजसाठीं केला होता अट्टाहास । शेवटचा दिस गोड व्हावा ॥१॥ आतां निश्चिंतीनें पावलों विसांवा । खुंटलिया धांवा तृष्णेचिया ॥२॥ कवतुक वाटे जालिया वेंचाचें । नांव मंगळाचें तेणें गुणें ॥३॥ तुका म्हणे मुक्ति परिणिली नोवरी । आतां दिवस चारी खेळीमेळीं ॥४॥

७६३. भक्तिचिया पोटीं रत्नाचिया खाणी । ब्रह्मींची ठेवणी सकळ वस्तु ॥१॥ माउलीचे मागें बाळकांची हारी । एका सूत्रें दोरी ओढतसे ॥२॥ जेथील जें मागें तें रायासमोर । नाहींसें उत्तर येत नाहीं ॥३॥ सेवेचिये सत्ते धनीच सेवक । आपुलें तें एक न वंची कांहीं ॥४॥ आदि अंत ठाव असे मध्यभाग । भोवतें भासे जग उच्चासनीं ॥५॥ भावारूढ तुका झाला एकाएकीं । देवचि लौकिकीं अवघा केला ॥६॥

७६४. सांगतो दुर्लभ ज्ञानाचिया गोष्टी । अनुभव तो पोटीं कैंचा घडे ॥१॥ भजनाचे सोई जगा परिहार । नेणत्या सादर चित्त कथे ॥२॥ नाइकवे कानीं साधन उपाय । ऐके तो गाय हरुषें गीत ॥३॥ नव्हे आराणूक जावयासी वना । वेध कामिमना हरिकथेचा ॥४॥ काळाच्या साधना कोणा अंगीं बळ । चिंतना मंगळ अष्ट प्रहर ॥५॥ तुका म्हणे आम्ही खेळों भातुकलें । विभागासी मुलें भोळीं येथें ॥६॥

७६५. जाणपण बरें देवाचे ते शिरीं । आम्ही ऐसीं बरीं नेणतींच ॥१॥ देखणियापुढें रुचें कवतुक । उभयतां सुख वाढतसे ॥२॥ आशंकेची बाधा नाहीं लडिवाळां । चित्त वरि खेळा समबुद्धि ॥३॥ तुका म्हणे दिशा मोकळ्या सकळां । अवकाशीं खेळा ठाव जाला ॥४॥

७६६. वचनाचे मांडे दावावे प्रकार । काय त्या साचार कौतुकाचे ॥१॥ जातां घरा मागें उरों नेणें खंती । मिळाल्या बहुती फांकलिया ॥२॥ उदयींच अस्त उदये संपादिला । कल्पनेचा केला जागेपणें ॥३॥ जाणवूनि गेला हांडोरि या पोरां । सावध इतरांकरुनि तुका ॥४॥

७६७. याती शूद्र वैश्य केला वेवसाव । आधीं तो हा देव कुळपूज्य ॥१॥ नये बोलों परि पाळिलें वचन । केलियाचा प्रश्न तुम्हीं संतीं ॥२॥ संवसारें जालों अतिदुःखें दुःखी । मायबापें

सेखीं क्रमिलिया ॥३॥ दुष्काळें आटिलें द्रव्य नेला मान । स्त्री एकी अन्न अन्न करितां मेली ॥४॥ लज्जा वाटे जीवा त्रासलो या दुःखें । वेवसाय देखे तुटी येतां ॥५॥ देवाचें देऊळ होतें जें भंगलें । चित्तासी तें आलें करावेंसें ॥६॥ आरंभीं कीर्तन करी एकादशीं । नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं ॥७॥ कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वास आदरें करोनियां ॥८॥ गाती पुढें त्याचें धरावें ध्रुपद । भावें चित्त शुद्ध करोनियां ॥९॥ संताचें सेविलें तीर्थ पायवणी । लाज नाहीं मनीं येऊं दिली ॥१०॥ ठाकला तो कांहीं केला परउपकार । केलें हे शरीर कष्टवूनी ॥११॥ वचनें मानिलीं नाहीं सुहृदांचीं । समूळ प्रपंचीं वीट आला ॥१२॥ सत्यअसत्यासी मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहुमतां ॥१३॥ मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश । धरिला विश्वास दृढ नामीं ॥१४॥ यावरी या जाली कवित्वाची स्फूर्ति । पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥१५॥ निषेधाचा कांहीं पडिला आघात । तेणें मध्यें चित्त दुखविलें ॥१६॥ बुडविल्या वह्या बैसलों धरणें । केलें नारायणें समाधान ॥१७॥ विस्तारी सांगतां बहुत प्रकार । होईल उशीर आतां पुरे ॥१८॥ आतां आहे तैसा दिसतो विचार । पुढील प्रकार देव जाणे ॥१९॥ भक्तां नारायण नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसा कळों आलें ॥२०॥ तुका म्हणे माझें सर्व भांडवल । बोलविले बोल पांडुरंगें ॥२१॥

७६८. ऐका वचन हें संत । मी तों आगळा पतित । काय काजें प्रीत । करितसां आदरें ॥१॥ माझें चित्त मज ग्वाही । सत्य तरलों मी नाहीं । एकाचिये वाहीं । एक देखीं मानिती ॥२॥ बहु पीडिलों संसारें । मोडीं पिसें पिटीं ढोरें । न पडतां पुरें । या विचारें राहिलों ॥३॥ सहज सरलें होतें कांहीं । द्रव्य थोडे बहु तेंही । त्याग केला नाहीं । दिलें द्विजां याचकां ॥४॥ प्रियापुत्रबंधु । यांचा तोडिला संबंधु । सहज जालों मंदु । भाग्यहीन करंटा ॥५॥ तोंड न दाखवावें जना । शिरें सांदी भरें राना । एकांत तो जाणा । तयासाठीं लागला ॥६॥ पोटें पिडिलें काहारें । दया नाहीं या विचारें । बोलावितां बरें । सहज म्हणें यासाठीं ॥७॥ सहज वडिलां होती सेवा । म्हणोनि पूजितों या देवा । तुका म्हणे भावा- । साठीं झणी घ्या कोणी ॥८॥

७६९. बरें झालें देवा निघालें दिवाळें । बरी या दुष्काळें पीडा केली ॥१॥ अनुतापें तुझें राहिलें चिंतन । झाला हा वमन संवसार ॥२॥ बरें जालें देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनामध्यें ॥३॥ बरें जालें जगीं पावलों अपमान । बरें गेलें धन ढोरें गुरें ॥४॥ बरें जालें नाहीं धरिली लोकलाज । बरा आलों तुज शरण देवा ॥५॥ बरें जालें तुझें केलें देवाईल । लेंकरें बाईल उपेक्षिलीं ॥६॥ तुका म्हणे बरें व्रत एकादशी । केलें उपवासीं जागरण ॥७॥

७७०. बोलावा विठ्ठल पहावा विठ्ठल । करावा विठ्ठल जीवभाव ॥१॥ येणें सोसें मन जालें हांवभरी । परती माघारी घेत नाहीं ॥२॥ बंधनापासूनी उकलली गांठी । देता आली मिठी

सावकाश ॥३॥ तुका म्हणे देह भरिला विठ्ठलें । कामक्रोधें केलें घर रितें ॥४॥

७७१. जग अवघें देव । मुख्य उपदेशाची ठेव ॥१॥ आधीं आपणयां नासी । तरि उतरे ये कसीं ॥२॥ ब्रह्मज्ञानाचें कोठार । तें या निश्चयें उत्तर ॥३॥ तुका म्हणे ते उन्मनी । नाश कारया कारणीं ॥४॥

७७२. मीचि मज व्यालों । पोटा आपुलिया आलों ॥१॥ आतां पुरले नवस । निरसोनी गेली आस ॥२॥ जालों बरा बळी । गेलों मरोनी ते काळीं ॥३॥ दोहींकडे पाहे । तुका आहे तैसा आहे ॥४॥

७७३. साधनाच्या कळा आकार आकृति । कारण नवनीतीं मथनाचें ॥१॥ पक्षियासी नाहीं मारगीं आडताळा । अंतरिक्षीं फळासीचि पावे ॥२॥ भक्तीची जोडी ते उखत्याचि साठीं । उणें पुरें तुटी तेथें नाहीं ॥३॥ तुका म्हणे आलें सांचत सांचणी । आजी जाली धणी एकसरें ॥४॥

७७४. नाहीं येथें वाणी । सकळा वर्णी घ्यावी धणी ॥१॥ जालें दर्पणाचें अंग । ज्याचा त्यासी दावी रंग ॥२॥ एका भावाचा एकांत । पीक पिकला अनंत ॥३॥ तुका खळे दाणीं । करी बैसोनि वांटणी ॥४॥

७७५. ठेविलें जतन । करूनियां निज धन ॥१॥ जयापासाव उत्पत्ति । तें हें बीज धरिलें हातीं ॥२॥ निवडिलें वरळा भूस । सार आइन जिन्नस ॥३॥ तुका म्हणे नारायण । भाग संचिताचा गुण ॥४॥

७७६. भ्रमणा पाउले वेचिताती वाव । प्रवेशाचा ठाव एका द्वारें ॥१॥ सार तीं पाउलें विठोबाचीं जीवीं । कोणीं न विसंबावीं क्षणभरी ॥२॥ सुलभ हें केलें सकळां जीवन । फुंकावेचि कान न लगे कांहीं ॥३॥ तुका म्हणे येथें सकळही कोड । पुरे मूळ खोड विस्ताराचें ॥४॥

७७७. कांही जाणों नये पांडुरंगाविण । पाविजेल शीण संदेहानें ॥१॥ भलतिया नांवें आळविला पिता । तरी तो जाणता कळवळा ॥२॥ अहंकार जातो गौरवितां वाणी । सर्व गात्रां धणी हरिकथा ॥३॥ तुका म्हणे उपजे विल्हाळ आवडी । करावा तो घडीघडी लाहो ॥४॥

७७८. बींजापोटीं पाहे फळ । विध न करिता सकळ ॥१॥ तया मूर्ख म्हणावें वेडे । कैसें तुटेल सांकडें ॥२॥ दाविितिया वाट । वेठी धरूं पाहे चाट ॥३॥ पुढिल्या उपाया । तुका म्हणे राखे काया ॥४॥

७७९. मातेचीं जो थानें फाडी । तया जोडी कोण ते ॥१॥ वेदां निंदी तो चांडाळ । भ्रष्ट सुतकीया खळ ॥२॥ आगी लावी घरा । मग वसती कोठें थारा ॥३॥ तुका म्हणे वर्म । येरा नाचवितो भ्रम ॥४॥

७८०. वेश वंदाया पुरते । कोण ब्राह्मण निरुते ॥१॥ ऐसें सांगा मजपाशीं । संतां

निरवितों येविशीं ॥२॥ असां जी प्रवीण । ग्रंथीं कळे शुद्ध हीण ॥३॥ तुका म्हणे लोपें । सत्याचिया घडती पापें ॥४॥

७८१. ज्या ज्या आम्हापाशीं होतील ज्या शक्ति । तेणें हा श्रीपती अळंकारूं ॥१॥ अवघा पायांपाशीं दिला जीवभाव । जन्ममरणा ठाव पुसियेला ॥२॥ ज्याचें देणें त्यासी घातला संकल्प । बंधनाचें पाप चुकविलें ॥३॥ तुका म्हणे येथें उरला विठ्ठल । खाय बोले बोल गाये नाचे ॥४॥

७८२. आम्हीं आळीकरें । प्रेमसुखाचीं लेंकरें ॥१॥ पायीं गोविली वासना । तुच्छ केलें ब्रह्मज्ञाना ॥२॥ येतां पाहें मुळा । वास पंढरीच्या डोळां ॥३॥ तुका म्हणे स्थळ । मग मी पाहेन सकळ ॥४॥

७८३. आइत्याची राशी । आली पाकसिद्धीपाशीं ॥१॥ आतां सोडोनि भोजन । भिके जावें वेडेपण ॥२॥ उसंतिली वाट । मागें परतावें फुकट ॥३॥ तुका म्हणे वाणी । वेचों बैसोन ठाकणीं ॥४॥

७८४. धन्य शुद्ध जाती । धरीं लौकरी परती ॥१॥ ऐकिलें तेंचि कानीं । होय परिपाक मनीं ॥२॥ कळवळा पोटीं । सावधान हितासाठीं ॥३॥ तुका म्हणे भाव । ज्याचा तोचि जाणा देव ॥४॥

७८५. जीवित्व तें किती । हेंचि धरितां बरें चित्तीं ॥१॥ संत सुमनें उत्तरें । मृदु रसाळ मधुरें ॥२॥ विसांवतां कानीं । परिपाक घडे मनीं ॥३॥ तुका म्हणे जोडी । होय जतन रोकडी ॥४॥

७८६. अभिमानाची स्वामिनी शांति । महत्व येती सकळ ॥१॥ कळोनिही न कळे वर्म । तरि श्रम पावती ॥२॥ सर्व सत्ता धरितां धीर । वीर्यां वीर आगळा ॥३॥ तुका म्हणे तिखट तिखें । मृद सखे आवडी ॥४॥

७८७. भोजन पा शांतीचें । उंच नीच उसाळी ॥१॥ जैशी कारंज्याची कळा । तो जिव्हाळा स्वहिताचा ॥२॥ कल्पना ते देवाविण । न करी भिन्न इतरीं ॥३॥ तुका म्हणे पावे भूतीं । ते निश्चिती आपली ॥४॥

७८८. दास जालों हरिदासाचा । बुद्धिकायामनें वाचा ॥१॥ तेथें प्रेमाचा सुकाळ । टाळमृदंगकल्लोळ । नासे दुष्टबुद्धि सकळ । समाधि हरिकीर्तनीं ॥२॥ ऐकता हरिकथा । भक्ति लागे त्या अभक्तां ॥३॥ देखोनि कीर्तनाचा रंग । कैसा उभा पांडुरंग ॥४॥ हें सुख ब्रह्मादिकां । नाहीं नाहीं म्हणे तुका ॥५॥

७८९. गति अधोगति मनाची हे युक्ति । मन लावा एकांतीं साधु संगें ॥१॥ जतन करा जतन करा । धांवतें सैरा ओढाळ तें ॥२॥ मान अपमान मनाचें लक्षण । लाविलिया ध्यान तेंचि करी ॥३॥ तुका म्हणे मन उतरी भवसिंधु । मन करी बंधु चौऱ्यांशीचा ॥४॥

७९०. पंढरीस दु:ख न मिळे ओखदा । प्रेमसुख सदा सर्वकाळ ॥१॥ पुंडलिकें हाट भरियेली पेंठ । अवघें वैकुंठ आणियेलें ॥२॥ उदिमासी तुटि नाहीं कोणा हाणी । घेऊनियां धणी लाभ घेती ॥३॥ पुरलें देशासी भरलें शीगेसी । अवघी पंचक्रोशी दुमदुमीत ॥४॥ तुका म्हणे संतां लागलीसे धणी । बैसले राहोनि पंढरीस ॥५॥

७९१. द्वारकेचें केणें आलें याचि ठाया । पुढें भक्तराया चोजवीत ॥१॥ गोविलें विसारें माप केलें खरें । न पाहे माघारें अद्यापवरी ॥२॥ वैष्णव मापारी नाहीं जाली सळें । पुढेंही न कळे पार त्याचा ॥३॥ लाभ जाला त्यांनीं धरिला तो विचार । आहिक्य परत्र सांठविलें ॥४॥ तुका म्हणे मज मिळाली मजुरी । विश्वास या घरीं संतांचिया ॥५॥

७९२. सुरवर येती तीर्थें नित्यकाळ । पेंठ त्या निर्मळ चंद्रभागा ॥१॥ साक्षभूत नव्हे सांगितली मात । महिमा अत्यद्भुत वर्णवेना ॥२॥ पंचक्रोशीमाजी रीघ नाहीं दोषा । जळती आपैसा अघोर ते ॥३॥ निर्विषय नर चतुर्भुज नारी । अवघा घरोघरीं ब्रह्मानंदु ॥४॥ तुका म्हणे ज्यापें नाहीं पुण्यलेश । जा रे पंढरीस घेई कोटि ॥५॥

७९३. विचार नाहीं नर खर तो तैसा । वाहे ज्ञान पाठी भार लगड जैसा ॥१॥ वादावाद करणें त्यासी तोंचि वरी । गुखाडीची चाड सरे तोंच बाहेरी ॥२॥ सौभाग्यसंपन्न हो कां वृद्ध प्रतिष्ठा । चिकरूनि सांडी पायां लागली ते विष्ठा ॥३॥ नाहीं याति कुळ फांसे ओढी तयासी । तुका म्हणे काय मुद्रासोंग जाळिसी ॥४॥

७९४. देव होसी जरी आणिकांतें करिसी । संदेह येविशीं करणें न लगे ॥१॥ दुष्ट होसी तरी आणिकांतें करिसी । संदेह येविशीं करणें न लगे ॥२॥ तुका म्हणे जें दर्पणीं बिंबलें । तें तया बाणलें निश्चयेसीं ॥३॥

७९५. कलिधर्म मागें सांगितलें संतीं । आचार सांडिती द्विजलोक ॥१॥ तेंचि कळों आतां येतसे प्रचिती । अधर्मा टेंकती धर्म नव्हे ॥२॥ तप व्रत करितां लागती सायास । पाळितां पिंडास गोड वाटे ॥३॥ देव म्हणऊनी न येती देऊळा । संसार वेगळा तरी कां नव्हे ॥४॥ तुका म्हणे मज धरितां गुमान । ऐसें कोणी जन नरका जाती ॥५॥

७९६. नमो विश्वरूपा विष्णु मायबापा । अपारा अमुपा पांडुरंगा ॥१॥ विनवितों रंक दास मी सेवक । वचन तें एक आइकावें ॥२॥ तुझी स्तुति वेद करितां भागला । निवांतचि ठेला नेति नेति ॥३॥ ऋषि मुनि बहु सिद्ध कविजन । वर्णितां तुझे गुण न सरती ॥४॥ तुका म्हणे तेथें काय माझी वाणी । जे तुझी वाखाणी कीर्ति देवा ॥५॥

७९७. अंतरींचा भाव जाणोनियां गुज । तैसें केलें काज पांडुरंगा ॥१॥ घातलें वचन न पडेचि खालीं । तूं आम्हां माउली अनाथांची ॥२॥ मज याचकाची पुरविली आशा ।

पंढरीनिवासा मायबापा ॥३॥ नाशिली आशंका माझिया जीवाची । उरली भेदाची होती कांहीं ॥४॥ तुका म्हणे आतां केलों मी निर्भर । गाईन अपार गुण तुझे ॥५॥

७९८. उदार कृपाळ अनाथांचा नाथ । ऐकसी मात शरणागतां ॥१॥ सर्व भार माथां चालविसी त्याचा । अनुसरले वाचा काया मनें ॥२॥ पाचारितां उभा राहासी जवळी । पाहिजे ते काळीं पुरवावें ॥३॥ चालतांही पंथ सांभाळीसी वाटे । वारिसील कांटे खडे हातें ॥४॥ तुका म्हणे चिंता नाहीं तुझ्या दासां । तूं त्यांचा कोंवसा सर्वभावें ॥५॥

७९९. काय कीर्ति करूं लोक दंभ मान । दाखवीं चरण तुझे मज ॥१॥ मज आतां ऐसें नको करूं देवा । तुझा दास जावा वांयांविण ॥२॥ होइल थोरपणें जाणीवेचा भार । दुरावेन दूर तुझ्या पायीं ॥३॥ अंतरींचा भाव काय कळे लोकां । एक मानी एका देखोवेखीं ॥४॥ तुका म्हणे तुझे पाय आतुडती । त्या मज विपत्ति गोड देवा ॥५॥

८००. मानावया जग व्हावी द्रव्यमाया । नाहीं हे माझिया जीवा चाड ॥१॥ तुझ्या पायांसाठीं केली आराणूक । आतां कांहीं एक नको दुजें ॥२॥ करूनियां कृपा करीं अंगीकार । न लावीं उशीर आतां देवा ॥३॥ नव्हे साच कांहीं कळों आलें मना । म्हणोनि वासना आवरिली ॥४॥ तुका म्हणे आतां मनोरथ सिद्धी । माझे कृपानिधी पाववावे ॥५॥

८०१. आतां माझा सर्वभावें हा निर्धार । न करीं विचार आणिकांसी ॥१॥ सर्वभावें नाम गाईन आवडी । सर्व माझी जोडी पाय तुझे ॥२॥ लोटांगण तुझ्या घालीन अंगणीं । पाहेन भरोनि डोळे मुख ॥३॥ निर्लज्ज होऊनि नाचेन रंगणीं । येऊं नेदीं मनीं शंका कांहीं ॥४॥ अंकित अंकिला दास तुझा देवा । संकल्प हा जीवा तुका म्हणे ॥५॥

८०२. जनीं जनार्दन ऐकतों हे मात । कैसा तो वृत्तांत न कळे आम्हां ॥१॥ जन्म जरा मरण कवण भोगी भोग । व्याधि नाना रोग सुखदुःखें ॥२॥ पापपुण्यें शुद्धाशुद्ध आचरणें । हीं कोणाकारणें कवणें केलीं ॥३॥ आम्हां मरण नाश तूं तव अविनाश । कैसा हा विश्वास साच मानूं ॥४॥ तुका म्हणे तूंचि निवडीं हें गुढार । दाखवीं साचार तेंचि मज ॥५॥

८०३. यथार्थ वाद सांडूनि उपचार । बोलती ते अघोर भोगितील ॥१॥ चोरा धरितां सांगे कुठोऱ्याचें नांव । दोघांचेही पाव हात जाती ॥२॥ तुका म्हणे असे पुराणीं निवाड । माझी हे बडबड नव्हे कांहीं ॥३॥

८०४. धीर तो कारण । साह्य होतो नारायण । नेदी होऊं सीण । वाहूं चिंता दासांसी ॥१॥ सुखें करावें कीर्तन । हर्षें गावे हरिचे गुण । वारी सुदर्शन । आपणचि कळिकाळा ॥२॥ जीव वेची माता । बाळा जडभारी होतां । तो तों नव्हे दाता । प्राकृतां यांसारिखा ॥३॥ हें तों माझ्या अनुभवें। अनुभवा आलें जीवें । तुका म्हणे सत्य व्हावें । आहाच नये कारणा ॥४॥

८०५. पुढें आतां कैचा जन्म । ऐसा श्रम वारेसा ॥१॥ सर्वथाही फिरों नये । ऐसी सोय लागलिया ॥२॥ पांडुरंगा ऐसी नाव । तारूं भाव असतां ॥३॥ तुका म्हणे चुकती बापा । पुन्हां खेपा सकळा ॥४॥

८०६. दूध दहीं ताक पशूचें पाळण । त्यामध्यें कारण घृतसार ॥१॥ हेंचि वर्म आम्हां भाविकांचे हातीं । म्हणऊनि चित्तीं धरिला राम ॥२॥ लोह कफ गारा अग्नीचिया काजे । येऱ्हवीं तें ओझें कोण वाहे ॥३॥ तुका म्हणे खोरीं पाहारा जतन । जोंवरि हें धन हातीं लागे ॥४॥

८०७. वीर विठ्ठलाचे गाढे । कळिकाळ पायां पडे ॥१॥ करिती घोष जयजयकार । जळती दोषांचे डोंगर ॥२॥ क्षमा दया शांति । बाण अभंग हे हातीं ॥३॥ तुका म्हणे बळी । तेंचि एक भूमंडळीं ॥४॥

८०८. ऐक रे जना तुझ्या स्वहिताच्या खुणा । पंढरीचा राणा मनामाजी स्मरावा ॥१॥ मग कैचें रे बंधन वाचे गातां नारायण । भवसिंधु तो जाण येचि तीरीं सरेल ॥२॥ दास्य करील कळिकाळ बंध तुटेल मायाजाळ । होतील सकळ रिद्धिसिद्धी म्हणियाऱ्या ॥३॥ सकळशास्त्रांचें सार हें वेदांचें गव्हर । पाहातां विचार हाचि करिती पुराणें ॥४॥ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र चांडाळाही अधिकार । बाळें नारीनर अदिकरोनि वेश्याही ॥५॥ तुका म्हणे अनुभवें आम्हीं पाडियलें ठावें । आणीकही दैवें सुख घेती भाविकें ॥६॥

८०९. न करीं तळमळ राहें रे निश्चळ । आहे हा कृपाळ स्वामी माझा ॥१॥ अविनाश सुख देईल निर्वाणी । चुकतील खाणी चौऱ्यांशीच्या ॥२॥ आणिकिया जीवा होईल उद्धार । तेही उपकार घडती कोटि ॥३॥ आहिक्य परत्रीं होसील सरता । वाचे उच्चारितां रामनाम ॥४॥ तुका म्हणे सांडीं संसाराचा छंद । मग परमानंद पावसील ॥५॥

८१०. कां रे दास होसी संसाराचा खर । दुःखाचे डोंगर भोगावया ॥१॥ मिष्टान्नाची गोडी जिव्हेच्या अगरीं । मसक भरल्यावरी स्वाद नेणें ॥२॥ आणीकही भोग आणिका इंद्रियांचे । नाहीं ऐसे साचे जवळी कांहीं ॥३॥ रूप दृष्टि धाय पाहातां पाहातां । न घडे सर्वथा आणि तृष्णा ॥४॥ तुका म्हणे कां रे नाशिवंतासाठीं । देवासवें तुटी करितासी ॥५॥

८११. बैसोनि निश्चळ करीं त्याचें ध्यान । देईल तो अन्नवस्त्रदाता ॥१॥ काय आम्हां करणें अधिक सांचुनि । देव झाला ऋणी पुरविता ॥२॥ दयाळ मायाळ जाणे कळवळा । शरणागतां लळा राखों जाणे ॥३॥ नलगे सांगणें मागणें तयासी । जाणे इच्छा तैसी पुरवी त्याची ॥४॥ तुका म्हणे लेईं अळंकार अंगीं । विठ्ठल हा जगीं तूंचि होसी ॥५॥

८१२. सोनियाचा कळस । माजी भरिला सुरारस ॥१॥ काय करावें प्रमाण । तुम्ही सांगा संतजन ॥२॥ मृत्तिकेचा घट । माजी अमृताचा सांठ ॥३॥ तुका म्हणे हित । तें

मज सांगावें त्वरित ॥४॥

८१३. सेत करा रे फुकाचें । नाम विठोबारायाचें ॥१॥ नाहीं वेठी जेवा सारा । जाहाती नाहीं म्हणियारा । सरिक नाहीं दुसरा । धनी सारा तुझा तूं ॥२॥ जपतप नांगरणी । न लगे आटी दुनवणी ॥३॥ कर्म कुळवणी । न लगे धर्मपाळी दान्ही ॥४॥ ज्ञानपाभारी ती फणी । न लगे करावी पेरणी ॥५॥ बीज न लगे संचिताचें । पीक पिकलें ठायींचें ॥६॥ नाहीं यमाचें चोरटें । विठ्ठल पागोऱ्याच्या नेटें ॥७॥ पीक न वजे हा भरंवसा । करी उद्वेग तो पिसा ॥८॥ सराई सर्व काळ । वांयां न वजे घटिकापळ ॥९॥ प्रेम पिकलें अपार । नाहीं सांठवावया थार ॥१०॥ ऐसिये जोडी जो चुकला । तुका म्हणे धिग त्याला ॥११॥

८१४. वोणव्या सोंकरीं । सेत खादलें पाखरीं ॥१॥ तैसा खाऊं नको दगा । निदसुरा राहूनि जागा ॥२॥ चोरासवें वाट । चालोनि केलें तळपट ॥३॥ डोळे झांकूनी राती । कूपीं पडे दिवसा जोती ॥४॥ पोसी वांझ गाय । तेथें कैंची दूध साय ॥५॥ फुटकी सांगडी । तुका म्हणे न पवे थडी ॥६॥

८१५. सेत आलें सुगी सांभाळावे चारी कोन । पीक आलें परी केलें पाहिजे जतन ॥१॥ सोंकरीं सोंकरीं सोहंकरी । विसावा तोंवरी नको उभें आहे तों ॥२॥ गोफणीसी गुंडा घालीं पागोऱ्याच्या नेटें । पळती आहाकारे अवघी पाखरांचीं थाटें ॥३॥ पेटवूनी आगटी राहें जागा पालटूनी । पडिलिया मानी बळ बुद्धि व्हावी दोनी ॥४॥ खळे दानें विश्वसुखी करीं होतां रासी । सारा सारूनियां ज्याचे भाग देईं त्यासी ॥५॥ तुका म्हणे मग नाहीं आपुलें कारण । निज आलें हातां भूस सांडिलें निकण ॥६॥

८१६. नका घालूं दूध जयामध्यें सार । ताकाचे उपकार तरी करा ॥१॥ नेदा तरी हें हो नका देऊं अन्न । फुकाचें जीवन तरी पाजा ॥२॥ तुका म्हणे मज सगुणाची चाड । पुरवा कोणी कोड दुर्बळाचें ॥३॥

८१७. म्हणसी नाहीं रे संचित । न करीं न करीं ऐसी मात ॥१॥ लाहो घेईं हरिनामाचा । जन्म जाऊं नेदी साचा । गळा पडेल यमफासा । मग कैंचा हरि म्हणसी ॥२॥ पुरलासाठीं देहाडा । ऐसें न म्हणें न म्हणें मूढा ॥३॥ नरदेह दुबळा । ऐसें न म्हणें रे चांडाळा ॥४॥ तुका म्हणे सांगों किती । सेखीं तोंडीं पडेल माती ॥५॥

८१८. संतांचा महिमा तो बहु दुर्गम । शाब्दिकांचें काम नाहीं येथें ॥१॥ बहु दुधड जरी झाली म्हैस गाय । तरी होईल काय कामधेनु ॥२॥ तुका म्हणे अंगें व्हावें तें आपण । तरीच महिमान येईल कळों ॥३॥

८१९. नाहीं संतपण मिळत हें हाटीं । हिंडता कपाटीं रानीं वनीं ॥१॥ नये मोल देतां

धनाचिया राशी । नाहीं तें आकाशीं पाताळीं तें ॥२॥ तुका म्हणे मिळे जिवाचिये साठीं । नाहीं तरी गोष्टी सांगों नये ॥३॥

८२०. नामाची आवडी तोचि जाणा देव । न धरीं संदेह कांहीं देव मनीं ॥१॥ ऐसें मी हें नाहीं बोलत नेणतां । आणोनि संमता संतांचिया ॥२॥ नाम म्हणे तया आणीक साधन । ऐसें हें वचन बोलों नये ॥३॥ तुका म्हणे सुख पावे या वचनीं । ज्याचीं शुद्ध दोन्ही मायबापें ॥४॥

८२१. सुखें होतों कोठें घेतली सुती । बांधविला गळा आपुलें हातीं ॥१॥ काय करूं बहू गुंतलों आतां । नयेचि सरतां मागें पुढें ॥२॥ होतें गांठीं तें सरलें आतां । आणीक माथां ऋण जालें ॥३॥ सोंकरिलियाविण गमाविलीं पिकें । रांडापोरें भिके लावियेलीं ॥४॥ बहुतांची बहु घेतलीं घरें । न पडे पुरे कांहीं केल्या ॥५॥ तुका म्हणे कांही न धरावी आस । जावें हें सर्वस्व टाकोनियां ॥६॥

८२२. न मनावें तैसें गुरूचें वचन । जेणें नारायण अंतरें तें । आड आला म्हणुनि फोडियेला डोळा । बळिनें आंधळा शुक्र केला ॥१॥ करी देव तरी काय नव्हे एक । कां तुम्ही पृथक सिणा वांयां ॥२॥ उल्लंघुनीयां भ्रताराची आज्ञा । अन्न ऋषिपत्न्या घेउनि गेल्या । अवघेंचि त्यांचें देवें केलें काज । धर्म आणि लाज राखियेली ॥३॥ पितयासी पुत्रें केला वैराकार । प्रल्हादें असुर मारवीला । बहुत विघ्नें केली तया आड । परि नाहीं कैवाड सांडियेला ॥४॥ गौळणी करिती देवाशीं व्यभिचार । सांडुनी आचार भ्रष्ट होती । तयां दिलें तें कवणासी नाहीं । अवघा अंतर्बाही तोचि जाला ॥५॥ देव जोडे तरी करावें अधर्म । अंतरें तें कर्म नाचरावें । तुका म्हणे हा तो जाणतो कळवळा । म्हणोनी अजामेळा उद्धरिलें ॥६॥

८२३. अरे गिळिलें हो संसारें । कांहीं तरि राखा खरें । दिला करुणाकरें । मनुष्यदेह सत्संग ॥१॥ येथें न घलीं न घलीं आड । संचितसा शब्द नाड । उठाउठीं गोड । बीजें बीज वाढवी ॥२॥ केलें तें क्रियमाण । झालें ते संचित म्हण । प्रारब्ध जाण । उर उरित उरलें तें ॥३॥ चित्त खोटें चालीवरि । रोग भोगाचे अंतरीं । रसना अनावरी । तुका म्हणे ढुंग वाहे ॥४॥

८२४. अग्नि तापलिया कायाचि होमे । तापत्रयें संतप्त होती । संचित क्रियमाण प्रारब्ध तेथें । न चुके संसार स्थिति । राहाट घटिका जैसी फिरतांचि राहिली । भरली जाली होती एके रितीं । साधीं हा प्रपंच पंचाय अग्न । तेणें पावशी निज शांतीरे ॥१॥ नारायण नाम नारायण नाम । नित्य करीं काम जिव्हा मुखें । जन्म जराव्याधि पापपुण्य तेथें । नासती सकळही दुःखें रे ॥२॥ शीत उष्ण वन सेवितां कपाट । आसन समाधी साधी । तप तीर्थ दान व्रत आचरण । यज्ञ नाना मन बुद्धी । भोगाभोग तेथें न चुकती प्रकार । जन्म जरादुःखव्याधी । साहोनि काम क्रोध अहंकार । आश्रमीं अविनाश साधीं रे ॥३॥ घोकितां

अक्षरें अभिमानविधि । निषेध लागला पाठी । वाद करितां निंदा घडती दोष । होय वज्रलेपो भविष्यति । दूषणाचें मूळ भूषण तुका म्हणे । सांडीं मिथ्या खंतीं । रिघोनि संतां शरण सर्वभावें । राहें भलतिया स्थिती रे ॥४॥

८२५. नव्हे गुरुदास्य संसारियां । वैराग्य तरी भेणें कांपे विषयां । तैसें नाम नव्हे पंढरीराया । जया सायास न लगती ॥१॥ म्हणोनि गोड सर्वभावें । आंघोळी न लगे तोंड धुवावें । आर्तचाड जीवें । नलगे भ्यावें संसारा ॥२॥ कर्मा तंव न पुरे संसारिक । धर्म तंव फळदायक । नाम विठ्ठलाचें एक । नाशी दुःख भवाचें ॥३॥ न लगे सांडणें मांडणें । आगमनिगमाचें देखणें । अवघें तुका म्हणे । विठ्ठलनामें आटलें ॥४॥

८२६. नये इच्छूं सेवा स्वइच्छा जगाची । अवज्ञा देवाची घडे तेणें ॥१॥ देहाचा निग्रही त्याचा तो सांभाळी । मग नये कळि अंगावरी ॥२॥ आपलिया इच्छा माता सेवा करी । न बाधी ते थोरी येणें क्षोभें ॥३॥ तुका म्हणे सांडा देखीचा दिमाख । मोडसीचें दुःख गांड फाडी ॥४॥

८२७. सत्य सत्य देतो फळ । नाहीं लागतचि बळ ॥१॥ ध्यावे देवाचे ते पाय । धीर सकळ उपाय ॥२॥ करावीच चिंता । नाहीं लागत तत्वता ॥३॥ तुका म्हणे भावें । होतें सकळ बरवें ॥४॥

८२८. साधक जाले कळी । गुगुडीची लांब नळी ॥१॥ पचीं पडे मद्यपान । भांगभुर्का हें साधन ॥२॥ अभेदाचें पाठांतर । अति विषयीं पडिभर ॥३॥ चेल्यांचा सुकाळ । पिंडदंड भगपाळ ॥४॥ सेवा मानधन। बरे इच्छेनें संपन्न ॥५॥ सोंगाच्या नरकाडी । तुका बोडोनियां सोडी ॥६॥

८२९. मज पाहातां हें लटिकें सकळ । कोठें मायाजाळ दावीं देवा ॥१॥ कोणाचा कोणासीं न धरें संबंध । आहे शुद्धबुद्ध ठायींचे ठायीं ॥२॥ काढा जी आपुलें मोह बुंथी जाळें । नका लावूं बळें वेड आम्हां ॥३॥ जीव शिव कांहीं ठेवियेलीं नांवें । सत्य तुम्हां ठावें असोनियां ॥४॥ सेवेच्या अभिळासें न धराचि विचार । आम्हां दारोदार हिंडविलें ॥५॥ आहे तैसें आतां फळलियावरी । परतें सांडा दुरी दुजेपण ॥६॥ तुका म्हणे काय छायेच्या अभिळासें । हंस पावे नाश तारांगणीं ॥७॥

८३०. पंचभूतांचा गोंधळ । केला एके ठायीं मेळ । लाविला सबळ । अहंकार त्यापाठीं ॥१॥ तेथें काय मी तें माझें । कोण वागवी तें ओझें । देहा केवीं रिझे । हें काळाचें भातुकें ॥२॥ जीव न देखें मरण । धरी नवी सांडी जीर्ण । संचित प्रमाण । भोग शुभा अशुभासी ॥३॥ इच्छा वाढविते वेल । खुंटावा तो खरा बोल । तुका म्हणे मोल । झांकलें तें पावेल ॥४॥

८३१. पुसावेंसें हेंचि वाटे । जें जें भेटे तयासी ॥१॥ देव कृपा करील मज । काय लाज राखील ॥२॥ अवघियांचा विसर जाला । हा राहिला उद्योग ॥३॥ तुका म्हणे चिंता वाटे । कोण भेटे सांगेसा ॥४॥

८३२. जाळा तुम्ही माझें जाणतें मीपण । येणें माझा खून मांडियेला ॥१॥ खादलें तें पचे तरिच तें हित । ओकलिया थीत पिंड पीडी ॥२॥ तरि भलें भोगे जोडिलें तें धन । पडिलिया खाण जीवनासी ॥३॥ तुका म्हणे मज तारीं गा विठ्ठला । नेणताचि भला दास तुझा ॥४॥

८३३. याती मतिहीन रूपें लीन दीन । आणीक अवगुण जाणोनियां ॥१॥ केला त्या विठ्ठलें माझा अंगीकार । ऐसा हा विचार जाणोनियां ॥२॥ जें कांहीं करितों तें माझें स्वहित । आली हे प्रचित कळों चित्ता ॥३॥ जालें सुख जीवा आनंद अपार । परमानंदें भार घेतला माझा ॥४॥ तुका म्हणे यासी नामाचा अभिमान । म्हणोनि शरण तारी बळें ॥५॥

८३४. बहु उतावीळ भक्तीचिया काजा । होसी केशीराजा मायबापा ॥१॥ तुझ्या पायीं मज जालासे विश्वास । म्हणोनियां आस मोकलिली ॥२॥ ऋषी मुनि सिद्ध साधक अपार । कळला विचार त्यांसी तुझा ॥३॥ नाहीं नास तें सुख दिलें तयांस । जाले जे उदास सर्वभावें ॥४॥ तुका म्हणे सुख न माय मानसीं । धरिलें जीवेंसी पाय तुझे ॥५॥

८३५. मायामोहजाळीं होतों सांपडला । परि या विठ्ठला कृपा आली ॥१॥ काढूनि बाहेरि ठेविलों निराळा । कवतुक डोळां दाखविलें ॥२॥ नाचे उडे माया करी कवतुक । नाशवंत सुखें साच केलीं ॥३॥ रडे फुंदे दुःखे कुटितील माथा । एकासी रडतां तेंही मरे ॥४॥ तुका म्हणे मज वाटतें नवल । मी हे माझे बोल ऐकोनियां ॥५॥

८३६. देहभाव आम्ही राहिलों ठेवूनि । निवांत चरणीं विठोबाच्या ॥१॥ आमुच्या हिताचा जाणोनि उपाव । तोचि पुढें देव करीतसे ॥२॥ म्हणउनी नाहीं सुख दुःख मनीं । ऐकलिया कानीं वचनाचें ॥३॥ जालों मी निःसंग निवांत एकला । भार त्या विठ्ठला घालूनियां ॥४॥ तुका म्हणे जालों जयाचे अंकित । तोचि माझें हित सर्व जाणे ॥५॥

८३७. आलें फळ तेव्हां राहिलें पिकोन । जरि तें जतन होय देंठीं ॥१॥ नामेंचि सिद्धि नामेंचि सिद्धि । व्यभिचारबुद्धि न पवतां ॥२॥ चालिला पंथ तो पाववील ठाया । जरि आड तया नये कांहीं ॥३॥ तुका म्हणे मध्यें पडती आघात । तेणें होय घात हानि लाभ ॥४॥

८३८. विरोधाचें मज न साहे वदन । बहु होतें मन कासावीस ॥१॥ म्हणऊनि जीवा न साहे संगति । बैसतां एकांती गोड वाटे ॥२॥ देहाची भावना वासनेचा संग । नावडे उबग आला याचा ॥३॥ तुका म्हणे देव अंतरे यामुळें । आशामोहजाळें दुःख वाढे ॥४॥

८३९. तुजशीं संबंध खोटा । परता परता रे तूं थोटा ॥१॥ देवा तुझें काय घ्यावें । आप आपणां ठकावें ॥२॥ जेथें मुद्दल न ये हातां । व्याजें मरावें लेखितां ॥३॥ तुका म्हणे ऐसा । त्रिभुवनीं तुझा ठसा ॥४॥

८४०. याचि हाका तुझे द्वारीं । सदा देखों ऋणकरी ॥१॥ सदा करिती खंड दंड । देवा

**बहु गा तूं लंड ॥२॥ सुखें गोविसी भोजना । लपवूनियां आपणां ॥३॥ एकें एक बुझाविसी । तुका म्हणे ठक होसी ॥४॥**

**८४१. आम्हीं जाणों तुझा भाव । दृढ धरियेले पाव ॥१॥ फांकूं नेदूं चुकवितां । नेघों थोडे बहू देतां ॥२॥ बहुतां दिसांचे लिगाड । आलें होत होत जड ॥३॥ तुका म्हणे आतां । नेघों सर्वस्वही देतां ॥४॥**

**८४२. ऋण वैर हत्या । हें तो न सुटे नेदितां ॥१॥ हें कां नेणों पांडुरंगा । तुम्ही सांगतसां जगा ॥२॥ माझा संबंध तो किती । चुकवा लोकांची फजिती ॥३॥ तुका म्हणे याचिसाठीं । मज घेतां नये तुटी ॥४॥**

**८४३. नाहीं मागितला । तुम्हां मान म्यां विठ्ठला ॥१॥ जे हे करविली फजिती । माझी एवढी जना हातीं ॥२॥ नाहीं केला पोट । पुढें घालूनि बोभाट ॥३॥ तुका म्हणे धरूनि हात । नाहीं नेलें दिवाणांत ॥४॥**

**८४४. तूं पांढरा स्फटिक मणी । करिसी आणिकां त्यांहुनि ॥१॥ म्हणोनि तुझ्या दारा । न येती ठकती दातारा ॥२॥ तुझे ठाई नांदणूक । अवघा बुडविला लौकिक ॥३॥ तुका म्हणे ज्याचें घेसी । त्यासी हेंचि दाखविसी ॥४॥**

**८४५. बोलतों निकुरें । नव्हतीं सलगीचीं उत्तरें ॥१॥ माझें संतापलें मन । परपीडा ऐकोन ॥२॥ अंगावरि आलें । तोंवरि जाईल सोसिलें ॥३॥ तुज भक्ताची आण देवा । जरि तुका येथें ठेवा ॥४॥**

**८४६. बुद्धीची जनिता लक्ष्मीचा पति । आठवितां चित्तीं काय नव्हे ॥१॥ आणिकां उपाया कोण वांटी मन । सुखाचें निधान पांडुरंग ॥२॥ गीतीं गावों नाचों छंदें वाहों टाळी । वैष्णवांचे मेळीं सुखरूप ॥३॥ अनंत ब्रह्मांडें एके रोमावळी । आम्ही केला भोळीं भावें उभा ॥४॥ लटिका हा केला संसारसिंधु । मोक्ष करा बंधु नाहीं पुढें ॥५॥ तुका म्हणे ज्याच्या नामाचे अंकित । राहिलों निश्चिंत त्याच्या बळ ॥६॥**

**८४७. नलगे मायेसी बाळ निरवावें । आपल्या स्वभावें ओढे त्यासी ॥१॥ मज कां लागला करणें विचार । ज्याचा जार भार त्याचे माथां ॥२॥ गोड धड त्यासी ठेवी न मागतां । समाधान खातां नेदी मना ॥३॥ खेळतां गुंतलें उमगूनी आणी । बैसोनियां स्तनीं लावी बळें ॥४॥ त्याच्या दुःखें पडे आपण खापरीं । लाही तळी वरी होय जैसी ॥५॥ तुका म्हणे देह विसरे आपुला । आघात तो त्याला लागों नेदी ॥६॥**

**८४८. ब्राह्मण तो नव्हे ऐसी ज्याची बुद्धि । पाहा श्रुतीमधीं विचारूनि ॥१॥ जयासी नावडे हरिनाम कीर्तन । आणीक नर्तन वैष्णवांचें ॥२॥ सत्य त्याचे वेळे घडला व्यभिचार । मातेसी**

वेव्हार अंत्यजाचा ॥३॥ तुका म्हणे येथें मानी आनसारिखें । तत्काळ तो मुखें कुष्ठ होय ॥४॥

८४९. ब्राम्हण तो याती अंत्यज असतां । मानावा तत्त्वतां निश्चयेसीं ॥१॥ रामकृष्णनामें उच्चारी सरळें । आठवी सांवळें रूप मनीं ॥२॥ शांति क्षमा दया अळंकार अंगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥३॥ तुका म्हणे गेल्या षडऊर्मी अंग । सांडुनियां मग ब्राह्मण तो ॥४॥

८५०. एक करिती गुरु गुरु । भोंवता भारु शिष्यांचा ॥१॥ पुंस नाहीं पाय चारी । मनुष्य परी कुतरीं तीं ॥२॥ परस्त्री मद्यपान । पेंडखाण माजविलें ॥३॥ तुका म्हणे निर्भर चित्तीं । अधोगती जावया ॥४॥

८५१. एका पुरुषा दोघी नारी । पाप वसे त्याचे घरीं ॥१॥ पाप नलगे धुंडावें । लागेल तेणें तेथें जावें ॥२॥ कांहीं दुसरा विचार । नलगे करावाचि फार ॥३॥ असत्य जे वाणी । तेथें पापाचीच खाणी ॥४॥ सत्य बोलें मुखें । तेथें उचंबळती सुखें ॥५॥ तुका म्हणे दोन्ही । जवळीच लाभहानी ॥६॥

८५२. जळतें संचित । ऐसी आहे धर्मनीत ॥१॥ माझ्या विठोबाचे पाय । वेळोवेळां मनीं ध्याय ॥२॥ नेदी कर्म घडों । कोठें आडरानें पडो ॥३॥ तुका म्हणे मळ । राहो नेदी तापजाळ ॥४॥

८५३. संतांपाशीं बहु असावें मर्यादा । फलकटाचा धंदा उरफोडी ॥१॥ बासर तो भुंके गाढवाचे परी । उडे पाठीवरी यमदंड ॥२॥ समयो नेणें तें वेडें चाहाटळ । अवगुणाचा ओंगळ मान पावे ॥३॥ तुका म्हणे काय वांयां चाळवणी । पिट पिट घाणी हागवणीची ॥४॥

८५४. पोटापुरतें काम । परि अगत्य तो राम ॥१॥ कारण तें हेंचि करीं । चित्तीं पांडुरंग धरीं ॥२॥ प्रारब्धीं हेवा । जोडी देवाची ते सेवा ॥३॥ तुका म्हणे बळ । बुद्धी वेंचूनि सकळ ॥४॥

८५५. घेसी तरी घेईं संतांची हे भेटी । आणीक ते गोष्टी नको मना ॥१॥ सर्वभावें त्याचें देव भांडवल । आणीक ते बोल न बोलती ॥२॥ करिसील तो करी संतांचा सांगात । आणीक ते मात नको मना ॥३॥ बैससील तरी बैस संतांमधीं । आणिक ते बुद्धि नको मना ॥४॥ जासी तरी जाई संतांचिया गांवा । होईल विसावा तेथें मना ॥५॥ तुका म्हणे संत सुखाचे सागर । मना निरंतर धणी घेईं ॥६॥

८५६. संतांचिये गांवीं प्रेमाचा सुकाळ । नाहीं तळमळ दुःख लेश ॥१॥ तेथें मी राहीन होऊनि याचक । घालितील भीक तेचि मज ॥२॥ संतांचिये गांवीं वरो भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥३॥ संतांचें भोजन अमृताचें पान । करिती कीर्तन सर्वकाळ ॥४॥ संतांचा उदीम उपदेशाची पेंठ । प्रेमसुख साठीं घेती देती ॥५॥ तुका म्हणे तेथें आणिक नाहीं परी । म्हणोनि भिकारी झालों त्यांचा ॥६॥

८५७. बहुतां जन्मांअंतीं । जोडी लागली हे हातीं ॥१॥ मनुष्यदेहा ऐसा ठाव । धरीं

पांडुरंगीं भाव ॥२॥ बहु केला फेरा । येथें सांपडला थारा ॥३॥ तुका म्हणे जाणे । ऐसे दुर्लभ ते शाहाणे ॥४॥

८५८. लेंकराची आळी न पुरवी कैसी । काय तयापाशीं उणें जालें ॥१॥ आम्हां लडिवाळां नाहीं तें प्रमाण । कांहीं ब्रह्मज्ञान आत्मस्थिति ॥२॥ वचनाचा घेईन अनुभव पदरीं । जें हें जनाचारीं मिरवलें ॥३॥ तुका म्हणे माझी भोळिवेची आटी । दावीन शेवटी कौतुक हें ॥४॥

८५९. रूप नांव माया बोलावया ठाव । भागा आले भाव तयापरी ॥१॥ सींव वाटे परी न खंडे पृथिवी । शाहाणे ते जीवीं समजती ॥२॥ पोटा आलें तिच्या लोळे मांडीवरी । पारखी न करी खंती चित्तीं ॥३॥ तुका म्हणे भक्तिसाठीं हरिहर । अरूपीचे क्षरविभाग हे ॥४॥

८६०. आर्तभूतांप्रति । उत्तम योजाव्या त्या शक्ति ॥१॥ फळ आणि समाधान । तेथें उत्तम कारण ॥२॥ अल्प तो संतोषी । स्थळीं सांपडे उद्देशीं ॥३॥ सहज संगम । तुका म्हणे तो उत्तम ॥४॥

८६१. मुळाचिया मुळें । दुःखें वाढती सकळें ॥१॥ ऐसा योगियांचा धर्म । नव्हे वाढवावा श्रम ॥२॥ न कळे आवडी । कोण आहे कैसी घडी ॥३॥ तुका म्हणे थीतें । दुःख पाववावें चित्तें ॥४॥

८६२. भाग्यवंतां हेंचि काम । मापी नाम वैखरी ॥१॥ आनंदाची पुष्टि अंगीं । श्रोते संगीं उद्धरती ॥२॥ पिकलें तया खाणें किती । पंगतीस सुकाळ ॥३॥ तुका करी प्रणिपात । दंडवत आचारितां ॥४॥

८६३. लटिकें तें रुचे । साच कोणाही न पचे ॥१॥ ऐसा माजल्याचा गुण । भोगें कळों येइल सीण ॥२॥ वाढवी ममता । नाहीं वरपडला तो दूतां ॥३॥ न मनी माकड । कांहीं उपदेश हेकड ॥४॥

८६४. कौतुकाची सृष्टी । कौतुकेंचि केलें कष्टी ॥१॥ मोडे तरी भले खेळ । फांके फांकिल्या कोल्हाळ ॥२॥ जाणणियासाठीं । भय सामावलें पोटीं ॥३॥ तुका म्हणे चेता । होणें तें तूंच आयता ॥४॥

८६५. भोवंडीसरिसे । अवघें भोंवतचि दिसे ॥१॥ ठायीं राहिल्या निश्चळ । आहे अचळीं अचळ ॥२॥ एके हाकेच्या कपाटीं । तेथें आणीक नाद उठी ॥३॥ अभ्रे धांवे शशी । असे ते तें दुसरें भासी ॥४॥

८६६. नव्हों आम्ही आजिकाळाचीं । कांची कुची चाळवणी ॥१॥ एके ठायीं मूळडाळ । ठावा सकळ आहेसी ॥२॥ तुमचें आमचेंसें कांहीं । भिन्न नाहीं वांटलें ॥३॥ तुका म्हणे जेथें असें । तेथें दिसें तुमचासा ॥४॥

८६७. योग्याची संपदा त्याग आणि शांति । उभयलोकीं कीर्ति सोहळा मान ॥१॥ येरयेरांवरी जायांचें उसणें । भाग्यस्थळीं देणें झाडा वेसीं ॥२॥ केलीया फावला ठायींचा तो लाहो । तृष्णेचा तो काहो काहवितो ॥३॥ तुका म्हणे लाभ अकर्तव्या नांवें । शिवपद जीवें भोगिजेल ॥४॥

८६८. मरणा हातीं सुटली काया । विचारें या निश्चयें ॥१॥ नासोनियां गेली खंती । सहज स्थिति भोगाचे ॥२॥ न देखेंसें झाले श्रम । आलें वर्म हाता हें ॥३॥ तुका म्हणे कैंची कींव । कोठें जीव निराळा ॥४॥

८६९. नव्हे ब्रह्मचर्य बाइलेच्या त्यागें । वैराग्य वाउगें देशत्यागें ॥१॥ काम वाढे भय वासनेच्या द्वारें। सांडावें तें धीरें आचावाचा ॥२॥ कांपवूनि टिरी शूरत्वाची मात। केलें वाताहात उचित काळें ॥३॥ तुका म्हणे करी जिव्हेसी विटाळ। लटिक्याची मूळ स्तुति होतां ॥४॥

८७०. नको सांडूं अन्न नको सेवूं वन। चिंतीं नारायण सर्व भोगीं ॥१॥ मातेचिये खांदीं बाळ नेणे सीण। भावना त्या भिन्न मुंडाविया ॥२॥ नको गुंफों भोगीं नको पडों त्यागीं। लावुनि सरे अंगीं देवाचिया ॥३॥ तुका म्हणे नको पुसों वेळोवेळां। उपदेश वेगळा उरला नाहीं ॥४॥

८७१. अवघी मिथ्या आटी । राम नाहीं जंव कंठीं ॥१॥ सावधान सावधान । उगवीं संकल्पीं हें मन ॥२॥ सांडिलें तें मांडे । आग्रह उरल्या काळ दंडे ॥३॥ तुका म्हणे आलें भागा । देउनि चिंतीं पांडुरंगा ॥४॥

८७२. न सांगावें वर्म । जनीं असों द्यावा भ्रम ॥१॥ उगीच लागतील पाठीं । होतीं रितींच हिंपुटीं ॥२॥ शिकविल्या गोष्टी । शिकोन न धरिती पोटीं ॥३॥ तुका म्हणे सीण । होइल अनुभवाविण ॥४॥

८७३. जातिविजातीची व्हावयासि भेटी। संकल्प तो पोटीं वाहों नये ॥१॥ होणार तें घडो होणाराच्या गुणें। होइल नारायणें निर्मिलें तें ॥२॥ व्याघ्राचिये भुके वधावी ते गाय। याचें नांव काय पुण्य असे ॥३॥ तुका म्हणे न करी विचार पुरता। गरज्याची माता पिता खर ॥४॥

८७४. शाहाणियां पुरे एकचि वचन । विशारती खूण तेचि त्यासी ॥१॥ उपदेश असे बहुतांकारणें। घेतला तो मनें पाहिजे हा ॥२॥ फांसावेना तरि दुःख घेतें वाव। मग होतो जीव कासावीस ॥३॥ तुका म्हणे नको राग धरूं झोंडा। नुघडितां पीडा होइल डोळे ॥४॥

८७५. अभिनव सुख तरि या विचारें । विचारावें बरें संतजनीं ॥१॥ रूपाच्या आठवें दोन्हीही आपण। वियोग तो क्षण होत नाहीं ॥२॥ पूजा तरि चित्तें कल्पावें ब्रह्मांड। अहाच तो खंड एकदेसी ॥३॥ तुका म्हणे माझा अनुभव यापरि। डोई पायांवरि ठेवीतसें ॥४॥

८७६. नटनाट्य तुम्हीं केलें याचसाठीं । कवतुकें दृष्टी निववावी ॥१॥ नाहीं तरि काय

कळलेंचि आहे। वाघ आणि गाय लांकडाची ॥२॥ अभेदचि असे मांडियेलें खेळा। केल्या दीपकळा बहु एकी ॥३॥ तुका म्हणे रूप नाहीं दर्पणांत। संतोषाची मात दुसरें तें ॥४॥

८७७. रवीचा प्रकाश। तोचि निशी घडे नाश। जाल्या बहुवस। तरि त्या काय दीपिका ॥१॥ आतां हाचि वसो जीवीं। माझे अंतरीं गोसावी। होऊं येती ठावीं। काय वर्मै त्याच्यानें ॥२॥ सर्वे असतां धनी। आड येऊं न सके कोणी। नलगे विनवणी। पृथकाची करावी ॥३॥ जन्माचिया गति। येणें अवघ्या खुंटती। कारण ते प्रीती। तुका म्हणे जवळी ॥४॥

८७८. ऐसे सांडुनियां धुरे। केविलवाणी दिसां कां रे। कामें उर भरे। हातीं नुरे मृत्तिका ॥१॥ उदार हा जगदानी। पांडुरंग अभिमानी। तुळसीदळ पानी। चिंतनाचा भुकेला ॥२॥ नलगे पुसावी चाकरी। कोणी वकील ये घरीं। त्याचा तोचि करी। पारपत्य सकळां ॥३॥ नाहीं आडकाठी। तुका म्हणे जातां भेटी। न बोलतां मिठी। उगीच पायीं घालावी ॥४॥

८७९. उपकारी असे आरोनी उरला। आपुलें तयाला पर नाहीं ॥१॥ लाभावरि घ्यावें सांपडलें काम। आपला तो श्रम न विचारी ॥२॥ जीवा ऐसें देखे आणिकां जिवांसी। निखळचि रासि गुणांचीच ॥३॥ तुका म्हणे देव तयाचा पांगिला। न भंगे संचला धीर सदा ॥४॥

८८०. कोण पुण्यें यांचा होईन सेवक। जींहीं द्वंद्वादिक दुराविलें ॥१॥ ऐसीं वर्मै मज दावी नारायणा। अंतरींच्या खुणा प्रकटोनि ॥२॥ बहु अवघड असे संतभेटी। तरि जगजेठी करुणा केली ॥३॥ तुका म्हणे मग नयें वृत्तीवरी। सुखाचे शेजारीं पहुडईन ॥४॥

८८१. क्षणक्षणां सांभाळितों। साक्षी होतों आपुला ॥१॥ न घडवी पायीं तुटी। मनें मिठी घातली ॥२॥ विचार तो वचना आधीं। धरूनि शुद्धी ठेविली ॥३॥ तुका म्हणे मागें भ्यालों। तरी जालों जागृत ॥४॥

८८२. आणोनियां मना। अवघ्या धांडोळिल्या खुणा। देखिला तो राणा। पंढरपूरनिवासी ॥१॥ यासी अनुसरल्या काय। घडे ऐसें वायां जाय। देखिले ते पाय। सम जीवीं राहती ॥२॥ तो देखावा हा विध। चिंतनेंचि कार्य सिद्ध। आणिकां संबंध। नाहीं पर्वकाळासी ॥३॥ तुका म्हणे खळ। होती क्षणेंचि निर्मळ। जाऊनियां मळ। वाळवंटीं नाचती ॥४॥

८८३. धरितां पंढरीची वाट। नाहीं संकट मुक्तीचें ॥१॥ वंदूं येती देव पदें। त्या आनंदें उत्साहें ॥२॥ नृत्यछंदें उडती रज। जे सहज चालतां ॥३॥ तुका म्हणे गरुड टके। वैष्णव निके संभ्रम ॥४॥

८८४. नाम घेतां मन निवे। जिव्हे अमृतचि स्त्रवे। होताती बरवे। ऐसे शकुन लाभाचे ॥१॥ मन रंगलें रंगलें। तुझ्या चरणीं स्थिरावलें। केलिया विठ्ठलें। ऐसी कृपा जाणावी ॥२॥ जालें भोजनसें दिसे। चिरा पडोनि ठेला इच्छे। धालियाच्या ऐसे। अंगा येती उद्गार ॥३॥

सुख भेटों आलें सुखा । निध सांपडला मुखा । तुका म्हणे लेखा । आतां नाहीं आनंदा ॥४॥

८८५. रुची रुची घेऊं गोडी । प्रेमसुख जाली जोडी ॥१॥ काळ जाऊं नेदूं वांयां । चिंतूं विठोबाच्या पायां ॥२॥ करूं भजन भोजन । धणी घेऊं नारायण ॥३॥ तुका म्हणे जीव धाला । होय तुझ्यानें विठ्ठला ॥४॥

८८६. वेळोवेळा हेंचि सांगे । दान मागें जगासी ॥१॥ विठ्ठल हें मंगळ वाणी । घेऊं धणी पंगतीसी ॥२॥ वेचतसे पळें पळ । केलें बळ पाहिजे ॥३॥ तुका म्हणे दुश्चित नका । राहों फुका नाड हा ॥४॥

८८७. आणीक ऐसें कोठें सांगा । पांडुरंगासारिखें ॥१॥ दैवत ये भूमंडळीं । उद्धार कली पावविते ॥२॥ कोठें कांहीं कोठें कांहीं । शोध ठायीं स्थळासी ॥३॥ अन्यत्रींचें तीर्थीं नासे । तीर्थीं वसे वज्रलेप ॥४॥ पांडुरंगींचें पांडुरंगीं । पाप अंगीं राहेना ॥५॥ ऐसें हरें गिरिजेप्रती । गुह्य स्थिती सांगितली ॥६॥ तुका म्हणे तीर्थ क्षेत्र । सर्वत्र हें दैवत ॥७॥

८८८. पुराणींचा इतिहास । गोड रस सेविला ॥१॥ नव्हती हे आहाच बोल । मोकळें फोल कवित्व ॥२॥ भावें घ्या रे भावें घ्या रे । एकदां जा रे पंढरिये ॥३॥ भाग्यें आलेति मनुष्यदेहा । तो हा पाहा विठ्ठल ॥४॥ पापपुण्या करिल झाडा । जाइल पीडा जन्माची ॥५॥ घ्यावी हातीं टाळदिंडी । गावे तोंडीं गुणनाद ॥६॥ तुका म्हणे घटापटा । नलगे वाटा शोधाव्या ॥७॥

८८९. कर्म धर्म नव्हती सांग । उण्या अंगें पतन ॥१॥ भलत्या काळीं नामावळी । सुलभ भोळी भाविका ॥२॥ प्रायश्चित्तें पडती पायां । गाती तयां वैष्णवां ॥३॥ तुका म्हणे नुपजे दोष । करा घोष आनंदें ॥४॥

८९०. पाहा रे हें दैवत कैसें । भक्तिपिसें भाविका ॥१॥ पाचारिल्यासरिसें पावे । ऐसी सवे बराडी ॥२॥ शुष्ककाष्ठीं गुरुगुरी । लाज हरि न धरितां ॥३॥ तुका म्हणे अर्धनारी । ऐसीं धरी रूपडीं हा ॥४॥

८९१. बहुत सोसिले मागें न कळतां । पुढती काय आतां अंध व्हावें ॥१॥ एकाचे अंगीं हें ठेवावें लावून । नये भिन्नाभिन्न चांचपडों ॥२॥ कोण होईल तो ब्रह्मांडचाळक । आपणचि हाक देईल हाके ॥३॥ तुका म्हणे दिलीं चेतवूनि सुनीं । कौतुकावांचूनि नाहीं छळ ॥४॥

८९२. आश्चर्य या वाटे नसत्या छंदाचें । कैचें दिलें साचें करोनियां ॥१॥ दुजियासी तव अकळ हा भाव । करावा तो जीव साक्षी येथे ॥२॥ एकीं अनेकत्व अनेकीं एकत्व । प्रकृतिस्वभावत्व प्रमाणेंचि ॥३॥ तुका म्हणे करूं उगवूं जाणसी । कुशळ येविशीं तुम्ही देवा ॥४॥

८९३. अस्त नाहीं आतां एकचि मोहोरा । पासूनि अंधारा दुरि जालों ॥१॥ साक्षत्वें या जालों

गुणाचा देखणा । करीं नारायणा तरी खरें ॥२॥ आठवू विसरु पडियेला मागें । आलें तेचि भागें यत्न केले ॥३॥ तुका म्हणे माझा विनोद देवासी । आम्ही तुम्हां ऐसीं दोन्ही नव्हों ॥४॥

८९४. क्षर अक्षर हे तुमचे विभाग । कासयानें जग दूरी धरा ॥१॥ तैसें आम्ही नेणों पालटोंच कांही । त्यागिल्याची नाहीं मागें चाड ॥२॥ प्रतिपादिता तूं समविषयाचा । प्रसाद तो याचा पापपुण्य ॥३॥ तुका म्हणे तुम्हां नाना अवगणीं । लागे संपादणी लटिक्याची ॥४॥

८९५. सर्वरसीं मीनलें चित्त । अखंडित आनंदु ॥१॥ गोत पति विश्वंभरा । जाला हरि सोयरा ॥२॥ वोळखी ते एका नांवें । इतर वाव खंडणा ॥३॥ तुका म्हणे नांवें रूपें । दुसरीं पापें हारपलीं ॥४॥

८९६. मी हें ऐसें काय जाती । अवघड किती पाहातां ॥१॥ नाहीं होत उल्लंघन । नसतां भिन्न दुसरें ॥२॥ अंधारानें तेज नेलें । दृष्टीखालें अंतर ॥३॥ तुका म्हणे सवें देव । घेतां ठाव दावील ॥४॥

८९७. कवीश्वरांचा तो आम्हांसी विटाळ । प्रसाद वोंगळ चिवडिती ॥१॥ दंभाची आवडी बहिरट अंधळे । सेवटासि काळें होइल तोंड ॥२॥ सोन्याशेजारी तों लाखेची जतन । सतत ते गुण जैसेतैसे ॥३॥ सेव्यसेवकता न पडतां ठावी । तुका म्हणे गोवी पावती हीं ॥४॥

८९८. वाढलिया मान न मनावी निश्चिंती । भूतांचिये प्रीती भूतपण ॥१॥ म्हणऊनि मना लावावी कांचणी । इंद्रियांचे झणी ओढी भरे ॥२॥ एका एकपणें एकाचिया अंगीं । लागे रंग रंगीं मिळालिया ॥३॥ तुका म्हणे देव निष्काम निराळा । जीवदशे चाळा चळणाचा ॥४॥

८९९. माया साक्षी आम्ही नेणों भीड भार । आप आणि पर नाहीं दोन्ही ॥१॥ सत्याचियेसाठीं अवघाचि भर । नावडे व्यापार तुटीचा तो ॥२॥ पोभाळितां चरे अंतरीचें दु:ख । लासें फांसें मुख उघडावें ॥३॥ तुका म्हणे नव्हे स्फीतीचा हा ठाव । निवाड्यासी देव साक्षी केला ॥४॥

९००. संता आवडे तो काळाचाही काळ । समर्थाचें बाळ जेवीं समर्थ ॥१॥ परि सत्ता तेथें नाहीं एकेविणे । मोहें न पवे सीण ऐसें राखे ॥२॥ केले अन्याय ते सांडवी उपचारें । न देखें दुसरें नाशा मूळ ॥३॥ तुका म्हणे मुख्य कल्पतरुछाया । काय नाहीं दया तये ठायीं ॥४॥

९०१. संतांच्या धिक्कारें अमंगळ जिणें । विश्वशत्रु तेणें सांडी परि ॥१॥ कुळ आणि रूप वांयां संवसार । गेला भरतार मोकलिता ॥२॥ मूळ राखे तया फळा काय उणें । चतुर लक्षणें राखों जाणे ॥३॥ तुका म्हणे सायास तो एके ठायीं । दीप हातीं तईं अवघें बरें ॥४॥

९०२. ओलें मूळ भेदी खडकाचें अंग । अभ्यासासी सांग कार्यसिद्धि ॥१॥ नव्हे ऐसें कांहीं नाहीं अवघड । नाहीं कईवाड तोंच वरि ॥२॥ दोरें चिरा कापे पडिला





कांचणीं । अभ्यासें सेवनीं विष पडे ॥३॥ तुका म्हणे कैंचा बैसण्यासी ठाव । जठरीं बाळा वाव एकाएकीं ॥४॥

९०३. अमर आहां अमर आहां । खरें कीं पहा खोटें हें ॥१॥ न म्हणा देह माझा ऐसा । मग भरंवसा कळेल ॥२॥ कैंचा धाक कैंचा धाक । सकळिक हें आपुलें ॥३॥ देवचि बरे देवचि बरे । तुका म्हणे खरे तुम्ही ॥४॥

९०४. काम नाहीं काम नाहीं । जालों पाहीं रिकामा ॥१॥ फावल्या त्या करूं चेष्टा । निश्चळ द्रष्टा बैसोनि ॥२॥ नसत्या छंदें नसत्या छंदें । जग विनोदें विव्हळतसे ॥३॥ एकाएकीं एकाएकीं । तुका लोकीं निराळा ॥४॥

९०५. हातीं घेऊनियां काठी । तुका लागला कलेवरा पाठी ॥१॥ नेऊनि निजविलें स्मशानीं । माणसें जाळी ते ठीकाणीं ॥२॥ काढिलें तें ओढें । मागील उपचाराचें पुढें ॥३॥ नाहीं वाटों आला भेव । सुख दुःख भोगिता देव ॥४॥ याजसाठीं हें निर्वाण । केलें कसियेलें मन ॥५॥ तुका म्हणे अनुभव बरा । नाहीं तरी हस्तपाय चोरा ॥६॥

९०६. कीर्तन चांग कीर्तन चांग । होय अंग हरिरूप ॥१॥ प्रेमें छंदें नाचे डोले । हारपले देहभाव ॥२॥ एकदेशीं जीवकळा । हा सकळां सोयरा ॥३॥ तुका म्हणे उरला देव । गेला भेव त्या काळें ॥४॥

९०७. न बोलसी करा वाचा । उपाधीचा संबंध ॥१॥ एका तुमच्या नामाविण । अवघा सीण कळतसे ॥२॥ संकल्पाचे ओढी मन । पापपुण्य सवेंचि ॥३॥ तुका म्हणे नारायणीं । पावो वाणी विसांवा ॥४॥

९०८. प्रारब्धा हातीं जन । सुख सीण पावतसे ॥१॥ करितां घायाळाचा संग । अंगें अंग माखावें ॥२॥ आविसा अंगीं पीडा वसे । त्यागें असे बहु सुख ॥३॥ तुका म्हणे जीव भ्याला । अवघ्या आला बाहेरी ॥४॥

९०९. आशा ते करविते बुद्धीचा तो लोप । संदेह तें पाप कैसें नव्हे ॥१॥ आपुला आपण करावा विचार । प्रसन्न तें सार मन ग्वाही ॥२॥ नांवें रूपें अंगीं लाविला विटाळ । होतें तें निर्मळ शुद्ध बुद्ध ॥३॥ अंधळ्यासी नये देखण्याची चाली । चाले ऐसी बोली तुका बोले ॥४॥

९१०. जळों आतां नांव रूप । माझें पाप गांठीचें ॥१॥ संतांचिया चरणरजें । उतरूं ओझें मातीचें ॥२॥ लटिक्याचा अभिमान । होता सीण पाववीत ॥३॥ तुका म्हणे अरूपींचें । सुख साचें निनांवें ॥४॥

९११. निंदा स्तुती करवी पोट । सोंग दाखवी बोभाट ॥१॥ जटा राख विटंबना । धीर नाहीं क्षमा मना ॥२॥ शृंगारिलें मढें । जीवेंवीण जैसें मुडें ॥३॥ तुका म्हणे रागें ।

भलतें चावळे वाउगें ॥४॥

९१२. भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें । ऐसियासी नारायणें । उपेक्षीजे सर्वथा ॥१॥ देवा पायीं नाहीं भाव । भक्ति वरी वरी वाव । समर्पिला जीव । नाहीं तों हा व्यभिचार ॥२॥ जगा घालावें सांकडें । दीन होऊनि बापुडें । हेंचि अभाग्य रोकडें । मूळ आणि अविश्वास ॥३॥ काय न करी विश्वंभर । सत्य करितां निर्धार । तुका म्हणे सार । दृढ पाय धरावे ॥४॥

९१३. भावबळें विष्णुदास । नाहीं नाश पावत ॥१॥ योगभाग्यें घरा येती । सर्व शक्ति चालत ॥२॥ पित्याचें जें काय धन । पुत्रा कोण वंचील ॥३॥ तुका म्हणे कडे बैसों । तेणें असों निर्भर ॥४॥

९१४. कोरड्या गोष्टी चावट्या बोल । शिकल्या सांगे नाहीं ओल ॥१॥ कोण याचें मना आणी । ऐकों कानीं नाइकोनि ॥२॥ घरोघरीं सांगती ज्ञान । भूस सीण कांडती ॥३॥ तुका म्हणे आपुल्या मति । काय रितीं पोकळ ॥४॥

९१५. नव्हतियाचा सोस होता । झडों आतां पदर ॥१॥ देखणें तें देखियलें । आतां भलें साक्षित्वें ॥२॥ लाभ कळों आली हानि । राहों दोन्हीं निराळीं ॥३॥ तुका म्हणे एकाएकीं । हा कां लोकीं पसारा ॥४॥

९१६. सोसें वाढे दोष । जाला न पालटे कस ॥१॥ ऐसें बरवें वचन । करिता तो नारायण ॥२॥ असे प्रारब्ध नेमें । श्रमचि उरे श्रमें ॥३॥ सुख देते शांती । तुका म्हणे धरितां चित्तीं ॥४॥

९१७. काय शरीरापें काम । कृपा साधावया प्रेम । उचिताचे धर्म । भागा आले ते करूं ॥१॥ देईन हाक नारायणा । ते तों नाकळे बंधना । पंढरीचा राणा । आइकोन धांवेल ॥२॥ सातांपांचांचें गोठलें । प्रारब्धें आकारलें । आतां हें संचलें । असो भोगा सांभाळीं ॥३॥ फावली ते बरवी संधि । सावधान करूं बुद्धि । तुका म्हणे मधीं । कोठें नेघें विसावा ॥४॥

९१८. नलगे देशकाळ । मंत्रविधान सकळ । मनचि निश्चळ । करूनि करुणा भाकावी ॥१॥ येतो बैसलिया ठाया । आसनें व्यापी देवराया । निर्मळ ते काया । अधिष्ठान तयाचें ॥२॥ कल्पनेचा साक्षी । तरि आदरेंचि लक्षी । आवडीनें भक्षी । कोरडें धान्य मटमटां ॥३॥ घेणें तरि भाव । लक्षी दासाचा उपाव । तुका म्हणे जीव । जीवीं मेळविल अनंत ॥४॥

९१९. भक्तिसुख आलें नाहीं अनुभवा । तों मी ज्ञान देवा काय करूं ॥१॥ नसावें जी तुम्हीं कांहीं निश्चितीनें । माझिया वचनें अभेदाच्या ॥२॥ एकाएकीं मन नेदी समाधान । देखिल्या चरण वांचूनियां ॥३॥ तुका म्हणे वाचा गुणीं लांचावली । न राहे उगली मौन्य मज ॥४॥

९२०. मागतां विभाग । कोठें लपाल जी मग ॥१॥ संत साक्षी या वचना । त्यांसी ठाऊकिया खुणा ॥२॥ होइन धरणेकरी । मग मी रिघों नेदीं बाहेरी ॥३॥ तुका म्हणे

मी अक्षर । तुज देवपणाचा भार ॥४॥

९२१. जिंकावा संसार । येणें नांवें तरी शूर ॥१॥ येर काय तीं बापुडीं । कीर अहंकाराचीं घोडीं ॥२॥ पण ऐशा नांवें । देव धरिजेतो भावें ॥३॥ तुका म्हणे ज्यावें । सत्कीर्तीनें बरवें ॥४॥

९२२. मिठवण्याचे धनी । तुम्ही व्यवसाय जनीं ॥१॥ कोण पडे ये लिगाडीं । केलीं तैसीं उगवा कोडीं ॥२॥ केलें सांगितलें काम । दिले पाळूनियां धर्म ॥३॥ तुका म्हणे आतां । असो तुमचें तुमचे माथां ॥४॥

९२३. समर्पिली वाणी । पांडुरंगीं घेते धणी ॥१॥ पूजा होते मुक्ताफळीं । रस वोविया मंगळीं ॥२॥ धार अखंडित । ओघ चालियेला नित्य ॥३॥ पूर्णाहुति जीव । तुका घेउनि ठेला भाव ॥४॥

९२४. अवघाचि आकार ग्रासियेला काळें । एकचि निराळें हरिचें नाम ॥१॥ धरूनि राहिलों अविनाश कंठी । जीवन हें पोटीं सांठविलें ॥२॥ शरीरसंपत्ति मृगजळभान । जाईल नासोन खरें नव्हे ॥३॥ तुका म्हणे आतां उपाधीच्या नांवें । आणियेला देवें वीट मज ॥४॥

९२५. बोलणेंचि नाहीं । आतां देवाविण कांहीं ॥१॥ एकसरें केला नेम । देवा दिले क्रोध काम ॥२॥ पाहेन ते पाय । जोंवरि हे दृष्टि धाय ॥३॥ तुका म्हणे मनें । हेचि संकल्प वाहाणें ॥४॥

९२६. येथूनियां ठाव । अवघे लक्षायाचे भाव ॥१॥ उंच देवाचे चरण । तेथें जालें अधिष्ठान ॥२॥ आघातावेगळा । असे ठाव हा निराळा ॥३॥ तुका म्हणे स्थळ । धरूनि राहिलों अचळ ॥४॥

९२७. भरला दिसे हाट । अवघी वाढली खटपट । संचिताची वाट । वाटा होऊनि फांकती ॥१॥ भोगा ऐसे ठायाठाव । कर्मा त्रिविधाचे भाव । द्रष्टा येथें देव । विरहित संकल्पा ॥२॥ दिला पाहूनियां धडा । पापपुण्याचा निवाडा । आचरती गोडा । आचरणें आपुलाल्या ॥३॥ तुका म्हणे पराधीनें । जालीं ओढलिया ऋणें । तुटती बंधनें । जरि देवा आळविती ॥४॥

९२८. आला भागासी तो करीं वेवसाव । परि राहों भाव तुझ्या पायीं ॥१॥ काय चाले तुम्हीं बांधलें दातारा । वाहिलिया भारा उसंतितो ॥२॥ शरीर तें करी शरीराचे धर्म । नको देऊं वर्म चुकों मना ॥३॥ चळण फिरवी ठाव बहुवस । न घडो आळस चिंतनाचा ॥४॥ इंद्रियें करोत आपुले व्यापार । आवडीसी थार देईं पायीं ॥५॥ तुका म्हणे नको देऊं काळा हातीं । येतों काकुळती म्हणऊनि ॥६॥

९२९. आम्हां अवघें भांडवल । येक विठ्ठल एकला ॥१॥ कायावाचामनोभावें । येथें जीवें वेंचलों ॥२॥ परतें कांहीं नेणें दुजें । तत्वबीज पाऊलें ॥३॥ तुका म्हणे संतसंगें ।

येणें रंगें रंगलों ॥४॥

९३०. साहोनियां टोले उरवावें सार । मग अंगीकार खऱ्या मोलें ॥१॥ भोगाचे सांभाळीं द्यावें कलेवर । संचिताची थार मोडूनियां ॥२॥ महत्वाचे ठायीं भोगावी अप्रतिष्ठा । विटवावें नष्टां पंचभूतां ॥३॥ तुका म्हणे मग कैंचा संवसार । जयाचा आदर तेंचि व्हावें ॥४॥

९३१. निर्वैर होणें साधनाचें मूळ । येर ते विल्हाळ सांडीं मांडीं ॥१॥ नाहीं चालों येत सोंगसंपादणी । निवडे अवसानीं शुद्धाशुद्ध ॥२॥ त्याग नांव तरी निर्विषय वासना । कार्याकारणापुरता विधि ॥३॥ तुका म्हणे राहे चिंतनीं आवडी । येणें नांवें जोडी सत्यत्वेंसीं ॥४॥

९३२. पशु ऐसे होती ज्ञानी । चर्वणीं विषयांचे ॥१॥ ठेवूनियां लोभीं लोभ । जाला क्षोभ आत्मत्वीं ॥२॥ केला आणिका वाढी पाक । खाणें ताक मूर्खासी ॥३॥ तुका म्हणे मोठा घात । वाताहात हा देह ॥४॥

९३३. कां जी धरिलें नाम । तुम्ही असोनि निष्काम ॥१॥ कोणा सांगतसां ज्ञान । ठकाठकीचें लक्षण ॥२॥ आवडीनें नाचें । आहे तरी पुढें साचें ॥३॥ तुका म्हणे प्रेम । नाहीं भंगायाचें काम ॥४॥

९३४. खरें बोले तरी । फुकासाठीं जोडे हरी ॥१॥ ऐसे फुकाचे उपाय । सांडोनियां वांयां जाय ॥२॥ परउपकार । एका वचनाचा फार ॥३॥ तुका म्हणे मळ । मनें सांडितां शीतळ ॥४॥

९३५. दया क्षमा शांती । तेथें देवाची वसति ॥१॥ पावें धांवोनियां घरा । राहे धरोनियां थारा ॥२॥ कीर्तनाचे वाटे । बराडिया ऐसा लोटे ॥३॥ तुका म्हणे घडे । पूजा नामें देव जोडे ॥४॥

९३६. शिष्याची जो नेघे सेवा । मानी देवासारिखें ॥१॥ त्याचा फळे उपदेश । आणिकां दोष उफराटे ॥२॥ त्याचें खरें ब्रह्मज्ञान । उदासीन देहभावीं ॥३॥ तुका म्हणे सत्य सांगें । येवोत रागें येतील ते ॥४॥

९३७. माझीं मेलीं बहुवरि । तूं कां जैसा तैसा हरी ॥१॥ विठो कैसा वांचलासी । आतां सांग मजपाशीं ॥२॥ तुज देखतांचि माझा । बाप गेला आजा पणजा ॥३॥ आम्हां लागलिसे पाठी । बालत्व तारुण्य काठी ॥४॥ तुज फावलें तें मागें । कोणी नसतां वादि लागें ॥५॥ तुका म्हणे तुझ्या अंगीं । मज देखतां लागलीं अवघीं ॥६॥

९३८. आणीक कोणाचा न करीं मी संग । जेणें होय भंग माझ्या चित्ता ॥१॥ विठ्ठलावांचूनि आणीक जे वाणी । नाइकें मी कानीं आपुलिया ॥२॥ समाधानासाठीं बोलावी हे मात । परि माझें चित्त नाहीं कोठें ॥३॥ जिवाहूनि मज तेचि आवडती । आवडे ज्या चित्तीं पांडुरंग ॥४॥ तुका म्हणे माझें तोचि जाणे हित । आणिकांच्या चित्त नेदीं बोला ॥५॥

९३९. आशा हे समूळ खाणोनि काढावी । तेव्हांचि गोसावी व्हावें तेणें ॥१॥ नाहीं

तरि सुखें असावें संसारीं । फजिती दुसरी करूं नये ॥२॥ आशा मारूनिया जयवंत व्हावें । तेव्हांचि निघावें सर्वांतूनि ॥३॥ तुका म्हणे जरी योगाची तांतडी । आशेची बीबुडी करीं आधीं ॥४॥

९४०. निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म । निर्धार हें वर्म चुकों नये ॥१॥ निष्काम निश्चळ विठ्ठलीं विश्वास । पाहों नये वास आणिकाची ॥२॥ तुका म्हणे ऐसा कोण उपेक्षिला । नाहीं ऐकिला ऐसा कोणी ॥३॥

९४१. नामाचें चिंतन प्रगट पसारा । असाल तें करा जेथें तेथें ॥१॥ सोडवील माझा स्वामी निश्चयेसीं । प्रतिज्ञा हे दासीं केली आम्हीं ॥२॥ गुण दोष नाहीं पाहात कीर्तनीं । प्रेमें चक्रपाणी वश्य होय ॥३॥ तुका म्हणे कडू वाटतो प्रपंच । रोकडे रोमांच कंठ दाटे ॥४॥

९४२. किती या काळाचा सोसावा वळसा । लागला सरिसा पाठोपाठीं ॥१॥ लक्ष चौऱ्यांशीची करा सोडवण । रिघा या शरण पांडुरंगा ॥२॥ उपजल्या पिंडा मरण सांगातें । मरतें उपजतें सवेंचि तें ॥३॥ तुका म्हणे माळ गुंतली राहाटीं । गाडग्याची सुटी फुटलिया ॥४॥

९४३. नाम म्हणतां मोक्ष नाहीं । ऐसा उपदेश करितील कांहीं । बधिर व्हावें त्याचे ठायीं । दुष्ट वचन वाक्य तें ॥१॥ जयाचे राहिलें मानसीं । तेचि पावले तयासी । चाचपडतां मेलीं पिसीं । भलतैसीं वाचाळें ॥२॥ नवविधीचा निषेध । जेणें मुखें करिती वाद । जन्मा आले निंद्य । शूकरयाती संसारा ॥३॥ काय सांगों वेळोवेळां । आठव नाहीं त्या चांडाळा । नामासाठीं बाळा । क्षीरसागरीं कोंडिलें ॥४॥ आपुलिया नामासाठीं । लाघे शंखासुरापाठीं । फोडोनियां पोटीं । वेद चारी काढिले ॥५॥ जगीं प्रसिद्ध हे बोली । नामें गणिका तारिली । आणिकेंही उद्धरिली । पातकी महादोषी ॥६॥ जे हे पवाडे गर्जती । नाम प्रल्हादाच्या चित्तीं । जळतां बुडतां घातीं । राखें हातीं विषाचे ॥७॥ काय सांगों ऐशी कीर्ति । तुका म्हणे नामख्याती । नरकाप्रती जाती । निषेधिती तीं एक ॥८॥

९४४. गासी तरी एक विठ्ठलचि गाई । नाहीं तरि ठायीं राहें उगा ॥१॥ अद्वैतीं तों नाहीं बोलाचें कारण । जाणीवेचा सीण करिसी वांयां ॥२॥ तुका म्हणे किती करावी फजिती । लाज नाहीं चित्तीं निलाजिरा ॥३॥

९४५. जयाचिये वाचे नये हा विठ्ठल । त्याचे मज बोल नावडती ॥१॥ शत्रु तो म्यां केला न म्हणे आपुला । जो विन्मुख विठ्ठला सर्वभावें ॥२॥ जयासी नावडे विठोबाचें नाम । तो जाणा अधम तुका म्हणे ॥३॥

९४६. आम्हांसी तों नाही आणीक प्रमाण । नामासी कारण विठोबाच्या ॥१॥ घालूनियां कास करितो कैवाड । वागों नेदीं आड कळिकाळासी ॥२॥ अबद्ध वांकुडें जैशातैशापरी । वाचे

हरि हरि उच्चारावें ॥३॥ तुका म्हणे आम्हां सांपडलें निज । सकळ हें बीज पुराणाचें ॥४॥

९४७. जीव तोचि देव भोजन ते भक्ति । मरण तेचि मुक्ति पाषांड्याची ॥१॥ पिंडाच्या पोषकें नागविले जन । लटिकें पुराण केल वेद ॥२॥ मना आला तैसा करिती विचार । म्हणती संसार नाहीं पुन्हां ॥३॥ तुका म्हणे पाठीं उडती यमदंड । पापपुण्य लंड न विचारिती ॥४॥

९४८. भक्ताचा महिमा भक्तचि जाणती । दर्लभ या गति आणिकांसी ॥१॥ जाणोनि नेणते जाले तेणें सेखें । न बोलोनि मुखें बोलताती ॥२॥ अभेदूनि भेदु राखियेला अंगीं । वाढावया जगीं प्रेमसुख ॥३॥ टाळघोळ कथा प्रेमाचा सुकाळ । मूढ लोकपाळ तरावया ॥४॥ तुका म्हणे हें तों आहे तयांठावें । तिहीं एक्याभावें जाणीतला ॥५॥

९४९. आशा तृष्णा माया अपमानाचें बीज । नासिलिया पूज्य होइजेतें ॥१॥ अधीरासी नाहीं चालों जाता मान । दुर्लभ दर्शन धीर त्याचें ॥२॥ तुका म्हणे नाहीं आणिकासी बोल । वांयां जाय मोल बुद्धि पाशीं ॥३॥

९५०. चिंतनें सरे तो धन्य धन्य काळ । सकळ मंगळ मंगळाचें ॥१॥ संवसारसिंधु नाहीं हरिदासां । गर्भवास कैसा नेणती ते ॥२॥ जनवन ऐसें कृपेच्या सागरें । दाटला आभारें पांडुरंग ॥३॥ तुका म्हणे देवाभक्तांचें बंधन । दाखविलें भिन्न परी एक ॥४॥

९५१. मोक्षाचें आम्हासी नाहीं अवघड । तो असे उघड गांठोळीस ॥१॥ भक्तीचे सोहळे होतील जीवासी । नवल तेविशीं पुरवितां ॥२॥ ज्याचें त्यासी देणें कोणतें उचित । मानूनियां हित घेतो सुखें ॥३॥ तुका म्हणे सुखें देईं संवसार । आवडीसी थार करीं माझे ॥४॥

९५२. चिंतनासी नलगे वेळ । सर्वकाळ करावें ॥१॥ सदा वाचे नारायण । तें वदन मंगळ ॥२॥ पढिये सर्वोत्तमा भाव । येर वाव पसारा ॥३॥ ऐसें उपदेशी तुका । अवघ्या लोकां सकळां ॥४॥

९५३. अंतरायें पडे गोविंदीं अंतर । जो जो घ्यावा भार तो तो बाधी ॥१॥ बैसलिये ठायीं आठवीन पाय । पाहीन तो ठाय तुझा देवा ॥२॥ अखंड तें खंडें संकल्पीं विकल्प । मनोजन्य पाप रज्जुसर्प ॥३॥ तुका म्हणे विश्वीं विश्वंभर वसे । राहों ऐसे दशे सुखरूप ॥४॥

९५४. एकाचिया घाट्या टोके । एका फिके उपचार ॥१॥ ऐसी सवे गोवळिया । भाव तया पढियंता ॥२॥ एकाचें तें उष्टें खाय । एका जाय ठकूनि ॥३॥ तुका म्हणे बहु सोपें । बहु रूपें अनंता ॥४॥

९५५. कोठें नाहीं अधिकार । गेले नर वांयां ते ॥१॥ ऐका हें सोपें वर्म । नलगे श्रम चिंतना ॥२॥ मृत्याचिये अंगीं छाये । उपायचि खुंटतां ॥३॥ तुका म्हणे अवघे जन । येथें मन असों द्या ॥४॥

९५६. ज्यानें ज्यानें जैसें ध्यावें । तैसें व्हावें कृपाळें ॥१॥ सगुण निर्गुणांचा ठाव । विटे पाव धरियेले ॥२॥ अवघे साकरेचें अंग । नये व्यंग निवडितां ॥३॥ तुका म्हणे जें जें करी । तें तें हरी भोगिता ॥४॥

९५७. आचरती कर्मे । ते ते काळें धर्माधर्मे ॥१॥ खेळे गोवळियांसवें । करिती तें त्यांचें साहावें ॥२॥ यज्ञमुखें घांस । मंत्रपूजेसी उदास ॥३॥ तुका म्हणे चोरी । योगियांही सवें करी ॥४॥

९५८. नामाचे पवाडे बोलती पुराणें । होऊनि कीर्तनें तोचि ठेला ॥१॥ आदिनाथा कंठीं आगळा हा मंत्र । आवडीचें स्तोत्र सदा घोकी ॥२॥ आगळें हें सार उत्तमा उत्तम । ब्रह्मकर्मा नाम एक तुझें ॥३॥ तिहीं त्रिभुवनीं गमन नारदा । हातीं विणा सदा नाम मुखीं ॥४॥ परिक्षिती मृत्यु सातां दिवसांचा । मुक्त जाला वाचा उच्चारितां ॥५॥ कोळियाची कीर्ति वाढली गहन । केलें रामायण रामाआधीं ॥६॥ सगुण निर्गुण तुज म्हणे वेद । तुका म्हणे भेद नाहीं नामीं ॥७॥

९५९. भूतदयापरत्वें जया तया परी । संत नमस्कारीं सर्वभावें ॥१॥ शिकल्या बोलाचा धरिशील ताठा । तरी जासी वाटा यमपंथें ॥२॥ हिरा परिस मोहरा आणीक पाषाण । नव्हे परी जन संतां तैसी ॥३॥ सरिता वोहोळ गंगा सागरा समान । लेखी तयाहून अधम नाहीं ॥४॥ आणीक अमुप होतीं तारांगणें । रवीसी समान लेखूं नये ॥५॥ तुका म्हणे नाहीं नम्रता अंगीं । नव्हे ते फिरंगी कठिण लोह ॥६॥

९६०. आणीक मज कांहीं नावडती मात । एका पंढरीनाथावांचूनियां ॥१॥ त्याचीच कथा आवडे कीर्तन । तें मज श्रवण गोड लागे ॥२॥ तुका म्हणे संत म्हणोत भलतें । विठ्ठलापरतें न मनीं कांहीं ॥३॥

९६१. ठेवा जाणीव गुंडून । येथें भावचि प्रमाण ॥१॥ एका अनुसरल्या काज । अवघें जाणे पंढरिराज ॥२॥ तर्कवितर्कासी । ठाव नलगे सायासीं ॥३॥ तुका म्हणे भावेंविण । अवघा बोलती तो सीण ॥४॥

९६२. येथें दुसरी न सरे आटी । देवा भेटी जावया ॥१॥ तोचि ध्यावा एक चित्तें । करूनि रितें कलेवर ॥२॥ षड्ऊर्मी हृदयांत । यांचा अंत पुरवूनि ॥३॥ तुका म्हणे खुंटे आस । तेथें वास करी तो ॥४॥

९६३. मुक्त तो आशंका नाहीं जया अंगीं । बद्ध मोहोसंगीं लज्जा चिंता ॥१॥ सुख पावे शांती धरूनि एकांत । दुःखी तो लोकांत दंभ करी ॥२॥ तुका म्हणे लागे थोडाच विचार । परी हे प्रकार नागविती ॥३॥

९६४. कानीं धरी बोल बहुतांचीं मतें । चाट त्यापरतें आणीक नाहीं ॥१॥ पावेल गौरव

वोढाळाचे परी । दंड पाठीवरी यमदूतांचे ॥२॥ शब्दज्ञानी एक आपुल्याला मतें । सांगती वेदान्त भिन्नभावें ॥३॥ तुका म्हणे एक भाव न धरिती । पडिली हे माती त्यांचे तोंडीं ॥४॥

९६५. देवा ऐकें हे विनंती । मज नको रे हे मुक्ति । तया इच्छा गति । हेंचि सुख आगळें ॥१॥ या या वैष्णवांचे घरीं । प्रेमसुख इच्छा करी । रिद्धिसिद्धि द्वारीं । कर जोडूनि तिष्ठती ॥२॥ नको वैकुंठींचा वास । असे तया सुखा नास । अद्भुत हा रस । कथाकाळीं नामाचा ॥३॥ तुझ्या नामाचा महिमा । तुज न कळे मेघश्यामा । तुका म्हणे आम्हां । जन्म गोड यासाठीं ॥४॥

९६६. न पूजीं आणिकां देवां न करीं त्यांची सेवा । न मनीं या केशवाविण दुजें ॥१॥ काय उणें जालें मज तया पायीं । तें मी मागों काई कवणासी ॥२॥ आणिकांची कीर्ति नाइके न बोलें । चाड या विठ्ठलेंविण नाहीं ॥३॥ न पाहें लोचनीं श्रीमुखावांचूनि । पंढरी सांडूनि नवजें कोठें ॥४॥ न करीं कांहीं आस मुक्तीचे सायास। न भे संसारास येतां जातां ॥५॥ तुका म्हणे कांहीं व्हावे ऐसें जीवा । नाहीं या केशवाविण दुजें ॥६॥

९६७. नव्हे खळवादी मताचि पुरता । सत्याची हे सत्ता उपदेश ॥१॥ साक्षत्वेंसि मना आणावीं उत्तरें । परिपाकीं खरें खोटें कळे ॥२॥ नव्हे एकदेशी शब्द हा उखता । ब्रह्मांडापुरता घेईल त्यासी ॥३॥ तुका विनवणी करी जाणतियां । बहुमतें वांयां श्रमों नये ॥४॥

९६८. कथा करोनियां द्रव्य देती घेती । तयां अधोगति नरकवास ॥१॥ रवरव कुंभपाक भोगिती यातना । नये नारायणा करुणा त्यांची ॥२॥ असिखड्गधारा छेदिती सर्वांग । तप्तभूमी अंग लोळविती ॥३॥ तुका म्हणे तया नरक न चुकती । सांपडले हातीं यमाचिया ॥४॥

९६९. नाइकावे कानीं तयाचे ते बोल । भक्तीविण फोल ज्ञान सांगे ॥१॥ वाखाणी अद्वैत भक्तिभावेंविण । दुःख पावे सीण श्रोता वक्ता ॥२॥ अहं ब्रह्म म्हणोनि पाळीतसे पिंडा । न बोलावें भांडा तयासवें ॥३॥ वेदबाह्य लंड बोले जो पाषांड । त्याचें काळें तोंड संतांमध्यें ॥४॥ तुका म्हणे खंडी देवभक्तपण । वरिष्ठ त्याहूनि श्वपच तो ॥५॥

९७०. वेदविहित तुम्ही आइका हो कर्में । बोलतों तीं वर्में संतांपुढें ॥१॥ चारी वर्ण जाले एकाचिये अंगीं । पापपुण्य भागीं विभागिले ॥२॥ प्रथम पाउलीं पावविला पंथ । आदि मध्य अंत भेद नाहीं ॥३॥ आंबे बोरी वड बांभुळा चंदन । गुणागुण भिन्न अग्नि एक ॥४॥ तुका म्हणे मन उन्मन जों होय । तोंवरि हे सोय विधि पाळीं ॥५॥

९७१. तीर्थांचें जें मूळ व्रतांचें जें फळ । ब्रह्म तें केवळ पंढरीये ॥१॥ तें आम्हीं देखिलें आपुल्या नयनीं । फिटलीं पारणीं डोळियांचीं ॥२॥ जीवांचें जीवन सुखाचें शेजार । उभें कटीं कर ठेवूनियां ॥३॥ जगाचा जनिता कृपेचा सागर । दीनां लोभापर दुष्टां काळ ॥४॥ सुरवरां चिंतनीं मुनिवरां ध्यानीं । आकार निर्गुणीं तोचि असे ॥५॥ तुका म्हणे

नाहीं श्रुती आतुडलें । आम्हां सांपडलें गीतीं गातां ॥६॥

९७२. माझे मनोरथ पावले जैं सिद्धी । तई पायीं बुद्धि स्थिरावली ॥१॥ समाधान जीव राहिला निश्चळ । गेली हळहळ स्मरणें हे ॥२॥ त्रिविध तापाचें जालेंसे दहन । सुखावलें मन प्रेमसुखें ॥३॥ महालाभ वाचे वसे पांडुरंग । अंगोअंगीं संग अखंडित ॥४॥ जीवनाचा जाला ओलावा अंतरीं । विश्व विश्वंभरीं मावळलें ॥५॥ तुका म्हणे माप भरूं आलें सिगे । धारबोळ गंगे पूर वाहे ॥६॥

९७३. कृपेचीं उत्तरें देवाचा प्रसाद । आनंदें आनंद वाढवावा ॥१॥ बहुतांच्या भाग्यें लागलें जहाज । येथें आतां काज लवलाहो ॥२॥ अलभ्य तें आलें दारावरी फुका । येथें आता चुका न पाहिजे ॥३॥ तुका म्हणे जिव्हाश्रवणाच्या द्वारें । माप भरा बरें सिगेवरी ॥४॥

९७४. पापपुण्यसुखदुःखाचीं मंडळें । एक एका बळें धांव घेती ॥१॥ कवतुक डोळां पाहिलें सकळ । नाचवितो काळ जीवांसी तो ॥२॥ स्वर्गाचिया भोगें सरता नरक । मागें पुढें एक एक दोन्ही ॥३॥ तुका म्हणे भय उपजलें मना । घेईं नारायणा कडिये मज ॥४॥

९७५. वचना फिरती अधम जन । नारायण तो नव्हे ॥१॥ केला असतां अंगीकार । न मनी भार समर्थ ॥२॥ संसाराचा नाहीं पांग । देवें सांग सकळ ॥३॥ तुका म्हणे कीर्ति वाणूं । मध्यें नाणूं संकल्प ॥४॥

९७६. कथा करोनियां मोल ज्यापें घेती । तेही दोघे जाती नरकामध्यें ॥१॥ ब्रह्म पूर्ण करा ब्रह्म पूर्ण करा । अखंड स्मरा रामराम ॥२॥ मधुरवाणीच्या नका पडों भरी । जाल यमपुरी भोगावया ॥३॥ तुका म्हणे करीं ब्रह्मांड ठेंगणें । हात पसरी जिणें धिग त्याचें ॥४॥

९७७. गोड नांवें क्षीर । परी साकरेचा धीर ॥१॥ तैसे जाणा ब्रह्मज्ञान । बापुडें तें भक्तीविण ॥२॥ रुची नेदी अन्न । ज्यांत नसतां लवण ॥३॥ अंधळ्याचे श्रम । शिकविल्याचेंचि नाम ॥४॥ तुका म्हणे तारा । नाव तंबुऱ्याच्या सारा ॥५॥

९७८. नम्र जाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ॥१॥ हेंचि शूरत्वाचें अंग । हारी आणिला श्रीरंग ॥२॥ अवघा जाला पण । लवण सकळां कारण ॥३॥ तुका म्हणे पाणी । पातळपणें तळा आणी ॥४॥

९७९. आपुल्या महिमानें । धातु परिसें केलें सोनें ॥१॥ तैसे न मनीं माझे आतां । गुणदोष पंढरिनाथा ॥२॥ गांवामागील वोहोळ । गंगा न मनी अमंगळ ॥३॥ तुका म्हणे माती । केली कस्तुरीनें सरती ॥४॥

९८०. तक्र शिष्या मान । दुधा म्हणे नारायण ॥१॥ ऐशीं ज्ञानाचीं डोंबडें । आशा विटंबिलीं मूढें ॥२॥ उपदेश तो जगा । आपण सोंवळा इतका मांगा ॥३॥ रसनाशिश्नाचे

अंकित । तुका म्हणे वरदळ स्फीत ॥४॥

९८१. ब्रह्मचारी धर्म घोकावीं अक्षरें । आश्रमीं विचार षट्कर्मीं ॥१॥ वानप्रस्थ तरी संयोगीं वियोग । संन्यास तो त्याग संकल्पाचा ॥२॥ परमहंस तरी जाणे सहज वर्म । तेथें याति धर्म कुळ नाहीं ॥३॥ बोले वर्म जो चाले याविरहित । तो जाणा पतित श्रुति बोले ॥४॥ तुका म्हणें कांहीं नाहीं नेमाविण । मोकळा तो सीण दुःख पावे ॥५॥

९८२. आम्ही क्षेत्रींचे संन्यासी । देह भरित हृषीकेशी । नाहीं केली ऐशी । आशाकामबाहेरी ॥१॥ आलें अयाचित अंगा । सहज तें आम्हां भागा । दाता पांडुरंगा । ऐसा करितां निश्चिती ॥२॥ दंड धरिला दंडायमान । मुळीं मुंडिलें मुंडण । बंदी बंदाची कौपीन । बहिरवास औटडें ॥३॥ काळें साधियेला काळ । मन करूनि निश्चळ । लौकिकीं विटाळ । धरूनि असों एकांत ॥४॥ कार्यकारणाची चाली । वाचावाचत्वें नेमिली । एका नेमें केली । स्वरूपींच वोळखी ॥५॥ नव्हे वेषधारी । तुका आहाच वरिवरि । आहे तैसीं बरीं । खंडें निवडी वेदांचीं ॥६॥

९८३. निर्वाहापुरतें अन्न आच्छादन । आश्रमासी स्थान कोपी गुहा ॥१॥ कोठेंही चित्तासी नसावे बंधन । हृदयीं नारायण सांठवावा ॥२॥ नये बोलों फार बैसों जनामधीं । सावधान बुद्धी इंद्रियदमीं ॥३॥ तुका म्हणे घडी घडीनें साधावी । त्रिगुणांची गोवी उगवूनि ॥४॥

९८४. याचि नांवें दोष । राहे अंतरीं किल्मिष ॥१॥ मना अंगीं पुण्य पाप । शुभ उत्तम संकल्प ॥२॥ बीजाऐसीं फळें । उत्तम कां अमंगळें ॥३॥ तुका म्हणे चित्त । शुद्ध करावें हे हीत ॥४॥

९८५. कुशळ वक्ता नव्हे जाणीव तो श्रोता । राहे भाव चित्ता धरोनियां ॥१॥ धन्य तो जगीं धन्य तो जगीं । ब्रह्म तया अंगीं वसतसे ॥२॥ न धोवी तोंड न करी अंघोळी । जपे सदाकाळीं रामराम ॥३॥ जप तप ध्यान नेणे योग युक्ती । कृपाळु जो भूतीं दयावंत ॥४॥ तुका म्हणे होय जाणोनि नेणता । आवडे अनंता जीवाहूनि ॥५॥

९८६. म्हातारपणीं थेटें पडसें खोकला । हात कपाळाला लावुनि बैसे ॥१॥ खोबरीयाची वाटी जालें असे मुख । गळतसे नाक श्लेष्मपुरी ॥२॥ बोलों जातां शब्द नयेचि हा नीट । गडगडी कंठ कफ भारी ॥३॥ सेजारी म्हणती मरेना कां मेला । आणिला कांटाळा येणें आम्हां ॥४॥ तुका म्हणे आतां सांडुनि सर्व काम । स्मरा राम राम क्षणक्षणा ॥५॥

९८७. बाळपणीं ऐसीं वरुषें गेलीं बारा । खेळतां या पोरा नानामतें ॥१॥ विटी दांडू चेंडू लगोऱ्या वाघोडीं । चंपे पेंड घडी एकीबेकी ॥२॥ हमामा हुंबरी पकव्याच्या बारे । खेळे जंगी भोंवरे चुंबाचुंबी ॥३॥ सेलडेरा आणि निरसभोंवडी । उचली बाळे धोंडीं अंगबळें ॥४॥ तुका म्हणे ऐसें बाळपण गेलें । मग तारुण्य आलें गर्वमूळ ॥५॥

९८८. तारुण्याच्या मदें न मानी कोणासी । सदा मुसमुसी धुळी जैसा ॥१॥ अठोनि

वेठोनि बांधला मुंडासा । फिरतसे म्हैसा जनामधीं ॥२॥ हातीं दीडपान वरती करी मान । नाहीं तो सन्मान भलियांसी ॥३॥ श्वानाचिया परी हिंडे दारोदारीं । पाहे परनारी पापदृष्टी ॥४॥ तुका म्हणे ऐसी थोर हानी जाली । करितां टवाळी जन्म गेला ॥५॥

९८९. काय माझें नेती वाईट म्हणोन । करूं समाधान काशासाठीं ॥१॥ काय मज लोक नेतील परलोका । जातां कोणी एक निवारील ॥२॥ न म्हणें कोणासी उत्तम वाईट । सुखें माझी कूट खावो मागें ॥३॥ सर्व माझा भार असे पांडुरंगा । काय माझें जगासवें काज ॥४॥ तुका म्हणे माझें सर्वही साधन । नामसंकीर्तन विठोबाचें ॥५॥

९९०. काळाचिये सत्ता ते नाहीं घटिका । पंढरीनायका आठवितां ॥१॥ सदा काळ गणना करी आयुष्याची । कथेचे वेळेची आज्ञा नाहीं ॥२॥ याकारणें माझ्या विठोबाची कीर्ति । आहे हे त्रिजगतीं थोर वाट ॥३॥ तुका म्हणे जन्मा आलियाचें फळ । स्मरावा गोपाळ तेंचि खरें ॥४॥

९९१. घरोघरीं जाले कवि । नेणे प्रसादाची चवी ॥१॥ लंडा भूषणांची चाड । पुढें न विचारी नाड ॥२॥ काढावें आइतें । तेंचि जोडावें स्वहितें ॥३॥ तुका म्हणे कळे । अहाच झांकतील डोळे ॥४॥

९९२. नये पाहों मुख मात्रागमन्याचें । तैसें अभक्ताचें गुरुपुत्रा ॥१॥ म्हणऊनि बरें धरितां एकांत । तेणें नव्हे घात भजनासी ॥२॥ नये होऊं कदा निंदकाची भेटी । जया द्वैत पोटीं चांडाळाच्या ॥३॥ तुका म्हणे नका बोलों त्यासी गोष्टी । जयाचिया दृष्टी पाप वाढे ॥४॥

९९३. जैसीं तैसीं तरी । शरणागतें तुझीं हरी ॥१॥ आतां न पाहिजे केलें । ब्रीद लटिकें आपुलें ॥२॥ शुद्ध नाहीं चित्त । परी म्हणवितों भक्त ॥३॥ मज कोण पुसे रंका । नाम सांगे तुझें तुका ॥४॥

९९४. नाशिवंत देह नासेल हा जाणा । कां रे उच्चाराना वाचे नाम ॥१॥ नामेंचि तारिले कोट्यान हे कोटी । नामें हे वैकुंठीं बैसविले ॥२॥ नामापरतें सार नाहीं त्रिभुवनीं । तें कां तुम्हीं मनीं आठवाना ॥३॥ तुका म्हणे नाम वेदांसी आगळें । तें दिलें गोपाळें फुकासाठी ॥४॥

९९५. आळविती बाळें । माते तें सुख आगळें ॥१॥ द्यावें आवडी भातुकें । पाहे निवे कवतुकें ॥२॥ लेववूनि अळंकार । दृष्टी करावी सादर ॥३॥ आपुलिये पदीं । बैसवूनि कोडें वंदी ॥४॥ नेदी लागों दिठी । उचलोनि लावी कंठीं ॥५॥ तुका म्हणे लाभा । वारी घ्या वो पद्मनाभा ॥६॥

९९६. तप तीर्थ दान व्रत आचरण । गातां हरिगुण वारूं नये ॥१॥ कोटि कुळें त्याची वाटुली पाहाती । त्या तया घडती ब्रह्महत्या ॥२॥ आपुलिया पापें न सुटे सायासें । कोणा काळें ऐसें निस्तरेल ॥३॥ व्हावें साह्य तया न घालावें भय । फुकासाठीं पाहें लाभ घात ॥४॥ तुका म्हणे हित माना या वचना । सुख दुःख जाणा साधे फुका ॥५॥

९९७. देवासाठीं जाणा तयासीच आटी । असेल ज्या गांठीं पुण्यराशी ॥१॥ निर्बळा पाठवी बळें वाराणसी । मेला आला त्यासी अर्ध पुण्य ॥२॥ कथे निद्राभंग करावा भोजनीं । तया सुखा धणी पार नाहीं ॥३॥ यागी ऋण घ्यावें द्यावें सुख लाहीं । बुडतां चिंता नाहीं उभयतां ॥४॥ तुका म्हणे वर्म जाणोनि करावें । एक न घालावें एकावरी ॥५॥

९९८. अग्नीमाजी पडे धातु । लीन होउनि राहे आंतु । होय शुद्ध न पावे घातु । पटतंतुप्रमाणें ॥१॥ बाह्यरंगाचें कारण । मिथ्या अवघेंचि भूषण । गर्व ताठा हें अज्ञान । मरण सवें वाहातसे ॥२॥ पुरें मातलिया नदी । लव्हाळा नांदे जीवनसंधी । वृक्ष उन्मळोनि भेदी । परि तो कधीं भंगेना ॥३॥ हस्ती परदळ जो भंगी । तया पायीं न मरे मुंगी । कोण जाय संगीं । पाणोवाणी तयाच्या ॥४॥ पिटितां घणें वरि सैरा । तया पोटीं राहे हिरा । तैशा काय तगती गारा । तया थोरा होऊनि ॥५॥ लीन दीन हेंचि सार । भव उतरावया पार । बुडे माथां भार । तुका म्हणे वाहोनि ॥६॥

९९९. आम्ही वीर झुंझार । करूं जमदाढे मार । थापटिले भार । मोड जाला दोषांचा ॥१॥ जाला हाहाकार । आले अंकित जुंझार । शंखचक्राचे शृंगार । कंठीं हार तुळसीचे ॥२॥ रामनामांकित बाण । गोपी लाविला चंदन । झळकती निशाण । गरुडटके पताका ॥३॥ तुका म्हणे काळ । जालों जिंकोनि निश्चळ । पावला सकळ । भोग आम्हां आमुचा ॥४ ॥

१०००. आशाबद्ध तो जगाचा दास । पूज्य तो उदास सर्वजना ॥१॥ आहे तें अधीन आपुले हातीं । आणिकां ठेविती काय बोला ॥२॥ जाणतिया पाठीं लागला उपाध । नेणता तो सिद्ध भोजनासी ॥३॥ तुका म्हणे भय बांधलें गांठीं । चोर लागे पाठी दुम तया ॥४॥

१००१. आणिकांसी तारी ऐसा नाहीं कोणी । धड तें नासोनि भलता टाकी ॥१॥ सोनें शुद्ध होतें अविट तें घरीं । नासिलें सोनारीं अळंकारीं ॥२॥ ओल शुद्ध काळीं काळें जिरें बीज । कैचे लागे निज हाता तेथें ॥३॥ एक गहू करिती अनेक प्रकार । सांजा दिवसीं क्षीर घुगरिया ॥४॥ तुका म्हणे विषा रुचि एका हातीं । पाधानी नासिती नवनीत ॥५॥

१००२. वाटे या जनाचें थोर बा आश्चर्य । न करिती विचार कां हिताचा ॥१॥१॥ कोण दम ऐसा आहे यांचे पोटीं । येईल शेवटीं कोण कामा ॥२॥ काय मानुनियां राहिले निश्चिंती । काय जाब देती यमदूतां ॥३॥ कां हीं विसरलीं मरण बापुडीं । काय यांसी गोडी लागलीसे ॥४॥ काय हातीं नाहीं करील तयासी । काय जालें यांसी काय जाणों ॥५॥ कां हीं नाठविती देवकीनंदना । सुटाया बंधनापासूनियां ॥६॥ काय मोल यासी लागे धन वित्त । कां हें यांचें चित्त घेत नाहीं ॥७॥ तुका म्हणे कां हीं भोगितील खाणी । कां त्या चक्रपाणी विसरलीं ॥८॥

१००३. काय एकां जालें तें कां नाहीं ठावें । काय हें सांगावें काय म्हूण ॥१॥ देखतील

डोळां ऐकती कानीं । बोलिलें पुराणीं तेंही ठावें ॥२॥ काय हे शरीर साच की जाणार । सकळ विचार जाणती हा ॥३॥ कां हें कळों नये आपुलें आपणा । बाळत्व तारुण्य वृद्धदशा ॥४॥ कां हें आवडलें प्रियापुत्रधन । काय कामा कोण कोणा आलें ॥५॥ कां हें जन्म वांयां घातलें उत्तम । कां हें रामराम न म्हणती ॥६॥ काय भुली यांसी पडली जाणतां । देखती मरतां आणिकांसी ॥७॥ काय करिती हे बांधलिया काळें । तुका म्हणे बळें वज्रपाशीं ॥८॥

१००४. जुंझार ते एक विष्णुदास जगीं । पापपुण्य अंगीं नातळें त्यां ॥१॥ गोविंद आसनीं गोविंद शयनीं । गोविंद त्यां मनीं बैसलासे ॥२॥ ऊर्ध्वपुंड्र भाळ कंठीं शोभे माळ । कांपिजे कळिकाळ तया भेणें ॥३॥ तुका म्हणे शंखचक्रांचे शृंगार । नामामृतसार मुखामाजी ॥४॥

१००५. जेणें नाहीं केलें आपुलें स्वहित । पुढिलांचा घात इच्छितसे ॥१॥ संचितासी जाय मिळोनियां खोडी । पतनांचे जोडीवरी हांव ॥२॥ बांधलें गांठीं तें लागतें भोगावें । ऐसियासी देवें काय कीजे ॥३॥ तुका म्हणे जया गांवां जाणें जया । पुसोनियां तया वाट चाले ॥४॥

१००६. मानी भक्तांचे उपकार । ऋणीया म्हणवी निरंतर । केला निर्गुणीं आकार । कीर्ति मुखें वर्णितां ॥१॥ म्हणोनि जया जे वासना । ते पुरवितो पंढरिराणा । जाला भक्तांचा आंदणा । ते उपकार फेडावया ॥२॥ अंबऋषीकारणें । जन्म घेतले नारायणें । एवढें भक्तीचें लाहाणें । दास्य करी दासाचें ॥३॥ म्हणियें करिता शंका न धरी । रक्षपाळ बळिच्या द्वारीं । भक्तीचा आभारी । रीघ न पुरे जावया ॥४॥ अर्जुनाचे रथवारु । ते वागवी सर्वेश्वरु । एवढे भक्तीचे उपकारु । मागें मागें हिंडतसे ॥५॥ पुंडलिकाचे द्वारीं । सम पाउलें विटेवरी । न वजे कट करीं । धरूनि तेथें राहिला ॥६॥ भाव भक्तीचा अंकित । नाम साजे दीनानाथ । म्हणोनि राहिला निवांत । तुका चरण धरोनि ॥७॥

१००७. सांगों जाणती शकुन । भूत भविष्य वर्तमान ॥१॥ त्यांचा आम्हांसी कांटाळा । पाहों नावडती डोळां ॥२॥ रिद्धिसिद्धींचे साधक । वाचासिद्ध होती एक ॥३॥ तुका म्हणे जाती । पुण्यक्षयें अधोगती ॥४॥

१००८. ठाकलोंसें द्वारीं । उभा याचक भिकारी ॥१॥ मज भीक कांहीं देवा । प्रेम भातुकें पाठवा ॥२॥ याचकाचा भार । घेऊं नये येरझार ॥३॥ तुका म्हणे दान । सेवा घेतल्या वांचून ॥४॥

१००९. ऐसें कां जालें तें मजही न कळे । कीर्तनाचे रळेपळे जगीं ॥१॥ कैसें तुम्हां देवा वाटतसे बरें । संतांचीं उत्तरें लाजविलीं ॥२॥ भाविकां कंटक करिताती पीडा । हा तंव रोकडा अनुभव ॥३॥ तुका म्हणे नाम निर्वाणीचा बाण । याचा अभिमान नाहीं तुम्हां ॥४॥

१०१०. तुम्ही बैसलेती निर्गुणाचे खोळे । आम्हांसी कां डोळे कान दिले ॥१॥ नाइकवे तुझी अपकीर्ति देवा । अव्हेरिली सेवा न देखवे ॥२॥ आपुले पोटीं तों राखियेला

वाव । आम्हांसी कां भाव अल्प दिला ॥३॥ तुका म्हणे दुःखी असें हें कळों द्या । आपुलिया धंद्या मन नेघे ॥४॥

१०११. अवघीं भूतें साम्या आलीं । देखिलीं म्यां कैं होतीं ॥१॥ विश्वास तो खरा मग । पांडुरंगकृपेचा ॥२॥ माझी कोणी न धरू शंका । ऐसें हो कां निर्द्वंद्व ॥३॥ तुका म्हणे जें जें भेटे । तें तें वाटे मी ऐसें ॥४॥

१०१२. सोंगें छंदें कांहीं । देव जोडे ऐसें नाहीं ॥१॥ सारा अवघें गाबाळ । डोळ्याआडील पडळ ॥२॥ शुद्ध भावावीण । जो जो केला तो तो सीण ॥३॥ तुका म्हणे कळे । परि होताती अंधळे ॥४॥

१०१३. सत्य संकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥१॥ येथें अळंकार शोभती सकळ । भावबळें फळ इच्छेचें तें ॥२॥ अंतरींचे बीज जाणे कळवळा । व्यापक सकळां ब्रह्मांडाचा ॥३॥ तुका म्हणे नाहीं चालत तांतडी । प्राप्त काळ घडी आल्याविण ॥४॥

१०१४. काय वानूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवितसे ॥१॥ थोरीव सांडिली आपुली परिसें । नेणे सिवों कैसें लोखंडासी ॥२॥ जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति । देह कष्टविती परउपकारें ॥३॥ भूताची दया हें भांडवल संतां । आपुली ममता नाहीं देहीं ॥४॥ तुका म्हणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्त्रवतसे ॥५॥

१०१५. जन्मा आलों त्याचें । आजि फळ जालें साचें ॥१॥ तुम्हीं सांभाळिलें संतीं । भय निरसली खंती ॥२॥ कृतकृत्य जालों । इच्छा केली ते पावलों ॥३॥ तुका म्हणे काळ । आतां करूं न शके बळ ॥४॥

१०१६. काय पुण्यराशी । गेल्या भेदूनि आकाशीं ॥१॥ तुम्ही जालेति कृपाळ । माझा केला जी सांभाळ ॥२॥ काय वोळलें संचित । ऐसें नेणों अगणित ॥३॥ तुका म्हणे नेणें । काय केलें नारायणें ॥४॥

१०१७. असे येथेंचि या दिनें । भाग्यहीनें सकळां ॥१॥ भांडवल एवढें गांठी । नाम कंठीं धरियेलें ॥२॥ आणिक तें दुजें कांहीं । मज नाहीं यावरी ॥३॥ तुका म्हणे केला कोणें । एवढा नेणें लौकिक ॥४॥

१०१८. गाय नाचें वाहें टाळी । साधन कळी उत्तम हें ॥१॥ काय जाणों तरले किती । नाव आइती या बैसा ॥२॥ सायासाचें नाहीं काम । घेतां नाम विठोबाचें ॥३॥ तुका म्हणे निर्वाणीचें । शस्त्र साचें हें एक ॥४॥

१०१९. सर्व काळ माझें चित्तीं । हेचि खंती राहिली ॥१॥ बैसलें तें रूप डोळां । वेळोवेळां आठवें ॥२॥ वेव्हाराची सरली मात । अखंडित अनुसंधान ॥३॥ तुका म्हणे

वेध जाला । अंगा आला श्रीरंग ॥४॥

१०२०. जैसें दावी तैसा राहे । तरि कां देव दुरी आहे ॥१॥ दुःख पावायाचें मूळ । राहाणी ठाव नाहीं ताळ ॥२॥ माळामुद्रांवरी । कैंचा सोंगें जोडे हरि ॥३॥ तुका म्हणे देखें । ऐसे परीचीं बहुतेकें ॥४॥

१०२१. अवघा तो शकुन । हृदयीं देवाचें चिंतन ॥१॥ येथें नसतां वियोग । लाभा उणें काय मग ॥२॥ छंद हरिच्या नामाचा । शुचिर्भूत सदा वाचा ॥३॥ तुका म्हणे हरिच्या दासां । शुभ काळ अवघ्या दिशा ॥४॥

१०२२. ब्रह्मरूपाचीं कर्मे ब्रह्मरूप । विरहित संकल्प होती जाती ॥१॥ ठेविलिया दिसे रंगाऐसी शिळा । उपाधि निराळा स्फटिक मणि ॥२॥ नानाभाषामतें आळविता बाळा । प्रबोध तो मूळा जननीठायीं ॥३॥ तुका म्हणे माझें नमन जाणतिया । लागतसें पायां वेळोवेळां ॥४॥

१०२३. नाहीं सुगंधाची लागत लावणी । लावावी ते मनीं शुद्ध होतां ॥१॥ वाऱ्याहातीं माप चाले सज्जनाचें । कीर्ति मुख त्याचें नारायण ॥२॥ प्रभा आणि रवि काय असे आन । उदयीं तंव जन सकळ साक्षी ॥३॥ तुका म्हणे बरा सत्याचा सायास । नवनीता नाश नाहीं पुन्हां ॥४॥

१०२४. तीर्थाटणें एकें तपें हुंबरती । नाथिले धरिती अभिमान ॥१॥ तैसे विष्णुदास नव्हती साबडे । एकाचिया पडे पायां एक ॥२॥ अक्षरें आणिती अंगासी जाणीव । इच्छा ते गौरव पूज्य व्हावें ॥३॥ तुका म्हणे विधिनिषेधाचे डोहीं । पडले त्यां नाहीं देव कधीं ॥४॥

१०२५. पट्टे ढाळूं आम्ही विष्णुदास जगीं । लाहों नेदूं अंगीं पापपुण्य ॥१॥ निर्भर अंतरीं सदासर्वकाळ । घेतला सकळ भार देवें ॥२॥ बळिवंत जेणें रचिलें सकळ । आम्हां त्याचें बळ अंकितासी ॥३॥ तुका म्हणे आम्ही देखतचि नाहीं । देवाविण कांहीं दुसरें तें ॥४॥

१०२६. कथेचा उल्लंघ तो अधमां अधम । नावडे ज्या नाम ओळखा तो ॥१॥ कासया जीऊन जाला भूमीभार । अनउपकार माते कुसी ॥२॥ निद्रेचा आदर जागरणीं वीट । त्याचे पोटीं कीट कुपथ्याचें ॥३॥ तुका म्हणे दोन्हीं बुडविलीं कुळें । ज्याचें तोंड काळें कथेमाजी ॥४॥

१०२७. सांडोनियां दों अक्षरां । काय करूं हा पसारा । विधिनिषेधाचा भारा । तेणें दातारा नातुडसी ॥१॥ म्हणोनि बोबड्या उत्तरीं । वाचे जपें निरंतरीं । नाम तुझें हरी । भवसागरीं तारूं तें ॥२॥ सर्वमय ऐसें वेदाचें वचन । श्रुति गर्जती पुराणें । नाहीं आणीक ध्यान । साधनीं मज चाड ॥३॥ शेवटीं हे ब्रह्मार्पण । याचि मंत्राचें कारण । काना मात्रा वांयांविण । तुका म्हणे बिंदुलीं ॥४॥

१०२८. हरिनामाचें करूनि तारूं । भवसिंधु पार उतरलों ॥१॥ फावलें फावलें आतां । पायीं संतां विनटलों ॥२॥ हरिनामाचा शस्त्र घोडा । संसार गाढा छेदिला ॥३॥ हरिनामाचें धनुष्यकांडें । विन्मुख तोंडें कळिकाळ ॥४॥ येणेंचि बळें सरते आम्ही । हरिचे नामें लोकीं

तिहीं ॥५॥ तुका म्हणे जालों साचे । श्रीविठ्ठलाचे डिंगर ॥६॥

१०२९. नव्हे हें गुरुत्व मेघवृष्टि वाणी । ऐकावी कानीं संतजनीं ॥१॥ आरुष हा शब्द देवाचा प्रसाद । करविला वाद तैसा केला ॥२॥देहपिंड दान दिला एकसरें । मुळिंचें तें खरें टांकसाळ ॥३॥ तुका म्हणे झरा लागला नवनीत । सेविलीया हित पोट धाय ॥४॥

१०३०. घटीं अलिप्त असे रवि । अग्नि काष्ठामाजी जेवीं । तैसा नारायण जीवीं । जीवसाक्षी वर्तनें ॥१॥ भोग ज्याचे तया अंगीं । भिन्न प्रारब्ध जगीं । विचित्र ये रंगीं । रंगें रंगला गोसावी ॥२॥ देह संकल्पासारिखें । एकएकांसी पारिखें । सुख आणि दु:खें । अंगीं कर्में त्रिविध ॥३॥ तुका म्हणे कोडें । नकळे तयासी सांकडें । त्याचिया निवाडें । उगवे केलें विंदान ॥४॥

१०३१. सद्गदित कंठ दाटो । येणें फुटो हृदय ॥१॥ चिंतनाचा एक लाहो । तुमच्या अहो विठ्ठला ॥२॥ नेत्रीं जळ वाहों सदा । आनंदाचे रोमांच ॥३॥ तुका म्हणे कृपादान । इच्छी मन हे जोडी ॥४॥

१०३२. जेथें देखें तेथें उभा । अवघ्या गगनाचा गाभा ॥१॥ डोळां बैसलें बैसलें । ध्यान राहोनि संचलें ॥२॥ सरसावलें मन । केले सोज्ज्वळ लोचन ॥३॥ तुका म्हणे सवें । आतां असिजेत देवें ॥४॥

१०३३. ताहाने तहान प्याली । भूक भुकेनें खादली ॥१॥ जेथें तेंच नाहीं झालें । झाडा घेतला विठ्ठलें ॥२॥ वास वासनेची नाहीं । मन पांगुळलें पायीं ॥३॥ शेष उरला तुका । जीवी जीवा जाला चुका ॥४॥

१०३४. पाणिमात्र दिगंबरा । हस्त करा सारिखे ॥१॥ आवश्यक देव मनीं । चिंतनींच सादर ॥२॥ भिक्षा कामधेनु ऐशी । अवकाशीं शयन ॥३॥ पांघरोनि तुका दिशा । केला वास अलक्षीं ॥४॥

१०३५. विषयीं विसर पडिला नि:शेष । अंगीं ब्रह्मरस ठसावला ॥१॥ माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे ॥२॥ लाभाचिया सोसें पुढें चाली मना । धनाचा कृपणा लोभ जैसा ॥३॥ तुका म्हणे गंगासागरसंगमीं । अवघ्या जाल्या ऊर्मि एकमय ॥४॥

१०२६. राम कृष्ण नाम मांडीं पां वोळी । तेणें होईल होळी पापा धुनी ॥१॥ ऐसा मना छंद लावीं रे अभ्यास । जया नाहीं नास ब्रह्मरसा ॥२॥ जोडी तरी ऐसी करावी न सरे । पुढें आस उरे मागुताली ॥३॥ तुका म्हणे ऐसें धरा कांहीं मनीं । यातायाती खाणीं चुकतील ॥४॥

१०३७. परमार्थी तो न म्हणावा आपुला । सलगी धाकुला हेळूं नये ॥१॥ थोडासि स्फुलिंग बहुत दावाग्नि । वाढतां इंधनीं वाढविला ॥२॥ पितियानें तैसा वंदावा कुमर । जयाचें अंतर देव वसे ॥३॥ तुका म्हणे शिरीं वाहावें खापर । माजी असे सार नवनीत ॥४॥

१०३८. ऐसा ज्याचा अनुभव । विश्व देव सत्यत्वें ॥१॥ देव तया जवळी असे । पाप नासे दर्शनें ॥२॥ कामक्रोधा नाहीं चाली । भूतीं जाली समता ॥३॥ तुका म्हणे भेदाभेद । गेला वाद खंडोनि ॥४॥

१०३९. सेवा ते आवडी उच्चारावे नाम । भेदाभेद काम निवारूनि ॥१॥ नलगे हालावें चालावें बाहेरी । अवघेंचि घरीं बैसलिया ॥२॥ देवाचीच नामें देवाचिये शिरीं । सर्व अळंकारीं समर्पावीं ॥३॥ तुका म्हणे होय भावेंचि संतोषी । वसे नामापाशीं आपुलिया ॥४॥

१०४०. ज्ञानियांचे घरीं चोजवितां देव । तेथें अहंभाव पाठीलागे ॥१॥ म्हणोनि अवघे सांडिले उपाय । धरियेले पाय दृढ तुझे ॥२॥ वेदपरायण पंडित वाचक । न मिळती एक एकामधीं ॥३॥ पाहों गेलों भाव कैसी आत्मनिष्ठा । तेथें देखें चेष्टा विपरीत ॥४॥ आपुलिया नाहीं निवाले जे अंगें । योगी करती रागें गुरगुरु ॥५॥ तुका म्हणे मज कोणाचा पांगिला । नको बा विठ्ठला करूं आतां ॥६॥

१०४१. पंढरीची वाट पाहें निरंतर । निढळावरी कर ठेवूनियां ॥१॥ जातियां निरोप पाठवीं माहेरा । कां मज सासुरा सांडियेलें ॥२॥ पैल कोण दिसे गरुडाचे वारिकें । विठ्ठलासारिकें चतुर्भुज ॥३॥ तुका म्हणे धीर नाहीं माझ्या जीवा । भेटसी केधवां पांडुरंगा ॥४॥

१०४२. ऐसी जोडी करा राम कंठीं धरा । जेणें चुके फेरा गर्भवास ॥१॥ नासिवंत आटी प्रियापुत्रधन । बीज ज्याचा सीण तेंचि फळ ॥२॥ नाव धड करा सहस्त्र नामांची । जे भवसिंधूची थडी पावे ॥३॥ तुका म्हणे काळा हाणा तोंडावरी । भाता भरा हरिरामबाणीं ॥४॥

१०४३. पाहें मजकडे भरोनियां दृष्टी । बहुत हिंपुटी जालों माते ॥१॥ करावेंसें वाटे जीवा स्तनपान । नव्हे हें वचन शृंगारिक ॥२॥ सत्यासाठी माझी शब्दविवंचना । जोडिल्या वचनाचें तें नव्हे ॥३॥ तुका म्हणे माझी कळवळ्याची कींव । भागलासे जीव कर्तव्यानें ॥४॥

१०४४. तुज म्हणतील कृपेचा सागर । तरि कां केला धीर पांडुरंगा ॥१॥ आझुनि कां नये तुज माझी दया । काय देवराया पाहातोसि ॥२॥ आळवितों जैसें पाडस कुरंगिणी । पीडिलिया वनीं तहानभूकें ॥३॥ प्रेमरसपान्हा पाजीं माझे आई । धांवे वो विठाई वोरसोनि ॥४॥ तुका म्हणे माझें कोण हरिल दुःख । तुजविण एक पांडुरंगा ॥५॥

१०४५. भक्ति तों कठिण शुळावरिल पोळी । निवडे तो बळी विरळा शूर ॥१॥ जेथें पाहें तेथें देखीचा पर्वत । पायाविण भिंत तांतडीची ॥२॥ कामावलें तरि पाका ओज घडे । रुचि आणि जोडे श्लाघ्यता हे ॥३॥ तुका म्हणे मना पाहिजे अंकुश । नित्य नवा दिस जागृतीचा ॥४॥

१०४६. पापी म्हणों तरि आठवितों पाय । दोष बळी काय तयाहूनि ॥१॥ ऐशा विचाराचे घालूनि कोंडणीं । काय चक्रपाणी निजलेती ॥२॥ एक वेळ जेणें पुत्राच्या उद्देशें । घेतल्याचें

कैसें नेलें दुःख ॥३॥ तुका म्हणे अहो वैकुंठनायका। चिंता कां सेवका तुमचिया ॥४॥

१०४७. उगविल्या गुंती । ऐशा मागें नेणों किती ॥१॥ ख्याती केली अजामेळें । होतें निघालें दिवाळें ॥२॥ मोकलिला प्रायश्चित्ती । कोणी न धरिती हातीं ॥३॥ तुका म्हणे मुक्त वाट । वैकुंठींची घडघडाट ॥४॥

१०४८. सरळीं हीं नामें उच्चारावीं सदा । हरि बा गोविंदा रामकृष्ण ॥१॥ पुण्य पर्वकाळ तीर्थेंही सकळ । कथा सिंधुजळ न्हाऊं येती ॥२॥ अवघेचि लाभ बैसलिया घरा । येती भाव धरा एके ठायीं ॥३॥ शेळ्या मेंढ्या गाई सेवा घेती म्हैसी । कामधेनु तैसी नव्हे एक ॥४॥ तुका म्हणे सुखें पाविजे अनंता । हें वर्म जाणतां सुलभचि ॥५॥

१०४९. पवित्र तो देह वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्वकाळ ॥१॥ तयाच्या चिंतनें तरतील दोषी । जळतील रासी पातकांच्या ॥२॥ देव इच्छी रज चरणींची माती । धांवत चालती मागें मागें ॥३॥ काय त्यां उरलें वेगळें आणीक । वैकुंठनायक जयां कंठीं ॥४॥ तुका म्हणे देवभक्तांचा संगम । तेथें ओघ नाम त्रिवेणीचा ॥५॥

१०५०. पाप ताप दैन्य जाय उठाउठी । जालिया भेटी हरिदासांची ॥१॥ ऐसें बळ नाहीं आणिकाचे अंगीं । तप तीर्थ जगीं दान व्रत ॥२॥ चरणींचें रज बंदी शूळपाणी । नाचती कीर्तनीं त्याचे माथां ॥३॥ भव तरावया उत्तम हे नाव । भिजों नेदी पाव हात कांहीं ॥४॥ तुका म्हणे मना जालें समाधान । देखिल्या चरण वैष्णवांचे ॥५॥

१०५१. येणें बोधें आम्ही असों सर्वकाळ । करूं हे निर्मळ हरिकथा ॥१॥ आम्ही भूमीवरी एक दैवाचें । निदान हें वाचे सांपडलें ॥२॥ तरतील कुळें दोन्ही उभयतां । गातां आइकतां सुखरूप ॥३॥ न चळे हा मंत्र न म्हणें यातीकुळ । नलगे काळ वेळ विचारावी ॥४॥ तुका म्हणे माझा विठ्ठल विसांवा । सांठविला हांवा हृदयांत ॥५॥

१०५२. बहुतां जन्मींचें संचित । सबळ होय जरि बहुत । तरिचि होय हरिभक्त । कृपावंत मानसीं ॥१॥ म्हणवी म्हणियासा तयाचा । दास आपुल्या दासांचा । अनुसरले वाचा । काया मनें विठ्ठलीं ॥२॥ असे भूतदया मानसीं । अवघा देखें हृषीकेशी । जीवें न विसंबे त्यासी । मागें मागें हिंडतसे ॥३॥ तुका म्हणे निर्विकार । शरणागतां वज्रपंजर । जे जे अनुसरले नर । तयां जन्म चुकलें ॥४॥

१०५३. तारूं लागलें बंदरीं । चंद्रभागेचिये तिरीं ॥१॥ लुटा लुटा संतजन । अमुप हें रासी धन ॥२॥ जाला हरिनामाचा तारा । सीड लागलें फरारा ॥३॥ तुका जवळी हमाल । भार चालवी विठ्ठल ॥४॥

१०५४. आळवीन स्वरें । कैशा मधुरा उत्तरें ॥१॥ ये वो ये वो पांडुरंगे । प्रेमपान्हा मज दे गे

॥२॥ पसरूनि चोंची। वचनें हीं करुणेचीं ॥३॥ तुका म्हणे बळी। आम्ही लडिवाळें आळीं ॥४॥

१०५५. सकळिकांचें समाधान । नव्हे देखिल्यावांचून ॥१॥ रूप दाखवीं रे आतां । सहस्त्रभुजांच्या मंडिता ॥२॥ शंखचक्रपद्मगदा । गरुडासहित ये गोविंदा ॥३॥ तुका म्हणे कान्हा । भूक लागली नयनां ॥४॥

१०५६. पतितपावना। दीनानाथा नारायणा ॥१॥ तुझें रूप माझे मनीं। राहो नाम जपो वाणी ॥२॥ ब्रह्मांडनायका। विश्वजनाच्या पाळका ॥३॥ जीवींचिया जीवा। तुका म्हणे देवदेवा ॥४॥

१०५७. करीं हेंचि काम। मन जपे राम राम ॥१॥ लागो हाचि छंद। मना गोविंद गोविंद ॥२॥ तुका म्हणे मना। मज भीक द्यावी दीना ॥३॥

१०५८. आपुलिया लाजा । धांवे भक्ताचिया काजा ॥१॥ नाम धरिलें दीनानाथ । सत्य करावया व्रत ॥२॥ घात आघात निवारी । छाया पीतांबर करी ॥३॥ उभा कर कटीं । तुका म्हणे याजसाठीं ॥४॥

१०५९. साधावया भक्तिकाज । नाहीं लाज धरीत ॥१॥ ऐसियासी शरण जावें । शक्ती जीवें न वंची ॥२॥ भीष्मपण केला खरा । धनुर्धरा रक्षीलें ॥३॥ तुका म्हणे साक्ष हातीं । तो म्यां चित्तीं धरियेला ॥४॥

१०६०. धेनु चरे वनांतरीं। चित्त बाळकापें घरीं ॥१॥ तैसें करीं वो माझे आई। ठाव देउनि राखें पायीं ॥२॥ काढितां तळमळी । जिवनाबाहेरी मासोळी ॥३॥ तुका म्हणे कुडी । जीवप्राणांची आवडी ॥४॥

१०६१. हरिजनाची कोणा घडावी न निंदा । साहात गोविंदा नाहीं त्याचें ॥१॥ रूपा येऊनियां धरी अवतार। भक्तां अभयकर खळां कष्ट ॥२॥ दुर्वास हा छळूं आला आंबऋषी। सुदर्शन त्यासां जाळित फिरे ॥३॥ द्रौपदीच्या क्षोभें कौरवांची शांति। होऊनि श्रीपति साह्य केली ॥४॥ न साहेचि बभ्रु पांडवां पारिखा। दुराविला सखा बळिभद्र ॥५॥ तुका म्हणे अंगीं राखिली दुर्गंधि। अश्वत्थामा वधी पांडवपुत्रां ॥६॥

१०६२. ज्यासी आवडी हरिनामाची। तोचि एक बहु शुचि ॥१॥ जपे हरिनाम बीज। तोचि वर्णांमाजी द्विज ॥२॥ तुका म्हणे वर्ण धर्म। अवघे आहे सम ब्रह्म ॥३॥

१०६३. विठ्ठल हा चित्तीं । गोड लागे गातां गीतीं ॥१॥ आम्हां विठ्ठल जीवन । टाळ चिपुळिया धन ॥२॥ विठ्ठल विठ्ठल वाणी । अमृत हे संजीविनी ॥३॥ रंगला या रंगें । तुका विठ्ठल सर्वांगें ॥४॥

१०६४. विठ्ठल विठ्ठल मंत्र सोपा । करी पापा निर्मूळ ॥१॥ भाग्यवंता छंद मनीं । कोड कानीं ऐकती ॥२॥ विठ्ठल हें दैवत भोळें । चाड काळें न धरावी ॥३॥ तुका म्हणे

भलते याती । विठ्ठल चित्तीं तो धन्य ॥४॥

१०६५. म्हणे विठ्ठल ब्रह्म नव्हे । त्याचे बोल नाइकावे ॥१॥ मग तो हो का कोणी एक । आदि करोनि ब्रह्मादिक ॥२॥ नाहीं विठ्ठल जया ठावा । तोही डोळां न पहावा ॥३॥ तुका म्हणे नाही । त्याची भीड मज कांहीं ॥४॥

१०६६. एक पाहातसां एकाचीं दहनें । सावध त्या गुणें कां रे नव्हा ॥१॥ मारा हाक देवा भय अट्टाहासें । जंव काळाऐसें जालें नाहीं ॥२॥ मरणाची तंव गांठोडी पदरीं । जिणें तोचिवरी माप भरे ॥३॥ तुका म्हणे धिग वाहती मारग । अंगा आले मग हालों नेदी ॥४॥

१०६७. संतांसी तों नाहीं सन्मानाची चाड । परि पडे द्वाड अव्हेरि तों ॥१॥ म्हणऊनि तया न वजावें ठाया । होतसे घात या दुर्बळाचा ॥२॥ भावहीना आड येतसे आशंका । उचितासी चुका घालावया ॥३॥ तुका म्हणे जया संकोच दर्शनें । तया ठाया जाणें अनुचित ॥४॥

१०६८. संसारसंगें परमार्थ जोडे । ऐसें काय घडे जाणतेनो ॥१॥ हेंडग्याच्या आळां अवघीं चिपाडें । काय तेथें गोडें निवडावीं ॥२॥ ढेकणाचे बाजे सुखाची कल्पना । मूर्खत्व वचना येऊं पाहे ॥३॥ तुका म्हणे मद्य सांडवी लंगोटी । सांगितला शेवटीं विचार त्या ॥४॥

१०६९. पंढरिये माझें माहेर साजणी । ओविया कांडणी गाऊं गीती ॥१॥ राही रखुमाई सत्यभामा माता । पांडुरंग पिता माहियेर ॥२॥ उद्धव अक्रूर व्यास आंबऋषि । भाई नारदासी गौरवीन ॥३॥ गरुड बंधु लडिवाळ पुंडलीक । यांचे कवतुक वाटे मज ॥४॥ मज बहु गोत संत आणि महंत । नित्य आठवीत ओवियेसी ॥५॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपान चांगया । जिवलगा माझिया नामदेवा ॥६॥ नागो जगमित्रा नरहरि सोनारा । रोहिदास कबिरा सोईरिया ॥७॥ परिसा भागवता सुरदास सांवता । गाईन नेणतां सकळिकांसी ॥८॥ चोखामेळा संत जिवाचे सोईरे । न पडे विसर यांचा घडी ॥९॥ जीवींच्या जीवना एका जनार्दना । पाठक हा कान्हा मिराबाई ॥१०॥ आणीकही संत महानुभाव मुनि । सकळां चरणीं जीव माझा ॥११॥ आनंदें ओविया गाईन मी त्यांसी । जाती पंढरीसी वारकरी ॥१२॥ तुका म्हणे माझा बळिया बापमाय । हर्षें नांदे सये घराचारी ॥१३॥

१०७०. जातीचें तें चढे प्रेम । पक्षी स्मरे राम राम ॥१॥ ते काय गुण लागती येरां । कागा न शोभे पिंजरा ॥२॥ शिकविलें तें सुजात सोसी । मग मोल चढे त्यासी ॥३॥ तुका म्हणे वेषधारी । हिजड्या नव्हती त्या नारी ॥४॥

१०७१. बसणें थिल्लरीं । बेडुक सागरा धिक्कारी ॥१॥ नाहीं देखिला ना ठावा । तोंडपिटी करी हांवा ॥२॥ फुगतें काउळें । म्हणे मी राजहंसा आगळें ॥३॥ गजाहूनि खर । म्हणे चांगला मी फार ॥४॥ मुलाम्याचें नाणें । तुका म्हणे नव्हे सोनें ॥५॥

१०७२. मुक्त होता परि बळें जाला बद्ध । घेउनियां छंद माझें माझें ॥१॥ पाप पुण्य अंगीं घेतलें जडून । वर्म नेणे कोण करिता तो ॥२॥ तुका म्हणे गेलें व्यर्थ वायांविण । जैसा मृग सीण मृगजळीं ॥३॥

१०७३. वरतें करोनियां तोंड । हाका मारितो प्रचंड ॥१॥ राग आळवितो नाना । गातो काय तें कळेना ॥२॥ आशा धरोनि मनीं । कांहीं देईल म्हणऊनि ॥३॥ पोटा एका साठीं । तुका म्हणे जाले कष्टी ॥४॥

१०७४. जाळी महाकर्मे । दावी निजसुखवर्मे ॥१॥ ऐसें कळलें आम्हां एक । झालों नामाचे धारक ॥२॥ तपाचे सायास । नलगे घेणें वनवास ॥३॥ तुका म्हणे येणें । कळिकाळ हें ठेंगणें ॥४॥

१०७५. ये हरि मज कृपा देईं दान । नासीं तिमिर दाखवीं चरण । आर्त पुरवावें भेटी देऊन । नको उपेक्षूं आलिया शरण ॥१॥ कामक्रोध अहंकार नको देहीं । आशा तृष्णा माया लज्जा चिंता कांहीं । वास पंढरीचा जन्म सदा देईं । आणीक दुजें मागणें तुज नाहीं ॥२॥ नाम अखंड हृदयीं राहो वाणी । न पडो विसर क्षण जागृतिं स्वप्नीं । संतसमागम ऐसा दे लावुनि । आणीक दुजें कांहीं नेणें तुजवांचूनि ॥३॥ पंथपुरिंचा रविसुत पुरे आतां । आड करावा भवसिंधु ऐसा नव्हता । नाहीं अडथळा त्रैलोक्यामाजी सरता । विनवी तुकयाबंधु चरणीं ठेवूनि माथा ॥४॥

१०७६. तट्टाचे जातीला नाहीं भीड भार । लाता मारी थोर लहान नेणे ॥१॥ परी तो विषेश मनुष्य होऊन । करी खंड मान वडिलांचा ॥२॥ बेरसा गाढव माय ना बहिण । भुंके चवीविण भलतेंचि ॥३॥ तुकयाबंधु म्हणे बोकड मातले । न विचारितां आपुलें तोंडीं मुते ॥४॥

१०७७. मायझवा खर गाढवाचें बीज । तें ऐसें सहज कळों येतें ॥१॥ अपमानिलें जेणें श्रेष्ठांचे वचन । तेचि त्याची खूण ओळखावी ॥२॥ मद्यपी तो पुरा अधम जातीचा । तया उपदेशाचा राग वांयां ॥३॥ तुकयाबंधु म्हणे पिसाळलें सुनें । आप पर तेणें न विचारावें ॥४॥

१०७८. मत्स्यकूर्मशेषा कोणाचा आधार । पृथिवीचा भार वाहावया ॥१॥ काय धाक आम्हां कासयाची चिंता । ऐसा तो असतां साहाकारी ॥२॥ शंखचक्रगदा आयुधें अपार । वागवितो भार भक्तांसाठीं ॥३॥ पांडवां जोहरी राखिलें कुसरी । तो हा बंधुचा कैवारी तुकयाच्या ॥४॥

१०७९. राम म्हणतां कामक्रोधाचें दहन । होय अभिमान देशधडी ॥१॥ राम म्हणतां कर्म तुटेल भवबंधन । नये श्रम सीण स्वप्नासही ॥२॥ राम म्हणतां जन्म नाहीं गर्भवास । नव्हे दारिद्रास पात्र कधीं ॥३॥ राम म्हणतां यम शरणागत बापुडें । अढळपद पुढें काय तेथे ॥४॥ राम म्हणतां धर्म घडती सकळ । तिमिरपडळ नासे हेळा ॥५॥ राम म्हणतां म्हणे

तुकयाचा बंधु । तरिजेल भवसिंधु संदेह नाहीं ॥६॥

१०८०. मरोनि जाईन गुणनामावरूनि । तुझ्या चक्रपाणी मायबापा ॥१॥ चुकविली दु:खें मायेचा वोळसा । तोडोनियां आशापाश तेणें ॥२॥ केली काया तनु हिंवसी शीतळ । चिंता तळमळ नाहीं ऐसी ॥३॥ काळें तोंड काळ करूनि राहिलें । भूतमात्र जालें सज्जनसखें ॥४॥ तुकयाबंधु म्हणे अवघ्या दशदिशा । मुक्त रे परेशा तुझ्या पुण्यें ॥५॥

१०८१. आतां मागतों तें ऐका नारायणा । भावपूर्वक मनापासूनियां ॥१॥ असों दे मोकळी जिव्हा जरि गाइल गुण । नाहीं तरी खिळून टाकीं परती ॥।२॥ मातेचिया परी देखती परनारी । ठेवीं नेत्र तरी नाहीं तरि नको ॥३॥ तरी बरें कंटाळा करिती निंदास्तुतीचा । नाहीं तरि कानांचाही देखे प्रयत्न ॥४॥ सकळ इंद्रियांचा निग्रह करूनि एक । राखावीं पृथक तोडोनि भ्रम ॥५॥ तुकयाबंधु म्हणे तेचि वाट प्राणां । पडतां नारायणा विसर तुझा ॥६॥

१०८२. नमस्कारी भूतें विसरोनि याती । तेणें आत्मस्थिति जाणीतली ॥१॥ परउपकारीं वेचियेल्या शक्ति । तेणें आत्मस्थिति जाणितली ॥२॥ द्वैताद्वैत भाव नाहीं जया चित्तीं । तेणें आत्मस्थिती जाणितली ॥३॥ जयाचिये वाचे नये निंदास्तुती । तेणें आत्मस्थिती जाणितली ॥४॥ उचित अनुचित जाणे धर्मनीती । दृढ भाव भक्ति मानव तो ॥५॥ तुकयाबंधु म्हणे वरकड ते येर । संसाराचे खर भारवाही ॥६॥

१०८३. चवदा भुवनें लोक तिन्ही दाढे जो कवळी । संपुट तो संबळीमध्यें देखा ॥१॥ उत्पत्तिसंहार करिता जो पाळण । तो नंदा नंदन म्हणवीतसे ॥२॥ असूर तोडरी दैत्यांचा काळ । जाला द्वारपाळ बळीचा तो ॥३॥ लक्ष्मीचा स्वामी क्षीराच्या सागरा । उच्छिष्ट कवळा पसरी मुख ॥४॥ तुकयाबंधु म्हणे चतुरांचा रावो । भावें तों पाहा हो केला वेडा ॥५॥

१०८४. कोण या पुरुषार्थाची गति । आणियेला हातोहातीं । जाहाज पृथवीपति । केली ख्याति अद्भुत ॥१॥ भला पुंडलिका भला । महिमा नव जाय वर्णिला । दगा देऊनि अवघियांला । सांठविलें अविनाश ॥२॥ केलें एके घरीं केणें । भरलीं सदोदित दुकानें । दुमदुमिलीं सुखानें । हे भाग्याची पंढरी ॥३॥ तुकयाबंधु म्हणे किल्ल्या । संतांचे हातीं दिल्या । आंगावेगळें आपुल्या । टाकुनि जाला मेहेमान ॥४॥

१०८५. केली हार्णाळां अंघोळी । येऊनि बैसलों राउळीं ॥१॥ अजिचें जालें भोजन । राम कृष्ण नारायण ॥२॥ तुकयाबंधु म्हणे नास । नाहीं कल्पांतीं जयास ॥३॥

१०८६. तुजलागीं माझा जीव झाला पिसा । अवलोकितों दिशा पांडुरंगा ॥१॥ सांडिला व्यवहार माया लोकाचार । छंद निरंतर हाचि मनीं ॥२॥ आइकिलें कानीं तें रूप लोचन । देखावया सीण करिताती ॥३॥ प्राण हा विकळ होय कासावीस । जिवनाविण मत्स्य तयापरी

॥४॥ तुका म्हणे आतां कोणता उपाव । करूं तुझे पाव आतुडे तो ॥५॥

१०८७. कोणे गांवीं आहे सांगा हा विठ्ठल । जरी ठावा असेल तुम्हां कोणा ॥१॥ लागतसें पायां येतों लोटांगणीं । मात तरी कोणी सांगा याची ॥२॥ गुण रूप याचे वर्णितां या संतां । मज क्षेम देतां सुख वाटे ॥३॥ सर्वस्वें हा जीव ठेवीन चरणीं । पांडुरंग कोणी दावी तया ॥४॥ तुका म्हणे गाईवत्सा तडातोडी । तैसी जाते घडी एकी मज ॥५॥

१०८८. विठ्ठल माझा जीव विठ्ठल माझा भाव । कुळधर्म देव विठ्ठल माझा ॥१॥ विठ्ठल माझा गुरु विठ्ठल माझा तारूं । उतरील पारू भवनदीचा ॥२॥ विठ्ठल माझी माता विठ्ठल माझा पिता । विठ्ठल चुलता बहिणी बंधु ॥३॥ विठ्ठल हें जन विठ्ठल माझें मन । सोइरा सज्जन विठ्ठल माझा ॥४॥ तुका म्हणे माझा विठ्ठल विसावा । नस्वरित गावा जाइन त्याच्या ॥५॥

१०८९. एकाचिये सोई कवित्वाचे बांधे । बांधिलिया साधे काय तेथें ॥१॥ काय हातीं लागे भुसाचे कांडणीं । सत्यासि दाटणी करुनि काय ॥२॥ कवित्वाचे रूढी पायां पडे जग । सुखावोनि मग नरका जाय ॥३॥ तुका म्हणे देव केल्याविण साहे । फजिती ते आहे लटिक्या अंगीं ॥४॥

१०९०. भल्याचें दर्शन । तेथें शुभचि वचन ॥१॥ बोलावी हे धर्मनीत । शोभे होत नाहीं हित ॥२॥ मर्यादा ते बरी । वेळ जाणावी चतुरीं ॥३॥ तुका म्हणे बहु । लागे ऐसें बरें मऊ ॥४॥

१०९१. आवडीनें धरिलीं नांवें । प्रियभावें चिंतन ॥१॥ वेडा जाला वेडा जाला । लांचावला भक्तीसी ॥२॥ निचाड हा चाड धरी । तुळसी करीं दळ मागें ॥३॥ धरिला मग न करी बळ । तुका म्हणे कळ पायीं ॥४॥

१०९२. कंठीं राहो नाम । अंगीं भरोनियां प्रेम ॥१॥ ऐसें द्यावें कांहीं दान । आलों पतित शरण ॥२॥ संतांचिये पायीं । ठेवी वेळोवेळां डोई ॥३॥ तुका म्हणे तरे । भवसिंधु एकसरें ॥४॥

१०९३. विठ्ठल विठ्ठल येणें छंदें । ब्रह्मानंदें गर्जावें ॥१॥ वाये टाळ टाळ्या ठाळीं । होइल होळी विघ्नांची ॥२॥ विठ्ठल आदि अवसानीं । विठ्ठल मनीं स्मरावा ॥३॥ तुका म्हणे विठ्ठलवाणी । वदा कानीं आईका ॥४॥

१०९४. पंढरीचे वारकरी । ते अधिकारी मोक्षाचे ॥१॥ पुंडलिका दिला वर । करुणाकरें विठ्ठलें ॥२॥ मूढ पापी जैसे तैसे । उतरी कासे लावूनि ॥३॥ तुका म्हणे खरें जालें । एका बोलें संताच्या ॥४॥

१०९५. अमृताचीं फळें अमृताची वेली । तेचि पुढें चाली बीजाचीही ॥१॥ ऐसियांचा संग देईं नारायणा । वोलावा वचना जयाचिया ॥२॥ उत्तम सेवन सीतळ कंठासी । पुष्ट कांती तैसी दिसे वरी ॥३॥ तुका म्हणे तैसें होईजेत संगें । वास लागे अंगें चंदनाच्या ॥४॥

१०९६. पंढरीसी जा रे आलेनो संसारा । दीनाचा सोयरा पांडुरंग ॥१॥ वाट पाहे उभा भेटीची आवडी । कृपाळु तांतडी उतावीळ ॥२॥ मागील परिहार पुढें नाहीं सीण । जालिया दर्शन एकवेळ ॥३॥ तुका म्हणे नेदी आणिकांचे हातीं । बैसला तो चित्तीं निवडेना ॥४॥

१०९७. न कळे तें कळों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥१॥ न दिसे तें दिसों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥२॥ न बोलों ते बोलों येईल उगलें । नामें या विठ्ठल एकाचिया ॥३॥ न भेटे तें भेटों येईल आपण । करिता चिंतन विठोबाचें ॥४॥ अलभ्य तो लाभ होईल अपार । नाम निरंतर म्हणतां वाचे ॥५॥ तुका म्हणे जीव आसक्त सर्वभावें । तरतील नांवें विठोबाच्या ॥६॥

१०९८. बहुजन्मीं केला लाग । तो हा भाग लाधलों ॥१॥ जीव देईन हा बळी । करीन होळी संसारा ॥२॥ गेलें मग नये हातां । पुढती चिंता वाटतसे ॥३॥ तुका म्हणे तांतड करूं । पाय धरूं बळकट ॥४॥

१०९९. भक्तिप्रेमसुख नेणवे आणिकां । पंडित वाचकां ज्ञानियांसी ॥१॥ आत्मनिष्ठ जरी जाले जीवन्मुक्त । तरी भक्तिसुख दुर्लभ त्यां ॥२॥ तुका म्हणे कृपा करिल नारायण । तरीच हें वर्म पडे ठायीं ॥३॥

११००. दुधाळ गाढवी जरी जाली पाहें । पावेल ते काय धेनुसरी ॥१॥ कागाचिया गळां पुष्पांचिया माळा । हंसाचि तो कळा काय जाणे ॥२॥ मर्कटें अंघोळी लावियेले टिळे । ब्राह्मणाचे लीळे वर्तूं नेणे ॥३॥ जरी तो ब्राह्मण जाला कर्मभ्रष्ट । तुका म्हणे श्रेष्ठ तिहीं लोकीं ॥४॥

११०१. देव भक्तालागीं करूं नेदी संसार । अंगे वारावार करोनि ठेवी ॥१॥ भाग्य द्यावें तरी अंगीं भरे ताठा । म्हणोनि करंटा करोनि ठेवी ॥२॥ स्त्री द्यावी गुणवंती तीपें गुंते आशा । यालागीं कर्कशा करूनि ठेवी ॥३॥ तुका म्हणे साक्ष मज आली देखा । आणीक या लोकां काय सांगों ॥४॥

११०२. वाघें उपदेशिला कोल्हा । सुखें खाऊं द्यावें मला ॥१॥ अंतीं मरसी तें न चुके । मजही मारितोसि भुके ॥२॥ येरू म्हणे भला भला । निवाड तुझ्या तोंडें जाला ॥३॥ देह तों जाणार । घडेल हा परउपकार ॥४॥ येरू म्हणे मनीं । ऐसें जावें समजोनि ॥५॥ गांठी पडली ठका ठका । त्याचे वर्म जाणे तुका ॥६॥

११०३. जेथें आठवती स्वामीचे ते पाय । उत्तम ते ठाय रम्य स्थळ ॥१॥ रान अथवा घर एकांत लोकांत । समाधान चित्त ते ते घडी ॥२॥ धन्य तो हा काळ सरे आनंदरूप । वाहातां संकल्प गोविंदाचे ॥३॥ तुका म्हणे लाभकाळ तेंचि जिणें । भाग्य नारायण उत्तम तें ॥४॥

११०४. तुज न भें मी कळिकाळा । मज नामाचा जिव्हाळा ॥१॥ माझा बळिया नेणसी

कोण । संतां साहे नारायण ॥२॥ शंख वधिला सागरीं । वेद घेउनि आला चारी ॥३॥ कूर्मे दैत्य वधिला जेठी । हात पाय लपवी पोटीं ॥४॥ वाराहरूप धरिलें गाढें । धरा प्रतापें धरिली दाढे ॥५॥ हिरण्यकश्यप विदारिला । भक्त प्रल्हाद रक्षिला ॥६॥ वामन जाला दीनानाथ । बळी पाताळीं घातला दैत्य ॥७॥ छेदुनियां सहस्त्र भुजा । कामधेनु आणिली वोजा ॥८॥ शिळा प्रतापें सागरीं तारी । स्थापी बिभीषण रावण मारी ॥९॥ मारोनियां कंसराव । पिता सोडविला वसुदेव ॥१०॥ पांचाळीसी गांजितां वैरी । वस्त्रें आपण जाला हरी ॥११॥ गजेंद्र स्मरे राम राम । त्यासी पाववी वैकुंठधाम ॥१२॥ तुका म्हणे हरिरूप जाले । पुन्हा जन्मा नाहीं आले ॥१३॥

११०५. सर्वां भूतीं द्यावें अन्न । द्रव्य पात्र विचारोन । उपतिष्ठे कारण । तेथें बीज पेरीजे ॥१॥ पुण्य करितां होय पाप । दुग्ध पाजोनि पोशिला साप । करोनि अघोर जप । दुःख विकत घेतलें ॥२॥ भूमी पाहातां नाहीं वेगळी । माळ बरड एक काळी । उत्तम निराळी । मध्यम आणि कनिष्ठ ॥३॥ म्हणोनि विवेकें । कांहीं करणें तें निकें । तुका म्हणे फिकें । रुची नेदी मिष्टान्न ॥४॥

११०६. देवावरी भार । वृत्ति अयाचित सार ॥१॥ देह देवाचे सांभाळी । सार योजे यथाकाळीं ॥२॥ विश्वासी निर्धार । विस्तारला विश्वंभर ॥३॥ तुका म्हणे व्हावें । बळ एकचि जाणावें ॥४॥

११०७. वर्ततां बासर । काय करावें शरीर ॥१॥ ठेवा नेमून नेमून । माझें तुमचे पायीं मन ॥२॥ नेदाविया वृत्ती । कोठें फांकोजी श्रीपती ॥३॥ तुका म्हणे भले । जन्मा येउनियां ज्याले ॥४॥

११०८. केली प्रज्ञा मनाशीं । तईं मी दान सत्यत्वेशीं । नेईन पायांपाशीं । स्वामी मूळ पंढरिये ॥१॥ तोंवरीं हें भरीं पोट । केला तो मिथ्या बोभाट । नाहीं सांपडली वाट । सइराट फिरतसें ॥२॥ ज्यावें आदराचें जिणें । स्वामी कृपा करी तेणें । पाळिल्या वचनें । सख्यत्वाचा अनुभव ॥३॥ घडे तैसें घडो आतां । मायबापाची सत्ता । तुका म्हणे चिंता । काय पाहें मारगा ॥४॥

११०९. नेत्र झांकोनियां काय जपतोसी । जंव नाहीं मानसीं प्रेमभाव ॥१॥ उघडा मंत्र जाणा राम कृष्ण म्हणा । तुटती यातना गर्भवास ॥२॥ मंत्र यंत्र कांहीं करिसी बुट बुटी । तेणें भूतसृष्टी पावशील ॥३॥ सार तुका जपे बीजमंत्र एक । भवसिंधुतारक रामकृष्ण ॥४॥

१११०. संत मारगीं चालती । त्यांची लागो मज माती ॥१॥ काय करावीं साधनें । काय एक नव्हे तेणें ॥२॥ शेष घेईन उच्छिष्ट । धाय धणीवरी पोट ॥३॥ तुका जपे संतां पायीं । जीव ठेविला निश्चयीं ॥४॥

११११. जैसें तैसें बाळ मातेसी आवडे । बोलतां बोबडे शब्द गोड ॥१॥ आपुली आवडी लेववी खाववी । पाहोनिया जीवीं सुख वाटे ॥२॥ तुका म्हणे काय देऊं परिहार । काय तें साचार जाणा संत ॥३॥

१११२. देवाचिया वस्त्रा स्वप्नींही नाठवी । स्त्रियेसी पाठवी उंच साडी ॥१॥ गाईचे पाळण

नयेचि विचारा । अश्वासी खरारा करी अंगें ॥२॥ लेंकराचीं गांड स्वयें धावे क्षाळूं । न म्हणे प्रक्षाळूं द्विजपाय ॥३॥ तुका म्हणे त्याच्या तोंडावरी थुंका । जातो यमलोका भोगावया ॥४॥

१११३. उरा लावी ऊर आळंगितां कांता । संतांसी भेटतां अंग चोरी ॥१॥ अतीत देखोनि होय पाठिमोरा । व्याह्यासी सामोरा जाय वेगीं ॥२॥ द्विजा नमस्कार मनीं भाव कैंचा । तुर्काचे दासींचा लेंक होय ॥३॥ तुका म्हणे तुम्ही क्रोधासी न यावें । स्वभावा करावें काय कोणी ॥४॥

१११४. ब्रह्मज्ञान जरी कळे उठाउठी । तरि कां हिंपुटी वेदशास्त्रें ॥१॥ शास्त्रांचे भांडण तप तीर्थाटन । पूर्वीचें भ्रमण याजसाठीं ॥२॥ याजसाठीं जप याजसाठीं तप । व्यासेंही अमुप ग्रंथ केले ॥३॥ याजसाठीं संतपाय हे सेवावे । तरिच तरावें तुका म्हणे ॥४॥

१११५. गायत्री विकोनी पोट जे जाळिती । तयां होय गती यमलोकीं ॥१॥ कन्येचा जे नर करिती विकरा । ते जाती अघोरा नरकपाता ॥२॥ नाम गाऊनियां द्रव्य जे मागती । नेणें तयां गति कैसी होय ॥३॥ कैसी होय गती तेच हो जाणती । आम्हासी संगती नलगे त्यांची ॥४॥ आमुचा सांगाती आहे तो श्रीहरि । नलगे दुराचारी तुका म्हणे ॥५॥

१११६. साधूच्या दर्शना लाजसी गव्हारा । वेश्येचिया घरा पुष्पें नेसी ॥१॥ वेश्या दासी मुरली जगाची वोवळी । ते तुज सोंवळी वाटे कैसी ॥२॥ तुका म्हणे आतां लाज धरीं बुच्या । टांचराच्या कुच्या मारा वेगीं ॥३॥

१११७. राउळासी जातां त्रास मानी मोठा । बैसतो चोहोटां आदरेंशीं ॥१॥ न करी स्नान संध्या न म्हणे रामराम । गुरुगुडीचें प्रेम अहर्निशीं ॥२॥ देवब्राह्मणांसी जाईना शरण । दासीचे चरण वंदी भावें ॥३॥ सुगंध चंदन सांडोनियां माशी । बैसे दुर्गंधीशीं अत्यादरें ॥४॥ तुका म्हणे अरे ऐक भाग्यहीना । कां रे रामराणा विसरसी ॥५॥

१११८. दुर्बुद्धि ते मना । कदा नुपजो नारायणा ॥१॥ आतां मज ऐसें करीं । तुझे पाय चित्तीं धरीं ॥२॥ उपजला भावो । तुझे कृपें सिद्धी जावो ॥३॥ तुका म्हणे आतां । लाभ नाहीं यापरता ॥४॥

१११९. तरुवर बीजापोटीं । बीज तरुवराशेवटीं ॥१॥ तैसें तुम्हां आम्हां जाले । एकीं एक सामावलें ॥२॥ उदकावरील तरंग । तरंग उदकाचें अंग ॥३॥ तुका म्हणे बिंबछाया । ठायीं पावली विलया ॥४॥

११२०. साकरेची गोणी बैलाचिया पाठीं । तयासी शेवटीं करबाडें ॥१॥ मालाचे पैं पेटे वाहाताती उंटें । तयालागीं कांटे भक्षावया ॥२॥ वाउगा हा धंदा आशा वाढविती । बांधोनियां देती यमाहातीं ॥३॥ ज्यासी असे लाभ तोचि जाणे गोडी । येर तीं बापुडीं सिणलीं वांयां ॥४॥ तुका म्हणे शहाणा होईं रे गव्हारा । चौऱ्यासीचा फेरा फिरों नको ॥५॥

११२१. चिरगुटें घालूनि वाढविलें पोट । गऱ्हवार बोभाट जनामध्ये ॥१॥ लटकेची डोहळे दाखवी प्रकार । दूध स्तनीं पोर पोटीं नाहीं ॥२॥ तुका म्हणे अंतीं वांज तेचि खरी । फजिती दुसरी जनामध्यें ॥३॥

११२२. माझी सर्व चिंता आहे विठोबासी । मी त्याच्या पायाशीं न विसंबें ॥१॥ विसरेना रूप क्षण एक चित्तीं । जिवलग मूर्ति सांवळी ते ॥२॥ विसरतां हरी क्षणएक घडी । अंतरेल जोडी लक्षलाभ ॥३॥ तुका म्हणे माझ्या विठोबाचे पाय । संजीवनी आहे हृदयामाजीं ॥४॥

११२३. काय तीं करावीं मोलाचीं माकडें । नाचताती पुढें संसाराच्या ॥१॥ झाडा देते वेळे विचकिती दांत । घेती यमदूत दंड वरी ॥२॥ हात दांत कान हलविती मान । दाखविती जन मानावया ॥३॥ तुका म्हणे किती जालीं हीं फजित । मागें नाहीं मित भारवाही ॥४॥

११२४. थोर ते गळाली पाहिजे अहंता । उपदेश घेतां सुख वाटे ॥१॥ व्यर्थ भरोवरी केलें पाठांतर । जोंवरी अंतर शुद्ध नाहीं ॥२॥ घोडें काय थोडें वागवितें ओझें । भावेंविण तैसें पाठांतर ॥३॥ तुका म्हणे बरा निष्ठावंत भाव । जरी पंढरीराव पाहिजे तो ॥४॥

११२५. जाय जाय तूं पंढरी । होय होय वारकरी ॥१॥ सांडोनियां वाळवंट । काय इच्छिसी वैकुंठ ॥२॥ खांद्या पताकांचे भार । तुळसीमाळा आणि अबीर ॥३॥ साधुसंतांच्या दाटणी । तुका जाय लोटांगणीं ॥४॥

११२६. संतांच्या हेळणें बाटलें जें तोंड । प्रत्यक्ष तें कुंड चर्मकाचें ॥१॥ भेसळीचें वीर्य ऐशा अनुभवें । आपुलें परावें नाहीं खळा ॥२॥ संतांचा जो शोध करितो चांडाळ । धरावा विटाळ बहु त्याचा ॥३॥ तुका म्हणे केली प्रतिज्ञा याचसाठीं । कांहीं माझे पोटीं शंका नाहीं ॥४॥

११२७. बहु टाळाटाळी । होते भोवताहे कळी ॥१॥ बरें नव्हेल सेवटीं । भय असो द्यावें पोटीं ॥२॥ मुरगाळीतां कान । घुसमाडील सावधान ॥३॥ अबोलणा तुका । ऐसें कोणी लेखूं नका ॥४॥

११२८. जिव्हे जाला चळ । नाहीं अवसान तें पळ ॥१॥ हेंचि वोसणावोनी उठी । देव सांठविला पोटीं ॥२॥ नाहीं ओढा वारा । पडिला प्रसंग तो बरा ॥३॥ तुका म्हणे जाली । भय हे अनावर बोलीं ॥४॥

११२९. गोहो यावा गांवा । ऐसे नवस करी आवा ॥१॥ कैंचें पुण्य तिये गांठीं । व्रतें वेची लोभासाठीं ॥२॥ वाढावें संतान । गृहीं व्हावें धनधान्य ॥३॥ मागे गारगोटी । परिसाचीये साटोवाटी ॥४॥ तुका म्हणे मोल । देऊन घेतला सोमल ॥५॥

११३०. जेथें कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ॥१॥ बुका लावूं नये भाळा । माळ घालूं नये गळां ॥२॥ तट्टावृषभासी दाणा । तृण मागों नये जाणा ॥३॥ तुका म्हणे द्रव्य घेती । देती तेही नरका जाती ॥४॥

११३१. लंकेमाजी घरें किती तीं आइका । सांगतसे संख्या जैसी तैसी ॥१॥ पांच लक्ष घरें पाषाणांचीं जेथें । सात लक्ष तेथें विटबंदी ॥२॥ कोटि घरें जेथें काशा आणि तांब्याचीं । शुद्ध कांचनाची सप्त कोटी ॥३॥ तुका म्हणे ज्याची संपदा एवढी । सांगातें कवडी गेली नाहीं ॥४॥

११३२. व्यभिचारिणी गणिका असतां कुंटणी । विश्वास तिचे मनीं राघोबाचा ॥१॥ ऐसीही पापिणी वाहिली विमानीं । अचळ भुवनीं ठेवियेली ॥२॥ पतितपावन तिहीं लोकीं ठसा । कृपाळू कोंवसा अनाथांचा ॥३॥ तुका म्हणे धरा विठोबाची सोय । आणिक उपाय नेणों किती ॥४॥

११३३. गजेंद्र तो हस्ती सहस्त्र वरुषें । जळामाजी नक्रें पीडिलासे ॥१॥ सुहृदीं सांडिलें कोणी नाहीं साहे । अंतीं वाट पाहे विठो तुझी ॥२॥ कृपेच्या सागरा माझ्या नारायणा । तया दोघांजणां तारियेलें ॥३॥ तुका म्हणे नेले वाहूनी विमानीं । मीही आइकोनी विश्वासलों ॥४॥

११३४. कैं वाहावें जीवन । कैं पलंगीं शयन ॥१॥ जैसी जैसी वेळ पडे । तैसें तैसें होणें घडे ॥२॥ कैं भोज्य नानापरी । कैं कोरड्या भाकरी ॥३॥ कैं बसावें वहनीं । कैं पायीं अनवाणी ॥४॥ कैं उत्तम प्रावर्णे । कैं वसनें तीं जीर्णे ॥५॥ कैं सकळ संपत्ती । कैं भोगणें विपत्ती ॥६॥ कैं सज्जनाशीं संग । कैं दुर्जनाशीं योग ॥७॥ तुका म्हणे जाण । सुख दुःख ते समान ॥८॥

११३५. उंच नीच कांहीं नेणे भगवंत । तिष्ठे भावभक्त देखोनियां ॥१॥ दासीपुत्र कण्या विदुराच्या भक्षी । दैत्या घरीं रक्षी प्रल्हादासी ॥२॥ चर्म रंगूं लागे रोहिदासासंगें । कबिराचे मागें शेले विणी ॥३॥ सज्जन कसाया विकूं लागे मांस । माळ्या सांवत्यास खुरपूं लागे ॥४॥ नरहरि सोनारा घडूं फुंकूं लागे । चोख्यामेळ्यासंगें ढोरें ओढी ॥५॥ नामयाची जनी सवें वेची सेणी । धर्मा घरीं पाणी वाहे झाडी ॥६॥ नाम्यासवें जेवी नव्हे संकोचित । ज्ञानियाची भिंत अंगें ओढी ॥७॥ अर्जुनाचे रथीं होय हा सारथी । भक्षी पोहे प्रीतीं सुदाम्याचे ॥८॥ गौळियांचे घरीं अंगें गाई वळी । द्वारपाळ बळीद्वारीं जाला ॥९॥ येकोबाचे ऋण फेडी हृषीकेशी । आंबऋषीचे सोशी गर्भवास ॥१०॥ मिराबाईसाठीं घेतो विष प्याला । दामाजीचा जाला पाडिवार ॥११॥ घडी माती वाहे गोऱ्या कुंभाराची । हुंडी त्या मेहत्याचीं अंगें भरी ॥१२॥ पुंडलिकासाठीं अझूनि तिष्ठत । तुका म्हणे मात धन्य त्याची ॥१३॥

११२६. भेटीलागीं जीवा लागलीसे आस । पाहे रात्रंदिवस वाट तुझी ॥१॥ पूर्णिमेचा चंद्रमा चकोरा जीवन । तैसें माझें मन वाट पाहे ॥२॥ दिवाळीच्या मुळा लेंकी आसावली । पाहातसे वाटुली पंढरीची ॥३॥ भुकेलिया बाळ अति शोक करी । वाट पाहे परि माउलीची ॥४॥ तुका म्हणे मज लागलीसे भूक । धांवूनि श्रीमुख दावीं देवा ॥५॥

११३७. आले संत पाय ठेविती मस्तकीं । इही उभयलोकीं सरता केलों ॥१॥ वंदीन पाउलें लोळेन चरणीं । आजि इच्छाधणी फिटईल ॥२॥ अवघीं पूर्व पुण्यें जालीं सानुकूळ । अवघेंचि

मंगळ संतभेटी ॥३॥ तुका म्हणे कृतकृत्य जालों देवा । नेणें परि सेवा डोळां देखें ॥४॥

११३८. करीं धंदा परि आवडती पाय । प्रीती सांगों काय नेणां देवा ॥१॥ रूप डोळां देखें सदा सर्वकाळ । संपादितों आळ प्रपंचाचा ॥२॥ नेमून ठेविली कारया कारणीं । आमुची ते वाणी गुण वदे ॥३॥ मनासीं उत्कंठा दर्शनाचा हेवा । नाहीं लोभ जीवा धन धान्य ॥४॥ उसंतितों पंथ वेठीचिया परी । जीवनसूत्र दोरीपाशीं ओढे ॥५॥ तुका म्हणे ऐसें करितों निर्वाण । जीव तुम्हां भिन्न नाहीं माझा ॥६॥

११३९. कां रे माझीं पोरें म्हणसील ढोरें । मायबाप खरें काय एक ॥१॥ कां रे गेलें म्हणोनि करिसी तळमळ । मिथ्याचि कोल्हाळ गेलियाचा ॥२॥ कां रें माझें माझें म्हणसील गोत । न सोडविती दूत यमाहातीं ॥३॥ कां रे मी बळिया म्हणविसी ऐसा । सरणापाशीं कैसा उचलविसी ॥४॥ तुका म्हणे न धरीं भरंवसा कांहीं । वेगीं शरण जाईं पांडुरंगा ॥५॥

११४०. अगा करुणाकरा करितसें धांवा । या मज सोडवा लवकरि ॥१॥ ऐकोनियां माझीं करुणेचीं वचनें । व्हावें नारायणें उतावीळ ॥२॥ मागें पुढें अवघा दिसे रिता ठाव । ठेवूनि पायीं भाव वाट पाहें ॥३॥ उशीर तो आतां न पाहिजे केला । आहो जी विठ्ठला मायबापा ॥४॥ उरलें तें एक हेंचि मज आतां । अवघें विचारितां शून्य जालें ॥५॥ तुका म्हणे आतां करीं कृपादान । पाऊलें समान दावीं डोळां ॥६॥

११४१. न मनी ते ज्ञानी न मनी ते पंडित । ऐसे परीचे एकएका भावें ॥१॥ धातू पोसोनियां आणिकां उपदेश । अंतरीं तो लेश प्रेम नाहीं ॥२॥ न मनी ते योगी न मनी ते हरिदास । दर्शनें बहुवस बहुतां परींचीं ॥३॥ तुका म्हणे तया नमन बाह्यात्कारी । आवडती परी चित्तशुद्धी ॥४॥

११४२. कासया पाषाण पूजितसां पितळ । अष्ट धातु खळ भावेविण ॥१॥ भावचि कारण भावचि कारण । मोक्षाचें साधन बोलियेलें ॥२॥ काय करिल जपमाळा कंठमाळा । करिशी वेळोवेळां विषयजप ॥३॥ काय करिशील पंडित हे वाणी । अक्षराभिमानी थोर होय ॥४॥ माय करिशील कुशळ गायन । अंतरीं मळीण कुबुद्धि ते ॥५॥ तुका म्हणे भाव नाहीं करिसी सेवा । तेणें काय देवा योग्य होशी ॥६॥

११४३. शिळा जया देव । तैसा फळे त्याचा भाव ॥१॥ होय जतन तें गोड । अंतराय येती नाड ॥२॥ देव जोडे भावें । इच्छेचें तें प्रेम घ्यावें ॥३॥ तुका म्हणे मोड दावी । तैशीं फळें आलीं व्हावीं ॥४॥

११४४. अंतरींचें गोड । राहे आवडीचें कोड ॥१॥ संघटणें येती अंगा । गुणदोष मनभंगा ॥२॥ उचिताच्या कळा । नाहीं कळत सकळा ॥३॥ तुका म्हणे अभावना । भावीं मूळ तें पतना ॥४॥

११४५. कासया जी ऐसा माझे माथां ठेवा । भार तुम्ही देवा संतजन ॥१॥ विचित्र विंदानी नानाकळा खेळे । नाचवी पुतळे नारायण ॥२॥ काय वानरांचे अंगींची ते शक्ति । उदका तरती वरी शिळा ॥३॥ तुका म्हणे करी निमित्यचि आड । चेष्टवूनि जड दावी पुढें ॥४॥

११४६. पायां पडावें हें माझें भांडवल । सरती हे बोल कोठें पायीं ॥१॥ तरि हे सलगी कवतुक केलें । लडिवाळ धाकुलें असें बाळ ॥२॥ काय उणें तुम्हां संतांचिये घरीं । विदित या परी सकळही ॥३॥ तुका म्हणे माझी उचित हे सेवा । नये करूं ठेवाठेवी कांहीं ॥४॥

११४७. वदवावी वाणी माझी कृपावंता । वागपुष्पें संतां समर्पीशी ॥१॥ सर्व संकटांचा तुम्हां परिहार । घालावा म्यां भार पांडुरंगा ॥२॥ एकसरें चित्त ठेवूनियां पायीं । जालों उतराई होतों तेणें ॥३॥ तुका म्हणे येथें जालें अवसान । काया वाचा मन वेचूनियां ॥४॥

११४८. नमावें पाय हें माझें उचित । आशीर्वादें हित तुमचिया ॥१॥ कृपेचा वोरस न समाये पोटीं । म्हणोनि उफराटीं वचनें हीं ॥२॥ तुमचीं उष्टावळी तें माझें भोजन । झाडावें अंगण केरपुंजे ॥३॥ परि ऐसें पुण्य नाहीं माझे गांठीं । जेणें पडे मिठी पायांसवें ॥४॥ तुका म्हणे राहे आठवण चित्तीं । ऐसी कृपा संतीं केली तुम्हीं ॥५॥

११४९. काय नाही माता गौरवीत बाळा । काय नाहीं लळा पाळीत ते ॥१॥ काय नाहीं त्याची करीत ते सेवा । काय नाहीं जीवा गोमटें तें ॥२॥ अमंगळपणें कंटाळा न धरी । उचलोनि करीं कंठीं लावी ॥३॥ लेववीं आपुले अंगें अळंकार । संतोषावे फार देखोनियां ॥४॥ तुका म्हणे स्तुति योग्य नाहीं परी । तुम्हां लाज थोरी अंकिताची ॥५॥

११५०. माझीया मीपणावरी पडो पाषाण । जळो हें भूषण नाम माझें । पापा नाहीं पार दु:खाचे डोंगर । जालों ये भूमीसी ओझें ॥१॥ काय विटंबना सांगों किती । पाषाण फुटती ऐसें दु:ख । नर नारी सकळ उत्तम चांडाळ । न पाहाती डोळां माझें सुख ॥२॥ काया वाचा मनें अघटित करणें । चर्म चक्षु हात पाय । निंदा द्वेष घात विश्वासीं व्यभिचार । आणीक सांगों किती काय ॥३॥ लक्ष्मीमदें मातें घडले महा दोष । पत्नी दोनी भेदाभेद । पितृवचनीं घडली अवज्ञा अविचार । कुटिळ कुचरवादी निंद्य ॥४॥ आणीक किती सांगों तें अवगुण । न वळे जिव्हा कांपे मन । भूतदया उपकार नाहीं शब्दा धीर । विषयीं लंपट शब्दहीन ॥५॥ संत महानुभाव ऐका हे उत्तर । अवगुण अविचार वृद्धि पापा । तुका म्हणे सरतें करा पांडुरंगीं । शरण आलों मायबापा ॥६॥

११५१. फिरविलीं दोनी । कन्या आणि चक्रपाणी ॥१॥ जाला आनंदी आनंद । अवतरले गोविंद ॥२॥ तुटलीं बंधनें । वसुदेवदेवकीचीं दर्शनें ॥३॥ गोकुळासी आलें । ब्रह्म अव्यक्त चांगलें ॥४॥ नंद दसवंती । धन्य देखिले श्रीपती ॥५॥ निशीं जन्मकाळ । आले अष्टमी गोपाळ ॥६॥ आनंदली मही । भार गेला सकळही ॥७॥ तुका म्हणे कंसा । आठ भोविला वळसा ॥८॥

११५२. सोडियेल्या गांठी । दरुषणें कृष्णभेटी ॥१॥ करिती नारी अक्षयवाणें । जीवभाव देती दानें ॥२॥ उपजल्या काळें । रूपें मोहिल्या सकळें ॥३॥ तुका तेथें वारी । एकी आडोनि दुसरी ॥४॥

११५३. मुख डोळां पाहे । तैशीच ते उभी राहे ॥१॥ केल्याविण नव्हे हातीं । धरोनि आरती परती ॥२॥ न धरिती मनीं । कांहीं संकोच दाटणी ॥३॥ तुका म्हणे देवें । ओस केल्या देहभावें ॥४॥

११५४. गोकुळींच्या सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥१॥ बाळकृष्ण नंदा घरीं । आनंदल्या नरनारी ॥२॥ गुढिया तोरणें । करिती कथा गाती गाणें ॥३॥ तुका म्हणे छंदें । येणें वेधिलीं गोविंदें ॥४॥

११५५. विटंबिले भट। दिला पाठीवरी पाट ॥१॥ खोटें जाणोनी अंतर। न साहेचि विश्वंभर ॥२॥ तेंचि करी दान। जैसें आइके वचन ॥३॥ तुका म्हणे देवें। पूतना शोषियेली जीवें ॥४॥

११५६. प्रेम देवाचें देणें। देहभाव जाय जेणें। न धरावी मनें। शुद्धी देशकाळाची ॥१॥ मुक्त लज्जाविरहित। भाग्यवंत हरिभक्त। जाले वोसंडत। नामकीर्ति पवाडे ॥२॥ जोडी आली अविनाश। जन्मोनि जाले हरिचे दास। त्यांस नव्हे गर्भवास। परब्रह्मीं सौरस ॥३॥ हेचि वाहाती संकल्प। पुण्यप्रसंगाचे जप। तुका म्हणे पाप। गांवीं नाही हरिजना ॥४॥

११५७. तोचि लटिक्यामाजी भला। म्हणे देव म्यां देखीला ॥१॥ ऐशियाच्या उपदेशें। भवबंधन कैसें नासे। बुडवी आपणासरिसे। अभिमानें आणिकांस ॥२॥ आणिक नाहीं जोडा। देव म्हणवि तया मूढा ॥३॥ आणिकाचें न मनी साचें। तुका म्हणे या श्रेष्ठांचें ॥४॥

११५८. होईल जाला अंगें देव जो आपण। तयासी हे जन अवघे देव ॥१॥ येरांनीं सांगावी रेमट काहाणी। चित्ता रंजवणी करावया ॥२॥ धाला आणिकांची नेणे तहानभूक। सुखें पाहे सुख आपुलिया ॥३॥ तुका म्हणे येथें पाहिजे अनुभव। शब्दांचे गौरव कामा नये ॥४॥

११५९. कां नवजावें बैसोनि कथे । ऐसें ऐका हो श्रोते । पांडुरंग तेथें । उभा असे तिष्ठत ॥१॥ म्हणऊनि करी धीर । लक्ष लावूनि सादर । भवसिंधुपार । असेल ज्या तरणें ॥२॥ कथे कांहीं अणुमात्र । न बोलावा वृत्तांत । देवभक्तां चित्त । समरसीं खंडणा ॥३॥ कां वैष्णव पूजावे । ऐका घेईल जो भावें । चरणरजा शिवें । वोढविला मस्तक ॥४॥ ऐसें जाणा हो निभ्रांत । देव वैष्णवांचा अंकित । अलिप्त अतीत । परमित त्यासाठीं ॥५॥ घालोनि लोळणी । तुका आला लोटांगणीं । वंदी पायवणी । संतचरणींचें माथां ॥६॥

११६०. अनुभवें आलें अंगा । तें या जगा देतसें ॥१॥ नव्हती हाततुके बोल । मूळ ओल अंतरिंची ॥२॥ उतरूनि दिलें कशी । शुद्धरसीं सरतें ॥३॥ तुका म्हणे दुसरें नाहीं ।

ऐसी ग्वाही गुजरली ॥४॥

११६१. साधकाची दशा उदास असावी । उपाधि नसावी अंतर्बाही ॥१॥ लोलुप्यता काय निद्रेतें जिणावें । भोजन करावें परमित ॥२॥ एकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं भाषण । प्राण गेल्या जाण बोलों नये ॥३॥ तुका म्हणे ऐशा साधनीं जो राहे । तोचि ज्ञान लाहे गुरुकृपा ॥४॥

११६२. अंतरींची ज्योती प्रकाशली दीप्ति । मुळींची जे होती आच्छादिली ॥१॥ तेथींचा आनंद ब्रह्मांडीं न समाये । उपमेशीं काय देऊं सुखा ॥२॥ भावाचे मथिलें निर्गुण संचलें । तें हें उभें केलें विटेवरी ॥३॥ तुका म्हणे आम्हां ब्रह्मांड पंढरी । प्रेमाची जे थोरी सांठवण ॥४॥

११६३. कासया गा मज घातलें संसारीं । चित्त पायांवरी नाहीं तुझ्या ॥१॥ कासया गा मज घातलें या जन्मा । नाहीं तुझा प्रेमा नित्य नवा ॥२॥ नामाविण माझी वाचा अमंगळ । ऐसा कां चांडाळ निर्मियेलों ॥३॥ तुका म्हणे माझी जळो जळो काया । विठ्ठल सखया वांचूनियां ॥४॥

११६४. प्रारब्धेंचि जोडें धन । प्रारब्धेंचि वाढे मान ॥१॥ सोस करिसी वांयां । भजे मना पंढरीराया ॥२॥ प्रारब्धेंचि होय सुख । प्रारब्धेंचि पावे दुःख ॥३॥ प्रारब्धेंचि भरे पोट । तुका करीना बोभाट ॥४॥

११६५. हीन माझी याति । वरि स्तुति केली संतीं ॥१॥ अंगीं वसूं पाहे गर्व । माझें हरावया सर्व ॥२॥ मी एक जाणता । ऐसें वाटतसे चित्ता ॥३॥ राख राख गेलों वांयां । तुका म्हणे पंढरीराया ॥४॥

११६६. माता कापी गळा । तेथें कोण राखी बाळा ॥१॥ हें कां नेणां नारायणा । मज चाळवितां दीना ॥२॥ नागवी धांवणें । तेथें साह्य व्हावें कोणें ॥३॥ राजा सर्व हरी । तेथें दुजा कोण वारी ॥४॥ तुझ्या केल्याविण । स्थिर वश नव्हे मन ॥५॥ तुका म्हणे हरी । सूत्र तुझ्या हातीं दोरी ॥६॥

११६७. गाऊं नेणें परी मी कांहीं गाईन । शरण जाईन पांडुरंगा ॥१॥ ब्रह्मांडनायक मी त्याचा अंकित । काय यमदूत करिती काळ ॥२॥ वेश्या ज्याच्या नामें तारिली गणिका । अजामेळासारिखा पापरासी ॥३॥ चरणींच्या रजें अहिल्या तारिली । रूपवंत केली कुब्जा दासी ॥४॥ पृथिवी तारिली पाताळासी जातां । तुका म्हणे आतां आम्ही किती ॥५॥

११६८. गाजराची पुंगी । तैसे नवे जाले जोगी ॥१॥ काय करोनि पठण । केली अहंता जतन ॥२॥ अल्प असे ज्ञान । अंगीं ताठा अभिमान ॥३॥ तुका म्हणे लंड । त्याचे हाणोनि फोडा तोंड ॥४॥

११६९. परद्रव्य परनारी । अभिळासूनि नाक धरी ॥१॥ जळो तयाचा आचार । व्यर्थ भार वाहे खर ॥२॥ सोंवळ्याची स्फीति । क्रोधें विटाळला चित्तीं ॥३॥ तुका म्हणे सोंग ।

**दावी बाहेरील रंग ॥४॥**

**११७०. टिळा टोपी उंच दावी । जगीं मी एक गोसावी ॥१॥ अवघा वरपंग सारा । पोटीं विषयांचा थारा ॥२॥ मुद्रा लाविती कोरोनी । मान व्हावयासी जनीं ॥३॥ तुका म्हणे ऐसे किती । नरका गेले पुढें जाती ॥४॥**

**११७१. ऐसे संत जाले कळीं । तोंडीं तमाखूची नळी ॥१॥ स्नानसंध्या बुडविली । पुढें भांग वोढविली ॥२॥ भांगभुर्का हें साधन । पची पडें मद्यपान ॥३॥ तुका म्हणे अवघें सोंग । तेथें कैंचा पांडुरंग ॥४॥**

**११७२. जातीची शिंदळी । तिला कोण कैसा वळी ॥१॥ आपघर ना बापघर । चिंतीं मनीं व्यभिचार ॥२॥ सेजे असोनियां धणी । परद्वार मना आणी ॥३॥ तुका म्हणे अस्सल जाती । जातींसाठीं खाती माती ॥४॥**

**११७३. अंधळ्याची काठी । हिरोनियां कडा लोटी ॥१॥ हे कां देखण्या उचित । लाभ किंवा कांहीं हित ॥२॥ चाळवूनि हातीं । साकर म्हणोनि द्यावी माती ॥३॥ तुका म्हणे वाटे । देवा पसरावे सराटे ॥४॥**

**११७४. प्रीतिचिया बोला नाहीं पेचपाड । भलतैसें गोड करूनि घेई ॥१॥ तैसें विठ्ठलराया तुज मज आहे । आवडीनें गाय नाम तुझें ॥२॥ वेडे वांकडे बाळकाचे बोल । करिती नवल मायबाप ॥३॥ तुका म्हणे तुज येवो माझी दया । जीवींच्या सखया जिवलगा ॥४॥**

**११७५. माझे मज कळों येती अवगुण । काय करूं मन अनावर ॥१॥ आतां आड उभा राहें नारायणा । दयासिंधुपणा साच करीं ॥२॥ वाचा वदे परी करणें कठिण । इंद्रियां अधीन जालों देवा ॥३॥ तुका म्हणे तुझा जैसा तैसा दास । न धरीं उदास मायबापा ॥४॥**

**११७६. वर्णावी ती थोरी एका विठ्ठलाची । कीर्ति मानवाची सांगों नये ॥१॥ उदंडचि जाले जन्मोनियां मेले । होऊनियां गेले राव रंक ॥२॥ त्यांचें नाम कोणी नेघे चराचरीं । साही वेद चारी वर्णिताती ॥३॥ अक्षय अढळ चळेना ढळेना । तया नारायणा ध्यात जावें ॥४॥ तुका म्हणे तुम्ही विठ्ठल चित्तीं ध्यातां । जन्ममरणव्यथा दूर होती ॥५॥**

**११७७. नको देऊं देवा पोटी हें संतान । मायाजाळें जाण नाठविसी ॥१॥ नको देऊं देवा द्रव्य आणि भाग्य । तो एक उद्योग होय जीवा ॥२॥ तुका म्हणे करीं फकीराचे परी । रात्रंदिवस हरी येइल वाचे ॥३॥**

**११७८. जोडोनियां धन उत्तम वेव्हारें । उदास विचारें वेच करी ॥१॥ उत्तमचि गति तो एक पावेल । उत्तम भोगील जीवखाणी ॥२॥ परउपकारी नेणें परनिंदा । परस्त्रिया सदा बहिणी माया ॥३॥ भूतदया गाईपशूचें पाळण । तान्हेल्या जीवन वनामाजीं ॥४॥ शांतिरूपें**

नव्हे कोणाचा वाईट । वाढवी महत्व वडिलांचें ॥५॥ तुका म्हणे हेंचि आश्रमाचें फळ । परमपद बळ वैराग्याचें ॥६॥

११७९. हरि म्हणतां गति पातकें नासती । कळिकाळ कांपती हरि म्हणतां ॥१॥ हरि म्हणतां मुक्ति हरि म्हणतां मुक्ति । चुके यातायाती हरि म्हणतां ॥२॥ तपें अनुष्ठानें न लगती साधनें । तुटती बंधनें हरि म्हणतां ॥३॥ तुका म्हणे भावें जपा हरिचें नाम । मग काळयम शरण तुम्हां ॥४॥

११८०. नये वांटूं मन । कांहीं न देखावें तें भिन्न ॥१॥ पाय विठोबाचे चित्तीं । असों द्यावी दिवसराती ॥२॥ नये काकुळती । कोणा येवो हरिभक्ति ॥३॥ तुका म्हणे साई । करील कृपेची विठाई ॥४॥

११८१. सकळ देवांचें दैवत । उभें असे या रंगात ॥१॥ रंग लुटा माझे बाप । शुद्ध भावें खरें माप ॥२॥ रंग लुटिला बहुतीं । शुक नारदादि संतीं ॥३॥ तुका लुटिताहे रंग । साह्य जाला पांडुरंग ॥४॥

११८२. उशीर कां केला । कृपाळुवा जी विठ्ठला ॥१॥ मज दिलें कोणा हातीं । काय मानिली निश्चिंती ॥२॥ कोठवरी धरूं धीर । आतां मन करूं स्थिर ॥३॥ तुका म्हणे जीव । ऐसी भाकितसे कींव ॥४॥

११८३. तुका वेडा अविचार । करी बडबड फार ॥१॥ नित्य वाचे हाचि छंद । राम कृष्ण हरि गोविंद ॥२॥ धरीं पांडुरंगीं भाव । आणीक नेणें दुजा देव ॥३॥ गुरुज्ञान सर्वा ठायीं । दुजें न विचारी कांहीं ॥४॥ बोल नाइके कोणाचे । कथे नागवाचि नाचे ॥५॥ संग उपचारें कांटाळे । सुखें भलते ठायीं लोळे ॥६॥ कांहीं उपदेशिलें नेणें । वाचे विठ्ठल विठ्ठल म्हणे ॥७॥ केला बहुतीं फजित । तरी हेंचि करी नित्य ॥८॥ अहो पंडित जन । तुका टाकावा थुंकोन ॥९॥

११८४. आली सिंहस्थ पर्वणी । न्हाव्या भटा झाली धणी ॥१॥ अंतरीं पापाच्या कोडी । वरि वरि बोडी डोई दाढी ॥२॥ बोडिले तें निघालें । काय पालटलें सांग वहिलें ॥३॥ पाप गेल्याची काय खूण । नाहीं पालटले अवगुण ॥४॥ भक्तिभावेंविण । तुका म्हणे अवघा सीण ॥५॥

११८५. तुज घालोनियां पूजितों संपुटीं । परि तुझ्या पोटीं चौदा भुवनें ॥१॥ तुज नाचूनि दाखवूं कौतुक । परी रूपरेखा नाहीं तुज ॥२॥ तुजलागीं आम्हीं गात असों गीत । परी तूं अतीत शब्दाहूनि ॥३॥ तुज लागीं आम्हीं घातियेल्या माळा । परी तूं वेगळा कर्तृत्वासी ॥४॥ तुका म्हणे आतां होऊनि परमित । माझें कांहीं हित विचारावें ॥५॥

११८६. पापाची मी राशी । सेवाचोर पायांपाशीं ॥१॥ करा दंड नारायणा । माझ्या मानाची खंडणा ॥२॥ जना हातीं सेवा । घेतों लंडपणें देवा ॥३॥ तुझा ना संसार । तुका दोहींकडे चोर ॥४॥

११८७. दुडीवरी दुडी । चाले मोकळी गुजरी ॥१॥ ध्यान लागो ऐसें हरी । तुझे चरणीं

तैशापरी ॥२॥ आवतण्याची आस । जैसी लागे दुर्बळास ॥३॥ लोभ्या कळांतराची आस । बोटें मोजी दिवस मास ॥४॥ तुका म्हणे पंढरीनाथा । मजला आणिक नको व्यथा ॥५॥

११८८. लागोनियां पायां विनवितों तुम्हाला । करें टाळी बोला मुखें नाम ॥१॥ विठ्ठल विठ्ठल म्हणा वेळोवेळां । हा सुख सोहळा स्वर्गी नाहीं ॥२॥ कृष्ण विष्णु हरि गोविंद गोपाळ । मार्ग हा प्रांजळ वैकुंठींचा ॥३॥ सकळांसीं येथें आहे अधिकार । कलियुगीं उद्धार हरिनामें ॥४॥ तुका म्हणे नामापाशीं चारी मुक्ति । ऐसें बहुतां ग्रंथीं बोलियेलें ॥५॥

११८९. लटिकें हासें लटिकें रडें । लटिकें उडे लटिक्यापें ॥१॥ लटिकें माझें लटिकें तुझें । लटिकें ओझें लटिक्याचें ॥२॥ लटिकें गाय लटिकें ध्याय । लटिकें जाय लटिक्यापें ॥३॥ लटिका भोगी लटिका त्यागी । लटिका जोगी जगमाया ॥४॥ लटिका तुका लटिक्या भावें । लटिकें बोले लटिक्यासवें ॥५॥

११९०. जालों म्हणती त्याचें मज वाटें आश्चर्य । ऐका नव्हे धीर वचन माझें ॥१॥ शिजलिया अन्ना ग्वाही दांत हात । जिव्हेंसी चाखतां न कळे कैसें ॥२॥ तापलिया तेला बावन चंदन । बुंदे एक क्षण शीतळ करी ॥३॥ पारखी तो जाणे अंतरींचा भेद । मूढ जना छंद लावण्याचा ॥४॥ तुका म्हणे कसीं निवडे आपण । शुद्ध मंद हीन जैसें तैसें ॥५॥

११९१. हेचि थोर भक्ति आवडती देवा । संकल्पाची माया संसाराची ॥१॥ ठेविलें अनंतें तैसेंचि रहावें । चित्तीं असों द्यावें समाधान ॥२॥ वाहिल्या उद्वेग दुःखचि केवळ । भोगणें तें फळ संचिताचें ॥३॥ तुका म्हणे घालूं तयावरी भार । वाहूं हा संसार देवापायीं ॥४॥

११९२. जन्मा येणें घडे पातकाचें मूळ । संचिताचें फळ आपुलिया ॥१॥ मग वांयांविण दुःख वाहों नये । रुसोनियां काय देवावरी ॥२॥ ठाऊकाचि आहे संसार दुःखाचा । चित्तीं सीण त्याचा वाहों नये ॥३॥ तुका म्हणे नाम त्याचें आठवावें । तेणें विसरावें जन्मदुःख ॥४॥

११९३. आतां माझे नका वाणूं गुणदोष । करितों उपदेश याचा कांहीं ॥१॥ मानदंभासाठीं छळीतसें कोणा । आण या चरणां विठोबाची ॥२॥ तुका म्हणें हें तों ठावें पांडुरंगा । काय कळे जगा अंतरींचें ॥३॥

११९४. वांझा गाई दुभती । देवा ऐसी तुझी ख्याती ॥१॥ ऐसें मागत नाहीं तुज । चरण दाखवावे मज ॥२॥ चातक पाखरूं । त्यासी वर्षे मेघधारू ॥३॥ पक्षी राजहंस । अमोलिक मोतीं त्यास ॥४॥ तुका म्हणे देवा । कां गा खोंचलासी जीवा ॥५॥

११९५. परतें मी आहें सहजचि दुरी । वेगळें भिकारी नामरूपा ॥१॥ नलगे रुसावें धरावा संकोच । सहज तें नीच आलें भागा ॥२॥ पडिलिये ठायीं उच्छिष्ट सेवावें । आर्त तेंचि देवें केलें ऐसें ॥३॥ तुका म्हणे तुम्ही आम्हां जी वेगळे । केले ते निराळे द्विज देवा ॥४॥

११९६. चिंतामणिदेवा गणपतीसी आणा । करवावें भोजना दुजे पात्रीं ॥१॥ देव म्हणती तुकया एवढी कैंची थोरी । अभिमानाभीतरी नागवलों ॥२॥ वाड वेळ जाला सिळें जालें अन्न । तटस्थ ब्राह्मण बैसलेती ॥३॥ तुका म्हणे देवा तुमच्या सुकृतें । आणीन त्वरित मोरयासी ॥४॥

११९७. भोक्ता नारायण लक्ष्मीचा पति । म्हणोनि प्राणाहुति घेतलिया ॥१॥ भर्ता आणि भोक्ता कर्ता आणि करविता । आपण सहजता पूर्णकाम ॥२॥ विश्वंभर कृपादृष्टी सांभाळीत । प्रार्थना करीत ब्राह्मणांची ॥३॥ कवळोकवळीं नाम घ्यावें गोविंदाचें । भोजन भक्तांचें तुका म्हणे ॥४॥

११९८. माझा स्वामी तुझी वागवितो लात । तेथें मी पतित काय आलों ॥१॥ तीर्थें तुमच्या चरणीं जाहलीं निर्मळ । तेथें मी दुर्बळ काय वाणूं ॥२॥ तुका म्हणे तुम्ही देवा द्विज वंद्य । मी तों काय निंद्य हीन याती ॥३॥

११९९. वंदिलें वंदावें जीवाचियेसाठीं । किंवा बरी तुटी आरंभीच ॥१॥ स्वहिताची चाड ते ऐका हे बोल । अवघेंचि मोल धीरा अंगीं ॥२॥ सिंपलें तें रोप वरीवरी बरें । वाळलिया पुरें कोंभ नये ॥३॥ तुका म्हणे टाकीघायें देवपण । फुटलिया जन कुला पुसी ॥४॥

१२००. आम्हां विष्णुदासां हेंचि भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥१॥ वाणी नाहीं घ्यावें आपुलिया हातें । करोनियां चित्तें समाधान ॥२॥ तुका म्हणे द्रव्य मेळविलें मागें । हें तों कोणासंगें आलें नाहीं ॥३॥

१२०१. सुखाचे व्यवहारीं सुखलाभ जाला । आनंद कोंदला मागें पुढें ॥१॥ संगती पंगती देवासवें घडे । नित्य नित्य जोडे तेंचि साच ॥२॥ समर्थाचे घरीं सकळ संपदा । नाहीं तुटी कदा कासयाची ॥३॥ तुका म्हणे येथें लाभाचिया कोटी । बहु वाव पोटीं समर्थाचे ॥४॥

१२०२. काय देवें खातां घेतलें हातींचे । आलें हें तयाचें थोर भय ॥१॥ म्हणतां गजरें राम एकसरें । जळती पापें थोरें भयधाकें ॥२॥ काय खोळंबले हात पाय अंग । नाशिलें हें सांग रूप काय ॥३॥ कोण लोकीं सांग घातला बाहेरी । म्हणतां हरि हरि तुका म्हणे ॥४॥

१२०३. उत्तम त्या याति । देवा शरण अनन्यगति ॥१॥ नाहीं दुजा ठाव । कांहीं उत्तम मध्यम भाव ॥२॥ उमटती ठसे । ब्रह्मप्राप्ति अंगीं दिसे ॥३॥ भाविक विश्वासी । तुका म्हणे नमन त्यांसी ॥४॥

१२०४. भय हरिजनीं । कांहीं न धरावें मनीं ॥१॥ नारायणा ऐसा सखा । काय जगाचा हा लेखा ॥२॥ चित्त वित्त हेवा । समर्पून राहा देवा ॥३॥ तुका म्हणे मन । असों द्यावें समाधान ॥४॥

१२०५. आयुष्य मोजावया बैसला मापारी । तूं कां रे वेव्हारीं संसाराच्या ॥१॥ नेईल ओढोनि ठाउकें नसतां । न राहे दुश्चिता हरिविण ॥२॥ कठिण हें दुःख यम जाचतील । कोण

सोडवील तया ठायीं ॥३॥ राहतील दुरी सज्जन सोयरीं । आठवीं श्रीहरी लवलाहीं ॥४॥ तुका म्हणे किती करिसी लंडायी । होईल भंडाई पुढें थोर ॥५॥

१२०६. होऊं नको कांहीं या मना आधीन । नाइकें वचन याचें कांहीं ॥१॥ हटियाची गोष्टी मोडून टाकावी । सोई ही धरावी विठोबाची ॥२॥ आपुले आधीन करूनियां ठेवा । नाहीं तरी जीवा घातक हें ॥३॥ तुका म्हणे झाले जे मना आधीन । तयांसी बंधन यम करी ॥४॥

१२०७. नामाविण काय वाउगी चावट । वांयां वटवट हरीविण ॥१॥ फुकटची सांगे लोकाचिया गोष्टी । राम जगजेठी वाचे नये ॥२॥ मेळवूनि चाट करी सुरापान । विषयांच्या गुणें मातलासे ॥३॥ बैसोनि टवाळी करी दुजयाची । नाहीं गोविंदाची आठवण ॥४॥ बळें यम दांत खाय तयावरी । जंव भरे दोरी आयुष्याची ॥५॥ तुका म्हणे तुला सोडवील कोण । नाहीं नारायण आठविला ॥६॥

१२०८. संत गाती हरिकीर्तनीं । त्यांचे घेइन पायवणी ॥१॥ हेंचि तप तीर्थ माझें । आणीक मी नेणें दुजें ॥२॥ काया कुरवंडी करीन । संत महंत ओंवाळीन ॥३॥ संत महंत माझी पूजा । आन भाव नाहीं दुजा ॥४॥ तुका म्हणे नेणें कांहीं । अवघें आहे संतांपायीं ॥५॥

१२०९. जालें भांडवल । अवघा पिकला विठ्ठल ॥१॥ आतां वाणी काशासाठीं । धीर धरावाच पोटीं ॥२॥ आपुल्या संकोचें । म्हणऊनि तेथें टांचे ॥३॥ घेतों खऱ्या मापें । तुका देखोनियां सोपें ॥४॥

१२१०. शुद्ध ऐसें ब्रह्मज्ञान । करा मन सादर ॥१॥ रवि रसां सकळां शोषी । गुणदोषीं न लिंपे ॥२॥ कोणासवें नाहीं चोरी । सकळांवरी समत्व ॥३॥ सत्य तरी ऐसें आहे । तुका पाहे उपदेशी ॥४॥

१२११. अग्नि हा पाचारी कोणासी साक्षेपें । हिंवें तोचि तापे जाऊनियां ॥१॥ उदक म्हणे काय या हो मज प्यावें । तृषित तो धांवे सेवावया ॥२॥ काय वस्त्र म्हणे या हो मज नेसा । आपुले स्वइच्छा जग वेढी ॥३॥ तुकया स्वामी म्हणे काय मज स्मरा । आपुल्या उद्धारा लागूनियां ॥४॥

१२१२. भक्त देवाघरिंचा सुना । देव भक्ताचा पोसणा ॥१॥ येर येरां जडलें कैसें । जीवा अंग जैसें तैसें ॥२॥ देव भक्ताची कृपाळु माता । भक्त देवाचा जनिता ॥३॥ तुका म्हणे अंगें । एक एकाचिया संगें ॥४॥

१२१३. बरवयांबरवंट । विटे चरण सम नीट ॥१॥ ते म्यां हृदयीं धरिले । तापशमन पाउलें ॥२॥ सकळ तीर्थां अधिष्ठान । करी लक्ष्मी संवाहन ॥३॥ तुका म्हणे अंतीं । ठाव मागितला संतीं ॥४॥

१२१४. मांस चर्म हाड । देवा अवघींच गोड ॥१॥ जे जे हरिरंगीं रंगले । कांहीं न

वचे वांयां गेले ॥२॥ वेद खाय शंखासुर । त्याचें वागवी कलेवर ॥३॥ तुका म्हणे ऐसा । बराडी या भक्तिरसा ॥४॥

१२१५. कोण चिंता आड । कोणा लोकलाज नाड ॥१॥ कैंचा राम अभागिया । करी वटवट वांयां ॥२॥ स्मरणाचा राग । क्रोधें विटाळलें अंग ॥३॥ तुका म्हणे जडा । काय चाले या दगडा ॥४॥

१२१६. आपुलिया काजा । आम्हीं सांडियलें लाजा ॥१॥ तुम्हां असों जागवीत । आपुलिया हातीं हित ॥२॥ तुम्हीं देहशून्य । आम्हां कळे पापपुण्य ॥३॥ सांगायासी लोकां । उरउरीत उरला तुका ॥४॥

१२१७. सत्य आम्हां मनीं । नव्हों गाबाळाचे धनी ॥१॥ ऐसें जाणा रे सकळ । भरा शुद्ध टाका मळ ॥२॥ देतों तीक्ष्ण उत्तरें । पुढें व्हावयासी बरें ॥३॥ तुका म्हणे बरें घडे । देशोदेशीं चाले कोडें ॥४॥

१२१८. शिकवूनि हित । सोयी लावावे हे नीत ॥१॥ त्याग करूं नये खरें । ऐसें विचारावें बरें ॥२॥ तुमचिया तोंडें । धर्माधर्माचींच खंडें ॥३॥ मजसाठीं देवा । कांहो लपविला हेवा ॥४॥ जाला सावधान । त्यासी घालावें भोजन ॥५॥ तुका म्हणे पिता । वरी बाळाच्या तो हिता ॥६॥

१२१९. सुख सुखा भेटे । मग तोडिल्या न तुटे ॥१॥ रवि रश्मिकळा । नये घालितां पैं डोळां ॥२॥ दुरि तें जवळी । स्नेहें आकाशा कवळी ॥३॥ तुका म्हणे चित्त । माझें पायीं अखंडित ॥४॥

१२२०. तुम्हां न पडे वेच । माझा सरेल संकोच ॥१॥ फुकासाठीं जोडे यश । येथें कां करा आळस ॥२॥ कृपेचें भुकेलें । होय जीवदान केलें ॥३॥ तुका म्हणे शिकविलें । माझें ऐकावें विठ्ठलें ॥४॥

१२२१. लोक म्हणती मज देव । हा तो अधर्म उपाव ॥१॥ आतां कळेल तें करीं । सीस तुझे हातीं सुरी ॥२॥ अधिकार नाहीं । पूजा करिती तैसा कांहीं ॥३॥ मन जाणे पापा । तुका म्हणे मायबापा ॥४॥

१२२२. एका म्हणतां भलें । आणिका सहजचि निंदिलें ॥१ ॥ कांहीं न करितां सायास । सहज घडले ते दोष ॥२॥ बरेवाईटाचें । नाही मज कांहीं साचें ॥३॥ तुका म्हणे वाणी । खंडोनि राहावें चिंतनीं ॥४॥

१२२३. आणिलें सेवटा । आतां कामा नये फांटा ॥१॥ मज आपुलेंसें म्हणा । उपरि या नारायणा ॥२॥ वेचियेली वाणी । युक्ती अवघी चरणीं ॥३॥ तुका धरी पाय । क्षमा करवूनि अन्याय ॥४॥

१२२४. न करा टांचणी । येथें कांहीं आडचणी ॥१॥ जिव्हा अमुप करी माप । विठ्ठल

पिकला माझा बाप ॥२॥ आठही प्रहर । बारा मास निरंतर ॥३॥ तुका म्हणे वाणी । वर्जेना हे घेता धणी ॥४॥

१२२५. तुझ्या नामाची आवडी । आम्ही विठो तुझीं वेडीं ॥१॥ आतां न वजों आणिकां ठाया । गाऊं गीत लागों पायां ॥२॥ काय वैकुंठ बापुडें । तुझ्या प्रेमसुखापुढें ॥३॥ संतसमागममेळे। प्रेमसुखाचा सुकाळ ॥४॥ तुका म्हणे तुझ्या पायीं। जन्ममरणा ठाव नाहीं ॥५॥

१२२६. साकरेंच्या योगें वर्ख । राजा कागदातें देखे ॥१॥ तैसें आम्हां माणुसपण । रामनाम केण्यागुणें ॥२॥ फिरंगीच्या योगें करी । राजा काष्ठ हातीं धरी ॥३॥ रत्नकनका योगें लाख । कंठीं धरिती श्रीमंत लोक ॥४॥ देवा देवपाट । देव्हाऱ्यावरी बैसे स्पष्ट ॥५॥ ब्रह्मानंदयोगें तुका । पढीयंता जनलोकां ॥६॥

१२२७. धनवंतालागीं । सर्व मान्यता हे जगीं ॥१॥ माता पिता बंधु जन । सर्व मानिती वचन ॥२॥ जंव चाले मोठा धंदा । तंव बहिण म्हणे दादा ॥३॥ सदा शृंगारभूषणें । कांता लवे बहुमानें ॥४॥ तुका म्हणे धन । भाग्य अशाश्वत जाण ॥५॥

१२२८. न विचारतां ठायाठाव । काय भुंके तो गाढव ॥२॥ केला तैसा लाहे दंड । खळ अविचारी लंड ॥३॥ करावें लाताळें । ऐसें नेणें कोण्या काळें ॥३॥ न कळे उचित । तुका म्हणे नीत हित ॥४॥

१२२९. कंठीं नामसिक्का । आतां कळिकाळासी धक्का ॥१॥ रोखा माना कीं सिक्का माना । रोखा सिक्का तत्समाना ॥२॥ रोखा न मना कां न मना । जतन करा नाक काना ॥३॥ सिक्का न मनी रावण । त्याचें केलें निसंतान ॥४॥ सिका मानी हळाहळ । जालें सर्वांग शीतळ ॥५॥ तुका म्हणे नाम सिक्का । पटीं बैसविलों निजसुखा ॥६॥

१२३०. भूतीं देव म्हणोनि भेटतों या जना । नाहीं हे भावना नरनारी ॥१॥ जाणे भाव पांडुरंग अंतरींचा । नलगे द्यावा साचा परिहार ॥२॥ दयेसाठीं केला उपाधिपसारा । जड जीवा तारा नाव कथा ॥३॥ तुका म्हणे नाहीं पडत उपवास । फिरतसे आस धरोनिया ॥४॥

१२३१. हारपल्याची नका चित्तीं । धरूं खंती वांयांच ॥१॥ पावलें तें म्हणा देवा । सहज सेवा या नांवें ॥२॥ होणार तें भोगें घडे । लाभ जोडे संकल्पें ॥३॥ तुका म्हणे मोकळें मन । अवघें पुण्य या नांवें ॥४॥

१२३२. नेसणें आलें होतें गळ्या । लोक रळ्या करिती ॥१॥ आपणियां सावरिलें । जग भलें आपण ॥२॥ संबंध तो तुटला येणें । जागेपणें चेष्टांच्या ॥३॥ भलती सवा होती अंगें । बासर वेगें पडिलें ॥४॥ सावरिलें नीट वोजा । दृष्टिलाजा पुढिलांच्या ॥५॥ बरे उघडिलें डोळे । हळहळेपासूनि ॥६॥ तुका म्हणे विटंबना । नारायणा चुकली ॥७॥

१२३३. जिव्हा जाणे फिकें मधुर कीं क्षार । येर मांस पर हातास न कळे ॥१॥ देखावें नेत्रीं बोलावें मुखें । चित्ता सुखदु:खे कळों येती ॥२॥ परिमळासी घ्राण ऐकती श्रवण । एकाचें कारण एका नव्हे ॥३॥ एके देहीं भिन्न ठेवियेल्या कळा । नाचवी पुतळा सूत्रधारी ॥४॥ तुका म्हणे ऐशी जयाची सत्ता । कां तया अनंता विसरलेती ॥५॥

१२३४. नलगे द्यावा जीव सहजचि जाणार । आहे तो विचार जाणा कांहीं ॥१॥ मरण जो मागें गाढवाचा बाळ । बोलिजे चांडाळ शुद्ध त्यासी ॥२॥ तुका म्हणे कांहीं होईल स्वहित । निधान जो थीत टाकूं पाहे ॥३॥

१२३५. मोल वेचूनियां धुंडिती सेवका । आम्ही तरी फुका मागों बळें ॥१॥ नसतां जवळी हित फार करूं । जीवभाव धरूं तुझ्या पायीं ॥२॥ नेदु भोग आम्ही आपुल्या शरीरा । तुम्हांसी दातारा व्हावें म्हणून ॥३॥ कीर्ती तुझी करूं आमुचे सायास । तूं कां रे उदास पांडुरंगा ॥४॥ तुका म्हणे तुज काय मागों आम्ही । फुकाचे का ना मी म्हणसी ना ॥५॥

१२३६. काय लवणकणिकेविण । एके क्षीण सागर ॥१॥ मा हे येवढी अडचणी । नारायणीं मजविण ॥२॥ कुबेरा अट्टाहासें जोडी । काय कवडी कारणें ॥३॥ तुका म्हणे काचमणी । कोण गणी भांडारी ॥४॥

१२३७. तुज मज नाहीं भेद । केला सहज विनोद ॥१॥ तूं माझा आकार । मी तों तूंची निर्धार ॥२॥ मी तुजमाजी देवा । घेसी माझ्या अंगे सेवा ॥३॥ मी तुजमाजी अचळ । मजमाजी तुझें बळ ॥४॥ तूं बोलसी माझ्या मुखें । मी तों तुजमाजी सुखें ॥५॥ तुका म्हणे देवा । विपरीत ठायीं नांवा ॥६॥

१२३८. वैराग्याचें भाग्य । संतसंग हाचि लाग ॥१॥ संतकृपेचे हे दीप । करी साधका निष्पाप ॥२॥ तोचि देवभक्त । भेदाभेद नाहीं ज्यांत ॥३॥ तुका प्रेमें नाचे गाय । गाणियांत विरोन जाय ॥४॥

१२३९. जप तप ध्यान नलगे धारणा । विठ्ठल कीर्तनामाजी उभा ॥१॥ राहें माझ्या मना दृढ या वचनीं । आणिक तें मनीं न धरावें ॥२॥ कीर्तनीं समाधि साधन ते मुद्रा । राहतील थारा धरोनियां ॥३॥ तुका म्हणे मुक्ति हरिदासांच्या घरीं । ओळगती चारी ऋद्धिसिद्धि ॥४॥

१२४०. नाहीं तुज कांहीं मागत संपत्ती । आठवण चित्तीं असो द्यावी ॥१॥ सरलिया भोग येईन सेवटीं । पायापें या भेटी अनुसंधानें ॥२॥ आतां मजसाठीं याल आकारास । रोकडी हे आस नाहीं देवा ॥३॥ तुका म्हणे मुखीं असो तुझें नाम । देईल तो श्रम देवो काळ ॥४॥

१२४१. हितावरी यावें । कोणी बोलिलों या भावें ॥१॥ नव्हे विनोदउत्तर । केले रंजवाया चार ॥२॥ केली अटाअटी । अक्षरांची देवासाठीं ॥३॥ तुका म्हणे खिजों ।

नका जागा तेथें निजों ॥४॥

१२४२. संचित प्रारब्ध क्रियमाण । अवघा झाला नारायण । नाहीं आम्हांसी संबंधु । जरा मरण कांहीं बाधु ॥२॥ द्वैताद्वैतभावें । अवघें व्यापियेलें देवें ॥३॥ तुका म्हणे हरि । आम्हांमाजी क्रीडा करी ॥४॥

१२४३. नेणें करूं सेवा । पांडुरंगा कृपाळुवा ॥१॥ धांवें बुडतों मी काढीं । सत्ता आपुलिया ओढीं ॥२॥ क्रियाकर्महीन । जालों इंद्रियां अधीन ॥३॥ तुका विनंती करी । वेळोवेळां पाय धरी ॥४॥

१२४४. जयापासोनि सकळ । महीमंडळ हें जालें ॥१॥ तो एक पंढरीचा राणा । नये अनुमाना श्रुतीसी ॥२॥ विवादती जयासाठीं । जगजेठी तो विठ्ठल ॥३॥ तुका म्हणे आकळ । आहे सकळ व्यापक ॥४॥

१२४५. नाहीं रूप नाहीं नांव । नाहीं ठाव धराया ॥१॥ जेथें जावें तेथें आहे । विठ्ठल मायबहीण ॥२॥ नाहीं आकार विकार । चराचर भरलेंसे ॥३॥ नव्हे निर्गुण सगुण । जाणे कोण तयासी ॥३॥ तुका म्हणे भावाविण । त्याचें मन वोळेना ॥५॥

१२४६. आहे सकळां वेगळा । खेळे कळा चोरोनि ॥१॥ खांब सूत्राचिये परी । देव दोरी हालवितो ॥२॥ आपण राहोनि निराळा । कैसी कळा नाचवी ॥३॥ जेव्हां आसुडितो दोरी । भूमीवरी पडें तेव्हां ॥४॥ तुका म्हणे तो जाणावा । सखा करावा आपुला ॥५॥

१२४७. आतां पुढें मना । चाली जाली नारायणा ॥१॥ येथें राहिलें राहिलें । कैसें गुंतुनि उगलें ॥२॥ भोंवतें भोंवणी । आलियाची जाली धणी ॥३॥ तुका म्हणें रंगें । रंगीं रंगलें श्रीपांडुरंगें ॥४॥

१२४८. आळस पाडी विषयकामीं । शक्ती देईं तुझ्या नामीं ॥१॥ आणिक वचना मुकी वाणी । तुमच्या गर्जों द्यावी गुणीं ॥२॥ हेचि विनवणी । विनविली धरा मनीं ॥३॥ तुका म्हणे पाय डोळां । पाहें एरवी आंधळा ॥४॥

१२४९. कोण वेची वाणी । आतां क्षुल्लका कारणीं ॥१॥ आतां हेंचि माप करूं । विठ्ठल हृदयांत धरूं ॥२॥ नेंदाविया वृत्ति । आतां उठोंचि बहुती ॥३॥ उपदेश लोकां । करुनी वेडा होतो तुका ॥४॥

१२५०. मागेन तें एक तुज । देईं विचारोनि मज ॥१॥ नको दुर्जनाचा संग । क्षणक्षणा चित्तभंग ॥२॥ जन्म घेईन मी नाना । बहु सोसीन यातना ॥३॥ रंक होईन दीनांचा । घायें देहपात साचा ॥४॥ तुका म्हणे हेंचि आतां । देईं देईं तूं सर्वथा ॥५॥

१२५१. जाणसी उचित । पांडुरंगा धर्मनीत ॥१॥ तरि म्यां बोलावें तें काई । सरे ऐसें तुझे पायीं ॥२॥ पालटती क्षण । संचित प्रारब्ध क्रियमाण ॥३॥ तुका म्हणे सत्ता ।

होसी सकळ करिता ॥४॥

१२५२. तुम्ही कांटाळलां तरी । आम्हां न सोडणें हरी ॥१॥ जावें कवणिया ठाया । सांगा विनवितों पाया ॥२॥ केली जिवा साठी । आतां सुखें लागों पाठी ॥३॥ तुका म्हणे ठाव । न सोडणें हाचि भाव ॥४॥

१२५३. येउनि संसारीं । मी तों एक जाणे हरी ॥१॥ नेणें आणिक कांहीं धंदा । नित्य ध्यातसें गोविंदा ॥२॥ कामक्रोधलोभस्वार्थ । अवघा माझा पंढरिनाथ ॥३॥ तुका म्हणे एक । धणी विठ्ठल मी सेवक ॥४॥

१२५४. सर्वपक्षीं हरि साहे सखा जाला । ओल्या अंगणीच्या कल्पलता त्याला ॥१॥ सहजचाली चालतां पायवाटे । चिंतामणीसमान होती गोटे ॥२॥ तुका तरी सहज बोले वाणी । त्याचे घरीं वेदान्त वाहे पाणी ॥३॥

१२५५. आम्हां घरीं एक गाय दुभताहे । पान्हा न समाये त्रिभुवनीं ॥१॥ वान ते सांवळी नांव तें श्रीधरा । चरे वसुंधरा चौदा भुवनें ॥२॥ वत्स नाहीं माय भलत्यासवें जाय । कुर्वाळी तो लाहे भावभरणा ॥३॥ चहूं धारीं क्षीर वोळली अमुप । धालें सनकादिक सिद्ध मुनी ॥४॥ तुका म्हणे माझी भूक तेथें काय । जोगाविते माय तिन्ही लोक ॥५॥

१२५६. काय पुण्य ऐसें आहे मजपाशीं । तांतडी धांवसी पांडुरंगा ॥१॥ काय ऐसा भक्त वांयां गेलों थोर । तूं मज समोर होसी वेगा ॥२॥ काय कष्ट माझी देखिली चाकरी । तो तूं झडकरी पाचारिशी ॥३॥ कोण मी नांवाचा थोर गेलों मोठा । अपराधी करंटा नारायणा ॥४॥ तुका म्हणे नाहीं ठाऊकें संचित । येणें जन्में हित नाहीं केलें ॥५॥

१२५७. आमुचिया भावें तुज देवपण । तें कां विसरोन राहिलासी ॥१॥ समर्थासी नाहीं उपकारस्मरण । दिल्या आठवण वांचोनियां ॥२॥ चळण वळण सेवकाच्या बळें । निर्गुणाच्यामुळें सांभाळावें ॥३॥ तुका म्हणे आतां आलों खंडावरी । प्रेम देउनि हरी बुझवावें ॥४॥

१२५८. आम्ही मेलों तेव्हां देह दिला देवा । आतां करूं सेवा कोणाची मी ॥१॥ सूत्रधारी जैसा हालवितो कळा । तैसा तो पुतळा नाचे छंदें ॥२॥ बोलतसें जैसें बोलवितो देव । मज हा संदेह कासयाचा ॥३॥ पाप पुण्य ज्याचें तोचि जाणे कांहीं । संबंध हा नाहीं आम्हांसवें ॥४॥ तुका म्हणे तुम्हीं आइका हो मात । आम्ही या अतीत देहाहूनी ॥५॥

१२५९. लागों नेदी बोल पायां तुझ्या हरी । जीव जावो परि न करीं आन ॥१॥ परनारी मज रखुमाईसमान । वमनाहूनि धन नीच मानी ॥२॥ तुका म्हणे याची लाज असे कोणा । साहाकारी दीना ज्याची तया ॥३॥

१२६०. हेचि भेटी साच रूपाचा आठव। विसावला जीव आवडीपैं ॥१॥ सुखाचे भातुकें करावें जतन। सेविल्या तहान भूक जाय ॥२॥ दुरील जवळी आपणचि होतें। कवळिलें चित्तें जीवनासी ॥३॥ तुका म्हणे नाम घेतां वेळोवेळा। होतील शीतळा सकळा नाडी ॥४॥

१२६१. आपुलिया बळें नाहीं मी बोलत। सखा कृपावंत वाचा त्याची ॥१॥ साळुंकी मंजुळ बोलतसे वाणी। शिकविता धणी वेगळाची ॥२॥ काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें। परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥३॥ तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा। वागवी पांगुळा पायांविण ॥४॥

१२६२. हित सांगे तेणें दिलें जीवदान। घातकी तो जाण मनामागें ॥१॥ बळें हे वारावे अधर्म करितां। आंधळें चालतां आडरानें ॥२॥ द्रव्य देऊनियां धाडावें तीर्थासी। नेदावें चोरासी चंद्रबळ ॥३॥ तुका म्हणे ऐसें आहे हें पुराणीं। नाहीं माझी वाणी पदरींची ॥४॥

१२६३. ऐसा घेईं कां रे संन्यास। करीं संकल्पाचा नाश ॥१॥ मग तूं राहें भलते ठायीं। जनीं वनीं खाटे भोई ॥२॥ तोडीं जाणिवेची कळा। होई वृत्तीसी वेगळा ॥३॥ तुका म्हणे नभा। होईं अणूचाही गाभा ॥४॥

१२६४. सोळा सहस्र होऊं येतें। भरलें रितें आम्हां पैं ॥१॥ ऐसें तुम्हां ठायाठाव। म्हूण देव संपादे ॥२॥ कैंचीं चिरामध्यें चिरें। मना बरें आलें तैं ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगा। अंगसंगा भिन्न करा ॥४॥

१२६५. इहलोकीं आम्हां भूषण अवकळा। भोपळा वाकळा अन्न भिक्षा ॥१॥ निमोली संपदा भयविरहित। सर्वकाळ चित्त समाधान ॥२॥ छिद्राचा आश्रम उंदीरकुळवाडी। धन नाम जोडी देवाची ते ॥३॥ तुका म्हणे एके सेवटीं राहणें। वर्ततां या जनाविरहित ॥४॥

१२६६. गाऊं नेणें कळा कुसरी। कान धरोनि म्हणें हरी ॥१॥ माझ्या बोबडिया बोला। चित्त द्यावें बा विठ्ठला ॥२॥ मज हंसतील लोक। परी मी गाईन निःशंक ॥३॥ तुझे नामीं मी निर्लज्ज। काय जनासवें काज ॥४॥ तुका म्हणे माझी विनंती। तुम्ही परिसा कमळापती ॥५॥

१२६७. विष पोटीं सर्पा। जन भीतें तया दर्पा ॥१॥ पंच भूतें नाहीं भिन्न। गुण दुःख देती सीण ॥२॥ चंदन प्रिय वासें। आवडती जाती ऐसें ॥३॥ तुका म्हणे दाणा। कुचर मिळों नये अन्ना ॥४॥

१२६८. देव अवघें प्रतिपादी। वंदी सकळां एका निंदी ॥१॥ तेथें अवघें गेलें वायां। विष घास एके ठायां ॥२॥ सर्वांग कुरवाळी। उपटो एक रोमावळी ॥३॥ तुका म्हणे चित्त। नाहीं जयाचें अंकित ॥४॥

१२६९. मज माझा उपदेश। आणिकां नये याची रीस ॥१॥ तुम्ही अवघे पांडुरंग। मीच

दुष्ट सकळ चांग ॥२॥ तुमचा मी शरणागत । कांहीं करा माझें हित ॥३॥ तुका पाय धरी । मी हें माझें दूर करीं ॥४॥

१२७०. जाणे त्याचें वर्म नेणे त्याचें कर्म । केल्याविण धर्म नेणवती ॥१॥ मैथुनाचें सुख सांगितल्या खूण । अनुभवाविण कळों नये ॥२॥ तुका म्हणे जळो शाब्दिक हें ज्ञान । विठोबाची खूण विरळा जाणे ॥३॥

१२७१. अभिमानी पांडुरंग । गोवा काशाचा हो मग ॥१॥ अनुसरा लवलाहीं । नका विचार करूं काहीं ॥२॥ कोठें राहातील पापें । जालिया हो अनुतापें ॥३॥ तुका म्हणे येचि घडी । उभ्या पावईल थडी ॥४॥

१२७२. तुझें वर्म हातीं । दिलें सांगोनियां संतीं ॥१॥ मुखीं नाम धरीन कंठीं । अवघा सांठवीन पोटीं ॥२॥ नवविधा वेढिन आधीं । सांपडलासी भावासंधी ॥३॥ तुका म्हणे बळिये गाढे । कळिकाळ पायां पडे ॥४॥

१२७३. माझ्या मना लागो चाळा । पहावया विठ्ठल डोळां ॥१॥ आणिक नाहीं चाड । नलगे संसार हा गोड ॥२॥ तरिच फळ जन्मा आलों । सरता पांडुरंगीं जालों ॥३॥ तुका म्हणे देवा । देईं चरणाची सेवा ॥४॥

१२७४. अवघें जेणें पाप नासे । तें हें असे पंढरीसी ॥१॥ गात जागा गात जागा । प्रेम मागा विठ्ठला ॥२॥ अवघी सुखाचीच रासी । पुंडलिकाशीं वोळली ॥३॥ तुका म्हणे जवळी आलें । उभें ठेलें समचरणीं ॥४॥

१२७५. देह तुझ्या पायीं । ठेवूनि जालों उतराई ॥१॥ आतां माझ्या जीवा । करणें तें करीं देवा ॥२॥ बहुत अपराधी । मतिमंद हीन बुद्धि ॥३॥ तुका म्हणे नेणें । भावभक्तीचीं लक्षणें ॥४॥

१२७६. जन हें सुखाचें दिल्याघेतल्याचें । अंत हें काळींचें नाहीं कोणी ॥१॥ जाल्या हीन शक्ति नाकडोळे गळती । सांडोनियां पळती रांडापोरें ॥२॥ बाइल म्हणे खर मरता तरी बरें । नासिलें हें घर थुंकोनियां ॥३॥ तुका म्हणे माझीं नव्हतील कोणी । तुज चक्रपाणी वांचूनियां ॥४॥

१२७७. जाणोनि नेणतें करी माझें मन । तुझी प्रेमखूण देऊनियां ॥१॥ मग मी व्यवहारीं असेन वर्तत । जेवीं जळा आंत पद्मपत्र ॥२॥ ऐकोनि नाईकें निंदास्तुति कानीं । जैसा कां उन्मनीं योगिराज ॥३॥ देखोनि न देखें प्रपंच हा दृष्टीं । स्वप्नींचिया सृष्टि चेइल्या जेवीं ॥४॥ तुका म्हणे ऐसें जालियावांचून । करणें तो शीण वाटतसे ॥५॥

१२७८. विठ्ठला विठ्ठला । कंठ आळवितां फुटला ॥१॥ कां रे कृपाळू न होसी । काय

जालें मजविशीं ॥२॥ जाल्या वेरझारा । जन्मा बहुतांचा फेरा ॥३॥ तुका म्हणे नष्टा । अबोलण्या तुझ्या चेष्टा ॥४॥

१२७९. प्रपंच वोसरो । चित्त तुझे पायीं मुरो ॥१॥ ऐसें करीं गा पांडुरंगा । शुद्ध रंगवावें रंगा ॥२॥ पुरे पुरे आतां । नको दुजियाचीं सत्ता ॥३॥ लटिकें तें फेडा । तुका म्हणे जाय पीडा ॥४॥

१२८०. बोलाचें गौरव । नव्हे माझा हा अनुभव ॥१॥ माझी हरिकथा माउली । नव्हे आणिकांसी पांगिली ॥२॥ व्याली वाढविलें । निजपदीं निजविलें ॥३॥ दाटली वोरसें । त्रिभुवन ब्रह्मरसें ॥४॥ विष्णु जोडी कर । माथां रज वंदी हर ॥५॥ तुका म्हणे बळ । तोडरीं हा कळिकाळ ॥६॥

१२८१. सेवट तो भला । माझा बहु गोड जाला ॥१॥ आलों निजाच्या माहेरा । भेटी रखुमाईच्या वरा ॥२॥ परिहार जाला । अवघ्या दुःखाचा मागिला ॥३॥ तुका म्हणे वाणी । गेली आतां घेऊं धणी ॥४॥

१२८२. तुझें नाम गाऊं आतां । तुझ्या रंगीं नाचों था था ॥१॥ तुझ्या नामाचा विश्वास । आम्हां कैंचा गर्भवास ॥२॥ तुझे नामीं विसर पडे । तरी कोटी हत्या घडे ॥३॥ नाम घ्यारे कोणी फुका । भावें सांगतसे तुका ॥४॥

१२८३. बाइल तरी ऐसी व्हावी । नरकीं गोवी अनिवार ॥१॥ घडों नेदी तीर्थयात्रा । केला कुतरा हातसोंका ॥२॥ आपुलीच करवी सेवा । पुजवी देवासारिखें ॥३॥ तुका म्हणे गाढव पशु । केला नाशु आयुष्या ॥४॥

१२८४. बाइले अधीन होय ज्याचें जिणें । तयाच्या अवलोकनें पडिजे द्वाड ॥१॥ कासया ते जंत जिताती संसारीं । माकडाच्या परी गारोड्यांच्या ॥२॥ बाइलेच्या मना येईल तें खरें । अभागी तें पुरें बाइलेंचें ॥३॥ तुका म्हणे मेंग्या गाढवाचें जिणें । कुतऱ्याचें खाणें लगबगा ॥४॥

१२८५. जगीं मान्य केलें हा तुझा देकार । कीं कांहीं विचार आहे पुढें ॥१॥ करितों कवित्व जोडितों अक्षरें । येणें काय पुरें जालें माझें ॥२॥ तोंवरि हे माझी न सरे करकर । जों नव्हे विचार तुझ्या मुखें ॥३॥ तुका म्हणे तुज पुंडलिकाची आण । जरि कांहीं वंचन करिसी मज ॥४॥

१२८६. झड मारोनिया बैसलों पंगती । उठवितां फजिती दातयाची ॥१॥ काय तें उचीत तुम्हां कां न कळे । कांहो झांका डोळे पांडुरंगा ॥२॥ घेईन इच्छेचें मागोनि सकळ । नाहीं नव्हे काळ बोलायाचा ॥३॥ तुका म्हणे जालों गगनाधिकारी । नाहीं लोक परी लाज देवा ॥४॥

१२८७. माझ्या वडिलांची मिरासी गा देवा । तुझी चरणसेवा पांडुरंगा ॥१॥ उपवास

पारणीं राखिला दारवंटा । केला भोग वटा आम्हालागीं ॥२॥ वंशपरंपरा दास मी अंकिता । तुका मोकलितां लाज कोणां ॥३॥

१२८८. नाम न वदे ज्याची वाचा । तो लेंक दो बापांचा ॥१॥ हेचि ओळखी तयाची । खूण जाणा अभक्ताची ॥२॥ ठावा नाहीं पांडुरंग । जाणा जातीचा तो मांग ॥३॥ ज्यासी विठ्ठल नाहीं ठावा । त्याचा संग न करावा ॥४॥ नाम न म्हणे ज्याचें तोंड । तेंचि चर्मकाचें कुंड ॥५॥ तुका म्हणे त्याचे दिवशीं । रांड गेली महारापाशीं ॥६॥

१२८९. पतित मिराशी शरण आलों तुज । राखीं माझी लाज पांडुरंगा ॥१॥ तारियेले भक्त नकळे तुझा अंत । थोर मी पतित पांडुरंगा ॥२॥ द्रौपदी बहिणी वैरीं गांजियेली । आपणाऐसी केली पांडुरंगा ॥३॥ प्रल्हादाकारणें स्तंभीं अवतार । माझा कां विसर पांडुरंगा ॥४॥ सुदामा ब्राह्मण दरिद्रें पीडिला । आपणाऐसा केला पांडुरंगा ॥५॥ तुका म्हणे तुज शरण निजभावें । पाप निर्दाळावें पांडुरंगा ॥६॥

१२९०. कस्तूरीचें रूप अति हीनवर । माजी असे सार मोल तया ॥१॥ आणीकही तैसीं चंदनाचीं झाडें । परिमळें वाढे मोल तयां ॥२॥ काय रूपें असे परीस चांगला । धातु केली मोला वाढ तेणें ॥३॥ फिरंगी आटितां नये बारा रूके । गुणें मोलें विके सहस्त्रवरी ॥४॥ तुका म्हणे नाहीं जातीसवें काम । ज्याचे मुखीं नाम तोचि धन्य ॥५॥

१२९१. नव्हे मी स्वतंत्र अंगाचा पाईक । जे हे सकळिक सत्ता वारूं ॥१॥ तुम्हां आळवावें पाउलापाउलीं । कृपेची साउली करीं मज ॥२॥ शक्तिहीन तरी जालों शरणागत । आपुला वृत्तांत जाणोनियां ॥३॥ तुका म्हणे भवाभेणें धरिले पाय । आणीक उपाय नेणें कांहीं ॥४॥

१२९२. पाहों ग्रंथ तरी आयुष्य नाहीं हातीं । नाहीं ऐशी मति अर्थ कळे ॥१॥ होईल तें हो या विठोबाच्या नांवें । अर्जिलें तें भावें जीवीं धरूं ॥२॥ एखादा अंगासी येईल प्रकार । विचारितां फार युक्ति वाढे ॥३॥ तुका म्हणे आळी करितां गोमटी । मायबापा पोटीं येते दया ॥४॥

१२९३. पाहातां रूप डोळां भरे । अंतर नुरे वेगळें । इच्छावशें खेळ मांडी । अवघें सांडी बाहेरी ॥१॥ तो हा नंदा नंदन बाइये । यासी काय परिचार वो ॥२॥ दिसतो हा नोहे तैसा । असे दिशाव्यापक । लाघव हा खेळासाठीं । होतां भेटी परतेना ॥३॥ म्हणोनि उभी ठाकलीये । परतलीये या वाटा । आड करोनियां तुका । जो या लोकां दाखवितो ॥४॥

१२९४. इंद्रियांचीं दीनें । आम्ही केलों नारायणें ॥१॥ म्हणऊनि ऐसे सोसी । काय सांगों कोणापाशीं ॥२॥ नाहीं अंगीं बळ । त्याग करिजेसा सकळ ॥३॥ तुका म्हणे

मोठें । प्रारब्ध हें होतें खोटें ॥४॥

१२९५. हातीं धरूं जावें । तेणें परतेंचि व्हावें ॥१॥ ऐसा कां हो आला वांटा । हीन भाग्याचा करंटा ॥२॥ देव ना संसार । दोहीं ठायीं नाहीं थार ॥३॥ तुका म्हणे पीक । भूमि नेदी न मिळे भीक ॥४॥

१२९६. मोलें घातलें रडाया । नाहीं असूं आणि माया ॥१॥ तैसा भक्तिवाद काय । रंगबेगडीचा न्याय ॥२॥ वेठी धरिल्या दावी भाव । मागें पळायाचा पाव ॥३॥ काजव्याच्या ज्योती । तुका म्हणे नलगे वाती ॥४॥

१२९७. तरिच जन्मा यावें । दास विठोबाचें व्हावें ॥१॥ नाहीं तरि काय थोडीं । श्वानसूकरें बापुडीं ॥२॥ ज्याल्याचें तें फळ । अंगीं लागों नेदी मळ ॥३॥ तुका म्हणे भले । ज्याच्या नांवें मानवलें ॥४॥

१२९८. द्या जी माझा विचारोनियां विभाग । न खंडे हा लाग आहाचपणें ॥१॥ किती नेणों तुम्हां साहाते कटकट । आम्हीच वाईट निवडलों ते ॥२॥ करवितां कलह जिवाचियेसाठीं । हे तुम्हा वोखटी ढाळ देवा ॥३॥ तुका म्हणे धीर कारणा आपुला । तुम्हीं तों विठ्ठला मायातीत ॥४॥

१२९९. आमुचे ठाऊके तुम्हां गर्भवास । बळिवंत दोष केले भोग ॥१॥ काय हा सांगावा नसता नवलाव । मैंदपणें भाव भुलवणेचा ॥२॥ एका पळवूनि एका पाठी लावा । कवतुक देवा पहावया ॥३॥ तुका म्हणे जेणें असें चेतविलें । त्याच्यानें उगलें कैसें नव्हे ॥४॥

१३००. निर्दयासी तुम्ही करितां दंडण । तुमचें गाऱ्हाणें कोठें द्यावें ॥१॥ भाकितों करुणा ऐकती कान । उगलेंचि मौन्य धरिलें ऐसें ॥२॥ दीनपणें पाहें पाय भिडावोनि । मंजुळा वचनीं विनवीतसें ॥३॥ तुका म्हणे गांठी मनाची उकला । काय जी विठ्ठला पाहातसां ॥४॥

१३०१. नसतों किविलवाणें । कांही तुमच्या कृपादानें ॥१॥ हेचि तयाची ओळखीं । धालें टवटवित मुखीं ॥२॥ वांयां जात नाहीं । वचन प्रीतीचें तें कांहीं ॥३॥ तुका म्हणे देवा । सत्य येतें अनुभवा ॥४॥

१३०२. जालों तंव साचें । दास राहवणें काचें ॥१॥ हें कां मिळतें उचित । तुम्ही नेणां कृपावंत ॥२॥ सिंहाचें तें पिले । जाय घेऊनियां कोल्हें ॥३॥ तुका म्हणे नास । आम्हां म्हणविल्या दास ॥४॥

१३०३. देवाच्या उद्देशें जेथें जेथें भाव । तो तो वसे ठाव विश्वंभर ॥१॥ लोभाचे संकल्प पळालियावरी । कैंची तेथें उरी पापपुण्या ॥२॥ शुद्ध भक्ती मन जालिया निर्मळ । कुश्चळीं विटाळ वज्रलेप ॥३॥ तुका म्हणे ज्याचें तयासीच कळे । प्रांत येतो फळें कळों मग ॥४॥

१३०४. कडसणी धरितां अडचणीचा ठाव । म्हणऊनि जीव त्रासलासे ॥१॥ लौकिकाबाहेरि राहिलों निराळा । तुजविण वेगळा नाहीं दुजा ॥२॥ संकोचानें नाहीं होत धणीवरी । उरवूनी उरी काय काज ॥३॥ तुका म्हणे केले इच्छेचि सारिखें । नाहींसें पारिखें येथें कोणी ॥४॥

१३०५. हेंचि जतन करा दान । धरुनि चरण राहिलों ते ॥१॥ घ्यावी माझ्या हातें सेवा । हेचि देवा विनवणी ॥२॥ आणीक कांहीं न घालीं भार । बहुत फार सांकडें ॥३॥ तुका तुमचा म्हणवी दास । त्याची आस पुरवावी ॥४॥

१३०६. आपल्याच फुंदे । जेथें तेथें घेती छंदें ॥१॥ पडला सत्याचा दुष्काळ । बहु फार जाली घोंळ ॥२॥ विश्वाचे माठ । त्याचे कपाळीं तें नाट ॥३॥ तुका म्हणे घाणा । मूढा तीर्थी प्रदक्षिणा ॥४॥

३०७. उद्योगाची धांव बैसली आसनीं । पडिलें नारायणीं मोटळें हें ॥१॥ सकळ निश्चिंती जाली हा भरंवसा । नाहीं गर्भवासा येणें ऐसा ॥२॥ आपुलिया सत्ते नाहीं आम्हां जिणें । अभिमान तेणें नेला देवें ॥३॥ तुका म्हणे चळे एकाचिया सत्ते । आपुलें मी रितेपणें असें ॥४॥

१३०८. बहुतां पुरे ऐसा वाण । आलें धन घरासी ॥१॥ घ्या रे फुका मोलेंविण । नारायण न भुला ॥२॥ ऐका निवळल्या मनें । बरव्या कानें सादर ॥३॥ तुका म्हणे करूनि अंतीं । निश्चिंती हे ठेवावी ॥४॥

१३०९. माझी मज जाती आवरली देवा । न व्हावा या गोवा इंद्रियांचा ॥१॥ कासया मी तुझा म्हणवितों दास । असतों उदास सर्व भावें ॥२॥ भयाचिये भेणें धरियेली कास । न पुरतां आस काय थोरी ॥३॥ तुका म्हणे आपआपलीं जतन । कैंचें थोरपण मग तुम्हां ॥४॥

१३१०. विनवितों तरी आणितोसि परी । याचकानें थोरी दातयाची ॥१॥ आमुचेही कांहीं असों द्या उपकार । एकल्यानें थोर कैंचे तुम्ही ॥२॥ न घ्यावी जी कांही बहुसाल सेवा । गौरव तो देवा यत्न कीजे ॥३॥ तुका म्हणे नाहीं आमुची मिरासी । असावेंसीं ऐसीं दुर्बळेंचि ॥४॥

१३११. एका ऐसें एक होतें कोणा काळें । समर्थाच्या बळें काय नव्हे ॥१॥ घालूनि बैसलों मिरासीस पाया । जिंको देवराया संदेह नाहीं ॥२॥ केला तो न संडीं आतां कइवाड । वारीन हे आड कामक्रोध ॥३॥ तुका म्हणे जाली आळसाची धाडी । नव्हती आली जोडी कळों साच ॥४॥

१३१२. झालें समाधान । तुमचे धरिले चरण ॥१॥ आतां उठावेंसें मना । येत नाहीं नारायणा ॥२॥ सुराडिकपणें । जेथें सांपडलें केणें ॥३॥ तुका म्हणे भोग । गेला निवारला लाग ॥४॥

१३१३. मुखाकडे वास । पाहे करूनियां आस ॥१॥ आतां होईल तें शिरीं । मनोगत आज्ञाधारी ॥२॥ तुम्हीं अंगीकार । केला पाहिजे हें सार ॥३॥ तुका म्हणे दारीं । उभें याचक मी हरी ॥४॥

१३१४. नाहीं माथा भार । तुम्हीं घेत हा विचार ॥१॥ जाणोनियां केलें । दुरिल अंगेस लाविलें ॥२॥ आतां बोलावें आवडी । नाम घ्यावें घडी घडी ॥३॥ तुका म्हणे दुरी । देवा खोटी ऐसी उरी ॥४॥

१३१५. माझें जड भारी । आतां अवघें तुम्हांवरी ॥१॥ जालों अंकित अंकिला । तुमचा मुकलों मागिला ॥२॥ करितों जें काम । माझी सेवा तुझें नाम ॥३॥ तुका पायां लागे । कांहीं नेदी ना न मागें ॥४॥

१३१६. तुम्ही आम्ही भले आतां । जालों चिंता काशाची ॥१॥ आपुलाले आलों स्थळीं । मौन कळी वाढेना ॥२॥ सहज जें मनीं होतें । तें उचित उघडलें ॥३॥ तुका म्हणे नसतें अंगा । येत संगा सारिखे ॥४॥

१३१७. चित्ता ऐसी नको देऊं आठवण । जेणें देवाचे चरण अंतरे तें ॥१॥ आलिया वचन रामनामध्वनि । ऐकावी कानीं ऐसी गोडी ॥२॥ मत्सराचा ठाव शरीरीं नसावा । लाभेंविण जीवा दुःख देतो ॥३॥ तुका म्हणे राहे अंतरीं शीतळ । शांतीचें तें बळ क्षमा अंगीं ॥४॥

१३१८. कोण पुण्य कोण गांठी । ज्यासी ऐसियांची भेटी ॥१॥ जिहीं हरी धरिला मनीं । दिलें संसारासी पाणी ॥२॥ कोण हा भाग्याचा । ऐसियासी बोले वाचा ॥३॥ तुका म्हणे त्याचे भेटी । होय संसारासी तुटी ॥४॥

१३१९. तरिच हा जीव संसारीं उदास । धरिला विश्वास तुम्हां सोई ॥१॥ एके जातीविण नाहीं कळवळा । ओढिली गोपाळा सूत्रदोरी ॥२॥ फुटतसे प्राण क्षणाच्या विसरें । हें तों परस्परें सारिखेंचि ॥३॥ तुका म्हणे चित्तीं राखिला अनुभव । तेणें हा संदेह निवारला ॥४॥

१३२०. किती विवंचना करीतसें जीवीं । मन धावंडवी दाहीं दिशा ॥१॥ कोणा एका भावें तुम्हीं अंगीकार । करावा विचार याचसाठी ॥२॥ इतर ते आतां लाभ तुच्छ जाले । अनुभवा आले गुणागुण ॥३॥ तुका म्हणे लागो अखंड समाधि । जावें प्रेमबोधीं बुडोनियां ॥४॥

१३२१. दिकचि या नाहीं संसारसंबंधा । तुटेना या बाधा भवरोगाची ॥१॥ तांतडी ते करीं म्हणऊनि तांतडी । साधिली ते घडी सोनियाची ॥२॥ संकल्पाच्या बीजें इंद्रियांची चाली । प्रारब्ध तें घाली गर्भवासीं ॥३॥ तुका म्हणे बीजें जाळुनि सकळ । करावें गोपाळें आपुले भाट ॥४॥

१३२२. आतां होईन धरणेकरी । भीतरीच कोंडीन ॥१॥ नाहीं केली जीवेंसाठीं । तों कां गोष्टी रुचे ते ॥२॥ आधीं निर्धार तो सार । मग भार सोसेना ॥३॥ तुका म्हणे खाऊं जेऊं ।

नेदूं होऊं वेगळा ॥४॥

१२२३. होईल तरि पुसापुसी । उत्तर त्यासी योजावें ॥१॥ तोंवरि मी पुढें कांहीं । आपुलें नाहीं घालीत ॥२॥ जाणोनियां अंतर देव । जेव्हां भेव फेडील ॥३॥ तुका म्हणे धरिल हातीं । करील खंतीवेगळें ॥४॥

१३२४. हा तों नव्हे कांहीं निराशेचा ठाव । भलें पोटीं वाव राखिलिया ॥१॥ विश्वंभरें विश्व सामाविलें पोटीं । तेथेंचि सेवटीं आम्ही असों ॥२॥ नेणतां चिंतन करितों अंतरीं । तेथें अभ्यंतरीं उमटेल ॥३॥ तुका म्हणे माझा स्वामी अबोलणा । पुरवूं खुणे खुणा जाणतसों ॥४॥

१३२५. निष्ठुर तो दिसे निराकारपणें । कोंवळा सगुणें प्रतिपाळी ॥१॥ केलाच करावा केला कड्वाड । होईल तें गोड न सरते ॥२॥ मथिलिया लागे नवनीत हातां । नासे वितुळतां आहाच तें ॥३॥ तुका म्हणे आतां मनाशीं विचार । करावा तो सार एकचित्तें ॥४॥

१३२६. बहु देवा बरें जालें । नसतें गेलें सोंवळें ॥१॥ धोवटाशीं पडली गांठी । जगजेठीप्रसादें ॥२॥ गादल्याचा जाला झाडा । गेली पीडा विकल्प ॥३॥ तुका म्हणे वरावरी । निर्मळ करी निर्मळा ॥४॥

१३२७. स्वामित्वाचीं वर्में असोनि जवळी । वाहों जावें मोळी गुणासवें ॥१॥ काबाडापासूनि सोडवा दातारा । कांहीं नका भारा पात्र करूं ॥२॥ धनवंत्र्याचिये अंगी सत्ताबळ । व्याधी ते सकळ तोडावया ॥३॥ तुका म्हणे आलें मोड्यासी कोंपट । सांडोव्याची वाट विसरावी ॥४॥

१३२८. ऋणाच्या परिहारा जालों वोळगणा । द्यावी नारायणा वासलाती ॥१॥ जालों उतरायी शरीरसंकल्पें । चुकों द्यावीं पापें सकळही ॥२॥ आजिवरी होतों धरूनि जीवासी । व्याजें कासाविसी बहु केलें ॥३॥ तुका म्हणे मना आणिला म्यां भाव । तुमचा तेथें ठाव आहे देवा ॥४॥

१३२९. येणें पांगें पायांपाशीं । निश्चयेंसी राहेन ॥१॥ सांगितली करीन सेवा । सकळ देवा दासत्व ॥२॥ बंधनाची तुटली बेडी । हेचि जोडी मग आम्हां ॥३॥ तुका म्हणे नव्हे क्षण । पायांविण वेगळा ॥४॥

१३३०. आपुल्या आपण उगवा लिगाड । काय माझें जड करुन घ्याल ॥१॥ उद्धरासी काय उधाराचें काम । वाढवूंचि श्रम नये देवा ॥२॥ करा आतां मजसाठीं वाड पोट । ठावें नाहीं तंट जालें लोकीं ॥३॥ तुका म्हणे बाकी झडलियावरी । न पडे व्यवहारीं संचिताचे ॥४॥

१३३१. सर्व संगीं विट आला । तूं एकला आवडसी ॥१॥ दिली आतां पायीं मिठी । जगजेठी न सोडीं ॥२॥ बहु जालों खेदक्षीण । येणें सीण तो नासे ॥३॥ तुका म्हणे गंगे वास ।

बहु त्या आस स्थळाची ॥४॥

१३३२. शीतळ तें शीतळाहुनी । पायवणी चरणींचें ॥१॥ सेवन हें शिरसा धरीं । अंतरीं ही वरदळा ॥२॥ अवघेंचि नासी पाप । तीर्थ बाप माझ्याचें ॥३॥ बैसोनिया तुका तळीं । त्या कल्लोळीं डौरला ॥४॥

१३३३. गोदे काठीं होता आड । करूनि कोड कवतुकें ॥१॥ देखण्यांनी एक केलें । आइत्या नेलें जिवनापें ॥२॥ राखोनियां होतों ठाव । अल्प जीव लावूनि ॥३॥ तुका म्हणे फिटे धणी । हे सज्जनीं विश्रांति ॥४॥

१३३४. न पाहें माघारें आतां परतोनि । संसारापासूनि विटला जीव ॥१॥ सामोरा येऊनि कवळीं दातारा । काळाचा हाकारा न साहावे ॥२॥ सावधान चित्त होईल आधारें । खेळतांही बरें वाटईल ॥३॥ तुका म्हणे कंठ दाटला या सोसे । न पवेचि कैसें जवळीं हे ॥४॥

१३३५. मथनीचें नवनीत । सर्व हितकारक ॥१॥ दंडवत दंडापरी । मागें उरी नुरावी ॥२॥ वचनाचा तो पसरु काई । तांतडीं डोईपाशींच ॥३॥ तुका म्हणे जगजेठी । लावी कंठीं उचलूनि ॥४॥

१३३६. अवचिताचि हातीं ठेवा । दिला सेवा न करितां ॥१॥ भाग्य फळलें जाली भेटी । नेघें तुटी यावरी ॥२॥ दैन्य गेलें हरली चिंता । सदैव आतां यावरी ॥३॥ तुका म्हणे वांटा जाला । बोलों बोला देवासी ॥४॥

१३३७. समर्थाची धरिली कास । आतां नाश कशाचा ॥१॥ धांवे पावें करीन लाहो । तुमचा आहो विठ्ठला ॥२॥ नलगे मज पाहाणें दिशा । हाकेसरिसा ओढसी ॥३॥ तुका म्हणे नव्हे धीर । तुम्हां स्थिर दयेनें ॥४॥

१३३८. करूं तैसें पाठांतर । करुणाकर भाषण ॥१॥ जिहीं केला मूर्तिमंत । ऐसा संतप्रसाद ॥२॥ सोज्वळ केल्या वाटा । आइत्या नीटा मागीलां ॥३॥ तुका म्हणे घेऊं धांवा । करूं हांवा तें जोडी ॥४॥

१३३९. अचळ न चळे ऐसें झालें मन । धरूनि निज खूण राहिलोंसें ॥१॥ आवडी बैसली गुणांची अंतरीं । करूं धणीवरी सेवन तें ॥२॥ एकविध भाव नव्हे अभावना । आणिक या गुणां न मिळवे ॥३॥ तुका म्हणे माझे पडिलें आहारीं । ध्यान विटेवरी ठाकलें तें ॥४॥

१३४०. वैष्णवांसंगती सुख वाटे जीवा । आणीक मी देवा कांहीं नेणें ॥१॥ गायें नाचें उडें आपुलिया छंदें । मनाच्या आनंदें आवडीनें ॥२॥ लाज भय शंका दुराविला मान । न कळे साधन यापरतें ॥३॥ तुका म्हणे आतां आपुल्या सायासें । आम्हा जगदीशें सांभाळावें ॥४॥

१३४१. शरण शरण वाणी । शरण त्रिवाचा विनवणी ॥१॥ स्तुति न पुरे हे वाचा । सत्य

दास मी दासांचा ॥२॥ देह न सांभाळून । पायांवरी लोटांगण ॥३॥ विनवी संतां तुका दीन । नोहे गौरवीं उत्तीर्ण ॥४॥

१३४२. लेंकरा लेववी माता अळंकार । नाहीं अंतपार आवडीसी ॥१॥ कृपेचें पोसणें तुमचें मी दीन । आजि संतजन मायबाप ॥२॥ आरुषा उत्तरीं संतोषे माउली । कवळुनि घाली हृदयांत ॥३॥ पोटा आलें त्याचे नेणे गुणदोष । कल्याणचि आस असावी हे ॥४॥ मनाची ते चाली मोहाचिये सोई । ओघ गंगा काई परतों जाणें ॥५॥ तुका म्हणे कोठें उदार मेघां शक्ति । माझी तृषा किती चातकाची ॥६॥

१३४३. युक्ति तंव झाल्या कुंठित सकळा । उरली हे कळा जीवनाची ॥१॥ संतचरणीं भावें ठेविलें मस्तक । जोडोनि हस्तक राहिलोंसें ॥२॥ जाणपणें नेणें कांहींच प्रकार । साक्षीतें अंतर अंतरासी ॥३॥ तुका म्हणे तुम्हीं केलें अभयदान । तेणें समाधान राहिलोंसे ॥४॥

१३४४. हागे आलों कोणी म्हणे बुडतिया । तेणें किती तया बळ चढे ॥१॥ तुम्हीं तव भार घेतला सकळ । आश्वासिलों बाळ अभयकरें ॥२॥ भुकेलिया आस दावितां निर्धार । किती होय धीर समाधान ॥३॥ तुका म्हणे दिली चिंतामणीसाठीं । उचित काचवटी दंडवत ॥४॥

१३४५. कैसा तूं देखिला होसील गोपाळीं । पुण्यवंता डोळीं नारायण ॥१॥ तेणें लोभें जीव जालासे बराडी । आम्ही ऐसी जोडी कईं लाभों ॥२॥ असेल तें कैसें दर्शनाचें सुख । अनुभवें श्रीमुख अनुभवितां ॥३॥ तुका म्हणे वाटे देसी आळिंगन । अवस्था ते क्षणक्षणा होते ॥४॥

१३४६. कासया या लोभें केलें आर्तभूत । सांगा माझें चित्त नारायणा ॥१॥ चातकाचे परी एकचि निर्धार । लक्षभेदी तीर फिरों नेणे ॥२॥ सांवळें रूपडें चतुर्भुज मूर्ति । कृष्णनाम चित्तीं संकल्प हा ॥३॥ तुका म्हणे करीं आवडीसी ठाव । नको माझा भाव भंगों देऊं ॥४॥

१३४७. काय माझा पण होईल लटिका । ब्रिदावळी लोकां दाविली ते ॥१॥ करी करूनियां देईं माझी आळी । येऊनि कुरवाळी पांडुरंगे ॥२॥ आणीक म्यां कोणा म्हणवावें हातीं । नये काकुलती दुजियासी ॥३॥ तुका म्हणे मज येथेंचि ओळखी । होईन तो सुखी पायांनींच ॥४॥

१३४८. तुम्हां आम्हां जंव जालिया समान । तेथें कोणां कोण सनमानी ॥१॥ उरी तों राहिलें गोमटें गौरव । ओढे माझा जीव पायांपाशी ॥२॥ नेणपणें आम्ही आळवूं वोरसें । बोलावितों रसें शब्दरत्नें ॥३॥ तुका म्हणे लळे पाळीं वो विठ्ठले । कां हे उरविले भेदाभेद ॥४॥

१३४९. नको माझे मानूं आहाच ते शब्द । कळवळ्याचा वाद करीतसें ॥१॥ कासयानें बळ करूं पायांपासीं । भाकावी ते दासीं करुणा आम्हीं ॥२॥ काय मज चाड असे या लौकिकें । परी असे निकें अनुभवाचें ॥३॥ लांचावल्यासाठीं वचनाची आळी । टकळ्यानें घोळी जवळी मन ॥४॥ वाटतसे आस पुरविसी ऐसें । तरि अंगीं पिसें लावियेलें ॥५॥ तुका म्हणे माझी येथेंचि

आवडी । श्रीमुखाची जोडी इच्छीतसें ॥६॥

१३५०. जन्मा आलियाचा लाभ । पद्मनाभ दरुषणें ॥१॥ म्हणउनि लवलाहें । पाय आहें चिंतित ॥२॥ पाठीलागा येतो काळ । तूं कृपाळू माउली ॥३॥ बहु उसंतीत आलों । तया भ्यालों स्थळासी ॥४॥ कोण्या उपायें हें घडे । भव आंगडें सुटकेचें ॥५॥ तुका म्हणे तूं जननी । ये निर्वाणीं विठ्ठले ॥६॥

१३५१. जेणें वाढे अपकीर्ति । सर्वार्थी तें वर्जावें ॥१॥ सत्य रूचे भलेपण । वचन तें जगासी ॥२॥ होईजेतें शूर त्यागें । वाउगें तें सारावें ॥३॥ तुका म्हणे खोटें वर्म । निंद्यकर्म काळिमा ॥४॥

१३५२. याची सवे लागली जीवा । गोडी हेवा संगाचा ॥१॥ परतें न सरवे दुरी । क्षण हरीपासूनि ॥२॥ जालें तरी काय तंट । आतां चट न संडे ॥३॥ तुका म्हणे चक्रचाळें । वेड बळें लाविलें ॥४॥

१३५३. याचा तंव हाचि मोळा । देखिला डोळा उदंड ॥१॥ नेदी मग फिरो मागें । अंगा अंगे संचरे ॥२॥ कां गा याची नेणां खोडी । जीभा जोडी करितसे ॥३॥ पांघरें तें बहु काळें । घोंगडेंही ठायींचें ॥४॥ अंगीं वसेचि ना लाज । न म्हणे भाज लोणाची ॥५॥ सर्वसाक्षी अबोल्यानें । दुश्चित कोणें नसावें ॥६॥ तुका म्हणे धरीला हातीं । मग निश्चिंती हरीनें ॥७॥

१३५४. प्रसिद्ध हा असे जगा । अवघ्या रंगारंगाचा ॥१॥ तरी वाटा न वजे कोणी । नारायणीं घरबुडीं ॥२॥ बहुतां ऐसें केलें मागें । लाग लागें लागेना ॥३॥ हो कां नर अथवा नारी । लाहान थोरीं आदर ॥४॥ जालें वेगळें लोकीं पुरे । मग नुरे समूळ ॥५॥ कळेना तो आहे कैसा । कोणी दिशा बहु थोडा ॥६॥ तुका म्हणे दुसऱ्या भावें । छाया नावें न देखवे ॥७॥

१३५५. न संडावा आतां ऐसा वाटे ठाव । भयासी उपाव रक्षणाचा ॥१॥ म्हणऊनि मनें वळियेलें मन । कारियाकारण चाड नाहीं ॥२॥ नाणावी उपाधि करूनियां मूळ । राखतां विटाळ तेंचि व्हावें ॥३॥ तुका म्हणे येथें न वेचें वचन । निजीं निजखूण सांपडली ॥४॥

१३५६. सत्तेचें भोजन समयीं आतुडे । सेवनही घडे रुचिनेसीं ॥१॥ वर्मे भ्रम नेला जालें एकमय । हृदयस्थीं सोय संग जाला ॥२॥ कोथळीस जमा पडिलें संचित । मापल्याचा वित्त नेम जाला ॥३॥ तुका म्हणे धणी ऐसा जालों आतां । करीन ते सत्ता माझी आहे ॥४॥

१३५७. देईल तें उणें नाहीं । याचें कांहीं पदरीं ॥१॥ पाहिजे तें संचित आतां । येथें सत्ता करावया ॥२॥ गुणां ऐसा भरणा भरी । जों जें चारी तें लाभे ॥३॥ तुका म्हणे देवीं देव । फळे भाव आपुला ॥४॥

१३५८. तेव्हां होतों भोगाधीन । तुम्हां भिन्न पासुनि ॥१॥ आतां बोलों नये ऐसें ।

अनारिसे वेगळें ॥२॥ सन्मुख जालों स्वामीकडे । भव आंगडे निराळे ॥३॥ चिंतिलें तें चिंतामणी । फिटे धणी तों द्यावें ॥४॥ सहज स्थिति आहे अंगीं । प्रसंगीं ते वंचेना ॥५॥ तुमची देवा धरिली कास । केला नास प्रपंचा ॥६॥ तुका म्हणे जाणोनि वर्मे । कर्माकर्मे ठेविलीं ॥७॥

१३५९. केला कईवाड संतांच्या आधारें । अनुभवें खरें कळों आलें ॥१॥ काय जीवित्वाची धरुनियां आशा । व्हावें गर्भवासा पात्र भेणें ॥२॥ अबाळीनें जावें निश्चितीच्या ठायां । रांडा रोटा वांयां करूं नये ॥३॥ तुका म्हणे बळी देतां तें निधान । भिकेसाठीं कोण राज्य देतो ॥४॥

१३६०. संगतीनें होतो पंगतीचा लाभ । अशोभीं अनुभव असिजेतें ॥१॥ जैसीं तैसीं असों पुढिलांचे सोई । धरिती हातीं पायीं आचारिये ॥२॥ उपकारी नाहीं देखत आपदा । पुढिलाची सदा दया चित्तीं ॥३॥ तुका म्हणे तरी सज्जनाची कीर्ति । पुरवावी आर्ति निर्बळाची ॥४॥

१३६१. करितां विचार सांपडलें वर्म । समूळ निश्रम परिहाराचें ॥१॥ मज घेऊनियां आपणांसी द्यावें । साटीं जीवें भावें नारायणा ॥२॥ उरी नाहीं मग पडदा कां आला । स्वमुखेंचि भला करितां वाद ॥३॥ तुका म्हणे माझें खरें देणें घेणें । तुम्हीं साक्षी जाणें अंतरींचें ॥४॥

१३६२. आतां देह अवसान । हें जतन तोंवरीं ॥१॥ गाऊं नाचूं गदारोळें । जिंकों बळें संसार ॥२॥ याचि जीऊं अभिमानें । सेवाधनें बळकट ॥३॥ तुका म्हणे न सरें मागें । होईन लागें आगळा ॥४॥

१३६३. कुळींची हें कुळदेवी । केली ठावी संतांनीं ॥१॥ बरवें जालें शरण गेलों । उगविलों संकटीं ॥२॥ आणिला ही रूपा बळें । करूनि खळें हरिदासीं ॥३॥ तुका म्हणे समागमें । नाचों प्रेमें लागलों ॥४॥

१३६४. ज्यानें आड यावें कांहीं । त्याचें नाहीं बळ आतां ॥१॥ मन येथें साह्य जालें । हरिच्या धालें गुणवादीं ॥२॥ चुकुर तो गेला काळ । जालें बळ संगाचें ॥३॥ तुका म्हणे धरूं सत्ता । होईल आतां करूं तें ॥४॥

१३६५. देवासी तो पुरे एकभाव गांठीं । तोचि त्याचे मिठी देईल पायीं ॥१॥ पाहोनि राहीन कवतुकें निराळा । मी मजवेगळा होऊनियां ॥२॥ कांहीं नेघें शिरीं निमित्ताचा भार । नलगे उत्तर वेचावेंचि ॥३॥ तुका म्हणे जीवें पडिलिया गांठी । मग नाहीं मिठी सुटों येत ॥४॥

१३६६. लौकिकासाठीं या पसाऱ्याचा गोवा । कांहीं नाहीं देवा लागो येत ॥१॥ ठेवावा माथा तो नुचलावा पायीं । ठायींचिये ठायीं हालों नये ॥२॥ डहुळल्या मनें वितुळेल रूप । नांव ऐसें पाप उपाधीतें ॥३॥ तुका म्हणे देव प्रीतीनें कवळीं । ठेविल जवळी उठवूनि ॥४॥

१३६७. नाहीं होत भार घातल्या उदास । पुरवावी आस सकळही ॥१॥ ऐसा नाहीं मज एकाचा अनुभव । धरिला तो भाव उद्धरिले ॥२॥ उतावीळ असे शरणागत काजें । धांवा केशीराजें आइकतां ॥३॥ तुका म्हणे हितचिंतनीं भरंवसा । नेदी गर्भवासा येऊं देऊं ॥४॥

१३६८. उपजों मरों हें तों आमुची मिरासी । हें तूं निवारिसी तरी थोर ॥१॥ उभा राहे करीं खराखोटा वाद । आम्हीं जालों निंद्य लंडपणें ॥२॥ उभयतां आहे करणें समान । तुम्हां ऐसा म्हणे मीहि देवा ॥३॥ तुका म्हणे हातीं सांपडलें वर्म । अवघाचि भ्रम फेडिन आतां ॥४॥

१३६९. मेलियांचा रांडा इच्छिती लेंकरूं । लाज नाहीं धरूं प्रीत कैशी ॥१॥ मागिलां पुढिलां एक सरोवरी । काळाची पेटारी खांदां वाहे ॥२॥ आन दिसे परी मरणचि खरें । सांपळां उंदिरें सामाविलीं ॥३॥ तुका म्हणे जाली मनाची परती । निवळली ज्योती दिसों आली ॥४॥

१३७०. निष्ठुर मी जालों अतिवादागुणें । हें कां नारायणें नेणिजेल ॥१॥ सांडियेली तुम्ही गोत परिसोय । फोडविली डोय कर्माहातीं ॥२॥ सांपडूनि संदि केली जीवेंसाठीं । घ्यावयासी तुटी कारण हें ॥३॥ तुका म्हणे तुज काय म्हूण उणें । नाहीं अभिमानें चाड देवा ॥४॥

१३७१. माझें माझ्या हातां आलें । आतां भलें सकळ ॥१॥ काशासाठीं विषम थारा । तो अंतरा विटाळ ॥२॥ जालीं तया दुःखें तुटी । मागिल पोटीं नसावें ॥३॥ तुका म्हणे शुद्ध कुळ । तेथें मळ कशाचा ॥४॥

१३७२. समर्थपणें हे करा संपादणी । नसतेंचि मनीं धरिल्याची ॥१॥ दुसऱ्याचें येथें नाहीं चालों येत । तरी मी निवांत पाय पाहें ॥२॥ खोटियाचें खरें खरियाचें खोटें । मानलें गोमटें तुम्हांसी तें ॥३॥ तुका म्हणे तुम्हांसवें करितां वाद । होईजे तें निंद्य जनीं देवा ॥४॥

१३७३. तुम्हांआम्हांसवें न पडावी गांठी । आलेति जगजेठी कळों आतां ॥१॥ किती म्हणों आतां वाईटावाईट । शिवों नये वीट आल्यावरी ॥२॥ बोलिल्याची आतां हेचि परचित । भीड भार थीत उडवीली ॥३॥ तुका म्हणे आली रोकडी प्रचिती । झांकणें तें किती कोठें देवा ॥४॥

१३७४. सकळ सत्ताधारी । व्हावें ऐसें काय हरी ॥१॥ परी या कृपेच्या वोरसें । कुढावयाचेंचि पिसें ॥२॥ अंगें सर्वोत्तम । अवघाचि पूर्णकाम ॥३॥ तुका म्हणे दाता । तरि हा जीवदान देता ॥४॥

१३७५. कोणापाशीं द्यावें माप । आपेआप राहिलें ॥१॥ कासयाची भरोवरी । काय दुरी जवळी ॥२॥ एकें दाखविले दहा । फांटा पाहा पुसून ॥३॥ तुका म्हणे सरलें वोझें । आतां माझें सकळ ॥४॥

१३७६. नभोमय जालें जळ । एकीं सकळ हरपलें ॥१॥ आतां काय सारासरी । त्याच्या लहरी तयांत ॥२॥ कैंची तेथे यावा सांडी । आप कोंडी आपणां ॥३॥ तुका म्हणे कल्प जाला । अस्त गेला उदय ॥४॥

१३७७. राजा करी तैसे दाम । चाम तेही चालती ॥१॥ कारण ते सत्ता शिरीं । कोण करी अव्हेर ॥२॥ वाहिलें तें सुनें खांदी । चाले पदीं बैसविलें ॥३॥ तुका म्हणे विश्वंभरें । करुणाकरें रक्षिलें ॥४॥

१३७८. आम्ही देव तुम्ही देव । मध्यें भेव अधीक ॥१॥ कैवाडाच्या धांवा लागें । मागें मागें विठ्ठलें ॥२॥ भेडसाविलें हाके नादें । वोळखी भेदें मोडिली ॥३॥ तुका म्हणे उभा राहे । मागें पाहे परतोनि ॥४॥

१३७९. हीन शूर बुद्धीपासीं । आकृतीसी भेद नाहीं ॥१॥ एक दांडी एक खांदी । पदोपदीं भोगणें ॥२॥ एकाऐसें एक नाहीं । भिन्न पाहीं प्रकृती ॥३॥ तुका म्हणे भूमी खंडे । पीक दंडे जेथें तें ॥४॥

१३८०. काय बोलो सांगा । याउपरी पांडुरंगा ॥१॥ कांहीं आधारावांचून । पुढें न चले वचन ॥२॥ वाढे ऐसा रस । कांहीं करावा सौरस ॥३॥ भक्तिभाग्यसीमा । द्यावा जोडोनियां प्रेमा ॥४॥ कोरड्या उत्तरीं । नका गौरवूं वैखरी ॥५॥ करी विज्ञापना । तुका प्रसादाची दाना ॥६॥

१३८१. आहाच तो मोड वाळलिया मधीं । अधीराची बुद्धि तेणें न्यायें ॥१॥ म्हणऊनि संग न करीं दुसरें । चित्त मळिनद्वारें दोड पडे ॥२॥ विषासाठीं सर्पा भयाभीत लोक । हें तों सकळीक जाणतसां ॥३॥ तुका म्हणे काचें राहे कुळाकुड । अवगुण तो नाड ज्याचा तया ॥४॥

१३८२. क्षणक्षणां जीव वाटतसे खंती । आठवती चित्तीं पाय देवा ॥१॥ येईं वो येईं वो येईं लवलाहीं । आलिंगूनि बाही क्षेम देईं ॥२॥ उताविळ मन पंथ आवलोकीं । आठवती चुकी काय जाली ॥३॥ तुका म्हणे माझ्या जीवींच्या जीवना । घाला नारायणा उडी वेगीं ॥४॥

१३८३. आळी करावी ते कळतें बाळका । बुझवावें हें कां नेणां तुम्ही ॥१॥ निवाड तो येथें असे पायापाशीं । तुम्हांआम्हांविशीं एकेठायीं ॥२॥ आणीक तें आम्हीं न देखोंसें जालें । जाणावें तें शिणलें भागलेसें ॥३॥ तुका म्हणे तुम्हां लागतें सांगावें । अंतरीचें ठावें काय नाहीं ॥४॥

१३८४. तातडीनें आम्हां धीरचि न कळे । पाळावे हे लळे लवलाहीं ॥१॥ नका कांहीं पाहों सावकाशीं देवा । करा एक हेवा तुमचा माझा ॥२॥ वोरसाचा यावा सांभाळावी प्रीत । नाहीं राहों येत अंगीं धंदा ॥३॥ तुका म्हणे मज नका गोवूं खेळा । भोजनाची वेळा राखियेली ॥४॥

१३८५. नाहीं लोपों येत गुण । वेधी आणिकां चंदन ॥१॥ न सांगतां पडे ताळा । रूप दर्पणीं सकळां ॥२॥ सारविलें वरी । आहाच तें क्षणभरी ॥३॥ तुका म्हणे वोहळें । सागराच्या ऐसें व्हावें ॥४॥

१३८६. वचनेंचि व्हावें आपण उदार । होईल विश्वंभर संतुष्टचि ॥१॥ सत्यसंकल्पाचीं फळें बीजाऐशीं । शुद्ध नाहीं नासी पावों येत ॥२॥ वंचिलिया काय येईल उपेगा । शरीर हें

नरकाचेंचि आळें ॥३॥ तुका म्हणे जीव जितां थारे लावा । पडिलिया गोवा देशधडी ॥४॥

१३८७. उखतें आयुष्य जायाचें कलेवर । अवघें वोडंबर विषयांचें ॥१॥ कोणासी हा लागे पुसणें विचार । मनचि सादर करूं आता ॥२॥ उत्पत्ति प्रळय पडिलें दळण । पाकाचें भोजन बीज वाढे ॥३॥ तुका म्हणे जाऊं अभयाच्या ठायां । रिघों देवराया शरण वेगीं ॥४॥

१३८८. बोलावें म्हणू बोलतों उपाय । प्रवाहें जाय गंगाजळ ॥१॥ भाग्ययोगें कोणां घडेल सेवन । कैचे येथें जन अधिकारी ॥२॥ मुखीं घेतां घांस पळविती तोंड । अंगींचिया भांड असुखानें ॥३॥ तुका म्हणे पूजा करितों देवाची । आपुलिया रुची मनाचिये ॥४॥

१३८९. लटिक्याची वाणी वचनाचा संवाद । नाहीं कोणा वाद रुचों येत ॥१॥ अन्याय तो त्याचा नव्हे वायचाळा । मायबापीं वेळां न साधिली ॥२॥ अनावर अंगीं प्रबळ अवगुण । तांतडीनें मन लाहो साधी ॥३॥ तुका म्हणे दोष आणि अवकळा । न पडतां ताळा घडतसे ॥४॥

१३९०. नये स्तवूं काचें होतें क्रियानष्ट । फुंदाचे ते कष्ट भंगा मूळ ॥१॥ नाहीं परमार्थ साधत लौकिकें । धरुन होतों फिकें अंगा आलें ॥२॥ पारखिया पुढें नये घालूं तोंड । तुटी लाभा खंड होतो माना ॥३॥ तुका म्हणे तरी मिरवतें परवडी । कामावल्या गोडी अविनाश ॥४॥

१३९१. कोण्या काळें येईल मना । नारायणा तुमचिया ॥१॥ माझा करणें अंगीकार । सर्व भार फेडूनि ॥२॥ लागलिये तळमळ चित्ता । तरी दुश्चित्ता संसारीं ॥३॥ मुखाचीच पाहे वास । मागें दोष सांभाळी ॥४॥ इच्छा पूर्ण जाल्याविण । कैसा सीण वारेल ॥५॥ लाहो काया मनें वाचा । दिवसाच्या भेटीचा ॥६॥ कंटाळा तो न धरावा । तुम्हीं देवा दासाचा ॥७॥ तुका म्हणे माझे वेळे । न कळे कां हें उफराटें ॥८॥

१३९२. घ्यावी तरी घ्यावी उदंडचि सेवा । द्यावें तरी देवा उदंडचि ॥१॥ ऐसीं कैंचीं आम्ही पुरतीं भांडवलें । आल्या करीं बोलें समाधान ॥२॥ व्हावें तरी व्हावें बहुतचि दुरी । आलिया अंतरीं बसवावें ॥३॥ तुका म्हणे तुझें सख्यत्व आपणीं । अससील ऋणी आवडीचा ॥४॥

१३९३. काय करूं जीव होतो कासावीस । कोंडिले दिस गमेचिना ॥१॥ पडिलें हें दिसे ब्रह्मांडचि वोस । दाटोनि उछ्वास राहातसे ॥२॥ तुका म्हणे अगा सर्व जाणतिया । विश्वंभरें काया निववावी ॥३॥

१३९४. सुकलिया कोंभा अत्यंत जळधरें । तेणेंचि प्रकारें न्याय असे ॥१॥ न चले पाउलीं सांडीं गरुडासन । मनाचें हो मन त्वरेलागीं ॥२॥ तुका म्हणे भूक न साहावे बाळा । जीवनाची कळा ओढलीसे ॥३॥

१३९५. शृंगारिक माझीं नव्हतीं उत्तरें । आळवितों खरें अवस्थेच्या ॥१॥ न घालावा

मधीं कामाचा विलंब । तुम्ही तों स्वयंभ करुणामूर्ति ॥२॥ तुका म्हणे केलें सन्मुख वदन । देखतां चरण पोटाळीन ॥३॥

१३९६. तूं माझी माउली तूं माझी साउली । पाहातों वाटुली पांडुरंगे ॥१॥ तूं मज एकुला वडील धाकुला । तूं मज आपुला सोयरा जीव ॥२॥ तुका म्हणे जीव तुजपाशीं असे । तुझियानें ओस सर्व दिशा ॥३॥

१३९७. कराल तें करा । हातें आपुल्या दातारा ॥१॥ बळियाचीं आम्हीं बाळें । असो निर्भर या सळे ॥२॥ आतां कोठे काळ । मध्यें रिघेल ओंगळ ॥३॥ तुका म्हणे पंढरीराया । थापटितों ठोक बाह्या ॥४॥

१३९८. डोळां भरिलें रूप । चित्तीं पायांचा संकल्प ॥१॥ अवघीं घातलीं वांटणी । प्रेम राहिलें कीर्तनीं ॥२॥ जिव्हा केली माप । रासीं हरिनाम अमुप ॥३॥ भरूनियां भाग । तुका बैसला पांडुरंग ॥४॥

१३९९. आतां आहे नाहीं । न कळे आळीकरा कांहीं ॥१॥ देसी पुरवुनी इच्छा । आतां पंढरीनिवासा ॥२॥ नेणें भाग सीण । दुजें कोणी तुम्हांविण ॥३॥ आतां नव्हे दुरी । तुका पायीं मिठी मारी ॥४॥

१४००. संकल्पासी अधिष्ठान । नारायण गोमटें ॥१॥ अवघियाचें पुरे कोड । फिटे जड देहत्व ॥२॥ उभयलोकीं उत्तम कीर्ति । देव चित्तीं राहिलिया ॥३॥ तुका म्हणे जीव धाय । नये हाय जवळी ॥४॥

१४०१. भाग्यवंतां हेचि जोडी । परवडी संतांची ॥१॥ धन घरीं पांडुरंग । अभंग जें सरेना ॥२॥ जनाविरहित हा लाभ । टांचें नभ सांठवणें ॥३॥ तुका म्हणे विष्णुदासां । नाहीं आशा दुसरी ॥४॥

१४०२. जरी आलें राज्य मोळविक्या हातां । तरी तो मागुता व्यवसायी ॥१॥ तृष्णेचीं मजुरें नेणती विसांवा । वाढे हांव हांवा काम कामीं ॥२॥ वैभवांचीं सुखें नातळतां अंगा । चिंता करी भोगा विघ्न जाळी ॥३॥ तुका म्हणे वाहे मरणाचें भय । रक्षण उपाय करूनि असे ॥४॥

१४०३. कोण होईल आतां संसारपांगिलें । आहे उगवलें सहजचि ॥१॥ केला तो चालवीं आपुला प्रपंच । काय कोणां वेच आदा घे दे ॥२॥ सहजचि घडे आतां मोळ्याविण । येथें काय सीण आणि लाभ ॥३॥ तुका म्हणे जालों सहज देखणा । ज्याच्या त्यानें खुणा दाखविल्या ॥४॥

१४०४. आम्हां शरणागतां । एवढी काय करणें चिंता ॥१॥ परि हे कौतुकाचे खेळ । अवघे पाहातों सकळ ॥२॥ अभयदानवदें । आम्हां कैंचीं भयद्वंद्वें ॥३॥ तुका म्हणे आम्ही । हरिजन साधनाचे स्वामी ॥४॥

१४०५. देवाचिया चाडे प्रमाण उचित । नये वांटूं चित्त निषेधासी ॥१॥ नये राहों उभें कसमळापाशीं । भुंकतील तैसीं सांडावीं तीं ॥२॥ तुका म्हणे क्षमा सुखाची हे रासी । सांडूनि कां ऐसी दुःखी व्हावें ॥३॥

१४०६. खळा सदा क्षुद्र दृष्टी । करी कष्टी सज्जना ॥१॥ करिती आपुलाले परी । धणीवरी व्यापार ॥२॥ दया संतां भांडवल । वेंची बोल उपकार ॥३॥ तुका म्हणे आपुलालें । उसंतिलें ज्यांणीं तें ॥४॥

१४०७. जग ऐसें बहुनांवें । बहुभावें भावना ॥१॥ पाहों बोलों बहु नये । सत्य काय सांभाळा ॥२॥ कारियासी जें कारण । ते जतन करावें ॥३॥ तुका म्हणे संतजनीं । हेंचि मनीं धरावें ॥४॥

१४०८. निघालें तें आगीहुनी । आतां झणीं आतळे ॥१॥ पळवा परपरतें दूरी । आतां हरी येथूनि ॥२॥ धरिलें तैसें श्रुत करा हो । येथें आहो प्रपंचीं ॥३॥ अबोल्यानें ठेला तुका । भेउनि लोकां निराळा ॥४॥

१४०९. आतां दुसरें नाहीं मनीं । निरंजनीं पडिलों ॥१॥ तुमचीच पाहें वास । अवघी आस निरसली ॥२॥ मागिलांचा मोडला माग । घडला त्याग अरुची ॥३॥ तुका म्हणे करुणाकरा । तूं सोयरा दीनांचा ॥४॥

१४१०. धरुनियां सोई परतलें मन । अनुलक्षीं चरण करूनियां ॥१॥ येईं पांडुरंगें नेईं सांभाळूनी । करुणावचनीं आळवितों ॥२॥ बुद्धि जाली साह्य परि नाहीं बळ । अवलोकितों जळ वाहे नेत्रीं ॥३॥ न चलती पाय गळित जाली काया । म्हणऊनि दया येऊं द्यावी ॥४॥ दिशेच्या करितों वारियासी मात । जोडुनियां हात वाट पाहें ॥५॥ तुका म्हणे वेग करावा सत्वर । पावावया तीर भवनदीचें ॥६॥

१४११. कौलें भरियेली पेंठ । निग्रहाचें खोटें तंत्र ॥१॥ ऐसें माता जाणे वर्म । बाळा वाढवितां धर्म ॥२॥ कामवितां लोहो कसे । तांतडीनें काम नासे ॥३॥ तुका म्हणे खडे । देतां अक्षर तें जोडे ॥४॥

१४१२. चालिलें न वाटे । गाऊनियां जातां वाटे ॥१॥ बरवा वैष्णवांचा संग । येतो सामोरा श्रीरंग ॥२॥ नाहीं भय आड । कांहीं विषमाचें जड ॥३॥ तुका म्हणे भक्ति । सुखरूप आदीं अंतीं ॥४॥

१४१३. करितां विचार । तो हा दृढ संसार । ब्रह्मादिकां पार । नुलंघवे सामर्थ्यें ॥१॥ शरण शरण नारायणा । मज अंगीकारा दीनां । आलें तें वचना - । पाशीं माझ्या सामर्थ्य ॥२॥ पाठीवरी मोळी । तोचि कळवा पायीं तळीं । सांपडला जाळीं । मत्स्य जाला तो न्याय ॥३॥ आतां करीन

तांतडी । लाभाची ते याच जोडी । तुका म्हणे ओढी । पायां सोई मनाची ॥४॥

१४१४. बहुतां जातीचा केला अंगीकार । बहुतही फार सर्वोत्तमें ॥१॥ सरलाचि नाहीं कोणाचिये वेचें । अक्षोभ्य ठायींचें ठायीं आहे ॥२॥ लागतचि नाहीं घेतां अंतपार । वसवी अंतर अणूचेंही ॥३॥ तुका म्हणे केला होय ठाकी ऐसा । पुरवावी इच्छा धरिली ते ॥४॥

१४१५. पोट धालें आतां जीवनीं आवडी । पुरवावी परवडी बहुतांची ॥१॥ काय आंचवणा तांतडीचें काम । मागील ते श्रम न पवाची ॥२॥ वाढितियां पोटीं बहु असे वाव । सांभाळितां ठाव काय वेचे ॥३॥ दाविल्यावांचूनि नाहीं कळों येत । तेथेंही दुश्चित्त एकपण ॥४॥ नावेचा भार तो उदकाचे शिरीं । काय हळू भारी तये ठायीं ॥५॥ तुका म्हणे गीतीं गाऊनि गोविंदु । करूं ब्रह्मानंदू एकसरें ॥६॥

१४१६. एका हातीं टाळ एका हातीं चिपळिया । घालिती हुंबरी एक वाहातातीं टाळिया ॥१॥ मातले वैष्णव नटती नाना छंदें । नाहीं मोक्षपदीं चाड भजनीं आवडी ॥२॥ हाका आरोळिया गीत वाद्य सुखसोहळे । जाय ते न कळे केव्हां रजनीं दिवस ॥३॥ तीर्थीं नाहीं चाड नलगे जावें वनांतरा । तुका म्हणे हरिहरात्मकचि पृथिवी ॥४॥

१४१७. देव सखा आतां केलें नव्हे काईं । येणें सकळही सोइरींच ॥१॥ भाग्यवंत जालों गोतें सपुरतीं । आतां पुण्या नीती पार नाहीं ॥२॥ पाहातां दिसती भरलिया दिशा । ठसावला ठसा लोकत्रयीं ॥३॥ अविनाश जोडी आम्हां भाग्यवंता । जाली होती सत्ता संचिताची ॥४॥ पायांवरी डोई ठेवाया आरोथा । जाली द्यावी सत्ता क्षेम ऐसी ॥५॥ तुका म्हणे जीव पावला विसावा । म्हणवितां देवा तुमचींसीं ॥६॥

१४१८. कोण आतां कळिकाळा । येऊं बळा देईल ॥१॥ सत्ता झाली त्रिभुवनीं । चक्रपाणी कोंवसा ॥२॥ लडिवाळांचा भार वाहे । उभा आहे कुढावया ॥३॥ तुका म्हणे घटिका दिस । निमिषही न विसंबे ॥४॥

१४१९. आम्हां आवडे नाम घेतां । तोही पिता संतोषे ॥१॥ उभयतां एकचित्त । तरी प्रीत वाढली ॥२॥ आम्ही शोभों निकटवासें । अनारिसें न दिसों ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगे । अवघीं अंगें निवालीं ॥४॥

१४२०. देह तंव असे भोगाचे अधीन । याचें सुख सीण क्षणभंगुर ॥१॥ अविनाश जोडी देवापायीं भाव । कल्याणाचा ठाव सकळही ॥२॥ क्षणभंगुर हा येथील पसारा । आलिया आकारा अवघें नासे ॥३॥ तुका म्हणे येथें सकळ विश्रांति । आठवावा चित्तीं नारायण ॥४॥

१४२१. आतां अवश्यक करणें समाधान । पाहिलें निर्वाण न पाहिजे ॥१॥ केलें तरी आतां सुशोभ्य करावें । दिसतें बरवें संतांमधीं ॥२॥ नाहीं भक्तराजीं ठेविला उधार । नामाचा आकार

त्यांचियानें ॥३॥ तुका म्हणे माझ्या वडिलांचें ठेवणें। गौप्य नारायणें न करावें ॥४॥

१४२२. काया वाचा मनें श्रीमुखाची वास। आणीक उदास विचारासी ॥१॥ काय आतां मोक्ष करावा जी देवा। तुमचिया गोवा दर्शनासी ॥२॥ केलिया नेमासी उभें ठाऊव्हावें। नेमलें तें भावें पालटेना ॥३॥ तुका म्हणे जों जों कराल उशीर। तों तों मज फार रडवील ॥४॥

१४२३. पुढीलांचे सोयी माझ्या मना चाली । मताची आणिली नाहीं बुद्धी ॥१॥ केलासि तों उभा आजिवरी संतीं । धरविलें हातीं कट देवा ॥२॥ आहे तेंचि मागों नाहीं खोटा चाळा । नये येऊं बळा लेंकराशीं ॥३॥ तुका म्हणे माझा साक्षीचा व्यवहार । कृपण जी थोर परी तुम्ही ॥४॥

१४२४. बहुता करूनि चाळवाचाळवी। किती तुम्ही गोवी करीतसां ॥१॥ लागटपणें मी आलों येथवरी। चाड ते दुसरी न धरूनि ॥२॥ दुजियाचा तंव तुम्हांसी कांटाळा। राहासी निराळा एकाएकीं ॥३॥ तुका म्हणे आतां यावरी गोविंदा। मजशीं विनोदा येऊं नये ॥४॥

१४२५. तीर्थ जळ देखे पाषाण प्रतिमा। संत ते अधमा माणसा ऐसे ॥१॥ वांजेच्या मैथुनापरी गेलें वांयां। बांडेल्याचें जायां जालें पीक ॥२॥ अभाविक सदा सुतकी चांडाळ। सदा तळमळ चुकेचि ना ॥३॥ तुका म्हणे वरदळी ज्याची दृष्टि। देहबुद्धि कष्टी सदा दुःखी ॥४॥

१४२६. नव्हे मतोळ्याचा वाण। नीच नवा नारायण ॥१॥ सुख उपजे श्रवणें। खरें टांकसाळी नाणें ॥२॥ लाभ हातोहातीं। अधिक पुढतोंपुढती ॥३॥ तुका म्हणे नेणों किती। पुरोनि उरलें पुढती ॥४॥

१४२७. घातला दुकान। देती आलियासी दान ॥१॥ संत उदार उदार। भरलें अनंत भांडार ॥२॥ मागत्याची पुरे। धणी आणिकांसी उरे ॥३॥ तुका म्हणे पोतें। देवें भरिलें नव्हे रितें ॥४॥

१४२८. नरस्तुति आणि कथेचा विकरा। हें नको दातारा घडों देऊं ॥१॥ ऐसिये कृपेची भाकितों करुणा। आहेसि तूं राणा उदाराचा ॥२॥ पराविया नारी आणि परधना। नको देऊं मनावरी येऊं ॥३॥ भूतांचा मत्सर आणि संतनिंदा। हें नको गोविंदा घडों देऊं ॥४॥ देहअभिमान नको देऊं शरीरीं। चढों कांहीं परी एक देऊं ॥५॥ तुका म्हणे तुझ्या पायांचा विसर। नको वारंवार पडों देऊं ॥६॥

१४२९. लौकिकापुरती नव्हे माझी सेवा। अनन्य केशव दास तुझा ॥१॥ म्हणऊनि करीं पायांसवें आळी। आणीक वेगळी नेणें परी ॥२॥ एकविध आम्ही स्वामिसेवेसाठीं। वरी तोचि पोटीं एकभाव ॥३॥ तुका म्हणे करीं सांगितलें काम। तुम्हां धर्माधर्म ठावे देवा ॥४॥

१४३०. ज्यांच्या संगें होतो पडिलों भोवणीं। ते केली धोवनी झाडोनियां ॥१॥ आतां एकाएकीं मनासीं विचार। करूं नाहीं भार दुजियाचा ॥२॥ प्रसादसेवनें आली उष्टावळी। उचित

ते काळीं अविचित ॥३॥ तुका म्हणे वर्म सांपडलें हातीं । सांडिली ते खंती चिंता देवा ॥४॥

१४३१. आवडी भोजन प्रकार परवडी । भिन्नभिन्न गोडी एका रसा ॥१॥ भोगित्या पंगती लाधलों प्रसाद । तिहीं नाहीं भेद राखियेला ॥२॥ पाकसिद्धि स्वहस्तकें विनियोग । आवडीचे भाग सिद्ध केले ॥३॥ तुका म्हणे आला उच्छिष्ट प्रसाद । तेणें हा आनंद माझ्या जीवा ॥४॥

१४३२. समर्थाचा ठाव संचलाचि असे । दुर्बळाची आस पुढें करी ॥१॥ फावलें घेईन पदरीं हें दान । एकांतीं भोजन करूं जाऊं ॥२॥ नलगे पाहावी उचिताची वेळ । अयाचित काळ साधला तो ॥३॥ तुका म्हणे पोट धालिया उपरी । गौरवा उत्तरीं पूजूं देवा ॥४॥

१४३३. आपुल्यांचा करीन मोळा । माझ्या कुळाचारांचा ॥१॥ अवघियांचें वंदिन पाय । ठायाठाय न देखें ॥२॥ नेदीं तुटों समाधान । थांबो जन सकळ ॥३॥ तुका म्हणे झाडा होय । तों हे सोय न संडीं ॥४॥

१४३४. जन्ममरणाची विसरलों चिंता । तूं माझा अनंता मायबाप ॥१॥ होतील ते डोळां पाहेन प्रकार । भय आणि भार निरसलीं ॥२॥ लिगाडाचे मुळीं होती पंचभूतें । ज्याचें त्यापुरतें विभागिलें ॥३॥ तुका म्हणे जाला प्रपंच पारिखा । जिवासी तूं सखा पांडुरंग ॥४॥

१४३५. उदार तूं हरी । ऐसी कीर्ति चराचरीं । अनंत हे थोरी । गर्जताती पवाडे ॥१॥ तुझें पायीं माझा भाव । पुसी जन्ममरण ठाव । देवाचा तूं देव । स्वामी सकळां ब्रह्मांडा ॥२॥ मागणें तें तुज मागों । जीवभाव तुज सांगों । लागों तरी लागों । पायां तुमच्या दातारा ॥३॥ दिसों देसी कींविलवाणे । तरी तुजचि हें उणें । तुका म्हणे जिणें । माझें तुज अधीन ॥४॥

१४३६. पाहा किती आले । शरण समानचि केले । नाहीं विचारिले । गुण दोष कोणाचे ॥१॥ मज सेंवटींसा द्यावा । ठाव तयांचिये देवा । नाहीं करीत हेवा । कांहीं थोरपणाचा ॥२॥ नाहीं पाहिला आचार । कुळगोत्राचा विचार । फेडूं आला भार । मग न म्हणे दगड ॥३॥ तुका म्हणे सर्व जाणा । तुझ्या आल्यावरि मना । केला तो उगाणा । घडल्या महादोषाचा ॥४॥

१४३७. आतां चुकलें बंधन । गेलें विसरोनि दान । आपुले ते वाण । सावकाश विकावे ॥१॥ लाभ जोडला अनंत । घरीं सापडलें वित्त । हातोहातीं थीत । उरों तळ नल्हाची ॥२॥ होतें गोविलें विसारें । माप जालें एकसरें । होतें होरें वारें । तोंचि लाहो साधिला ॥३॥ कराया जतन । तुका म्हणे निजधन । केला नारायण । साह्य नेदी विसंबों ॥४॥

१४३८. तुझ्या रूपें माझी काया । भरों द्यावी पंढरीराया । दर्पणींची छाया । एक रूपें भिन्नत्वें ॥१॥ सुख पडिलें सांठवणें । सत्ता वेचे शनें शनें । अडचणीचे कोन । चारी मार्ग उगवले ॥२॥ वसो डोळ्यांची बाहुली । कवळे भिन्न छाया आली । कृष्णांजन चाली । नव्हे परती माघारी ॥३॥ जीव ठसावला शिवें । मना आलें येथें जावें । फांटा पहिला नांवें । तुका म्हणे खंडलें ॥४॥

१४३९. सोसें सोसें मारूं हाका । होईल चुका म्हणऊनि । मागें पुढें क्षणभरी । नव्हे दुरी अंतर ॥२॥ नाम मुखीं बैसला चाळा । वेळोवेळां पडताळीं ॥३॥ तुका म्हणे सुखी केलें । या विठ्ठलें बहुतांसी ॥४॥

१४४०. धरूनियां चाली हांवा । येईल गांवा धांवत ॥१॥ पाठविसी मूळ तरी । लवकरी विठ्ठलें ॥२॥ नाचेन त्या प्रेमसुखें । कीर्तीमुखें गाईन ॥३॥ तुका म्हणे संतमेळीं । पायधुळी वंदीन ॥४॥

१४४१. मायबापाचिये भेटी । अवघ्या तुटी संकोचा ॥१॥ भोगिलें तें आहे सुख । आतां मुख मोकळें ॥२॥ उत्तम तें बाळासाठीं । लावी ओठीं माउली ॥३॥ तुका म्हणे जाली धणी । आनंद मनीं न समाये ॥४॥

१४४२. उदासीनाचा देह ब्रह्मरूप । नाहीं पुण्य पाप लागत त्या ॥१॥ अनुताप अंगीं अग्निचिया ज्वाळा । नाहीं मृगजळा विझों येत ॥२॥ दोष ऐशा नांवें देहाचा आदर । विटाळलें अंतर अहंभावें ॥३॥ तुका म्हणे जाय नासोनियां खंती । तंवचि हे चित्तीं बद्धता ते ॥४॥

१४४३. बंधनाचा तोडूं फांसा । देऊं आशा टाकोनि ॥१॥ नाहीं तेंच घेतां शिरीं । होईल दुरी निजपंथ ॥२॥ नाथिलेंचि माझें तुझें । कोण ओझें वागवी ॥३॥ तुका म्हणे अंतराय । देवीं जाणे जिणें तें ॥४॥

१४४४. तेंच किती वारंवार । बोलों फार बोलिलें ॥१॥ आतां माझे दंडवत । तुमच्या संत चरणांसी ॥२॥ आवडी ते नीच नवी । जाली जीवीं वसती ॥३॥ तुका म्हणे बरवें जालें । घरा आलें बंदरींचें ॥४॥

१४४५. उपासा सेवटीं अन्नासवें भेटी । तैसी माझी मिठी पडो पायीं ॥१॥ पुरवीं वासना साच सर्व जाणा । आम्हां नारायणा अंकिताची ॥२॥ बहु दिसां पुत्रामातेसवें भेटी । तैसा दाटो पोटीं प्रीति उभड ॥३॥ तुका म्हणे धन कृपणा सोइरें । यापरि दुसरें नहो आतां ॥४॥

१४४६. रणीं निघतां शूर न पाहे माघारें । ऐशा मज धीरें राखें आतां ॥१॥ संसारा हातीं अंतरलों दुरी । आतां कृपा करीं नारायण ॥२॥ वागवितों तुझिया नामाचें हत्यार । हाचि बडिवार मिरवितों ॥३॥ तुका म्हणे मज फिरतां माघारें । तेथें उणें पुरें तुम्हीं जाणा ॥४॥

१४४७. सकळ पूजा स्तुति । करावी ते व्हावी याती ॥१॥ म्हणऊनि वारा जन । संत पूजा नारायणा ॥२॥ सेवावें तें वरी । दावी उमटूनि ढेंकरीं ॥३॥ तुका म्हणे सुरा । दुधा म्हणतां केवीं बरा ॥४॥

१४४८. धीर नव्हे मनें । काय तयापाशीं उणें ॥१॥ भार घातलियावरी । दासां नुपेक्षील हरी ॥२॥ याच्या ऐसी आटी । द्यावी द्रव्याचिये साटी ॥३॥ तुका म्हणे पोटें ।

देवा बहु केलें खोटें ॥४॥

१४४९. द्रव्याचिया कोटी । नये गांडीची लंगोटी ॥१॥ अंतीं बोळवणेसाठीं । पांडुरंगा धरा कंठीं ॥२॥ लोभाचीं लोभिकें । यांचें सन्निधान फिकें ॥३॥ तुका म्हणे हितें । जग नहो पडो रितें ॥४॥

१४५०. कोणापाशीं आतां सांगों मी बोभाट । कधीं खटपट सरेल हे ॥१॥ कोणां आराणूक होईल कोणे काळीं । आपुलालीं जाळीं उगवूनि ॥२॥ माझा येणें दुःखें फुटतसे प्राण । न कळतां जन सुखी असे ॥३॥ भोगा आधीं मनें मानिलासे त्रास । पाहे लपायास ठाव कोठें ॥४॥ तुका म्हणे देतों देवाचें गाऱ्हाणें । माझें ऋण येणें सोसियेलें ॥५॥

१४५१. राहिलों निराळा । पाहों कवतुक डोळां ॥१॥ करूं जगाचा विनोद । डोळां पाहोनियां छंद ॥२॥ भुललिया संसारें । आलें डोळ्यासी माजिरें ॥३॥ तुका म्हणे माथा । कोणी नुचली सर्वथा ॥४॥

१४५२. आम्हां एकविध पुण्य सर्वकाळ । चरणकमळ स्वामीचे ते ॥१॥ चित्ताचे संकल्प राहिले चळण । आज्ञा ते प्रमाण करूनी असों ॥२॥ दुजिया पासाव परतलें मन । केलें घ्यावें दान होईल तें ॥३॥ तुका म्हणे आतां पुरला नवस । एकाविण ओस सकळही ॥४॥

१४५३. राहाणें तें पायापाशीं । आणिका रसीं विटोनि ॥१॥ ऐसा धीर देईं मना । नारायणा विनवितों ॥२॥ अंतरीं तो तुझा वास । आणिका नास कारणां ॥३॥ तुका म्हणे शेवटींचें । वाटे साचें राखावें ॥४॥

१४५४. चंदन तो चंदनपणें । सहज गुणें संपन्न ॥१॥ वेधलिया धन्य जाती । भाग्यें होती सन्मुख ॥२॥ परिसा अंगीं परिसपण । बाणोनि तें राहिलें ॥३॥ तुका म्हणे कैंची खंती । सुजाती ते टाकणी ॥४॥

१४५५. लय लक्षी मन न राहे निश्चळ । मुख्य तेथें बळ आसनाचें ॥१॥ हें तों असाध्य जी सर्वत्र या जना । भलें नारायणा आळवितां ॥२॥ कामनेचा त्याग वैराग्य या नांव । कुटुंब ते सर्व विषयजात ॥३॥ कर्म उसंतावें चालतां पाउलीं । होय जों राहिली देहबुद्धि ॥४॥ भक्ती ते नमावें जीवजंतुभूत । शांतवूनि ऊत कामक्रोध ॥५॥ तुका म्हणे साध्य साधन अवघड । देतां हें सांकडें देह बळी ॥६॥

१४५६. ऐसें कां हो न करा कांहीं । पुढें नाहीं नास ज्या ॥१॥ विश्वंभरा शरणागत । भूतजात वंदूनि ॥२॥ श्रुतीचें कां नेघा फळ । सारमूळ जाणोनि ॥३॥ तुका म्हणे पुढें कांहीं । वाट नाहीं यावरी ॥४॥

१४५७. जाला प्रेतरूप शरीराचा भाव । लक्षियेला ठाव स्मशानींचा ॥१॥ रडती रात्रंदिवस

कामक्रोधमाया। म्हणती हायहाय यमधर्म ॥२॥ वैराग्याच्या शेणी लागल्या शरीरा। ज्ञानाग्नि लागला ब्रह्मत्वेंसी ॥३॥ फिरविला घट फोडिला चरणीं। महावाक्य ध्वनि बोंब जाली ॥४॥ दिली तिळांजुळी कुळनामरूपासी। शरीर ज्याचें त्यासी समर्पिलें ॥५॥ तुका म्हणे रक्षा जाली आपोआप। उजळला दीप गुरुकृपा ॥६॥

१४५८. आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां। तो जाला सोहळा अनुपम्य ॥१॥ आनंदें दाटलीं तिन्ही त्रिभुवनें। सर्वात्मकपणें भोग जाला ॥२॥ एकदेशी होतों अहंकारें आथिला। त्याचा त्याग जाला सुकाळ हा ॥३॥ फिटलें सुतक जन्ममरणाचें। मी माझ्या संकोचें दुरीं जालों ॥४॥ नारायणें दिला वसतीसी ठाव। ठेवूनियां भाव ठेलों पायीं ॥५॥ तुका म्हणे दिलें उमटूनि जगीं। घेतलें तें अंगीं लावूनियां ॥६॥

१४५९. बोळविला देह आपुलेनि हातें। हुताशिलीं भूतें ब्रह्माग्नीसीं ॥१॥ एकवेळे जालें सकळ कारण। आतां नारायण नारायण ॥२॥ अमृतसंजीवनी विजविली खाई। अंगें तये ठायीं हारपलीं ॥३॥ एकादशीविध जागरण उपवास। बारावा दिवस भोजनाचा ॥४॥ अवघीं कर्में जालीं घटस्फोटापाशीं। संबंध एकेसी उरला नामीं ॥५॥ तुका म्हणे आतां आनंदी आनंदु। गोविंदें गोविंदु विस्तारला ॥६॥

१४६०. पिंडदान पिंडे ठेविलें करून। तिळीं तिळवण मूळत्रयीं ॥१॥ सारिले संकल्प एकाचि वचनें। ब्रह्मीं ब्रह्मार्पणें सेवटींच्या ॥२॥ सव्य अपसव्य बुडालें हें कर्म। एका एक वर्म एकोविष्णु ॥३॥ पित्यापुत्रत्वाचें झालें अवसान। जनीं जनार्दन अभेदेंसी ॥४॥ आहे तैसी पूजा पावली सकळ। सहज तो काळ साधियेला ॥५॥ तुका म्हणे केला अवघ्यांचा उद्धार। आतां नमस्कार सेवटींचा ॥६॥

१४६१. सरले आतां नाहीं। न म्हणे वेळकाळ कांहीं ॥१॥ विठ्ठल कृपाळु माउली। सदा प्रेमें पान्हायेली ॥२॥ सीण न विचारी भाग। नव्हे निष्ठुर नाहीं राग ॥३॥ भेदाभेद नाहीं। तुका म्हणे तिच्याठायीं ॥४॥

१४६२. तुज पाहावें हे धरितो वासना। परि आचरणा ठाव नाहीं ॥१॥ करिसी कैवार आपुलिया सत्ता। तरिच देखता होइन पाय ॥२॥ बाहिरल्या वेषें उत्तम दंडिलें। भीतरी मुंडलें नाहीं तैसें ॥३॥ तुका म्हणे वांयां गेलोंच मी आहें। जरि तुम्ही साह्य न व्हा देवा ॥४॥

१४६३. दुष्ट आचरण ग्वाही माझें मन। मज ठावे गुण दोष माझे ॥१॥ आतां तुम्ही सर्व जाणा पांडुरंगा। पाहिजे प्रसंगाऐसें केलें ॥२॥ व्याह्याजांवयांचे पंगती दुर्बळ। वंचिजे तो काळ नव्हे कांहीं ॥३॥ तुका म्हणे आतां जालों शरणागत। पुढील उचित तुम्हां हातीं ॥४॥

१४६४. आतां भय नाहीं ऐसें वाटे जीवा। घडलीया सेवा समर्थाची ॥१॥ आतां माझ्या

मनें धरावा निर्धार । चिंतनीं अंतर न पडावें ॥२॥ येथें नाहीं जाली कोणाची मिरास । आल्या याचकास कृपेविशीं ॥३॥ तुका म्हणे येथें नाहीं दुजी परी । राया रंकासरी देवापायीं ॥४॥

१४६५. वैष्णव चोरटीं । आली घरासी करंटी ॥१॥ आजि आपुलें जतन । करा भांडें पांघरूण ॥२॥ ज्याचे घरीं खावें । त्याचें सर्वस्वही न्यावें ॥३॥ तुका म्हणे माग । नाहीं लागों देत लाग ॥४॥

१४६६. ऐकतों दाट । आले एकाचे बोभाट ॥१॥ नका विश्वासों यावरी । चोर देहाचे खाणोरी ॥२॥ हेचि यांची जोडी । सदा बोडकीं उघडीं ॥३॥ तुका म्हणे न्यावें । ज्याचें त्यासी नाहीं ठावें ॥४॥

१४६७. आणिकाची सेवा करावी शरीरें । ती येथें उत्तरें कोरडींच ॥१॥ ऐसा पांडुरंग सुलभ सोपारा । नेघे येरझारा याचकाच्या ॥२॥ आणिकांचें देणें काळीं पोट भरे । येथील न सरे कल्पांतींही ॥३॥ आणिकांचे भेटी आडकाठी पडे । येथें तें न घडे वचनही ॥४॥ आणिकें दंडिती चुकलिया सेवा । येथें सोस हेवा नाहीं दोन्ही ॥५॥ तुका म्हणे करी आपणासारिखें । उद्धरी पारिखें उंच नीच ॥६॥

१४६८. दुर्जनाची जाती । त्याचे तोंडीं पडे माती ॥१॥ त्याची बुद्धि त्यासी नाडी । वाचें अनुचित बडबडी ॥२॥ पाहे संतांकडे । दोषदृष्टी सांडी भिडे ॥३॥ उंच नीच नाहीं । तुका म्हणे खळा कांहीं ॥४॥

१४६९. न करीं उदास । माझी पुरवावी आस ॥१॥ ऐका ऐका नारायणा । माझी परिसा विज्ञापना ॥२॥ मायबाप बंधुजन । तूंचि सोयरा सज्जन ॥३॥ तुका म्हणे तुजविरहित । कोण करिल माझें हित ॥४॥

१४७०. जीवन उपाय । वैद्यवाणी तुझे पाय ॥१॥ ते मी नाठवीं घडिघडी । म्हणोनियां चरफडीं ॥२॥ तुटे भवरोग । जेथें सर्व सुख भोग ॥३॥ तुका म्हणे विटे । धरियेलें जें गोमटें ॥४॥

१४७१. ऐका हें वचन माझें संतजन । विनवितों जोडुनि कर तुम्हां ॥१॥ तर्क करूनियां आपुल्या भावना । बोलतिया जना कोण वारीं ॥२॥ आमुच्या जीवींचा तोचि जाणे भाव । रखुमाईचा नाहो पांडुरंग ॥३॥ चित्त माझें त्याचे गुंतलेंसे पायीं । म्हणऊनि कांहीं नावडे त्या ॥४॥ तुका म्हणे मज न साहे मीनती । खेद होय चित्ती भंग मना ॥५॥

१४७२. ऐसा कोणी नाहीं हें जया नावडे । कन्या पुत्र घोडे दारा धन ॥१॥ निंब घेती रोगी कवणिया सुखें । हरावया दुःखे व्याधि पीडा ॥२॥ काय पळे सुखें चोर लागे पाठीं । न घालावी काठी आड तया ॥३॥ जायाचें कारण तोचि जाणे करूं । नये कोणां वारूं आणिकासी ॥४॥ तुका म्हणे तरी सांपडे निधान । द्यावा ओंवाळून जीव बळी ॥५॥

१४७३. काय मी अन्यायी तें घाला पालवीं । आणिक वाट दावीं चालावया ॥१॥ माग पाहोनियां जातों तेच सोयी । नवजावें कायी कोणी सांगा ॥२॥ धोपट मारग लागलासे गाढा । मज काय पीडा करा तुम्ही ॥३॥ वारितांही भय कोण धरी धाक । परी तुम्हां एक सांगतों मी ॥४॥ तुका म्हणे शूर दोहीं पक्षीं भला । मरतां मुक्त जाला मान पावे ॥५॥

१४७४. नव्हती माझे बोल जाणां हा निर्धार । मी आहें मजूर विठोबाचा ॥१॥ निर्धारा वचनें सोडविलें माझ्या । कृपाळुत्वें लज्जा राखियेली ॥२॥ निर्भर मानसीं जालों आनंदाचा । गोडावली वाचा नामघोषें ॥३॥ आतां भय माझें नासलें संसारीं । जालोंसें यावरी गगनाचा ॥४॥ तुका म्हणे हा तों संतांचा प्रसाद । लाधलों आनंद प्रेमसुख ॥५॥

१४७५. जरा कर्णमुळीं सांगों आली गोष्टी । मृत्याचिये भेटी जवळी आली ॥१॥ आतां माझ्या मना होई सावधान । ॐ पुण्याची जाण कार्यसिद्धि ॥२॥ शेवटील घडी बुडतां नलगे वेळ । साधावा तो काळ जवळी आला ॥३॥ तुका म्हणे चिंतीं कुळींची देवता । वारावा भोंवता शब्द मिथ्या ॥४॥

१४७६. मागील ते आटी येणें घडे सांग । सुतविलें अंग एका सूत्रें ॥१॥ पहिपाहुणेर ते सोहळ्यापुरते । तेथूनि आरते उपचार ते ॥२॥ आवश्यक तेथें आगळा आदर । चाली थोडें फार संपादतें ॥३॥ तुका म्हणे ऋण फिटे एके घडी । अलभ्य ते जोडी हातां आल्या ॥४॥

१४७७. साधावा तो देव सर्वस्वाचे साठीं । प्रारब्ध तुटी क्रियमाण ॥१॥ मग कासयाने पुन्हां संवसार । बीजाचे अंकुर दग्ध होती ॥२॥ जिणें दिल्हे त्यासी द्यावा पिंडदान । उत्तीर्ण चरण धरूनि व्हावें ॥३॥ तुका म्हणे निज भोगईल निजतां । नाहीं होईल सत्ता दुजियाची ॥४॥

१४७८. जळो आगी पडो खाण । नारायण भोगिता ॥१॥ ऐसी ज्याची वदे वाणी । नारायणीं ते पावे ॥२॥ भोजनकाळीं करितां धंदा । म्हणा गोविंदा पावलें ॥३॥ तुका म्हणे नलगे मोल । देवा बोल आवडती ॥४॥

१४७९. संतांसी क्षोभवी कोण्याही प्रकारें । त्याचें नव्हे बरें उभयलोकीं ॥१॥ देवाचा तो वैरी शत्रु दावेदार । पृथ्वीही थार नेदी तया ॥२॥ संतांपाशीं ज्याचा नुरेची विश्वास । त्याचे जाले दोष बळिवंत ॥३॥ तुका म्हणे क्षीर वासराच्या अंगें । किंवा धांवें लागें विषमें मारूं ॥४॥

१४८०. उदकीं कालवी शेण मलमूत्र । तो होय पवित्र कासयानें ॥१॥ उद्धाराशी ठाव नाहीं भाग्यहीना । विन्मुख चरणा संतांचिया ॥२॥ दुखवी तो बुडे सांगडीचा तापा । अतित्याई पापाचीच मूर्ति ॥३॥ तुका म्हणे जेव्हां फिरतें कपाळ । तरी अमंगळ योग होतो ॥४॥

१४८१. शोकवावा म्यां देहे । ऐसें नेणो पोटीं आहे ॥१॥ तरीच नेदां जी उत्तर । दु:खी राखिलें अंतर ॥२॥ जावें वनांतरा । येणें उद्देशें दातारा ॥३॥ तुका म्हणे गिरी ।

मज सेववावी दरी ॥४॥

१४८२. येइल तुझ्या नामा । लाज म्हूण पुरुषोत्तमा ॥१॥ धीर राहिलों धरूनि । त्रास उपजला मनीं ॥२॥ जगा कथा नाव । निराशेनें नुपजे भाव ॥३॥ तुम्ही साक्ष कीं गा । तुका म्हणे पांडुरंगा ॥४॥

१४८३. नेणें जप तप अनुष्ठान याग । काळें तंव लाग घेतलासे ॥१॥ रिघालों या भेणें देवाचे पाठीसी । लागे ज्याचें त्यासी सांभाळणें ॥२॥ मापें माप सळे चालिली चढती । जाली मग राती काय चाले ॥३॥ तुका म्हणे चोरा हातीं जें वांचलें । लाभावरी आलें वारिलेशु ॥४॥

१४८४. कळों आलें ऐसें आतां । नाहीं सत्ता तुम्हांसी ॥१॥ तरी वीर्य नाहीं नामा । जातो प्रेमा खंडत ॥२॥ आड ऐसें येतें पाप । वाढे ताप आगळा ॥३॥ तुका म्हणे गुण जाला । हा विठ्ठला हीन शक्ति ॥४॥

१४८५. लागों दिलें अंगा । ऐसें कांगा सन्निध ॥१॥ कोण्या पापें उदय केला । तो देखिला प्रळय ॥२॥ न देखवे पिडला सर्प । दया दर्प विषाचा ॥३॥ तुका म्हणे भलें । मज तों न वजे साहिलें ॥४॥

१४८६. धांवा शीघ्रवत । किंवा घ्यावें दंडवत ॥१॥ तुमचा जातो बडिवार । आम्ही होतों हीनवर ॥२॥ न धरावा धीर । धांवा नका चालों स्थिर ॥३॥ तुका म्हणे वाणी । माझी लाजली जी गुणीं ॥४॥

१४८७. सेवकासी आज्ञा निरोपासी काम । स्वामीचे ते धर्म स्वामी जाणे ॥१॥ मनाचिये मुळीं रहावें बैसोन । आकर्षावे गुण पायांपाशीं ॥२॥ भेटीचे तातडी करितसें लाहो । ओंवाळावा देहो ऐसें वाटे ॥३॥ तुका म्हणे माझें करावें कारण । आपुलें जतन ब्रीद करा ॥४॥

१४८८. उद्वेगासी बहु फांकती मारग । नव्हे ऐसें अंग माझें होतें ॥१॥ आतां कोण यासी करणें विचार । तो देखा साचार पांडुरंगा ॥२॥ मज तो अत्यंत दर्शनाची आस । जाला तरी हो नाश जीवित्वाचा ॥३॥ तुका म्हणे आहे वचनाची उरी । करितों तोंवरि विज्ञापना ॥४॥

१४८९. दुःखाची संगति । तिच्या ठायीं कोण प्रीति ॥१॥ अवघें असों हें निराळें । करूं सोइरें सावळें ॥२॥ क्षणभंगुर ते ठाव । करूनि सांडावेचि वाव ॥३॥ तुका म्हणे बरा । ठाव पावलों हा थारा ॥४॥

१४९०. गेला तरी जावो सुखें नरकासी । कळंकी याविशीं शिवों नये ॥१॥ रजस्वला करी वेलासी आघात । अंतर तों हित दुरी बरें ॥२॥ उगीच कां आलीं नासवावीं फळें । विटाळ विटाळें कालवूनि ॥३॥ तुका म्हणे लोणी घालोनि शेणांत । उपेगाची मात काय असे ॥४॥

१४९१. वर्णावे ते किती । केले पवाडे श्रीपति ॥१॥ विश्वासिया घडे लाभ । देइल तरी पद्मनाभ ॥२॥ भाव शुद्ध तरी । सांगितलें काम करी ॥३॥ तुका म्हणे भोळा देव । परी हा नागवी संदेह ॥४॥

१९२. संचितावांचून । पंथ न चलवे कारण ॥१॥ कोरडी ते अवघी आटी । वांयां जाय लळ घोटी ॥२॥ धन वित्तें जोडे । देव ऐसें तों न घडे ॥३॥ तुका म्हणे आड । स्वहितासी बहु नाड ॥४॥

१४९३. अतित्याई बुडे गंगे । पाप लागे त्याचें त्या ॥१॥ हें तों आपुलिया गुणें । असें जेणें योजिलें ॥२॥ अवचटें अग्नि जाळी । न सांभाळी तो दुःख पावे ॥३॥ जैसें तैसें दावी आरसा । नकट्या कैसा पालटे ॥४॥

१४९४. हेंदऱ्याचे भरितां कान । हलवी मान भोंक रितें ॥१॥ नाहीं मी तेथें सांगो स्पष्ट । भावें नष्ट घेत नाहीं ॥२॥ अवगुणी वाटलें चित्त । तया हित आतळे ना ॥३॥ तुका म्हणे फजितखोरा । म्हणतां बरा उगा रहा ॥४॥

१४९५. माहीं सरो येत जोडिल्या वचनीं । कवित्वाची वाणी कुशळता ॥१॥ सत्याचा अनुभव वेधी सत्यपणें । अनुभवाच्या गुणें रुचों येते ॥२॥ काय आगीपाशीं शृंगारिलें चाले । पोटींचें उकले कसापाशीं ॥३॥ तुका म्हणे येथें करावा उकल । लागेचि ना बोल वाढवूनि ॥४॥

१४९६. लचाळाच्या कामा नाहीं ताळावाळा । न कळे ओंगळा उपदेश ॥१॥ वचनचर्येची न कळे चांचणी । ऐसीं संघष्टनी अमंगळ ॥२॥ समय न कळे वेडगळ बुद्धि । विजाती ते शुद्धि चांच चाट ॥३॥ तुका म्हणे याचा धिक्कारचि बरा । बहुमति खराहूनि हीन ॥४॥

१४९७. एक धरिला चित्तीं । आम्हीं रखुमाईचा पती ॥१॥ तेणें जालें अवघें काम । निवारला भवभ्रम ॥२॥ परद्रव्य परनारी । जाली विषाचिये परी ॥३॥ तुका म्हणे फार । नाहीं लागत व्यवहार ॥४॥

१४९८. भेणें पळे डोळसा । न कळे मृत्यू तो सरिसा ॥१॥ कैसी जाली दिशाभुली । नवजाति ये वाटचाली ॥२॥ संसाराची खंती । मावळल्या तरी शक्ति ॥३॥ तुका म्हणे हीणा । बुद्धि चुकली नारायणा ॥४॥

१४९९. अभिमानाचें तोंड काळें । दावी बळें अंधार ॥१॥ लाभ न्यावा हातोहातीं । तोंडीं माती पाडोनि ॥२॥ लागलीसे पाठी लाज । जाले काज नासाया ॥३॥ तुका म्हणे कुश्चळ मनीं । विटंबणीं पडिलीं तीं ॥४॥

१५००. चोराचिया धुडका मनीं । वसे ध्यानीं लांछन ॥१॥ यासी आम्हीं करणें काय । वर्षों न्यायें पर्जन्य ॥२॥ ज्याच्या बैसे खतावरी । ते चुरचुरी दाखवूनि ॥३॥ तुका म्हणे

त्याची खोडी । त्याची जोडी त्या पीडी ॥४॥

१५०१. बुद्धिहीना उपदेश । तें तें विष अमृतीं ॥१॥ हुंगो नये गोन्हवाडी । तेथें जोडी विटाळ ॥२॥ आळसियाचें अंतर कुडें । जैसें मढें निष्काम ॥३॥ तुका म्हणे ऐशा हातीं । मज श्रीपती वांचवा ॥४॥

१५०२. न करीं तुमची सेवा । बापुडें मीपणें देवा । बोलिलों तो पाववा । पण सिद्धी सकळ ॥१॥ आणीक काय तुम्हां काम । आम्हां नेदा तरी प्रेम । कैसे धर्माधर्म । निश्चयेंसी रहाती ॥२॥ आम्हीं वेचलों शरीरें । तुम्ही बीज पेरा खरें । संयोगाचें बरें । गोड होतें उभयतां ॥३॥ एका हातें टाळी । कोठें वाजते निराळी । जाला तरी बळी । स्वामीविण शोभेना ॥४॥ रूपा यावें जी अनंता । धरीन पुटाची त्या सत्ता । होईन सरता । संतांमाजी पोसणा ॥५॥ ठेविलें उधारा । वरी काय तो पातेरा । तुका म्हणे बरा । रोकडाचि निवाड ॥६॥

१५०३. भुके नाहीं अन्न । मेल्यावरी पिंडदान ॥१॥ हे तों चाळवाचाळवी । केलें आपणचि जेवी ॥२॥ नैवेद्याचा आळ । वेचे ठाकणीं सकळ ॥३॥ तुका म्हणे जड । मज न राखावें दगड ॥४॥

१५०४. सर्व भाग्यहीन । असें सांभाळिलों दीन ॥१॥ पायीं संतांचे मस्तक । असों जोडोनि हस्तक ॥२॥ जाणें तरी सेवा । दीन दुर्बळाची देवा ॥३॥ तुका म्हणे जीव । समर्पून भाकीं कींव ॥४॥

१५०५. भाग्याचा उदय । ते हे जोडी संतपाय ॥१॥ येथूनिया नुठवुं माथा । मरणावांचूनि सर्वथा ॥२॥ होईं बळकट । माझ्या मना तुं रे धीट ॥३॥ तुका आला लोटांगणीं । भक्तिभाग्या जाली धणी ॥४॥

१५०६. नाहीं तरी आतां कैंचा अनुभव । जालासी तूं देव घरघेण ॥१॥ जेथें देखें तेथें लांचाचे पर्वत । घ्यावें तरि चित्त समाधान ॥२॥ आधीं वरी हात या नांवें उदार । उसण्याचे उपकार फिटाफीट ॥३॥ तुका म्हणे जैसी तैसी करूं सेवा । सामर्थ्यानें देवा पायांपाशीं ॥४॥

१५०७. आम्ही सर्वकाळ कैंचीं सावधान । व्यवसायें मन अभ्यासलें ॥१॥ तरी म्हणा मोट ठेविली चरणीं । केलों गुणागुणीं कासावीस ॥२॥ याच कानसुलीं मारीतसे हाका । मज घाटूं नका मधीं आतां ॥३॥ तुका म्हणे निद्रा जागृति सुषुप्ति । तुम्ही हो श्रीपती साक्षी येथें ॥४॥

१५०८. नसताचि दाउनि भेव । केला जीव हिंपुटी ॥१॥ जालों तेव्हां कळलें जागा । वाउगा हा आकांत ॥२॥ गंवसिलों पुढें मागें । लागलागे पावला ॥३॥ तुका म्हणे केली आयणी । सलगीच्यांनीं सन्मुख ॥४॥

१५०९. हें का आम्हां सेवा दान । देखों सीण विषमाचा ॥१॥ सांभाळा जी ब्रीदावळी ।

तुम्ही कां कलासारिखे ॥२॥ शरणागतें वैऱ्या हातीं । हे निश्चिंती देखिली ॥३॥ तुका म्हणे इच्छीं भेटी । पाय पोटीं उफराटे ॥४॥

१५१०. कां हो आलें नेणों भागा । पांडुरंगा माझिया ॥१॥ उफराटी तुम्हां चाली । क्रिया गेली सत्याची ॥२॥ साक्षी हेगे माझें मन । आर्त कोण होतें तें ॥३॥ तुका म्हणे समर्थपणें । काय नेणें करीतसां ॥४॥

१५११. शकुनानें लाभ हानि । येथूनिच कळतसे ॥१॥ भयारूढ जालें मन । आतां कोण विश्वास ॥२॥ प्रीत कळे आळिंगनीं । संपादणीं अत्यंत ॥३॥ तुका म्हणे मोकलिलें । कळों आलें बरवें हें ॥४॥

१५१२. न होय निग्रह देहासी दंडण । न वजे भूकतहान सहावली ॥१॥ तरि नित्य नित्य करीं आळवण । माझा अभिमान भिन्न असों द्यावा ॥२॥ नाहीं विटाळीलें कायावाचामन । संकल्पानें भिन्न आशेचिया ॥३॥ तुका म्हणे भवसागरीं उतार । करावया आधार इच्छीतसें ॥४॥

१५१३. आइकीली कीर्ति संतांच्या वदनीं । तरि हें ठाकोनि आलो स्थळ ॥१॥ मागिला पुढिला करावें सारिखें । पालटों पारिखें नये देवा ॥२॥ आम्हांसि विश्वास नामाचा आधार । तुटतां हे थार उरी नाहीं ॥३॥ तुका म्हणे येथें नसावेंचि दुजें । विनंति पंढरिराजें परिसावी हे ॥४॥

१५१४. मोलाचें आयुष्य वेचतसे सेवे । नुगवतां गोवे खेद होतो ॥१॥ उगवूं आलेति तुम्ही नारायणा । परिहार या सिणा निमिषांत ॥२॥ लिगाडाचे मासी न्यायें जाली परी । उरली ते उरी नाहीं कांहीं ॥३॥ तुका म्हणे लाहों साधीं वाचाबळें । ओढियेलों काळें धांव घाला ॥४॥

१५१५. म्हणऊनि जालों क्षेत्रींचे संन्यासी । चित्त आशापाशीं आवरूनि ॥१॥ कदापिही नव्हे सीमा उल्लंघन । केलें विसर्जन आव्हानींच ॥२॥ पारिखा तो आतां जाला दुजा ठाव । दृढ केला भाव एकविध ॥३॥ तुका म्हणे कार्यकारणाचा हेवा । नाहीं जीव देवा समर्पिला ॥४॥

१५१६. विभ्रंशिली बुद्धि देहांतीं जवळी । काळाची अवकाळीं वायचाळा ॥१॥ पालटलें जैसें देठ सांडी पान । पिकलें आपण तयापरी ॥२॥ न मारितां हीन बुद्धि दुःख पावी । माजल्याची गोवी तयापरी ॥३॥ तुका म्हणे गळ लागलिया मत्स्या । तळमळीचा तैसा लवलाहो ॥४॥

१५१७. नवजावा तो काळ वांयां । मुख्य दया हे देवा ॥१॥ म्हणऊनि जैसें तैसें । रहणी असें पायांचे ॥२॥ मोकळें हें मन कष्ट । करीं नष्ट दुर्जन ॥३॥ तुका म्हणे कांहीं नेणें । नवजें येणेंपरी वांयां ॥४॥

१५१८. कल्पतरूअंगीं इच्छिलें तें फळ । अभागी दुर्बळ भावी सिद्धी ॥१॥ धन्य त्या जाती धन्य त्या जाती । नारायण चित्तीं सांठविला ॥२॥ बीजाऐसा द्यावा उदकें अंकुर । गुणाचे प्रकार ज्याचे तया ॥३॥ तुका म्हणे कळे पारखिया हिरा । ओझें पाठीं खरा चंदनाचें ॥४॥

१५१९. उकारडा आधीं अंगीं नरकाडी । जातीची ते जोडी तेचि चित्तीं ॥१॥ कासयानें देखें अंधळें माणिकें । चवीविण फिके वांया जाय ॥२॥ काय जाणे विष पालटों उपचारें । मूर्खासी अंतर तोंचि बरें ॥३॥ तुका म्हणे काय उपदेश वेड्या । संग होतां रेड्यासवें कष्ट ॥४॥

१५२०. जया शिरीं कारभार । बुद्धि सार तयाची ॥१॥ वर्ते तैसें वर्ते जन । बहुतां गुण एकाचा ॥२॥ आपणीयां पाक करीं । तो इतरीं सेविजे ॥३॥ तुका म्हणे शूर राखे । गांडया वाखे सांगातें ॥४॥

१५२१. एक एका साह्य करूं । अवघे धरूं सुपंथ ॥१॥ कोण जाणे कैसी परी । पुढें उरी ठेवितां ॥२॥ अवघे धन्य होऊं आतां । स्मरवितां स्मरण ॥३॥ तुका म्हणे अवघी जोडी । ते आवडी चरणांची ॥४॥

१५२२. फलकट तो संसार । येथें सार भगवंत ॥१॥ ऐसे जागवितों मना । सरसें जनासहित ॥२॥ अवघें निरसूनि काम । घ्यावें नाम विठोबाचें ॥३॥ तुका म्हणे देवाविण । केला सीण तो मिथ्या ॥४॥

१५२३. शुद्धरसें ओलावली । रसना धाली न धाये ॥१॥ कळों नये जाली धणी । नारायणीं पूर्णता ॥२॥ आवडे ते तेचि यासी । ब्रह्म रसीं निरसें ॥३॥ तुका म्हणे बहुतां परी । करुणाकरीं सेवन ॥४॥

१५२४. असंतीं कांटाळा हा नव्हे मत्सर । ब्रह्म तें विकारविरहित ॥१॥ तरि म्हणा त्याग प्रतिपादलासे । अनादि हा असे वैराकार ॥२॥ सिजलें हिरवें एका नांवें धान्य । सेवनापें भिन्न निवडे तें ॥३॥ तुका म्हणे भूतीं साक्ष नारायण । अवगुणीं दंडण गुणीं पूजा ॥४॥

१५२५. आपुलें आपण जाणावें स्वहित । जेणें राहे चित्त समाधान ॥१॥ बहुरंगें माया असे विखुरली । कुंठितचि जाली होतां बरी ॥२॥ पूजा ते अबोला चित्ताच्या प्रकारीं । भाव विश्वंभरी समर्पावा ॥३॥ तुका म्हणे गेला फिटोनियां भेद । मग होतो देव मनाचाचि ॥४॥

१५२६. असोनि न कीजे अलिप्त अहंकारें । उगीच या भारें कुंथाकुंथी ॥१॥ धांवा सोडवणें वेगीं लवकरी । मी तो जालों हरी शक्तिहीन ॥२॥ भ्रमल्यानें दिसें बांधल्याचेपरी । माझें मजवरी वाहोनियां ॥३॥ तुका म्हणे धांव घेतलीसे सोई । आतां पुढें येईं लवकरी ॥४॥

१५२७. आपुल्याचा भोत चाटी । मारी करंटी पारिख्या ॥१॥ ऐसें जन भुललें देवा । मिथ्या हेवा वाढवी ॥२॥ गळ गिळी आमिषें मासा । प्राण आशा घेतला ॥३॥ तुका म्हणे बोकड मोहो । धरी पहा हो खाटिकाचा ॥४॥

१५२८. विषय तो मरणासंगीं । नेणे सुटिका अभागी ॥१॥ शास्त्राचा केला लुंडा । तोंडीं पाडियेला धोंडा ॥२॥ अगदीं मोक्ष नाहीं ठावा । काय सांगावें गाढवा ॥३॥ तुका

म्हणे ग्यानगंड । देवा सुखें पावो नाड ॥४॥

१५२९. मीच विखळ मीच विखळ । येर सकळ बहु बरें ॥१॥ पाहिजे हें क्षमा केलें । येणें बोलें विनवणी ॥२॥ मीच माझें मीच माझें । जालें ओझें अन्याय ॥३॥ आधीं आंचवला आधीं आंचवला । तुका जाला निर्मनुष्य ॥४॥

१५३०. येणें जाणें तरी । राहे देव कृपा करी ॥१॥ ऐसें तंव पुण्य नाहीं । पाहातां माझे गांठीं कांहीं ॥२॥ भय निवारिता । कोण वेगळा अनंता ॥३॥ तुका म्हणे बारे भोग । वारी तरी पांडुरंग ॥४॥

१५३१. भल्याचें कारण सांगावें स्वहित । जैसी कळे नीत आपणासी ॥१॥ परी आम्ही असों एकाचिये हातीं । नाचवितों चित्तीं त्याचें तैसें ॥२॥ वाट सांगे त्याच्या पुण्या नाहीं पार । होती उपकार अगणित ॥३॥ तुका म्हणे तुम्ही बहु कृपावंत । आपुलें उचित केलें संतीं ॥४॥

१५३२. लावूनियां पुष्टी पोरें । आणी करकर कथेमाजी ॥१॥ पडा पायां करा विनंती । दवडा हातीं धरोनियां ॥२॥ कुर्वाळूनि बैसे मोहें । प्रेम कां हे नासीतसे ॥३॥ तुका म्हणे वाटे चित्त । करा फजित म्हणऊनि ॥४॥

१५३३. पुण्य उभें राहो आतां । संताचें याकारणें ॥१॥ पंढरीचे लागा वाटे । सखा भेटे विठ्ठल ॥२॥ संकल्प हे यावे फळा । कळवळा बहुतांचा ॥३॥ तुका म्हणे होउनि क्षमा । पुरुषोत्तमा अपराध ॥४॥

१५३४. आइकिली मात । पुरविले मनोरथ ॥१॥ प्रेम वाढविलें देवा । बरवी घेऊनियां सेवा ॥२॥ केली विनवणी । तैसी पुरविली धणी ॥३॥ तुका म्हणे काया । रसा कुरोंडी वरोनियां ॥४॥

१५३५. संतांची स्तुति तें दर्शनाच्या योगें । पडिल्या प्रसंगें ऐसी कीजे ॥१॥ संकल्प ते सदा स्वामीचेचि चित्तीं । फांको नये वृत्ति अखंडित ॥२॥ दास्यत्वे तें असे एकविध नांवें । उरों नये जीवें भिन्नत्वेंसी ॥३॥ निज बीजा येथें तुका अधिकारी । पाहिजे तें पेरी तये वेळीं ॥४॥

१५३६. सेजेचा एकांत आगीपाशीं कळे । झांकलिया डोळे अध:पात ॥१॥ राहो अथवा मग जळो आगीमधीं । निवाड तो आधीं होउनि गेला ॥२॥ भेणें झडपणी नाहीं येथें दुजें । पादरधिटा ओझें हतियारें ॥३॥ तुका म्हणे मज नाहीं जो भरंवसा । तोंवरि सहसा निवाड तो ॥४॥

१५३७. न सरे भांडार । भरलें वेचितां अपार ॥१॥ भरित्याचें पोट भरे । पुढिलासी पुढें उरे ॥२॥ कारणापुरता । लाहो आपुल्याल्या हिता ॥३॥ तुका म्हणे देवा । पुढें केला चाले हेवा ॥४॥

१५३८. तरी हांव केली अमुप व्यापारें । व्हावें एक सरें धनवंत ॥१॥ जालों हरिदास शूरत्वाच्या नेमें । जालीं ठावीं वर्मे पुढिलांची ॥२॥ जना वेगळे हे असे अभिनव । बळी दिला जीव म्हणऊनि ॥३॥ तुका म्हणे तरी लागलों विल्हेसी । चालतिया दिवसीं स्वामी ऋणी ॥४॥

१५३९. कोण दुजें हरी सीण । शरण दीन आल्याचा ॥१॥ तुम्हांविण जगदीशा । उदार ठसा त्रिभुवनीं ॥२॥ कोण ऐसें वारी पाप । हरि ताप जन्माचा ॥३॥ तुका म्हणे धांव घाली । कोण चाली मनाची ॥४॥

१५४०. ग्रंथाचे ते अर्थ नेणता हे खळ । बहु अनर्गळ जाले विषयीं ॥१॥ नाहीं भेद म्हणून भलतेंचि आचरे । मोकळा विचरे मनासवें ॥२॥ तुका म्हणे विषा नांव ते अमृत । पापपुण्या भीत नाहीं नष्ट ॥३॥

१५४१. कायावाचामनें जाला विष्णुदास । काम क्रोध त्यास बाधीतना ॥१॥ विश्वासी तो करी स्वामीवरी सत्ता । सकळ भोगिता होय त्याचें ॥२॥ तुका म्हणे चित्त करावें निर्मळ । येऊनि गोपाळ राहे तेथें ॥३॥

१५४२. येईं गा तूं मायबापा पंढरीच्या राया । तुजविण सीण वाटे क्षीण जाली काया ॥१॥ याती हीन मती हीन कर्म हीन माझें । सर्व लज्जा सांडोनियां शरण आलों तुज ॥२॥ दीनानाथ दीनबंधु नाम तुज साजे । पतितपावन नाम ऐसी ब्रीदावळी गाजे ॥३॥ विटेवरी उभा नीट कटावरी कर । तुका म्हणे हेंचि आम्हां ध्यान निरंतर ॥४॥

१५४३. हरिचें नाम कदाकाळीं कां रे नये वाचे । म्हणतां राम राम तुझ्या बाचें काय वेचे ॥१॥ पोटासाठीं खटपट करिसी अवघा वीळ । राम राम म्हणतां तुझी बसली दांतखीळ ॥२॥ द्रव्याचिया आशा तुजला दाही दिशा न पुरती । कीर्तनासी जातां तुझी जड झाली माती ॥३॥ तुका म्हणे ऐशा जीवा काय करूं आतां । राम राम न म्हणे त्याचा गाढव मातापिता ॥४॥

१५४४. गंगा आली आम्हांवरी । संत पाउलें साजिरीं ॥१॥ तेथें करीन अंघोळी । उडे चरणरज धुळी । येती तीर्थावळी । पर्वकाळ सकळ ॥२॥ पाप पळालें जळालें । भवदु:ख दुरावलें ॥३॥ तुका म्हणे धन्य जालों । संतसागरीं न्हालों ॥४॥

१५४५. आम्हां सुकाळ सुखाचा । जवळी हाट पंढरीचा । सादाविती वाचा । रामनामें वैष्णव ॥१॥ घ्यारे आपुलाल्या परी । नका ठेवूं कांहीं उरी । ओसरतां भरी । तोंडवरी अंबर ॥२॥ वाहे बंदर द्वारका । खेप आली पुंडलिका । उभेचि विकीलें एका । सनकादिका सांपडलें ॥३॥ धन्य धन्य हे भूमंडळीं । प्रगटली नामावळी । घेती जीं दुबळी । तीं आगळी सदैव ॥४॥ माप आपुलेनि हातें । कोणी नाहीं निवारितें । पैस करूनि चित्तें । घ्यावें हितें आपुलिया ॥५॥ नाहीं वांटितां सरलें । आहे तैसेंचि भरलें । तुका म्हणे गेलें । वांयांविण न घेतां ॥६॥

१५४६. चुकलिया ताळा । वाती घालुनि बैसे डोळां ॥१॥ तैसें जागें करीं चित्ता । कांहीं आपुलिया हिता ॥२॥ विक्षेपिलें धन । तेथें गुंतलेंसें मन ॥३॥ नाशिवंतासाठीं । तुका म्हणे करिसी आटी ॥४॥

१५४७. करूनि जतन । कोणा कामा आलें धन ॥१॥ ऐसें जाणत जाणतां । कां रे होतोसी नेणता ॥२॥ प्रिया पुत्र बंधु । नाहीं तुज याशीं संबंधु ॥३॥ तुका म्हणे एका । हरीविण नाहीं सखा ॥४॥

१५४८. आम्ही देतों हाका । कां रें जालासि तूं मुका ॥१॥ न बोलसी नारायणा । कळलासी क्रियाहीना ॥२॥ आधीं करूं चौघाचार । मग सांडूं भीडभार ॥३॥ तुका म्हणे शेवटीं । तुम्हां आम्हां घालूं तुटी ॥४॥

१५४९. नव्हे भिडा हें कारण । जाणे करूं ऐसें जन ॥१॥ जों जों धरावा लौकिक । रडवितोसी आणीक ॥२॥ चाल जाऊं संतांपुढें । ते हें निवडिती रोकडें ॥३॥ तुका म्हणे तूं निर्लज्ज । आम्हां रोकडी गरज ॥४॥

१५५०. बहु होता भला । परि ये रांडेनें नासिला ॥१॥ बहु शिकला रंग चाळे । खरें खोटें इचे वेळे ॥२॥ नव्हतें आळवितें कोणी । इनें केला जग ऋणी ॥३॥ ज्याचें त्यासी नेदी देऊं । तुका म्हणे धावे खाऊं ॥४॥

१५५१. काय करावें तें आतां । जालें नयेसें बोलतां ॥१॥ नाहीं दोघांचिये हातीं । गांठी घालावी एकांतीं ॥२॥ होय आपुलें काज । तों हे भीड सांडूं लाज ॥३॥ तुका म्हणे देवा । आधीं निवडूं हा गोवा ॥४॥

१५५२. केली सलगी तोंडपिटी । आम्ही लडिवाळें धाकुटीं ॥१॥ न बोलावें तेंचि आलें । देवा पाहिजे साहिलें ॥२॥ अवघ्यामध्यें एक वेडें । तेंचि खेळविती कोडें ॥३॥ तुका म्हणे मायबापा । मजवरी कोपों नका ॥४॥

१५५३. शिकवूनि बोल । केलें कवतुक नवल ॥१॥ आपणियां रंजविलें । बापें माझिया विठ्ठलें ॥२॥ हातीं प्रेमाचें भातुकें । आम्हां देउनियां निकें ॥३॥ तुका करी टाहो । पाहे रखुमाईचा नाहो ॥४॥

१५५४. तेथें सुखाची वसति । गाती वैष्णव नाचती । दिंड्या पताका झळकती । जे गर्जती हरिनामें ॥१॥ दोषा जाली घेघेमारी पळती भरले दिशा चारी । न येती माघारीं । नाहीं उरी परताया ॥२॥ विसरोनि देवपणा । उभा पंढरीचा राणा । विटोनि निर्गुणा । रूप धरिलें गोजिरें ॥३॥ पोट सेवितां न धाये । भूक भुकेलीच राहे । तुका म्हणे पाहे । कोण वास मुक्तीची ॥४॥

१५५५. शूद्रवंशीं जन्मलों । म्हणोनि दंभें मोकलिलों ॥१॥ अरे तूंच माझा आतां । मायबाप पंढरीनाथा ॥२॥ घोकाया अक्षर । मज नाहीं अधिकार ॥३॥ सर्वभावें दीन । तुका म्हणे यातिहीन ॥४॥

१५५६. वेडें वाकडें गाईन । परि तुझाचि म्हणवीन ॥१॥ मज तारीं दीनानाथा । ब्रीद

साच करीं आतां ॥२॥ केल्या अपराधाच्या राशी । म्हणऊनि आलों तुजपाशीं ॥३॥ तुका म्हणे मज तारीं । सांडीं ब्रीद नाहीं तरी ॥४॥

१५५७. हरिभक्त माझे जिवलग सोइरे । हृदयीं पाउलें धरीन त्यांचीं ॥१॥ अंतकाळीं येती माझ्या सोडवणे । मस्तक बैसणें देईन त्यासी ॥२॥ आणिक सोइरे सज्जन वो कोणी । वैष्णवांवांचोनि नाहीं मज ॥३॥ देइन आलिंगण धरीन चरण । संवसारसीण नासे तेणें ॥४॥ कंठीं तुळशीमाळा नामाचे धारक । ते माझे तारक भवनदीचे ॥५॥ तयांचे चरणीं घालीन मी मिठी । चाड ही वैकुंठीं नाहीं मज ॥६॥ आळसे दंभें भावें हरिचें नाम गाती । ते माझे सांगाती परलोकींचे ॥७॥ कायावाचामनें देईन क्षेम त्यासी । चाड जीवित्वासी नाहीं मज ॥८॥ हरिचें नाम मज म्हणविती कोणी । तया सुखा धणी धणीवरी ॥९॥ तुका म्हणे तया उपकारें बांधलों । म्हणऊनि आलों शरण संतां ॥१०॥

१५५८. लटिका तो प्रपंच एक हरिनाम साच । हरिविण आहाच सर्व इंद्रियें ॥१॥ लटिकें तें मौन भ्रमाचें स्वप्न । हरिविण ध्यान नश्वर आहे ॥२॥ लटिकिया वित्पत्ति हरिविण करिती । हरी नाहीं चित्तीं तो शव जाणा ॥३॥ तुका म्हणे हरि हें धरिसी निर्धारीं । तरी तूं झडकरी जासी वैकुंठासी ॥४॥

१५५९. सर्वस्वासी मुकावें तेणें हरिसी जिंकावें । अर्थ प्राण जीवें देहत्याग ॥१॥ मोह ममता माया चाड चिंता । विषयकंदुवेथा जाळुनियां ॥२॥ लोकलज्जा दंभ आणि अहंकार । करूनि मत्सर देशाधडी ॥३॥ शांति क्षमा दया सखिया विनउनी । मूळ चक्रपाणी धाडी त्यांसी ॥४॥ तुका म्हणे याती अक्षरें अभिमान । सांडोनियां शरण रिघें संतां ॥५॥

१५६०. एकांताचें सुख देईं मज देवा । आघात या जीवा चुकवूनि ॥१॥ ध्यानीं रूप वाचे नाम निरंतर । आपुला विसर पडों नेदीं ॥२॥ मायबाळा भेटी सुखाची आवडी । तैसी मज गोडी देईं देवा ॥३॥ कीर्ती ऐकोनियां जालों शरणागत । दासाचें तूं हित करितोसी ॥४॥ तुका म्हणे मी तों दीन पापराशी । घालावें पाठीशीं मायबापा ॥५॥

१५६१. लटिकें तें ज्ञान लटिकें ते ध्यान । जरि हरिकीर्तन प्रिय नाहीं ॥१॥ लटिकाचि दंभ घातला दुकान । चाळविलें जन पोटासाठीं ॥२॥ लटिकेंचि केलें वेदपारायण । जरि नाहीं स्फुंदन प्रेम कथे ॥३॥ लटिकें तें तप लटिका तो जप । आळस निद्रा झोप कथाकाळीं ॥४॥ नाम नावडे तो करील बोहरी । नाहीं त्याची खरी चित्तशुद्धि ॥५॥ तुका म्हणे ऐसीं गर्जती पुराणें । शिष्टांचीं वचनें मागिलाही ॥६॥

१५६२. भूतीं भगवद्भाव । मात्रासहित जीव । अद्वैत तो ठाव । निरंजन एकला ॥१॥ ऐसीं गर्जती पुराणें । वेदवाणी सकळ जन । संत गर्जतील तेणें । अनुभवें निर्भर ॥२॥ माझें

तुझें हा विकार। निरसतां एकंकार। नलगे कांहीं फार। विचारचि करणें ॥३॥ तुका म्हणे दुजें। हें तों नाहींच सहजें। संकल्पाच्या काजें। आपेंआप वाढलें ॥४॥

१५६३. नेणें फुंको कान । नाहीं एकांतींचें ज्ञान ॥१॥ तुम्ही आइका हो संत । माझा सादर वृत्तांत ॥२॥ नाहीं देखिला तो डोळां । देव दाखवूं सकळां ॥३॥ चिंतनाच्या सुखें । तुका म्हणे नेणें दु:खें ॥४॥

१५६४. त्याग तरी ऐसा करा । अहंकारा दवडावें ॥१॥ मग जैसा तैसा राहें । काय पाहें उरलें तें ॥२॥ अंतरींचें विषम जाड । येऊं पुढें न द्यावें ॥३॥ तुका म्हणे शुद्ध मन । समाधान पाहिजे ॥४॥

१५६५. मातेचिये चित्तीं । अवघी बाळकाची व्याप्ति ॥१॥ देह विसरे आपुला । जवळी घेतां सीण गेला ॥२॥ दावी प्रेमभातें । आणि अंगावरी चढतें ॥३॥ तुका संतांपुढें । पायीं झोंबे लाडें कोडें ॥४॥

१५६६. कोणा पुण्या फळ आलें। आजि देखिलीं पाउलें ॥१॥ ऐसें नेणों नारायणा। संतीं सांभाळिलें दीना ॥२॥ कोण लाभकाळ । दीन आजिचा मंगळा ॥३॥ तुका म्हणे जाला । एवढा लाभ का विठ्ठला ॥४॥

१५६७. मान इच्छी तो अपमान पावे। अमंगळ सवें अभाग्याची ॥१॥ एकाचिये अंगीं दुजियाचा वास। आशा पुढें नाश सिद्ध करी ॥२॥ आधीक फळासी कोठें पावों शके। वासनेची भिकेवरी चाली ॥३॥ तुका म्हणे राजहंस ढोरा नांवें। काय तया घ्यावें अळंकाराचें ॥४॥

१५६८. संसारापासूनी कैसें सोडविशी । न कळे हृषीकेशी काय जालों । करितां न सरे कांहीं आधीक वाढ पाहीं। तृष्णा देशधडी केलों। भक्तिभजनभाव यांसी नाहीं ठाव। चरणीं तुझ्या अंतरलों। मागें पुढें रीघ न पुरेचि पाहतां। अवघा अवघीं वेष्टिलों ॥१॥ आतां माझी लाज राखें नारायणा। हीन दीन लीन याचकाची। करितां न कळे कांहीं असतील गुण दोष। करी होळी संचिताची ॥२॥ इंद्रियद्वारें मन धांवे सैरें। नागवे करितांचि कांही। हात पाय कान मुख लिंगस्थान। नेत्रद्वारें घ्राण पाहीं। जया जैसी सोय तया तैसें होय। क्षण एक स्थिर नाहीं। करिती तडातोडी ऐसी यांची खोडी। न चले माझें यास कांहीं ॥३॥ शरीरसंबंधु पुत्र पत्नी बंधु। धन लोभ मायावंतें। जन लोकपाळ मैत्र हे सकळ। सोइरीं सज्जनें बहुतें। नाना कर्म डाय करिती उपाय। बुडावया घातपातें। तुका म्हणे हरी राखे भलत्यापरी। आम्हीं तुझीं शरणागतें ॥४॥

१५६९. नाम घेतां उठाउठीं । होय संसारासी तुटी ॥१॥ ऐसा लाभ बांधा गांठी । विठ्ठलपायीं पडे मिठी ॥२॥ नामापरितें साधन नाहीं । जें तूं करिसी आणिक कांहीं ॥३॥ हाकारोनि सांगे तुका । नाम घेतां राहों नका ॥४॥

१५७०. प्राण समर्पिला आम्हीं । आतां उशीर कां स्वामी ॥१॥ माझें फेडावें उसणें । भार न मना या ऋणें ॥२॥ जाला कंठस्फोट । जवळी पातलों निकट ॥३॥ तुका म्हणे सेवा । कैसी बरी वाटे देवा ॥४॥

१५७१. येणें मार्गें गेले । त्याचें निसंतान केलें ॥१॥ ऐसी अवघड वाट । कोणा सांगावा बोभाट ॥२॥ नागविल्या थाटी । उरों नेदीच लंगोटी ॥३॥ तुका म्हणे चोर । तो हा उभा कटिकर ॥४॥

१५७२. जोंवरि तोंवरि जंबुक करी गर्जना । जंव त्या पंचानना देखिलें नाहीं ॥१॥ जोंवरि तोंवरि सिंधु करि गर्जना । जंव त्या अगस्ति ब्राह्मणा देखिलें नाहीं ॥२॥ जोंवरि तोंवरि वैराग्याच्या गोष्टी । जंव सुंदर वनिता दृष्टी पडली नाहीं ॥३॥ जोंवरि तोंवरि शूरत्वाच्या गोष्टी । जंव परमाईचा पुत्र दृष्टी देखिला नाहीं ॥४॥ जोंवरि तोंवरि माळामुद्रांचीं भूषणें । जंव तुकयाचें दर्शन जालें नाहीं ॥५॥

१५७३. जोंवरि तोंवरि शोभतील गारा । जंव नाहीं हिरा प्रकाशला ॥१॥ जोंवरि तोंवरि शोभती दीपिका । नुगवतां एका भास्करासी ॥२॥ जोंवरि तोंवरि सांगती संतपणाचिया गोष्टी । जंव नाहीं भेटी तुकयासवें ॥३॥

१५७४. धरोनि दोन्ही रूपें पाळणें संहार । करी कोप रुद्र दयाळ विष्णु ॥१॥ जटाजूट एका मुगुट माथां शिरीं । कमळापति गौरीहर एक ॥२॥ भस्म उद्धळण लक्ष्मीचा भोग । शंकर श्रीरंग उभयरूपीं ॥३॥ वैजयंती माळ वासुकीचा हार । लेणे अळंकार हरिहरा ॥४॥ कपाळ झोळी एका स्मशानींचा वास । एक जगन्निवास विश्वंभर ॥५॥ तुका म्हणे मज उभयरूपीं एक । सारोनि संकल्प शरण आलों ॥६॥

१५७५. उचिताचा भाग होतों राखोनियां । दिसती ते वांयां गेले कष्ट ॥१॥ वचनाची कांहीं राहेचि ना रुचि । खळाऐसें वाची कुची झाली ॥२॥ विश्वासाने माझें बुडविलें घर । करविला धीर येथवरी ॥३॥ तुका म्हणे येकीं थार नाहीं बुड । कैसें तुम्हीं कोड पुरविलें ॥४॥

१५७६. लांब लांब जटा काय वाढवूनि । पावडें घेऊनि क्रोधें चाले ॥१॥ खायाचा वोळसा शिव्या दे जनाला । ऐशा तापशाला बोध कैंचा ॥२॥ सेवी भांग आफू तंबाखू उदंड । परि तो अखंड भ्रांतीमाजी ॥३॥ तुका म्हणे ऐसा सर्वस्वें बुडाला । त्यासी अंतरला पांडुरंग ॥४॥

१५७७. अवघींच तीर्थें घडलीं एक वेळां । चंद्रभागा डोळां देखिलिया ॥१॥ अवघींच पापें गेलीं दिगांतरीं । वैकुंठ पंढरीं देखिलिया ॥२॥ अवघियां संतां एक वेळां भेटी । पुंडलिक दृष्टी देखिलिया ॥३॥ तुका म्हणे जन्मा आल्याचें सार्थक । विठ्ठलचि एक देखिलिया ॥४॥

१५७८. आम्ही असों निश्चितीनें । एका गुणें तुमचिया ॥१॥ दुराचारी तरले नामें । घेतों

प्रेमें म्हणोनि ॥२॥ नाहीं तुम्हां धांव घेता । कृपावंता आळस ॥३॥ तुका म्हणे विसरूं काईं । तुज वो आई विठ्ठले ॥४॥

१५७९. अनुभवें वदे वाणी । अंतर ध्यानीं आपुलें ॥१॥ कैंची चिका दुधचवी । जरी दावी पांढरे ॥२॥ जातीऐसा दावी रंग । बहु जग या नांव ॥३॥ तुका म्हणे खद्योत तें । ढुंगाभोंवतें आपुलिया ॥४॥

१५८०. परपीडक तो आम्हां दावेदार । विश्वीं विश्वंभर म्हणऊनि ॥१॥ दंडूं त्यागूं बळें नांवलोकूं डोळा । राखूं तो चांडाळा ऐसा दुरी ॥२॥ अनाचार कांहीं न साहे अवगुण । बहु होय मन कासावीस ॥३॥ तुका म्हणे माझी एकविध सेवा । विन्मुख ते देवा वाळी चित्तें ॥४॥

१५८१. कांहीं न मागे कोणासी । तोचि आवडे देवासी ॥१॥ देव तयासी म्हणावें । त्याचे चरणीं लीन व्हावें ॥२॥ भूतदया ज्याचे मनीं । त्याचे घरीं चक्रपाणी ॥३॥ नाहीं नाहीं त्या समान । तुका म्हणे मी जमान ॥४॥

१५८२. नाम उच्चारितां कंठीं । पुढें उभा जगजेठी ॥१॥ ऐसें धरोनियां ध्यान । मनें करावें चिंतन ॥२॥ ब्रह्मादिकां ध्याना नये । तो हा कीर्तनाचे सोये ॥३॥ तुका म्हणे सार घ्यावें । मनें हरिरूप पहावें ॥४॥

१५८३. आडलिया जना होसी साहाकारी । अंधळिया करीं काठी तूंचि ॥१॥ आडले गांजिले पीडिले संसारीं । त्यांचा तूं कैवारी नारायण ॥२॥ प्रल्हाद महासंकटीं रक्षिला । तुम्ही आपंगिला नानापरी ॥३॥ आपुलेंचि अंग तुम्हीं वोढविलें । त्याचें निवारलें महा दुःख ॥४॥ तुका म्हणे तुझे कृपे पार नाहीं । माझे विठाबाई जननीये ॥५॥

१५८४. तपासी तें मन करूं पाहे घात । धरोनि सांगात इंद्रियांचा ॥१॥ म्हणोनि कीर्तन आवडलें मज । सांडोनियां लाज हेंचि करीं ॥२॥ पाहातां आगमनिगमाचे ठाव । तेथें नाहीं भाव एकविध ॥३॥ तुका म्हणे येथें नाही वो विकार । नाम एक सार विठोबाचें ॥४॥

१५८५. गुरुशिष्यपण । हें तों अधमलक्षण ॥१॥ भूतीं नारायण खरा । आप तैसाचि दुसरा ॥२॥ न कळतां दोरी साप । राहूं नेदावा तों कांप ॥३॥ तुका म्हणे गुण दोषीं । ऐसे न पडावें सोसीं ॥४॥

१५८६. अंगीकार ज्याचा केला नारायणें । निंद्य तेंहि तेणें वंद्य केलें ॥१॥ अजामेळ भिल्ली तारिली कुंटणी । प्रत्यक्ष पुराणीं वंद्य केली ॥२॥ ब्रह्महत्या राशी पातकें अपार । वाल्मीक किंकर वंद्य केला ॥३॥ तुका म्हणे येथें भजन प्रमाण । काय थोरपण जाळावें तें ॥४॥

१५८७. अवीट हे क्षीर हरिकथा माउली । सेवितां सेविली वैष्णवजनीं ॥१॥ अमृत राहिलें लाजोनि माघारें । येणें रसें थोरें ब्रह्मानंदें ॥२॥ पतित पातकी पावनपंगती । चतुर्भुज

होती देवा ऐसे ॥३॥ सर्व सुखें तया मोहोरती ठाया । जेथें दाटणी या वैष्णवांची ॥४॥ निर्गुण हें सोंग धरिलें गुणवंत । धरूनियां प्रीत गायनाची ॥५॥ तुका म्हणे केली साधना गाळणी । सुलभ कीर्तनीं होऊनि ठेला ॥६॥

१५८८. धनवंता घरीं । करी धनचि चाकरी ॥१॥ होय बैसल्या व्यापार । नलगे सांडावेंचि घर ॥२॥ रानीं वनीं द्वीपीं । असतीं तीं होतीं सोपीं ॥३॥ तुका म्हणे मोल । देतां कांहीं नव्हे खोल ॥४॥

१५८९. हा गे माझा अनुभव । भक्तिभाव भाग्याचा ॥१॥ केला ऋणी नारायण । नव्हे क्षण वेगळा ॥२॥ घालोनियां भार माथा । अवघी चिंता वारली ॥३॥ तुका म्हणे वचनासाठीं । नाम कंठीं धरियेलें ॥४॥

१५९०. देव आहे सुकाळ देशीं । अभाग्यासी दुर्भिक्ष ॥१॥ नेणती हा करूं सांटा । भरले फांटा आडरानें ॥२॥ वसवूनि असे घर । माग दूर घातला ॥३॥ तुका म्हणे मन मुरे । मग जें उरे तेंचि तूं ॥४॥

१५९१. खुंटोनियां दोरी आपणियांपाशीं । वावडी आकाशीं मोकलिली ॥१॥ आपुलिया आहे मालासी जतन । गाहाणाचें तें ऋण बुडों नेणें ॥२॥ बीज नेलें तेथें येईल अंकुर । जतन तें सार करायाची ॥३॥ तुका म्हणे माझी निश्चिंतीची सेवा । वेगळें नाहीं देवा उरों दिलें ॥४॥

१५९२. शाहाणपणें वेद मुका । गोपिका त्या ताकटी ॥१॥ कैसें येथें कैसें तेथें । शहाणे ते जाणती ॥२॥ यज्ञमुखें खोडी काढी । कोण गोडी बोरांची ॥३॥ तुका म्हणे भावाविण । अवघा सीण केला होय ॥४॥

१५९३. मजुराचें पोट भरे । दाता उरे संचला ॥१॥ या रे या रे हातोहातीं । काम माती सारावी ॥२॥ रोजकीर्दी होतो झाडा । रोकडाचि पर्वत ॥३॥ तुका म्हणे खोल पाया । वेचों काया क्लेशेसीं ॥४॥

१५९४. स्मशानींच आम्हां न्याहालीचें सुख । या नांवें कौतुक तुमची कृपा ॥१॥ नाहीं तरी वांयां अवघेंचि निर्फळ । शब्द ते पोकळ बडबड ॥२॥ झाडें झुडें जीव सोइरे पाषाण । होती तईं दान तुम्हीं केलें ॥३॥ तुका म्हणे आतां पाहें अनुभव । घेऊनि हातीं जीव पांडुरंगा ॥४॥

१५९५. आमची जोडी ते देवाचे चरण । करावें चिंतन विठोबाचें ॥१॥ लागेल तरी कोणी घ्यावें धणीवरी । अमुपचि परि आवडीच्या ॥२॥ उभारिला कर प्रसिद्ध या जगें । करूं केला त्याग मागें पुढें ॥३॥ तुका म्हणे होय दरिद्र विच्छिन्न । ऐसें देऊं दान एक वेळां ॥४॥

१५९६. दधिमाजी लोणी जाणती सकळ । तें काढी निराळें जाणें मथन ॥१॥ अग्निकाष्ठामाजी ऐसें जाणे जन । मथिलियाविण कैसा जाळी ॥२॥ तुका म्हणे मुख मळीण

दर्पणीं। उजळिल्यावांचुनि कैसें भासे ॥३॥

१५९७. नको नको मना गुंतूं मायाजाळीं। काळ आला जवळी ग्रासावया ॥१॥ काळाची हे उडी पडेल बा जेव्हां। सोडविना तेव्हां मायबाप ॥२॥ सोडविना राजा देशींचा चौधरी। आणीक सोइरीं भलीं भलीं ॥३॥ तुका म्हणे तुला सोडविना कोणी। एका चक्रपाणी वांचूनियां ॥४॥

१५९८. पुढें जाणें लाभ घडे। तेचि वेडे नासती ॥१॥ येवढी कोठें नागवण। अंधारून विष घ्यावें ॥२॥ होणारासी मिळे बद्धि। नेदी शुद्धी धरूं ते ॥३॥ तुका म्हणे जना सोंग। दावी रंग आणीक ॥४॥

१५९९. ऐका गा हे अवघे जन। शुद्ध मन तें हित ॥१॥ अवघा काळ नये जरी। समयावरी जाणावा ॥२॥ नाहीं कोणी सवें येतां। संचिता या वेगळा ॥३॥ बरवा अवकाश आहे। करा साहे इंद्रियें ॥४॥ कर्मभूमी ऐसा ठाव। वेवसाव जाणावा ॥५॥ तुका म्हणे उत्तम जोडी। जाती घडी नरदेह ॥६॥

१६००. संतसेवेसी अंग चोरी। दृष्टी न पडो तयावरी ॥१॥ ऐसियासी व्याली रांड। जळो जळो तिचें तोंड ॥२॥ संतचरणीं ठेवितां भाव। आपेंआप भेटे देव ॥३॥ तुका म्हणे संतसेवा। माझ्या पूर्वजांचा ठेवा ॥४॥

१६०१. गेले पळाले दिवस रोज। काय म्हणतोसि माझें माझें ॥१॥ सळे धरोनि बैसला काळ। फांकों नेदी घटिका पळ ॥२॥ कां रे अद्यापि न कळे। केश फिरले कान डोळे ॥३॥ हित कळोनि असतां हातीं। तोंडीं पाडोनि घेसी माती ॥४॥ तुज ठाउकें मी जाणार। पाया शोधोनि बांधिसी घर ॥५॥ तुका म्हणे वेगें। पंढरिराया शरण रिघें ॥६॥

१६०२. आतां माझ्या मायबापा। तूं या पापा प्रायश्चित्त ॥१॥ फजित हे केले खळ। तो विटाळ निवारीं ॥२॥ प्रेम आतां पाजीं रस। करीं वास अंतरीं ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगा। जिवलगा माझिया ॥४॥

१६०३. कां रे न पवसी धांवण्या। अंगराख्या नारायणा ॥१॥ अंगीं असोनियां बळ। होसी खट्याळ नाट्याळ ॥२॥ आम्ही नरका जातां। काय येइल तुझ्या हातां। तुका म्हणे कान्हा। क्रियानष्टा नारायणा ॥४॥

१६०४. माझे पाय तुझी डोई। ऐसें करीं गा भाक देईं ॥१॥ पाहतां दिसे उफराटें। घडे तईं भाग्य मोठें ॥२॥ बहु साधन मोलाचें। यासी जोडा दुजें कैंचें ॥३॥ नका अनुमानूं विठ्ठला। तुका म्हणे धडा झाला ॥४॥

१६०५. पवित्र तें अन्न। हरिचिंतनीं भोजन ॥१॥ येर वेठ्या पोट भरी। चाम मसकाचे परी ॥२॥ जेऊनियां तोचि धाला। हरिचिंतनीं केला काला ॥३॥ तुका म्हणे चवी आलें।

जें कां मिश्रित विठ्ठलें ॥४॥

१६०६. चरणाचा महिमा । हा तो तुझ्या पुरुषोत्तमा ॥१॥ अंध पारिखी माणिकें । बोलाविशी स्पष्ट मुकें ॥२॥ काय नाहीं सत्ता । हातीं तुझ्या पंढरीनाथा ॥३॥ तुका म्हणे मूढा । मज चेष्टविलें जडा ॥४॥

१६०७. बळिवंत कर्म । करी आपुला तो धर्म ॥१॥ पुढें घालूनियां सत्ता । न्यावें पतना पतिता ॥२॥ आचरणें खोटीं । केलीं सलताती पोटीं ॥३॥ तुका म्हणे देवा । नाहीं भजन केली सेवा ॥४॥

१६०८. जननिया बाळका रे घातलें पाळणा । पंचतत्त्वीं जडियेल्या वारतिया चहूं कोणा । अखंड जडियेल्या तया ढाळ अंगणा । वैखरी धरूनी हातीं भाव दावी खेळणा ॥१॥ निजीं रे निजीं आतां । म्हणोनि परिये दे माता । खेळतां कष्टलासी बाळा तूं रे नेणतां ॥२॥ खेळतां बाहेरी रे मुला लोकांच्या सवें । बागुल काळतोंडा नाहीं नेतो तें ठावें । खेळतां दुश्चिता रे देखोनी तें न्यावें । म्हणोनि सांगे तुज शीघ्र वचन पाळावें ॥३॥ संचित मागें शुद्ध तुज होतें सांगाती । तेणें तुज वांचविलें वेरझारिया हातीं । आणीक नेलीं मागें काय जाणों तीं किती । आलासी येथवरी थोर पुण्यें बहुतीं ॥४॥ खेळतां शुक देवा खोरें लागला पाठीं । लपाला वरुषें बारा तिये मातेचे पोटीं । रिघतां बाहेरी रे पळे घेऊनि कासोटी । तेचि परी जाली स्वामी भेणें रिघें कपाटीं ॥५॥ खेळतां चक्रवर्ती जनका लागला धाक । पडिलासे अग्निमाजी पाव जळत एक । भरलासे कांप अंगीं सुख नाठवे दुःख । आप पर तें ही नाहीं देहभाव सकळीक ॥६॥ सिबीया चक्रवर्ती कव पडिली अवचिती । धीट तो नभे तया मांस कापिलें हातीं । टाकिलें तयावरी खुणें गोविला अंती । पावला मायबाप हिरोन घेतला हातीं ॥७॥ बांधलें अजामेळा वेश्यागणिका कैसीं । मारिलीं हांक धाकें कळलें मायबापासी । घातली धांव नेटें वेगीं पावला त्यासी हिरोनि नेलीं दोघें आपणयां तीं पासीं ॥८॥ धरूनि आठवूं रे बाळा राहे निश्चळ । खेळतां दुश्चिता रे नको जाऊं बरळ । टोंकताहे तुजलागीं दिवस लेखूनी काळ । मग नेदी आठवूं रे नेत्रीं घालीं पडळ ॥९॥ ऐसी तीं कृपावंतें बाळा मोहिलें चित्त । सुस्वरें कंठ गाये मधुर आणि संगीत । तेणें तें चित्त राहे होऊनियां निवांत । पावती तुका म्हणे नाहीं विश्वास ते घात ॥१०॥

१६०९. देवें देऊळ सेविलें । उदक कोरडेंचि ठेविलें ॥१॥ नव्हे मत गूढ उमान कांहीं । तूं आपआपणापें पाहीं ॥२॥ पाटें पूर वोसंडला । सरिता सागर तुंबोनि ठेला ॥३॥ वांजे घरीं बाळ तान्हा । एक बाळी दो कानां ॥४॥ तुका म्हणे पैस । अनुभविया ठावा गोडी रस ॥५॥

१६१०. अशक्य तें तुम्हां नाहीं नारायणा । निर्जीवा चेतना आणावया ॥१॥ मागें काय जाणों स्वामीचे पवाडे । आतां कां रोकडे दावुं नये ॥२॥ थोर भाग्य आम्ही समर्थाचे कासे ।

म्हणवितों दास काय थोडे ॥३॥ तुका म्हणे माझे निववावे डोळे। दावूनि सोहळे समर्थाचे॥४॥

१६११. दाता तोचि एक जाणा । नारायणा स्मरवी ॥१॥ आणीक नाशिवंतें काय । न सरे हाय ज्याच्यानें ॥२॥ यावें तया काकुलती । जे दाविती सुपंथ ॥३॥ तुका म्हणे उरी नुरे । त्याचे खरे उपकार ॥४॥

१६१२. लेक लाडकी मी संतांची । मजवरी कृपा बहुतांची ॥१॥ अखई चुडा हातीं आला। आंकण मोती नाकाला॥२॥ बोध मुराळी शृंगारिला। चौऱ्यांशीचा सिक्का केला॥३॥ तुका तुर्की उतरला। साहानकेचा कौल दिला॥४॥

१६१३. संतां नाहीं मान । देव मानी मुसलमान ॥१॥ ऐसे पोटाचे मारिले । देवा अशा विटंबिले ॥२॥ घाली लोटांगण । वंदी नीचाचे चरण ॥३॥ तुका म्हणे धर्म । न कळे माजल्याचा भ्रम ॥४॥

१६१४. अहो कृपावंता। होय बुद्धीचा ये दाता॥१॥ जेणें पाविजे उद्धार। होय तुझे पायीं थार॥२॥ वदवीं हे वाचा। भाव पांडुरंगीं साचा॥३॥ तुका म्हणे देवा। माझें अंतर वसवा॥४॥

१६१५. नाहीं म्यां वंचिला मंत्र कोणापाशीं। राहिलों जिवासीं धरूनि तो॥१॥ विटेवरी भावें ठेवियेलें मन। पाउलें समान चिंतीतसें॥२॥ पावविलों पार धरिला विश्वास। घालूनियां कास बळकट॥३॥ तुका म्हणे मागें पावले उद्धार। तिहीं हा आधार ठेविलासे॥४॥

१६१६. चंचळीं चंचळ निश्चळीं निश्चळ। वाजवी खळाळ उदकासी॥१॥ सोपें वर्म परि मन नाहीं हातीं। हा हा भूत चित्तीं भ्रम गाढा॥२॥ रविबिंब नाहीं तुटत उदका। छायेची ते नका सरी धरूं॥३॥ तुका म्हणे भय धरी रज्जूसाठीं। नाहीं साच पोटीं कळलें तों॥४॥

१६१७. आवडी येते गुणें। कळों चिन्हें उमटती॥१॥ पोटीचें ओठीं उभें राहे। चित्त साहे मनासी॥२॥ डोहोळियाची भूक गर्भा। ताटीं प्रभा प्रतिबिंबे॥३॥ तुका म्हणे मागून घ्यावें। मना खावें वाटे तें॥४॥

१६१८. काय ऐसी वेळ । वोढवली अमंगळ ॥१॥ आजि दुखवलें मन । कथाकाळी जाला सीण॥२॥ पापाचिया गुणें। त्याचिये वेळे दर्शनें॥३॥ तुका म्हणे कानीं। घालूं आले दुष्ट वाणी॥४॥

१६१९. किती वेळां जन्मा यावें । नित्य व्हावें फजीत ॥१॥ म्हणऊनि जीव भ्याला । शरण गेला विठोसी॥२॥ प्रारब्ध हें पाठी गाढें। न सरे पुढें चालतां॥३॥ तुका म्हणे रोकडी हे। होती पाहें फजीती॥४॥

१६२०. होतों सांपडलों वेठी । जातां भेटी संसारा ॥१॥ तों या वाटे कृपा केली । भेटी जाली विठोसी॥२॥ होता भार माथां माझे। बहु ओझें अमुप॥३॥ तुका म्हणे केली चिंता।

कोण दाता भेटेल ॥४॥

१६२१. जा रे तुम्ही पंढरपुरा । तो सोयरा दीनांचा ॥१॥ गुण दोष नाणी मना । करी आपणासारिखें ॥२॥ उभारोनि उभा कर । भवपार उतराया ॥३॥ तुका म्हणे तांतड मोठी । जाली भेटी उदंड ॥४॥

१६२२. या रे हरिदासांनो जिंकों कळिकाळा । आमुचिया बळापुढें किती बापुडे ॥१॥ रंगसुरंग घमंडी नाना छंदें । हास्य विनोदें नामाची आवडी ॥२॥ येणें तेणें प्रकारें बहुतां सुख जोडे । पूजन तें घडे नारायणा अंतरीं ॥३॥ वांकुडिया माना बोल बोलावे आरूष । येईल तो त्यांस छंद पढीयें गोविंदा ॥४॥ आपुल्या आनंदें एकापुढें एक नटा । नाहीं थोर मोठा लहान ये प्रसंगीं ॥५॥ तुका म्हणे येथें प्रेम भंगूं नये कोणीं । देव भक्त दोन्ही निवडितां पातक ॥६॥

१६२३. देव जाणता देव जाणता । आपलीया सत्ता एकाएकीं ॥१॥ देव चतुर देव चतुर । जाणोनि अंतर वर्ततसे ॥२॥ देव निराळा देव निराळा । अलिप्त विटाळा तुका म्हणे ॥३॥

१६२४. माझ्या मुखें मज बोलवितो हरि । सकळांच्या अंतरीं नारायण ॥१॥ न करावा द्वेष भूतांचा मत्सर । हा तंव विचार जाणों आम्ही ॥२॥ तुका म्हणे दोष नाहीं या विचारें । हिताचीं उत्तरें शिकवितां ॥३॥

१६२५. मांस खातां हाऊस करी । जोडोनि वैरी ठेवियेला ॥१॥ कोण त्याची करील कींव । जीवें जीव नेणती ॥२॥ पुढिलासाठीं पाजवी सुरू । आपुली चोरी अंगुळी ॥३॥ तुका म्हणे पुढें कुटिती हाडें । आपुल्या नाडें रडतील ॥४॥

१६२६. तुज जाणें तान्हें नाहीं पांडुरंगा । कां जी मज सांगा उपेक्षिलें ॥१॥ तुज ठावें होतें पातकी मी खरा । आधींच कां थारा दिला पायीं ॥२॥ अंक तो पडिला हरिचा मी दास । भेद पंगतीस करूं नये ॥३॥ तुका म्हणे आम्हीं जिंतीलें तें खरें । आतां उणें पुरें तुम्हा लागीं ॥४॥

१६२७. आम्हां घरीं धन शब्दांचींच रत्नें । शब्दांचींच शस्त्रें यत्न करूं ॥१॥ शब्दचि आमुच्या जीवाचें जीवन । शब्द वांटूं धन जनलोकां ॥२॥ तुका म्हणे पाहा शब्दचि हा देव । शब्देंचि गौरव पूजा करूं ॥३॥

१६२८. ब्रह्मज्ञान दारीं येतें काकुलती । अव्हेरिलें संतीं विष्णुदासीं ॥१॥ रिघों पाहे माजी बळेंचि त्याचें घर । दवडिती दूर म्हणोनियां ॥२॥ तुका म्हणे येथें न चले सायास । पडिलें उदास त्याच्या गळां ॥३॥

१६२९. कासया लागला यासी चौघाचार । मुक्तीचा वेव्हार निवडिला ॥१॥ ग्वाही भक्तांची घालूनियां वरि । महजर करीं आहे माझ्या ॥२॥ तुम्हां वेगळें आपुल्या ठायीं । होतें करूनि तेंही माझें माझें ॥३॥ भांडण शेवटीं जालें एकवट । आतां कटकट करूं नये ॥४॥

ठेविला ठेवा तो आला माझ्या हाता । आतां नसे सत्ता तुज देवा ॥५॥ तुका म्हणे वांयाविण खटपटा । राहिलों मी वांटा घेऊनियां ॥६॥

१६२०. जाती पंढरीस । म्हणे जाईन तयांस ॥१॥ तया आहे संवसार । ऐसें बोले तो महार ॥२॥ असो नसो भाव । जो हा देखे पंढरिराव ॥३॥ चंद्रभागे न्हाती । तुका म्हणे भलते याती ॥४॥

१६३१. धरियेलीं सोंगें । येणें अवघीं पांडुरंगें ॥१॥ तें हें ब्रह्म विटेवरी । उभें चंद्रभागे तिरीं ॥२ ॥ अंतर्व्यापी बाहीं । धांडोळितां कोठें नाहीं ॥३॥ योगयागतपें । ज्याकारणें दानजपें ॥४॥ दिलें नेदीजती । भोग सकळ ज्या होती ॥५॥ अवघी लीला पाहे । तुका म्हणे दासां साहे ॥६॥

१६३२. ज्याचे गर्जतां पवाडे । कळिकाळ पायां पडे ॥१॥ तो हा पंढरीचा राणा । पुसा सहा चौं अठरां जणां ॥२॥ चिंतितां जयासी । भुक्तिमुक्ति कामारी दासी ॥३॥ वैकुंठासी जावें । तुका म्हणे ज्याच्या नांवें ॥४॥

१६३३. ज्याचे गर्जता पवाडे । श्रुतिशास्त्रां मौन पडे ॥१॥ तेथें माझी वाचा किती । पुरे करावया स्तुति ॥२॥ शिणला सहस्त्र तोंडें । शेष फणी ऐसें धेंडें ॥३॥ तुका म्हणे मही । पत्र सिंधु न पुरे शाई ॥४॥

१६२४. देव राखे तया मारील कोण । न मोडे कांटा हिंडतां वन ॥१॥ न जळे न बुडे नव्हे कांहीं । विष तेंही अमृत पाहीं ॥२॥ न चुके वाट न पडे फंदीं । नव्हे कधीं यमबाधा ॥३॥ तुका म्हणे नारायण । येतां गोळ्या वारी बाण ॥४॥

१६३५. कोठें गुंतलासी द्वारकेच्या राया । वेळ कां सखया लावियेला ॥१॥ दीनानाथ ब्रीद सांभाळीं आपुलें । नको पाहों केलें पापपुण्य ॥२॥ पतितपावन ब्रीदें चराचर । पातकी अपार उद्धरिले ॥३॥ तुकयाबंधु म्हणे द्रौपदीचा धांवा । केला तैसा मला पावें आतां ॥४॥

१६३५. कोठें गुंतलासी कोणाच्या धांवया । आली देवराया निद्रा तुज ॥१॥ कोठें गुंतलासी भक्तिप्रेमसुखें । न सुटती मुखें गोपिकांचीं ॥२॥ काय पडिलें तुज कोणाचें संकट । दुरी पंथ वाट न चलवे ॥३॥ काय माझे तुज गुणदोष दिसती । म्हणोनि श्रीपती कोपलासी ॥४॥ काय जालें सांग माझिया कपाळा । उरला जीव डोळां तुका म्हणे ॥५॥

१६३७. परस्त्रीतें म्हणतां माता । चित्त लाजवितें चित्ता ॥१॥ काय बोलोनियां तोंडें । मनामाजी कानकोंडें ॥२॥ धर्मधारिष्टगोष्टी सांगे । उष्ट्या हातें नुडवी काग ॥३॥ जें जें कर्म वसे अंगीं । तें तें आठवे प्रसंगीं ॥४॥ बोले तैसा चाले । तुका म्हणे तो अमोल ॥५॥

१६३८. असत्य वचन होतां सर्व जोडी । जरी लग्नघडी परउपकार ॥१॥ जाईल पतना यासि संदेह नाहीं । साक्ष आहे कांहीं सांगतों तें ॥२॥ वदविलें मुखें नारायणें धर्मा । अंगुष्ठ त्या कर्मासाठीं गेला ॥३॥ तुका म्हणे आतां सांभाळा रे पुढे । अंतरिंचे कुडें देईल दुःख ॥४॥

१६३९. जळो त्याचें तोंड । ऐसी कां तें व्याली रांड ॥१॥ सदा बोंवयासी गांठी । क्रोध धडधडीत पोटीं ॥२॥ फोडिली गोंवरी । ऐसी दिसे तोंडावरी ॥३॥ तुका म्हणे नाहीं । चित्ता समाधान कांहीं ॥४॥

१६४०. तोंडें खाय फार । पादे बोचा करी मार ॥१॥ एक ऐसे ते शाहाणे । आपुले अधीन तें नेणें ॥२॥ कुले घालूनि उघडे । रागें पाहे लोकां कडे ॥३॥ खेळे द्यूतकर्म । मग बोंबली जुलूम ॥४॥ निजतां आला मोहो । वीतां म्हणे मेला गोहो ॥५॥ तुका म्हणे त्यांनीं । मनुष्यपणा केली हानी ॥६॥

१६४१. पतिव्रता नेणें आणिकांची स्तुती । सर्वभावें पति ध्यानीं मनीं ॥१॥ तैसें माझें मन एकविध जालें । नावडे विठ्ठलेंविणें दुजें ॥२॥ सूर्यविकासिनी नेघे चंद्रकळा । गाय ते कोकिळा वसंतेंसी ॥३॥ तुका म्हणे बाळ मातेपुढें नाचे । बोल आणिकाचे नावडती ॥४॥

१६४२. पंडित म्हणतां थोर सुख । परि तो पाहतां अवघा मूर्ख ॥१॥ माय करावें घोकिलें । वेदपठण वांयां गेलें ॥२॥ वेदीं सांगितलें न करी । सम ब्रह्म नेणे दुराचारी ॥३॥ हा वेदींचा अनुभव । तुका देखे जीव शिव ॥४॥

१६४३. पंडित तोचि एक भला । नित्य भजे जो विठ्ठला ॥१॥ अवघें सम ब्रह्म पाहे । सर्वां भूतीं विठ्ठल आहे ॥२॥ रिता नाहीं कोणी ठाव । सर्वां भूतीं वासुदेव ॥३॥ तुका म्हणे तोचि दास । त्या देखिल्या जाती दोष ॥४॥

१६४४. ऐका पंडितजन । तुमचे वंदितों चरण ॥१॥ नका करूं नरस्तुती । माझी परिसा हे विनंती ॥२॥ अन्न आच्छादन । हें तों प्रारब्धा अधीन ॥३॥ तुका म्हणे वाणी । सुखें वेचा नारायणीं ॥४॥

१६४५. विठ्ठल टाळ विठ्ठल दिंडी । विठ्ठल तोंडीं उच्चारा ॥१॥ विठ्ठल अवघ्या भांडवला । विठ्ठल बोला विठ्ठल ॥२॥ विठ्ठल नाद विठ्ठल भेद । विठ्ठल छंद विठ्ठल ॥३॥ विठ्ठल सुखा विठ्ठल दुःखा । तुकया मुखा विठ्ठल ॥४॥

१६४६. काय तुझें वेचें मज भेटी देतां । वचन बोलतां एक दोन ॥१॥ काय तुझें रूप घेतों मी चोरोनि । त्या भेणें लपोनि राहिलासी ॥२॥ काय तुझे आम्हां करावे वैकुंठ । भेवों नको भेट आतां मज ॥३॥ तुका म्हणे तुझी नलगे दसोडी । परि आहे आवडी दर्शनाची ॥४॥

१६४७. संतनिंदा ज्याचे घरीं । नव्हे घर ते यमपुरी ॥१॥ त्याच्या पापा नाहीं जोडा । संगें जना होय पीडा ॥२॥ संतनिंदा आवडे ज्यासी । तो जिताची नर्कवासी ॥३॥ तुका म्हणे नष्ट । जाणा गाढव तो स्पष्ट ॥४॥

१६४८. आलें देवाचिया मना । तेथें कोणाचें चालेना ॥१॥ हरिश्चंद्र ताराराणी । वाहे

डोंबाघरीं पाणी ॥२॥ पांडवांचा साहाकारी । राज्याहुनि केले दुरी ॥३॥ तुका म्हणे उगेचि राहा । होईल तें सहज पाहा ॥४॥

१६४९. निजल्यानें गातां उभा नारायण । बैसल्या कीर्तन करितां डोले ॥१॥ उभा राहोनियां मुखीं नाम वदे । नाचे हा गोविंद नाना छंदें ॥२॥ मारगीं चालतां मुखीं नाम वाणी । उभा चक्रपाणी मागें पुढें ॥३॥ तुका म्हणे यासी कीर्तनाची गोडी । प्रेमें घाली उडी नामासाठीं ॥४॥

१६५०. काम क्रोध आम्हीं वाहिले विठ्ठलीं । आवडी धरिली पायांसवें ॥१॥ आतां कोण पाहे मागें परतोनि । गेले हारपोनि देहभाव ॥२॥ रिद्धिदिद्धि सुखें हाणितल्या लाता । तेथें या प्राकृता कोण मानी ॥३॥ तुका म्हणे आम्ही विठोबाचे दास । करूनि ठेलों ग्रास ब्रह्मांडाचा ॥४॥

१६५१. उठाउठीं अभिमान । जाय ऐसें स्थळ कोण ॥१॥ तें या पंढरीस घडे । खळां पाझर रोकडे ॥२॥ नेत्रीं अश्रुचिया धारा । कोठें रोमांच शरीरा ॥३॥ तुका म्हणे काला । कोठें अभेद देखिला ॥४॥

१६५२. पंढरी पंढरी । म्हणतां पापाची बोहरी ॥१॥ धन्य धन्य जगीं ठाव । होतो नामाचा उत्सव ॥२॥ रिद्धिसिद्धी लोटांगणीं । प्रेमसुखाचिया खाणी ॥३॥ अधिक अक्षरानें एका । भूवैकुंठ म्हणे तुका ॥४॥

१६५३. घालीं भार देवा । नलगे देश डोई घ्यावा ॥१॥ देह प्रारब्धा अधीन । सोसें अधिक वाढे सीण ॥२॥ व्यवसाय निमित्त । फळ देतसे संचित ॥३॥ तुका म्हणे फिरे । भोवंडीनें दम जिरे ॥४॥

१६५४. भोग भोगावरी द्यावा । संचिताचा करुनी ठेवा ॥१॥ शांती धरणें जिवासाठीं । दशा उत्तम गोमटी ॥२॥ देह लेखावा असार । सत्य परउपकार ॥३॥ तुका म्हणे हे मिरासी । बुडी द्यावी ब्रह्मरसीं ॥४॥

१६५५. येथें बोलोनियां काय । व्हावा गुरु तरि जाय ॥१॥ मज न साहे वांकडें । ये विठ्ठलकथेपुढें ॥२॥ ऐकोनि मरसी वृथा । जंव आहेसि तूं जीता ॥३॥ हुरमतीची चाड । तेणें न करावी बडबड ॥४॥ पुसेल कोणी त्यास । जा रे करीं उपदेश ॥५॥ आम्ही विठ्ठलाचे वीर । फोडूं कळिकाळाचें शीर ॥६॥ घेऊं पुढती जन्म । वाणूं कीर्ती मुखें नाम ॥७॥ तुका म्हणे मुक्ती । नाहीं आसचि ये चित्तीं ॥८॥

१६५६. अनुहातीं गुंतला नेणें बाह्य रंग । वृत्ति येतां मग बळ लागे ॥१॥ मदें माते तया नाहीं देहभाव । आपुलें अवयव आवरितां ॥२॥ आणिकांची वाणी वदे तेणें मुखें । उपचारदु:खें नाठवती ॥३॥ तें सुख बोलतां आश्चर्य या जना । विपरीत मना भासतसे ॥४॥ तुका म्हणे बाह्य रंग जो विटला । अंतरीं निवाला ब्रह्मरसें ॥५॥

१६५७. ब्रह्मरसगोडी तयासी फावली । वासना निमाली समूळ ज्याची ॥१॥ नाहीं त्यां विटाळ अखंड सोंवळा । उपाधीवेगळा जाणिवेच्या ॥२॥ मन हें निश्चळ जालें एके ठायीं । तया उणें काई निजसुखा ॥३॥ तेचि पुण्यवंत तेचि परउपकारी । प्रबोधी त्या नारीनरलोकां ॥४॥ तुका म्हणे त्याचे पायीं पायपोस । होऊनियां वास करिन तेथें ॥५॥

१६५८. जैसें तैसें राहे देवाचें हें देणें । यत्न करितां तेणें काय नव्हे ॥१॥ दासां कृपासिंधु नुपेक्षी सर्वथा । अंतरींची व्यथा कळे त्यासी ॥२॥ मागों नेणे परी माय जाणें वर्म । बाळा नेदी श्रम पावों कांहीं ॥३॥ तुका म्हणे मज अनुभव अंगें । वचन वाउगें मानेना हें ॥४॥

१६५९. परद्रव्य परनारीचा अभिलास । तेथोनि हरास सर्वभाग्या ॥१॥ घटिका दिवस मास वर्षें लागे तीन । बांधलें पतन गांठोडीस ॥२॥ पुढें घात त्याचा रोकडा शकुन । पुढें करी गुण निश्चयेंसीं ॥३॥ तुका म्हणे एका थडताथवड । काळ लागे नाड परी खरा ॥४॥

१६६०. आम्हां हरिच्या दासां कांहीं । भय नाहीं त्रयलोकीं ॥१॥ देव उभा मागें पुढें । उगवी कोडें संकट ॥२॥ जैसा केला तैसा होय । धावे सोय धरोनि ॥३॥ तुका म्हणे असों सुखें । गाऊं मुखें विठोबा ॥४॥

१६६१. समर्थाचें केलें । मोडिलें कोणा जाईल ॥१॥ वायां करावी ते उरे । खटपट सोस पुरे ॥२॥ ठेविला जो ठेवा । आपुलाला तैसा खावा ॥३॥ ज्याचें त्याचे हातीं । भुके तयासी फजिती ॥४॥ तुका म्हणे कोटी । वाळे जाले शूळ पोटीं ॥५॥

१६६२. नेणे गति काय कवण अधोगति । मानिली निश्चिंती तुझ्या पायीं ॥१॥ कर्म धर्म कोण नेणें हा उपाव । तुझ्या पायीं भाव ठेवियेला ॥२॥ नेणें निरसूं पाप पुण्य नेणें काय । म्हणऊनि पाय धरिले तुझे ॥३॥ वेडा मी अविचारी न कळे विचार । तुज माझा भार पांडुरंगा ॥४॥ तुका म्हणे तुज करितां नव्हे काय । माझा तो उपाय कवण तेथें ॥५॥

१६६३. देवा हे माझी मिराशी । ठाव तुझ्या पायांपाशीं ॥१॥ याचा धरीन अभिमान । करीन आपुलें जतन ॥२॥ देऊनियां जीव । वडिलीं साधियेला हा ठाव ॥३॥ तुका म्हणे देवा । जुन्हाट हे माझी सेवा ॥४॥

१६६४. तुझा म्हणऊनि जालों उतराई । त्याचें वर्म काई तें मी नेणें ॥१॥ हातीं धरोनियां दावीं मज वाट । पुढें कोण नीट तेंचि देवा ॥२॥ देवभक्तपण करावें जतन । दोहीं पक्षीं जाण तूंचि बळी ॥३॥ अभिमानें तुज लागली हें लाज । शरणागतां काज करावया ॥४॥ तुका म्हणे बहु नेणता मी फार । म्हणऊनि विचार जाणविला ॥५॥

१६६५. मारगीं चालतां पाउलापाउलीं । चिंतावी माउली पांडुरंग ॥१॥ सर्व सुख लागे घेऊनियां पाठीं । आवडीचा कंठीं रस ओती ॥२॥ पीतांबर छाया करी लोभापर । पाहे तें उत्तर

आवडीचें ॥३॥ तुका म्हणे हेंचि करावें जीवन । वाचे नारायण ताहान भूक ॥४॥

१६६६. जालों आतां दास । माझे तोडोनियां पाश ॥१॥ ठाव द्यावा पायांपाशीं । मी तो पातकाची राशी ॥२॥ सकळही गोवा । माझा उगवूनि देवा ॥३॥ तुका म्हणे भय । करा जवळी तें नये ॥४॥

१६६७. अंतरींचें जाणां । तरि कां येऊं दिलें मना ॥१॥ तुमची करावी म्यां सेवा । आतां अव्हेरितां देवा ॥२॥ नव्हती मोडामोडी । केली मागें तेचि घडी ॥३॥ तुका म्हणे दिला ठाव । पायीं लागों दिला भाव ॥४॥

१६६८. पवित्र होईन चरित्र उच्चारें । रूपाच्या आधारें गोजरिया ॥१॥ अपुरती बुद्धि पुण्य नाहीं गांठीं । पायीं घालीं मिठी पाहे डोळां ॥२॥ गाइन ओवीया शिष्टाच्या आधारें । सारिन विचारें आयुष्या या ॥३॥ तुका म्हणे तुझें नाम नारायणा । ठेवीन मी मना आपुलिया ॥४॥

१६६९. काय ऐसा जन्म जावा वांयांविण । कांहीं तरी ऋण असो माथां ॥१॥ कोणे तरी काळें होईल आठव । नाहीं जरी भाव भार खरा ॥२॥ शता एका तरी जन्माच्या शेवटीं । कृपाळुवा पोटीं येईल दया ॥३॥ तुका म्हणे तरी नाहीं फांकों देत । सर्वांचें उचित सांपडलें ॥४॥

१६७०. नाहीं कोणी दिस जात वांयांविण । साध्य नाहीं सीण लटिकाची ॥१॥ एकाचिये माथां असावें निमित्त । नसों नाहीं हित कपाळीं तें ॥२॥ कांहीं एक तरी बोलायाचा जागा । नेदिती वाउगा उभा ठाकों ॥३॥ तुका म्हणे वर्म कळों येतें कांहीं । ओळखी जे ठायीं होईल ते ॥४॥

१६७१. करील तें काय नव्हे विश्वंभर । सेवकां दरिद्र लाज नाहीं ॥१॥ मजपासूनि हें पडिलें अंतर । काय तो अव्हेर करूं जाणे ॥२॥ नामाच्या चिंतनें नासी गर्भवास । नेदी करूं आस आणिकाची ॥३॥ तुका म्हणे नेणों किती वांया गेले । तयां उद्धरिलें पांडुरंगें ॥४॥

१६७२. संध्या करितोसी केशवाच्या नांवें । आरंभीं तें ठावें नाहीं कैसें ॥१॥ किती या सांगावें करूनि फजित । खळ नेणें हित जवळी तें ॥२॥ माजल्या न कळे उचित तें काय । न द्यावें तें खाय द्यावें सांडी ॥३॥ तुका म्हणे घेती भिंतीसवें डोकें । वावसी तें एकें अंधारली ॥४॥

१६७३. दुधाचे घागरीं मद्याचा हा बुंद । पडिलिया शुद्ध नव्हे मग ॥१॥ तैसें खळा मुखें न करावें श्रवण । अहंकारें मन विटाळलें ॥२॥ काय करावीं तीं बत्तीस लक्षणें । नाक नाहीं तेणें वांयां गेलीं ॥३॥ तुका म्हणे अन्न जिरों नेदी माशी । आपुलिया जैसी संसर्गें ॥४॥

१६७४. सांगावें हें बरें असतें हें पोटीं । दुःख देते खोटी बुद्धि मग ॥१॥ आपला आपण करावा वेव्हार । जिंकोनि अंतर मन ग्वाही ॥२॥ नाहीं मागें येत बोलिलें वचन । पावावा तो सीण बरा मग ॥३॥ तुका म्हणे बहू भ्यालों खटपटें । आतां देवा खोटे शब्द पुरे ॥४॥

१६७५. परिसें वो माते माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवितसें ॥१॥ भागीरथी-महादोषनिवारणी । सकळां स्वामिणी तीर्थाचिये ॥२॥ जितां भुक्ति मोक्ष मरणें तुझ्या तीरीं । अहिक्यपरत्रीं सुखरूप ॥३॥ तुका विष्णुदास संतांचें पोसणें । वाग्पुष्प तेणें पाठविलें ॥४॥

१६७६. तुम्ही विश्वनाथ । दीन रंक मी अनाथ ॥१॥ कृपा कराल ते थोडी । पायां पडिलों बराडी ॥२॥ काय उणें तुम्हांपाशीं । मी तों अल्पचि संतोषी ॥३॥ तुका म्हणे देवा । कांहीं भातुकें पाठवा ॥४॥

१६७७. पिंड पदावरी । दिला आपुलिये करीं ॥१॥ माझें जालें गयावर्जन । फिटलें पितरांचें ऋण ॥२॥ केलें कर्मांतर । बोंब मारिली हरिहर ॥३॥ तुका म्हणे माझें । भार उतरलें ओझें ॥४॥

१६७८. मथुरेच्या राया । माझे दंडवत पायां ॥१॥ तुमचे कृपेचें पोसणें । माझा समाचार घेणें ॥२॥ नाम धरिलें कंठीं । असें आर्तभूत पोटीं ॥३॥ जीवींचे तें जाणां । तुका म्हणे नारायणा ॥४॥

१६७९. जाय तिकडे लागे पाठी । नाहीं तुटी आठवाची ॥१॥ हिरोनियां नेलें चित्त । माझें थीत भांडवल ॥२॥ दावूनियां रूप डोळां । मन चाळा लावियेलें ॥३॥ आणीक तोंडा पडिली मिठी । कान गोठी नाइकती ॥४॥ बोलिल्याचा आठव न घडे । वाणी ओढे ते सोई ॥५॥ तुका म्हणे प्रेमधगी । भरली अंगीं अखंड ॥६॥

१६८०. नको ऐसें जालें अन्न । भूक ताहान ते गेली ॥१॥ गोविंदाची आवडी जीवा । करिन सेवा धणीवरि ॥२॥ राहिलें तें राहो काम । सकळ धर्म देहींचे ॥३॥ देह धरिला त्याचें फळ । आणीक काळ धन्य हा ॥४॥ जाऊं नेदी करितां सोस । क्षमा दोष करवीन ॥५॥ तुका म्हणे याचे पाठी । आतां साटी जीवाची ॥६॥

१६८१. वाट पाहे हरि कां नये अझुनि । निष्ठुर कां मनीं धरियेलें ॥१॥ काय करूं धीर होत नाहीं जीवा । काय आड ठेवा उभा ठेला ॥२॥ नाहीं माझा धांवा पडियेला कानीं । कोठें चक्रपाणी गुंतलेती ॥३॥ नाहीं कळों आलें अंतरा अंतर । कृपावंत फार ऐकतों ॥४॥ बहुतां दिसांचें राहिलें भातुकें । नाहीं कवतुकें कुरवाळिलें ॥५॥ तुका म्हणे देईं एक वेळां भेटी । शीतळ हें पोटीं होईल मग ॥६॥

१६८२. नाहीं दिलें कधीं कठिण उत्तर । तरी कां अंतर पडियेलें ॥१॥ म्हणऊनि आतां वियोग न साहे । लांचावलें देहे संघष्टणें ॥२॥ वेळोवेळां वाचे आठवितों नाम । अधिकचि प्रेम चढे घेतां ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगे जननिये । घेऊनि कडिये बुझाविलें ॥४॥

१६८३. आतां न करीं सोस । सेवीन हा ब्रह्मरस ॥१॥ सुखें सेवीन अमृत । ब्रह्मपदींचें निश्चित ॥२॥ तुमचा निज ठेवा । आम्ही पाडियेला ठावा ॥३॥ तुका म्हणे देवराया । आतां लपालेती वांयां ॥४॥

१६८४. जेथें जेथें जासी । तेथें मजचि तूं पाहासी ॥१॥ ऐसा पसरीन भाव । रिता नाहीं कोणी ठाव ॥२॥ चित्त जडलें पायीं । पाळती हें ठायीं ठायीं ॥३॥ तुका म्हणे पोटीं । देवा घालूनि सांगे गोष्टी ॥४॥

१६८५. मुक्तिपांग नाहीं विष्णुचिया दासां । संसार तो कैसा न देखती ॥१॥ बैसला गोविंद जडोनियां चित्तीं । आदि तेचि अंतीं अवसानीं ॥२॥ भोग नारायणा देऊनि निराळीं । ओविया मंगळीं तोचि गाती ॥३॥ बळ बुद्धि त्याची उपकारासाठीं । अमृत तें पोटीं सांठविलें ॥४॥ दयावंत तरी देवाच सारखीं । आपली पारखीं नोळखती ॥५॥ तुका म्हणे त्यांचा जीव तोचि देव । वैकुंठ तो ठाव वसती ते ॥६॥

१६८६. सांपडला हातीं । तरी जाली हे निश्चिंती ॥१॥ नाहीं धांवा घेत मन । इंद्रियांचें समाधान ॥२॥ सांडियेला हेवा । अवघा संचिताचा ठेवा ॥३॥ तुका म्हणे काम । निरसुनियां घेतों नाम ॥४॥

१६८७. सेवीन उच्छिष्ट लोळेन अंगणीं । वैष्णवांचें न्हाणी होईन किडा ॥१॥ ऐसे जन्म आतां मज देईं देवा । आवडी हे जीवा सर्व काळ ॥२॥ त्यांचे चरणरज येती अंगावरी । वंदीन ते शिरीं जाईन मागें ॥३॥ तुका म्हणे येथें राहिलासे भाव । सकळही वाव जाणोनियां ॥४॥

१६८८. क्षेम देयाला हो । स्फुरताती दंड बाहो ॥१॥ आतां झडझडां चालें । देईं उचलोनी पाउलें ॥२॥ सांडीं हंसगती । बहु उत्कंठा हे चित्तीं ॥३॥ तुका म्हणे आई । श्रीरंगे विठाबाई ॥४॥

१६८९. जेणें वेळ लागे । ऐसें सांडीं पांडुरंगे ॥१॥ कंठ कंठा मिळों देईं । माझा वोरस तूं घेईं ॥२॥ नको पीतांबर । सांवरूं हे अळंकार ॥३॥ टाकी वो भातुकें । लौकिकाचें कवतुकें ॥४॥ हातां पायां नको । कांहीं वेगळालें राखों ॥५॥ तुका म्हणे यावरी । मग सुखें अळंकारी ॥६॥

१५९०. दावूनिया कोणा कांहीं । तेंचि वाहीं चाळविली ॥१॥ तैसें नको करूं देवा । शुद्धभावा माझिया ॥२॥ रिद्धिसिद्धी ऐसीं आड । येती नाड नागवूं ॥३॥ उदकाऐसी दावुनि ओढी । ऊर फोडी झळई ॥४॥ दर्पणींचें दिलें धन । दिसे पण चरफडी ॥५॥ तुका म्हणे पायांसाठीं । करितों आटी कळों द्या ॥६॥

१६९१. कृपेचा ओलावा । दिसे वेगळाचि देवा ॥१॥ मी हें इच्छीतसें साचें । न लगे फुकट साई काचें ॥२॥ जेणें जाय कळसा । पाया उत्तम तो तैसा ॥३॥ तुका म्हणे घरीं । तुझ्या अवघिया परी ॥४॥

१६९२. तरी आम्हीं तुझी धरियेली कास । नाहीं कोणी दास वांयां गेला ॥१॥ अगा पंढरीशा उभा विटेवरी । येईं लवकरी धांव नेटें ॥२॥ पालवितों तुज उभारोनि बाहे । कृपावंता पाहें मजकडे ॥३॥ तुका म्हणे तुज बहु कान डोळे । कां हे माझे वेळे ऐसी परी ॥४॥

१६९३. करावा कांटाळा नव्हे हें उचित। आधींच कां प्रीत लावियेली॥१॥ जाणतसां तुम्हीं रूपाचें लाघव। आपुलें तें जीव घेतें ऐसा॥२॥ काय म्हणऊनि आलेति आकारा। आम्हां उजगरा करावया॥३॥ तुका म्हणे भीड होती आजिवरी। आतां देवा उरी कोण ठेवी॥४॥

१६९४. धरूनि पालव असुडीन करें। मग काय बरें दिसे लोकीं॥१॥ काय तें विचारा ठायींचें आपणां। जो हा नारायणा अवकाश॥२॥ अंतर पायासी तोंवरी या गोष्टी। पडिलिया मिठी हालों नेदी॥३॥ रुसलेति तरी होईल बुझावणी। तांतडी करूनि साधावें हें॥४॥ सांपडलिया आधीं कारणासी ठाव। येथें करूं भाव दृढ आतां॥५॥ तुका म्हणे तुझे ठाउके बोभाट। मग खटपट चुकली ते॥६॥

१६९५. निष्ठुरा उत्तरीं न धरावा राग। आहें लागमाग ठायींचाचि॥१॥ तूं माझा जनिता तूं माझा जनिता। रखुमाईच्या कांता पांडुरंगा॥२॥ मुळींच्या ठेवण्या आहे अधिकार। दुराऊनि दूर गेलों होतों॥३॥ पोटींच्या आठवा पडिला विसर। कांही आला भार माथां तेणें॥४॥ राखिला हा होता बहु चौघाचार। साक्षीनें वेव्हार निवडिला॥५॥ तुका म्हणे कांहीं बोलणें नलगे। आतां पांडुरंगें तूं मी ऐसें॥६॥

१६९६. सांगता गोष्टी लागती गोडा। हा तो रोकडा अनुभव॥१॥ सुख जालें सुख जालें। नये बोले बोलतां॥२॥ अंतर तों नये दिसों। आतां सोस कासया॥३॥ तुका म्हणे जतन करूं। हेंचि धरूं जीवेंसी॥४॥

१६९७. मजशीं पुरें न पडे वादें। सुख दोहींच्या संवादें॥१॥ तूंचि आगळा काशानें। शिर काय पायांविणें॥२॥ वाहों तुझा भार। दुःख साहोनि अपार॥३॥ तुका म्हणे नाहीं भेद। देवा करूं नये वाद॥४॥

१६९८. तुज नाहीं शक्ति। काम घेसी आम्हां हातीं॥१॥ ऐसें अनुभवें पाहीं। उरलें बोलिजेसें नाहीं॥२॥ लपोनियां आड। आम्हां तुझा कैवाड॥३॥ तुका म्हणे तुजसाठीं। आम्हां संवसारें तुटी॥४॥

१६९९. तुझ्याठायीं ओस। दोन्हीं पुण्य आणि दोष॥१॥ झडलें उरलें किती। आम्हीं धरियेलें चित्तीं॥२॥ कळलासी नष्टा। यातिक्रियाकर्मभ्रष्टा॥३॥ तुका म्हणे बोला। नाहीं ताळा गा विठ्ठला॥४॥

१७००. भांडावें तों हित। ठायीं पडतें उचित॥१॥ नये खंडूं देऊं वाद। आम्हां भांडवल भेद॥२॥ शब्दासारसें भेटी। नये पडों देऊं तुटी॥३॥ तुका म्हणे आळस। तोचि कारणांचा नास॥४॥

१७०१. नव्हों गाढे आळसी। जो तूं आम्हांपुढें जासी॥१॥ अरे दिलें आम्हां हातीं। वर्म वेवादाचें संतीं॥२॥ धरोनियां वाट। जालो शिरोमणि थोंट॥३॥ तुका म्हणे देवा।

वादें करीन खरी सेवा ॥४॥

१७०२. तुझा विसर नको माझिया हो जीवा । क्षण एक केशवा मायबापा ॥१॥ जावो राहो देह आतां येचि घडी । कायसी आवडी याची मज ॥२॥ कुश्चिळ इंद्रियें आपुलिया गुणें । यांचिया पाळणे कोण हित ॥३॥ पुत्र पत्नी बंधु सोयरीं खाणोरीं । यांचा कोण धरीं संग आतां ॥४॥ पिंड हा उसना आणिला पांचांचा । सेखीं लागे ज्याचा त्यासी देणें ॥५॥ तुका म्हणे नाहीं आणिक सोइरें । तुजविण दुसरें पांडुरंगा ॥६॥

१७०३. ऐसें सत्य माझें येईल अंतरा । तरिच मज करा कृपा देवा ॥१॥ वचनांसारिखें तळमळे चित्त । बाहेरि तो आंत होईल भाव ॥२॥ तरिच मज ठाव द्यावा पायांपाशीं । सत्यत्वें जाणसी दास खरा ॥३॥ तुका म्हणे सत्य निकट सेवक । तरिच भातुकें प्रेम द्यावें ॥४॥

१७०४. आदि वर्तमान जाणसी भविष्य । मागें पुढे नीस संचिताचा ॥१॥ आतां काय देऊं पायांपें परिहार । जाणा तो विचार करा देवा ॥२॥ आपुलें तें येथें काय चाले केलें । जोडावे ते भले हात पुढें ॥३॥ तुका म्हणे फिके बोल माझे वारा । कराल दातारा होईल तें ॥४॥

१७०५. सुखें न मनीं अवगुण । दुःख भोगी त्याचें कोण ॥१॥ हें कां ठायींचें न कळे । राती करा झांकुनि डोळे ॥२॥ चालोनियां आड वाटे । पायीं मोडविले कांटे ॥३॥ तुका म्हणे कोणा । बोल ठेवितो शहाणा ॥४।

१७०६. आम्हीं न देखों अवगुणां । पापी पवित्र शहाणा ॥१॥ अवघीं रूपें तुझीं देवा । वंदूं भावें करूं सेवा ॥२॥ मज भक्तीसवें चाड । नेणें पाषाण धातु वाड ॥३॥ तुका म्हणे घोटीं । विष अमृत तुजसाठीं ॥४॥

१७०७. मज नाहीं तुझ्या ज्ञानाची ते चाड । घेतां वाटे गोड नाम तुझें ॥१॥ नेणतें लेंकरूं आवडीचें तान्हें । बोलतों वचनें आवडीनें ॥२॥ भक्ती नेणें कांहीं वैराग्य तें नाहीं । घातला विठाई भार तुज ॥३॥ तुका म्हणे नाच निर्लज्ज होऊनि । नाहीं माझें मनीं दुजा भाव ॥४॥

१७०८. काय माझी संत पाहती जाणीव । सर्व माझा भाव त्यांचे पायीं ॥१॥ कारण सरतें करा पांडुरंगीं । भूषणाची जगीं काय चाड ॥२॥ बोबड्या उत्तरीं म्हणे हरिहरि । आणीक भिकारी नेणें दुजें ॥३॥ तुका म्हणे तुम्ही विठ्ठलाचे दास । करितों मी आस उच्छिष्टाची ॥४॥

१७०९. जीवाचें जीवन अमृताची तनु । ब्रह्मांडभूषणु नारायण ॥१॥ सुखाचा सांगात अंतकासी अंत । निजाचा निवांत नारायण ॥२॥ गोडाचेंही गोड हर्षाचेंही कोड । प्रीतीचाही लाड नारायण ॥३॥ भावाचा निज भाव नांवाचाही नांव । अवघा पंढरिराव अवतरलासे ॥४॥ तुका म्हणे जें हें साराचेंही सार । माझा अंगीकार तेणें केला ॥५॥

१७१०. आतां मी सर्वथा नव्हें गा दुर्बळ । यातिहीनकुळ दैन्यवाणा ॥१॥ माय रखुमाई

पांडुरंग पिता । शुद्ध उभयतां पक्ष दोन्ही ॥२॥ बापुडा मी नव्हें दुर्बळ ठेंगणा । पांगिला हा कोणा आणिकासी ॥३॥ दुष्ट नव्हों आम्ही अभागी अनाथ । आमुचा समर्थ कैवारी हा ॥४॥ संवसार आम्हां सरला सकळ । लपोनियां काळ ठेला धाकें ॥५॥ तुका म्हणे जालों निर्भर मानसीं । जोडलिया रासी सुखाचिया ॥६॥

१७११. केलें नाहीं मनीं तया घडे त्याग । उबग उद्वेग नाहीं चित्तीं ॥१॥ देवचि हा जाणे अंतरींचा भाव । मिथ्या तो उपाव बाह्य रंग ॥२॥ त्यागिल्याचें ध्यान राहिलें अंतरीं । अवघी ते परी विटंबना ॥३॥ तुका म्हणे आपआपणां विचारा । कोण हा दुसरा सांगे तुम्हां ॥४॥

१७१२. हित व्हावें तरी दंभ दुरी ठेवा । चित्तशुद्ध सेवा देवाची हे ॥१॥ आवडी विठ्ठल गाइजे एकांतीं । अलभ्य ते येती लाभ घरा ॥२॥ आणिकां अंतरीं न द्यावी वसति । करावी हे शांती वासनेची ॥३॥ तुका म्हणे बाण हाचि निर्वाणींचा । वाउगी हे वाचा वेचूं नये ॥४॥

१७१३. हो कां नर अथवा नारी । ज्यांचा आवडता हरि ॥१॥ ते मज विठोबासमान । नमूं आवडी ते जन ॥२॥ ज्याचें अंतर निर्मळ । त्याचें सबाह्य कोमळ ॥३॥ त्यांचा संग सर्वकाळ । घडी मज हे मंगळ ॥४॥ तुका म्हणे प्राण । काया कुरवंडी करीन ॥५॥

१७१४. हरिची हरिकथा नावडे जया । अधम म्हणतां तया वेळ लागे । मनुष्यदेहीं तया नाट पैं लागलें । अघोर साधिलें कुंभपाक ॥१॥ कासया जन्मा आला तो पाषाण । जंत कां होऊन पडिला नाहीं । उपजे मरोनि वेळोवेळां भांड । परि न धरी लंड लाज कांहीं ॥२॥ ऐसियाची माता कासया प्रसवली । वर नाहीं घातली मुखावरी । देवधर्माविण तो हा चांडाळ । न साहे भूमि भार क्षणभरी ॥३॥ राम म्हणतां तुझें काय वेचेल । कां हित आपुलें न विचारिसी । जन्माजन्मींचा होईल नरकीं । तुका म्हणे चुकी जरी यासी ॥४॥

१७१५. उपेक्षिला येणें कोणी शरणागत । ऐसी नाहीं मात आईकिली ॥१॥ आतां काय ब्रीद सांडील आपुलें । ठायींचें धरिलें जाणोनियां ॥२॥ माझ्या दोषासाठीं होइल पाठमोरा । ऐसा कोण पुरा भोग बळी ॥३॥ तुका म्हणे रूप आमच्या कैवारें । धरिलें गोजिरें चतर्भुज ॥४॥

१७१६. आवडीसारिखें संपादिलें सोंग । अनंत हीं मग जालीं नामें ॥१॥ कळे ऐशा वाटा रचिल्या सुलभा । दुर्गम या नभाचाही साक्षी ॥२॥ हातें जेवी एक मुखें मागे घांस । माउली जयास तैसी बाळा ॥३॥ तुका म्हणे माझें ध्यान विटेवरी । तैसीच गोजिरी दिसे मूर्ति ॥४॥

१७१७. धन्य मी मानीन आपुलें संचित । राहिलीसे प्रीत तुझे नामीं ॥१॥ धन्य जालों आतां यासि संदेह नाहीं । न पडे या वाहीं काळा हातीं ॥२॥ ब्रह्मरस करूं भोजन पंगती । संतांचे संगती सर्वकाळ ॥३॥ तुका म्हणे पोट धालेंचि न धाय । खादेलेंचि खाय आवडीनें ॥४॥

१७१८. आवडी न पुरे सेवितां न सरे । पडियेली धुरेसवें गांठी ॥१॥ न पुरे हा जन्म हें सुख

सांठितां । पुढतीही आतां हेंचि मागों ॥२॥ मारगाची चिंता पालखी बैसतां । नाहीं उसंतितां कोस पेणी ॥३॥ तुका म्हणे माझी विठ्ठल माउली । जाणे ते लागली भूक ताहान ॥४॥

१७१९. नाहीं त्रिभुवनीं सुख या समान । म्हणऊनि मन स्थिरावलें ॥१॥ धरियेलीं जीवीं पाउलें कोंवळीं । कंठीं एकावळी नाममाळा ॥२॥ शीतळ होऊनी पावलों विश्रांती । न साहे पुढती चाली चित्ता ॥३॥ तुका म्हणे जाले सकळ सोहळे । पुरविले डोहळे पांडुरंगें ॥४॥

१७२०. मायबापापुढें लाडिकें लेंकरूं । तैसे बोल करूं कवतुकें ॥१॥ कृपावंता घालीं प्रेमरसपान्हा । वोळवी वोरस पांडुरंगें ॥२॥ नाहीं धीर खुंटीं जवळी हुंबरे । ठायींच पाखरें कवळिते ॥३॥ तुका म्हणे मज होऊं नेदी सीण । कळों नेदी भिन्न आहे तैसें ॥४॥

१७२१. उत्तम घालावें आमुचिये मुखीं । निवारावें दुःखी होऊं नेदी ॥१॥ न बैसे न वजे जवळूनि दूरी । मागें पुढें वारी घातपात ॥२॥ नाहीं शंका असो भलतिये ठायीं । मावळलें पाहीं द्वैताद्वैत ॥३॥ तुका म्हणे भार घेतला विठ्ठलें । अंतरीं भरलें बाह्य रूप ॥४॥

१७२२. आठवूंचि नेदी आवडी आणीक । भरूनियां लोक तिन्हीं राहे ॥१॥ मन धांवे तेथें तिचेंचि दुभतें । संपूर्ण आइतें सर्वकाळ ॥२॥ नलगे वळावीं इंद्रियें धांवतां । ठाव नाहीं रिता उरों दिला ॥३॥ तुका म्हणे समपाउलाचा खुंट । केला बळकट हालों नेदी ॥४॥

१७२३. आम्हां अळंकार मुद्रांचे शृंगार । तुळसीचे हार वाहों कंठीं ॥१॥ लाडिके डिंगर पंढरिरायाचे । निरंतर वाचे नामघोष ॥२॥ आम्हां आणिकांची चाड चित्तीं नाहीं । सर्व सुख पायीं विठोबाच्या ॥३॥ तुका म्हणे आम्ही नेघोंचि या मुक्ती । एकाविण चित्तीं दुजें नाहीं ॥४॥

१७२४. चला पंढरीसी जाऊं । रखुमादेवीवरा पाहूं ॥१॥ डोळे निवतील कान । मना तेथें समाधान ॥२॥ संतां महंतां होतील भेटी । आनंदें नाचों वाळवंटीं ॥३॥ तें तीर्थांचें माहेर । सर्व सुखाचें भांडार ॥४॥ जन्म नाहीं रे आणीक । तुका म्हणे माझी भाक ॥५॥

१७२५. पैल घरीं जाली चोरी । देहा करी बोंब ॥१॥ हावा हावा करिसि काय । फिराऊनि नेट्यां वाय ॥२॥ सांडुनियां शुद्धी । निजलासी गेली बुद्धि ॥३॥ चोरीं तुझा काढिला बुर । वेगळें भावा घातला दूर ॥४॥ भलतियासी देसी वाव । लाहेसि तूं एवढा ठाव ॥५॥ तुका म्हणे अझुनि तरी । उरलें तें जतन करीं ॥६॥

१७२६. किती वेळां खादला दगा । अझून कां गा जागसी ना ॥१॥ लाज नाहीं हिंडतां गांवें । दुःख नवें नित्य नित्य ॥२॥ सव चोरा हातीं फांसे । देखतां कैसे न देखती ॥३॥ तुका म्हणे सांडिती वाट । तळपट करावया ॥४॥

१७२७. मुदलामध्यें पडे तोटा । पैसा खोटा उदीम ॥१॥ आणिकांची कां लाज नाहीं । आळसा जिहीं जिंतिलें ॥२॥ एके सांते सारिखीं वित्तें । हाणि हिते वेगळालीं ॥३॥ तुका

म्हणे हित धरा । नोहे पुरा गांवढाळ ॥४॥

१७२८. निरोप सांगतां । न धरीं भय न करीं चिंता ॥१॥ असो ज्याचें त्याचे माथा । आपण करावी ते कथा ॥२॥ उतरावा भार । किंवा न व्हावें सादर ॥३॥ तुका म्हणे वाहे धाक । तया इह ना परलोक ॥४॥

१७२९. शूरत्वासी मोल । नये कामा फिके बोल ॥१॥ केला न संडी कैवाड । जीवेंसाठीं तों हें होड ॥२॥ धीर तो कारण । साह्य होतो नारायण ॥३॥ तुका म्हणे हरि । दासां रक्षितो निर्धारीं ॥४॥

१७३०. हरिच्या दासां भय । ऐसें बोलों तेंही नये ॥१॥ राहोनियां आड । उभा देव पुरवी कोड ॥२॥ हरिच्या दासां चिंता । अघटित हे वार्ता ॥३॥ खावें ल्यावें द्यावें । तुका म्हणे पुरवावें ॥४॥

१७३१. दासां सर्व काळ । तेथें सुखाचे कल्लोळ ॥१॥ जेथें वसती हरीचे दास । पुण्य पिके पापा नास ॥२॥ फिरे सुदर्शन । घेऊनियां नारायण ॥३॥ तुका म्हणे घरीं । होय म्हणियारा कामारी ॥४॥

१७३२. आमचा स्वदेश । भुवनत्रयामध्यें वास ॥१॥ मायबापाचीं लाडकीं । कळों आलें हें लौकिकीं ॥२॥ नाहीं निपराध । कोणां आम्हांमध्यें भेद ॥३॥ तुका म्हणे नाम । अवघें आमचें हें धाम ॥४॥

१७३३. काय ढोरापुढें घालूनि मिष्टान्न । खरासी लेपन चंदनाचें ॥१॥ नको नको देवा खळाची संगति । रस ज्या पंगती नाहीं कथे ॥२॥ काय सेज बाज माकडा विलास । अळंकारा नास करूनि टाकी ॥३॥ तुका म्हणे काय पाजुनि नवनीत । सर्पा विष थीत अमृताचें ॥४॥

१७३४. आनंदें एकांतीं प्रेमें वोसंडत । घेऊं अगणित प्रेममुख ॥१॥ गौप्य धन नये वारा लागों यास । पाहों नेदूं वास दुर्जनासी ॥२॥ झणी दृष्टि लागे आवडीच्या रसा । सेवूं जिरे तैसा आपणासी ॥३॥ तुका म्हणे हें बहु सुकुमार । न साहावे भार वचनाचा ॥४॥

१७३५. मोक्षपद तुच्छ केलें याकारणें । आम्हां जन्म घेणें युगायुगीं ॥१॥ विटे ऐसें सुख नव्हे भक्तिरस । पुढतापुढती आस सेवावें हें ॥२॥ देवा हातीं रूप धरविला आकार । नेदूं निराकार होऊं त्यासी ॥३॥ तुका म्हणे चित्त निवांत राहिलें । ध्याईं तीं पाउलें विटेवरि ॥४॥

१७३६. नको बोलों भांडा । खीळ घालून बैसा तोंडा ॥१॥ ऐकें विठोबाचे गुण । करीं सादर श्रवण ॥२॥ प्रेमसुखा आड । काय वाजतें चाभाड ॥३॥ तुका म्हणे हिता । कां रे नागविसी थीता ॥४॥

१७३७. अति जालें उत्तम वेश्येचें लावण्य । परि ते सवासीण न म्हणवी ॥१॥ उचित अनुचित केले ठाया ठाव । गुणां मोल वाव थोरपण ॥२॥ शूरत्वावांचूनि शूरांमाजी ठाव । नाहीं

आविर्भाव आणिलिया ॥३॥ तुका म्हणे सोंग पोटाचे उपाई । कारण कमाईविण नाहीं ॥४॥

१७३८. शूरां साजती हतियारें । गांढ्यां हांसतील पोरें ॥१॥ काय केली विटंबण । मोतीं नासिकावांचून ॥२॥ पतिव्रते रूप साजे । सिंदळ काजळ लेतां लाजे ॥३॥ दासी पत्नी सुता । नव्हे सरी एकचि पिता ॥४॥ मान बुद्धिमंता । थोर न मानिती पिता ॥५॥ तुका म्हणे तरी । आंत शुद्ध दंडे वरी ॥६॥

१७३९. काय केलें जळचरीं । ढीवर त्यांच्या घातावरी ॥१॥ हा तों ठायींचा विचार । आहे यातिवैराकार ॥२॥ श्वापदातें वधीं । निरपराधें पारधी ॥३॥ तुका म्हणे खळ । संतां पीडिती चांडाळ ॥४॥

१७४०. वाईटानें भलें । हीनें दाविलें चांगलें ॥१॥ एकाविण एका । कैचें मोल होतें फुका ॥२॥ विषें दाविलें अमृत । कडू गोड घातें हित ॥३॥ काळिमेनें ज्योती । दिवसें कळों आली राती ॥४॥ उंच नीच गारा । हिरा परिस मोहरा ॥५॥ तुका म्हणे भले । ऐसे नष्टांनीं कळलें ॥६॥

१७४१. असो खळ ऐसे फार । आम्हां तयांचे उपकार ॥१॥ करिती पातकांची धुणी । मोल न घेतां साबणीं ॥२॥ फुकाचे मजूर । ओझें वागविती भार ॥३॥ पार उतरुन म्हणे तुका । आम्हां आपण जाती नरका ॥४॥

१७४२. संत पंढरीसी जाती । निरोप धाडी तया हातीं ॥१॥ माझा न पडावा विसर । तुका विनवितो किंकर ॥२॥ केरसुणी महाद्वारीं । ते मी असें निरंतरीं ॥३॥ तुमचे पायीं पायतन । मोचे माझें तन मन ॥४॥ तांबुलाची पिकधरणी । ते मी असें मुख पसरूनि ॥५॥ तुमची विष्ठा पंढरीराया । ते सारसुवी माझी काया ॥६॥ लागती पादुका । ते मी तळील मृत्तिका ॥७॥ तुका म्हणे पंढरिनाथा । दुजें न धरावें सर्वथा ॥८॥

१७४३. इच्छेचें पाहिलें । डोळीं अंतीं मोकलिलें ॥१॥ याचा विश्वास तो काई । ऐसें विचारूनि पाहीं ॥२॥ सुगंध अभ्यंगें पाळितां । केश फिरले जाणतां ॥२॥ पिंड पाळितां ओसरे । अवघी घेऊनि मागें सरे ॥४॥ करितां उपचार । कोणा नाहीं उपकार ॥५॥ अल्प जीवन करीं । तुका म्हणे साधे हरी ॥६॥

१७४४. यज्ञनिमित्त शरिरासी बंधन । कां रे तृष्णा वांयांविण वाढविली ॥१॥ नव्हे ते भक्ति परलोकसाधन । विषयांनी बंधन केलें तुज ॥२॥ आशा धरूनि फळाची । तीर्थी व्रतीं मुक्ति कैंची । तुका म्हणे सिणसी वांयां । शरण न वजतां पंढरिराया ॥४॥

१७४५. संध्या कर्म ध्यान जप तप अनुष्ठान । अवघें जोडे नाम उच्चारितां । न वेचे मोल कांहीं न लगती सायास । तरी कां आळस करिसी झणी ॥१॥ ऐसें हें सार कां नेघेसी फुकाचें । काय तुझें वेचें मोल तया ॥२॥ पुत्रस्नेहें शोक करी अजामेळ । तंव तो कृपाळ जवळी उभा ।

अनाथांच्या नाथें घातला विमानीं । नेला उचलोनि परलोकां ॥३॥ अंतकाळी गणिका पक्षियाच्या छंदे । राम राम पद उच्चारिलें । तंव त्या दीनानाथा कृपा आली कैसी । त्यानें तियेसी वैकुंठासी नेलें ॥४॥ अवचिता नाम आलिया हे गती । चिंतितां चित्तीं जवळी असे । तुका म्हणे भावें स्मरतां राम राम । कोण जाणे तये दशे ॥५॥

१७४६. दुष्टाचें चिंतन भिन्न अंतरीं । जरी जन्मवरी उपदेशिला । पालथें घागरी घातलें जीवन । न धरीच जाण तेंही त्याला ॥१॥ जन्मा येऊनि तेणें पतनचि साधिलें । तमोगुणें व्यापिलें जया नरा । जळो जळो हें त्याचें ज्यालेपण । कासया हें आलें संवसारा ॥२॥ पाषाण जीवनीं असतां कल्पवरी । पाहतां अंतरीं कोरडा तो । कुचर मुग नयेचि पाका । पाहातां सारिखा होता तैसा ॥३॥ तुका म्हणे असे उपाय सकळां । न चले या खळा प्रयत्न कांहीं । म्हणऊनि संग न करितां भला । धरितां अबोला सर्व हित ॥४॥

१७४७. कासयानें पूजा करूं केशीराजा । हाचि संदेह माझा फेडीं आतां ॥१॥ उदकें न्हाणूं तरी स्वरूप तें तुझें । तेथें काय माझें वेचे देवा ॥२॥ गंधाचा सुगंध पुष्पाचा परिमळ । तेथें मी दुर्बळ काय करूं ॥३॥ फळदाता तूंच तांबोल अक्षता । तेथें काय आतां वाहों तुज ॥४॥ वाहूं दक्षिणा तरी धातु नारायणा । ब्रह्म तेंचि अन्न दुजें काई ॥५॥ गातां तूं ॐ कार टाळी नादेश्वर । नाचावया थार नाहीं कोठें ॥६॥ तुका म्हणे मज अवघें तुझें नाम । धूप दीप रामकृष्णहरि ॥७॥

१७४८. गातां आइकतां कांटाळा जो करी । वास त्या अघोरीं कुंभपाकीं ॥१॥ रागें यमधर्म जाचविती तया । तुज दिलें कासया मुख कान ॥२॥ विषयांच्या सुखें अखंड जागसी । न वजे एकादशी जागरणा ॥३॥ वेचूनियां द्रव्य सेवी मद्यपान । नाहीं दिलें अन्न अतीतासी ॥४॥ तीर्थाटण नाहीं केले उपकार । पाळिले शरीर पुष्ट लोभें ॥५॥ तुका म्हणे मग केला साहे दंड । नाइकती लंड सांगितलें ॥६॥

१७४९. तुझें म्हणवितां काय नास जाला । ऐकें बा विठ्ठला कीर्ती तुझी ॥१॥ परी तुज नाहीं आमचे उपकार । नामरूपा थार केलियाचे ॥२॥ समूळी संसार केला देशधडी । सांडिली आवडी ममतेची ॥३॥ लोभ दंभ काम क्रोध अहंकार । यांसीं नाहीं थार ऐसें केलें ॥४॥ मृत्तिका पाषाण तैसें केलें धन । आपलें ते कोण पर नेणों ॥५॥ तुका म्हणे जालों देहासी उदार । आणीक विचार काय तेथें ॥६॥

१७५०. जाऊनियां तीर्था काय तुवां केलें । चर्म प्रक्षाळिलें वरी वरी ॥१॥ अंतरींचें शुद्ध कासयानें जालें । भूषण तों केलें आपणया ॥२॥ वृंदावन फळ घोळिलें साकरा । भीतरील थारा मोडेचि ना ॥३॥ तुका म्हणे नाहीं शांति क्षमा दया । तोंवरी कासया फुंदां तुम्ही ॥४॥

१७५१. बैसोनि निवांत शुद्ध करीं चित्त । तया सुखा अंतपार नाहीं ॥१॥ येऊनि अंतरीं

राहील गोपाळ। सायासाचें फळ बैसलिया ॥२॥ राम कृष्ण हरि मुकुंद मुरारी। मंत्र हा उच्चारीं वेळोवेळां ॥३॥ तुका म्हणे ऐसें देईन मी दिव्य। जरी होइल भाव एकविध ॥४॥

१७५२. धन्य पुंडलिका बहु बरें केलें। निधान आणिलें पंढरिये ॥१॥ न करीं आळस आलिया संसारीं। पाहें पा पंढरीं भूवैकुंठ ॥२॥ न पविजे केल्या तपांचिया रासी। तें जनलोकांसी दाखविलें ॥३॥ सर्वोत्तम तीर्थ क्षेत्र आणि देव। शास्त्रांनी हा भाव निवडिला ॥४॥ विष्णुपद गया रामनाम काशी। अवघीं पायांपाशीं विठोबाच्या ॥५॥ तुका म्हणे मोक्ष देखिल्या कळस। तात्काळ हा नास अहंकाराचा ॥६॥

१७५३. धन्य ते पंढरी धन्य भीमातीर। आणियेलें सार पुंडलिकें ॥१॥ धन्य तोही लोक अवघा दैवांचा। सुकाळ प्रेमाचा घरोघरीं ॥२॥ धन्य तेही भूमी धन्य तरुवर। धन्य तें सरोवर तीर्थरूप ॥३॥ धन्य त्या नरनारी मुखीं नाम ध्यान। आनंदें भुवन गर्जतसे ॥४॥ धन्य पशु पक्षी कीटक पाषाण। अवघा नारायण अवरतलासे ॥५॥ तुका म्हणे धन्य संसारा तीं आलीं। हरिरंगीं रंगलीं सर्वभावें ॥६॥

१७५४. मायबाप करिती चिंता। पोर नाइके सांगतां ॥१॥ नको जाऊं देउळासी। नेतो बागुल लोकांसी ॥२॥ वैष्णवांसंगती। हातीं पडलीं नेणों किती ॥३॥ कर्णद्वारें पुराणिक। भुलवी शब्दें लावी भीक ॥४॥ आम्हां कैंचा मग। करिसी उघडियांचा संग ॥५॥ तुका म्हणे जाणें नरका। त्यांचा उपदेश आइका ॥६॥

१७५५. मन माझें चपळ न राहे निश्चळ। घडी एकी पळ स्थिर नाहीं ॥१॥ आतां तूं उदास नव्हें नारायणा। धांवें मज दीना गांजियेलें ॥२॥ धांव घालीं पुढें इंद्रियांचे ओढी। केलें तडातोडी चित्त माझें ॥३॥ तुका म्हणे माझा नचले सायास। राहिलों हे आस धरुनि तुझी ॥४॥

१७५६. मागतियाचे दोनिच कर। अमित भांडार दातियाचें ॥१॥ काय करूं आतां कासयांत भरूं। हा मज विचारु पडियेला ॥२॥ एक सांठवण प्रेमें वोसंडलीं। जिव्हा हे भागली करितां माप ॥३॥ तुका म्हणे आतां आहे तेथें असो। अंकुनिया बैसों पायांपाशीं ॥४॥

१७५७. जिचें पीडे बाळ। प्राण तियेचा विकळ ॥१॥ ऐसा मातेचा स्वभाव। सूत्र दोरी एक जीव ॥२॥ सुखाची विश्रांती। उमटे मातेचिया चित्तीं ॥३॥ तुका म्हणे संत। तुम्ही बहु कृपावंत ॥४॥

१७५८. यावें माहेरास। हेच सर्वकाळ आस ॥१॥ घ्यावी उच्छिष्टाची धणी। तीर्थ इच्छी पायवणी ॥२॥ भोग उभा आड। आहे तोंवरीच नाड ॥३॥ तुका म्हणे देवें। माझें सिद्धी पाववावें ॥४॥

१७५९. लेंकुराचें हित। वाहे माउलीचें चित्त ॥१॥ ऐसी कळवळ्याची जाती। करी

लाभाविण प्रीती ॥२॥ पोटीं भार वाहे । त्याचें सर्वस्वही साहे ॥३॥ तुका म्हणे माझें । तुम्हां संतांवरी ओझें ॥४॥

१७६०. आम्हां गांजी जन । तरि कां मेला नारायण ॥१॥ जालों पोरटीं निढळें । नाहीं ठाव बुड आळें ॥२॥ आम्ही जना भ्यावें । तरि कां न लाजिजें देवें ॥३॥ तुका म्हणे देश । जाला देवाविण ओस ॥४॥

१७६१. तुम्हीं पाय संतीं । माझे ठेवियले चित्तीं ॥१॥ आतां बांधू न सके काळ । जालीं विषमें शीतळ ॥२॥ भय नाहीं मनीं । देव वसे घरीं रानीं ॥३॥ तुका म्हणे भय । आम्हां स्वप्नीं तेंही नये ॥४॥

१७६२. काळाचेही काळ । आम्ही विठोबाचे लडिवाळ ॥१॥ करूं सत्ता सर्वांठायीं । वसों निकटवासें पायीं ॥२॥ ऐसी कोणाची वैखरी । वदे आमुचे सामोरी ॥३॥ तुका म्हणे बाण । हातीं हरिनाम तीक्ष्ण ॥४॥

१७६३. जन्मा येऊन उदार जाला । उद्धार केला वंशाचा । मेळवूनि धन मेळवी माती । सदा विपत्ति भोगितसे ॥१॥ नाम घेतां न मिळे अन्न । नव्हे कारण देखिलिया । धर्म करितां ऐके कानीं । बांधे निजोनि डोकियासी ॥२॥ घरा व्याही पाहुणा आला । म्हणे त्याला बरें नाहीं । तुमचे गांवीं वैद्य आहे । बैसोनि काय प्रयोजन ॥३॥ उजवूं किती होतील पोरें । मरतां बरें म्हणे यांसी । म्हणऊनि देवा नवस करी । दावी घरींहुनि बोनें ॥४॥ पर्वकाळीं भट घरासी आला । बोंब घाला म्हणे पोरां । तुमचा उणा होईल वांटा । काळ पिठासी पैं आला ॥५॥ दाढी करितां अडका गेला । घरांत आला वाइलेपें । म्हणे आतां उगवीं मोडी । डोई बोडीं आपुली ॥६॥ तीर्थ स्वप्नीं नेणें गंगा । पूजन लिंगा गांविंचिया । आडकुनि दार बैसें दारीं । आल्या घर म्हणे ओस ॥७॥ माझ्या भय वाटे चित्तीं । नरका जाती म्हणोनि । तुका म्हणे ऐसे आहेत गा हरी । याही तारीं जीवांसी ॥८॥

१७६४. जाणे वर्तमान । परि तें न वारे त्याच्यानें ॥१॥ तोही कारणाचा दास । देव म्हणवितां पावे नास ॥२॥ वेची अनुष्ठान । सिद्धी कराया प्रसन्न ॥३॥ तुका म्हणे त्याचें । मुद्दल गेलें हाटवेचें ॥५॥

१७६५. घातला दुकान । पढीये तैसा आहे वान ॥१॥ आम्हीं भांडारी देवाचें । द्यावें घ्यावें माप वाचे ॥२॥ उगवूं जाणो मोडी । जाली नव्हे त्याची जोडी ॥३॥ तुका म्हणे पुडी । मोल तैसी खरी कुडी ॥४॥

१७६६. सादाविलें एका । सरें अवघियां लोकां ॥१॥ आतां आवडीच्या हातीं । भेद नाहीं ये पंगती ॥२॥ मोकळीच पोतीं । नाहीं पुसायाची गुंती ॥३॥ तुका म्हणे बरा । आहे

ढसाळ वेव्हारा ॥४॥

१७६७. तडामोडी करा। परि उत्तम तें भरा ॥१॥ जेणें खंडे एके खेपे। जाय तेथें लोभें वोपे ॥२॥ दाविल्या सारिखें। मागें नसावें पारिखें ॥३॥ मागें पुढें ऋण। तुका म्हणे फिटे हीण ॥४॥

१७६८. नसावें ओशाळ । मग मानिती सकळ ॥१॥ जाय तेथें पावे मान । चाले बोलिलें वचन ॥२॥ राहों नेदी बाकी । दान ज्याचें त्यासी टाकी ॥३॥ व्हावा वाटे जना । तुका म्हणे साठीं गुणां ॥४॥

१७६९. चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती। व्याघ्र ही न खाती सर्प तया ॥१॥ विष तें अमृत आघात तें हित । अकर्तव्य नीत होय त्यासी ॥२॥ दुःख तें देईल सर्व सुख फळ । होतील शीतळ अग्निज्वाळा ॥३॥ आवडेल जीवां जीवाचिये परी। सकळां अंतरीं एक भाव ॥४॥ तुका म्हणे कृपा केली नारायणें। जाणिजेते येणें अनुभवें ॥५॥

१७७०. लाज वाटे मज मानिती हे लोक । हें तों नाहीं एक माझे अंगीं ॥१॥ मोजुनि झिजलों मापाचिया परी । जाळावी हे थोरी लाभाविण ॥२॥ कोमळ कंटक तीक्षण अगरीं । पोचट ते वरी अंगकांति ॥३॥ चित्रींचें ते लेप शृंगारिलें निकें। जीवेंविण फिकें रूप त्याचें ॥४॥ तुका म्हणे दिसें वांयां गेलों देवा। अनुभव ठावा नाहीं तेणें ॥५॥

१७७१. बोलविसी माझे मुखें । परी या जना वाटे दुःख ॥१॥ जया जयाची आवडी । तयालागीं तें चरफडी ॥२॥ कठीण देतां काढा। जल्पें रोगी मेळवी दाढा ॥३॥ खाऊं नये तेंचि मागे। निवारितां रडों लागे ॥४॥ वैद्या भीड काय। अतित्याई जीवें जाय ॥५॥ नये भिडा सांगो आन। पथ्य औषधा कारण ॥६॥ धन माया पुत्र दारा। हें तों आवडीं नरका थारा ॥७॥ तुका म्हणे यांत। आवडे ते करा मात ॥८॥

१७७२. पतिव्रते आनंद मनीं । सिंदळ खोंचे व्यभिचारवचनीं ॥१॥ जळो वर्म लागो आगी। शुद्धपण भले जगीं ॥२॥ सुख पुराणीं आचारशीळा। दुःख वाटे अनर्गळा ॥३॥ शूरा उल्हास अंगीं। गांढ्या मरण ते प्रसंगीं ॥४॥ शुद्ध सोनें उजळे अगी। हीन काळें धावे रंगीं ॥५॥ तुका म्हणे तोचि हिरा। घनघायें निवडे पुरा ॥६॥

१७७३. चालती आड वाटा। आणिकां दाविती जे नीटा ॥१॥ न मनीं तयांचे उपकार। नाहीं जोडा तो गंव्हार ॥२॥ विष सेवुनि वारी मागें। प्राण जाता जेणें संगें ॥३॥ बुडतां हाका मारी। ठाव नाहीं आणिका वारी ॥४॥ तुका म्हणे न करीं हेका। गुण घेऊन अवगुण टाका ॥५॥

१७७४. कुळींचें दैवत ज्याचें पंढरीनाथ । होईन दासीसुत त्याचे घरीं ॥१॥ शुद्ध यातिकुळवर्णा चाड नाहीं। करीं भलते ठायीं दास तुझा ॥२॥ पंढरीस कोणी जाती वारकरी। होईन त्याचे घरीं पशुयाति ॥३॥ विठ्ठलचिंतन दिवसरात्रीं ध्यान। होईन पायतन त्याचे पायीं

॥४॥ तुळसीवृंदावन जयाचे अंगणीं । होईन केरसुणी त्याचे घरीं ॥५॥ तुका म्हणे हाचि भाव माझ्या चित्तीं । नाहीं आणिका गती चाड मज ॥६॥

१७७५. चंदनाचें गांवीं सर्पांची वसति । भोगिते ते होती द्वीपांतरीं ॥१॥ एका ओझें एका लाभ घडे देवा । संचिताचा ठेवा वेगळाला ॥२॥ क्षीराची वसति अशुद्ध सेवावें । जवळीं तें जावें भोगें दुरी ॥३॥ तुका म्हणे ऐसी बुद्धि ज्याची जड । त्याहुनी दगड बरे देवा ॥४॥

१७७६. अवघिया चाडा कुंटित करूनि । लावीं आपुलीच गोडी । आशा मनसा तृष्णा कल्पना । करूनियां देशधडी । मीतूंपणापासाव गुंतलों मिथ्या । संकल्प तो माझा तोडीं । तुझिये चरणीं माझे दोन्ही पक्ष । अवघी करूनि दाखवी पिंडी रे रे ॥१॥ माझें साच काय केलें मृगजळें । वर्ण याती कुळ अभिमान । कुमारी भातुकें खेळती कवतुकें । काय त्यांचें साचपण ॥२॥ वेगळाल्या भावें चित्ता तडातोडी । केलों देशधडी मायाजाळें । गोत वित्त माय बाप बहिणी सुत । बंधुवर्ग माझीं बाळें । एका एक न धरी संबंध पुरलिया । पातलिया जवळी काळें । जाणोनियां त्याग सर्वस्वें केला । सांभाळीं आपुलें जाळें ॥३॥ एका जवळी धरी आणिकां अंतरीं । तीं काय सोयरीं नव्हतीं माझीं । एकाचें पाळण एकासी भांडण । चाड कवणिये काजीं । अधिक असे उणें कवण कवण्या गुणें । हे माव न कळेचि तुझी । म्हणोनि चिंतनीं राहिलों श्रीपती । तुका म्हणे भाक माझी ॥४॥

१७७७. आणिकां छळावया जालासी शाहाणा । स्वहिता घातलें खान । आडिके पैके करूनि सायास । कृपणें सांचलें धन । न जिरे क्षीर श्वानासी भक्षितां । याती तयाचा गुण । तारुण्य दशे अधम मातला । दवडी हात पाय कान ॥१॥ काय जालें यांस वांयां कां ठकले । हातीं सांपडलें टाकीतसे । घेउनि स्फटिकमणी टाकी चिंतामणी । नागवले आपुले इच्छे ॥२॥ सिद्धीं सेविलें सेविती अधम । पात्रासारिखें फळ । सिंपिला मोतीं जन्मलें स्वातीचें । वरुषलें सर्वत्र जळ । कापुस पट नयेचि कारणा । तयास पातला काळ । तेंचि भुजंगीं धरिलें कंठीं । मा विष जालें त्याची गरळ ॥३॥ भक्षुनि मिष्टान्न घृतसाकर । सहित सोलुनि केळें । घालूनियां घसां अंगोळिया । हातें वांती करूं पाहे बळें । कुंथावयाची आवडी ओवा । उन्हवणी रडवी बाळें । तुका म्हणे जे जैसें करिती । ते पावती तैसींच फळें ॥४॥

१७७८. तुज दिलें आतां करीं यत्न याचा । जीवभाव वाचाकायामन ॥१॥ भागलों दातारा सीण जाला भारी । आतां मज तारीं शरणागता ॥२॥ नेणतां सोसिली तयाची आटणी । नव्हतांही कोणी कांहीं माझीं ॥३॥ वर्म नेणें दिशा हिंडती मोकाट । इंद्रियें सुनाट दाही दिशा ॥४॥ येरझारी फेरा सिणलों सायासीं । आतां हृषीकेशी अंगीकारीं ॥५॥ तुका म्हणे मन इंद्रियांचे सोई । धांवे यासी काई करूं आतां ॥६॥

१७७९. स्वयें पाक करी । संशय तोचि धरी । संदेहसागरीं । आणिकां परी बुडविती ॥१॥ जाणे विरळा एक । जालें तेथेंचि हें सुख । देखिलें बहुतेक । पुसतां वाट चुकले ॥२॥ तोचि जाणे सोंवळें । शोधी विकल्पाचीं मुळें । नाचती पाल्हाळें । जे विटाळें कोंडिलें ॥३॥ तोचि साधी संधी । सावध त्रिकाळ जो बुद्धि । संदेहाच्या संधी । वेठी आणीक धरियेले ॥४॥ अखंड ते ध्यान । समबुद्धि समाधान । सोंग वांयांविण । ते झाकून बैसती ॥५॥ करणें जयासाठीं । जो नातुडे कवणे आटी । तुका म्हणे साटी । चित्तवित्तेंवांचूनि ॥६॥

१७८०. माझिया संचिता । दृढ देखोनि बळिवंता । पळसी पंढरीनाथा । भेणें आतां तयाच्या ॥१॥ तरि मज कळलासी । नव्हतां भेटी जाणीवेसी । एक संपादिसी । मान करिसी येकात ॥२॥ तरि हें प्रारब्ध जी गाढें । कांहीं न चले तयापुढें । काय तुज म्यां कोडें । रे सांकडें घालावें ॥३॥ भोगाधिपति क्रियमाण । तें तुज नागवें आझून । तरि कां वांयांविण । तुज म्यां सीण करावा ॥४॥ तुज न होतां माझें कांहीं । परि मी न संडीं भक्तिसोई । हो कां भलत्या ठायीं । कुळीं जन्म भलतैसा ॥५ । तूं भितोसि माझिया दोषा । कांहीं मागणें ते आशा । तुका म्हणे ऐसा । कांहीं न धरी संकोच ॥६॥

१७८१. लोकमान देहसुख । संपत्तिउपभोग अनेक । विटंबना दुःख । तुझिया भेटीवांचूनि ॥१॥ तरि मज ये भेट ये भेट । काय ठाकलासी नीट । थोर पुण्यें वीट । तुज दैवेंचि लाधली ॥२॥ काय ब्रह्मज्ञान करूं कोरडें । रितें मायेचें मापाडें । भेटीविण कुडें । तुझिया अवघें मज वाटे ॥३॥ आत्मस्थितीचा विचार । काय करूं हा उद्धार । न देखतां धीर । चतुर्भुज मज नाहीं ॥४॥ रिद्धिसिद्धी काय करूं । अथवा आगम विचारूं । भेटीविण भारु । तुझिया वाटे मज यांचा ॥५॥ तुजवांचूनि कांहीं व्हावें । ऐसें नको माझिया जीवें । तुका म्हणे द्यावें । दरुषण पायांचें ॥६॥

१७८२. तुझा म्हणवून तुज नेणें । ऐसें काय माझें जिणें ॥१॥ तरि मज कवणाचा आधार । करोनियां राहों धीर ॥२॥ काय शब्दचि ऐकिला । भेटी नव्हतां गा विठ्ठला ॥३॥ तुका म्हणे आतां । अभय देईं पंढरिनाथा ॥४॥

१७८३. उद्धवअक्रूरासी । आणीक व्यासआंबऋषी । रुक्मांगदा-प्रल्हादासी । दाविलें तें दाखवीं ॥१॥ तरि मी पाहेन पाहेन । तुझे श्रीमुखचरण । उतावीळ मन । तयाकारणें तेथें ॥२॥ जनकाश्रुतदेवा करीं । कैसा शोभलासी हरी । विदुराच्या घरीं । कण्या धरी कवतुकें ॥३॥ पांडवां अकांतीं । तेथें पावसी स्मरती । घातलें द्रौपदी । यागीं बिरडें चोळीचें ॥४॥ करीं गोपींचें कवतुक । गाईगोपाळांसी सुख । दावीं तेंचि मुख । दृष्टी माझ्या आपुलें ॥५॥ तरि तूं अनाथाचा दाता । मागतियां शरणागतां । तुका म्हणे आतां । कोड पुरवीं हे माझें ॥६॥

१७८४. मागता भिकारी जालों तुझें द्वारीं । देईं मज हरी कृपादान ॥१॥ प्रेम प्रीति नाम

उचित करावें । भावें संचरावें हृदयामाजी ॥२॥ सर्वभावें शरण आलों पांडुरंगा । कृपाळु तूं जगामाजी एक ॥३॥ तापत्रयें माझी तापविली काया । शीतळ व्हावया पाय तुझे ॥४॥ संबंधीं जनवाद पीडलों परोपरी । अंतरलों दुरी तुजसी तेणें ॥५॥ तुका म्हणे आतां तुझा शरणागत । करावे सनाथ मायबापा ॥६॥

१७८५. न मनी नाम न मनी त्यासी । वाचाळ शब्द पिटी भासी ॥१॥ भाव नाहीं काय मुद्रा वाणी । बैसे बगळा निश्चळ ध्यानीं ॥२॥ नाहीं चाड देवाची कांहीं । छळण टोंकें तस्करघाई ॥३॥ तुका म्हणे त्याचा संग । नको शब्द स्पर्शअंग ॥४॥

१७८६. दिनें दिनें शंका वाढे । आयुष्य नेणवतां गाढें ॥१॥ कैसीं भुलली बापुडीं । दंभविषयाचे सांकडीं ॥२॥ विसरलीं मरण । त्याची नाहीं आठवण ॥३॥ देखत देखत पाहीं । तुका म्हणे आठव नाहीं ॥४॥

१७८७. माझें मज आतां न देखें निरसतां । म्हणऊन आधार केला । संसाराची आंस सांडुनि लौकिक । जीव भाव तुज दिला । नव्हतीं माझीं कोणी मी कवणांचा । आर्त मोहो सांडवला । तारीं मारीं करीं भलतें दातारा । होऊन आतां तुझा ठेलों रे ॥१॥ असों माझें कोडें तुज हें सांकडें । मी असेन निवाडें सुखरूप । बाळकासी चिंता काय पोटव्यथा । जया शिरीं मायबाप ॥२॥ पापपुण्य श्रुति आटल्या । शास्त्रांसी न लगेचि ठाव । विधिनिषेधें गोविलीं पुराणें । वेदासी तो अहंभाव । ओंकाराचें मूळ व्यापिलें माथा । तेथें न धरीच भाव । म्हणऊन काबाड । सांडिलें उपसतां । धरिलें तुझेंचि नांव ॥३॥ तनमनइंद्रियें ठेवूनि राहिलों । सर्व आशा तुझें पायीं । तप तीर्थ दान करवूं कवणा हातीं । अधीन तें मज काई । आहिक्य परत्र चाड नाहीं सर्वथा । जन्म सदा मज देईं । मायामोहपाश करीं विष तैसें । तुका म्हणे माझ्याठायीं ॥४॥

१७८८. नाम गोड नाम गोड । पुरे कोड सकळ ही ॥१॥ रसना येरां रसां विटे । घेतां घोट अधिक हें ॥२॥ आणिकां रसें मरण गांठीं । येणें तुटी संसारें ॥३॥ तुका म्हणे आहार जाला । हा विठ्ठल आम्हांसी ॥४॥

१७८९. धालों सुखें ढेंकर देऊं । उमटे जेवूं तोंवरी ॥१॥ क्रीडा करूं निरंजनीं । न पुरे धणी हरिसवें ॥२॥ अवघें खेळों अवघ्यामधीं । डाईं न पडो ऐसी बुद्धि ॥३॥ तुका म्हणे वांचवितां । आम्हा सत्ता समर्थ ॥४॥

१७९०. ऐकल्या नव्हे खेळ चांग । धरिला संग म्हणऊनि ॥१॥ उमटे तेव्हां कळे नाद । भेदाभेद निवडेना ॥२॥ दुसऱ्या परी एक ऐसा । न वजे रिसा निकुरेंही ॥३॥ तुका म्हणे कळत्यां कळे । येर खेळे खेळ म्हणो ॥४॥

१७९१. बोलविलें जेणें । तोचि त्याचें गुह्य जाणे ॥१॥ मी तो काबाडाचा धनी । जेवूं

मागावें थिंकोनि ॥२॥ मजुराच्या हातें । माप जालें गेलें रितें ॥३॥ जाला पुरविता । पांडुरंग माझा पिता ॥४॥ मायबापासवें । बाळें कौतुकें खेळावें ॥५॥ जैसा करिती धंदा । तैसा पडोनियां छंदा ॥६॥ त्याच्या साच गाई म्हैसी । येणें खेळावें मातीशीं । तुका म्हणे बोल । माझा बोलतो विठ्ठल ॥८॥

१७९२. कां हो तुम्ही माझी वदविली वाणी । नेदा हे निवडूनि पांडुरंगा ॥१॥ आणीक म्यां कोणां पुसावा विचार । समूळ संसार दुराविला ॥२॥ स्वामिसेवा म्हूण घेतलीं पदरीं । सांगितलें करी कारण तें ॥३॥ तुका म्हणे नाहीं शिकविलें जेणें । तो याच्या वचनें उगा राहे ॥४॥

१७९३. सेवकासी आज्ञा स्वामीची प्रमाण । जोंवरी हा प्राण जाय त्याचा ॥१॥ आणिकांचा धाक न धरावा मनीं । निरोपावचनीं ढळों नये ॥२॥ समय सांभाळुनी आगळें उत्तर । द्यावें भेदी वज्र तयापरी ॥३॥ तुका म्हणे तरी म्हणवावें सेवक । खादलें तें हाक अन्न होय ॥४॥

१७९४. नये पुसों आज्ञा केली एकसरें । आम्हांसी दुसरें नाहीं आतां ॥१॥ ज्याचा तो बळिवंत सर्व निवारिता । आम्हां काय चिंता करणें लागे ॥२॥ बुद्धीचा जनिता विश्वाचा व्यापक । काय नाहीं एक अंगीं तया ॥३॥ तुका म्हणे मज होईल वारिता । तरि काय सत्ता नाहीं हातीं ॥४॥

१७९५. बळिवंत आम्ही समर्थाचे दास । घातली या कास कळिकाळासी ॥१॥ तेथें माणसाचा कोण आला पाड । उल्लंघोनि जड गेलों आधीं ॥२॥ संसाराचे बळी साधिलें निधान । मारिले दुर्जन षडवर्ग ॥३॥ तुका म्हणे एक उरला धरिता ठाव । येर केले वाव तृणवत ॥४॥

१७९६. एक गावें आम्ही विठोबाचें नाम । आणीकांपें काम नाहीं आतां ॥१॥ मोडूनियां वाटा सुक्षम दुस्तर । केला राज्यभार चाले ऐसा ॥२॥ लावूनि मृदंग श्रुतिटाळघोष । सेवूं ब्रह्मरस आवडीनें ॥३॥ तुका म्हणे महापातकी पतित । ऐसियांचें हित हेळामात्रें ॥४॥

१७९७. वाचा चापल्यें बहु जालों कुशळ । नाहीं बीजमूळ हाता आलें ॥१॥ म्हणोनि पंढरिराया दु:खी होतें मन । अंतरींचें कोण जाणे माझें ॥२॥ पूज्य जालों अंगा आला अभिमान । पुढील कारण खोळंबलें ॥३॥ तुका म्हणे खूण न कळेचि निरुती । सांपडलों हातीं अहंकाराचे ॥४॥

१७९८. आतां काढाकाढी करीं गा पंढरिराया । नाहीं तरी वांयां गेलों दास ॥१॥ जाणतां बैसलों दगडाचे नावे । तिचा तो स्वभाव प्राण घ्यावा ॥२॥ मनाचा स्वभाव इंद्रियांची ओढी । पतनाचे जोडी वरीं हांव ॥३॥ तुका म्हणे जाली अंधळ्याची परी । आतां मज हरी वाट दावीं ॥४॥

१७९९. सज्जन तो शब्द सत्य जो मानी । छळी दुर्जन आणीकांसी ॥१॥ एक गुण तो केलासे दोंठायीं । ज्याचा त्यास पाहीं जैसा तैसा ॥२॥ भाविक शब्द बोले वाणीचा । लटिका वाचा वाचाळ तो ॥३॥ परउपकार घडे तोचि भला । नाठ्याळ तयाला दया नाहीं ॥४॥

जातीवंत तो पायरी जाणे । अधम तो नेणे खुंट जैसा ॥५॥ हित तें अनहित केलें कैसें । तुका म्हणे पिसें लागलें यासीं ॥६॥

१८००. तुझें नाम मुखीं न घेतां आवडी । जिव्हा तेचि घडी झडो माझी ॥१॥ हेंचि मज देईं हेंचि मज देईं । आणिक दुजें कांहीं न मगें तुज ॥२॥ बहिर कान तुझी कीर्ति नाइकतां । पाय न देखतां जावोत डोळे ॥३॥ मना तुझें ध्यान नाहीं नित्य काळ । धिग तें चांडाळ जळो जळो ॥४॥ हात पाय तेणें पंथें न चालतां । जावोत अनंता गळोनियां ॥५॥ तुजविण जिणे नाहीं मज चाड । तुका म्हणे गोड नाम तुझें ॥६॥

१८०१. म्हणसी होऊनी निश्चिंता । हरूनियां अवघी चिंता । मग जाऊं एकांता । भजन करूं । संसारसंभ्रमें आशा लागे पाठी । तेणें जीवासाटी होईल तुझ्या ॥१॥ सेकीं नाडसील नाडसील । विषयसंगें तूं अवघा नाडसील । मागुता पडसील भवडोहीं ॥२॥ शरीर सकळ मायेचा बांधा । यासी नाहीं कदा अराणूक । करिती तडातोडी अंतर्बाह्यात्कारीं । ऐसे जाती चारी दिवस वेगीं ॥३॥ मोलाची घडी जाते वांयांविण । न मिळे मोल धन देतां कोडी । जागा होईं करी हिताचा उपाय । तुका म्हणे हाय करिसी मग ॥४॥

१८०२. पांडुरंगे ये वो पांडुरंगे । जीवाचे जीवलगे ये वो पांडुरंगे ॥१॥ कनवाळू कृपाळू भक्तालागीं मोही । गजेंद्राचा धांवा तुंवा केला विठाई ॥२॥ भक्तांच्या कैवारें कष्टलीस विठ्ठले । आंबऋषीकारणें जन्म दहा घेतले ॥३॥ प्रल्हादाकारणें स्तंभीं अवतार केला । विदारूनि दैत्य प्रेमपान्हा पाजिला ॥४॥ उपमन्याकारणें कैसी धांवसी लवलाहीं । पाजी प्रेमपान्हा क्षीरसागराठायीं ॥५॥ कौरवीं पांचाळी सभेमाजी आणिली । वस्त्रहरणीं वस्त्रें कैसी जाली माउली ॥६॥ दुर्वास पातला धर्मा छळावया वनीं । धांवसी लवलाहीं शाखादेठ घेऊनि ॥७॥ कृपाळू माउली भुक्तिमुक्ति भांडार । करीं माझा अंगीकार तुका म्हणे विठ्ठले ॥८॥

१८०३. कवणाचें कारण नलगेचि कांहीं । सर्वी सर्वांठायीं तूं मज एक ॥१॥ कायावाचामन ठेविलें तुझ्या पायीं । आतां उरले काई न दिसे देवा ॥२॥ कवणा पाषाणासी धरुनियां भाव । कवणावरी पाव ठेवूं आतां ॥३॥ म्हणऊनि निश्चिंत राहिलों मनीं । तूंचि सर्वा खाणीं देखोनियां ॥४॥ जळे जळ काय धोविलें एक । कवण तें पातक हरलें तेथें ॥५॥ पापपुण्य हे वासना सकळ । ते तुज समूळ समर्पिली ॥६॥ पितरस्वरूपी तूंचि जनार्दन । सव्य तें कवण अपसव्य ॥७॥ तुका म्हणे जीव पिंड तुझे हातीं । देऊनि निश्चिंती मानियेली ॥८॥

१८०४. सिणलों दातारा करितां वेरझारा । आतां सोडवीं संसारापासोनियां ॥१॥ न सुटेचि बाकी नव्हें झाडापाडा । घातलोंसें खोडा हाडांचिया ॥२॥ मायबापें माझीं जीवांची सांगाती । तीं देतील हातीं काळाचिया ॥३॥ पडताळूनि सुरी बैसली सेजारीं । यमफांसा करीं घेऊनियां ॥४॥

पाठीं पोटीं एकें लागलीं सरसीं । नेती नरकापाशीं ओढोनियां ॥५॥ जन साह्यभूत असे या सकळां । मी एक निराळा परदेशी ॥६॥ कोणा काकुलती नाहीं कोणे परी । तुजविण हरी कृपाळुवा ॥७॥ तुका म्हणे मज तुझाची भरंवसा । म्हणवूनि आशा मोकलिली ॥८॥

१८०५. देवाचा भक्त तो देवासीच गोड । आणिकांसी चाड नाहीं त्याची ॥१॥ कवणाचा सोइरा नव्हेच सांगाती । अवघियां हातीं अंतरला ॥२॥ निष्काम वेडें म्हणती बापुडें । अवघियां सांकडें जाला कैसा ॥३॥ माझें ऐसें तया न म्हणती कोणी । असे रानीं वनीं भलते ठायीं ॥४॥ प्रात:स्नान करी विभूतिचर्चन । देखोनियां जन निंदा करी ॥५॥ कंठीं तुळसीमाळा बैसोनि निराळा । म्हणती या चांडाळा काय जालें ॥६॥ गातां शंका नाहीं बैसे भलते ठायीं । शिव्या देती आईबाप भाऊ ॥७॥ घरी बाइल म्हणे कोठें व्याली रांड । बरें होतें षंढ मरता तरी ॥८॥ जन्मोनि जाला अवघियां वेगळा । म्हणोनि गोपाळा दुर्लभ तो ॥९॥ तुका म्हणे जो संसारा रुसला । तेणेचि ठाकिला सिद्धपंथ ॥१०॥

१८०६. कस्तुरी भिनली जये मृत्तिकेसी । तये आणिकासी कैसी सरी ॥१॥ लोखंडाचे अंगीं लागला परिस । तया आणिकास कैसी सरी ॥२॥ तुका म्हणे मी नवजें यातीवरी । पूज्यमान करी वैष्णवासी ॥३॥

१८०७. अनुहात ध्वनि वाहे सकळां पिंडीं । राम नाहीं तोंडीं कैसा तरे ॥१॥ सकळां जीवामाजी देव आहे खरा । देखिल्या दुसरा विण न तरे ॥२॥ ज्ञान सकळांमाजी आहे हें साच । भक्तीविण तेंच ब्रह्म नव्हे ॥३॥ काय मुद्रा कळल्या कराव्या सागतां । दीप न लागतां उन्मनीचा ॥४॥ तुका म्हणे नका पिंडाचें पाळण । स्थापूं नारायण आतुडेना ॥५॥

१८०८. नेणें अर्थ कांहीं नव्हती माझे बोल । विनवितों कोपाल संत झणीं ॥१॥ नव्हती माझे बोल बोले पांडुरंग । असे अंगसंगें व्यापूनियां ॥२॥ मज मूढा शक्ति कैंचा हा विचार । निगमादिकां पार बोलावया ॥३॥ राम कृष्ण हरी मुकुंदा मुरारी । बोबड्या उत्तरीं हेंचि ध्यान ॥४॥ तुका म्हणे गुरुकृपेचा आधार । पांडुरंगे भार घेतला माझा ॥५॥

१८०९. देवासी लागे सकळांसी पोसावें । आम्हां नलगे खावें काय चिंता ॥१॥ देवा विचारावें लागे पापपुण्य । आम्हांसी हें जन अवघें भलें ॥२॥ देवासी उत्पत्ति लागला संहार । आम्हां नाहीं फार थोडें कांहीं ॥३॥ देवासी काम लागला धंदा । आम्हांसी ते सदा रिकामीक ॥४॥ तुका म्हणे आम्ही भले देवाहून । विचारितां गुण सर्वभावें ॥५॥

१८१०. घेईन मी जन्म याजसाठीं देवा । तुझी चरणसेवा साधावया ॥१॥ हरिनामकीर्तन संतांचें पूजन । घालूं लोटांगण महाद्वारीं ॥२॥ आनंदे निर्भर असों भलते ठायीं । सुखदु:खा नाहीं चाड आम्हां ॥३॥ आणीक सायास न करीं न धरीं आस । होईन उदास सर्व भावें ॥४॥

मोक्ष आम्हां घरीं कामारी ते दासी। होय सांगों ऐसी तुका म्हणे ॥५॥

१८११. देवा तुज मज पण। पाहों आगळा तो कोण ॥१॥ तरी साच मी पतित। तूंच खोटा दीनानाथ। वाही साधुसंत जन। करून अंगीं लावीन ॥२॥ आम्ही धरिले भेदाभेद। तुज नव्हे त्याचा छेद ॥३॥ आम्हीं बळकाविले दोष। न चले तुझें कांहीं त्यास ॥४॥ दिशा भरल्या माझ्या मनें। लपालासी त्याच्या भेणें ॥५॥ तुका म्हणे चित्त। करी तुझी माझी नीत ॥६॥

१८१२. लापणिकशब्दें नातुडे हा देव। मनिंचा गुह्य भाव शुद्ध बोला ॥१॥ अंतरिंचा भेद जाणे परमानंद। जयासी संवाद करणें लागे ॥२॥ तुका म्हणे जरी आपुलें स्वहित। तरी करीं चित्त शुद्ध भावें ॥३॥

१८१३. नव्हे ब्रह्मज्ञान बोलतां हें सिद्ध। जंव हा आत्मबोध नाहीं चित्तीं ॥१॥ काय करिसी वांयां लटिकाचि पाल्हाळ। श्रम तो केवळ जाणिवेचा ॥२॥ मीच देव ऐसें सांगसी या लोकां। विषयांच्या सुखा टाकोनियां ॥३॥ अमृताची गोडी पुढिलां सांगसी। आपण उपवासी मरोनियां ॥४॥ तुका म्हणे जरि राहील तळमळ। ब्रह्म तें केवळ सदोदित ॥५॥

१८१४. गंगाजळा पाहीं पाठी पोट नाहीं। अवगुण तो कांहीं अमृतासी ॥१॥ रवि दीप काळिमा काय जाणे हिरा। आणिकां तिमिरा नाश तेणें ॥२॥ कर्पूरकांडणी काय कोंडा कणी। सिंधू मेळवणी काय चाले ॥३॥ परिस चिंतामणि आणिकाचा गुणी। पालटे लागोनि नव्हे तैसा ॥४॥ तुका म्हणे तैसे जाणा संतजन। सर्वत्र संपूर्ण गगन जैसें ॥५॥

१८१५. परिस काय धातु सोनें न करितु। फेडितो निभ्रांतु लोहपांगु ॥१॥ काय तयाहूनि जालासी बापुडें। फेडितां सांकडें माझें एक ॥२॥ कल्पतरु कोड पुरवितो रोकडा। चिंतामणि खडा चिंतिलें तें ॥३॥ चंदनाच्या वासें वसतां चंदन। होती काष्ठ आन वृक्षयाती ॥४॥ काय त्यांचें उणें जालें त्यासी देतां। विचारीं अनंता तुका म्हणे ॥५॥

१८१६. तोडुनि पुष्पवटिका फळवृक्षयाती। बाभुळा राखिती करूनि सार ॥१॥ कोण हित तेणें देखिलें आपुलें। आणीक पाहिलें सुख काई ॥२॥ धान्य बीजें जेणें जाळोनि सकळें। पेरितों काळें जिरें बीज ॥३॥ मोडोनिया वाटा पुढिलांची सोय। आडरानें जाय घेउनि लोकां ॥४॥ विषाचें अमृत ठेवूनियां नाम। करितो अधम ब्रह्महत्या ॥५॥ तुका म्हणे त्यास नाइके सांगतां। तया हाल करितां पाप नाहीं ॥६॥

१८१७. संसाराच्या भेणें। पळों न लाहेसें केलें ॥१॥ जेथें तेथें आपण आहे। आम्हीं करावें ते काय ॥२॥ एकांतासी ठाव। तिहीं लोकीं नाहीं वाव ॥३॥ गांवा जातो ऐसें। नलगे म्हणावें तें कैसे ॥४॥ स्वप्नाचिये परी। जागा पाहे तंव घरीं ॥५॥ तुका म्हणे काय। तुझें घेतलें म्यां आहे ॥६॥

१८१८. आपण काय सादर । विशीं आम्हां कां निष्ठुर ॥१॥ केले भक्त तैसें देई । तुझें प्रेम माझ्या ठायीं ॥२॥ काय पंगतीस कोंडा । एकांतासी साकरमांडा ॥३॥ काय एकपण । पोतां घालूनि गांठी खूण ॥४॥ काय घ्यावें तैसें । तया आपण अनारिसें ॥५॥ तुका म्हणे मधीं । आतां तोडूं भेद बुद्धी ॥६॥

१८१९. चित्त तुझ्या पायीं । ठेवुनि जालों उतराई ॥१॥ परि तूं खोटा केशीराजा । अंतपार न कळे तुझा ॥२॥ आम्हीं सर्वस्वें उदार । तुज देऊनि वेव्हार ॥३॥ इंद्रियांची होळी । संवसार दिला बळी ॥४॥ न पडे विसर । तुझा आम्हां निरंतर ॥५॥ प्रेम एकासाटीं । तुका म्हणे न वेचे गांठीं ॥६॥

१८२०. आम्ही पतित म्हणोनि तुज आलों शरण । करितों चिंतन दिवस रात्रीं । नाहीं तरी मज काय होती चाड । धरावया भीड तुझी चित्तीं ॥१॥ आम्हां न तारावें तुम्ही काय करावें । सांगीजो जी भावें नारायणा ॥२॥ अन्याय कोणाचा अंगीकार करणें । तया हातीं देणें लाज तेचि । काय तें शूरत्व मिरवूनि बोलणें । जनामाजी दावणें बळ रया ॥३॥ पोह्या अन्नछत्र घालूनियां घरीं । दंडितो बाहेरी आलियासी । नव्हे कीर्ती कांहीं न मानेचि लोकां । काय विटंबना तैसी तैसी ॥४॥ प्रत्यक्षासी काय द्यावें गा प्रमाण । पाहातां दर्पण साक्ष काई । तुका म्हणे तरी आम्हां कां न कळे । तरलों किंवा आम्ही नाहीं ॥५॥

१८२१. काग बग रिठा मारिले बाळपणीं । अवघी दैत्यखाणी बुडविली ॥१॥ तो मज दावा तो मज दावा । नंदानंदन जीवा आवडे तो ॥२॥ गोवर्धन गिरी उचलिला करीं । गोकुळ भीतरीं राखियेलें ॥३॥ वधुनि भौमासुरा आणिल्या गोपांगना । राज्य उग्रसेना मथुरेचें ॥४॥ पांडव जो हरीं राखिले कुसरी । विवराभीतरीं चालविलें ॥५॥ तुका म्हणे तो हा भक्तांचा कृपाळ । दुष्ट जना काळ नारायण ॥६॥

१८२२. तुजविण देवा । कोणा म्हणे माझी जिव्हा ॥१॥ तरि हो कां शतखंड । पडो झडोनियां रांड ॥२॥ कांहीं इच्छेसाठीं । करिल वळवळ करंटी ॥३॥ तुका म्हणे कर । कटीं तयाचा विसर ॥४॥

१८२३. आम्हां सर्वभावें हेंचि काम । न विसंबावें तुझें नाम ॥१॥ नलगे करावी हे चिंता । तरणें करणें काय आतां ॥२॥ आसनीं भोजनीं शयनीं । दुजे नाहीं ध्यानीं मनीं ॥३॥ तुका म्हणे कृपानिधी । माझी तोडिली उपाधी ॥४॥

१८२४. नव्हे कांही कवणाचा । भाव जाणवला साचा ॥१॥ म्हणोनि तुझ्या पायीं । जीव ठेविला निश्चयीं ॥२॥ शरीर जायाचें कोंपट । याची काय खटपट ॥३॥ तुका म्हणे वांयावीण । देवा कळों आला सीण ॥४॥

१८२५. नेघें तुझें नाम । न करीं सांगितलें काम ॥१॥ वाढे वचनें वचन । दोष उच्चारितां गुण ॥२॥ आतां तुझ्या घरा । कोण करी येरझारा ॥३॥ तुका म्हणे ठायीं । मजपाशीं काय नाहीं ॥४॥

१८२६. रज्जु धरूनियां हातीं । भेडसाविलीं नेणतीं । कळों येतां चित्तीं । दोरी दोघां सारिखी ॥१॥ तुम्हांआम्हांमध्यें हरी । जाली होती तैसी परी । मृगजळाचे पुरीं । ठाव पाहों तरावया ॥२॥ सरी चिताकभोंवरीं । अळंकाराचिया परी । नामें जालीं दुरी । एक सोनें आटितां ॥३॥ पिसांचीं पारवीं । करोनि बाजेगिरी दावी । तुका म्हणे तेवीं । मज नको चाळवूं ॥४॥

१८२७. व्यवहार तो खोटा । आतां नवजों तुझ्या वाटा ॥१॥ एका नामा नाहीं ताळा । केली सहस्त्रांची माळा ॥२॥ पाहों जातां ठायीं । खेळसील लपंडाई ॥३॥ तुका म्हणे चार । बहु करितोसी फार ॥४॥

१८२८. लटिकाचि केला । सोंग पसारा दाविला ॥१॥ अवघा बुडालासी ऋणें । बहुतांचें देणें घेणें ॥२॥ लावियेला चाळा । बहु दावूनि पुतळा ॥३॥ तुका म्हणे हात । आम्हीं अवरिली मात ॥४॥

१८२९. दाखवूनि आस । केला बहुतांचा नास ॥१॥ थोंटा झोंडा शिरोमणी । भेटलासी नागवणी ॥२॥ सुखाचें उत्तर । नाहीं मुदलासी थार ॥३॥ तुका म्हणे काय । तुझें घ्यावें उरे हाय ॥४॥

१८३०. ठाव नाहीं बुड । घरें वसविसी कुड ॥१॥ भलते ठायीं तुझा वास । सदा एरवीं उदास ॥२॥ जागा ना निजला । होसी धाला ना भुकेला ॥३॥ न पुसतां भलें । तुका म्हणे तुझे बोलें ॥४॥

१८३१. लाज ना विचार । बाजारी तूं भांडखोर ॥१॥ ऐसें ज्याणें व्हावें । त्याची गांठी तुजसवें ॥२॥ फेडिसी लंगोटी । घेसी सकळांसी तुटी ॥३॥ तुका म्हणे चोरा । तुला आप ना दुसरा ॥४॥

१८३२. श्वाना दिली सवे । पायांभोंवतें तें भोवे ॥१॥ तैसी जाली मज परी । वसें निकट सेजारीं ॥२॥ जेवितां जवळी । येऊनियां पुस घोळी ॥३॥ कोपेल तो धणी । तुका म्हणे नेणें मनीं ॥४॥

१८३३. वटवट केली । न विचारितां मना आली ॥१॥ मज कराल तें क्षमा । कैसें नेणों पुरुषोत्तमा ॥२॥ उचित न कळे । जिव्हा भलतेंचि बरळे ॥३॥ तुका म्हणे कांहीं । लौकिकाची चाड नाहीं ॥४॥

१८३४. जीवें व्हावें साटी । पडे संवसारें तुटी ॥१॥ ऐसी बोलिलों वचनें । सवें घेउनि नारायण ॥२॥ येणें नाहीं जाणें । केलें कोणा न मागणें ॥३॥ नाहीं जन्मा आलों ।

करील ऐसें नेदी बोलों ॥४॥ ठाव पुसी सेणें। तुका म्हणे खुंटी येणें ॥५॥

१८३५. आतां पंढरीराया । माझ्या निरसावें भया ॥१॥ मनीं राहिली आशंका । स्वामिभयाची सेवका ॥२॥ ठेवा माथां हात। कांहीं बोला अभयमात ॥३॥ तुका म्हणे लाडें। खेळें ऐसें करा पुढें ॥४॥

१८३६. कवतुकवाणें । बोलों बोबड्या वचनें ॥१॥ हें तों नसावें अंतरीं । आम्हां धरायाचें दुरी ॥२॥ स्तुति तैसी निंदा । माना समचि गोविंदा ॥३॥ तुका म्हणे बोलें । मज तुम्हीं शिकविलें ॥४॥

१८३७. असो मागें जालें। पुढें गोड तें चांगलें ॥१॥ आतां माझे मनीं। कांहीं अपराध न मनीं ॥२॥ नेदी अवसान । करितां नामाचें चिंतन ॥३॥ तुका म्हणे बोलें । तुज आधींच गोविलें ॥४॥

१८३८. मातेविण बाळा। आणीक न माने सोहळा ॥१॥ तैसें जालें माझ्या चित्ता। तुजविण पंढरीनाथा ॥२॥ वाट पाहे मेघा बिंदु । नेघे चातक सरिता सिंधू ॥३॥ सारसाशीं निशीं। ध्यान रवीच्या प्रकाशीं ॥४॥ जीवनावीण मत्स्य। जैसें धेनूलागीं वत्स ॥५॥ पतिव्रते जिणें। भ्रताराच्या वर्तमानें ॥६॥ कृपणाचें धन । लोभ्यालागीं जैसें मन ॥७॥ तुका म्हणे काय। तुजविण प्राण राहे ॥८॥

१८३९. तुज ऐसा कोणी न देखें उदार। अभयदानशूर पांडुरंगा ॥१॥ शरण येती त्यांचे न विचारिसी दोष। मागतां त्यांस अढळ देसी ॥२॥ धांवसी आडणी ऐकोनियां धांवा। कइवारें देवा भक्तांचिया ॥३॥ दोष त्यांचे जाळी कल्पकोटिवरी। नामासाटीं हरि आपुलिया ॥४॥ तुका म्हणे तुज वाणूं कैशा परी। एक मुख हरी आयुष्य थोडें ॥५॥

१८४०. काय तुझे उपकार पांडुरंगा। सांगों मी या जगामाजी आतां ॥१॥ जतन हें माझें करूनि संचित। दिलें अवचित आणूनियां ॥२॥ घडल्या दोषांचे न घलींच भरी। आली यास थोरी कृपा देवा ॥३॥ नव्हतें ठाऊकें आइकिलें नाहीं। न मागतां पाहीं दान दिलें ॥४॥ तुका म्हणे याच्या उपकारासाटीं। नाहीं माझें गांठी कांहीं एक ॥५॥

१८४१. वाळूनियां जन सांडी मज दुरी। करिसील हरी ऐसें कधीं ॥१॥ आठवीन पाय धरूनि अनुताप। वाहे जळ झोंप नाही डोळां ॥२॥ नावडती जीवा आणीक प्रकार। आवडी ते फार एकांताची ॥३॥ तुका म्हणे ऐसी धरितों वासना। होईं नारायणा साह्य मज ॥४॥

१८४२. सांगतों या मना तें माझें नाइकें। घातावरी टेंके चांडाळ हें ॥१॥ म्हणऊनि पाहे तरतें बुडतें। न लाहे पुरतें बळ करूं ॥२॥ काय तें संचित न कळे पाहातां। मतिमंदचिंता उपजते ॥३॥ तुका म्हणे ऐसें बळ नाहीं अंगीं। पावोनियां वेगीं पार ठाकीं ॥४॥

१८४३. आतां नको चुकों आपुल्या उचिता। कृपाळुवा कांता रखुमाईच्या ॥१॥ आचरावे दोष हें आम्हां उचित। तारावे पतित तुमचें तें ॥२॥ आम्ही तों आपुलें केलेंसें जतन। घडो तुम्हांकून घडेल तें ॥३॥ तुका म्हणे विठो चतुराच्या राया। आहे तें कासया मोडों देसी ॥४॥

१८४४. मुखें बोलावें तें जीविंचें जाणसी। विदित पायांपाशीं सर्व आहे ॥१॥ आतां हेंचि भलें भाकावी करुणा। विनियोग तो जाणां तुम्ही याचा ॥२॥ आपलें तों येथें केलें नव्हे कांहीं। साधनाच्या वाहीं पडों नये ॥३॥ तुका म्हणे देह दिला पिंडदान। वेळोवेळां कोण चिंता करी ॥४॥

१८४५. कामातुरा भय लाज ना विचार। शरीर असार तृणतुल्य ॥१॥ नवल हे लीळा कर्त्याचें लाघव। प्रारब्धें भाव दाखविले ॥२॥ लोभालोभ एका धनाचिये ठायीं। आणिकांची सोई चाड नाहीं ॥३॥ तुका म्हणे भूक न विचारी प्रकार। योजे तेंचि सार यथाकाळें ॥४॥

१८४६. बांधी सोडी हें तों धन्याचिये हातीं। हेंकड गोविती आपणां बळें ॥१॥ भुललियासी नाहीं देहाचा आठव। धोतऱ्यानें भाव पालटिला ॥२॥ घरांत रिघावें दाराचिये सोई। भिंतीसवें डोई घेऊनि फोडी ॥३॥ तुका म्हणे देवा गेलीं विसरोन। आतां वर्म कोण दावी यांसी ॥४॥

१८४७. कवण जन्मता कवण जन्मविता। न कळे कृपावंता माव तुझी ॥१॥ कवण हा दाता कवण हा मागता। न कळे कृपावंता माव तुझी ॥२॥ कवण भोगिता कवण भोगविता। न कळे कृपावंता माव तुझी ॥३॥ कवण ते रूपता कवण अरूपता। न कळे कृपावंता माव तुझी ॥४॥ सर्वां ठायीं तूंचि सर्वही जालासी। तुका म्हणे यासी दुजें नाहीं ॥५॥

१८४८. जेथें देखें तेथें तुझींच पाऊलें। विश्व अवघें कोंदाटलें ॥ रूप गुण नाम अवघा मेघश्याम। वेगळें तें काय उरलें ॥ जातां लोटांगणीं अवघीच मेदिनी। सकळ देवपाट जालें ॥ सदा सर्वकाळ सुदिन सवेळ। चित्त प्रेमें असे धालें ॥१॥ अवघा आम्हां तूंच जालासी देवा। संसार हेवा काम धंदा ॥ नलगे जाणें कोठें कांहींच करणें। मुखी नाम ध्यान सदा ॥२॥ वाचा बोले ते तुझेचि गुणवाद। मंत्रजप कथा स्तुति ॥ भोजन सारूं ठायीं फल तांबूल कांहीं। पूजा नैवेद्य तुज होती ॥ चालतां प्रदक्षिणा निद्रा लोटांगण। दंडवत तुजप्रति ॥ देखोनि दृष्टी परस्परें गोष्टी। अवघ्या तुझ्या मूर्ति ॥३॥ जाल्या तीर्थरूप बावी नदी कूप। अवघें गंगाजळ जालें ॥ महाल मंदिरें माड्या तनघरें। झोंपड्या अवघीं देव देवाइलें ॥ ऐकें कानीं त्या हरिनामध्वनी। नाना शब्द होत जाले ॥ तुका म्हणे आम्ही या विठोबाचे दास। सदा प्रेमसुखें धालों रे ॥४॥

१८४९. जे दोष घडले न फिटे करितां कांहीं। सरते तुझ्या पायीं जाले तैसे ॥१॥ माझा कां हो करूं नये अंगीकार। जालेती निष्ठुर पांडुरंगा ॥२॥ यातिहीन नये ऐकों ज्यां वेद। तयां दिलें पद वैकुंठींचें ॥३॥ तुका म्हणे कां रे एकाचा आभार। घेसी माथां भार वाहोनियां ॥४॥

१८५०. हरिकथेची आवडी देवा । करितो सेवा दासांची ॥१॥ म्हणोनि हिंडे मागें मागें । घरटी जागे घालितसे ॥२॥ निर्लज्ज भोजें नाचे रंगीं । भरतें अंगीं प्रेमाचें ॥३॥ तुका म्हणे विकलें देवें । आपणा भावें संवसाटी ॥४॥

१८५१. साधन संपत्ति हेंचि माझें धन । सकळ चरण विठोबाचे ॥१॥ शीतळ हा पंथ माहेराची वाट । जवळीच नीट सुखरूप ॥२॥ वैष्णवांचा संग रामनाम गाणें । मंडित भूषणें अळंकार ॥३॥ भवनदी आड नव्हतीसी जाली । कोरडीच चाली जावें पायीं ॥४॥ मायबाप दोघें पाहातील वाट । ठेवूनियां कटीं कर उभीं ॥५॥ तुका म्हणे केव्हां देखेन कळस । पळाली आळस निद्रा भूक ॥६॥

१८५२. यथार्थवादें तुज न वर्णवे कदा । बोलतों ते निंदा करितों तुझी ॥१॥ वेदश्रुति तुज नेणती कोणी । चोवीस ठेंगणीं धांडोळितां ॥२॥ आतां मज क्षमा करावें तें देवा । सलगी ते केशवा बोलियेलों ॥३॥ सगुण कीं साकार निर्गुण कीं निराकार । न कळे हा पार वेदश्रुतीं ॥४॥ तो आम्हीं भावें केलासी लहान । ठेवूनियां नांवें पाचारितों ॥५॥ सहस्त्रमुखें शेष सीणला स्तवितां । पार न कळतां ब्रह्मा ठेला ॥६॥ तेथें माझी देहबुद्धि ते काई । थोर मी अन्यायी तुका म्हणे ॥७॥

१८५३. कृष्ण ध्यातां चित्तीं कृष्ण गातां गीतीं । तेही कृष्ण होती कृष्णध्यानें ॥१॥ आसनीं शयनीं भोजनीं जेवितां । म्हणा रे भोगितां नारायण ॥२॥ ओळिये दळणीं गावा नारायण । कांडितां कांडण करितां काम ॥३॥ नर नारी याति हो कोणी भलतीं । भावें एका प्रती नारायणा ॥४॥ तुका म्हणे एका भावें भजा हरी । कांति ते दुसरी रूप एक ॥५॥

१८५४. डोळियां पाझर कंठ माझा दाटी । येईं वो देईं भेटी पांडुरंगे ॥१॥ बहु दिस टाकिलें कां निरास केलें । कोठें वो गुंतलें चित्त तुझें ॥२॥ बहु धंदा तुज नाहीं वो आठव । राहिलासे जीव माझा कंठीं ॥३॥ पंढरीस जाती वारकरी संतां । निरोप बहुतां हातीं धाडीं ॥४॥ तुजविण कोण सांवा धांवा करी । येईं वो झडकरी पांडुरंगे ॥५॥ काय तुझी वाट पाहों कोठवरी । कृपाळुवा परी विसरलासी ॥६॥ एक वेळे माझा धरूनि आठव । तुका म्हणे ये वो न्यावयासी ॥७॥

१८५५. काय करूं या मना आतां । कां विसरतें पंढरिनाथा ॥ करि संसाराची चिंता । वेळोवेळां मागुती ॥१॥ अधिक कोंडितां चरफडी । भलतीकडे घाली उडी ॥२॥ भजन नावडे श्रवण । धांवे विषय अवलोकून ॥३॥ बहुत चंचळ चपळ । जातां येतां नलगे वेळ ॥४॥ किती राखों दोनी काळ । निजलिया जागे वेळ ॥५॥ मज राखें आतां । तुका म्हणे पंढरिनाथा ॥६॥

१८५६. कंथा प्रावर्ण । नव्हे भिक्षेचें तें अन्न ॥१॥ करीं यापरी स्वहित । विचारूनि धर्म नीत ॥२॥ देऊळ नव्हे घर । प्रपंच परउपकार ॥३॥ विधिसेवन काम । नव्हे शब्द रामराम ॥४॥

हत्या क्षात्रधर्म। नव्हे निष्काम तें कर्म ॥५॥ तुका म्हणे संतीं। करूनि ठेविली आइती ॥६॥

१८५७. पडोनियां राहीं। उगाच संतांचिये पायीं ॥१॥ नलगे पुसणें सांगावें। चित्त शुद्ध करी भावें ॥२॥ सहज ते स्फीती। उपदेश पर युक्ति ॥३॥ तुका म्हणे भाव। जवळी धरूनि आणी देव ॥४॥

१८५८. देवाचे घरीं देवें केली चोरी। देवें देव नागवूनि केला भिकारी ॥१॥ धांवणियां धांवा धांवणियां धांवा। मागचि नाहीं जावें कवणिया गांवा ॥२॥ सवेंचि होता चोर घरिचिया घरीं। अवघें केलें वाटोळें फांवलियावरी ॥३॥ तुका म्हणे येथें कोणीच नाहीं। नागवलें कोण गेलें कोणाचें काई ॥४॥

१८५९. जतन करा रे जतन करा। घालूं पाहे घरावरी घाला चोरटें ॥१॥ अवघेचि निजों नका अवघिये ठायीं। वेळ अवेळ तरी सांभाळावी कांहीं ॥२॥ सींतरलीं फार खाती भोंवताले फेरे। गेलें नये हाता सेकीं तळमळ उरे ॥३॥ तुका म्हणे आम्हीं करूं आपुलें जतन। नलगे कांहीं कोणां द्यावें उघडारे कान ॥४॥

१८६०. काळोखी खाऊन कैवाड केला धीर। आपुलिया हितें जाले जनामध्यें शूर ॥१॥ कां रे तुम्हीं नेणां कां तुम्हीं नेणां। अल्पसुखासाठीं पडशी विपत्तीचे घाणां ॥२॥ नाहीं ऐसी लाज काय तयांपें आगळें। काय नव्हे केलें आपुलिया बळें ॥३॥ तुका म्हणे तरी सुख अवघेंचि बरें। जतन करूं हीं आपुलालीं ढोरें ॥४॥

१८६१. जाय परते काय आणिला कांटाळा। बोला एक वेळा ऐसें तरी ॥१॥ कां हो केली तुम्ही निष्ठुरता देवा। मानेना हे सेवा करितों ते ॥२॥ भाग्यवंत त्यांसी सांगितल्या गोष्टी। तें नाहीं अदृष्टीं आमुचिया ॥३॥ तुका म्हणे तुम्हापासूनि अंतर। न पडे नाहीं स्थिर बुद्धि माझी ॥४॥

१८६२. अनुभवें कळों येतें पांडुरंगा। रुसावें तें कां गा तुम्हांवरी ॥१॥ आवरितां चित्त नावरे दुर्जन। घात करी मन माझें मज ॥२॥ अंतरीं संसार भक्ति बाह्यात्कार। म्हणोनि अंतर तुझ्या पायीं ॥३॥ तुका म्हणे काय करूं नेणें वर्म। आलें तैसें कर्म सोसूं पुढें ॥४॥

१८६३. तुजकरितां होतें आनाचें आन। तारिले पाषाण उदकीं देवा ॥१॥ कां नये कैवार करूं अंगीकार। माझा बहु भार जड जाला ॥२॥ चुकलासी म्हणों तरी जीवांचाही जीव। रिता नाहीं ठाव उरों दिला ॥३॥ तुका म्हणे ऐसें काय सत्ताबळ। माझें परी कृपाळ आम्हां तुम्ही ॥४॥

१६६४. फळ देंठींहून झडे। मग मागुतें न जोडे ॥१॥ म्हणउनि तांतडी खोटी। कारण उचिताचे पोटीं ॥२॥ पुढें चढे जरी हात। त्याग मागिलां उचित ॥३॥ तुका म्हणे रणीं। नये पाहो परतोनि ॥४॥

१८६५. आगी देखोनियां सती। अंगीं रोमांच उठती ॥१॥ हा तो नव्हे उपदेश। सुख

अंतरीं उल्हास ॥२। वित्तगोतांकडे । चित्त न घलीं न रडे ॥३॥ आठवूनि एका । उडी घाली म्हणे तुका ॥४॥

१८६६. फळ पिके देंठीं । निमित्य वारियाची भेटी ॥१। हा तों अनुभव रोकडा । कळों येतो खरा कुडा ॥२॥ तोडलियां बळें । वांयां जाती काची फळें ॥३॥ तुका म्हणे मन । तेथें सकळ कारण ॥४॥

१८६७. हालवुनि खुंट । आधीं करावा बळकट ॥१॥ मग तयाच्या आधारें । करणें तें अवघें बरें ॥२॥ सुखदुःख साहे । हर्षामर्षी भंगा नये ॥३॥ तुका म्हणे जीवें । आधीं मरोनि राहावें ॥४॥

१८६८. धांवे माते सोई । बाळ न विचारितां कांहीं ॥१॥ मग त्याचें जाणें निकें । अंग वोढवी कौतुकें ॥२॥ नेणें सर्प दोरी । आगी भलते हातीं धरी ॥३॥ तीविणें तें नेणें । आणीक कांही तुका म्हणे ॥४॥

१८६९. भोग द्यावे देवा । त्याग भोगींच बरवा ॥१॥ आपण व्हावें एकीकडे । देव कळेवरी जोडे ॥२॥ योजें यथाकाळें । उत्तम पाला कंद मुळें ॥३॥ वंचकासी दोष । तुका म्हणे मिथ्या सोस ॥४॥

१८७०. पायांच्या प्रसादें । कांहीं बोलिलों विनोदें ॥१। मज क्षमा करणें संतीं । नव्हे अंगभूत युक्ति ॥२॥ नव्हे हा उपदेश । तुमचें बडबडिलों शेष ॥३॥ तुमचे कृपेचें पोसणें । जन्मोजन्मीं तुका म्हणे ॥४।

१८७१. जायाचें अंगुलें लेतां नाहीं मान। शोभा नेदी जन हांसविलें ॥१॥ घुसळितां ताक कांडितां भूस । साध्य नाहीं क्लेश जाती वांयां ॥२॥ तुका म्हणे नाहीं स्वता भांडवल । भिकेचें तें फोल बीज नव्हे ॥३॥

१८७२. न बोलावें परी पडिला प्रसंग। हाकलितें जग तुझ्या नामें ॥१॥ लटिकेंचि सोंग मांडिला पसारा। भिकारी तूं खरा कळों आलें ॥२॥ निलाजिरीं आम्ही करोनियां धीर। राहिलों आधार धरूनियां ॥३॥ कैसा नेणों आतां करिसी शेवट । केली कटकट त्याची पुढें ॥४॥ तुका म्हणे कांहीं न बोलसी देवा। उचित हे सेवा घेसी माझी ॥५॥

१८७३. नाहीं जालें मोल कळे देतां काळीं। कोण पाहों बळी दोघांमध्ये ॥१॥ आम्ही तरी जालों जीवासी उदार। कैंचा हा धीर तुजपाशीं ॥२॥ बहु चाळविलें मागें आजिवरी। आतां पुढें हरी जाऊं नेदीं ॥३॥ नव्हती जों भेटी नामाची ओळखी । म्हणऊनि दुःखी बहु जालों ॥४॥ तुका म्हणे कांहीं राहों नेदीं बाकी। एक वेळां चुकी जाली आतां ॥५॥

१८७४. कैसा कृपाळु हें न कळसी देवा। न बोलसी सेवा घेसी माझी ॥१॥ काय ऐसें बळ

आहे तुजपाशीं । पाहों हरी घेसी कोणा आड ॥२॥ पाडियेला ठायीं तुझा थारा मारा । अवघा दातारा लपसी तो ॥३॥ आतां तुम्हां आम्हां उरी तोंचि बरें । काय हीं उत्तरें वाढवूनि ॥४॥ तुका म्हणे मज साह्य जाले संत । म्हणऊनि मात फावली हे ॥५॥

१८७५. चुकलियां आम्हां करितसां दंड । हक्कासी कां खंड पांडुरंगा ॥१॥ चाळविलीं एकें रिद्धिसिद्धीवरी । तैसा मी भिकारी नव्हें देवा ॥२॥ कां मी येथें गुंतों मांडूनि पसारा । मागुता दातारा दंभासाठीं ॥३॥ केलें म्यां जतन आपुलें वचन । ठायींचें धरून होतों पोटीं ॥४॥ तुका म्हणे ताळा घातला आडाखीं । ठावें होतें सेकीं आडविसी ॥५॥

१८७६. कृपावंता कोप न धरावा चित्तीं । छळूं वक्रोक्ति स्तुती करूं ॥१॥ आम्ही तुझा पार काय जाणों देवा । नेणों कैसी सेवा करावी ते ॥२॥ अनंता अरूपा अलक्षा अच्युता । निर्गुणा सच्चिता सर्वोत्तमा ॥३॥ चांगलीं हीं नामें घेतलीं ठेवून । जालासी लाहान भक्तिकाजा ॥४॥ तुका म्हणे तुझ्या पायांवरी सदा । मस्तक गोविंदा असो माझा ॥५॥

१८७७. आतां तुझा भाव कळों आला देवा । ठकूनियां सेवा घेसी माझी ॥१॥ टाकूनि सांकडें आपुलिये माथां । घातला या संतांवरी भार ॥२॥ स्तुती करूनीयां पिटिला डांगोरा । तें कोण दातारा साच करी ॥३॥ जातींचे वाणी मी पोटींचें कुडें । नका मजपुढें ठकाठकीं ॥४॥ तुका म्हणे नाहीं आलें अनुभवा । आधींच मी देवा कैसा नाचूं ॥५॥

१८७८. जन पूजी याचा मज कां आभार । हा तुम्ही विचार जाणां देवा ॥१॥ पत्र कोण मानी वंदितील सिक्का । गौरव सेवका त्याचि मुळें ॥२॥ मी मीपणें होतों जनामधीं आधीं । कोणें दिलें कधीं काय तेव्हां ॥३॥ आतां तूं भोगितां सर्व नारायणा । नको आम्हां दीना पीडा करूं ॥४॥ आपुलिया हातें देसील मुशारा । तुका म्हणे खरा तोचि आम्हां ॥५॥

१८७९. आमची कां नये तुम्हासी करुणा । किती नारायणा आळवावें ॥१॥ काय जाणां तुम्ही दुर्बळाचें जिणें । वैभवाच्या गुणें आपुलिया ॥२॥ देती घेती करिती खटपटा आणिकें । निराळा कौतुकें पाहोनियां ॥३॥ दिवस बोटीं आम्हीं धरियेलें माप । वाहातों संकल्प स्वहिताचा ॥४॥ तुका म्हणे मग देसी कोण्या काळें । चुकुर दुर्बळें होतों आम्ही ॥५॥

१८८०. तुम्हां आम्हां तुटी होईल यावरी । ऐसें मज हरी दिसतसे ॥१॥ वचनाचा कांहीं न देखों आधार । करावा हा धीर कोठवरी ॥२॥ सारिलें संचित होतें गांठी कांहीं । पुढें ऋण तेंही नेदी कोणी ॥३॥ जावेंचि नलगे कोणाचिया घरा । उडाला पातेरा तुझ्या संगें ॥४॥ तुका म्हणे आम्हां हाचि लाभ जाला । मनुष्यधर्म गेला पांडुरंगा ॥५॥

१८८१. देव मजुर देव मजुर । नाहीं उजुर सेवेपुढें ॥१॥ देव गांढ्याळ देव गांढ्याळ । देखोनियां बळ लपतसे ॥२॥ देव तर काई देव तर काई । तुका म्हणे राई तरी मोठी ॥३॥

१८८२. देव दयाळ देव दयाळ । साहें कोल्हाळ बहुतांचा ॥१॥ देव उदार देव उदार । थोड्यासाठीं फार देऊं जाणे ॥२॥ देव चांगला देव चांगला । तुका लागला चरणीं ॥३॥

१८८३. देव बासर देव बासर । असे निरंतर जेथें तेथें ॥१॥ देव खोळंबा देव खोळंबा । मज झळंबा म्हुण कोंडी ॥२॥ देव लागट देव लागट । लाविलिया चट जीवीं जडे ॥३॥ देव बावळा देव बावळा । भावें जवळा लुडबुडी ॥४॥ देव न व्हावा देव न व्हावा । तुका म्हणे गोवा करी कामीं ॥५॥

१८८४. देव निढळ देव निढळ । मूळ नाहीं डाळ परदेशी ॥२ । देव अकुळी देव अकुळी । भलते स्थळीं सोयरिक ॥२॥ देव लिगाड्या देव लिगाड्या । तुका म्हणे भाड्या दंभें ठकी ॥३॥

१८८५. देव बराडी देव बराडी । घालीं देंठासाठीं उडी ॥१॥ देव भ्याड देव भ्याड । राखे बळींचे कवाड ॥२॥ देव भाविक देव भाविक । होय दासांचा सेवक ॥३॥ देव होया देव होया । जैसा म्हणे तैसा तया ॥४॥ देव लहान देव लहान । तुका म्हणे अनुरेण ॥५॥

१८८६. देव भला देव भला । मिळोनि जाय जैसा त्याला ॥१॥ देव उदार देव उदार । देतां नाही थोडें फार ॥२॥ देव बळी देव बळी । जोडा नाहीं भूमंडळीं ॥३॥ देव व्हावा देव व्हावा । आवडे तो सर्वां जीवां ॥४॥ देव चांगला देव चांगला । तुका चरणीं लागला ॥५॥

१८८७. देव पाहों देव पाहों । उंच ठायीं उभे राहों ॥१॥ देव देखिला देव देखिला । तो नाहीं कोणां भ्याला ॥२॥ देवासी कांहीं मागों मागों । जीव भाव त्यासी सांगों ॥३॥ देव जाणें देव जाणें । पुरवी मनींचिये खुणे ॥४ । देव कातर देव कातर । तुका म्हणे अभ्यंतर ॥५॥

१८८८. देव आमचा देव आमचा । जीव सकळ जीवांचा ॥१॥ देव आहे देव आहे । जवळी आम्हां अंतरबाहे ॥२॥ देव गोड देव गोड । पुरवी कोडाचेंही कोड ॥३॥ देव आम्हां राखे राखे । घाली कळिकाळासी काखे ॥४॥ देव दयाळ देव दयाळ । करी तुक्याचा सांभाळ ॥५॥

१८८९. जाऊं देवाचियां गांवां । देव देईल विसांवा ॥१॥ देवा सांगों सुखदुःख । देव निवारील भूक ॥२॥ घालूं देवासीच भार । देव सुखाचा सागर ॥३॥ राहों जवळी देवापाशीं । आतां जडोनि पायांसी ॥४॥ तुका म्हणे आम्ही बाळें । या देवाची लडिवाळें ॥५॥

१८९०. प्रेम तेथें वास करी । मुखीं उच्चारितां हरी ॥१॥ प्रेमे यावें तया गांवा । चोजवीत या वैष्णवां ॥२॥ प्रेम पाठी लाग बळें । भक्त देखोनियां भोळे ॥३॥ प्रेम नवजे दडवितां । शिरे बळें जेथें कथा ॥४॥ तुका म्हणे थोर आशा । प्रेमा घरीं विष्णुदासां ॥५॥

१८९१. संत मानितील मज । तेणें वाटतसे लाज ॥१॥ तुम्ही कृपा केली नाहीं । चित्त माझें मज ग्वाही ॥२॥ गोविलों थोरिवा । दुःख वाटतसे जीवा ॥३॥ तुका म्हणे माया । आवरा हे पंढरिराया ॥४॥

१८९२. नाहीं तुम्हीं केला । अंगीकार तो विठ्ठला ॥१॥ सोंगें न पवीजे थडी । माजी फुटकी सांगडी ॥२॥ प्रेम नाहीं अंगीं । भले म्हणविलें जगीं ॥३॥ तुका म्हणे देवा । मज वायां कां चाळवा ॥४॥

१८९३. आतां चक्रधरा । झणीं आम्हांस अव्हेरा ॥१॥ तुमचीं म्हणविल्यावरी । जैसीं तैसीं तरी हरी ॥२॥ काळ आम्हां खाय । तरी तुझें नाव जाय ॥३॥ तुका म्हणे देवा । आतां पण सिद्धी न्यावा ॥४॥

१८९४. मज ऐसें कोण उद्धरीलें सांगा । ब्रीदें पांडुरंगा बोलतसां ॥१॥ हातींच्या कांकणा कासया आरसा । उरलों मी जैसा तैसा आहें ॥२॥ धन्वंतरी हरी रोग्याचिये व्यथे । तें तों कांहीं येथें न देखिजे ॥३॥ तुका म्हणे नाहीं अनुभव अंगें । वचन वाउगें कोण मानी ॥४॥

१८९५. काय तें सामर्थ्य न चले या काळें । काय जाले बळ शक्तिहीन ॥१॥ माझिया संचितें आणिलासी हरी । जालें तुजवरी वरिष्ठ तें ॥२॥ काय गमाविली सुदर्शन गदा । त्या भेणें गोविंदा लाजतसां ॥३॥ तुका म्हणे काय ब्रीदाचे ते काम । सांडा परतें नाम दीनानाथा ॥४॥

१८९६. बळ बुद्धी वेचुनियां शक्ती । उदक चालवावें युक्ती ॥१॥ नाहीं चळण तया अंगीं । धांवें लवणामागें वेगीं ॥२॥ पाट मोट कळा । भरित पखाला सागळा ॥३॥ बीजा त्यासी द्यावें । तुका म्हणे तैसें व्हावें ॥४॥

१८९७. न म्हणे सान थोर । दुष्ट पापी अथवा चोर ॥१॥ सकळा द्यावी एकी चवी । तहान हरूनि निववी ॥२॥ न म्हणे दिवस राती । सर्व काळ सर्वां भूतीं ॥३॥ तुका म्हणे झारी । घेतां तांब्यानें खापरी ॥४॥

१८९८. इच्छा चाड नाहीं । न धरी संकोचही कांहीं ॥१॥ उदका नेलें तिकडे जावें । केलें तैसें सहज व्हावें ॥२॥ मोहरी कांदा ऊंस । एक वाफा भिन्न रस ॥३॥ तुका म्हणे सुख । पीडा इच्छा पावे दुःख ॥४॥

१८९९. तरले ते मागें आपुलिया सत्ता । कमाई अनंता करूनियां ॥१॥ उसणें फेडितां धर्म तेथें कोण । ते तुज अनन्य तुम्ही त्यांसी ॥२॥ मजऐसा कोण सांग वांयां गेला । तो तुम्हीं तारिला पांडुरंगा ॥३॥ तुका म्हणे नामासारखी करणी । न देखें हें मनीं समजावें ॥४॥

१९००. कवणाशी भांडों कोण माझें साहे । कोण मज आहे तुजविण ॥१॥ धरिलें उदास दुरदुरांतरें । सांडीं एकसरें केली माझी ॥२। आइकोन माझे नाइकसी बोल । देखोनियां खोळबुंथी घेसी ॥३॥ तुका म्हणे एके गांवींची वसती । म्हणऊनि खंती वाटे देवा ॥४॥

१९०१. आळवितां कंठ शोकला भीतर । आयुष्य वेचे धीर नाहीं मना ॥१॥ अझून कां नये हें तुझ्या अंतरा । दीनाच्या माहेरा पांडुरंगा ॥२॥ धन दिसे डोळा दगडाचे परी । भोग ते

शरीरीं विष जालें ॥३॥ चुकलों काय तें मज क्षमा करीं । आळिंगूनी हरी प्रेम द्यावें ॥४॥ अवस्था राहिली रूपाची अंतरीं । बाहेर भीतरी सर्व काळ ॥५॥ तुका म्हणे माझे सकळ उपाय । पांडुरंगा पाय तुझे आतां ॥६॥

१९०२. नाहीं काष्ठाचा गुमान । गोवी भ्रमरा सुमन ॥१॥ प्रेम प्रीतीचें बांधलें । तें न सुटे कांहीं केलें ॥२॥ पदरीं घालीं पिळा । बाप निर्बळ साटी बाळा ॥३॥ तुका म्हणे भावें । भेणें देवें आकारावें ॥४॥

१९०३. भावाचिया बळें । आम्हीं निर्भर दुबळें ॥१॥ नाहीं आणिकाची सत्ता । सदा समाधान चित्ता ॥२॥ तर्का नाहीं ठाव । येथें रिघावया वाव ॥३॥ एकछत्री राज । तुक्या पांडुरंगीं काज ॥४॥

१९०४. भावापुढें बळ । नाहीं कोणाचें सबळ ॥१॥ करी देवावरी सत्ता । कोण त्याहूनि परता ॥२॥ बैसें तेथें येती । न पाचारितां सर्व शक्ति ॥३॥ तुका म्हणे राहे । तयाकडे कोण पाहे ॥४॥

१९०५. सत्ता वर्ते मन । पाळी विठ्ठलाची आण ॥१॥ आज्ञा वाहोनियां शिरीं । सांगितलें तेंचि करीं ॥२॥ सरलीसे धांव । नलगे वाढवावी हांव ॥३॥ आहे नाहीं त्याचें । तुका म्हणे कळे साचें ॥४॥

१९०६. खावें ल्यावें द्यावें । जमाखर्च तुझ्या नांवें ॥१॥ आतां चुकली खटपट । झाड्यापाड्याचा बोभाट ॥२॥ आहे नाहीं त्याचें । आम्हां काम सांगायाचें ॥३॥ तुका म्हणे चिंता । भार वाहे तुझ्या माथां ॥४॥

१९०७. आतां बरें जालें । माझे माथांचें निघालें ॥१॥ चुकली हे मरमर । भार माथाचे डोंगर ॥२॥ नसतां कांही जोडी । केली बहुतें तडातोडी ॥३॥ जाला झाडापाडा । तुका म्हणे गेली पीडा ॥४॥

१९०८. संचितचि खावें । पुढें कोणाचें न घ्यावें ॥१॥ आतां पुरे हे चाकरी । राहों बैसोनियां घरीं ॥२॥ नाहीं कामा हातीं । आराणूक दिवसराती ॥३॥ तुका म्हणे सत्ता । आतां पुरे पराधीनता ॥४॥

१९०९. ज्याचे गांवीं केला वास । त्यासी नसावें उदास ॥१॥ तरीच जोडिलें तें भोगे । कांहीं आघात नलगे ॥२॥ वाढवावी थोरी । मुखें म्हणे तुझे हरी ॥३॥ तुका म्हणे हे गोमटी । दासा न घालावी तुटी ॥४॥

१९१०. माझा तुम्ही देवा केला अंगीकार । हें मज साचार कैसें कळे ॥१॥ कांहो कांहीं माझ्या नये अनुभवा । विचारितां देवा आहें तैसा ॥२॥ लौकिकाचा मज लाविसी आभार । शिरोरत्नभार दुःखाचा हा ॥३॥ तुका म्हणे नाहीं पालट अंतरीं । तेथें दिसे हरी ठकाठकी ॥४॥

१९११. तोंडें बोलावें तें तरी वाटे खरें । जीवेंयेर येरें वंचिजे ना ॥१॥ हें तुम्हां सांगणें

काय उगवूनि । जावें समजोनि पांडुरंगा ॥२॥ जेवित्याची खूण वाढित्या अंतरीं । प्रीतीनें हे धरी चाली तेथें ॥३॥ तुका म्हणे बहु परीचे आदर । अत्यंत वेव्हार संपादणी ॥४॥

१९१२. न पालटे एक । भक्त भोळाचि भाविक ॥१॥ येरां नास आहे पुढें । पुण्य सरतां उघडें ॥२॥ नेणे गर्भवास । एक विष्णूचाचि दास ॥३॥ तुका म्हणे खरें । नाम विठोबाचें बरें ॥४॥

१९१३. मना एक करीं । म्हणे मी जाईन पंढरी । उभा विटेवरी । तो पाहेन सांवळा ॥१॥ करीन सांगसी तें काम । जरी जपसी हें नाम । नित्य वाचे राम । हरि कृष्ण गोविंद ॥२॥ लागे संतांचियां पायां । कथे उल्हास गावया । आलों मागावया । शरण देईं उचित ॥३॥ नाचें रंगीं वाहे टाळी । होय सादर ते काळीं । तुका म्हणे मळी । सांडूनियां अंतरींची ॥४॥

१९१४. न राहे क्षण एक वैकुंठीं । क्षीरसागर त्रिपुटीं । जाय तेथें दाटी । वैष्णवांची धांवोनि ॥१॥ भाविक गे माये भोळें गुणाचें । आवडे तयाचें नाम घेतां तयासी ॥२॥ जो नातुडे कवणिये परी । तपें दानें व्रतें थोरी । म्हणतां वाचे हरी । राम कृष्ण गोविंदा ॥३॥ चौदा भुवनें जया पोटीं । तो राहे भक्ताचिये कंठीं । करूनियां साटी । चित्त प्रेम दोहींची ॥४॥ जया रूप ना आकार । धरी नाना अवतार । घेतलीं हजार । नांवें ठेवूनि आपणां ॥५॥ ऐसा भक्तांचा हा ऋणी । पाहतां आगमीं पुराणीं । नाहीं तुका म्हणे ध्यानीं । तो कीर्तनीं नाचतसे ॥६॥

१९१५. स्वल्प वाटे चला जाऊं । वाचे गाऊं विठ्ठल ॥१॥ तुम्ही आम्ही खेळीमेळीं । गदारोळी आनंदें ॥२॥ ध्वजा कुंचे गरुडटके । शृंगार निके करोनि ॥३॥ तुका म्हणे हेचि नीट । जवळी वाट वैकुंठा ॥४॥

१९१६. आनंदाच्या कोटी । सांठवल्या आम्हां पोटीं ॥१॥ प्रेम चालिला प्रवाहो । नाम ओघ लवलाहो ॥२॥ अखंड खंडेना जीवन । राम कृष्ण नारायण ॥३॥ थडी अहिक्य परत्र । तुका म्हणे समतीर ॥४॥

१९१७. चाहाडाची माता । व्यभिचारीण तत्वता ॥१॥ पाहे संतांचें उणें । छिद्र छळावया सुनें ॥२॥ जाणों त्याच्या बाचें । कांहीं सोडिलें गांठीचें ॥३॥ तुका म्हणे घात । व्हावा ऐसी जोडी मात ॥४॥

१९१८. सापें ज्यासी खावें । तेणें प्राणासी मुकावें ॥१॥ काय लाधला दुर्जन । तोंडावरी थुंके जन ॥२॥ विंचु हाणी नांगी । अग्न लावी आणिकां अंगीं ॥३॥ तुका म्हणे जाती । नरका पाउलीं चालती ॥४॥

१९१९. खडा खाळी साकर । जाला नामाचाचि फेर । न दिसे अंतर । गोडी ठायीं निवडतां ॥१॥ तुम्ही आम्ही पांडुरंगा । भिन्न ऐसें काय सांगा । चाळविलें जगा । मी हें माझें यासाठीं ॥२॥ पायीं हातीं नाकीं शिरीं । हेम राहे अळंकारीं । मुसे आल्यावरी । काय निवडे वेगळें ॥३॥

निजलिया लाभ हानी । तोंच खरी ते स्वप्नीं । तुका म्हणे दोन्ही । निवारलीं जागतां ॥४॥

१९२०. आम्हीं जाणों तुझा भाव । कैंचा भक्त कैंचा देव । बीजा नाहीं ठाव । कैंचें फळ शेवटीं ॥१॥ संपादिलें बहु रूप । कैंचें पुण्य कैंचें पाप । नव्हतों आम्ही आप । आपणासी देखिलें ॥२॥ एके ठायीं घरिच्याघरीं । न कळतां जाली चोरी । तेथेंचि तें दुरी । जाणें येणें खुंटलें ॥३॥ तुका म्हणे धरूनि हातीं । उरी ठेविली मागुती । एकांतीं लोकांतीं । देवभक्तसोहळा ॥४॥

१९२१. कांहीं बोलिलों बोबडें । मायबापा तुम्हांपुढें । सलगी लाडें कोडें । मज क्षमा करावी ॥१॥ काय जाणावा महिमा । तुमचा म्या पुरुषोत्तमा । आवडीनें सीमा । सांडविली मज हातीं ॥२॥ घडे अवज्ञा सख्यत्वें । बाळें बापासी न भ्यावें । काय म्यां सांगावें । आहे ठावें तुम्हांसी ॥३॥ तुका म्हणे देवा । प्रेम लोभ न संडावा । पाळिला पाळावा । लळा पुढती आगळा ॥४॥

१९२२. बहु भितो जाणपणा । आड न यो नारायणा । घेईन प्रेमपान्हा । भक्तिसुख निवाडें ॥१॥ यासी तुळे ऐसें कांहीं । दुजें त्रिभुवनीं नाही । काला भात दहीं । ब्रह्मादिकां दुर्लभ ॥२॥ निमिषार्ध संतसंगती । वास वैकुंठी कल्पांतीं । मोक्षपदें येती । ते विश्रांती बापुडी ॥३॥ तुका म्हणे हेंचि देईं । मीतूंपणा खंड नाहीं । बोलिलें त्या नाहीं । अभेदाची आवडी ॥४॥

१९२३. देवा आतां ऐसा करीं उपकार । देहाचा विसर पाडीं मज ॥१॥ तरीच हा जीव सुख पावे माझा । बरें केशीराजा कळों आलें ॥२॥ ठाव देईं चित्ता राखें पायांपाशी । सकळ वृत्तींसी अखंडित ॥३॥ आस भय चिंता लाज काम क्रोध । तोडावा संबंध यांचा माझा ॥४॥ मागणें तें एक हेंचि आहे आतां । नाम मुखीं संतसंग देईं ॥५॥ तुका म्हणे नको वरपंग देवा । घेईं माझी सेवा भावशुद्ध ॥६॥

१९२४. तुज न करितां काय नव्हे एक । हे तों सकळिक संतवाणी ॥१॥ घेईं माझा भार करीं कइवार । उतरीं हा पार भवसिंधु ॥२॥ उचित अनुचित पापपुण्यकाला । हा तों नये मला निवडितां ॥३॥ कुंठित राहिली बोलतां बोलतां । पार न पवतां वाणी पुढें ॥४॥ पुसतांही कोणा न कळे हें गुज । राखें आतां लाज पांडुरंगा ॥५॥ तुका म्हणे बहु पाहिलें या जीवें । वर्म जालें ठावें नाम तुझें ॥६॥

१९२५. मज त्याची भीड नुल्लंघवे देवा । जो म्हणे केशवा दास तुझा ॥१॥ मज आवडती बहु तैसे जन । करिती कीर्तन कथा तुझी ॥२॥ सांडूनियां लाज नाचेन त्यांपुढें । आइकती कोडें नाम तुझें ॥३॥ नलगे उपचार होईन भिकारी । वैष्णवांच्या घरीं उष्टावळी ॥४॥ तुका म्हणे जाणो उचित अनुचित । विचारूनि हित तेंचि करूं ॥५॥

१९२६. जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती । चालविसी हातीं धरूनियां ॥१॥ चालों वाटे आम्ही तुझाचि आधार । चालविसी भार सवें माझा ॥२॥ बोलों जातां बरळ करिसी तें नीट । नेली

लाज धीट केलों देवा ॥३॥ अवघे जन मज जाले लोकपाळ । सोईरे सकळ प्राणसखे ॥४॥ तुका म्हणे आतां खेळतों कौतुकें । जालें तुझें सुख अंतर्बाहीं ॥५॥

१९२७. तुझे पाय माझे राहियले चित्तीं । ते मज दाविती वर्म देवा ॥१॥ आम्हां अंधां तुझ्या पायांचा आधार । जाणसी विचार चालवितां ॥२॥ मन स्थिर ठेलें इंद्रियें निश्चळ । हें तों माझें बळ नव्हे देवा ॥३॥ पापपुण्य भेद नासिलें तिमिर । त्रिगुणें शरीर सांडियेलें ॥४॥ तुका म्हणे तुझा प्रताप हा खरा । मी जाणें दातारा शरणागत ॥५॥

१९२८. जालें पीक आम्हां अवघा सुकाळ । घेऊं अवघा काळ प्रेमसुख ॥१॥ जाली आराणूक अवघियांपासून । अवघा गेला सीणभाग आतां ॥२॥ अवघा जाला आम्हां एक पांडुरंग । आतां नाहीं जग माझें तुझें ॥३॥ अवघेचि आम्ही ल्यालों अळंकार । शोभलोंहि फार अवघ्यांवरी ॥४॥ तुका म्हणे आम्ही सदैवाचे दास । करणें नलगे आस आणिकांची ॥५॥

१९२९. साधनें आमुचीं आज्ञेचीं धारकें । प्रमाण सेवकें स्वामिसत्ता ॥१॥ प्रकाशिलें जग आपुल्या प्रकाशें । रवि कर्म रसें अलिप्त त्या ॥२॥ सांगणें तें नाहीं करणें आपण । मोलाही वचन वाढ जालें ॥३॥ तुका म्हणे आम्हां भांडवल हातीं । येरझार खाती केवटिये ॥४॥

१९३०. शुभ जाल्या दिशा अवघाचि काळ । अशुभ मंगळ मंगळाचें ॥१॥ हातींचिया दीपें दुराविली निशी । न देखिजे कैसी आहे तेही ॥२॥ सुखदुःखाहूनि नाहीं विपरीत । देतील आघात हित फळें ॥३॥ तुका म्हणे आतां आम्हांसी हे भले । अवघेचि जाले जीव जंत ॥४॥

१९३१. पाप पुण्य दोन्ही वाहाती मारग । स्वर्गनर्कभोग यांचीं पेणीं ॥१॥ एका आड एक नलगे पुसावें । जेविल्या देखावें मागें भूक ॥२॥ राहाटीं पडिलीं भरोनियां रितीं । होतील मागुतीं येतीं जातीं ॥३॥ तुका म्हणे आम्ही खेळतों या मधीं । नाहीं केली बुद्धि स्थिर पाहों ॥४॥

१९३२. आमुची जिवलगें सज्जन सोयरीं । नांदतील तीरीं भिवरेच्या ॥१॥ तींच माझ्या चित्तीं वसती दिवसराती । भेटावया खंती वाटतसे ॥२॥ संपदा सोहळे सर्व सुख वसे । वैकुंठीं जें नसे सुरवरासी ॥३॥ ज्याच्या नामें पाप दुःख नासे भय । विठ्ठल बाप माय रखुमाई ॥४॥ माझा जीव जीतो अमृत ते कळा । कंठीं वेळोवेळां ध्यात असें ॥५॥ तुका म्हणे वाट पाहतां शिणलें । त्या पंथें डोळुलें पंढरीच्या ॥६॥

१९३३. न्यावयासी मूळ पाठवील कधीं । मज कृपानिधि पांडुरंग ॥१॥ प्राण फुटे माझा त्याचिया वियोगें । घडी जाय युगें येकी येकी ॥२॥ त्याचिये गांवींची आवड ती जीवा । जीव हा सांडावा वोवाळुनी ॥३॥ दिनो दिन चिंता वाटते बहुत । नावडे संचित करावेंसें ॥४॥ तुका म्हणे आतां आहे तेंचि सरो । कोण करी भरोवरी मग ॥५॥

१९३४. पाळिला विध तो आजि फळा आला । ऐसा हा कळला साच भाव ॥१॥ नामाची आवडी लागलीसे चित्ता । पाय आठवितां सुख वाटे ॥२॥ धरिल्या देहाचें साधलें कारण । पुढिल्या खंडण गर्भवासा ॥३॥ तुका म्हणे लाभ झाला एकसरें । आणिक दुसरें नाहीं आतां ॥४॥

१९३५. हित तेंचि एक राम कंठीं राहे । नाठविती देहभाव देही ॥१॥ हाचि एक धर्म निज बीज वर्म । हेंचि जाळी कर्मे केलीं महा ॥२॥ चित्त राहे पायीं रूप बैसे डोळां । जीवें कळवळा आवडीचा ॥३॥ अखंड न खंडे अभंग न भंगे । तुका म्हणे गंगे मिळणी सिंधु ॥४॥

१९३६. माझीये जातीचें मज भेटो कोणी । आवडीची धणी फेडावया ॥१॥ आवडे ज्या हरि अंतरापासूनि । ऐसियांचे मनीं आर्त माझें ॥२॥ तयालागीं जीव होतो कासावीस । पाहातील वास नयन हे ॥३॥ सुफळ हा जन्म होईल तेथून । देतां आलिंगन वैष्णवांसी ॥४॥ तुका म्हणे तोचि सुदिन सोहळा । गाऊं या गोपाळा धणीवरि ॥५॥

१९३७. आमुचें जीवन हें कथा अमृत । आणिकही संत समागम ॥१॥ सारूं एके ठायीं भोजन परवडी । स्वादरसें गोडी पदोपदीं ॥२॥ धालिया ढेंकर येती आनंदाचें । वोसंडलें वाचे प्रेमसुख ॥३॥ पिकलें स्वरूप आलिया घुमरी । रासी ते अंबरीं न समाये ॥४॥ मोजितां तयाचा अंत नाहीं पार । खुंटला व्यापार तुका म्हणे ॥५॥

१९३८. जोडिलें तें आतां न सरे सारितां । जीव बळी देतां हाता आलें ॥१॥ संचित सारूनि बांधिलें धरणें । तुंबिलें जीवन अक्षेपे हें ॥२॥ शीत उष्ण तेथें सुखदुःख नाहीं । अंतर सबाहीं एक जालें ॥३॥ बीज तो अंकुर पत्र शाखा फळ । प्राप्तबीज मूळ अवघें नासे ॥४॥ तुका म्हणे नामीं राहिलीसे गोडी । बीजाच्या परवडी होती जाती ॥५॥

१९३९. भक्तिभावें आम्हीं बांधिलासे गांठी । सादावितों हाटीं घ्या रे कोणी ॥१॥ सुखाचिया पेठे घातला दुकान । मांडियेले वान रामनाम ॥२॥ सुखाचें फुकाचें सकळांचें सार । तरावया पार भवसिंधु ॥३॥ मागें भाग्यवंत जाले थोर थोर । तिहीं केला फार हाचि सांटा ॥४॥ खोटें कुडे तेथें नाहीं घातपात । तुका म्हणे चित्त शुद्ध तरी ॥५॥

१९४०. पर्जन्यें पडावें आपुल्या स्वभावें । आपुलाल्या दैवें पिके भूमि ॥१॥ बीज तेंचि फळ येईल शेवटीं । लाभहानि तुटी ज्याची तया ॥२॥ दीपाचिये अंगीं नाहीं दुजा भाव । धणी चोर साव सारिखेचि ॥३॥ काउळें ढोंपरा कंकर तित्तिरा । राजहंसा चारा मुक्ताफळें ॥४॥ तुका म्हणे येथें आवडी कारण । पिकला नारायण जयां तैसा ॥५॥

१९४१. धीर तो कारण एकविध भाव । पतिव्रते नाहो सर्वभावें ॥१॥ चातक हे जळ न पाहाती दृष्टी । वाट पाहे कंठीं प्राण मेघा ॥२॥ सूर्यविकासिनी नेघे चंद्रामृत । वाट पाहे अस्त उदयाची ॥३॥ धेनु येऊं नेदी जवळी आणिकां । आपुल्या बाळकाविण वत्सा ॥४ ॥ तुका म्हणे

नेम प्राणांसवसाटी । तरीच या गोष्टी विठोबाची ॥५॥

१९४२. देहबुद्धि वसे जयाचिये अंगीं । पूज्यता ते जगीं सुख मानी ॥१॥ थोर असे दगा जाला त्यासी हाटीं । सोडोनियां गांठी चोरी नेली ॥२॥ गांठीचें जाऊनि नव्हे तो मोकळा । बांधविलासे गळा दंभलोभें ॥३॥ पुढिल्या उदिमा जालेंसे खंडण । दिसे नागवण पडे गांठी ॥४॥ तुका म्हणे ऐसे बोलतील संत । जाणूनियां घात कोण करी ॥५॥

१९४३. जिकडे जाय तिकडे सवें । आतां यावें यावरी ॥१॥ माझ्या अवघ्या भांडवला । तूं एकला जालासी ॥२॥ आतां दुजें धरा झणी । पायांहूनि वेगळें ॥३॥ तुका म्हणे आतां देवा । नका गोवा यावरी ॥४॥

१९४४ स्मरतां कां घडे नास । विष्णुदास यावरी ॥१॥ ऐसी सीमा जाली जगीं । तरी मी वेगीं अनुसरलों ॥२॥ धरिलें तें निवडे आतां । न घडे चित्ता वेगळें ॥३॥ तुका म्हणे नाश नाहीं । पुराणेंही गर्जती ॥४॥

१९४५. आधीं नाहीं कळों आला हा उपाय । नाहीं तरी काय चुकी होती ॥१॥ घालितों पायांसी मिठी एकसरें । नेदी तों दुसरें आड येऊं ॥२॥ कासया पडितों लटिक्याचे भरी । नव्हता कां शिरीं भार घेतों ॥३॥ संसाराचा हाटक फिरतों दुकानें । भरोवरी धन मेळवितों ॥४॥ तुका म्हणे कां हे घेतों गर्भवास । कां या होतो दास कुटुंबाचा ॥५॥

१९४६. आतां बरें जालें । माझें मज कळों आलें ॥१॥ खोटा ऐसा संसार । मज पायीं द्यावी थार ॥२॥ उघडल्या डोळे । भोग देताकाळीं कळे ॥३॥ तुका म्हणे जीवा । होतां तडातोडी देवा ॥४॥

१९४७. बोलिलों ते धर्म अनुभव अंगें । काय पांडुरंगें उणें केलें ॥१॥ सर्व सिद्धि पायीं वोळगती दासी । इच्छा नाहीं ऐसी व्हावें काहीं ॥२॥ संतसमागमें अळंकारूं वाणी । करूं हे पेरणी शुद्ध बीजें ॥३॥ तुका म्हणे रामकृष्णनामें गोड । आवडीचें कोड माळ ओऊं ॥४॥

१९४८. ज्याचे माथां जो जो भार । तोचि फार तयासी ॥१॥ मागें पुढें अवघें रितें । कळों येतें अनुभवें ॥२॥ परिसा अंगीं अमुप सोनें । पोटीं हीन धातूचें ॥३॥ आपुला तो करी धर्म । जाणे वर्म तुका तें ॥४॥

१९४९. निंबाचिया झाडा साकरेचें आळें । आपुलीं तीं फळें न संडीच ॥१॥ तैसें अधमाचें अमंगळ चित्त । वमन तें हित करूनि सांडी ॥२॥ परिसाचे अंगीं लाविलें खापर । पालट अंतर नेघे त्याचें ॥३॥ तुका म्हणे वेळू चंदना संगतीं । काय ते असती जवळिकें ॥४॥

१९५०. दुबळें सदैवा । म्हणे नागवेल केव्हां ॥१॥ आपणा ऐसें करूं पाहे । स्वभावासी करिल काय ॥२॥ मूढ सभे आंत । इच्छी पंडिताचा घात ॥३॥ गांढ्या

देखुनि शूर । उगीच करी बुरबुर ॥४॥ आणिकांचा हेवा । करीं शरण जाईं देवा ॥५॥ तुका म्हणे किती । करूं दुष्टाची फजिती ॥६॥

१९५१. माझी आतां लोक सुखें निंदा करू । म्हणती विचारू सांडियेला ॥१॥ कारण होय तो करीन विचार । काय भीड भार करूं देवा ॥२॥ तुका म्हणे काय करूं लापणिक । जनाचार सुख नासिवंत ॥३॥

१९५२. ढेंकणाचे संगें हिरा जो भंगला । कुसंगें नाडला साधु तैसा ॥१॥ ओढाळाच्या संगें सात्विक नासलीं । क्षण एक नाडलीं समागमें ॥२॥ डांकाचे संगती सोनें हीन जालें । मोल तें तुटलें लक्ष कोडी ॥३॥ विषाने पक्वान्नें गोड कडू जालीं । कुसंगानें केलीं तैसी परी ॥४॥ भावें तुका म्हणे सत्संग हा बरा । कुसंग हा फेरा चौऱ्याशीचा ॥५॥

१९५३. नामें स्नानसंध्या केलें क्रियाकर्म । त्याचा भवश्रम निवारला ॥१॥ आणिकें दुरावली करितां खटपट । वाउगे बोभाट वर्माविण ॥२॥ रामनामीं जिहीं धरिला विश्वास । तिहीं भवपाश तोडियेले ॥३॥ तुका म्हणे केलें कळिकाळ ठेंगणें । नामसंकीर्तनें भाविकांनीं ॥४॥

१९५४. वैष्णवांची कीर्ति गाईली पुराणीं । साही अठरा जणीं चहूं वेदीं ॥१॥ ऐसे कोणी दावा ग्रंथांचे वाचक । कर्मठ धार्मिक पुण्यशील ॥२॥ आदिनाथ शंकर नारद मुनीश्वर । शुका ऐसा थोर आणिक नाहीं ॥३॥ तुका म्हणे मुगुटमणी हरि भक्ति । आणिक विश्रांति आरतिया ॥४॥

१९५५. बोलिलों जैसें बोलविलें देवें । माझें तुम्हां ठावें जातिकुळ ॥१॥ करा क्षमा कांहीं नका धरूं कोप । संत मायबाप दीनावरी ॥२॥ वाचेचा चाळक जाला दावी वर्म । उचित ते धर्म मजपुढें ॥३॥ तुका म्हणे पुढें अपराध नेणतां । द्यावा मज आतां ठाव पायीं ॥४॥

१९५६. संतांचे घरींचा दास मी कामारी । दारीं पर्वरीं लोळतसें ॥१॥ चरणींचे रज लागती अंगास । तेणें बेताळीस उद्धरती ॥२॥ उच्छिष्ट हें जमा करूनि पत्रावळी । घालीन कवळी मुखामाजी ॥३॥ तुका म्हणे मी आणीक विचार । नेणें हेंचि सार मानीतसें ॥४॥

१९५७. एक शेर अन्ना चाड । येर वाउगी बडबड ॥१॥ कां रे तृष्णा वाढविसी । बांधवूनि मोहपाशीं ॥२॥ औट हात तुझा जागा । येर सिणसी वाउगा ॥३॥ तुका म्हणे श्रम । एक विसरतां राम ॥४॥

१९५८. आलें भरा येच पेंठे । पुढें मागुतें न भेटे ॥१॥ होसी फजीती वरपडा । लक्ष चौऱ्यासीचे वेढां ॥२॥ नाहीं कोणाचा सांगात । दुःख भोगितां आघात ॥३॥ एका पाउलाची वाट । कोणा सांगावा बोभाट ॥४॥ जुंतिजेसी घाणां । नाहीं मारित्या करुणा ॥५॥ तुका म्हणे हित पाहे । जोंवरि हें हातीं आहे ॥६॥

१९५९. लाभ जाला बहुतां दिसीं । लाहो करा पुढें नासी । मनुष्यदेहा ऐसी । उत्तम जोडी जोडिली ॥१॥ घेईं हरिनाम सादरें । भरा सुखाचीं भांडारें । जालिया व्यापारें । लाहो हेवा जोडीचा ॥२॥ घेउनि माप हातीं । काळ मोवी दिवस राती । चोर लाग घेती । पुढें तैसें पळावें ॥३॥ हित सावकासें । म्हणे करीन तें पिसें । हातीं काय ऐसें । तुका म्हणे नेणसी ॥४॥

१९६०. सुखाचें ओतलें । दिसे श्रीमुख चांगलें ॥१॥ मनें धरिला अभिळास । मिठी घातली पायांस ॥२॥ होतां दृष्टादृष्टीं । ताप गेला उठाउठी ॥३॥ तुका म्हणे जाला । लाभें लाभ दुणावला ॥४॥

१९६१. झरा लागला सुखाचा । ऐसा मापारी कइंचा ॥१॥ जो हें माप तोंडें धरी । सळे जाली ते आवरी ॥२॥ जाले बहु काळ । कोणा नाहीं ऐसें बळ ॥३॥ तुका म्हणे तळ । नाहीं पाहेसा सकळ ॥४॥

१९६२. आम्ही बोलों तें तुज कळे । एक दोहीं ठायीं खेळे ॥१॥ काय परिहाराचें काम । जाणे अंतरींचें राम ॥२॥ कळोनियां काय चाड । माझी लोकांसी बडबड ॥३॥ कारण सवें एका । अवघें आहे म्हणे तुका ॥४॥

१९६३. उमटे तें ठायीं । तुझे निरोपावें पायीं ॥१॥ आम्हीं करावें चिंतन । तुझें नामसंकीर्तन ॥२॥ भोजन भोजनाच्या काळीं । मागों करूनियां आळी ॥३॥ तुका म्हणे माथां । भार तुझ्या पंढरिनाथा ॥४॥

१९६४. केला पण सांडी । ऐसीयासी म्हणती लंडी ॥१॥ आतां पाहा विचारून । समर्थासी बोले कोण ॥२॥ आपला निवाड । आपणचि करितां गोड ॥३॥ तुम्हीं आम्हीं देवा । बोलिला बोल सिद्धी न्यावा ॥४॥ असे धुरे उणें । मागें सरे तुका म्हणे ॥५॥

१९६५. न व्हावें तें जालें । तुम्हां आम्हांसी लागलें ॥१॥ आतां हालमाकलमें । भांडोनियां काढूं वर्मे ॥२॥ पाटोळ्यासंवसाटी । दिली रगट्याची गांठी ॥३॥ तुका म्हणे हारी । आणूनिया करिन सरी ॥४॥

१९६६. पतित मिरासी । ते म्यां धरिलें जीवेंसी ॥१॥ आतां बळिया सांग कोण । ग्वाही तुझें माझें मन ॥२॥ पावनाचा ठसा । दावीं मज तुझा कैसा ॥३॥ तुका म्हणे वाव जालें । रोख पाहिजे दाविलें ॥४॥

१९६७. करितां वेरझारा । उभा न राहासी वेव्हारा ॥१॥ हें तों झोंडाईचे चाळे । काय पोटीं तें न कळे ॥२॥ आरोगुनी मुग । बैसलासी जैसा बग ॥३॥ तुका म्हणे किती । बुडविलीं आळवितीं ॥४॥

१९६८. नाहीं देणें घेणें । गोवी केली अभिमानें ॥१॥ आतां कां हो निवडूं नेदां ।

पांडुरंगा येवढा धंदा ॥२॥ पांचांमधीं जावें । थोड्यासाठीं फजित व्हावें ॥३॥ तुज ऐसीं नाहीं । पांडुरंगा आम्हीं कांहीं ॥४॥ टाकूं तो वेव्हार । तुज बहु करकर ॥५॥ तुका म्हणे आतां । निवडूं संतां हे देखतां ॥६॥

१९६९. सिंचन करितां मूळ । वृक्ष ओलावे सकळ ॥१॥ नको पृथकाचे भरी । पडों एक सार धरीं ॥२॥ पाणचोऱ्याचें दार । वरिल दाटावें ते थोर ॥३॥ वश जाला राजा । मग आपुल्या त्या प्रजा ॥४॥ एक आतुडे चिंतामणी । फिटे सर्व सुखधणी ॥५॥ तुका म्हणे धांवा । आहे पंढरी विसावा ॥६॥

१९७०. करूं याची कथा नामाचा गजर । आम्हां संवसार काय करी ॥१॥ म्हणवूं हरिचे दास लेऊं तीं भूषणें । कांपे तया भेणें कळिकाळ ॥२॥ आशा भय लाज आड नये चिंता । ऐसी तया सत्ता समर्थाची ॥३॥ तुका म्हणे करूं ऐसियाचा संग । जेणें नव्हे भंग चिंतनाचा ॥४॥

१९७१. काय सर्प खातो अन्न । काय ध्यान बगाचें ॥१॥ अंतरींची बुद्धि खोटी । भरलें पोटीं वाईट ॥१॥ काय उंदीर नाहीं धांवीं । राख न लावी गाढव ॥३॥ तुका म्हणे सुसर जळीं । काउळी कां न न्हाती ॥४॥

१९७२. मदें मातलें तें नागवेंचि नाचे । अनुचित वाचे बडबडी ॥१॥ आतां शिकवावा कोणासी विचार । कर्म तें दुस्तर करवी धीट ॥२॥ आलें अंगासी तें बळिवंत गाढें । काय वेड्यापुढें धर्मनीत ॥३॥ तुका म्हणे कळों येईल तो भाव । अंगावरि घाव उमटतां ॥४॥

१९७३. भाविकां हें वर्म सांपडलें निकें । सेविती कवतुकें धणीवरि ॥१॥ इच्छितील तैसा नाचे त्यांचें छंदें । वंदितील पदें सुकुमारें ॥२॥ विसरलें मुक्ती भक्तिच्या अभिळासें । ओढत सरिसें सुख आलें ॥३॥ तुका म्हणे नाहीं मागायाची आस । पांडुरंग त्यांस विसंबेना ॥४॥

१९७४. भक्त समागमें सर्व भावें हरी । सर्व काम करी न सांगतां ॥१॥ सांठवला राहे हृदयसंपुष्टीं । बाहेर धाकुटी मूर्ति उभा ॥२॥ मागण्याची वास पाहे मुखाकडे । चिंतिल्या रोकडे मनोरथ ॥३॥ तुका म्हणे जीव भाव देवापायीं । ठेवूनि ते कांहीं न मागती ॥४॥

१९७५. परमअमृतें रसना ओलावली । मनाची राहिली वृत्ति पायीं ॥१॥ सकळही तेथें वोळलीं मंगळें । वृष्टि केली जळें आनंदाच्या ॥२॥ सकळ इंद्रियें जालीं ब्रह्मरूप । ओतलें स्वरूप माजी तया ॥३॥ तुका म्हणे जेथें वसे भक्तराव । तेथें नांदे देव संदेह नाहीं ॥४॥

१९७६. कासया गुणदोष पाहों आणिकांचें । मज काय त्यांचें उणें असे ॥१॥ काय पापपुण्य पाहों आणिकांचें । मज काय त्यांचें उणें असे ॥२॥ नष्टदुष्टपण कवणाचें वाणूं । तयाहून अणु अधिक माझें ॥३॥ कुचर खोटा मज कोण असे आगळा । तो मी पाहों डोळां आपुलिये ॥४॥ तुका म्हणे मी या भांडवलें पुरता । तुजसी पंढरीनाथा लावियेलें ॥५॥

१९७७. काळ जवळचि उभा नेणां । घाली झांपडी खुंटी कानां ॥१॥ कैसा हुशार सावध राहीं । आपुला तूं आपुले ठायीं ॥२॥ काळ जवळिच उभा पाहीं । नेदि कोणासि देऊं कांहीं ॥३॥ काळें पुरविली पाठी । वरुषें जालीं तरी साठी ॥४॥ काळ भोंवताला भोंवे । राम येऊं नेदी जिव्हे ॥५॥ तुका म्हणे काळा । कर्म मिळे तें तें जाळा ॥६॥

१९७८. दुष्ट भूषण सज्जनाचें । अलभ्यलाभ पुण्य त्याचें ॥१॥ धन्य ऐसा परउपकारी । जाय नरका आणिकां वारि ॥२॥ मळ खाये संवदणी । करी आणिकांची उजळणी ॥३॥ तुका म्हणे त्याचा । प्रीती आदर करा साचा ॥४॥

१९७९. साहोनि टांकीघाये । पाषाण देवचि जाला पाहें ॥१॥ तया रीती दृढ मन । करीं साधाया कारण ॥२॥ बाण शस्त्र साहोनि गोळी । शूरां ठाव उंच स्थळीं ॥३॥ तुका म्हणे सती । अग्न न देखे ज्या रीती ॥४॥

१९८०. तेणें वेशें माझीं चोरिलीं अंगें । मानावया जग आप्तपणें ॥ नाहीं चाड भीड संसाराचें कोड । उदासीन सर्व गुणें ॥ भय मोह लज्जा निरसली शंका । अवघियां एकचिपणें ॥ विठ्ठलाच्या पायीं बैसोनि राहिली । भागली नुठित तेणें ॥१॥ आतां त्यांसीं काय चाले माझें बळ । जालोंसें दुर्बळ सत्त्वहीन ॥ दग्ध पट दिसे संगीत बरवंट । काय त्याचें कारण ॥२॥ आळस दृष्टी न पाहे आपुलें । एकचि देखिलें सर्वरूप ॥ मानामान तेथें खुंटोनि राहिलें । पिशुन तो कोण बाप ॥ ज्योति ना अंधार अवघा एकंकार । तेथें काय पुण्यपाप ॥ विठ्ठलावांचुनि कांहींच नावडे । वेगळ्याला भावें रूप ॥३॥ बळबडिवार लौकिक वेव्हार । गेली आशा तृष्णा माया ॥ सुखदु:खाची वार्ता नाइके । अंतरलों दुरी तया ॥ मीतूंपणा निष्काम होऊनि । राहिलों आपुलिया ठाय ठायां । तुजविण आतां मज नाहीं कोणी । तुका म्हणे देवराया ॥४॥

१९८१. कथा पुराण ऐकतां । झोपें नाथिलें तत्त्वता । खाटेवरि पडतां । व्यापी चिंता तळमळ ॥१॥ ऐसी गहन कर्मगति । काय तयासी रडती । जाले जाणते जे चित्तीं । कांहीं नेघे आपुल्या ॥२॥ उदक लावितां न धरे । चिंता करी केव्हां सरे । जाऊं नका धीरें । म्हणे करितां टवाळ्या ॥३॥ जवळी गोंचिड क्षीरा । जैसी कमळणी दर्दुरा । तुका म्हणे दुर । देशत्यागे तयासी ॥४॥

१९८२. संदेह बाधक आपआपणातें । रज्जुसर्पवत भासतसे ॥ भेऊनियां काय देखिलें येणें । मारें घायेंविण लोळतसे ॥१॥ आपणचि तारी आपणचि मारी । आपण उद्धरी आपणयां ॥ शुकनळिकेन्यायें गुंतलासी काय । विचारूनि पाहें मोकळिया ॥२॥ पापपुण्य कैसे भांजिले अंक । दशकाचा एक उरविला । जाणोनियां काय होतोसि नेणता । शून्या ठाव रिता नाहीं नाहीं ॥३॥ दुरा दृष्टी पाहें न्याहाळूनि । मृगजळा पाणी न म्हणे चाडा । धांवतांचि फुटे नव्हे समाधान । तुका म्हणे जाण पावे पीडा ॥४॥

१९८३. कथे उभा अंग राखेल जो कोणी । ऐसा कोण गणी तया पापा ॥१॥ येथें तो पातकी न येताच भला । रणीं कुचराला काय चाले ॥२॥ कथे बैसोनी आणीका चर्चा । धिग त्याची वाचा कुंभपाक ॥३॥ तुका म्हणे ऐलपैल ते थडीचे । बुडतील साच मध्यभागीं ॥४॥

१९८४. नावडे ज्यां कथा उठोनियां जाती । ते यमा फावती बरे वोजा ॥१॥ तो असे जवळी गोंचिडाच्या न्यायें । देशत्यागें ठाय तया दुरी ॥२॥ नव्हे भला कोणी नावडे दुसरा । पाहुणा किंकरा यमा होय ॥३॥ तुका म्हणे तया करावें तें काई । पाषाण कां नाहीं जळामध्यें ॥४॥

१९८५. जवळी नाहीं चित्त । काय मांडियेलें प्रेत ॥१॥ कैसा पाहे चंद्रीदृष्टी । दीप स्नेहाच्या शेवटीं ॥२॥ कांतेलेंसें श्वान । तैसें दिशा हिंडे मन ॥३॥ त्याचे कानीं हाणे । कोण बोंब तुका म्हणे ॥४॥

१९८६. दुर्बळा वाणीच्या एक दोन सिद्धि । सदैवा समाधि विश्वरूपीं ॥१॥ काय त्याचें वांयां गेलें तें एक । सदा प्रेमसुख सर्वकाळ ॥२॥ तीर्थ देव दुरी तया भाग्यहीना । विश्व त्या सज्जना दुमदुमिलें ॥३॥ तुका म्हणे एक वाहाती मोळिया । भाग्यें आगळिया घरा येती ॥४॥

१९८७. परिमळें काष्ठ ताजवां तुळविलें । आणीक नांवांचीं थोडीं । एक तीं कांतिवें उभविलीं धवलारें । एकाचिया कुड मेडी । एक दीनरूप आणिती मोळिया । एक ती बांधोनि माडी । अवघियां बाजार एकचि जाला । मा विकलीं आपुलाल्या पाडीं ॥१॥ गुण तो सार रूपमध्यकार । अवगुण तो फार पीडीतसे ॥२॥ एक गुणें आगळे असती । अमोल्य नांवाचे खडे । एक समर्थ दुर्बळा घरीं । फार मोलाचे थोडे । एक झगझग करिती वाळवंटीं । कोणी न पाहाती तयांकडे । सभाग्य संपन्न आपुलाले परीं । मा येक दैन्यवाणें बापुडें ॥३॥ एक नामें रूपें सारिख्या असती । अनेक प्रकार याती । ज्याचिया संचितें जैसें आलें पुढें । तयासी तैसीच गति । एक उंचपदीं बैसोनि सुखें । दास्य करवी एका हातीं । तुका म्हणे कां मानिती सुख । चुकलिया वांयां खंती ॥४॥

१९८८. नाहीं आम्हां शत्रु सोईरें पिशुन । दाटलें हें धन माहियेर ॥१॥ पाहें तेथें पांडुरंग रखुमाई । सत्यभामा राही जननिया ॥२॥ लाज भय कांहीं आम्हां चिंता नाहीं । सर्वसुखें पायीं वोळगती ॥३॥ तुका म्हणे आम्ही सदैवाचीं बाळें । जालों लडिवाळें सकळांचीं ॥४॥

१९८९. गर्भी असतां बाळा । कोण पाळी त्याचा लळा ॥१॥ कैसा लाघवी सूत्रधारी । कृपाळुवा माझा हरी ॥२॥ सर्प पिलीं वितांचि खाय । वाचवित्या कोण माय ॥३॥ गगनीं लागला कोंसरा । कोण पुरवीं तेथें चारा ॥४॥ पोटीं पाषाणांचे जीव । कवण जीव त्याचा भाव ॥५॥ तुका म्हणे निश्चळ राहें । होईल तें सहज पाहें ॥६॥

१९९०. न म्हणे कोणा सिद्ध साधक गंव्हार । अवघा विश्वंभर वांचूनियां ॥१॥ ऐसें माझें

बुद्धि काया वाचा मन । लावी तुझें ध्यान पांडुरंगा ॥२॥ गातां प्रेमगुण शंका माझ्या मनीं । नाचतां रंगणीं नाठवावी ॥३॥ देईं चरणसेवा भूतांचें भजन । वर्ण अभिमान सांडवूनि ॥४॥ आशापाश माझी तोडी माया चिंता । तुजविण व्यथा नको कांहीं ॥५॥ तुका म्हणे सर्व भाव तुझे पायीं । राहे ऐसें देईं प्रेम देवा ॥६॥

१९९१. अग्निमाजी गेलें । अग्नि होऊन तेंच ठेलें ॥१॥ काय उरलें ताय पण । मागील तें नाम गुण ॥२॥ लोह लागे परिसा अंगीं । तोही भूषण जाला जगीं ॥३॥ सरिता ओहळा ओघा । गंगे मिळोनी जाल्या गंगा ॥४॥ चंदनाच्या वासें । तरु चंदन जाले स्पर्शें ॥५॥ तुका जवळा संतां पायी । दुजेपणा ठाव नाहीं ॥६॥

१९९२. ऐशा भाग्यें ज्यालों । तरी धन्य जन्मा आलों ॥१॥ रुळें तळील पायरी । संत पाय देती वरी ॥२॥ प्रेमामृतपान । होईल चरणरजें स्नान ॥३॥ तुका म्हणे सुखें । तया हरतील दुःखें ॥४॥

१९९३. करितां या सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥१॥ माथां पडती संतपाय । सुख कैवल्य तें काय ॥२॥ ऐसा लाभ नाहीं । दुजा विचारितां कांहीं ॥३॥ तुका म्हणे गोड । तेथें पुरे माझें कोड ॥४॥

१९९४. वेद जया गाती । आम्हां तयाची संगती ॥१॥ नाम धरियेले कंठीं । अवघा सांठविला पोटीं ॥२॥ ॐ काराचे बीज । हातीं आमुचे तें निज ॥३॥ तुका म्हणे बहु मोठें । अणुरेणुयां धाकुटें ॥४॥

१९९५. तुम्ही तरी हो श्रीपती । माझी बहु हीन याती ॥१॥ दोघे असों एके ठायीं । माझा माथा तुझे पायीं ॥२॥ माझ्या दीनपणां पार । नाहीं बहु तूं उदार ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगा । मी ओहोळ तूं गंगा ॥४॥

१९९६. मी याचक तूं दाता । काय सत्य पाहों आतां ॥१॥ म्यां तों पसरिला हात । करीं आपुलें उचित ॥२॥ आम्हीं घ्यावें नाम । तुम्हां समाधान काम ॥३॥ तुका म्हणे देवराजा । वाद खंडीं तुझा माझा ॥४॥

१९९७. तुझे पोटीं ठाव । व्हावा, ऐसा माझा भाव ॥१॥ करीं वासनेसारिखें । प्राण फुटे येणें दुःखें ॥२॥ अहंकार खोटे । वाटे श्वापदांची थाटे ॥३॥ तुका म्हणे आई । हातीं धरून संग देईं ॥४॥

१९९८. दारी परवरी । कुडीं कवाडीं मी घरीं ॥१॥ तुमच्या लागलों पोषणा । अवघे ठायीं नारायणा ॥२॥ नेदीं खाऊं जेवूं । हातीं तोंडींचेंही घेऊं ॥३॥ तुका म्हणे अंगीं । जडलों ठायींचा सलगी ॥४॥

१९९९. मज कोणी कांहीं करी । उमटे तुमचे अंतरीं ॥१॥ व्याला वाढविलें म्हूण । मज मुख तुज सीण ॥२॥ माझें पोट धालें । तुझें अंगीं उमटलें ॥३॥ तुका म्हणे खेळें । तेथें तुमचिया बळें ॥४॥

२०००. जोडोनियां कर । उभा राहिलों समोर ॥१॥ हेंचि माझें भांडवल । जाणे कारण विठ्ठल ॥२॥ भाकितों करुणा । आतां नुपेक्षावें दीना ॥३॥ तुका म्हणे डोई । ठेवीं वेळोवेळां पायीं ॥४॥

२००१. आम्हीं घ्यावें तुझें नाम । तुम्हीं आम्हां द्यावें प्रेम ॥१॥ ऐसें निवडिलें मुळीं । संतीं बैसोनि सकळीं ॥२॥ माझी डोई पायांवरी । तुम्हीं न धरावी दुरी ॥३॥ तुका म्हणे केला । खंड दोघांचा विठ्ठला ॥४॥

२००२. वारिलें लिगाड । बहू दिसांचें हें जाड ॥१॥ न बोलावें ऐसें केलें । कांहीं वाउगें तितुलें ॥२॥ जाला चौघांचार । गेला खंडोनि वेव्हार ॥३॥ तुका म्हणे देवा । करीन ते घ्यावी सेवा ॥४॥

२००३. पायरवे अन्न । मग करी खेदक्षीण ॥१॥ ऐसे होती घातपात । लाभेंविण संगें थीत ॥२॥ जन्माची जोडी । वाताहात एके घडी ॥३॥ तुका म्हणे शंका । हित आड या लौकिका ॥४॥

२००४. आम्हां वैष्णवांचा । नेम काया मने वाचा ॥१॥ धीर धरूं जिवासाठीं । येऊं नेदूं लाभा तुटी ॥२॥ उचित समय । लाज निवारावें भय ॥३॥ तुका म्हणे कळा । जाणों नेम नाहीं बाळा ॥४॥

२००५. उल्लंघिली लाज । तेणें साधियेलें काज ॥१॥ सुखें नाचों पैलतीरीं । गेलों भवाचे सागरीं ॥२॥ नामाची सांगडी । सुखें बांधली आवडी ॥३॥ तुका म्हणे लोकां । उरली वाचा मारीं हाका ॥४॥

२००६. बैसलोंसें दारीं । धरणें कोंडोनि भिकारी ॥१॥ आतां कोठें हालों नेदी । बरी सांपडली संदी ॥२॥ किती येरझारा । मागें घातलिया घरा ॥३॥ माझें मज नारायणा । देतां कां रे नये मना ॥४॥ भांडावें तें किती । बहु सोसिली फजिती ॥५॥ तुका म्हणे नाहीं । लाज तुझें अंगीं काहीं ॥६॥

२००७. जालों द्वारपाळ । तुझें राखिलें सकळ ॥१॥ नाहीं लागों दिलें अंगा । आड ठाकलों मी जगा ॥२॥ करूनियां नीती । दिल्याप्रमाणें चालती ॥३॥ हातीं दंड काठी । उभा जिवाचिये साटीं ॥४॥ बळ बुद्धी युक्ती । तुज दिल्या सर्व शक्ती ॥५॥ तुका म्हणे खरा । आतां घेईन मुशारा ॥६॥

२००८. फळाची तों पोटीं । घडे वियोगेंही भेटी ॥१॥ करावें चिंतन । सार तेंचि

आठवण ॥२॥ चित्त चित्ता ग्वाही । उपचारें चाड नाहीं ॥३॥ तुका म्हणे देवा । पावे अंतरींची सेवा ॥४॥

२००९. दुर्बळाचें कोण । ऐके घालुनियां मन । राहिलें कारण । तयावांचूनि काय तें ॥१॥ कळों आलें अनुभवें । पांडुरंगा माझ्या जीवें । न सांगतां ठावें । पडे चर्या देखोनि ॥२॥ काम क्रोध माझ्या देहीं । भेदाभेद गेले नाहीं । होतें तेथें कांहीं । तुज कृपा करितां ॥३॥ हें तों नव्हे उचित । नुपेक्षावें शरणागत । तुका म्हणे रीत । तुमची आम्हां न कळे ॥४॥

२०१०. आम्ही भाव जाणों देवा । न कळती तुझिया मावा । गणिकेचा कुढावा । पतना न्यावा दशरथ ॥१॥ तरी म्यां काय गा करावें । कोण्या रीती तुज पावावें । न सांगतां ठावें । तुम्हांविण न पडे ॥२॥ दोनी फाकविल्या वाटा । गोवा केला घटापटा । नव्हे धीर फांटा । आड रानें भरती ॥३॥ तुका म्हणे माझे डोळे । तुझे देखती हे चाळे । आतां येणें वेळे । चरण जीवें न सोडीं ॥४॥

२०११. वेरझारीं जाला सीण । बहु केलें खेदक्षीण । भांडणासी दिन । आजी येथें फावला ॥१॥ आतां काय भीड भार । धरूनियां लोकाचार । बुडवूनि वेव्हार । सरोबरी करावी ॥२॥ आलें बहुतांच्या मना । कां रे न होसी शाहाणा । मुळींच्या वचना । आम्ही जागों आपुल्या ॥३॥ तुका म्हणे चौघांमधीं । तुज नेलें होतें आधीं । आतां नाहीं मधीं । उरी कांहीं राहिली ॥४॥

१०१२. कल्पतरूखालीं । फळें येती मागितलीं ॥१॥ तेथें बैसल्याचा भाव । विचारूनि बोले ठाव ॥२॥ द्यावें तें उत्तर । येतो प्रीतीचा तो फेर ॥३॥ तुका म्हणे मनीं । आपुल्याची लाभहानि ॥४॥

२०१३. रंगलिया रंग पालट न धरी । खेवलें अंतरीं पालटेना ॥१॥ सावळें निखळ कृष्णनाम ठसे । अंगसंगें कैसे शोभा देती ॥२॥ पवित्र जालें तें न लिंपे विटाळा । नेदी बैसों मळा आडावरी ॥३॥ तुका म्हणे काळें काळें केलें तोंड । प्रकाश अभंड देखोनियां ॥४॥

२०१४. जगा काळ खाय । आम्हीं माथां दिले पाय ॥१॥ नाचों तेथें उभा राहे । जातां व्यंग करी साहे ॥२॥ हरिच्या गुणें धाला । होता खातचि भुकेला ॥३॥ तुका म्हणे हळु । जाला कढत शितळु ॥४॥

२०१५. ब्रह्मरस घेई काढा । जेणें पीडा वारेल ॥१॥ पथ्य नाम विठोबाचें । आणीक वाचे न सेवी ॥२॥ भवरोगाऐसें जाय । आणीक काय क्षुल्लकें ॥३॥ तुका म्हणे नव्हे बाधा । आणीक कदा भूतांची ॥४॥

२०१६. अंगें अनुभव जाला मज । संतरजचरणांचा ॥१॥ सुखी जालों या सेवनें । दुःख नेणें यावरी ॥२॥ निर्माल्याचें तुळसीदळ । विष्णुजळ चरणींचें ॥३॥ तुका म्हणे भावसार ।

करूनि फार मिश्रित ॥४॥

२०१७. वैद्य एक पंढरिराव । अंतर्भाव तो जाणे ॥१॥ रोगाऐशा द्याव्या वल्ली । जाणे जाली बाधा ते ॥२॥ नेदी रुका वेचों मोल । पाहे बोल प्रीतीचे ॥३॥ तुका म्हणे दयावंता । सदा चिंता दीनांची ॥४॥

२०१८. करितां कोणाचेंही काज । नाहीं लाज देवासी ॥१॥ बरें करावें हें काम । धरिलें नाम दीनबंधु ॥२॥ करूनि अराणूक पाहे । भलत्या साह्य व्हावया ॥३॥ बोले तैसी करणी करी । तुका म्हणे एक हरी ॥४॥

२०१९. उभे चंद्रभागे तीरीं । कट धरोनियां करीं । पाउलें गोजिरीं । विटेवरी शोभलीं ॥१॥ त्याचा छंद माझ्या जीवा । काया वाचा मनें हेवा । संचिताचा ठेवा । जोडी हातीं लागली ॥२॥ रूप डोळियां आवडे । कीर्ति श्रवणीं पवाडे । मस्तका नावडे । उठों पायांवरोनि ॥३॥ तुका म्हणे नाम । ज्याचें नासी क्रोध काम । हरी भवश्रम । उच्चारितां वाचेसी ॥४॥

२०२०. आम्हां हेंचि भांडवल । म्हणों विठ्ठल विठ्ठल ॥१॥ सुखें तरों भवनदी । संगें वैष्णवांची मांदी ॥२॥ बाखाराचें वाण । सांडूं हें जेवूं जेवण ॥३॥ नलगे वारंवार । तुका म्हणे वेरझार ॥४॥

२०२१. आतां माझ्या भावा अंतराय नको देवा ॥१॥ आलें भागा तें करितों । तुझें नाम उच्चारितों ॥२॥ दृढ माझें मन । येथें राखावें बांधोन ॥३॥ तुका म्हणे वाटे । नको फुटों देऊं फांटे ॥४॥

२०२२. काय देवापाशीं उणें । हिंडे दारोदारीं सुनें ॥१॥ करी अक्षरांची आटी । एके कवडीचेसाठीं ॥२॥ निंदी कोणी स्तवी । चिंतातुर सदा जीवीं ॥३॥ तुका म्हणे भांड । जळो जळो त्याचे तोंड ॥४॥

२०२३. मागणें तें मागों देवा । करूं भक्ती त्याची सेवा ॥१॥ काय उणें तयापाशीं । रिद्धिसिद्धी ज्याच्या दासी ॥२॥ कायावाचमन । करूं देवा हें अर्पण ॥३॥ तुका म्हणे विश्वंभर । ज्याच्यानें हें चराचर ॥४॥

२०२४. चित्तीं नाहीं आस । त्याचा पांडुरंग दास ॥१॥ असे भक्तांचिये घरीं । काम न सांगतां करी ॥२॥ अनाथाचा बंधु । अंगीं असे हा संबंधु ॥३॥ तुका म्हणे भावें । देवा सत्ता राबवावें ॥४॥

२०२५. कर्कशेसंगती । दुःख उदंड फजिती ॥१॥ नाहीं इह ना परलोक । मजुर दिसे जैसें रंक ॥२॥ वचन सेंटावरी । त्याचें ठेवूनि धिक्कारी ॥३॥ तुका म्हणे पायीं बेडी । पडिली कपाळीं कुऱ्हाडी ॥४॥

२०२६. बीज पेरी सेतीं । मग गाडेवरी वाहाती ॥१॥ वांयां गेलें ऐसें दिसे । लाभ त्याचे अंगीं वसे ॥२॥ पाल्याची जतन । तरि प्रत्यया येती कण ॥३॥ तुका म्हणे आळा । उदक देतां लाभे फळा ॥४॥

२०२७. जाणावें तें सार । नाहीं तरी दगा फार ॥१॥ डोळे झांकलिया रवि । नाहीं ऐसा होय जेवीं ॥२॥ बहु थोड्या आड । निवारितां लाभे जाड ॥३॥ तुका म्हणे खरें । नेलें हातींचें अंधारें ॥४॥

२०२८. मुळीं नेणपण । जाला तरी अभिमान ॥१॥ वांयां जाय हेंचि खरें । केलें तेणेंचि प्रकारें ॥२॥ अराणूक नाहीं कधीं । जाली तरि भेदबुद्धि ॥३॥ अंतरली नाव । तुका म्हणे नाहीं ठाव ॥४॥

२०२९. संवसारसांतें आले हो आईका । तुटीचें तें नका केणें भरूं ॥१॥ लाभाचा हा काळ अवघे विचारा । पारखी ते करा साह्य येथें ॥२॥ शृंगारिलें दिसे न कळे अंतर । गोविला पदर उगवेना ॥३॥ तुका म्हणे खोटें गुंफतां विसारें । हातिंचिया खरें हातीं घ्यावें ॥४॥

२०३०. सारावीं लिगाडें धरावा सुपंथ । जावें उसंतीत हळूहळू ॥१॥ पुढें जातियाचे उमटले माग । भांबावलें जग आडरानें ॥२॥ वेचल्याचा पाहे वरावरि झाडा । बळाचा निधडा पुढिलिया ॥३॥ तुका म्हणे जैसी दाखवावी वाणी । ते द्यावी भरोनी शेवट तों ॥४॥

२०३१. बुद्धिमंदा शिरीं । भार फजिती पदरीं ॥१॥ जाय तेथें अपमान । पावे हानि थुंके जन ॥२॥ खरियाचा पाड । मागें लावावें लिगाड ॥३॥ तुका म्हणे करी । वर्म नेणें भरोवरी ॥४॥

२०३२. पूर्वजांसी नरका । जाणें तें एक आइका ॥१॥ निंदा करावी चाहाडी । मनीं धरूनि आवडी ॥२॥ मात्रागमना ऐसी । जोडी पातकांची रासी ॥३॥ तुका म्हणे वाट । कुंभपाकाची ते नीट ॥४॥

२०३३. वेडी ते वेडी बहुतच वेडी । चाखतां गोडी चवी नेणे ॥१॥ देहा लावी वात । पालव घाली जाली रात ॥२॥ कडिये मूल भोंवतें भोंये । मोकलुनि रडे धाय ॥३॥ लेंकरें वीत पुसे जगा । माझा गोहो कोण तो सांगा ॥४॥ आपली शुद्धि जया नाहीं । आणिकाची ते जाणे काई ॥५॥ तुका म्हणे ऐसे जन । नरका जातां राखे कोण ॥६॥

२०३४. आवडींचे दान देतो नारायण । बाहे उभारोन राहिलासे ॥१॥ जें जयासी रुची तें करी समोर । सर्वज्ञ उदार मायबाप ॥२॥ ठायीं पडिलिया तेंचि लागे खावें । ठायींचेंचि घ्यावें विचारूनि ॥३॥ बीज पेरूनियां तेंचि घ्यावें फळ । डोरलीस केळ कैचें लागे ॥४॥ तुका म्हणे देवा कांहीं बोल नाहीं । तुझा तूंचि पाहीं शत्रु सखा ॥५॥

२०३५. अडचणीचें दार । बाहेर माजी पैस फार ॥१॥ काय करावें तें मौन । दाही दिशा

हिंडे मन ॥२॥ बाहेर दावी वेश । माजी वासनेचे लेश ॥३॥ नाहीं इंद्रियां दमन । काय मांडिला दुकान ॥४॥ सारविलें निकें । वरि माजी अवघें फिकें ॥५॥ तुका म्हणे अंतीं । कांहीं नलगेचि हातीं ॥६॥

२०३६. लक्ष लक्षूनियां जालों म्हणती देव । तोही नव्हे भाव सत्य जाणा ॥१॥ जालों बहुश्रुत नलगे आतां कांहीं । नको राहूं तेही निश्चिंतीनें ॥२॥ तपें दानें काय मानिसी विश्वास । बीज फळ त्यास आहे पुढें ॥३॥ कर्म आचरण यातीचा स्वगुण । विशेष तो गुण काय तेथें ॥४॥ तुका म्हणे जरी होईल निष्काम । तरिच होय राम देखे डोळां ॥५॥

२०३७. पुरली धांव कडिये घेईं । पुढें पायीं न चलवीं ॥१॥ कृपाळुवे पांडुरंगे । अंगासंगे जिवलगे ॥२ । अवघी निवारावी भूक । अवघ्या दुःख जन्माचें ॥३॥ तुका म्हणे बोलवेना । लावीं स्तना ईश्वरे ॥४॥

२०३८. जें जें मना वाटे गोड । तें तें कोड पुरविसी ॥१॥ आंत तूंचि बाह्यात्कारीं । अवघ्यापरी जालासी ॥२॥ नाहीं सायासाचें काम । घेतां नाम आवडी ॥३॥ तुका म्हणे सर्व सांगे । पांडुरंगे दयाळे ॥४॥

२०३९. जेथें माझी दृष्टी जाय । तेथें पाय भावीन ॥१॥ असेन या समाधानें । पूजा मनें करीन ॥२॥ अवघाच अवघे देसी । सुखरासी संपन्न ॥३॥ तुका म्हणे बंधन नाहीं । ऐसें कांहीं तें करूं ॥४॥

२०४०. भला भला पुंडलिका । मानलासी जनलोकां । कोण्या काळें सुखा । ऐशा कोण पावत ॥१॥ नातुडे जो कवणे परी । उभा केला विटेवरी ॥२॥ अवघा आणिला परिवार । गोपी गोपाळांचा भार ॥३॥ तुका म्हणे धन्य जालें । भूमीं वैकुंठ आणिलें ॥४॥

२०४१. अवघे चुकविले सायास । तप रासी जीवा नास ॥१॥ जीव देऊनियां बळी । अवघीं तारिलीं दुबळीं । केला भूमंडळीं । माजी थोर पवाडा ॥२॥ कांहीं न मगे याची गती । लुटवितो जगा हातीं ॥३॥ तुका म्हणे भक्तराजा । कोण वर्णी पार तुझा ॥४॥

२०४२. प्रमाण त्याच्या बोला । देव भक्ताचा अंकिला ॥१॥ न पुसतां जातां नये । खालीं बैसतांही भिये ॥२॥ अवघा त्याचा होय । जीव भावासहित ॥३॥ वदे उपचारें वाणी । कांहीं माग म्हणऊनि ॥४॥ उदासीनाच्या लागें । तुका म्हणे धांवे मागें ॥५॥

२०४३. कांहीं न मागती देवा । त्यांचि करूं धांवे सेवा ॥१॥ हळूहळू फेडी ऋण । होउनियां रूपें दीन ॥२॥ होऊं न सके वेगळा । क्षण एक त्यां निराळा ॥३॥ तुका म्हणे भक्तिभाव । तोचि देवाचाही देव ॥४॥

२०४४. जाणे अंतरींचा भाव । तोचि करितो उपाव ॥१॥ नलगे सांगावें मागावें । जीवें

भावें अनुसरावें । अविनाश घ्यावें । फळ धीर धरोनि ॥२॥ बाळा न मागतां भोजन । माता घाली पाचारून ॥३॥ तुका म्हणे तरी । एकीं लंघियेले गिरी ॥४॥

२०४५. आम्हीं नाचों तेणें सुखें । वाहुं टाळी गातों मुखे ॥१॥ देव कृपेचा कोंवळा । शरणागता पाळी लळा ॥२॥ आम्हां जाला हा निर्धार । मागें तारिले अपार ॥३॥ तुका म्हणे संतीं । वर्म दिलें आम्हां हातीं ॥४॥

२०४६. जालों निर्भर मानसीं । म्हणऊनि कळलासी ॥१॥ तुझे म्हणविती त्यांस । भय चिंता नाहीं आस । चुकविशी पाश । गर्भवासयातना ॥२॥ तुझें जाणोनियां वर्म । कंठीं धरियेलें नाम ॥३॥ तुका म्हणे तेणें सुखें । निरसलीं जन्मदु:खें ॥४॥

२०४७. नको दुष्टसंग । पडे भजनामधीं भंग ॥१॥ काय विचार देखिला । सांग माझा तो विठ्ठला ॥२॥ तुज निषेधितां । मज न साहे सर्वथा ॥३॥ एका माझ्या जीवें । वाद करूं कोणासवें ॥४॥ तुझे वर्णूं गुण । कीं हे राखों दुष्टजन ॥५॥ काय करूं एका । मुखें सांग म्हणे तुका ॥६॥

२०४८. विठ्ठल माझी माय । आम्हां सुखा उणें काय ॥१॥ घेतों अमृताची धणी । प्रेम वोसंडलें स्तनीं ॥२॥ क्रीडों वैष्णवांच्या मेळीं । करूं आनंदाच्या जळीं ॥३॥ तुका म्हणे कृपावंत । ठेवी आम्हांपाशीं चित्त ॥४॥

२०४९. भक्तिसुखें जें मातले । ते कळिकाळा शूर जाले ॥१॥ हातीं बाण हरिनामाचे । वीर गर्जती विठ्ठलाचे ॥२॥ महादोषां जाला त्रास । जन्ममरणां केला नास ॥३॥ सहस्त्रनामाची आरोळी । एक एकाहूनि बळी ॥४॥ नाहीं आणिकांचा गुमान । ज्याचें अंकित त्यावांचून ॥५॥ तुका म्हणे त्यांच्या घरीं । मोक्षसिद्धी या कामारी ॥६॥

२०५०. पंधरा दिवसां एक एकादशी । कां रे न करिसी व्रतसार ॥१॥ काय तुझा जीव जातो एका दिसें । फराळाच्या मिसें धणी घेसी ॥२॥ स्वहित कारण मानवेल जन । हरिकथा पूजन वैष्णवांचें ॥३॥ थोडे तुज घरीं होती उजगरे । देउळासी कां रे मरसी जातां ॥४॥ तुका म्हणे कां रे सुकुमार जालासी । काय जाब देसी यमदूतां ॥५॥

२०५१. कथा हें भूषण जनामध्यें सार । तरले अपार बहु येणें ॥१॥ नीचिये कुळींचा उंचा वंद्य होय । हरीचे जो गाय गुणवाद ॥२॥ देव त्याची माथां वंदी पायधुळी । दीप जाला कुळीं वंशाचिये ॥३॥ त्याची निंदा करी त्याची कुष्ट वाणी । मुख संवदणी रजकाची ॥४॥ तुका म्हणे नाहीं चोरीचा व्यापार । विठ्ठलाचें सार नाम घ्यावें ॥५॥

२०५२. टाळघोळ सुख नामाचा गजर । घोष जयजयकार ब्रह्मानंदु ॥१॥ गरुडटके दिंडीं पताकांचे भार । आनंद अपार ब्रह्मादिकां ॥२॥ आनंदें वैष्णव जाती लोटांगणीं । एक एकाहूनि भद्रजाति ॥३॥ तेणें सुखें सुटे पाषाणा पाझर । नष्ट खळ नर शुद्ध होती ॥४॥ तुका म्हणे सोपें

वैकुंठासी जातां । रामकृष्ण कथा हेचि वाट ॥५॥

२०५३. देखोवेखीं करिती गुरु । नाहीं ठाउका विचारु ॥१॥ वर्म तें न पडे ठायीं । पांडुरंगाविण कांहीं ॥२॥ शिकों कळा शिकों येती । प्रेम नाहीं कोणा हातीं ॥३॥ तुका म्हणे सार । भक्ति नेणती गव्हार ॥४॥

२०५४. भाग्यवंत म्हणों तयां । शरण गेले पंढरिराया ॥१॥ तरले तरती हा भरंवसा । नामधारकाचा ठसा ॥२॥ भुक्तिमुक्तिचें तें स्थळ । भोळेभाविकां निर्मळ ॥३॥ गाईलें पुराणीं । तुका म्हणे वेदवाणी ॥४॥

२०५५. जैसें चित्त जयावरि । तैसें जवळी तें दुरीं ॥१॥ नलगे द्यावा परिहार । या कोरडें उत्तर । असे अभ्यंतर । साक्षभूत जवळी ॥२॥ अवघें जाणे सूत्रधारी । कोण नाचे कोणेपरी ॥३॥ तुका म्हणे बुद्धि । ज्याची तया तेच सिद्धि ॥४॥

२०५६. नाहीं पाइतन भूपतीशीं दावा । धिग त्या कर्तव्या आगी लागो ॥१॥ मुंगिचिया मुखा गजाचा आहार । न साहे भार जाय जीवें ॥२॥ तुका म्हणे आधीं करावा विचार । शूरपणें तीर मोकलावा ॥३॥

२०५७. तिन्ही लोक ऋणें बांधिले जयानें । सर्वसिद्धि केणें तया घरीं ॥१॥ पंढरीचोहोटां घातला दुकान । मांडियेलें वाण आवडीचे ॥२॥ आषाढी कार्तिकी भरियेले हाट । इनाम हे पेंठ घेतां देतां ॥३॥ मुक्ति तेथें कोणी हातीं नेघे फुका । लुटितील सुखा प्रेमाचिया ॥४॥ तुका म्हणे संतसज्जन भाग्याचे । अनंता जन्मींचे सांटेकरी ॥५॥

२०५८. दुःखाचिये साटीं तेथें मिळे सुख । अनाथाची भूक दैन्य जाय ॥१॥ उदाराचा राणा पंढरीस आहे । उभारोनि बाहे पालवितो ॥२॥ जाणतियाहूनि नेणत्याची गोडी । आळिंगी आवडी करूनियां ॥३॥ शीण घेऊनियां प्रेम देतो साटी । न विचारी तुटी लाभ कांहीं ॥४॥ तुका म्हणे असों अनाथ दुबळीं । आम्हांसी तो पाळी पांडुरंग ॥५॥

२०५९. आणीक मात माझ्या नावडे जीवासी । काय करूं यासी पांडुरंगा ॥१॥ मुखा तेंचि गोडी श्रवणीं आवडी । चित्त माझें ओढी तुझे पायीं ॥२॥ जये पदीं नाहीं विठ्ठलाचें नाम । मज होती श्रम आइकतां ॥३॥ आणिकाचें मज म्हणवितां लाज । वाटे हें सहज न बोलावें ॥४॥ तुका म्हणे मज तूंचि आवडसी । सर्वभावेविसीं पांडुरंगा ॥५॥

२०६०. कळेल हें तैसें गाईन मी तुज । जनासवें काज काय माझें ॥१॥ करीन मी स्तुती आपुले आवडी । जैसी माझ्या गोडी वाटे जीवा ॥२॥ होऊनि निर्भर नाचेन मी छंदें । आपुल्या आनंदें करूनियां ॥३॥ काय करूं कळा युक्ती या कुसरी । जाणिवेच्या परी सकळिका ॥४॥ तुका म्हणे माझें जयासवें काज । भोळा तो सहज पांडुरंग ॥५॥

२०६१. तयास नेणतीं बहु आवडती । होय जयां चित्तीं एक भाव ॥१॥ उपमन्यु धुरु हे काय जाणती । प्रल्हादाच्या चित्तीं नारायण ॥२॥ कोळी भिल्ल पशु श्वापदें अपारें । कृपेच्या सागरें तारियेलीं ॥३॥ काय तीं गोपाळें चांगलीं शाहाणीं । तया चक्रपाणी जेवी सवें ॥४॥ तुका म्हणे भोळा भाविक हा देव । आम्ही त्याचे पाव धरुनी ठेलों ॥५॥

२०६२. नलगे पाहावें अबद्ध वांकडें । उच्चारावें कोडें नाम तुझें ॥१॥ नाहीं वेळ काळ पंडितांचा धाक । होत कां वाचक वेदवक्ते ॥२॥ वेदीं जें प्रतिपाद्य न कळे पाहातां । तैशी या अनंता ठेवूं नामें ॥३॥ आपुलिया मना उपजे आनंद । तैसे करूं छंद कथेकाळीं ॥४॥ तुका म्हणे आम्ही आनंदेंचि धालों । आनंदचि ल्यालों अळंकार ॥५॥

२०६३. दैन्य दुःख आम्हां न येती जवळी । दहन हे होळी होती दोष ॥१॥ सर्व सुखें येती मानें लोटांगणीं । कोण यांसी आणी दृष्टीपुढें ॥२॥ आमुची आवडी संतसमागम । आणीक त्या नाम विठोबाचें ॥३॥ आमचें मागणें मागों त्याची सेवा । मोक्षाची निर्दैवा कोणा चाड ॥४॥ तुका म्हणे पोटीं सांठविला देव । न्यून तो भाव कोण आम्हां ॥५॥

२०६४. काळतोंडा सुना । भलतें चोरुनि करी जना ॥१॥ धिग त्याचें साधुपण । विटाळुनि वर्ते मन ॥२॥ मंत्र ऐसे घोकी । वश व्हावें जेणें लोकीं ॥३॥ तुका म्हणे थीत । नागवला नव्हे हित ॥४॥

२०६५. विठ्ठल मुक्तिदाता । नव्हे मरो हें बोलतां ॥१॥ मज न साहावे कानीं । विष उत्तर लागे मनीं ॥२॥ हरिकथेतें धिक्कारी । शत्रु माझा तोचि वैरी ॥३॥ सुना काळतोंडा । जो या देवा म्हणे धोंडा ॥४॥ अहं म्हणे ब्रह्म । नेणें भक्तीचें तें वर्म ॥५॥ तुका म्हणे क्षण । नको तयाचें दर्शन ॥६॥

२०६६. यमपुरी त्याणीं वसविली जाणा । उच्छेद भजना विधी केला ॥१॥ अवघड कोणी न करी सांगतां । सुलभ बहुतां गोड वाटे ॥२॥ काय ते नेणते होते मागें ऋषी । आधार लोकांसी ग्रंथ केले ॥३॥ द्रव्य दारा कोणें स्थापियलें धन । पिंडाचे पाळण विषयभोग ॥४॥ तुका म्हणे दोहीं ठायीं हा फजित । पावे यमदूत जना हातीं ॥५॥

२०६७. न कळतां कोणीं मोडियलें व्रत । तया प्रायश्चित्त चाले कांहीं ॥१॥ जाणतियां वज्रलेप जाले थोर । तयांस अघोर कुंभपाक ॥२॥ जातां जरी कोणी नाइके सांगतां । तया शिकवितां तेंचि पाप ॥३॥ काय करूं मज देवें बोलविलें । माझें खोळंबलें काय होतें ॥४॥ तुका म्हणे जना पाहा विचारूनी । सुख वाटे मनीं तेंचि करा ॥५॥

२०६८. वाचे विठ्ठल नाहीं । तोचि प्रेतरूप पाहीं ॥१॥ धिग त्याचें ज्यालेपण । भार न साहे मेदिन ॥२॥ न बैसें कीर्तनीं । गुण नाइके जो कानीं ॥३॥ जातां कांटाळे देउळा । तोचि

सुना मुखकाळा ॥४॥ हरिभक्तीविण । जळो त्याचें शहाणपण ॥५॥ तुका म्हणे तेणें । वंशा आणियेलें उणें ॥६॥

२०६९. तारिलीं बहुत चुकवूनि घात । नाम हें अमृत स्वीकारितां ॥१॥ नेणतां सायास शुद्ध आचरण । यातीकुळहीन नामासाठीं ॥२॥ जन्म नाम धरी भक्तीच्या पाळणा । आकार कारणा याचसाठीं ॥३॥ असुरीं दाटली पाप होतां फार । मग फेडी भार पृथिवीचा ॥४॥ तुका म्हणे देव भक्तपण सार । कवतुक वेव्हार तयासाठीं ॥५॥

२०७०. याचिया आधारें राहिलों निश्चिंत । ठेवूनियां चित्त पायीं सुखें ॥१॥ माझें सुख दु:ख जाणे हित फार । घातलासे भार पांडुरंगा ॥२॥ कृपेची पोसणीं ठायींचीं अंकिलीं । म्हणऊनि लागली यास चिंता ॥३॥ मन राखे हातीं घेउनियां काठी । इंद्रियें थापटी फांकों नेदी ॥४॥ तुका म्हणे यासी अवघड नाहीं । शरणागता कांहीं रक्षावया ॥५॥

२०७१. उभा उभी फळ । अंगीं मंत्राचिया बळ ॥१॥ म्हणा विठ्ठल विठ्ठल । गोड आणि स्वल्प बोल ॥२॥ कळिकाळाची बाधा । नव्हे उच्चारितां सदा ॥३॥ तुका म्हणे रोग । वारे भवाऐसा भोग ॥४॥

२०७२. पाहोनि अधिकार । तैसें बोलावें उत्तर ॥१॥ काय वाउगी घसघस । आम्ही विठोबाचे दास ॥२॥ आम्ही जाणों एका देवा । जैसी तैसी करूं सेवा ॥३॥ तुका म्हणे भावें । माझें पुढें पडेल ठावें ॥४॥

२०७३. न वजतां घरा । आम्ही कोणाच्या दातारा ॥१॥ कां हे छळूं येती लोक । दाट बळेंचि कंटक ॥२॥ नाहीं आम्ही खात । कांहीं कोणाचें लागत ॥३॥ कळे तैसी सेवा । तुका म्हणे करूं देवा ॥४॥

२०७४. मोहरोनि चित्ता । आणूं हळूचि वरि हिता ॥१॥ तों हे पडती आघात । खोडी काढिती पंडित ॥२॥ संसारा भेणें । कांहीं उसंतीतों पेणें ॥३॥ एखादिया भावें । तुका म्हणे जवळी यावें ॥४॥

२०७५. काय जाणों वेद । आम्ही आगमाचे भेद ॥१॥ एक रूप तुझें मनीं । धरूनि राहिलों चिंतनीं ॥२॥ कोठें अधिकार । नाहीं रानट विचार ॥३॥ तुका म्हणे दीना । नुपेक्षावें नारायणा ॥४॥

२०७६. धर्माचें पाळण । करणें पाखांड खंडण ॥१॥ हेंचि आम्हां करणें काम । बीज वाढवावें नाम ॥२॥ तीक्ष्ण उत्तरें । हातीं घेउनि बाण फिरे ॥३॥ नाहीं भीड भार । तुका म्हणे साना थोर ॥४॥

२०७७. निवडावे खडे । तरी दळणा वोज घडे ॥१॥ नाहिं तरि नासोनि जाय । कारण

आळस उरे हाय ॥२॥ निवडावें तन । शेतीं करावें राखण ॥३॥ तुका म्हणे नीत । न विचारितां नव्हे हित ॥४॥

२०७८. दुर्जनाचा मान । सुखें करावा खंडण ॥१॥ लाता हाणोनियां वारी । गुंडा वाट शुद्ध करी ॥२॥ बहुतां पीडी खळ । त्याचा धरावा विटाळ ॥३॥ तुका म्हणे नखें । काढुनि टाकिजेती सुखें ॥४॥

२०७९. नका धरूं कोणी । राग वचनाचा मनीं ॥१॥ येथें बहुतांचें हित । शुद्ध करोनि राखा चित्त ॥२॥ नाहीं केली निंदा । आम्हीं दूषिलेंसे भेदा ॥३॥ तुका म्हणे मज । येणेंविण काय काज ॥४॥

२०८०. काहीं जडभारी । पडतां ते अवसरीं ॥१॥ तुझें आठवावे पाय । आम्हीं मोकलूनि धाय ॥२॥ तहान पीडी भूक । शीत उष्ण वाटे दुःख ॥३॥ तुका म्हणे देहयोगें । वारंवार पिडिता भोगें ॥४॥

२०८१. होउनि कृपाळ । भार घेतला सकळ ॥१॥ तूंचि चालविसी माझें । भार सकळही ओझें ॥२॥ देह तुझ्या पायीं । ठेवुनि झालों उतराई ॥३॥ कायावाचामनें । तुका म्हणे दुजें नेणें ॥४॥

२०८२. आतां होईं माझे बुद्धीचा जनिता । अवरावें चित्ता पांडुरंगा ॥१॥ येथूनियां कोठें न वजें बाहेरी । ऐसें मज धरीं सत्ताबळें ॥२॥ अनावर गुण बहुतां जातींचे । न बोलावें वाचे ऐसें करीं ॥३॥ तुका म्हणे हित कोणिये जातीचें । तुज ठावें साचें मायबापा ॥४॥

२०८३. नित्य मनासी करितों विचार । तों हें अनावर विषयलोभी ॥१॥ आतां मज राखें आपुलिया बळें । न देखें हें जाळें उगवतां ॥२॥ सांपडलों गळीं नाहीं त्याची सत्ता । उगळी मागुता घेतला तो ॥३॥ तुका म्हणे मी तों अज्ञानचि आहें । परि तुझी पाहें वास देवा ॥४॥

२०८४. दुर्बळाचे हातीं सांपडलें धन । करितां जतन नये त्यासी ॥१॥ तैसी परि मज झाली नारायणा । योगक्षेम जाणा तुम्ही आतां ॥२॥ खातां लेतां नये मिरवितां वरि । राजा दंड करी जन राग ॥३॥ तुका म्हणे मग तळमळ उरे । देखिलें तें झुरे पाहावया ॥४॥

२०८५. मागें जैसा होता माझें अंगीं भाव । तैसा एक ठाव नाहीं आतां ॥१॥ ऐसें ग्वाही माझें मन मजपाशीं । तुटी मुदलेंसी दिसे पुढें ॥२॥ पुढिलांचे मना आणी गुणदोष । पूज्य आपणांस करावया ॥३॥ तुका म्हणे जालि कोंबड्याची परी । पुढेंचि उकरी लाभ नेणे ॥४॥

२०८६. किती तुजपाशीं देऊं परिहार । जाणसी अंतर पांडुरंगा ॥१॥ आतां माझे हातीं देईं माझें हित । करी माझें चित्त समाधान ॥२॥ राग आला तरी कांपूं नये मान । बाळा मायेविण कोण दुजें ॥३॥ तुका म्हणे तैसा होईल लौकिक । मागे बाळ भीक समर्थाचें ॥४॥

२०८७. लाज वाटे पुढें तोंड दाखवितां । परि जाऊं आतां कोणापाशीं ॥१॥ चुकलिया कामा मागतों मुशारा । लाज फजितखोरा नाहीं मज ॥२॥ पाय सांडूनियां फिरतों बासर । स्वामिसेवाचोर होऊनियां ॥३॥ तुका म्हणे मज पाहिजे दंडिलें । पुढें हें घडलें न पाहिजें ॥४॥

२०८८. पुढिलिया सुखें निंब देतां भले । बहुत वारलें होय दुःख ॥१॥ हें तों वर्म असे माउलीच्या हातीं । हाणी मारी प्रीती हितासाठीं ॥२॥ खेळतां विसरे भूक तहान घर । धरूनियां कर आणी बळें ॥३॥ तुका म्हणे पाळी तोंडींचिया घांसे । उदार सर्वस्वें सर्वकाळ ॥४॥

२०८९. आतां गुण दोष काय विचारिसी । मी तों आहें रासी पातकाची ॥१॥ पतितपावनासवे समागम । आपुलाले धर्म चालवीजे ॥२॥ घणघायीं भेटी लोखंड परिसा । तरी अनारिसा न पालटे ॥३॥ तुका म्हणे माती कोण पुसे फुका । कस्तुरीच्या तुका समागमें ॥४॥

२०९०. कृपावंत दुजें नाहीं तुम्हां पोटीं । लाडें बोलें गोठी सुख मातें ॥१॥ घेउनि भातुकें लागसील पाठी । लाविसील ओंठीं ब्रह्मरस ॥२॥ आपुलिया पांखे घालिसी पाखर । उदार मजवर कृपाळू तूं ॥३॥ तुका म्हणे आम्हांकारणें गोविंदा । वागविसी गदा सुदर्शन ॥४॥

२०९१. पाळिलों पोसिलों जन्मजन्मांतरीं । वागविलों करीं धरोनियां ॥१॥ आतां काय माझा घडेल अव्हेर । मागें बहु दूर वागविलें ॥२॥ नेदी वारा अंगीं लागों आघाताचा । घेतला ठायींचा भार माथां ॥३॥ तुका म्हणे बोल करितों आवडी । अविट तेचि गोडी अंतरींची ॥४॥

२०९२. पांडुरंगा कांहीं आईकावी मात । न करावें मुक्त आतां मज ॥१॥ जन्मांतरें मज तैसीं देईं देवा । जेणें चरणसेवा घडे तुझी ॥२॥ वाखाणीन कीर्ती आपुलिया मुखें । नाचेन मी सुखें तुजपुढें ॥३॥ करूनि कामारी दास दीनाहुनी । आपुल्या अंगणीं ठाव मज ॥४॥ तुका म्हणे आम्ही मृत्युलोकीं भले । तुझेचि अंकिले पांडुरंगा ॥५॥

२०९३. माझे अंतरींचें तोचि जाणे एक । वैकुंठनायक पांडुरंग ॥१॥ जीव भाव त्याचे ठेवियेला पायीं । मज चिंता नाहीं कवणेविशीं ॥२॥ सुखसमारंभें संतसमागम । गाऊं वाचे नाम विठोबाचें ॥३॥ गातां पुण्य होय आइकतां लाभ । संवसारबंद तुटतील ॥४॥ तुका म्हणे जीव तयासी विकिला । आणीक विठ्ठलाविण नेणें ॥५॥

२०९४. कथा सुख करी कथा मुक्त करी । कथा याची बरी विठोबाची ॥१॥ कथा पाप नासी उद्धरिले दोषी । समाधि कथेसी मूढजना ॥२॥ कथा तप ध्यान कथा अनुष्ठान । अमृत हे पान हरिकथा ॥३॥ कथा मंत्रजप कथा हरी ताप । कथाकाळीं कांप कळिकाळासी ॥४॥ तुका म्हणे कथा देवाचेंही ध्यान । समाधि लागोन उभा कथे ॥५॥

२०९५. काय ऐसा सांगा । धर्म मज पांडुरंगा ॥१॥ तुझें पायीं पावें ऐसा । जेणें उगवे हा फांसा ॥२॥ करीं कृपादान । तैसें बोलवीं वचन ॥३॥ तुका म्हणे देवा । माझें हृदय वसवा ॥४॥

२०९६. भला म्हणे जन । परि नाही समाधान ॥१॥ माझें तळमळी चित्त । अंतरलें दिसे हित ॥२॥ कृपेचा आधार । नाहीं दंभ जाला फार ॥३॥ तुका म्हणे कृपे । अंतराय कोण्या पापें ॥४॥

२०९७. शिकविलें ते बोल । बोले तैसी नाहीं ओल ॥१॥ आतां देवा संदेह नाहीं । वांयां गेलों यासी कांहीं ॥२॥ एकांताचा वास । नाहीं संकल्पाचा नास ॥३॥ बुद्धि नाहीं स्थिर । तुका म्हणे शब्दा धीर ॥४॥

२०९८. उचिताचा दाता । कृपावंता तूं अनंता ॥१॥ कां रे न घालिसी धांव । तुझें उच्चारितां नांव ॥२॥ काय बळयुक्ति । नाहीं तुझे अंगीं शक्ति ॥३॥ तुका म्हणे तूं विश्वंभर । वोस माझें कां अंतर ॥४॥

२०९९. वाहावतों पुरीं । आतां उचित तें करीं ॥१॥ माझी शक्ति नारायणा । कींव भाकावी करुणा ॥२॥ आम्हां ओढी काळ । तुझें क्षीण झालें बळ ॥३॥ तुका म्हणे गोडी । जीवा मातेचिया ओढी ॥४॥

२१००. आतां घेईं माझें । भार सकळही ओझें ॥१॥ काय करिसी होई वाड । आलों पोटासीं दगड ॥२॥ तूंचि डोळे वाती । होईं दीपक सांगातीं ॥३॥ तुका म्हणे कांहीं । विचाराया चाड नाहीं ॥४॥

२१०१. असोत हे बोल । अवघें तूंचि भांडवल ॥१॥ माझा मायबाप देवा । सज्जन सोयरा केशवा ॥२॥ गाळियेले भेद । सारियेले वादावाद ॥३॥ तुका म्हणे मधीं । आतां न पडे उपाधि ॥४॥

२१०२. करीन कोल्हाळ । आतां हाचि सर्वकाळ ॥१॥ आतां ये वो माझे आई । देईं भातुकें विठाई ॥२॥ उपायासी नाम । दिले याचि पुढें क्षेम ॥३॥ बीज आणि फळ । तुका म्हणे हेंचि मूळ ॥४॥

२१०३. धनासींच धन । करी आपणा जतन ॥१॥ तुज आळवितां गोडी । पांडुरंगा खरी जोडी ॥२॥ जेविल्याचें खरें । वरी उमटे ढेंकरें ॥३॥ तुका म्हणे धाय । तेथें कोठें उरे हाय ॥४॥

२१०४. अनुभवा आलें । माझें चित्तींचें क्षरलें ॥१॥ असे जवळी अंतरे । फिरे आवडीच्या फेरें ॥२॥ खादलेंचि वाटे । खावें भेटलेंचि भेटे ॥३॥ तुका म्हणे उभें । आम्हीं राखियेलें लोभें ॥४॥

२१०५. पोटीं शूळ अंगीं उटी चंदनाची । आवडी सुखाची कोण तया ॥१॥ तैसें मज कांगा केलें पंढरिराया । लौकिक हा वांयां वाढविला ॥२॥ ज्वरिलियापुढें वाढिलीं मिष्टान्नें । काय चवी तेणें घ्यावी त्यांची ॥३॥ तुका म्हणे मढें शृंगारिलें वरी । तेचि जाली परी मज देवा ॥४॥

२१०६. बेगडाचा रंग राहे कोण काळ । अंग हें पितळ न देखतां ॥१॥ माझें चित्त मज

जवळीच ग्वाही । तुझी मज नाहीं भेटी ऐसी ॥२॥ दासीसुता नाहीं पितियाचा ठाव । अवघेंचि वाव सोंग त्याचें ॥३॥ तुका म्हणे माझी केली विटंबना । अनुभवे जना येईल कळों ॥४॥

२१०७. मजपुढें नाहीं आणीक बोलतां । ऐसे कांहीं चित्ता वाटतसे ॥१॥ याचा कांहीं तुम्हीं देखावा परिहार । सर्वज्ञ उदार पांडुरंगा ॥२॥ कामक्रोधें नाहीं सांडिलें आसन । राहिले वसोन देहामध्यें ॥३॥ तुका म्हणे आतां जालों उतराई । कळों यावें पायीं निरोपिलें ॥४॥

२१०८. सावित्रीची विटंबणा । रांडपणा करीतसे ॥१॥ काय जाळावें तें नांव । अवघें वाव असे तें ॥२॥ कुबेर नांव मोळी वाहे । कैसी पाहें फजिती ॥३॥ तुका म्हणे ठुणगुण देखें । उगीच मूर्खे फुंदतां ॥४॥

२१०९. न गमेसी जाली दिवसरजनी । राहिलों लाजोनी न बोलवे ॥१॥ रुचिविण काय शब्द वाऱ्या माप । अनादरें कोप येत असे ॥२॥ आपुलिया रडे आपुलेंचि मन । दाटे समाधान पावतसें ॥३॥ तुका म्हणे तुम्ही असां जी जाणते । काय करूं रिते वादावाद ॥४॥

२११०. मेल्यावरि मोक्ष संसारसंबंध । आरालिया बद्ध ठेवा आम्हां ॥१॥ वागवीत संदेह राहों कोठवरी । मग काय थोरी सेवकाची ॥२॥ गाणें गीत आम्हां नाचणें आनंदें । प्रेम कोठें भेदें अंगा येतें ॥३॥ तुका म्हणे किती सांगावे दृष्टांत । नसतां तूं अनंत सानुकूळ ॥४॥

२१११. एकाएकीं आतां असावेंसें वाटे । तरिच हे खोटे चाळे केले ॥१२॥ वाजवूनि तोंड घातलें बाहेरी । कल्पें करुनी दारीं माजी वसा ॥२॥ उजेडाचा केला दाटोनि अंधार । सवें हुद्देदार चेष्टविला ॥३॥ तुका म्हणे भय होतें तोंचि वरी । होती कांहीं उरी स्वामिसेवा ॥४॥

२११२. काय नव्हेसी तूं एक । देखों कासया पृथक ॥१॥ मुंग्या कैंचे मुंगळे । नटनाट्य तुझे चाळे ॥२॥ जाली तरी मर्यादा । किंवा त्रासावें गोविंदा ॥३॥ तुका म्हणे साचा । कोठें जासी हृदयींचा ॥४॥

२११३. कां जी वाढविलें । न लगतां हे उगलें ॥१॥ आतां मानितां कांटाळा । भोवतीं मिळालिया बाळा ॥२॥ लावूनिया सवे । पळतां दिसाल बरवे ॥३॥ तुका म्हणे बापा । येतां न कळाचि रूपा ॥४॥

२११४. क्षुधेलिया अन्न । द्यावें पात्र न विचारून ॥१॥ धर्म आहे वर्मा अंगीं । कळलें पाहिजे प्रसंगीं ॥२॥ द्रव्य आणि कन्या । तेथें कुळ कर्म शोधण्या ॥३॥ तुका म्हणे पुण्य गांठी । तरिच उचिताची भेटी ॥४॥

२११५. वेचावें तें जीवें । पूजा घडे ऐशा नांवें ॥१॥ बिगारीची ते बिगारी । साक्षी अंतरींचा हरी ॥२॥ फळ बीजाऐसें कार्यकारणासरिसें ॥३॥ तुका म्हण मान । लवणासारिखें लवण ॥४॥

२११६. मज नाहीं धीर । तुम्ही न करा अंगिकार ॥१॥ ऐसें पडिलें विषम । बळी देवाहूनि

कर्म ॥२॥ चालों नेणें वाट । केल्या न पवाचि बोभाट ॥३॥ वेचों नेणें जीवें । तुका उदास धरिला देवें ॥४॥

२११७. तळमळी चित्त दर्शनाची आशा । बहु जगदीशा करुणा केली ॥१॥ वचनींच संत पावलें स्वरूप । माझें नेदी पाप योगा येऊं ॥२॥ वेठीऐसा करीं भक्तिवेवसाव । न पवेचि जीव समाधान ॥३॥ तुका म्हणे कईं देसील विसांवा । पांडुरंगीं धांवा घेतें मन ॥४॥

२११८. हागतांही खोडी । चळण मोडवितें काडी ॥१॥ ऐसे अनावर गुण । आवरावे काय म्हूण ॥२॥ नाहीं जरी संग । तरी बडबडती रंग ॥३॥ तुका म्हणे देवा । तुमची न घडेचि सेवा ॥४॥

२११९. देह निरसे तरी । बोलावया नुरे उरी ॥१॥ येर वाचेचें वाग्जाळ । अळंकारापुरते बोल ॥२॥ काचें तरी कढे । जाती ऐसें चित्त ओढे ॥३॥ विष्णुदास तुका । पूर्ण धणी जाले चुका ॥४॥

२१२०. खोट्याचा विकरा । येथें नव्हे कांच हिरा ॥१॥ काय दावायाचें काम । उगाच वाढवावा श्रम ॥२॥ परीक्षकाविण । मिरवो जाणें तें तें हीण ॥३॥ तुका पाया पडे । वाद पुरे हे झगडे ॥४॥

२१२१. पंढरीस घडे अतित्यायें मृत्य । तो जाय पतित अध:पाता ॥१॥ दुराचाऱ्या मोक्षसुखाची वसति । भोळी बाळमूर्ति पांडुरंग ॥२॥ कालियापें भेद मानितां निवाडे । श्रोत्रियांसी जोडे अंत्यजता ॥३॥ माहेरीं सलज्ज ते जाणा सिंदळी । काळिमा काजळी पाववितें ॥४॥ केला न सहावे तीर्थ उपहास । कथेविण दोषसाधन तें ॥५॥ तुका म्हणे तेथें विश्वास जतन । पुरे भीमास्नान सम पाय ॥६॥

२१२२. चातुर्याच्या अनंत कळा । सत्या विरळा जाणत ॥१॥ हांसत्यासवें हांसे जन । रडतां भिन्न पालटे ॥२॥ जळो ऐसे वांजट बोल । गुणां मोल भूस मिथ्या ॥३॥ तुका म्हणे अंधळ्याऐसें । वोंगळ पिसें कौतुकें ॥४॥

२१२३. नयो वाचे अनुचित वाणी । नसो मनी कुडी बुद्धि ॥१॥ ऐसें मागा अरे जना । नारायणा विनवूनि ॥२॥ कामक्रोधां पडो चिरा । ऐसा बरा सायास ॥३॥ तुका म्हणे नानाछंदें । या विनोदें न पडावें ॥४॥

२१२४. माझिया देहाची मज नाहीं चाड । कोठें करूं कोड आणिकांचें ॥१॥ इच्छितातीं मान मागा देवापाशीं । असा संचितासी गुंतले हो ॥२॥ देह आम्हीं केला भोगाचे सांभाळीं । राहिलों निराळीं मानामान ॥३॥ तुका म्हणे कोणें वेचावें वचन । नसतां तो सीण वाढवावा ॥४॥

२१२५. धरितां इच्छा दुरी पळे । पाठी सोहळे उदासा ॥१॥ म्हणऊनि असट मन । नका खूण सांगतों ॥२॥ आमिषापाशीं अवघें वर्म । सोसें श्रम पाववी ॥३॥ तुका म्हणे बीज न्यावें । तेथें यावें फळानें ॥४॥

२१२६. वेद शास्त्र नाहीं पुराण प्रमाण । तयाचें वदन नावलोका ॥१॥ तार्किकाचें अंग आपणा पारिखें । माजिऱ्यासारिखे वाईचाळे ॥२॥ माता निंदी तया कोण तो आधार । भंगलें खापर याच नांवें ॥३॥ तुका म्हणे आडरानें ज्याची चाली । तयाची ते बोली मिठेंविण ॥४॥

२१२७. कस्तुरीचे अंगीं मिनली मृत्तिका । मग वेगळी कां येईल लेखों ॥१॥ तयापरि भेद नाहीं देवभक्ती । संदेहाच्या युक्ति सरों द्याव्या ॥२॥ इंधनें तें आगी संयोगाच्या गुणें । सागरा दरुषणें वोहोळ तोंचि ॥३॥ तुका म्हणे माझें साक्षीचें वचन । येथें तो कारण शुद्ध भाव ॥४॥

२१२८. भक्ति तें नमन वैराग्य तो त्याग । ज्ञान ब्रह्मीं भोग ब्रह्मतनु ॥१॥ देहाच्या निरसनें पाविजे या ठाया । माझी ऐसी काया जंव नव्हे ॥२॥ उदक अग्नि धान्य जाल्या घडे पाक । एकाविण एक कामा नये ॥३॥ तुका म्हणे मज कळते चांचणी । बडबडीची वाणी अथवा सत्य ॥४॥

२१२९. श्रीसंतांचिया माथा चरणांवरी । साष्टांग हें करीं दंडवत ॥१॥ विश्रांती पावलों सांभाळा उत्तरीं वाढलें अंतरीं प्रेमसुख ॥२॥ डौरली हे काया कृपेच्या वोरसें । नव्हे अनारिसें उद्धरलों ॥३॥ तुका म्हणे मज न घडतां सेवा । पूर्वपुण्यठेवा वोढवला ॥४॥

२१३०. नेणो काय नाड । आला उचित काळ आड ॥१॥ नाहीं जाली संतभेटी । येवढी हानी काय मोठी ॥२॥ सहज पायांपासीं । जवळी पावलिया ऐसी ॥३॥ चुकी जाली आतां काय । तुका म्हणे उरली हाय ॥४॥

२१३१. आणीक कांहीं नेणें । असें पायांच्या चिंतनें ॥१॥ माझा न व्हावा विसर । नाहीं आणीक आधार ॥२॥ भांडवल सेवा । हाचि ठेवियेला ठेवा ॥३॥ करीं मान भावा । तुका विनंती करी देवा ॥४॥

२१३२. आरुष माझी वाणी बोबडीं उत्तरें । केली ते लेंकुरें सलगी पायीं ॥१॥ करावें कवतुक संतीं मायबापीं । जीवन देउनि रोपीं विस्तारिजे ॥२॥ आधारें वदली प्रसादाची वाणी । उच्छिष्टसेवनीं तुमचिया ॥३॥ तुका म्हणे हेचि करितों विनंती । मागेन पुढती सेवादान ॥४॥

२१३३. पुरुषा हाती कंकणचुडा । नवल दोडा वृत्ति या ॥१ । पाहा कैसी विटंबणा । नारायणा देखिली ॥२॥ जळो ऐसी ब्रिदावळी । भाटवोळीपणाची ॥३॥ तुका म्हणे पाहों डोळां । अवकळा नये हे ॥४॥

२१३४. वितीयेवढेंसें पोट । केवढा बोभाट तयाचा ॥१॥ जळो त्याची विटंबना । भूक जना नाचवी ॥२॥ अभिमाना सिरीं भार । जाले खर तृष्णेचे ॥३॥ तुका म्हणे नरका जावें । हाचि जीवें व्यापार ॥४॥

२१३५. सेवटासी जरी आलें । तरी जालें आंधळें ॥१॥ स्वहिताचा लेश नाहीं । दगडा कांहीं

अंतरीं ॥२॥ काय परिसासवें भेटी । खापरखुंटी जालिया ॥३॥ तुका म्हणे अधम जन । अवगुणचि वाढवी ॥४॥

२१३६. प्रायश्चित्त देतो तुका । जातो लोकां सकळां ॥१॥ धरितील ते तरतील मनीं । जाती घाणी वांयां त्या ॥२॥ निग्रहअनुग्रहाचे ठाय । देतो घाय पाहोनि ॥३॥ तुका जाला नरसिंहीं । भय नाहीं कृपेनें ॥४॥

२१३७. दुर्जनाचें अंग अवघेंचि सरळ । नर्काचा कोथळ सांठवला ॥१॥ खाय अमंगळ बोले अमंगळ । उठवी कपाळ संघष्टणें ॥२॥ सर्पा मंत्र चाले धरावया हातीं । खळाची ते जाती निखळची ॥३॥ तुका म्हणे कांहीं न साहे उपमा । आणीक अधमा वोखट्यासी ॥४॥

२१३८. ऐका जी संतजन । सादर मन करूनि ॥१॥ सकळांचें सार एक । कंटक ते त्यजावे ॥२॥ विशेषता कांद्याहुनी । सेवित्या घाणी आगळी ॥३॥ तुका म्हणे ज्याची जोडी । ते परवडी बैसीजे ॥४॥

२१३९. आज्ञा पाळुनियां असें एकसरें । तुमचीं उत्तरें संतांचीं हीं ॥१॥ भागवूनि देह ठेवियेला पायीं । चरणावरि डोई येथूनचि ॥२॥ येणें जाणें हें तों उपाधीचें मूळ । पूजा ते सकळ अकर्तव्य ॥३॥ तुका म्हणे असें चरणींचा रज । पदींच सहज जेथें तेथें ॥४॥

२१४०. न संडावा ठाव । ऐसा निश्चयाचा भाव ॥१॥ आतां पुरे पुन्हां यात्रा । हेंचि सारूनि सर्वत्रा ॥२॥ सन्निधचि सेवा । असों करुनियां देवा ॥३॥ आज्ञेच्या पाळणें । असें तुका संतां म्हणे ॥४॥

२१४१. उपाधीचें बीज । जळोनि राहिलें सहज ॥१॥ आम्हां राहिली ते आतां । चाली देवाचिया सत्ता ॥२॥ पराधीन तें जिणें । केलें सत्ता नारायणे ॥३॥ तुका म्हणे जाणें पाय । खुंटले आणीक उपाय ॥४॥

२१४२. गोविंदावांचोनि वदे ज्याची वाणी । हगवण घाणी पिटपिट ते ॥१॥ मस्तक सांडुनि सिसफुल गुड्घां । चार तो अवघा बावळ्याचा ॥२॥ अंगभूत म्हूण पूजितो वाहाणा । म्हणतां शहाणा येईल कैसा ॥३॥ तुका म्हणे वेश्या सांगे सवासिणी । इतर पूजनीं भाव तैसा ॥४॥

२१४३. कुतऱ्याऐसें ज्याचें जिणें । संग कोणें न करिजे ॥१॥ जाय तिकडे हाडहाडी । गोऱ्हवाडीच सोयरीं ॥२॥ अवगुणांचा त्याग नाहीं । खवळे पाहीं उपदेशें ॥३॥ तुका म्हणे कैंची लवी । ठेंग्या केवीं अंकुर ॥४॥

२१४४. सर्वथाही खोटा संग । उपजे भंग मनासी ॥१॥ बहु रंगें भरलें जन । संपन्नचि अवगुणी ॥२॥ सेविलिया निष्कामबुद्धि । मदें शुद्धि सांडवी ॥३॥ त्रासोनियां बोले तुका । आतां लोकां दंडवत ॥४॥

२१४५. उपचारासी वांझ जालों । नका बोलों यावरी ॥१॥ असेल तें असो तैसें । भेटीसरिसें नमन ॥२॥ दुसऱ्यामध्यें कोण मिळे । छंद चाळे बहुमतें ॥३॥ एकाएकीं आतां तुका । लौकिका या बाहेरी ॥४॥

२१४६. मीं तें मी तूं तें तूं । कुकुड हें लाडसी ॥१॥ वचनासी पडो तुटी । पोटींचें पोटीं राखावें ॥२॥ तेथील तेथें येथील येथें । वेगळ्या कुंथें कोण भारें ॥३॥ याचें यास त्याचें त्यास । तुक्याने कास घातली ॥४॥

२१४७. लाडाच्या उत्तरीं वाढविती कलह । हा तो अमंगळ जातिगुण ॥१॥ तमाचे शरीरीं विटाळचि वसे । विचाराचा नसे लेश तोही ॥२॥ कवतुकें घ्यावें लेंकराचे बोल । साहिलिया मोल ऐसें नाहीं ॥३॥ तुका म्हणे काय उपदेश खळा । न्हाउनि कावळा क्षतें धुंडी ॥४॥

२१४८. आतां मज देवा । इचे हातींचे सोडवा ॥१॥ पाठी लागलीसे लांसी । इच्छा जिते जैसी तैसी ॥२॥ फेडा आतां पांग । अंगीं लपवुनी अंग ॥३॥ दुजें नेणें तुका । कांहीं तुम्हांसी ठाउका ॥४॥

२१४९. बहु वाटे भय । माझे उडी घाला दये ॥१॥ फांसा गुंतलों लिगाडीं । न चले बळ चरफडी ॥२॥ कुंठितचि युक्ति । माझ्या जाल्या सर्व शक्ति ॥३॥ तुका म्हणे देवा । काममोहें केला गोवा ॥४॥

२१५०. विष्ठा भक्षी तया अमृत पारिखें । वोंगळासी सखें वोंगळचि ॥१॥ नये पाहों कांहीं गोऱ्हवाडीचा अंत । झणीं ठाका संत दुर्जनापें ॥२॥ भेंसळीच्या बीजा अमंगळ गुण । उपजवी सीण दरुषणें ॥३॥ तुका म्हणे छीथू जया घरीं धन । तेथें तें कारण कासयाचें ॥४॥

२१५१. चळलें तें काय न करी बडबड । न म्हणे फिकें गोड भुकेलें तें ॥१॥ उमजल्याविण न धरी सांभाळ । असो खळखळ जनाची हे ॥२॥ गरज्या न कळे आपुलिया चाडा । करावी ते पीडा कोणा काई ॥३॥ तुका म्हणे भोग भोगितील भोगें । संचित तें जोगें नाहीं कोणा ॥४॥

२१५२. आपुला तो देह आम्हां उपेक्षीत । कोठें जाऊं हित सांगों कोणा ॥१॥ कोण नाहीं दक्ष करितां संसार । आम्हीं हा विचार वमन केला ॥२॥ नाहीं या धरीत जीवित्वाची चाड । कोठें करूं कोड आणिकांचें ॥३॥ तुका म्हणे असों चिंतोनियां देवा । मी माझे हा हेवा सारूनियां ॥४॥

२१५३. चाकरीवांचून । खाणें अनुचित वेतन ॥१॥ धणी काढोनियां निजा । करील ये कामेंची पूजा ॥२॥ उचितावेगळें । अभिळासें तोंड काळें ॥३॥ सांगे तरी तुका । पाहा लाज नाहीं लोकां ॥४॥

२१५४. बरें सावधान । राहावें समय राखोन ॥१॥ नाहीं सारखिया वेळा । अवघ्या पावतां अवकळा ॥२॥ लाभ अथवा हानी । थोड्यामध्येंच भोवनी ॥३॥ तुका म्हणे राखा । आपणा

नाहीं तोंचि वाखा ॥४॥

२१५५. काय करूं जी दातारा। कांहीं न पुरे संसारा ॥१॥ जाली माकडाची परी। जातो तळा येतो वरी ॥२॥ घालीं भलते ठायीं हात। होती शिव्या बैसे लात ॥३॥ आदि अंतीं तुका। सांगे न कळे झाला चुका ॥४॥

२१५६. धर्म तो न कळे। काय झांकियले डोळे ॥१॥ जीव भ्रमले या कामें। कैसीं कळों येती वर्मे ॥२॥ विषयांचा माज। कांहीं धरूं नेदी लाज ॥३॥ तुका म्हणे लांसी। माया नाचविते कैसी ॥४॥

२१५७. दुर्जनाची जोडी। सज्जनाचे खेंटर तोडी ॥१॥ पाहे निमित्य तें उणें। धांवे छळावया सुनें ॥२॥ न म्हणे रामराम। मनें वाचे हेंचि काम ॥३॥ तुका म्हणे भागा। आली निंदा करी मागा ॥४॥

२१५८. शादीचें तें सोंग। संपादितां राजा व्यंग ॥१॥ पाहा कैसी विटंबना। मूर्खा अभाग्याची जना ॥२॥ दिसतें तें लोपी। झिंज्या वोडनियां पापी ॥३॥ सिंदळी त्या सती। तुका म्हणे थुंका घेती ॥४॥

२१५९. भक्त म्हणवूनि वंचावें तें जीवें। तेणें शेण खावें कशासाठीं ॥१॥ नासिले अडबंद कौपिन ते माळा। अडचण राउळामाजी केली ॥२॥ अंगीकारिले सेवे अंतराय। तया जाला न्याय खापराचा ॥३॥ तुका म्हणे कोठें तगों येती घाणी। आहाच ही मनीं अधीरता ॥४॥

२१६०. गयाळाचे काम हिताचा आवारा। लाज फजितखोरा असत नाहीं ॥१॥ चित्ता न मिळे तें डोळां सलों येतें। असावें परतें जवळूनि ॥२॥ न करावा संग न बोलावी मात। सावधान चित्त नाहीं त्यासी ॥३॥ तुका म्हणे दुःख देतील माकडें। घालिती सांकडें उफराटें ॥४॥

२१६१. बहु बरें एकाएकीं। संग चुकी करावा ॥१॥ ऐसें बरें जालें ठावें। अनुभवें आपुल्या ॥२॥ सांगावें तें काम मना। सलगी जना नेदावी ॥३॥ तुका म्हणे निघे आगी। दुजे संगीं आतळतां ॥४॥

२१६२. बरें आम्हां कळों आलें देवपण। आतां गुज कोण राखे तुझें ॥१॥ मारिलें कां मज सांग आजिवरी। आतां सरोबरी तुज मज ॥२॥ जें आम्ही बोलों तें आहे तुझ्या अंगीं। देईन प्रसंगी आजि शिव्या ॥३॥ निलाजिरा तुज नाहीं याति कुळ। चोरटा शिंदळ ठावा मज ॥४॥ खासी धोंडे माती जीव जंतु झाडें। एकलें उघडें परदेसीं ॥५॥ गाढव कुतरा ऐसा मज ठावा। बईल तूं देवा भारवाही ॥६॥ लटिका तूं मागें बहुतांसी ठावा। आलें अनुभवा माझ्या तेंही ॥७॥ तुका म्हणे मज खवळिलें भांडा। आतां धीर तोंडा न धरवे ॥८॥

२१६३. आम्ही भांडो तुजसवें। वर्मी धरूं जालें ठावें ॥१॥ होसी सरड बेडुक। वाघ

गांढ्याही पाइक ॥२॥ बळ करी तया भ्यावें । पळों लागे तया घ्यावें ॥३॥ तुका म्हणे दूर परता । नर नारी ना तूं भूता ॥४॥

२१६४. काय साहतोसी फुका । माझा बुडविला रुका ॥१॥ रीण घराचें पांगिलें । तें न सुटे कांहीं केलें ॥२॥ चौघांचिया मतें । आधीं खरें केलें होतें ॥३॥ तुका म्हणे यावरी । आतां भीड कोण धरी ॥४॥

२१६५. प्रीतीचा हेकळ । पदरासी घाली पीळ । सरों नेदी बाळ। मागें पुढें पित्यासी ॥१॥ काय लागे त्यासी बळ । हेडावितां कोण काळ । गोवितें सबळ । जाळी स्नेहसूत्राचीं ॥२॥ सलगी दिला लाड । केलें तें तें वाटे गोड । करी बुझावोनि कोड । हातीं देऊनि भातुकें ॥३॥ तुका म्हणे बोलों कोणा । हें कां नेणां नारायणा । सलगीच्या वचना । कैचें उपजे विषम ॥४॥

२१६६. भार देखोनि वैष्णवांचे । दूत पळाले यमाचे ॥१॥ आले आले वैष्णववीर । काळ कांपती असुर ॥२॥ गरुडटकयाच्या भारें । भूमी गर्जे जयजयकारें ॥३॥ तुका म्हणे काळ । पळे देखोनियां बळ ॥४॥

२१६७. रंगीं रंगेरे श्रीरंगे । काय भुललासी पतंगें ॥१॥ शरीर जायाचें ठेवणें । धरिसी अभिळास झणें ॥२॥ नव्हे तुझा हा परिवार । द्रव्य दारा क्षणभंगुर ॥३॥ अंतकाळींचा सोइरा । तुका म्हणे विठो धरा ॥४॥

२१६८. जन्मा येउनि काय केलें । तुवां मुद्दल गमाविलें ॥१॥ का रे न फिरसी माघारा । अझुनि तरी फजिखोरा ॥२॥ केली गाठोळीची नासी । पुढें भीकचि मागसी ॥३॥ तुका म्हणे ठाया । जाई आपुल्या आलिया ॥४॥

२१६९. पंढरीस जाते निरोप आइका । वैकुंठनायका क्षेम सांगा ॥१॥ अनाथांचा नाथ हें तुझें वचन । धांवें नको दीन गांजों देऊं ॥२॥ ग्रासिलों भुजंगें सर्पें महाकाळें । न दिसे हें जाळें उगवतां ॥३॥ कामक्रोधसुनीं श्वापदें बहुतीं । वेढलों आवर्ती मायेचिये ॥४॥ मृगजळनदी बुडविना तारी । आणूनियां वरी तळा नेते ॥५॥ तुका म्हणे तुवां धरिलें उदास । तरी पाहों वास कवणाची ॥६॥

२१७०. कृपाळू सज्जन तुम्ही संतजन । हेंचि कृपादान तुमचें मज ॥१॥ आठवण तुम्हीं द्यावी पांडुरंगा । कींव माझी सांगा काकुलती ॥२॥ अनाथ अपराधी पतित आगळा । परि पायांवेगळा नका करूं ॥३॥ तुका म्हणे तुम्ही निरविल्यावरी । मग मज हरि उपेक्षीना ॥४॥

२१७१. संतांचिया पायीं हा माझा विश्वास । सर्वभावें दास झालों त्यांचा ॥१॥ तेचि माझें हित करिती सकळ । जेणें हा गोपाळ कृपा करी ॥२॥ भागलिया मज वाहतील कडे ।

त्यांचियानें जोडे सर्व सुख ॥३॥ तुका म्हणे शेष घेईन आवडी । वचन न मोडी बोलिलें तें ॥४॥

२१७२. लाघवी सूत्रधारी । दोरी नाचवी कुसरी । उपजवी पाळूनि संहारी । नानापरीचें लाघव ॥१॥ पुरोनि पंढरिये उरलें । भक्तिसुखें लांचावलें । उभेंचि राहिलें । कर कटीं न बैसे ॥२॥ बहु काळें ना सांवळें । बहु कठिण ना कोवळें । गुणत्रया वेगळें । बहुबळें आथीलें ॥३॥ असोनि नसे सकळामधीं । मना अगोचर बुद्धी । स्वामी माझा कृपानिधि । तुज म्हणे श्रीविठ्ठल ॥४॥

२१७३. कीर्तन ऐकावया भुलले श्रवण । श्रीमुख लोचन देखावया ॥१॥ उदित हें भाग्य होईल कोणे काळीं । चित्त तळमळी म्हणऊनि ॥२॥ उतावीळ बाह्या भेटिलागीं दंड । लोटांगणीं धड जावयासी ॥३॥ तुका म्हणे माथा ठेवीन चरणीं । होतील पारणीं इंद्रियांचीं ॥४॥

२१७४. नाम घेतां कंठ शीतळ शरीर । इंद्रियां व्यापार नाठवती ॥१॥ गोड हें गोमटें अमृतासी वाड । केला कईवाड माझ्या चित्तें ॥२॥ प्रेमरसें जाली पुष्ट अंगकांति । त्रिविध नासती ताप क्षणें ॥३॥ तुका म्हणे तेथें विकाराची मात । बोलों नये हित सकळांचें ॥४॥

२१७५. स्वामिकाज गुरुभक्ति । पितृवचन सेवा पति ॥१॥ हेचि विष्णूची महापूजा । आनुभाव नाहीं दुजा ॥२॥ सत्य बोलें मुखें । दुखवे आणिकांच्या दुःखें ॥३॥ निश्चयाचें बळ । तुका म्हणे तेंच फळ ॥४॥

२१७६. चित्त घेऊनियां तूं काय देसी । ऐसें मजपाशीं सांग आधीं ॥२॥ तरिच पंढरिराया करिन साटोवाटी । नेघें जया तुटी येईल तें ॥२॥ रिद्धिसिद्धि कांहीं दाविसी अभिळास । नाहीं मज आस मुक्तीचीही ॥३॥ तुका म्हणे तुझें माझें घडे तर । भक्तीचा भाव रे देणें घेणें ॥४॥

२१७७. तुझा संग पुरे संग पुरे । संगति पुरे विठोबा ॥१॥ आपल्यासारिखें करिसी दासां । भिकारीसा जग जाणे ॥२॥ रूपा नाहीं ठाव नांवा । तैसे आमुचें करिसी देवा ॥३॥ तुका म्हणे तोयें आपुलें भेंडोळें । करिसी वाटोळें माझें तैसें ॥४॥

२१७८. आतां मज तारीं । वचन हें साच करीं ॥१॥ तुझें नाम दीनानाथ । ब्रिदावळी जगविख्यात ॥२॥ कोण लेखी माझ्या दोषा । तुझा त्रिभुवनीं ठसा ॥३॥ वांयां जातां मज । तुका म्हणे तुम्हां लाज ॥४॥

२१७९. विठ्ठल आमुचा निजाचा । सज्जन सोयरा जीवाचा ॥१॥ माय बाप चुलता बंधु । अवघा तुजशीं संबंधु ॥२॥ उभय कुळीं साक्ष । तूंचि माझा मातुळपक्ष ॥३॥ समर्पिली काया । तुका म्हणे पंढरीराया ॥४॥

२१८०. वेदाचा तो अर्थ आम्हांसीच ठावा । येरांनीं वाहावा भार माथां ॥१॥ खादल्याची गोडी देखिल्यासी नाहीं । भार धन वाही मजुरीचें ॥२॥ उत्पत्तिपाळणसंहाराचें निज । जेणें नेलें

बीज त्याचे हातीं ॥३॥ तुका म्हणे आम्हां सांपडलें मूळ। आपणचि फळ आलें हाता ॥४॥

२१८१. आमुचा तूं ऋणी ठायींचाचि देवा। मागावया ठेवा आलों दारा ॥१॥ वर्म तुझें आम्हां सांपडलें हातीं। धरियेले चित्तीं दृढ पाय ॥२॥ बैसलों धरणें कोंडोनियां द्वारीं। आंतूनि बाहेरी येओं नेदी ॥३॥ तुज मज सरी होइल या विचारें। जळों भांडखोरें निलाजिरीं ॥४॥ भांडवल माझें मिरविसी जनीं। सहस्र वोवणी नाममाळा ॥५॥ तुका म्हणे आम्हीं केली जिवें साटी। तुम्हां आम्हां तुटी घालूं आतां ॥६॥

२१८२. काय धोविलें बाहेरी। मन मळलें अंतरीं। गादलें जन्मवरी। असत्यकाटें काटलें ॥१॥ सांडी व्यापार दंभाचा। शुद्ध करीं रे मन वाचा। तुझिया चित्ताचा। तूं ग्वाही आपुला ॥२॥ पापपुण्यविटाळ देहीं। करितां न विचारिसी कांहीं। काय चाचपसी मही। जी अखंड सोंवळी ॥३॥ कामक्रोधा वेगळा। ऐसा होईं कां रे सोंवळा। तुका म्हणे कळा। गुंडून ठेवीं या कुसरी ॥४॥

२१८३. सत्यकर्म आचरें रे। बापा सत्यकर्म आचरें रे। सत्यकर्म आचरें होईल हित। वाढेल दुःख असत्याचें ॥ध्रु०॥ ऊंस वाढवितां वाढली गोडी। गूळ साकर हे त्याची परवडी ॥१॥ साकरेच्या आळां लाविला कांदा। स्थूळ साना परी वाढे दुर्गंधा ॥२॥ सत्य असत्य हें ऐसिया परी। तुका म्हणे याचा विचार करीं ॥३॥

२१८४. पाषाण देव पाषाण पायरी। पूजा एकावरी पाय ठेवी ॥१॥ सार तो भाव सार तो भाव। अनुभवीं देव तेचि झाले ॥२॥ उदका भिन्न पालट काई। गंगा गोड येरां चवी काय नाहीं ॥३॥ तुका म्हणे हें भाविकांचें वर्म। येरें धर्माधर्म विचारावे ॥४॥

२१८५. जन्मा येऊनि कां रे निदसुरा। जाय भेटी वरा रखुमाईच्या ॥१॥ पाप ताप दैन्य जाईल सकळ। पावसी अढळ उत्तम तें ॥२॥ संतमहंतसिद्धहरिदासदाटणी। फिटती पारणीं इंद्रियांचीं ॥३॥ तुका म्हणे तेथें नामाचा गजर। फुकाचे अपार लुटी घेईं ॥४॥

२१८६. काय धोविलें कातडें। काळकूट भीतरि कुडें ॥१॥ उगा राहें लोकभांडा। चाळविल्या पोरें रांडा ॥२॥ घेसी बुंथी पानवथां। उगाच हालविसी माथा ॥३॥ लावूनि बैसे टाळी। मन इंद्रियें मोकळीं ॥४॥ हालवीत बैसे माळा। विषयजप वेळोवेळां ॥५॥ तुका म्हणे हा व्यापार। नाम विठोबाचें सार ॥६॥

२१८७. येईं वो येईं वो येईं धांवोनियां। विलंब कां वांयां लावियला कृपाळे ॥१॥ विठाबाई विश्वंभरे भवच्छेदके। कोठें गुंतलीस माये विश्वव्यापके ॥२॥ न करीं न करीं आतां आळस अव्हेरु। व्हावया प्रगट कैंचा दूरी अंतरु ॥३॥ नेघें नेघें नेघें माझी वाचा विसांवा। तुका म्हणे हांवा हांवा हांवा साधावा ॥४॥

२१८८. तरी कां पवाडे गर्जती पुराणें। असता नारायण शक्तिहीन ॥१॥ कीर्तीविण नाहीं

नामाचा डांगोरा । येर कां इतरां वाणीत ना ॥२॥ तरीच म्हणतों आहे चिरंजीव । केलियाचा जीव सुखीं गुणें ॥३॥ चांगलेंपण हे निरुपायता अंगीं । बाणलें श्रीरंगीं म्हणऊनी ॥४॥ तरीच हा थोर सांगितलें करी । अभिमान हरीपाशीं नाहीं ॥५॥ तुका म्हणे तरी करिती याची सेवा । देवापाशीं हेवा नाहीं कुडी ॥६॥

२१८९. तेव्हां धालें पोट बैसलों पंगती । आतां आम्हां मुक्तिपांग काई ॥१॥ धांवा केला आतां येईल धांवोन । येथें काईं करणें लागे संदेह ॥२॥ गायनाचा आतां कोठें उरला काळ । आनंद सकळ भरी आलें ॥३॥ देवाच्या सख्यत्वें विषमासी ठाव । मध्यें कोठें वाव राहों सके ॥४॥ तेव्हां जाली अवघी बाधा वाताहात । प्रेम हृदयांत प्रवेशलें ॥४॥ तुका म्हणे आम्हीं जिंतिलें भरंवसा । देव कोठें दासां मोकलितो ॥५॥

२१९०. हेचि याच्या ऐसें मागावें दान । वंदुनि चरण नारायणा ॥१॥ धीर उदारींव निर्मळ निर्मत्सर । येणें सर्वेश्वर ऐसें नांव ॥२॥ हाचि होईजेल याचिया विभागें । अनुभव अंगें अनुभवील्या ॥३॥ जोडे तयाचे कां न करावे सायास । झाला तरि आळस दीनपणें ॥४॥ फांवल्या मागें की न घालावी धांव । धरिल्या तरि हांव बळ येतें ॥५॥ तुका म्हणे घालूं खंडीमध्यें टांक । देवाचें हें एक करुनी घेऊं ॥६॥

२१९१. सत्ताबळें येतो मागतां विभाग । लावावया लाग निमित्य करूं ॥१॥ तुझें ऐसें मुखें करूं उच्चारण । बोलें नारायण सांपडवूं ॥२॥ आसेविण नाहीं उपजत मोहो । तरिच हा गोहो न पडे फंदीं ॥३॥ तुका म्हणे आतां व्हावें याजऐसें । सरिसें सरिसें समागमें ॥४॥

२१९२. करितां होय होय चित्तचि नाहीं । घटापटा कांहीं करूं नये ॥१॥ मग हालतचि नाहीं जवळून । करावा तो सीण सीणवितो ॥२॥ साहतचि नाहीं कांहीं पाकुळलें । उगल्या उगलें ढळत आहे ॥३॥ तुका म्हणे तरी बोलावें झांकून । येथें खुणे खूण पुरतेंचि ॥४॥

२१९३. संतसंगें याचा वास सर्वकाळ । संचला सकळ मूर्तिमंत ॥१॥ घालूनियां काळ अवघा बाहेरी । त्यासीच अंतरीं वास दिला ॥२॥ आपुलेंसें जिहीं नाहीं उरों दिलें । चोजवितां भलें ऐसीं स्थळें ॥३॥ तुका म्हणे नाहीं झांकत परिमळ । चंदनाचें स्थळ चंदनचि ॥४॥

२१९४. पुष्ट कांति निवती डोळे । हे सोहळे श्रीरंगीं ॥१॥ अंतर्बाहीं विलेपन । हें भूषण मिरवूं ॥२॥ इच्छेऐसी आवडी पुरे । विश्वंभरे जवळीं ॥३॥ तुका करी नारायण । या सेवन नामाचें ॥४॥

२१९५. सुकाळ हा दिवसरजनी । नित्य धणी नवीच ॥१॥ करुनि सेवूं नाना परी । राहे उरी गोडीनें ॥२॥ सरे ऐसा नाहीं झरा । पंक्तीकरा समवेत ॥३॥ तुका म्हणे बरवा पान्हा । कान्हाबाई माउलीचा ॥४॥

२१९६. पाहतां तव एकला दिसे । कैसा असे व्यापक ॥१॥ ज्याचे त्याचे मिळणीं मिळे । तरी खेळे बहुरूपी ॥२॥ जाणिवेचें नेदी अंग । दिसे रंग निवडेना ॥३॥ तुका म्हणे हेचि ठायीं । हें तों नाहीं सर्वत्र ॥४॥

२१९७. तुम्हांसाठीं आम्हां आपुला विसर । करितां अव्हेर कैसें दिसे ॥१॥ विचारा जी आतां ठायींचें हे देवा । आम्हां नये हेवा वाढवितां ॥२॥ आलों ठाकोनियां सुखाची वसती । पुढें माझ्या युक्ति खुंटलिया ॥३॥ तुका म्हणे जाला सकळ वृत्तांत । केला प्रणिपात म्हणऊनि ॥४॥

२१९८. करावा उध्दार हें तुम्हां उचित । आम्हीं केली नीत कळली ते ॥१॥ पावविली हांक धांवा म्हणऊन । करावें जतन ज्याचें तेणें ॥२॥ दुश्चितासी बोल ठेवायासी ठाव । ऐसा आम्ही भाव जाणतसों ॥३॥ तुका म्हणे माझें कायावाचामन । दुसरें तें ध्यान करीत नाहीं ॥४॥

२१९९. संतांचा उपदेश आमुचे मस्तकीं । नाहीं मृत्युलोकीं राहाणेसा ॥१॥ म्हणऊनि बहु तळमळी चित्त । येईं वो धांवत पांडुरंगे ॥२॥ उपजली चिंता लागला उशीर । होत नाहीं धीर निढळ वाटे ॥३॥ तुका म्हणे पोटीं रिघालेंसे भय । करूं आतां काय ऐसे जालें ॥४॥

२२००. काळावरी घालूं तरि तो सरिसा । न पुरतां इच्छा दास कैसे ॥१॥ आतां नाहीं कांहीं उसिराचें काम । न खंडावें प्रेम नारायणा ॥२॥ देणें लागे मज विलंब कां आड । गोड तरि गोड आदि अंत ॥३॥ तुका म्हणे होइल दर्शनें निश्चिंती । गाईन तें गीतीं ध्यान मग ॥४॥

२२०१. पर उपकारें कायावाचामन । वेची सुदर्शन रक्षी तया ॥१॥ याजसाठीं असें योजिलें श्रीपति । संकल्पाचे हातीं सर्व जोडी ॥२॥ परपीडे ज्याची जिव्हा मुडताळे । यमदूत टाळे करिती पूजा ॥३॥ तुका म्हणे अंबऋषी दुर्योधना । काय झालें नेणां दुर्वासया ॥४॥

२२०२. हागिल्याचे सिंके वोणवाचि राहे । अपशकुन पाहे वेडगळ ॥१॥ अतेता समय नेणतां अवकळा । येऊं नये बळा सिक धरा ॥२॥ भोजनसमयीं ओकाचा आठव । ठकोनियां जीव कष्टी करी ॥३॥ तुका म्हणे किती सांगावें उगवून । अभाग्याचे गुण अनावर ॥४॥

२२०३. नारडे तरि काय नुजडे कोंबडें । करूनियां वेडें आग्रहो दावी ॥१॥ आइत्याचें साहे फुकाचा विभाग । विक्षेपानें जग छी थू करी ॥२॥ नेमूनि ठेविला करत्यानें काळ । न लाहेसें बळ करूं पुढें ॥३॥ तुका म्हणे देव साह्य जाल्यावरी । असंगाचें करी सर्व सांग ॥४॥

२२०४. तरी सदा निर्भर दास । चिंता आस विरहित ॥१॥ अवघाच एक ठाव । सर्व भाव विठ्ठलीं ॥२॥ निरविलें तेव्हां त्यास । जाला वास त्यामाजी ॥३॥ तुका म्हणे रूप ध्यावें । नाहीं ठावे गुणदोष ॥४॥

२२०५. वेडिया उपचार करितां सोहळे । काय सुख कळे तयासी तें । अंधापुढें दीप नाचती नाचणें । भक्तिभावेंविण भक्ति तैसी ॥१॥ तिमाणें राखण ठेवियलें सेता । घालुनियां माथां चुना

तया । खादलें म्हणूनि सेवटीं बोंबली । ठायींची कां भुली नेणां रया ॥२॥ मुकियापासाव सांगतां पुराण । रोगिया मिष्टान्न काय होय । नपुंसका काय करील पद्मिणी । रुचिविण वाणी तैसी होय ॥३॥ हात पाय नाहीं करिल तो काय । वृक्षा फळ आहे अमोलिक । हातां नये तैसा वांयांच तळमळी । भावेंविण भोळीं म्हणे तुका ॥४॥

२२०६. मेघवृष्टीनें करावा उपदेश । परि गुरुनें न करावा शिष्य । वांटा लाभे त्यास । केल्या अर्धकर्माचा ॥१॥ द्रव्य वेचावें अन्नछत्रीं । भूतीं द्यावें सर्वत्र । न घ्यावा हा पुत्र । उत्तम याती पोसणा ॥२॥ बीज न पेरावें खडकीं । ओल नाहीं ज्याचे बुडखीं । थीतां ठके सेखीं । पाठी लागे दिवाण ॥३॥ गुज बोलावे संतांसीं । पत्नी राखावी जैसी दासी । लाड देतां तयेसी । वांटा पावे कर्माचा ॥४॥ शुद्ध कसूनि पाहावें । वरिला रंगा न भुलावें । तुका म्हणे घ्यावें । जया नये तुटी तें ॥५॥

२२०७. नावडावे जन नावडावा मान । करूनि प्रमाण तूंचि होईं ॥१॥ सोडवूनि देहसंबंध व्यसनें । ऐसी नारायणें कृपा कीजे ॥२॥ नावडावें रूप नावडावा रस । अवघी राहो आस पायांपाशीं ॥३॥ तुका म्हणे आतां आपुलिया सत्ता । करूनि अनंता ठेवा ऐसें ॥४॥

२२०८. उपाधिवेगळे तुम्ही निर्विकार । कांहीच संसार तुम्हां नाहीं ॥१॥ ऐसें मज करूनि ठेवा नारायणा । समूळ वासना नुरवावी ॥२॥ निःसंग तुम्हांसी राहणें एकट । नाहीं कटकट साहों येत ॥३॥ तुका म्हणे नाहीं मिळों येत शिळा । रंगासी सकळा स्फटिकाची ॥४॥

२२०९. माहार मातेचे पणी भरे । न कळे खरें पुढील ॥१॥ वोंगळ अधमाचे गुण । जातां घडी नलगेचि ॥२॥ श्वान झोळी स्वामिसत्ता । कोप येतां उत्तर ॥३॥ तुका म्हणे गुमान कां । सांगों लोकां अधमासी ॥४॥

२२१०. डोळ्यामध्यें जैसें कणु । अणु तेंहि न समाये ॥१॥ तैसें शुद्ध करा हित । नका चित्त बाटवूं ॥२॥ आपुल्याचा कळवळा । आणिका बाळावरि न ये ॥३॥ तुका म्हणे बीज मुडा । जैशा चाडा पिकाच्या ॥४॥

२२११. मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांची ॥१॥ वैष्णवाचा माल खरा । तुरतुरा वस्तूसी ॥२॥ भस्म दंड नलगे काठी । तीर्थां आटी भ्रमण ॥३॥ तुका म्हणे आडकाठी । नाहीं भेटी देवाचे ॥४॥

२२१२. आगी लागो तया सुखा । जेणें हरि नये मुखा ॥१॥ मज होत कां विपत्ति । पांडुरंग राहो चित्तीं ॥२॥ जळो तें समूळ । धनसंपत्ति उत्तम कुळ ॥३॥ तुका म्हणे देवा । जेणें घडे तुझी सेवा ॥४॥

२२१३. आतां न म्हणें मी माझें । नेघें भार कांहीं ओझें ॥१॥ तूंचि तारिता मारिता । कळों

आलासी निरुता ॥२॥ अवघा तूंचि जनार्दन । संत बोलती वचन ॥३॥ तुका म्हणे कांहीं । माझें तिळभरी नाहीं ॥४॥

२२१४. समुद्रवळकांकित पृथ्वीचें दान । करितां समान नये नामा ॥१॥ म्हणऊनि कोणी न करावा आळस । म्हणा रात्रीदिवस रामराम ॥२॥ सकळही शास्त्रें पठण करितां वेद । सरी नये गोविंदनामें एकें ॥३॥ सकळही तीर्थें प्रयागादि काशी । करितां नामाशीं तुळति ना ॥४॥ कर्वतीं कर्मरीं देहासी दंडण । करितां समान नये नामा ॥५॥ तुका म्हणे ऐसा आहे श्रेष्ठाचार । नाम हेंचि सार विठोबाचें ॥६॥

२२१५. अवघ्या वाटा जाल्या क्षीण । कळी न घडे साधन । उचित विधी विधान । न कळे न घडे सर्वथा ॥१॥ भक्तिपंथ बहु सोपा । पुण्य नांगवेया । येणें जाणें खेपा । येणेंचि एके खंडती ॥२॥ उभारोनि बाहे । विठो पालवित आहे । दासां मीचि साहे । मुखें बोले आपुल्या ॥३॥ भाविक विश्वासी । पार उतरिलें त्यासी । तुका म्हणे नासी । कुतर्क्यांचे कपाळीं ॥४॥

२२१६. आम्ही नामाचे धारक । नेणों प्रकार आणीक । सर्व भावें एक । विठ्ठलचि प्रमाण ॥१॥ नलगे जाणावें नेणावें । गावें आनंदें नाचावें । प्रेमसुख घ्यावें । वैष्णवांचे संगती ॥२॥ भावबळें घालूं कास । लज्जा चिंता दवडूं आस । पायीं निजध्यास । म्हणवूं दास विष्णूचे ॥३॥ भय नाहीं जन्म घेतां । मोक्षसुखा हाणों लाता । तुका म्हणे सत्ता । करूं निकट सेवेची ॥४॥

२२१७. आम्ही हरिचे संवगडे । जुने ठायींचे वेडे बागडे । हातीं धरूनि कढे । पाठीसवें वागविलों ॥१॥ म्हणोनि भिन्न भेद नाहीं । देवा आम्हां एक देहीं । नाहीं जालों कईं । एका एक वेगळे ॥२॥ निद्रा करितां होतों पायीं । सवेंचि लंका घेतलीं तईं । वानर गोवळ गाई । सवें चारित फिरतसों ॥३॥ आम्हां नामाचें चिंतन । राम कृष्ण नारायण । तुका म्हणे क्षण । खातां जेवितां न विसंबों ॥४॥

२२१८. मागें बहुतां जन्मीं । हेंचि करित आलों आम्ही । भवतापश्रमी । दुःखें पीडिले निववूं त्यां ॥१॥ गर्जों हरिचे पवाडे । मेळवूं वैष्णव बागडे । पाझर रोकडे । काढूं पाषाणामध्यें ॥२॥ भाव शुद्ध नामावळी । हर्षें नाचों पिटूं टाळी । घालूं पायां तळीं । कळिकाळ या बळें ॥३॥ कामक्रोध बंदी खाणी । तुका म्हणे दिले दोन्ही । इंद्रियांचे धणी । आम्ही जालों गोसावी ॥४॥

२२१९. अमर तूं खरा । नव्हे कैसा मी दातारा ॥१॥ चाल जाऊं संतांपुढें । वाद सांगेन निवाडें ॥२॥ तुज नांव जरी नाहीं । तरी माझें दाव काई ॥३॥ तुज रूप जरी नाहीं । तरी माझें दाव काई ॥४॥ खेळसी तूं लीळा । तेथें मी काय वेगळा ॥५॥ साच तूं लटिका । तैसा मीही म्हणे तुका ॥६॥

२२२०. मंत्र चळे पिसें लागतें सत्वर । अबद्ध ते फार तरले नामें ॥१॥ अशौच तो बाधी

आणिकां अक्षरां । नाम निदसुरा घेतां तरे ॥२॥ रागज्ञानघात चुकतां होय वेळ । नाम सर्वकाळ शुभदायक ॥३॥ आणिकां भजना विधी बोलिला निषेध । नाम तें अभेद सकळां मुखीं ॥४॥ तुका म्हणे तपें घालिती घालणी । वेश्या उद्धरूनि नेली नामें ॥५॥

२२२१. नव्हती ते संत करितां कवित्व । संतांचे ते आप्त नव्हती संत ॥१॥ येथें नाहीं वेश सरते आडनांव । निवडे घावडाव व्हावा अंगीं ॥२॥ नव्हती ते संत धरितां भोपळा । करितां वाकळा प्रावरणासी ॥३॥ नव्हती ते संत करितां कीर्तन । सांगतां पुराणें नव्हती संत ॥४॥ नव्हती ते संत वेदाच्या पठणें । कर्म आचरणें नव्हती संत ॥५॥ नव्हती ते संत करितां तप तीर्थाटन । सेविलिया वन नव्हती संत ॥६॥ नव्हती संत माळामुद्रांच्या भूषणें । भस्म उधळणें नव्हती संत ॥७॥ तुका म्हणे नाहीं निरसला देहें । तोंवरी आघवे संसारिक ॥८॥

२२२२. हेंचि दान देहा देवा । तुझा विसर न व्हावा ॥१॥ गुण गाइन आवडी । हेंचि माझी सर्व जोडी ॥२॥ नलगे मुक्ति आणि संपदा । संतसंग देईं सदा ॥३॥ तुका म्हणे गर्भवासी । सुखें घालावें आम्हासी ॥४॥

२२२३. भाग्यवंता हे परवडी । करिता जोडी जन्माची ॥१॥ आपुलाला लाहो भावें । जें ज्या व्हावें तें आहे ॥२॥ इच्छाभोजनाचा दाता । नलगे चिंता करावी ॥३॥ तुका म्हणे आल्या थोऱ्या । वस्तु बऱ्या मोलाच्या ॥४॥

२२२४. वंचुनियां पिंड । भाता दान करी लंड ॥१॥ जैसी याची चाली वरी । तैसा अंतरला दुरी ॥२॥ मेल्या राखे दिस । ज्यालेपण जालें वोस ॥३॥ तुका म्हणे देवा । लोभें न पुरेचि सेवा ॥४॥

२२२५. अधीरा माझ्या मना ऐक एक मात । तूं कां रे दुश्चित निरंतर ॥१॥ हेचि चिंता काय खावें म्हणऊनि । भले तुजहूनि पक्षिराज ॥२॥ पाहा ते चातक नेघे भूमिजळा । वरुषे उन्हाळा मेघ तया ॥३॥ सकळयातींमध्यें ठक हा सोनार । त्या घरीं व्यापार झारियाचा ॥४॥ तुका म्हणे जळीं वनीं जीव एक । तयापाशीं लेख काय असे ॥५॥

२२२६. कां रे नाठविसी कृपाळु देवासी । पोसितो जनासी एकला तो ॥१॥ बाळा दुधा कोण करितें उत्पत्ती । वाढवी श्रीपति सवें दोन्ही ॥२॥ फुटती तरुवर उष्णकाळमासीं । जीवन तयांसी कोण घाली ॥३॥ तेणें तुझी काय नाहीं केली चिंता । राहे त्या अनंता आठवूनि ॥४॥ तुका म्हणे ज्याचें नाम विश्वंभर । त्याचें निरंतर ध्यान करीं ॥५॥

२२२७. उदारा कृपाळा पतितपावना । ब्रिदें नारायणा साच तुझीं ॥१॥ वर्णिलासी जैसा जाणतां नेणतां । तैसा तूं अनंता साच होसी ॥२॥ दैत्यां काळ भक्तां मेघश्याममूर्ति । चतुर्भुज हातीं शंख चक्र ॥३॥ काम इच्छा तयां तैसा होसी रानीं । यशोदेच्या स्तनीं पान करी ॥४॥

होऊनि सकळ कांहींच न होसी । तुका म्हणे यासी वेद ग्वाही ॥५॥

२२२८. करूनि चिंतन खेळें भोंवतालें । चित्त येथें आलें पायांपाशीं ॥१॥ येथें नाहीं खोटा चालत परिहार । जाणसी अंतर पांडुरंगा ॥२॥ सुख दुःख तुज देऊनि सकळ । नाहीं ऐसा काळ केला आम्हीं ॥३॥ तुका म्हणे जाला देहाचा विसर । आतां आप पर नाहीं कोणी ॥४॥

२२२९. परिसाचे अंगें सोनें जाला विळा । वाकणिया कळाहीन नव्हे ॥१॥ अंतरीं पालट घडला कारण । मग समाधान तेंचि गोड ॥२॥ पिकलिया सेंद पूर्वकर्मा नये । अव्हेरु तो काय घडे मग ॥३॥ तुका म्हणे आणा पंगती सुरण । पृथक ते गुण केले पाकें ॥४॥

२२३०. पाहे तिकडे दिशा ओस । अवघी आस पायांपें ॥१॥ मनिंचें साच होइल कईं । प्रेम देईं भेटोनि ॥२॥ सर्वांपरी पांगुळ असे । न कळे कैसें हें तुम्हां ॥३॥ तुका म्हणे कृपावंत । तूं तों दाता दीनाचा ॥४॥

२२३१. चाळवणें काय । ऐसें अगे माझे माय ॥१॥ धांव पाव लवलाहें । कंठीं प्राण वाट पाहे ॥२॥ पसरूनि कर । तुज चालिलों समोर ॥३ । देशील विसांवा । तुका म्हणे ऐशा हांवा ॥४॥

२२३२. मतिविण काय वर्णूं तुझें ध्यान । जेथें पडे मौन वेदश्रुती ॥१॥ करूनि गोजिरा आपुलिये मती । धरियेलें चित्तीं चरणकमळ ॥२॥ सुखाचें ओतिलें पाहों तें श्रीमुख । तेणें हरे भूक ताहान माझी ॥३॥ रसना गोडावली ओव्या गातां गीत । पावलेंसे चित्त समाधान ॥४॥ तुका म्हणे माझी दृष्टि चरणांवरी । पाउलें गोजिरीं कुंकुमाचीं ॥५॥

२२३३. ओस जाल्या दिशा मज भिंगुळवाणें । जीवलग नेणें मज कोणी ॥१॥ भय वाटे देखें श्वापदांचे भार । नव्हे मज धीर पांडुरंगा ॥२॥ अंधकार पुढें न चलवे वाट । लागतील खुंट कांटे अंगा ॥३॥ एकला निःसंग फांकती मारग । भितों नव्हे लाग चालावया ॥४॥ तुका म्हणे वाट दावुनि सद्गुरु । राहिलासे दुरु पांडुरंग ॥५॥

२२३४. जे केली आळी ते अवघी गेली वांयां । उरला पंढरिराया श्रम माझा ॥१॥ काय समाधान केलें कोणे वेळे । कोण माझे लळे पाळियेले ॥२॥ आभासही नाहीं स्वप्नीं दुश्चित्ता । प्रत्यक्ष बोलतां काय चिंता ॥३॥ आतां पुढें लाज वाटे पांडुरंगा । भक्त ऐसें जगामाजी जालें ॥४॥ तुका म्हणे आतां नाहीं भरंवसा । मोकलीसी ऐसा वाटतोसी ॥५॥

२२३५. भलते जन्मीं मज घालिसील तरी । न सोडीं मी हरी नाम तुझें ॥१॥ सुख दुःख तुज देईन भोगितां । मग मज चिंता कासयाची ॥२॥ तुझा दास म्हणवीन मी अंकिला । भोगितां विठ्ठला गर्भवास ॥३॥ कासया मी तुज भाकितों करुणा । तारीं नारायणा म्हणऊनि ॥४॥ तुका म्हणे तुज येऊं पाहे उणें । तारिसील तेणें आम्हां तया ॥५॥

२२३६. गातों नाचतों आनंदें । टाळघागरियाच्या छंदें ॥१॥ तुझीं तुजपुढें देवा । नेणों भाव

कैसी सेवा ॥२॥ नेणों ताल घात मात । भलते सवा पाय हात ॥३॥ लाज नाहीं शंका । प्रेमें धालों म्हणे तुका ॥४॥

२२३७. मरण माझें मरोन गेलें । मज केले अमर ॥१॥ ठाव पुसिलें बुड पुसिलें । वोस वोसलें देहभाव ॥२॥ आला होता गेला पूर । धरिला धीर जीवनीं ॥३॥ तुका म्हणे बुनादीचें । जालें साचें उजवणें ॥४॥

२२३८. माझें लेखीं देव मेला । असो त्याला असेल ॥१॥ गोष्ट न करीं नांव नेघें । गेलों दोघें खंडोनी ॥२॥ स्तुतिसमवेत निंदा । केला धंदा उदंड ॥३॥ तुका म्हणे निवांत ठेलों । वेंचित आलों जीवित्व ॥४॥

२२३९. लवविलें तयासवें लवे जाती । अभिमाना हातीं सांपडेना ॥१॥ भोळिवेचें लेणें विष्णुदासां साजे । तेथें भाव दुजे हारपती ॥२॥ अर्चन वंदन नवविधा भक्ति । दया क्षमा शांति तये ठायीं ॥३॥ तये गांवीं नाहीं दु:खाची वसति । अवघाचि भूतीं नारायण ॥४॥ अवघेंचि जालें सोंवळें ब्रह्मांड । विटाळाचें तोंड न देखती ॥५॥ तुका म्हणे गाजे वैकुंठीं सोहळा । याही भूमंडळामाजी कीर्ति ॥६॥

२२४०. संपदा सोहळा नावडे मनाला । करीतें टकळा पंढरीचा ॥१॥ जावें पंढरिसी आवडी मनासी । कधीं एकादशी आषाढी हे ॥२॥ तुका म्हणे ऐसें आर्त ज्याचे मनीं । त्याची चक्रपाणी वाट पाहे ॥३॥

२२४१. पंढरीची वारी आहे माझे घरीं । आणीक न करीं तीर्थव्रत ॥१॥ व्रत एकादशी करीन उपवाशी । गाईन अहर्निशीं मुखीं नाम ॥२॥ नाम विठोबाचें घेईन मी वाचे । बीज कल्पांतींचें तुका म्हणे ॥३॥

२२४२. कथनी पठणी करूनि काय । वांचुनि रहणी वांयां जाय ॥१॥ मुखीं वाणी अमृतगोडी । मिथ्या भुकें चरफडी ॥२॥ पिळणीं पाक करितां दगडा । काय जडा होय तें ॥३॥ मधु मेळवूनी माशी । आणिका सांसी पारधिया ॥४॥ मेळवूनी धन मेळवी माती । लोभ्या हातीं तेंचि मुखीं ॥५॥ आपुलें केलें आपण खाय । तुका वंदी त्याचे पाय ॥६॥

२२४३. उमटती वाणी । वाटे नामाचिया ध्वनी ॥१॥ बरें सेवन उपकारा । द्यावें घ्यावें या उत्तरा ॥२॥ सरळ आणि मृद । कथा पाववीते ऊर्ध्व ॥३॥ गात जात तुका । हाचि उपदेश आइका ॥४॥

२२४४. कथाकाळींची मर्यादा । सांगतों ते भावें वंदा । प्रीतीनें गोविंदा । हेंचि एक आवडे ॥१॥ टाळ वाद्य गीत नृत्य । अंत:करण प्रेमभरित । वाणिता तो कीर्त । तद्भावने लेखावा ॥२॥ नये आळसें मोडूं अंग । कथे कानवडे ढुंग । हेळणेचा रंग । दावील तो चांडाळ ॥३॥ तोंडीं विडा

माने ताठा । थोरपणें घाली गेंठा । चित्त नेदी नामपाठा । गोष्टी लावी तो चांडाळ ॥४॥ कथे इच्छी मान । दावू नियां थोरपण । रजा संकोचून । लुगडीं सांवरी तो चांडाळ ॥५॥ आपण बैसे बाजेवरी । सामान्य हरीच्या दासां धरी । तरि तो सुळावरी । वाहिजेल निश्चयें ॥६॥ येतां न करी नमस्कार । कर जोडोनिया नम्र । न म्हणतां थोर । आणिकां खेटी तो चांडाळ ॥७॥ तुका विनवी जना । कथे नाणावें अवगुणा । करा नारायणा । ऋणी समर्पण भावें ॥८॥

२२४५. कथा देवाचें ध्यान कथा साधना मंडण । कथे ऐसें पुण्य आणिक नाहीं सर्वथा ॥१॥ ऐसा साच खरा भाव । कथेमाजी उभा देव ॥२॥ मंत्र स्वल्प जना । उच्चारितां वाचे मना । म्हणतां नारायणा । क्षणें जळती महा दोष ॥३॥ भावें करितां कीर्तन । तरे तारी आणीक जन । भेटे नारायण । संदेह नाहीं म्हणे तुका ॥४॥

२२४६. कथा त्रिवेणीसंगम । देव भक्त आणि नाम । तेथींचें उत्तम । चरणरज वंदितां ॥१॥ जळती दोषांचे डोंगर । शुद्ध होती नारी नर । गाती ऐकती सादर । जे पवित्र हरिकथा ॥२॥ तीर्थें तया ठाया । येती पुनीत व्हावया । पर्वकाळ पायां । तळीं वसे वैष्णवां ॥३॥ अनुपम्य हा महिमा । नाहीं द्यावया उपमा । तुका म्हणे ब्रह्मा । नेणें वर्णूं या सुखा ॥४॥

२२४७. सांडूनि कीर्तन न करीं आणीक काज । नाचेन निर्लज्ज तुझ्या रंगीं ॥१॥ आवडीचें आर्त पुरवीं पंढरिराया । शरण तुझ्या पायां याचि लागीं ॥२॥ टाळी वाहूनियां विठ्ठल म्हणेन । तेणें निवारीन भवश्रम ॥३॥ तुका म्हणे देवा नुपेक्षावें आम्हां । न्यावें निजधामा आपुलिया ॥४॥

२२४८. जळती कीर्तनें । दोष पळतील विघ्नें ॥१॥ हेचि बळिवंत गाढें । आनंद करूं दिंडीपुढें ॥२॥ कलि पापाची हे मूर्ति । नामखड्ग घेऊं हातीं ॥३॥ तुका म्हणे जाऊं । बळें दमामेही लावूं ॥४॥

२२४९. यमधर्म सांगे दूतां । तुम्हां नाहीं येथें सत्ता । जेथें होय हरिकथा । सदा घोष नामाचा ॥१॥ नका जाऊं तया गांवां । नामधारकाच्या शिवां । सुदर्शन यावा । घरटी फिरे भोंवतीं ॥२॥ चक्र गदा घेउनि हरि । उभा असे त्यांचें द्वारीं । लक्ष्मी कामारी । रिद्धिसिद्धीसहित ॥३॥ ते बळियाशिरोमणी । हरिभक्त ये मेदिनी । तुका म्हणे कानीं । यम सांगे दूताचे ॥४॥

२२५०. कान्हया रे जगजेठी । देई भेटी एक वेळे ॥१॥ काय मोकलिलें वनीं । सावजांनीं वेढिलें ॥२॥ येथवरी होता संग । अंगें अंग लपविलें ॥३॥ तुका म्हणे पाहिलें मागें । एवढ्या वेगें अंतरला ॥४॥

२२५१. आपुलें आम्हीं पुसिलें नाहीं । तुज कांहीं कारणें ॥१॥ मागें मागें धांवत आलों । कांहीं बोलों यासाठीं ॥२॥ बहुत दिस होतें मनीं । घ्यावी धणी एकांतीं ॥३॥ तुका म्हणे उभा राहें । कान्हो पाहें मजकडे ॥४॥

२२५२. धन्य बाया ऐशा नारी । घरीं दारीं नांदती ॥१॥ चोरूनियां तुजपाशीं । येती त्यासी न कळतां ॥२॥ दोहीं ठायीं समाधान । सम कठिण बहुतांसी ॥३॥ तुका म्हणे जीवासाठीं । दुर्लभ भेटी ते देवा ॥४॥

२२५३. उदासीना पावल्या वेगीं । अंगा अंगीं जडलिया ॥१॥ वेंटाळिला भोंवता हरी । मयूरफेरीं नाचती ॥२॥ मना आले करिती चार । त्या फार हा एकला ॥३॥ तुका म्हणे नारायणीं । निरंजनीं मीनलिया ॥४॥

२२५४. विषमाची शंका वाटे । सारिखें भेटे तरी सुख ॥१॥ म्हणऊनि चोरिले जना । आल्या रानां एकांतीं ॥२॥ दुजियासी कळों नये । जया सोय नाहीं हे ॥३॥ तुका म्हणे मोकळें मन । नारायण भोगासी ॥४॥

२२५५. आलिंगन कंठाकंठीं । पडे मिठी सर्वांगें ॥१॥ न घडे मागें परतें मन । नारायण संभोगी ॥२॥ वचनासी वचन मिळे । रिघती डोळे डोळियांत ॥३॥ तुका म्हणे अंतर ध्यानीं । जीव जीवनीं विराल्या ॥४॥

२२५६. कोणी सुना कोणी लेंकी । कोणी एकी सतंता ॥१॥ अवघियांची जगनिंद । झाली धिंद सारखी ॥२॥ अवघ्या अवघ्या चोरा । विना वरा मायबापा ॥३॥ तुका म्हणे करा सेवा । आलें जीवावरी तरी ॥४॥

२२५७. येथील जे एक घडी । तये जोडी पार नाहीं ॥१॥ किती त्याचा सासुरवास । कैंचा रस हा तेथें ॥२॥ अवघे गेले दिवस कामा । नाहीं जन्मा खंडण ॥३॥ तुका म्हणे रतल्या जणीं । सोडा झणी कान्होबा ॥४॥

२२५८. चिंता नाहीं गांवीं विष्णुदासांचिये । घोष जयजयकार सदा ॥१॥ नारायण घरीं साठविलें धन । अवघेचि वाण तया पोटीं ॥२॥ सवंग सकळां पुरे धणीवरी । सेवावया नारी नर बाळा ॥३॥ तुका म्हणे येणें आनंदी आनंदु । गोविंदें गोविंदु पिकविला ॥४॥

२२५९. करिती तया वेवसाव आहे । येथें व्हा रे साहे एक एकां ॥१॥ गातां आइकतां समानचि घडे । लाभें लाभ जोडे विशेषता ॥२॥ प्रेमाचें भरतें भातें घ्यावें अंगीं । नटे टाळी रंगीं शूरत्वेंसी ॥३॥ तुका म्हणे बहुजन्मांचे खंडण । होईल हा सीण निवारोनि ॥४॥

२२६०. जीव जीती जीवना संगें । मत्स्या मरण त्या वियोगें ॥१॥ जया चित्तीं जैसा भाव । तयां जवळि तैसा देव ॥२॥ सकळां पढिये भानु । परि त्या कमळाचें जीवनु ॥३॥ तुका म्हणे माता । वाहे तान्हुल्याची चिंता ॥४॥

२२६१. मुंगिचियां घरा कोण जाय मूळ । देखोनियां गूळ धांव घाली ॥१॥ याचकाविण काय खोळंबला दाता । तोचि धांवे हिता आपुलिया ॥२॥ उदक अन्न काय म्हणे मज खावें ।

भुकेला तो जाय चोजवीत ॥३॥ व्याधी पिडिला धांवे वैद्याचिया घरा । दु:खाच्या परिहारा आपुलिया ॥४॥ तुका म्हणे जया आपुलें स्वहित । करणें तोचि प्रीत धरी कथे ॥५॥

२२६२. जन्मांतरिचा परिट न्हावी । जात ठावी त्यानें ते ॥१॥ वाखर जैसा चरचरी । तोंड करी संवदणी ॥२॥ पूर्व जन्मीं शिखासूत्र । मळ मूत्र अंतरीं ॥३॥ तुका म्हणे करिती निंदा । धुवटधंदा पुढिलांचा ॥४॥

२२६३. नाम दूषी त्याचें नको दरुषण । विष तें वचन वाटे मज ॥१॥ अमंगळ वाणी नाइकावी कानीं । निंदेची पोहणी उठे तेथें ॥२॥ काय साच लभ्य त्याचिये वचनीं । कोणत्या पुराणीं दिली ग्वाही ॥३॥ काय आड लावूं त्याचिया तोंडासी । आतां या जिभेसी काय करूं ॥४॥ तुका म्हणे संत न मानिती त्यास । घेऊं पाहे ग्रास यमदूत ॥५॥

२२६४. येऊनि नरदेहा झांकितील डोळे । बळेंचि अंधळे होती लोक ॥१॥ उजाडासरसी न चलती वाट । पुढील बोभाट जाणोनियां ॥२॥ बहु फेरे आले सोसोनि वोळसा । पुढें नाहीं ऐसा लाभ मग ॥३॥ तुका म्हणे जाऊं सादावीत वाटे । भेटे तरी भेटे कोणी तरी ॥४॥

२२६५. नव्हे जाखाई जोखाई । मायराणी मेसाबाई ॥१॥ बळिया माझा पंढरिराव । जो ह्या देवांचाही देव ॥२॥ रंडी चंडी शक्ति । मद्यमांस भक्षिती ॥३॥ बहिरव खंडेराव । रोटी सुटीसाठीं देव ॥४॥ गणोबा विक्राळ । लाडुमोदकांचा काळ ॥५॥ मुंजा ह्मैसासुरें । हे तों कोण लेखी पोरें ॥६॥ वेताळें फेताळें । जळो त्याचें तोंड काळें ॥७॥ तुका म्हणे चित्तीं । धरा रखुमाईचा पती ॥८॥

२२६६. पडतां जड भारी । दासीं आठवावा हरी ॥१॥ मग तो होऊं नेदी सीण । आड घाली सुदर्शन ॥२॥ नामाच्या चिंतनें । बारा वाटा पळती विघ्नें ॥३॥ तुका म्हणे प्राण । करा देवासी अर्पण ॥४॥

२२६७. मायें मोकलिलें कोठें जावें बाळें । आपुलिया बळें न वांचे तें ॥१॥ रुसोनियां पळे सांडुनियां ताट । मागें पाहे वाट यावी ऐसी ॥२॥ भांडवल आम्हां आळी करावी हे । आपणची धाये धांवशील ॥३॥ तुका म्हणे आळी करूनियां निकी । देसील भातुकीं बुझाऊनि ॥४॥

२२६८. नागर गोडें बाळरूप । तें स्वरूप काळीचें ॥१॥ गाईगोपाळांच्या संगें । आलें लागें पुंडलिका ॥२॥ तें हें ध्यान दिगंबर । कटीं कर मिरवती ॥३॥ नेणपणें उगेंचि उभें । भक्तिलोभें राहिलें ॥४॥ नेणे वरदळाचा मान । विटे चरण सम उभें ॥५॥ सहज कटावरी हात । दहीं भात शिदोरी ॥६॥ मोहरी पावा गांजिवा पाठीं । धरि काठी ज्याकाळें ॥७॥ रम्य स्थळ चंद्रभागा । पांडुरंगा क्रीडेसी ॥८॥ भीमा दक्षणमुख वाहे । दृष्टी पाहे समोर ॥९॥ तारावेसे मूढ लोक । दिली भाक पुंडलिका ॥१०॥ तुका म्हणे वैकुंठवासी । भक्तांपासीं राहिला ॥११॥

२२६९. विठ्ठलनामाचा नाहीं ज्या विश्वास । तो वसे उदास नरकामध्यें ॥१॥ तयासी बोलतां

होईल विटाळ। नव जाय तो जळस्नान करितां ॥२॥ विठ्ठलनामाची नाहीं ज्या आवडी। त्याची काळ घडी लेखिताहे ॥३॥ तुका म्हणे मज विठोबाची आण। जरी प्रतिवचन करिन त्यासी ॥४॥

२२७०. तया घडले सकळ नेम। मुखीं विठोबाचे नाम ॥१॥ कांहीं नलगें सिणावें। आणिक वेगळाल्या भावें ॥२॥ वाचे उच्चारावें। राम कृष्ण गोविंदा ॥३॥ फळ पावाल अवलिळा। भोग वैकुंठ सोहळा ॥४॥ तुका म्हणे त्याच्या नांवें। तोचि होईजे स्वभावें ॥५॥

२२७१. पुराणप्रसिद्ध सीमा। नामतारक महिमा ॥१॥ मागें जाळी महादोष। पुढें नाहीं गर्भवास ॥२॥ जें निंदिलें शास्त्रें। वंद्य जालें नाममात्रें ॥३॥ तुका म्हणे ऐसा। त्रिभुवनीं नामठसा ॥४॥

२२७२. नाम घेतां नलगे मोल। नाममंत्र नाहीं खोल ॥१॥ दोंचि अक्षरांचें काम। उच्चारावें राम राम ॥२॥ नाहीं वर्णधर्मयाती। नामीं अवघींचि सरती ॥३॥ तुका म्हणे नाम। चैतन्य हें निजधाम ॥४॥

२२७३. नाम घेतां वांयां गेला। ऐसे कोणे आइकिला ॥१॥ सांगा विनवितों तुम्हांसी। संत महंत सिद्ध ऋषी ॥२॥ नामें तरला नाहीं कोण। ऐसा द्यावा निवडून ॥३॥ सलगीच्या उत्तरा। तुका म्हणे क्षमा करा ॥४॥

२२७४. फुकाचें तें लुटा सार। व्हारे अमर सदैव ॥१॥ नाहीं गर्भवास पुढती। डोंगर जळती दोषांचे ॥२॥ उदंड भावें उदंड घ्यावें। नाम गावें आवडी ॥३॥ तुका म्हणे घरिंच्या घरीं। देशाउरीं न सीणीजे ॥४॥

२२७५. इतुकें करीं देवा ऐकें हें वचन। समूळ अभिमान जाळीं माझा ॥१॥ इतुलें करीं देवा ऐकें हे गोष्टी। सर्व समदृष्टीं तुज देखें ॥२॥ इतुलें करी देवा विनवितों तुज। संतचरणरज वंदीं माथां ॥३॥ इतुलें करी देवा ऐकें हे मात। हृदयीं पंढरीनाथ दिवसरात्रीं ॥४॥ भलतिया भावें तारीं पंढरीनाथा। तुका म्हणे आतां शरण आलों ॥५॥

२२७६. तुझा दास ऐसें म्हणती लोकपाळ। म्हणऊनी सांभाळ करीं माझा ॥१॥ अनाथाचा नाथ पतितपावन। हें आतां जतन करीं नाम ॥२॥ माझे गुण दोष पाहातां न लगे अंत। ऐसें माझें चित्त मज ग्वाही ॥३॥ नेणें तुझी कैसी करावी हे सेवा। जाणसी तूं देवा अंतरींचें ॥४॥ तुका म्हणे तूं या कृपेचा सिंधु। तोडीं भवबंधु माझा देवा ॥५।

२२७७. जाणावें तें काय नेणावें तें काय। ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥१॥ करावें तें काय न करावें तें काय। ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥२॥ बोलावें तें काय न बोलावें तें काय। ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥३॥ जावें तें कोठें नव जावें तें आतां। बरवें आठवितां नाम तुझें ॥४॥ तुका म्हणे तूं करिसी तें सोपें। पुण्यें होतीं पापें आमुच्या मतें ॥५॥

२२७८. नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव । मी भक्त तूं देव ऐसें करीं ॥१॥ दावीं रूप मज गोपिकारमणा । ठेवीन चरणांवरी माथा ॥२॥ पाहोनी श्रीमुख देईन आलिंगन । जीवें निंबलोण उतरीन ॥३॥ पुसतां सांगेन हितगुज मात । बैसोनी एकांत सुखगोष्टी ॥४॥ तुका म्हणे यासी न लावीं उशीर । माझें अभ्यंतर जाणोनियां ॥५॥

२२७९. मागें शरणागत तारिले बहुत । म्हणती दीनानाथ तुज देवा ॥१॥ पाहिले अपराध नाहीं याती कुळ । तारिला अजामेळ गणिका भिल्ली ॥२॥ अढळपदीं बाळ बैसविला धुरु । क्षीराचा सागरु उपमन्या ॥३॥ गजेंद्रपशु नाडिला जळचरें । भवसिंधुपार उतरिला ॥४॥ प्रह्लाद अग्नींत राखिला जळांत । विषाचें अमृत तुझ्या नामें ॥५॥ पांडवां संकट पडतां जडभारी । त्यांचा तूं कैवारी नारायणा ॥६॥ तुका म्हणे तूं या अनाथाचा नाथ । ऐकोनियां मात शरण आलों ॥७॥

२२८०. तुझा शरणागत जालों मी अंकित । करीं माझें हित पांडुरंगा ॥१॥ पतित पावन तुझी ब्रीदावळी । ते आतां सांभाळीं मायबापां ॥२॥ अनाथाचा नाथ बोलतील संत । ऐकोनियां मात विश्वासलों ॥३॥ न करावी निरास न धरावें उदास । देईं याचकास कृपादान ॥४॥ तुका म्हणे मी तों पातकांची रासी । देईं पायापासीं ठाव देवा ॥५॥

२२८१. सर्वस्वाचा त्याग तो सदा सोंवळा । न लिंपे विटाळा अग्नि जैसा ॥१॥ सत्यवादी करी संसार सकळ । अलिप्त कमळ जळीं जैसें ॥२॥ घडे ज्या उपकार भूतांची ते दया । आत्मस्थिति तया अंगी वसे ॥३॥ न बोले गुणदोष नाइके जो कानीं । वर्तोनी तो जनीं जनार्दन ॥४॥ तुका म्हणे वर्म जाणितल्याविण । पावे करितां सीण सांडीमांडी ॥५॥

२२८२. कुळधर्म ज्ञान कुळधर्म साधन । कुळधर्में निधान हाता चढे ॥१॥ कुळधर्म भक्ति कुळधर्म गति । कुळधर्म विश्रांति पाववील ॥२॥ कुळधर्म दया कुळधर्म उपकार । कुळधर्म सार साधनाचें ॥३॥ कुळधर्म महत्त्व कुळधर्म मान । कुळधर्म पावन परलोकींचें ॥४॥ तुका म्हणे कुळधर्म दावीं देव । यथाविध भाव जरी होय ॥५॥

२२८३. पुण्य परउपकार पाप ते परपीडा । आणिक नाहीं जोडा दुजा यासी ॥१॥ सत्य तोचि धर्म असत्य तें कर्म । आणिक हें वर्म नाहीं दुजें ॥२॥ गति तेचि मुखीं नामाचें स्मरण । अधोगति जाण विन्मुखता ॥३॥ संतांचा संग तोचि स्वर्गवास । नर्क तो उदास अनर्गळा ॥४॥ तुका म्हणे उघडें आहे हित घात । जयाचें उचित करा तैसें ॥५॥

२२८४. न वजे वांयां कांहीं ऐकतां हरिकथा । आपण करितां वांयां न वजे ॥१॥ न वजे वांयां कांहीं देवळासी जातां । देवासी पूजितां वांयां न वजे ॥२॥ न वजे वांयां कांहीं केलिया तीर्थ । अथवा कां व्रत वांयां न वजे ॥३॥ न वजे वांयां जालें संतांचें दर्शन । शुद्ध आचरण वांयां न वजे ॥४॥ तुका म्हणे भाव असतां नसतां । सायास करितां वांयां न वजे ॥५॥

२२८५. चित्तीं धरीन मी पाउलें सुकुमार । सकळ बिढार संपत्तीचें ॥१॥ कंठीं धरीन नाम अमृताची वल्ली । होईल राहिली शीतळ तनु ॥२॥ पाहेन श्रीमुख साजिरें सुंदर । सकळां आगर लावण्याचें ॥३॥ करीन अंगसंग बाळकाचे परी । बैसेन तो वरी नुतरें कडिये ॥४॥ तुका म्हणे हा केला तैसा होय । धरिली मने सोय विठोबाची ॥५॥

२२८६. बाळ मातेपाशीं सांगे तहानभूक । उपायाचें दुःख काय जाणे ॥१॥ तयापरी करीं पाळण हें माझें । घेऊनियां ओझें सकळ भार ॥२॥ कासया गुणदोष आणिसील मना । सर्व नारायणा अपराधी ॥३॥ सेवाहीन दीन पातकांची रासी । आतां विचारिसी काय ऐसें ॥४॥ जेणें काळें पायीं अनुसरलें चित्त । निर्धार हें हित झालें ऐसें ॥५॥ तुका म्हणे तुम्हीं तारिलें बहुतां । माझी कांहीं चिंता असों द्यावी ॥६॥

२२८७. जीवनावांचूनी तळमळी मासा । प्रकार हा तैसा होतो जीवा ॥१॥ न संपडे झालें भूमिगत धन । चरफडी मन तयापरी ॥२॥ मातेचा वियोग झालिया हो बाळा । हा तो कळवळा जाणा देवा ॥३॥ सांगावे ते किती तुम्हांसी प्रकार । सकळांचें सार पाय दावीं ॥४॥ येचि चिंते माझा करपला भीतर । कां नेणों विसर पडिला माझा ॥५॥ तुका म्हणे तूं हें जाणसी सकळ । यावरी कृपाळ होईं देवा ॥६॥

२२८८. शरण आले त्यासी नेदावी जी पाठी । ऐका जगजेठी विज्ञापना ॥१॥ आळवी तयासी उत्तर झडकरी । द्यावें परिसा हरी विज्ञापना ॥२॥ गांजिलियाचें करावें धांवणें । विनंती नारायणें परिसावी हे ॥३॥ भागलियाचा होईं रे विसांवा । परसावी केशवा विज्ञापना ॥४॥ अंकिताचा भार वागवावा माथां । परिसावी अनंता विज्ञापना ॥५॥ तुका म्हणे आम्हां विसरावें ना देवा । परिसावी केशवा विज्ञापना ॥६॥

२२८९. कोण आम्हां पुसे सिणलें भागलें । तुजविण उगलें पांडुरंगा ॥१॥ कोणापाशीं आम्हीं सांगावें सुखदुःख । कोण तहानभूक निवारील ॥२॥ कोण या तापाचा करील परिहार । उतरील पार कोण दुजा ॥३॥ कोणापें इच्छेचें मागावें भातुकें । कोण कवतुकें बुझावील ॥४॥ कोणावरी आम्हीं करावी हे सत्ता । होईल साहाता कोण दुजा ॥५॥ तुका म्हणे अगा स्वामी सर्व जाणा । दंडवत चरणां तुमच्या देवा ॥६॥

२२९०. प्रीति नाहीं राया वर्जिली ते कांता । परी तिची सत्ता जगावरी ॥१॥ तैसे दंभें जालों तरी तुझे भक्त । वास यमदूत न पाहाती ॥२॥ राजयाचा पुत्र अपराधी देखा । तो काय आणिकां दंडवेल ॥३॥ बाहात्तर खोडी परी देवमण कंठीं । तैसा मी जगजेठी म्हणे तुका ॥४॥

२२९१. करावा उद्धार किंवा घ्यावी हारी । एका बोला स्थिरी राहें देवा ॥१॥ निरासेनें माझा होईल संदेह । अवघेंचि आहे मूळ पायीं ॥२॥ राहिलों डिंकोनी कांहींच न कळे । कोणा नेणों काळें

उदय भाग्य ॥३॥ तुका म्हणे बहु उद्वेगला जीव । भाकीतसे कींव देवराया ॥४॥

२२९२. आलिया भोगासी असावें सादर । देवावरी भार घालूनियां ॥१॥ मग तो कृपासिंधु निवारी सांकडें । येर तें बापुडें काय रंक ॥२॥ भयाचिये पोटीं दुःखाचिया रासी । शरण देवासी जातां भले ॥३॥ तुका म्हणे नव्हे काय त्या करितां । चिंतावा तो आतां विश्वंभर ॥४॥

२२९३. भोग तो न घडे संचितावांचूनि । करावें तें मनीं समाधान ॥१॥ म्हणऊनी मनीं मानूं नये खेदू । म्हणावा गोविंदू वेळोवेळां ॥२॥ आणिकां रुसावें नलगे बहुतां । आपुल्या संचितावांचूनियां ॥३॥ तुका म्हणे भार घातलियावरी । होईल कैवारी नारायण ॥४॥

२२९४. निर्वैर व्हावें सर्वभूतांसवें । साधन बरवें हेंचि एक ॥१॥ तरीच अंगीकार करी नारायण । बडबड तो सीण येणेंविण ॥२॥ सोइरें पिशुन समानचि घडे । चित्त पर ओढे उपकारी ॥३॥ तुका म्हणे चित्त झालिया निर्मळ । तरिच सकळ केलें होय ॥४॥

२२९५. दिली चाले वाचा । क्षय मागिल्या तपाचा ॥१॥ रिद्धि सिद्धी येती घरा । त्याचा करिती पसारा ॥२॥ मानदंभासाठीं । पडे देवासवें तुटी ॥३॥ तुका म्हणे मेवा । कैंचा वेठीच्या निर्दैवां ॥४॥

२२९६. तापल्यावांचून नव्हे अळंकार । पिटूनियां सार उरलें तें ॥१॥ मग कदाकाळीं नव्हे शुद्ध जाति । नासें शत्रु होती मित्र तेचि ॥२॥ कलेवर बरें भोगूं द्यावें भोगा । फांसिलें तें रोगा हातीं सुटे ॥३॥ तुका म्हणे मन करावें पाठेळ । राहावेचि जाळ सिजेवरी ॥४॥

२२९७. पाठेळ करितां न साहावे वारा । साहेलिया ढोरा गोणी चाले ॥१॥ आपणां आपण हेचि कसवटी । हर्षामर्ष पोटीं विरों द्यावे ॥२॥ नवनीत तोंवरी कडकडी लोणी । निश्चळ होऊनी राहे मग ॥३॥ तुका म्हणे जरी जगे टाकीघाया । त्याच्या पडे पायां जन मग ॥३॥

२२९८. कावळिया नाहीं दया उपकार । काळिमें अंतर विटाळलें ॥१॥ तैसें कुजनाचें जिणें अमंगळ । घाणेरी वोंगळ वदे वाणी ॥२॥ कडु भोंपळ्याचा उपचारें पाक । सेविल्या तिडीक कपाळासी ॥३॥ तुका म्हणे विष सांडूं नेणें साप । आदरें तें पाप त्याचे ठायीं ॥४॥

२२९९. लाभ खरा नये तुटी । नाहीं आडखळा भेटी ॥१॥ जाय अवघिया देशा । येथें संचलासी तैसा ॥२॥ मग नलगे पारखी । अवघीं सकट सारखीं ॥३॥ तुका म्हणे वोळे । रूपें भुलविले डोळे ॥४॥

२३००. नको आतां पुसों कांहीं । लवलाहीं उसंती ॥१॥ जाय वेगीं पंढरपुरा । तो सोयरा दीनांचा ॥२॥ वचनाचा न करीं गोवा । रिघें देवा शरण ॥३॥ तुका म्हणे कृपावंता । बहु चिंता दीनाची ॥४॥

२३०१. बुद्धिहीनां जडजीवां । नको देवा उपेक्षूं ॥१॥ परिसावी हे विज्ञापना । आम्हां

दीनां दासांची ॥२॥ चिंतूनियां आले पाय । त्यांसी काय वंचना ॥३॥ तुका म्हणे पुरुषोत्तमा । करा क्षमा अपराध ॥४॥

२३०२. म्हणऊनि काकुलती । येतों पुढत पुढती । तुमचिया असे हातीं । कमळापती भांडार ॥१॥ फेडूं आलेती दरिद्र । तरी नलगेचि उशीर । पुरे अभयकर । ठाया ठाव रंकासी ॥२॥ कोठें न घली धांव । याजसाठीं त्यजिली हांव । घेऊं नेदी वाव । मना केला विरोध ॥३॥ कारणांच्या गुणें । वेळ काळ तोही नेणें । तुमच्या कीर्तनें । तुका तुम्हां जागवी ॥४॥

२३०३. बहु नांवें ठेविलीं स्तुतीची आवडी । बहुत या गोडी आली रसा ॥१॥ बहु सोसें सेवन केलें बहुवस । बहु जाला दिस गोमट्याचा ॥२॥ बहुतां पुरला बहुतां उरला । बहुतांचा केला बहु नट ॥३॥ बहु तुका जाला बहु निकट वृत्ती । बहु काकुलती येऊनियां ॥४॥

२३०४. इहलोकीं आम्हां वस्तीचें तें पेणें । उदासीन तेणें देहभावीं ॥१॥ कार्यापुरतें कारण मारगीं । उलंघूनि वेगीं जावें स्थळा ॥२॥ सोंगसंपादणी चालवितो वेव्हार । अत्यंतीं आदर नाहीं गोवा ॥३॥ तुका म्हणे वेंचे लाविला संचिता । होइल घेतां देतां लाभ कोणा ॥४॥

२३०५. रोजकीर्दी जमा धरुनी सकळ । खताविला काळ वरावरी ॥१॥ नाहीं होत झाड्यापाड्याचें लिगाड । हुजराती गोड सेवा रुजू ॥२॥ चोरासाठीं रदबदल अट्टाहास्य । जळो जिणें दास्य बहुतांचें ॥३॥ सावधान तुका निर्भर मानसीं । सालझाड्यापाशीं गुंफों नेणें ॥४॥

२३०६. त्रिविधकर्माचे वेगळाले भाव । निवडूवि ठाव दाखविले ॥१॥ आलियाचा झाडा राहिल्याचा ठाव । सुख तो गौरव संतां अंगीं ॥२॥ हिशेबें आलें तें सकळांसी प्रमाण । तेथें नाहीं आन चालों येत ॥३॥ तुका म्हणे नाहीं पापपुण्य खंती । झाड्याची हुजुती हातां आली ॥४॥

२३०७. साकरेचें नाम घेतां कळे गोडी । तैसी आम्हां जोडी वैष्णवांची ॥१॥ मोक्ष गांठी असे ठेविला बांधोनी । सोस तो भजनीं आवडीचा ॥२॥ भोजनाची चिंता माय वाहे बाळा । आम्हां तरी खेळावरि चित्त ॥३॥ तुका म्हणे आम्ही देहउपकारें । गाऊं निरंतर नाचों लागों ॥४॥

२३०८. सुखें घेऊं जन्मांतरें । एक बरें इहलोकीं ॥१॥ पंढरीचे वारकरी । होतां थोरी जोडी हे ॥२॥ हें तों आलें अनुभवा । पाहावें जीवावरूनि ॥३॥ तुका म्हणे केला त्याग । सर्वसंग म्हणऊनि ॥४॥

२३०९. करूं जातां सन्निधान । क्षण जन पालटे ॥१॥ आतां गोमटे ते पाय । तुझे माय विठ्ठले ॥२॥ हरिदासांचा समागम । अंगीं प्रेम विसांवा ॥३॥ तुका म्हणे हेंचि मन । इच्छादान मागतसे ॥४॥

२३१०. क्षीर मागे तया रायतेंचि वाढी । पाधानी गधडी ऐशा नांवें ॥१॥ समयो जाणां समयो जाणां । भलतें नाणां भलतेथें ॥२॥ अमंगळ वाणी वदवी मंगळी । अशुभ वोंगळी

शोभन तें ॥३॥ तुका म्हणे नेणें समयो ठाया ठाव । रहाडी ते वाव नरकाडी ॥४॥

२३११. विंचा पीडी नांगी । ज्याचा दोष त्याचे अंगा ॥१॥ केला पाहिजे विचार । मन मित्र दावेदार ॥२॥ मधुरा उत्तरीं । रांवा खेळे उराउरी ॥३॥ तुका म्हणे रेडा । सुखें जाती ऐशा पीडा ॥४॥

२३१२. तीर्थीची अपेक्षा स्थळीं वाढे धर्म । जाणावें तें वर्म बहु पुण्य ॥१॥ बहु बरी ऐसी भाविकांची जोडी । काळ नाहीं घडी जात वांयां ॥२॥ करूनी चिंतन करवावें आणिकां । तो या झाला लोकां नाव जगीं ॥३॥ तुका म्हणे ऐसे परउपकारी । त्यांच्या पायांवरी डोई माझी ॥४॥

२३१३. भयाची तों आम्हां चित्तीं । राहों खंती सकेचिना ॥१॥ समर्पिलों जीवें भावें । काशा भ्यावें कारणें ॥२॥ करीन तें कवतुकें । अवघें निकें शोभेल ॥३॥ तुका म्हणे माप भरूं । दिवस सारूं कवतुकें ॥४॥

२३१४. पाचारितां धावे । ऐसी ठायींची ही सवे ॥१॥ बोले करुणावचनीं । करी कृपा लावी स्तनीं ॥२॥ जाणे कळवळा । भावसिद्धींचा सोहळा ॥३॥ तुका म्हणे नाम । मागें मागें धांवे प्रेम ॥४॥

२३१५. कां जी माझे जीवीं । आळस ठेविला गोसावी ॥१॥ येवढा घात आणीक काय । चिंतनासी अंतराय ॥२॥ देह आत्मवादी । केला घात कुबुद्धी ॥३॥ तुका म्हणे मन । कळवळी वाटे सीण ॥४॥

२३१६. दर्शनाचें आर्त जीवा । बहु देवा राहिलें ॥१॥ आतां जाणसी तें करीं । विश्वंभरीं काय उणें ॥२॥ येथें जरी उरे चिंता । कोण दाता याहूनी ॥३॥ तुका म्हणे जाणवलें । आम्हां भले एवढेंचि ॥४॥

२३१७. बैसों पाठिमोरीं । मना वाटे तैसें करीं ॥१॥ परि तूं जाणसी आवडी । बाळा बहुतांची परवडी ॥२॥ आपुलाल्या इच्छा । मागों जया व्हावें तैसा ॥३॥ तुका म्हणे आई । नव्हेसी उदास विठाई ॥४॥

२३१८. विश्वंभरा वोळे । बहुत हात कान डोळे ॥१॥ जेथें असे तेथें देखे । मागितलें तें आईके ॥२॥ जें जें वाटे गोड । तैसें पुरवितो कोड ॥३॥ तुका म्हणे भेटी । कांहीं पडों नेदी तुटी ॥४॥

२३१९. दाटे कंठ लागे डोळियां पाझर । गुणाची अपार वृष्टि वरी ॥१॥ तेणें सुखें छंदें घेईन सोहळा । होऊनि निराळा पापपुण्यां ॥२॥ तुझ्या मोहें पडो मागील विसर । अलाप सुस्वर करिन कंठ ॥३॥ तुका म्हणे येथें पाहिजे सौरस । तुम्हांविण रस गोड नव्हे ॥४॥

२३२०. पसरूनि राहिलों बाहो । सोयी अहो तुमचीये ॥१॥ आतां यावें लागवेगें । पांडुरंगे धांवत ॥२॥ बैसायाची इच्छा कडे । चाली खडे रुपताती ॥३॥ तुका म्हणे कृपाळुवा ।

**करणें सेवा लागली ॥४॥**

**२३२१. आम्ही झालों एकविध । सुध्या सुधें असावें ॥१॥ यावरी तुमचा मोळा । तो गोपाळा अकळ ॥२॥ घेतलें तें उसणें द्यावें । कांहीं भावें विशेष ॥३॥ तुका म्हणे क्रियानष्ट । तरी कष्ट घेतसां ॥४॥**

**२३२२. आम्ही आर्तभूत जिवीं । तुम्ही गोसावी उदास ॥१॥ वादावाद समर्थाशीं । काशानशीं करावा ॥२॥ आम्ही मरों वेरझारीं । स्वामी घरीं बैसले ॥३॥ तुका म्हणे करिता वाद । कांहीं भेद कळेना ॥४॥**

**२३२३. पुसावें तें ठाईं आपुल्या आपण । अहंकारा शून्य घालूनियां ॥१॥ येर वाग्जाळ मायेचा अहंकार । वचनाशीं थार अज्ञान तें ॥२॥ फळ तेंचि बीज बीज तेंचि फळ । उपनांवें मूळ न पालटे ॥३॥ तुका म्हणे अवघे गव्हांचे प्रकार । सोनें अळंकार मिथ्या नांव ॥४॥**

**२३२४. माझी आतां सत्ता आहे । तुम्हां पायां हे वरती ॥१॥ एकाविण नेणें दुजा । पंढरीराजा सर्वांगें ॥२॥ पुरवावी केली आळी । जे जे काहीं मागेन तें ॥३॥ तुका म्हणे सुटसी कैसा । धरूनि दिशा राहिलों ॥४॥**

**२३२५. फावलें तें तुम्हां मागें । नवतों लागें पावलों ॥१॥ आलों आतां उभा राहें । जवळी पाहें सन्मुख ॥२॥ घरीं होती गोवी जाली । कामें बोली न घडेचि ॥३॥ तुका म्हणे धडफुडा । जालों झाडा देईं देवा ॥४॥**

**२३२६. आतां नये बोलों अव्हेराची मात । बाळावरि चित्त असों द्यावें ॥१॥ तुज कां सांगणें लागे हा प्रकार । परि हें उत्तर आवडीचें ॥२॥ न वंचि वो कांहीं एकही प्रकार । आपणां अंतर नका मज ॥३॥ तुका म्हणे मोहो राखावा सतत । नये पाहों अंत पांडुरंगा ॥४॥**

**२३२७. करोनि राहों जरी आत्माचि प्रमाण । निश्चळ नव्हे मन काय करूं ॥१॥ जेविलिया विण काशाचे ढेंकर । शब्दाचे प्रकार शब्दचि ते ॥२॥ पुरे पुरे आतां तुमचें ब्रह्मज्ञान । आम्हांसी चरण न सोडवे ॥३॥ विरोधें विरोध वाढे पुढतोपुढती । वासनेचे हातीं गर्भवास ॥४॥ सांडीमांडी अंगीं वसे पुण्यपाप । बंधन संकल्प याची नांवें ॥५॥ तुका म्हणे नाहीं मुक्तता मोकळी । ऐसा कोण बळी निरसी देह ॥६॥**

**२३२८. तुमचे स्तुतियोग्य कोठें माझी वाणीं । मस्तक चरणीं ठेवितसें ॥१॥ भक्तिभाग्य तरी नेदीं तुळसीदळ । जोडूनि अंजुळ उभा असें ॥२॥ कैचें भाग्य ऐसें पाविजे सन्निध । नेणें पाळूं विध करुणा भाकीं ॥३॥ संतांचे शेवटीं उच्छिष्टाची आस । करूनियां वास पाहतसें ॥४॥ करीं इच्छा मज म्हणोत आपुलें । एखादिया बोलें निमित्याच्या ॥५॥ तुका म्हणे शरण आलों हें साधन । करितों चिंतन रात्रंदिवस ॥६॥**

२३२९. सर्वविशीं आम्ही हेचि जोडी केली । स्वामिची साधिली चरणसेवा ॥१॥ पाहिलेंचि नाहीं मागें परतोनि । जिंकिला तो क्षणोक्षणीं काळ ॥२॥ नाहीं पडों दिला विचाराचा गोवा । नाहीं पोटीं हेवा येऊं दिला ॥३॥ केली लागवेगीं अवघी तांतडी । भावना ते कुडी दुरावली ॥४॥ कोठें मग ऐसें होतें सावकाश । जळो तया आस वेव्हाराची ॥५॥ तुका म्हणे लाभ घेतला पालवीं । आतां नाहीं गोवी कासयाची ॥६॥

२३३०. येणे मुखें तुझें वर्णी गुण नाम । तेंचि मज प्रेम देईं देवा ॥१॥ डोळे भरूनियां पाहेन तुझें मुख । तेंचि मज सुख देईं देवा ॥२॥ कान भरोनियां ऐकेन तुझी कीर्ती । ते मज विश्रांती देईं देवा ॥३॥ वाहें रंगीं टाळी नाचेन उदास । हें देईं हातांस पायां सुख ॥४॥ तुका म्हणे माझा सकळ देहभाव । आणीक नको ठाव चिंतूं यासी ॥५॥

२३३१. तूं माझा मायबाप सकळ वित्त गोत । तूंचि माझें हित करितां देवा ॥१॥ तूंचि माझा देव तूंचि माझा जीव । तूंचि माझा भाव पांडुरंगा ॥२॥ तूं माझा आचार तूं माझा विचार । तूंचि सर्व भार चालविसी ॥३॥ सर्वभावें मज तूं होसी प्रमाण । ऐशी तुझी आण वाहातसें ॥४॥ तुका म्हणे तुज विकला जीवभाव । कळेल तो उपाव करीं आतां ॥५॥

२३३२. वारंवार तुज द्यावया आठव । आइक तो भाव माझा कैसा ॥१॥ गेला मग नये फिरोन दिवस । पुढिलांची आस गणित नाहीं ॥२॥ गुणांअवगुणांचे पडती आघात । तेणें होय चित्त कासावीस ॥३॥ कांहीं एक तुझा न देखों आधार । म्हणऊनि धीर नाहीं जीवा ॥४॥ तुका म्हणे तूं या ब्रह्मांडाचा जीव । तरि का आम्ही कींव भाकितसों ॥५॥

२३३३. असोत हे तुझे प्रकार सकळ । काय खळखळ करावी हे ॥१॥ आमुचे स्वहित जाणतसों आम्ही । तुझें वर्म नामीं आहे तुझ्या ॥२॥ विचारितां आयुष्य जातें वांयांविण । रोज नागवण पडतसे ॥३॥ राहेन मी तुझे पाय आठवूनी । आणिक तें मनीं येऊं नेदीं ॥४॥ तुका म्हणे येथें येसी अनायासें । थोर तुज पिसें कीर्तनाचें ॥५॥

२३३४. विष्णुदासा भोग । जरी आम्हां पीडी रोग ॥१॥ तरि हें दिसे लाजिरवाणें । काय तुम्हांसी सांगणें ॥२॥ आम्हां काळें खावें । बोलिलें तें वायां जावें ॥३॥ तुका म्हणे दास । आम्ही भोगूं गर्भवास ॥४॥

२३३५. भावें गावें गीत । शुद्ध करूनियां चित्त ॥१॥ तुज व्हावा आहे देव । तरि हा सुलभ उपाव ॥२॥ आणिकांचे कानीं । गुण दोष मना नाणीं ॥३॥ मस्तक ठेंगणा । करीं संतांच्या चरणा ॥४॥ वेचीं तें वचन । जेणें राहे समाधान ॥५॥ तुका म्हणे फार । थोडा तरी परउपकार ॥६॥

२३३६. नहो आतां जीवीं कपटवसती । मग काकुलती कोणा यावें ॥१॥ सत्याचिये

मापें गांठीं नये नाड । आदि अंतीं गोड नारायण ॥२॥ चोखटीया नाहीं विटाळाचा आघात । साच तें साचत सांच पडे ॥३॥ विचारिली वाट उसंती शीतळ । बुद्धीपुढें बळ तृणतुल्य ॥४॥ आहाराच्या घासें पचोनियां जिरे । वासनाही उरे उर्वरीत ॥५॥ तुका म्हणे ताळा घालावा वचनीं । तूं माझी जननी पांडुरंगे ॥६॥

२३३७. नव्हती हीं माझीं जायाचीं भूषणें । ऐसें नारायणें उचित केलें ॥१॥ शब्दाच्या ओवणीं रत्नाचिया माळा । मुळींचा जिव्हाळा झरवणी ॥२॥ अर्थांतरीं असे अनुभवसेवन । परिपाकीं मन साक्ष येथें ॥३॥ तुका म्हणे मज सरतें परतें । हें नाहीं अनंतें उरों दिलें ॥४॥

२३३८. सहज लीळा मी साक्षी याचा । नये वंचू वाचा ऐसें जालें ॥१॥ उमक्रमें वदे निशब्दाची वाणी । जे कोठें बंधनीं गुंफों नेणें ॥२॥ तमनासी परी वेव्हारा वेगळा । रविप्रभाकळा वर्ते जन ॥३॥ तुका म्हणे येथें गेला अतिशय । आतां पुन्हां नये तोंड दावूं ॥४॥

२३३९. बोलाल या आतां आपुल्या पुरतें । मज या अनंतें गोवियेलें ॥१॥ झाडिला न सोडीं हातींचा पालव । वेधी वेधें जीव वेधियेला ॥२॥ तुमचे ते शब्द कोरडिया गोष्टी । मज सवें मिठी अंगसंगें ॥३॥ तुका म्हणे तुम्हां होईल ये परी । अनुभवावरी येईल मग ॥४॥

२३४०. जैशा तुम्ही दुरी आहां । तैशा राहा अंतरें ॥१॥ नका येऊं देऊं आळ । अंगीं गोपाळ जडलासे ॥२॥ अवघा हाचि राखा काळ । विक्राळचि भोंवता ॥३॥ तुका म्हणे मज ऐशा । होतां पिशा जगनिंद्य ॥४॥

२३४१. सतीचें तें घेतां वाण । बहु कठीण परिणामीं ॥१॥ जिवासाठीं गौरव वाढे । आहाच जोडे तें नव्हे ॥२॥ जरि होय उघडी दृष्टि । तरी गोष्टी युद्धाच्या ॥३॥ तुका म्हणे अंगा येतां । तरी सत्ता धैर्याची ॥४॥

२३४२. आडवा तो उभा । असे दाटोनियां प्रभा ॥१॥ देव नाहीं एकविध । एक भाव असे शुद्ध ॥२॥ भेदाभेद आटी । नाहीं फार कोठें तुटी ॥३॥ तुका म्हणे गोवा । उगवा वेव्हाराचा हेवा ॥४॥

२३४३. एका बोटाची निशाणी । परीपाक नाहीं मनीं ॥१॥ तरि तें संपादिलें सोंग । कारणावांचूनियां व्यंग ॥२॥ वैष्णवांचा धर्म । जग विष्णु नेणे वर्म ॥३॥ अतिशयें पाप । तुका सत्य करी माप ॥४॥

२३४४. सत्यत्वेंशीं घेणें भक्तीचा अनुभव । स्वामीचा गौरव इच्छीतसे ॥१॥ मग तें अवीट न भंगे साचार । पावलें विस्तार फिरों नेणे ॥२॥ वाणी वदे त्याचा कोणासी विश्वास । अभयकरें दास सत्य तईं ॥३॥ तुका म्हणे आधीं न करीं तांतडी । पायीं झाली जोडी तेणें शुद्ध ॥४॥

२३४५. सर्वात्मकपण । माझें हिरोनि नेतो कोण ॥१॥ मनीं भक्तीची आवडी । हेवा व्हावी

ऐशी जोडी ॥२॥ घेईन जन्मांतरें । हेंचि करावया खरें ॥३॥ तुका म्हणे देवा । ऋणी करूनि ठेवूं सेवा ॥४॥

२३४६. आणितां त्या गती । हंस काउळे न होती ॥१॥ सांडा सांडा रे मठारे । एकी गांठी सवें धुरें ॥२॥ नाकेंविण मोती । उभ्या बाजारें फजिती ॥३॥ हुकुमदाज तुका । येथें कोणी फुंदों नका ॥४॥

२३४७. ढेंकणासी बाज गड । उतरचढ केवढी ॥१॥ होता तैसा कळों भाव । आला वाव अंतरींचा ॥२॥ बोरामध्यें असे अळी । अठोळीच भोंवती ॥३॥ पोटासाठी वेंची चणे । राजा म्हणे तोंडें मी ॥४॥ बेडकानें चिखल खावा । काय ठावा सागर ॥५॥ तुका म्हणे तैसें आहे । काय पाहे त्यांत तें ॥६॥

२३४८. धांव धांव गरुडध्वजा । आम्हां अनाथांच्या काजा ॥१॥ बहु झालों कासावीस । म्हणोनि पाहें तुझी वास ॥२॥ पाहें त्या मारगें । कोणी येतें माझ्या लागें ॥३॥ असोनियां ऐसा । तुज सारिखा कोंवसा ॥४॥ न लवा उशीर । नेणों कां हो केला धीर ॥५॥ तुका म्हणे चाली । नको चालूं धांव घालीं ॥६॥

२३४९. पांडुरंगे पांडुरंगे । माझे गंगे माउलिये ॥१॥ पान्हा घालीं प्रेमधारा । पूर क्षीरा लोटों दे ॥२॥ अंगें अंग मेळउनी । करीं धणी फेडावया ॥३॥ तुका म्हणे घेइन उड्या । सांडिन कुड्या भावना ॥४॥

२३५०. गजइंद्र पशु आप्तें मोकलिला । तो तुज स्मरला पांडुरंगा ॥१॥ त्यासाठीं गरुड सांडूनि धांवसी । माया झळंबसी दीनानाथा ॥२॥ धेनु वत्सावरी झेंप घाली जैसी । तैसें गजेंद्रासी सोडविलें ॥३॥ तुका म्हणे ब्रीद बांधला यासाठीं । भक्तांसी संकटीं रक्षावया ॥४॥

२३५१. चारी वेद जयासाठीं । त्याचें नाम धरा कंठीं ॥१॥ न करीं आणीक साधन । कष्टसी कां वांयाविण ॥२॥ अठरा पुराणांचे पोटी । नामाविण नाहीं गोठी ॥३॥ गीता जेणें उपदेशिली । ते ही विटेवरी माउली ॥४॥ तुका म्हणे सार धरीं । वाचे हरिनाम उच्चारी ॥५॥

२३५२. पाहतां ठायाठाव । जातो अंतरोनि देव ॥१॥ नये वाटों गुणदोषीं । मना जतन येविशीं ॥२॥ त्रिविधदेह परिचारा । जनीं जनार्दन खरा ॥३॥ तुका म्हणे धीरें । विण कैसें होतें बरें ॥४॥

२३५३. नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरें ॥१॥ न लगती सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ॥२॥ ठायींच बैसोन करा एकचित्त । आवडी अनंत आळवावा ॥३॥ रामकृष्ण हरिविठ्ठलकेशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळ ॥४॥ याविण आणीक असतां साधन । वाहातसें आण विठोबाची ॥५॥ तुका म्हणे सोपें आहे सर्वांहूनि ।

शाहाणा तो धणी घेतो येथें ॥६॥

२३५४. भाविकाचें काज अंगें देव करी । काढी धर्माघरीं उच्छिष्ट तें ॥१॥ उच्छिष्ट तीं फळें खाय भिल्लटीचीं । आवडी तयाची मोठी देवा ॥२॥ काय देवा घरीं न मिळेची अन्न । मागे भाजीपान द्रौपदीसी ॥३॥ अर्जुनाचीं घोडीं धुतलीं अनंतें । संकटें बहुतें निवारिलीं ॥४॥ तुका म्हणे ऐसीं आवडती लडिवाळें । जाणीवेचें काळें तोंड देवा ॥५॥

२३५५. सावळें रूपडें चोरटें चित्ताचें । उभें पंढरीचे विटेवरी ॥१॥ डोळियांची धणी पाहतां न पुरे । तयालागीं झुरें मन माझें ॥२॥ प्राण रिघों पाहे कुडी ये सांडुनी । श्रीमुख नयनीं न देखतां ॥३॥ चित्त मोहियेलें नंदाच्या नंदनें । तुका म्हणे येणें गरुडध्वजें ॥४॥

२३५६. ऐका ऐका भाविकजन । व्हाल कोण कोण ते ॥१॥ तार्किकांचा टाका संग । पांडुरंग स्मरा हो ॥२॥ नका शोधूं मतांतरें । नुमगे खरें बुडाल ॥३॥ कलीमध्यें दास तुका । जातो लोकां सांगत ॥४॥

२३५७. आपुलिया अंगें तोडी मायाजाळ । ऐसें नाहीं बळ कोणापाशीं ॥१॥ रांडापोरें त्याग करी कुटुंबाचा । नावरे हे वाचा आणि मन ॥२॥ मुक्त जालों ऐसें बोलों जाय मुखें । तुका म्हणे दुःखें बांधला तो ॥३॥

२३५८. आलिया अतीता म्हणतसां पुढें । आपुलें रोकडें सत्त्व जाय ॥१॥ काय त्याचा भार घेऊनि मस्तकीं हीनकर्मी लोकीं म्हणावया ॥२॥ दारीं हाका कैसें करवतें भोजन । रुची तरि अन्न कैसें देतें ॥३॥ तुका म्हणे ध्वज उभारिला कर । ते शक्ति उदार काय झाली ॥४॥

२३५९. जेथें लक्ष्मीचा वास । गंगा आली पापा नाश ॥१॥ तुझीं पाउलें सुकुमार । तेथें मन माझें भ्रमर ॥२ । ठाव धरिला संतजनीं । सुखें राहिले लपोनी ॥३॥ तुका म्हणे वांकी । भाट झाली तिन्हीं लोकीं ॥४॥

२३६०. रूपीं जडले लोचन । पायीं स्थिरावलें मन ॥१॥ देहभाव हरपला । तुज पाहतां विठ्ठला ॥२॥ कळों नये सुखदुःख । तहान हरपली भूक ॥३॥ तुका म्हणे नव्हे परती । तुझ्या दर्शनें मागुती ॥४॥

२३६१. जाणतें लेंकरूं । माता लागे दूर धरूं ॥१॥ तैसें न करीं कृपावंते । पांडुरंगे माझे माते ॥२॥ नाहीं मुक्ताफळा । भेटी मागुती त्या जळा ॥३॥ तुका म्हणे लोणी । ताक सांडी निवडूनि ॥४॥

२३६२. तुजविण कोणां । शरण जाऊं नारायणा ॥१॥ ऐसा न देखें मी कोणी । दुजा तिहीं त्रिभुवनीं ॥२॥ पाहिलीं पुराणें । धांडोळिलीं दरुषणें ॥३॥ तुका म्हणे ठायीं । जडून ठेलों तुझ्या पायीं ॥४॥

२३६३. ऐसें भाग्य कईं लाहता होईन। अवघें देखें जन ब्रह्मरूप ॥१॥ मग तया सुखा अंत नाहीं पार। आनंदें सागर हेलावती ॥२॥ शांति क्षमा दया मूर्तिमंत अंगीं। परावृत्त संगीं कामादिकां ॥३॥ विवेकासहित वैराग्याचें बळ। धगधगित ज्वाळ अग्नि जैसा ॥४॥ भक्ति नवविधा भाव शुद्ध वरी। अळंकारावरी मुगुटमणी ॥५॥ तुका म्हणे माझी पुरवी वासना। कोण नारायणा तुजविण ॥६॥

२३६४. कासया करावे तपाचे डोंगर। आणीक अपार दुःखरासी ॥१॥ कासया फिरावे अनेक ते देश। दावितील आस पुढें लाभ ॥२॥ कासया पूजावीं अनेक दैवतें। पोटभरे तेथें लाभ नाहीं ॥३॥ कासया करावे मुक्तीचे सायास। मिळे पंढरीस फुकासाठीं ॥४॥ तुका म्हणे करीं कीर्तन पसारा। लाभ येईल घरा पाहिजे तो ॥५॥

२३६५. वैष्णवमुनिविप्रांचा सन्मान। करावा आपण घेऊं नये ॥१॥ प्रभु झाला तरी संसाराचा दास। विहित तयासी यांची सेवा ॥२॥ तुका म्हणे हे आशीर्वादें बळी। जाईल तो छळी नरका यांसीं ॥३॥

२३६६. देव वसे चित्तीं। त्याची घडावी संगती ॥१॥ ऐसें आवडतें मना। देवा पुरवावी वासना ॥२॥ हरिजनासी भेटी। नहो अंगसंगे तुटी ॥३॥ तुका म्हणे जिणें। भले संतसंघष्टणें ॥४॥

२३६७. भाग शीण गेला। माझा सकळ विठ्ठला ॥१॥ तुझा म्हणवितों दास। केली उच्छिष्टाची आस ॥२॥ राहिली तळमळ। तईं पासोनि सकळ ॥३॥ तुका म्हणे धालें। पोट ऐसें कळों आलें ॥४॥

२३६८. रायाचें सेवक। शेवटीचें पीडी रंक ॥१॥ हा तों हिनाव कवणा। कां हो नेणां नारायणा ॥२॥ परिसेंसी भेटी। नव्हे लोहोपणा तुटी ॥३॥ तुझें नाम कंठीं। तुक्या काळासवें भेटी ॥४॥

२३६९. सुखरूप ऐसें कोण दुजें सांगा। माझ्या पांडुरंगासारिखें तें ॥१॥ नलगे हिंडणें मुंडणें तें कांहीं। साधनाची नाहीं आटाआटी ॥२॥ चंद्रभागे स्नान विध तो हरिकथा। समाधान चित्ता सर्वकाळ ॥३॥ तुका म्हणे काला वैकुंठीं दुर्लभ। विशेष हा लाभ संतसंगें ॥४॥

२३७०. नसतां अधिकार। उपदेशाची बळात्कार। तरि ते केले चार। माकड आणि गारोडी ॥१॥ धन धान्य राज्य बोल। वृथा रंजवणें फोल। नाहीं तेथें ओल। बीज वेची मूर्ख तो ॥२॥ नये बांधों गांठी। पदरा आणी ऐसी तुटी। असोन कसोटी। शिष्टाचार अनुभव ॥३॥ उपदेशी तुका। मेघ वृष्टीनें आइका। संकल्पासी धोका। सहज तें उत्तम ॥४॥

२३७१. घालूनियां मापी। देव भक्त बैसले जपीं ॥१॥ तैसी होते सांडउलंडी। निजनिजांची मुकुंडी ॥२॥ अमुपीं उखतें। आपण वोस आपणयातें ॥३॥ देव आतां झाला।

उगवी संकोच वहिला ॥४॥ अखंड नेलें वेठी । भार सत्याविण गांठी ॥५॥ आडविला झोंपा । रिता कलेवराचा खोंपा ॥६॥ गोदातीरीं आड । करिते करविते द्वाड ॥७॥ तुका म्हणे बळें । उपदेशाचें तोंड काळें ॥८॥

२३७२. उंबरांतील कीटका । हेंचि ब्रह्मांड ऐसें लेखा ॥१॥ ऐसीं उंबरें किती झाडीं । ऐसीं झाडें किती नव खंडीं ॥२॥ हेंचि ब्रह्मांड आम्हांसी । ऐसीं अगणित अंडें कैसी ॥३॥ विराटाचें अंगीं तैसे । मोजूं जातां अगणित केश ॥४॥ ऐशा विराटाच्या कोटी । सांठविल्या ज्याच्या पोटीं ॥५॥ तो हा नंदाचा बाळमुकुंद । तान्हा म्हणवी परमानंद ॥६॥ ऐशी अगम्य ईश्वरी लीला । ब्रह्मानंदीं गम्य तुक्याला ॥७॥

२३७३. ब्रह्मज्ञान तरी एके दिवसीं कळे । तात्काळ हा गळे अभिमान ॥१॥ अभिमान लागे शुकाचिये पाठी । व्यासें उफराटी दृष्टी केली ॥२॥ जनकभेटीसी पाठविला तेणें । अभिमान नाणें खोटें केलें ॥३॥ खोटें करूनियां लाविला अभ्यासीं । मेरुशिखरासी शुक गेला ॥४॥ जाऊनियां तेणें साधिली समाधी । तुका म्हणे तधीं होतों आम्ही ॥५॥

२३७४. सहज पावतां भगवंतीं । परि ही विकल्पें परतीं । फुकाची हे चित्तीं । आठवण न धरिती ॥१॥ हरि व्यापक सर्वगत । हा तंव मुख्यत्वें वेदान्त । चिंतनासी चित्त । असों द्यावें सावध ॥२॥ विरजाहोम याचि नांवें । देह नव्हें मी हें जाणावें । मग कां जी यावें । वरी लागे संकल्पा ॥३॥ कामक्रोधें देह मळिण । स्वाहाकारीं कैचें पुण्य । मंत्रीं पूजिलिया यज्ञानें । मन मुंडण नव्हेचि ॥४॥ अनन्यभक्तीचे उपाय । ते या विठोबाचे पाय । ध्याइल तो काय । चुकों जाणे मारग ॥५॥ आतां सांगे तुका । एक तुम्ही चुकों नका । सांडीमांडी धोका । शरण रिघतां गोमटें ॥६॥

२३७५. आम्हीं जाणावें तें काई । तुझें वर्म कोणे ठायीं । अंतपार नाहीं । ऐसें श्रुति बोलती ॥१॥ होई मज तैसा मज जैसा । साना सकुमार हृषीकेशा । पुरवी माझी आशा । भुजा चारी दाखवीं ॥२॥ खालता सप्तही पाताळा । वरता स्वर्गाहूनि ढिसाळा । तो मी मशक डोळां । कैसा पाहों आपुल्या ॥३॥ मज असे हा भरंवसा । पढीयें होसी तयां तैसा । पंढरीनिवासा । तुका म्हणे गा विठोबा ॥४॥

२३७६. वृक्षवल्ली आम्हां सोयरें वनचरें । पक्षीही सुस्वरें आळविती ॥१॥ येणें सुखें रुचे एकांताचा वास । नाहीं गुण दोष अंगा येत ॥२॥ आकाश मंडप पृथिवी आसन । रमे तेथें मन क्रीडा करूं ॥३॥ कंथाकमंडलू देहउपचारा । जाणवितो वारा अवसरु ॥४॥ हरिकथा भोजन परवडी विस्तार । करोनि प्रकार सेवूं रुची ॥५॥ तुका म्हणे होय मनासी संवाद । आपुलाचि वाद आपणांसी ॥६॥

२३७७. अनंत ब्रह्मांडें । एके रोमीं ऐसें धेंडें ॥१॥ तो या गौळियांचे घरीं । उंबरा चढतां

टेंका धरी ॥२॥ मारिले दैत्य गाढे । ज्यांचे पुराणीं पवाडे ॥३॥ तुका म्हणे कळा । अंगी जयाच्या सकळा ॥४॥

२३७८. सावधान ऐसें काय तें विचारा । आले हो संसारा सकळही ॥१॥ अंतीं समयाचा करणें विचार । वेचती सादर घटिका पळें ॥२॥ मंगळ हें नोहे कन्यापुत्रादिक । राहिला लौकिक अंतरपाट ॥३॥ तुका म्हणे देव अंतरला दुरी । डोळिया अंधारी पडलीसे ॥४॥

२३७९. लवण मेळवितां जळें । काय उरलें निराळें ॥१॥ तैसा समरस झालों । तुजमाजी हरपलों ॥२॥ अग्निकर्पूराच्या वेळीं । काय उरली काजळी ॥३॥ तुका म्हणे होती । तुझी माझी एक ज्योती ॥४॥

२३८०. सुख नाहीं कोठें आलिया संसारीं । वांयां हांवभरी होऊं नका ॥१॥ दुःखबांदवडी आहे हा संसार । सुखाचा विचार नाहीं कोठें ॥२॥ चौदा कल्पेंवरी आयुष्य जयाला । परी तो राहिला ताटीखालीं ॥३॥ तुका म्हणे वेगीं जाय सुटोनियां । धरूनि हृदयामाजी हरि ॥४॥

२३८१ तुजकरितां होय ऐसें काय नाहीं । डोंगराची राई रंक राणा ॥१॥ अशुभाचें शुभ करितां तुज कांहीं । अवघड नाहीं पांडुरंगा ॥२॥ सोळा सहस्र नारी ब्रह्मचारी कैसा । निराहारी दुर्वासा नवल नव्हे ॥३॥ पंचभ्रतार द्रौपदी ते सती । करितां पितृशांती पुण्य धर्मा ॥४॥ दशरथ पातकी ब्रह्महत्यारासी । नवल त्याचे कुशीं जन्म तुझा ॥५॥ मुनेश्वरा नाहीं दोष अणुमात्र । भांडवितां सूत्र वध होती ॥६॥ तुका म्हणे माझे दोष ते कायी । सरता तुझे पायीं झालों देवा ॥७॥

२३८२. आवडीच्या ऐसें झालें । मुखा आलें हरिनाम ॥१॥ आतां घेऊं धणीवरि । मागें उरी नुरेतो ॥२॥ सांठवण मना ऐसी । पुढें रासी अमुप ॥३॥ तुका म्हणे कारण झालें । विट्ठल या तीं अक्षरी ॥४॥

२३८३. उपजोनि मरें । परि हेंचि वाटे बरें ॥१॥ नाहीं आवडीसी पार । न म्हणवे झालें फार ॥२॥ अमृताची खाणी । उघडली नव्हे धणी ॥३॥ तुका म्हणे पचे । विट्ठल हें मुखा रुचे ॥४॥

२३८४. लटिकेचि साच दाविलें अचळ । पीडीतसें काळ किती म्हूण ॥१॥ सत्य तूं सत्य तूं सत्य तूं विट्ठला । कांगा हा दाविला जगदाकार ॥२॥ सांभाळीं सांभाळीं आपुली हे माया । आम्हासी कां भयाभीत केलें ॥३॥ रूप नाहीं त्यासी ठेवियलें नाम । लटिकाचि भ्रम वाढविला ॥४॥ तुका म्हणे कांगा झालासी चतुर । होतासी निसूर निर्विकार ॥५॥

२३८५. आमच्या कपाळें तुज ऐसी बुद्धि । धरावी ते शुद्धी योगा नये ॥१॥ काय या राहिलें विनोदावांचून । आपुलिया भिन्न केलें आम्हां ॥२॥ कोठें मूर्तिमंत दावीं पुण्यपाप । काशासी संकल्प वाहाविसी ॥३॥ तुका म्हणे आतां आवरावा चेडा । लटिकी ते पीडा पांडुरंगा ॥४॥

२३८६. न बोलावें ऐसें जनासी उत्तर । करितों विचार बहु वेळां ॥१॥ कोण पाप आड

ठाकतें येऊन । पालटीत गुण अंतरींचा ॥२॥ संसारा हातीं सोडविला गळा । का हे अवकळा येती पुढें ॥३॥ तुका म्हणे सेवे घडे अंतराय । यासी करूं काय पांडुरंगा ॥४॥

२३८७. आतां हे उचित माझी जनाहातीं । पाहिजे फजीती केली कांहीं ॥१॥ मग मी तुमचे न सोडीं चरण । त्रासोनियां मन येईल ठाया ॥२॥ वाउगे वाणीचा न धरीं कांटाळा । ऐशी कां चांडाळा बुद्धि मज ॥३॥ तुका म्हणे जरि माथा बैसे घाव । तरि मग वाव नेघे पुढें ॥४॥

२३८८. मायेवरी सत्ता आवडीची बाळा । संकोचोनि लळा प्रतिपाळी ॥१॥ अपराध माझे न मनावे मनीं । तु ही संतजनीं मायबापीं ॥२॥ आरुषावचनीं लेंकुरांची आळी । साहोनि कवळी मागुताली ॥३॥ तुका म्हणे अंगीं काय नाहीं सत्ता । परि निष्ठुरता उपजेना ॥४॥

२३८९. कैसा होतो कृपावंत । बहु संत सांगती ॥१॥ पुसणें नाहीं याती कुळ । लागों वेळ नेदावी ॥२॥ ऐसी काय जाणों किती । उतरती उतरलीं ॥३॥ दावी वैकुंठींच्या वाटा । पहातां मोठा संपन्न ॥४॥ अभिमान तो नाहीं अंगीं । भक्तालागीं न बैसे ॥५॥ आलें घ्यावें भलत्या काळें । विठ्ठल बळें आगळा ॥६॥ तुका म्हणे आळस निद्रा । नाहीं थारा ते ठायीं ॥७॥

२३९०. सदैव हे वारकरी । जे पंढरी देखती ॥१॥ पदोपदीं विठ्ठल वाचा । तया कैंचा संसार ॥२॥ दोष पळाले पळाले । पैल आले हरिदास ॥३॥ प्रेमभातें भरलें अंगीं । निर्लज्ज रंगीं नाचती ॥४॥ गोपीचंदनाची उटी । तुळसी कंठीं मिरवती ॥५॥ दुर्बळा या शक्तिहीना । त्याही जना पुरता ॥६॥ तुका म्हणे देव चित्तीं । मोक्ष हातीं रोकडा ॥७॥

२३९१. ऐसीं ठावीं वर्में । तरी सांडवलों भ्रमें ॥१॥ सुखें नाचतों कीर्तनीं । नाहीं आशंकित मनीं ॥२॥ ऐसें आलें हाता । बळे तरी गेली चिंता ॥३॥ सुख येथे आलें तरी । नाहीं आणिकांची उरी ॥४॥ ऐसें केलें देवें । पुढें कांहींच न व्हावें ॥५॥ तुका म्हणे मन । आतां झालें समाधान ॥६॥

२३९२. चित्तीं बैसलें चिंतन । नारायण नारायण ॥१॥ नलगे गोड कांहीं आतां । आणीक दुसरें सर्वथा ॥२॥ हरपला द्वैतभाव । तेणें देहचि झाला वाव ॥३॥ तुका म्हणे आम्ही । झालों निष्काम ये कामीं ॥४॥

२३९३. नव्हें परि म्हणवीं दास । कांहीं निमित्तास मूळ केलें ॥१॥ तुमचा तो धर्म कोण । हा आपण विचारा ॥२॥ नाहीं शुद्ध आचरण । परी चरण चिंतितों ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगा । ऐसें कां गा नेणा हे ॥४॥

२३९४. व्यापिलें सर्वत्र । बाहेरी भीतरी अंतर ॥१॥ ऐसें गोविंदें गोविलें । बोले नवजाय बोलिलें ॥२॥ संचिताची होळी । करूनि जीव घेतला बळी ॥३॥ तुकयाबंधु म्हणे नाहीं । आतां संसारा उरी कांहीं ॥४॥

२३९५. आम्हांपाशीं सरे एक शुद्धभाव । चतुराई जाणीव नलगे कळा ॥१॥ सर्व जाण

माझा स्वामी पांडुरंग। तया अंगसंग गोपाळासी ॥२॥ तुका म्हणे कर्में धर्में नये हातां। तयावरी सत्ता भाविकांची ॥३॥

२३९६. प्रीति करी सत्ता। बाळा भिती माता पिता ॥१॥ काय चाले त्याशीं बळ। आळी करितां कोल्हाळ ॥२॥ पदरीं घाली मिठी। खेटी मागें पुढें लोटी ॥३॥ बोले मना आलें। तुका साहिलें विठ्ठलें ।४॥

२३९७. आवडीचे भेटी निवे। चित्त पावे विश्रांति ॥१। बरवियाचा छंद वना। नारायणा अवीट ॥२॥ तुळणें कांहीं साम्या पुरे। हें तों नुरे ये रुचि ॥३॥ तुका म्हणे बरवें झालें। फावलें हें कळे त्या ॥४॥

२३९८. केलियाचें दान। करा आपुलें जतन ॥१॥ माझी बुद्धी स्थिर देवा। नाहीं विषयाचा हेवा ॥२॥ भावा अंतराय। अंतीं अंतरती पाय ॥३॥ तुका म्हणे जोडी। आदि अंतीं राहो गोडी ॥४॥

२३९९. माझे हातीं आहे करावें चिंतन। तुम्हीं कृपादान प्रेम द्यावें ॥१॥ मागतिया भांडवल आळवण। नामासी जतन दातियासी ॥२॥ बाळक धांवोनि आड रिघे स्तनीं। घालावा जननीं प्रेमपान्हा ॥३॥ तुका म्हणे करीं कासवीचे परी। आहे सूत्रदोरी तुझे हातीं ॥४॥

२४००. वाट दावी त्याचें गेलें काय। नागवला जो वारितां जाय ॥१॥ ऐसीं मागें ठकलीं किती। सांगतां खाती विषगोळा ॥२॥ विचारोनि पाहे त्यास। न वजे जीवा नव्हे नास ॥३॥ तुका म्हणे जो रुसला जीवा। तयासी केशवा काय चाले ॥४॥

२४०१. अनुभवावांचून सोंग संपादणें। नव्हें हें करणें स्वहिताचें ॥१॥ तैसा नको भुलों बाहिरल्या रंगें। स्वहित तेंचि वेगें करूनि घेईं ॥२॥ बहुरूपी रूपें नटला नारायण। सोंग संपादून जैसा तैसा ॥३॥ कनक झाड म्हूण वंदियेलें माथां। परि तेंही अर्था न मिळे माजी ॥४॥ पाषाणाचें नांव ठेवियलें देव। आणिका तारी भाव परि तो तैसा ॥५॥ तुका म्हणे त्याचा भाव तारी त्यास। अहंभावीं नास तोचि पावे ॥६॥

२४०२. मज नष्टा माया मोह नाहीं लोभ। अधिक तो क्षोभ आदराचा ॥१॥ धिग हें शरीर अनउपकारें। न मनीं आभार उपकाराचा ॥२॥ मजहून नष्ट आहे ऐसा कोण। नावडे मिष्टान्न बहुमोल ॥३॥ न दिसती मज आपलेसे गुण। संचित तें कोण जाणें मागें ॥४॥ तुका म्हणे माझें देखोनियां काई। पांडुरंगें पायीं राखियेलें ॥५॥

२४०३. उभ्या बाजारांत कथा। हे तों नावडे पंढरीनाथा ॥१॥ अवघें पोटासाठीं सोंग। तेथें कैंचा पांडुरंग ॥२॥ लावी अनुसंधान। कांहीं देईल म्हणवून ॥३॥ काय केलें रांडलेंका। तुला राजी नाहीं तुका ॥४॥

२४०४. असोत लोकांचे बोल शिरावरी । माझी मज बरी विठाबाई ॥१॥ आपंगिलें मज आहे ते कृपाळू । बहुत कनवाळू अंतरींची ॥२॥ वेदशास्त्रें जिसीं वर्णिती पुराणें । तिचें मी पोसणें लडिवाळ ॥३॥ जिचें नाम कामधेनु कल्पतरू । तिचें मी लेंकरूं तुका म्हणे ॥४॥

२४०५. वाराणसी गया पाहिली द्वारका । परि नये तुका पंढरीच्या ॥१॥ पंढरीसी नाहीं कोणा अभिमान । पाया पडे जन एकमेकां ॥२॥ तुका म्हणे जाय एक वेळ पंढरी । तयाचिये घरीं यम नये ॥३॥

२४०६. सांडुनियां सर्व लौकिकाची लाज । आळवा यदुराज भक्तिभावें ॥१॥ पाहुनियां झाडें ओरबडुनि पाला । खाऊनि विठ्ठला आळवावें ॥२॥ वेचुनियां चिंध्या भरूनियां धागा । गुंडाळोनि ढुंगा आळवावें ॥३॥ तुका म्हणे ऐसें मांडिल्या निर्वाण । तया नारायण उपेक्षीना ॥४॥

२४०७. दह्याचिये अंगीं निघे ताक लोणी । एका मोलें दोन्ही मागों नये ॥१॥ आकाशाचे पोटीं चंद्र तारांगणें । दोहोंशीं समान पाहों नये ॥२॥ पृथ्वीच्या पोटीं हिरा गारगोटी । दोहोंसीं संसाटी करूं नये ॥३॥ तुका म्हणे तैसें संत आणि जन । दोहोंसी समान भजूं नये ॥४॥

२४०८. काय धर्म नीत । तुम्हां शिकवावें हित ॥१॥ अवघें रचियेलें हेळा । लीळा ब्रह्मांड सकळा ॥२॥ नाम महादेव । येथें निवडला भाव ॥३॥ तुका म्हणे वेळे । माझें तुम्हां कां न कळे ॥४॥

२४०९. भांडावें तें गोड । पुरे सकळही कोड ॥१॥ ऐसा घरिचिया मोळा । ठावा निकटांजवळां ॥२॥ हांक देतां दारीं । येती जवळी सामोरीं ॥३॥ तुका म्हणे शिवें । मागितलें हातीं द्यावें ॥४॥

२४१०. तेरा दिवस झाले निश्चक्र करितां । न पवसी अनंता मायबापा ॥१॥ पाषाणाची खोळ घेउनि बैसलासि । काय हृषीकेशी झालें तुज ॥२॥ तुजवरी आतां प्राण मी त्यजीन । हत्या मी घालीन पांडुरंगा ॥३॥ फार विठाबाई धरिली तुझी आस । करिन जीवा नाश पांडुरंगा ॥४॥ तुका म्हणे आतां मांडिलें निर्वाण । प्राण हा सांडीन तुजवरी ॥५॥

२४११. लोक फार वाखा अमंगळ झाला । त्याचा त्याग केला पांडुरंगा ॥१॥ विषयीं चेवलों मीपणा मुकलों । शरण तुज आलों पांडुरंगा ॥२॥ घर दार अवघीं ज्यजिलीं नारायणा । जीवींच्या जीवना पांडुरंगा ॥३॥ तुका म्हणे पडिलों पुंडलिकापाशीं । धांव हृषीकेशी आलिंगी मज ॥४॥

२४१२. करिसी कीं न करिसी माझा अंगीकार । हा मज विचार पडिला देवा ॥१॥ देसी कीं न देसी पायांचें दर्शन । म्हणऊनी मन स्थिर नाहीं ॥२॥ बोलसी कीं न बोलसी मजसवें देवा । म्हणोनियां जीवा भय वाटे ॥३॥ होईल कीं न होय तुज माझा आठव । पडिला संदेह हाचि मज ॥४॥ तुका म्हणे मी तों कमाईचा हीण । म्हणऊनी सीण करी देवा ॥५॥

२४१३. ऐसा माझा कोण आहे भीडभार। नांवाचा मी फार वांयां गेलों ॥१॥ काय सेवा रुजू आहे सत्ताबळ। जें मज राऊळ कृपा करी ॥२॥ काय याती शुद्ध आहे कुळ कर्म। तेणें पडे वर्म तुझे ठायीं ॥३॥ कोण तपोनिधी दानधर्मशीळ। अंगीं एक बळ आहे सत्ता ॥४॥ तुका म्हणे वांयां झालों भूमीभार। होईल विचार काय नेणों ॥५॥

२४१४. साच मज काय कळों नये देवा। काय तुझी सेवा काय नव्हे ॥१॥ करावें तें बरें जेणें समाधान। सेवावें हें वन न बोलावें ॥२॥ शुद्ध माझा भाव होईल तुझे पायीं। तरीच हें देई निवडुनी ॥३॥ उचित अनुचित कळों आली गोष्टी। तुझे कृपादृष्टी पांडुरंगा ॥४॥ तुका म्हणे मज पायांसवें चाड। सांगसी तें गोड आहे मज ॥५॥

२४१५. नाहीं कांटाळलों परि वाटे भय। करावें तें काय न कळतां ॥१॥ जन वन आम्हां समानचि झालें। कामक्रोध केले पावटणी ॥२॥ षड्ऊर्मी शत्रु जिंकिले अनंता। नामाचिया सत्ताबळें तुझ्या ॥३॥ मुख्य धर्म आम्हां सेवकांचा ऐसा। स्वामी करील शिरसा पाळावें तें ॥४॥ म्हणऊनी तुका अवलोकूनी पाय। वचनाची पाहे वास एका ॥५॥

२४१६. वांयांविण हा वाढविला लौकिक। आणिला लटिका वाद दोघां ॥१॥ नाहीं ऐसा झाला देव माझ्या मतें। भुकेलें जेवितें काय जाणे ॥२॥ शब्दज्ञानें गौरविली हे वैखरी। साच तें अंतरीं बिंबेची ना ॥३॥ झालों परदेशी गेले दोन्ही ठाय। संसार ना पाय तुझे देवा ॥४॥ तुका म्हणे मागें कळों येतें ऐसें। न घेतों हें पिसें लावूनियां ॥५॥

२४१७. न कळे तत्त्वज्ञान मूढ माझी मति। परि ध्यातों चित्तीं चरणकमळ ॥१॥ आगमाचे भेद मी तो काय जाणें। काळ तो चिंतनें सारीतसें ॥२॥ कांहीं नेणें परि म्हणवितों दास। होईल त्याचा त्यास अभिमान ॥३॥ संसाराची सोय सांडिला मारग। दुराविलें जग एका घायें ॥४॥ मागिल लागाचें केलेंसें खंडन। एकाएकीं मन राखियेलें ॥५॥ तुका म्हणे अगा रखुमादेवीवरा। भक्तकरुणाकरा सांभाळावें ॥६॥

२४१८. संसार सोहळे भोगिती सकळ। भक्तां त्यांचें बळ विठोबाचें ॥१॥ भय चिंत्तीं धाक न मानिती मनीं। भक्ता चक्रपाणि सांभाळीत ॥२॥ पाप पुण्य त्यांचें धरूं न शके अंग। भक्तासी श्रीरंग सर्व भावें ॥३॥ नव्हती ते मुक्त आवडे संसार। देव त्यांचा भार सर्व वाहे ॥४॥ तुका म्हणे देव भक्तां वेळाईत। भक्त ते निश्चिंत त्याचियानें ॥५॥

२४१९. देवासी अवतार भक्तांसी संसार। दोहींचा विचार एकपणें ॥१॥ भक्तांसीं सोहळे देवाचिया अंगें। देव त्यांच्या संगें सुख भोगी ॥२॥ देवें भक्तां रूप दिलासे आकार। भक्तीं त्याचा पार वाखाणिला ॥३॥ एका अंगीं दोन्ही झालीं हे निर्माण। देवभक्तपण स्वामिसेवा ॥४॥ तुका म्हणे येथें नाहीं भिन्नभाव। भक्त तोचि देव देव भक्त ॥५॥

२४२०. हुंबरती गाय तयांकडे कान । कैवल्यनिधान देउनी ठाके ॥१॥ गोपाळांची पूजा उच्छिष्ट कवळी । तेणें वनमाळी सुखावला ॥२॥ चोरोनियां खाय दूध दहीं लोणी । भावें चक्रपाणि गोविला तो ॥३॥ निष्काम तो झाला कामासी लंपट । गोपिकांची वाट पाहात बैसे ॥४॥ जगदानीं इच्छी तुळसी एक दळ । भावाचा सकळ विकिला तो ॥५॥ तुका म्हणे हेंचि चैतन्य सांवळें । व्यापूनी निराळें राहिलेंसे ॥६॥

२४२१. वाढविलें कांगा । तुम्ही एवढें पांडुरंगा ॥१॥ काय होती मज चाड । एवढी करावया बडबड ॥२॥ ब्रह्मसंतर्पण । लोकीं करावें कीर्तन ॥३॥ निमित्याचा धणी । तुका म्हणे नेणे कोणी ॥४॥

२४२२. आनंद अद्वय नित्य निरामय । जे कां निजध्येय योगियांचें ॥१॥ ते हे समचरण साजिरे विटेवरी । पाहा भीमातीरीं विठ्ठलरूप ॥२॥ पुराणासी वाड श्रुति नेणती पार । तें झालें साकार पुंडलिका ॥३॥ तुका म्हणे ज्यातें सनकादिक ध्यात । तें आमुचें कुळदैवत पांडुरंग ॥४॥

२४२३. वाचेचिया आळा कवळिलें ब्रह्म । चुकविला श्रम पृथक तो ॥१॥ सुलभ तें झालें सुलभ तें झालें । जवळीच आलें पंढरिये ॥२॥ नामरूपाचे बांधलें मोटळें । एक एका वेळे सारियेलें ॥३॥ तुका म्हणे वाटे चुकली वसती । उधार तो हातीं आणियेला ॥४॥

२४२४. सवंग झालें सवंग झालें । घरा आलें बंदरींचें ॥१॥ आतां हेवा करूं सोस । भक्तिरस बहु गोड ॥२॥ पाउल वेचे चिंता नाहीं । आड कांहीं मग नये ॥३॥ तुका म्हणे संचिताचें । नेणे काचे राहें तें ॥४॥

२४२५. तुम्ही संत मायबाप कृपावंत । काय मी पतित कीर्ती वाणूं ॥१॥ अवतार तुम्हा धराया कारण । उद्धरावे जन जड जीव ॥२॥ वाढविलें सुख भक्ति भाव धर्म । कुळाचार नाम विठोबाचें ॥३॥ तुका म्हणे गुण चंदनाचे अंगीं । तैसे तुम्ही जगीं संतजन ॥४॥

२४२६. पाठी लागे तया दवडी दुरी । घालीं बाहेरी संवसारा ॥१॥ येउनि दडें तुमच्या पायीं । धांवें तईं छो म्हणा ॥२॥ पारखियाचा वास पडे । खडबडे उठी तें ॥३॥ तुका म्हणे लाविला धाक । नेदी ताक खाऊं देऊं ॥४॥

२४२७. सांखळिलों प्रीती गळां । भुंके वेळां जाणोनियां ॥१॥ तुमचें मी केशीराजा । सुने या काजा पाळिलों ॥२॥ आलें गेलें कळे वाटा । कोण निटा वांकुडिया ॥३॥ तुका म्हणे आलें वारी । दुरि तें दुरी नातळतां ॥४॥

२४२८. पाळोनियां मोठें केलें । त्यासी बोलें ओळखी ॥१॥ जवळोनि नवजे दुरी । लाड करी कौतुकें ॥२॥ खूण उभा विटेवरी । कटीं कर ठेउनियां ॥३॥ तुका म्हणे घातली वरी । झुली थोरी मोलाची ॥४॥

२४२९. सुनियांची आवडी देवा । घेत सेवा नाहीं कांहीं ॥१॥ सिकविलें जवळी बैसों । जेथें असों तेथेंचि ॥२॥ नेदी दुजें बोल करूं । गुरुगुरु न साहे ॥३॥ तुका म्हणे कुर्वाळितां । अंग सत्ता संगाची ॥४॥

२४३०. शिळें खातां आला वीट । सुने धीट पाय धरी ॥१॥ कान्होबा ते जाणे खूण । उन उन घास घाली ॥२॥ आपुले ठायींचें घ्यावें । लाड भावें पाळावा ॥३॥ तुका म्हणे मी जुनाट सुनें । मोहो तेणें परतला ॥४॥

२४३१. लागलें भरतें । ब्रह्मानंदाही वरतें ॥१॥ झाला हरिनामाचा तारा । सीड लागलें फरारा ॥२॥ बैसोनि सकळ । बाळ चालिले गोपाळ ॥३॥ तुका म्हणे वाट । बरवी सांपडली नीट ॥४॥

२४३२. धन वित्त कुळें । अवघियानें तें आगळें ॥१॥ ज्याचे नारायण गांठीं । भरला हृदय संपुटीं ॥२॥ अवघेंचि गोड । त्याचें पुरे सर्व कोड ॥३॥ तुका म्हणे अस्त । उदयो त्याच्या तेजानास्त ॥४॥

२४३३. बोलावें तें आम्ही आतां अबोलणें । एकाचि वचनें सकळासि ॥१॥ मेघवृष्टि कांहीं न विचारी ठाव । जैसा ज्याचा भाव त्यासी फळे ॥२॥ तुका म्हणे नाहीं समाधानें चाड । आपणाही नाड पुढिलासी ॥३॥

२४३४. अधिकार तैसा करूं उपदेश । साहे ओझें त्यास तेंचि द्यावें ॥१॥ मुंगीवरी भार गजाचें पालाण । घालितां ते कोण कार्यसिद्धि ॥२॥ तुका म्हणे फांसे वाघुरा कुऱ्हाडी । प्रसंगीं ते काढी पारधी तो ॥३॥

२४३५. नव्हों वैद्य आम्ही अर्थाचे भुकेले । भलते द्यावे पाले भलत्यासी ॥१॥ कुपथ्य करूनि विटंबावे रोगी । काय हे सलगी भीड त्याची ॥२॥ तुका म्हणे लासूं फासूं देऊं डाव । सुखाचा उपाव पुढें आहे ॥३॥

२४३६. मागें चिंता होती आस । केला नास या काळें ॥१॥ तुम्ही आम्हां उदासीन । भिन्नाभिन्न वारिलें ॥२॥ मोहजाळें दुःख वाढे । ओढे ओढे त्यास तें ॥३॥ तुका म्हणे कोण देवा । आतां हेवा वाढवी ॥४॥

२४३७. असो खटपट । आतां वाऊगे बोभाट ॥१॥ परिसा हे विनवणी । असो मस्तक चरणीं ॥२॥ अपराध करा । क्षमा घडले दातारा ॥३॥ तुका म्हणे व्यथा । तुम्हां कळे पंढरीनाथा ॥४॥

२४३८. अहो उभया विटेवरी । भरोवरी चुकविली ॥१॥ निवारलें येणें जाणें । कोणा कोणें रुसावें ॥२॥ संकल्पासी वेचे बळ । भारे फळ निर्माण ॥३॥ तुका म्हणे उभयतां । भेटी सत्ता लोभाची ॥४॥

२४३९. वारकरी पायांपाशीं । आले त्यांसी विनविलें ॥१॥ काय काय तें आइका । विसरों

नका रंकासी ॥२॥ चिंतावोनि चिंता केली । हे राहिली अवस्था ॥३॥ तुका म्हणे संवसारा । रुसलो खरा यासाठीं ॥४॥

२४४०. जीवींचें कां नेणां । परि हे आवडी नारायणा ॥१॥ वाढवावें हें उत्तर । कांहीं लाड करकर ॥२॥ कोठें वांयां गेले । शब्द उत्तम चांगले ॥३॥ तुका म्हणे बाळा । असतां तात्पर्य या खेळा ॥४॥

२४४१. वोढविले अंग । आतां करूनि घ्यावें सांग ॥१॥ काय पूजा ते मी नेणें । जाणावें जी सर्वजाणें ॥२॥ पोटा आलें बाळ । त्याचें जाणावें सकळ ॥३॥ तुका म्हणे हरी । वाहावें जी कडियेवरी ॥४॥

२४४२. शेवटींची हे विनंती । पाय चित्तीं रहावे ॥१॥ ऐसें करा कृपादान । तुम्हां मन सन्निध ॥२॥ भाग्येविण कैंची भेटी । नव्हे तुटी चिंतनें ॥३॥ तुका म्हणे कळसा आलें । हें विठ्ठलें परिसावें ॥४॥

२४४३. करूनियां शुद्ध मन । नारायण स्मरावा ॥१॥ तरीच हा तरिजे सिंधु । भवबंधू तोडोनियां ॥२॥ येथें सरे शुद्ध साचें । अंतरींचें बीज तें ॥३॥ तुका म्हणे लवणकळी । पडतां जळीं तें होय ॥४॥

२४४४. जिकडे पाहे तिकडे देव । ऐसा भाव दे कांहीं ॥१॥ काय केलों एकदेशी । गुणदोषीं संपन्न ॥२॥ पडे तेथें तुझ्या पायां । करीं वांयां न वजेसें ॥३॥ तुका म्हणे विषमें सारी । ठाणें धरी जिवासी ॥४॥

२४४५. सरे ऐसें ज्याचें दान । त्याचे कोण उपकार ॥१॥ नको वाढूं ऐसें काचें । दे वो साचे विठ्ठले ॥२॥ रडत मागें सांडी पोर । ते काय थोर माउली ॥३॥ तुका म्हणे कीर्ति वाढे । धर्म गाढे ते ऐसे ॥४॥

२४४६. लोभावरी ठेवुनि हेत । करी असत्य न्याय नीत ॥१॥ त्याच्या पूर्वजां पतन । नरकीं किडे होती जाण ॥२॥ कोटिगोहत्यापातक । त्यासी घडेल निष्टंक ॥३॥ मासां स्त्रवे जे सुंदरा । पाजी विटाळ पितरां ॥४॥ तुका म्हणे ऐसियासी । यम गांजील सायासी ॥५॥

२४४७. देह जाईल जाईल । यासी काळ बा खाईल ॥१॥ कां रे नुमजसी दगडा । कैचे हत्ती घोडे वाडा ॥२॥ लोडें बालिस्तें सुपती । जरा आलिया फजिती ॥३॥ शरीरसंबंधाचें नातें । भोरड्या बुडविती सेतातें ॥४॥ अझुनि तरी होईं जागा । तुका म्हणे पुढें दगा ॥५॥

२४४८. मागें बहुतां जना राखिलें आडणी । धांवसी निर्वाणीं नाम घेतां ॥१॥ ऐसें ठावें झालें मज बरव्या परी । म्हणऊनि करीं धांवा तुझा ॥२॥ माझेविशीं तुज पडिला विसरू । आतां काय करूं पांडुरंगा ॥३॥ अझूनि कां नये तुम्हांसी करुणा । दुरि नारायणा धरिलें मज

॥४॥ तुका म्हणे जीव जाऊं पाहे माझा । आतां केशीराजा घालीं उडी ॥५॥

२४४९. कळलें माझा तुज नव्हे रे आठव । काय काजें जीव ठेवूं आतां ॥१॥ तूं काय करिसी माझिया संचिता । धिग हे अनंता झालें जिणें ॥२॥ पतितपावन राहिलों हे आशा । आइकोनि ठसा कीर्ति तुझी ॥३॥ आतां कोण करील माझा अंगीकार । कळलें निष्ठुर झालासी तूं ॥४॥ तुका म्हणे माझी मांडिली निरास । करितों जीवा नास तुजसाठीं ॥५॥

२४५०. तरि का मागें वांयां कीर्ति वाढविली । जनांत आपुली ब्रिदावळी ॥१॥ साच करितां आतां फिरसी माघारा । ठायींचें दातारा नेणवेचि ॥२॥ संतांसी श्रीमुख कैसें दाखविसी । पुढें मात त्यांसी सांगईन ॥३॥ घेईन डांगोरा तुझिया नामाचा । नव्हे अनाथांचा नाथ ऐसा ॥४॥ तुका म्हणे आम्ही राहिलों मरोनी । तूं कां होसी धनी निमित्याचा ॥५॥

२४५१. लाजती पुराणें । वेदां येऊं पाहे उणें ॥१॥ आम्ही नामाचे धारक । किविलवाणीं दिसों रंक ॥२॥ बोलिले ते संतीं । बोल वांयांविण जाती ॥३॥ तुका म्हणे देवा । रोकडे हे मोडे सेवा ॥४॥

२४५२. आम्ही तुझ्या दासीं । जरी जावें पतनासी ॥१॥ तरि हें दिसे विपरीत । कोठें बोलली हे नीत ॥२॥ तुझें नाम कंठीं । आम्हां संसार आटी ॥३॥ तुका म्हणे काळ । करिल आम्हांसी विटाळ ॥४॥

२४५३. आहार निद्रे नलगे आदर । आपण सादर तेचि होय ॥१॥ परिमितीविणें बोलणें तें वांयां । फार थोडें काया पिंड पीडी ॥२॥ समाधान त्याचें तोचि एक जाणे । आपुलिये खुणे पावोनियां ॥३॥ तुका म्हणे होय पीडा ते न करीं । मग राहें परी भलतिये ॥४॥

२४५४. भूमि अवघी शुद्ध जाणा । अमंगळ हे वासना ॥१॥ तैसे वोपसले जीव । सांडी नसतां अंगीं घाव ॥२॥ जीव अवघे देव । खोटा नागवी संदेह ॥३॥ तुका म्हणे शुद्ध । मग तुटलिया भेद ॥४॥

२४५५. सरतें माझें तुझें । तरि हें उतरतें ओझें ॥१॥ नलगे सांडावें मांडावें । आहे शुद्धचि स्वभावें ॥२॥ घातला तो आशा । मोहोजाळें गळां फासा ॥३॥ सुखाचा तो मान । नाहीं दुःखाचा तो शीण ॥४॥ करितां नारायण । एवढें वेचितां वचन ॥५॥ तैसा मान अपमान । लाभ हानी हे समान ॥६॥ तुका म्हणे याचें । नांव सोवळें हें साचें ॥७॥

२४५६. तुज करितां होते ऐसे । मूढ चतुर पंडित पिसे ॥१॥ परि हें वर्म नेणती कोणी । पीडाखाणी भोगितील ॥२॥ उल्लंघिती पांगुळ गिरी । मुकें करी अनुवाद ॥३॥ पापी होती पुण्यवंत । न करी घात दुर्जन ॥४॥ अवघें हेळमात्रें हरि । मुक्त करी ब्रह्मांड ॥५॥ तुका म्हणे खेळे लीळा । पाहे वेगळा व्यापूनी ॥६॥

२४५७. पिकवावें धन । ज्याची आस करी जन ॥१॥ पुरोनि उरे खातां देतां । नव्हे खंडण मवितां ॥२॥ खोलीं पडे ओली बीज । तरीच हातीं लागे निज ॥३॥ तुका म्हणे धणी । विठ्ठल अक्षरें या तिन्ही ॥४॥

२४५८. करिसी लाघवें । तूं हें खेळसी आघवें ॥१॥ केला अहंकार आड । आम्हां जगासी हा नाड ॥२॥ इत्थंभूत यावें । दावूं लपोंही जाणावें ॥३॥ तुका म्हणे हो श्रीपती । आतां चाळवाल किती ॥४॥

२४५९. घालिती पव्हया । वाटे अनाथाच्या दया ॥१॥ तैसें कां हो नये करूं । पांडुरंगा मज तारूं ॥२॥ रोगियासी काढा । देउनि वारिताती पीडा ॥३॥ बुडत्यासाठीं उडी । घालिताती काय जोडी ॥४॥ झाडिताती कांटे । पुढें मागिलांचे वाटे ॥५॥ तुका म्हणे भार । घेती भागल्यांचा फार ॥६॥

२४६०. नका दंतकथा येथें सांगों कोणी । कोरडे ते मानी बोल कोण ॥१॥ अनुभव येथें पाहिजे साचार । न चलती चार आम्हांपुढें ॥२॥ वरी कोण मानी रसाळ बोलणें । नाहीं झाली मनें वोळखीतों ॥३॥ निवडी वेगळें क्षीर आणि पाणी । राजहंस दोन्ही वेगळालीं ॥४॥ तुका म्हणे येथें पाहिजे जातीचें । येर गाबाळाचें काय काम ॥५॥

२४६१. न करि त्याचें गांढेपण । नारायण सिद्ध उभा ॥१॥ भवसिंधुचा थडवा केला । बोलाविला पाहिजे ॥२॥ याचे सोई पाउल वेचे । मग कैचे अडथळे ॥३॥ तुका म्हणे खरें खोटें । न म्हणे मोठें लहान ॥४॥

२४६२. रिकामें तूं नको मना । राहों क्षणक्षणाही ॥१॥ वेळोवेळां पारायण । नारायण हें करीं ॥२॥ भ्रमणाच्या मोडीं वाटा । न भरें फाटा आडरानें ॥३॥ तुका म्हणे माझ्या जीवें । हेंचि घ्यावें धणीवरी ॥४॥

२४६३. पंचभूताचे सांपडलों संदीं । घातलोंसे बंदीं अहंकारें ॥१॥ आपल्या आपण बांधविला गळा । नेणेंचि निराळा असतांही ॥२॥ कासया हा सत्य मानिला संसार । कां हे केले चार माझें माझें ॥३॥ कां नाहीं शरण गेलों नारायणा । कां नाहीं वासना आवरिली ॥४॥ किंचित सुखाचा धरिला अभिळास । तेणें बहु नास केला पुढें ॥५॥ तुका म्हणे आतां देह देऊं बळी । करुनि सांडूं होळी संचिताची ॥६॥

२४६४. देव झाले अवघे जन । दोष गुण हारपले ॥१॥ बरवें झालें बरवें झालें । चित्त धालें महालाभें ॥२॥ दर्पणीचें दुसरें भासे । परि तें असे एक तें ॥३॥ तुका म्हणे सिंधुभेटी । उदका तुटी वोहोळासी ॥४॥

२४६५. बहुत प्रकार गव्हांचे । जिव्हा नाचे आवडी ॥१॥ सरले परि आवडी नवी । सिंधु

दावी तरंग ॥२॥ घेतलें घ्यावें वेळोवेळां । माय बाळा न विसंबे ॥३॥ तुका म्हणे रस वचनीं । पडताळूनि तोचि सेवी ॥४॥

२४६६. आम्हां सोयरे हरिजन । जन भाग्य निकिंचन ॥१॥ ज्यांच्या धैर्या नाहीं भंग । भाव एकविध रंग ॥२॥ भूक तहान चित्तीं । सदा देव आठविती ॥३॥ तुका म्हणे धन । ज्यांचें निज नारायण ॥४॥

२४६७. म्हणवितों दास न करितां सेवा । लंडपणें देवा पोट भरीं ॥१॥ खोटें कोठें सरे तुझे पायांपाशीं । अंतर जाणसी पांडुरंगा ॥२॥ आचरण खोटें आपणासी ठावें । लटिकें बोलावें दुसरें तें ॥३॥ तुका म्हणे ऐसा आहें अपराधी । असो कृपानिधी तुम्हां ठावा ॥४॥

२४६८. जळो तें बाह्य सोंग । पडिलिया अंतर व्यंग ॥१॥ कारण तें अंतरलें । म्हणवितां वाइट भलें ॥२॥ तांतडीनें नासी । तांतडीनेंचि संतोषी ॥३॥ तुका म्हणे धीर । नाहीं बुद्धि एकी स्थिर ॥४॥

२४६९. चित्ताचें बांधलें जवळी तें वसे । प्रकाशीं प्रकाशे सर्वकाळ ॥१॥ अंतरी वसावी उत्तम ते भेटी । होऊं कांहीं तुटी न सकेची ॥२॥ ब्रह्मांड कवळे आठवणेसाठीं । धरावा तो पोटीं वाव बरा ॥३॥ तुका म्हणे लाभ घरिचिया घरीं । प्रेमतंतु दोरी न तुटतां ॥४॥

२४७०. दुखवलें चित्त आजिच्या प्रसंगें । बहु पीडा जगें केली देवा ॥१॥ कधीं हा संबंध तोडिसी तें नेणें । आठवूनि मनें पाय असें ॥२॥ आणिकांचीं येती अंतरा अंतरें । सुखदुःख बरेंवाइट तें ॥३॥ तुका म्हणे घडे एकांताचा वास । तरिच या नास संबंधाचा ॥४॥

२४७१. धनवंत एक बहिरट अंधळे । शुभ्र कुष्ठ काळे भोग अंगीं ॥१॥ प्रारब्धाची गति न कळे विचित्र । आहे हातीं सूत्र विठोबाचे ॥२॥ आणीक रोगांचीं नांवें सांगों किती । अखंड असती जडोनियां ॥३॥ तुका म्हणे नष्ट संचिताचे दान । खातां पावे पण सुख नेदी ॥४॥

२४७२. भेदाभेदताळा न घडे घालितां । आठवा रे आतां नारायण ॥१॥ येणें एक केलें अवघें होय सांग । अच्युताचा योग नाम छंद ॥२॥ भोंवरे खळाळ चोर वाटा घेती । पावलें मारिती सिवेपाशीं ॥३॥ तुका म्हणे येथें भावेंविण पार । न पविजे सार हेंचि आहे ॥४॥

२४७३. जे गाती अखंड विठ्ठलाचें गीत । त्यांचे पायीं चित्त ठेवीन मी ॥१॥ जयांसी आवडे विठ्ठलाचें नाम । ते माझे परम प्राणसखे ॥२॥ जयासी विठ्ठल आवडे लोचनीं । त्यांचें पायवणी स्वीकारीन ॥३॥ विठ्ठलासी जिहीं दिला सर्व भाव । त्यांच्या पायीं जीव ठेवीन मी ॥४॥ तुका म्हणे रज होईन चरणींचा । म्हणविती त्यांच्या हरिचे दास ॥५॥

२४७४. काय तो विवाद असो भेदाभेद । साधा परमानंद एका भावें ॥१॥ निघोनि आयुष्य जातें हातोहात । विचारीं पां हित लवलाहीं ॥२॥ तुका म्हणे भावभक्ति हे कारण ।

नागवी भूषण दंभ तोचि ॥३॥

२४७५. देवकीनंदनें। केलें आपुल्या चिंतनें॥१॥ मज आपुलिया ऐसें। मना लावूनियां पिसें ॥२॥ गोवळे गोपाळा। केलें लावूनियां चाळा॥३॥ तुका म्हणे संग। केला दूरि नव्हे मग॥४॥

२४७६. माझिया जीवासी हेचि पैं विश्रांति। तुझे पाय चित्तीं पांडुरंगा॥१॥ भांडवल गांठीं झालेंसें पुरतें। समाधान चित्तें मानियेलें॥२॥ उदंड उच्चारें घातला पसरु। रूपावरी भरु आवडीचा॥३॥ तुका म्हणे मज भक्तिची आवडी। अभेदीं तांतडी नाहीं म्हूण॥४॥

२४७७. एकविध आम्ही न धरूं पालट। न संडूं हे वाट सांपडली॥१॥ म्हणवूनी केला पाहिजे सांभाळ। माझें बुद्धीबळ पाय तुझे॥२॥ बहुत न कळे बोलतां प्रकार। अंतरा अंतर साक्ष असे॥३॥ तुका म्हणे अगा जीवींच्या जीवना। तूंचि नारायणा साक्षि माझा॥४॥

२४७८. राहो येचि ठायीं। माझा भाव तुझे पायीं॥१॥ करीन नामाचें चिंतन। जाऊं नेदी कोठें मन॥२॥ देईन ये रसीं। आतां बुडी सर्वविशीं॥३॥ तुका म्हणे देवा। साटी करोनियां जीवा॥४॥

२४७९. तैसे नव्हों आम्ही विठ्ठलाचे दास। यावें आणिकांस काकुळती॥१॥ स्वामिचिया सत्ता ठेंगणें सकळ। आला कळिकाळ हाताखालीं॥२॥ अंकिताचा असे अभिमान देवा। समर्पूनी हेवा असों पायीं॥३॥ तुका म्हणे आम्हां इच्छेचें खेळणें। कोड नारायणें पुरवावें॥४॥

२४८०. मोक्ष देवापाशीं नाहीं। लटक्या घाईं विव्हळत॥१॥ काय खर न धरी शुद्धी। गेली बुद्धी भ्रमलें॥२॥ अहंकारा उरलें काई। पांचांठायीं हें वाटे॥३॥ तुका म्हणे कुंथे भारें। लटिकें खरें मानुनियां॥४॥

२४८१. आपला तो एक देव करुनि घ्यावा। तेणेंविण जीवा सुख नव्हे॥१॥ येर तीं माइकें दुःखाचीं जनितीं। नाहीं आदिअंतीं अवसानीं॥२॥ अविनाश करी आपुलिया ऐसें। लावीं मना पिसें गोविंदाचें॥३॥ तुका म्हणे एका मरणेंचि सरे। उत्तमचि उरे कीर्ति मागें॥४॥

२४८२. आजिचें हे मज तुम्हीं कृपादान। दिले संतजन मायबापीं॥१॥ आलीं मुखावाटे अमृतवचनें। उत्तीर्णता येणें नव्हे जन्में॥२॥ तुका म्हणे तुम्हीं उदार कृपाळ। शृंगारिलें बाळ कवतुकें॥३॥

२४८३. स्तुती अथवा निंदा करावी देवाची। अधम तो वेचि व्यर्थ वाणी॥१॥ आइकोनि होती बहिर हे बोल। वेचूनि ते मोल नरका जाती॥२॥ इहलोकीं थुंका उडे तोंडावरी। करणे अघोरीं वास लागे॥३॥ तुका म्हणे माप वाचेऐसें निकें। भरलें नरकें निंदेसाठीं॥४॥

२४८४. लोह कफ गार सिद्ध हे सामुग्री। अग्नी टणत्कारी दिसों येतो॥१॥ सांगावें तें काई

सांगावें तें काई । चित्ता होय ठायीं अनुभव तो ॥२॥ अन्नें सांगों येतो तृप्तीचा अनुभव । करूनि उपाव घेऊं हेवा ॥३॥ तुका म्हणे मिळे जीवनीं जीवन । तेथें कोणा कोण नांव ठेवी ॥४॥

२४८५. बाळाचें जीवन । माता जाणें भूक तहान ॥१॥ काय करूं विनवणी । असो मस्तक चरणीं ॥२॥ ठेविलिये ठायीं । चित्त ठेवूनि असे पायीं ॥३॥ करितों हे सेवा । चिंतन सर्वां ठायीं देवा ॥४॥ न्यून तेंचि पुरें । घ्यावें करोनि दातारें ॥५॥ तुका म्हणे बुद्धि । अल्प असे अपराधी ॥६॥

२४८६. जाणतों समय । परिमित कामा नये ॥१॥ तुम्हीं सांगावें तें बरें । देवा सकळ विचारें ॥२॥ फुकाचिये पुसी । चिंता नाहीं होते ऐसी ॥३॥ तुका म्हणे आहे । धर पाय मज साहे ॥४॥

२४८७. द्वारपाळ विनंती करी । उभे द्वारीं राऊळा ॥१॥ आपुलिया शरणागता । वाहों चिंता न द्यावी ॥२॥ वचना या चित्त द्यावें । असो ठावें तुम्हासी ॥३॥ तुका म्हणे कृपासिंधु । दीनबंधू केशवा ॥४॥

२४८८. दोहीं बाहीं आम्हां वास । असो कास घालूनि ॥१॥ बोल बोलों उभयतां । स्वामीसत्ता सेवेची ॥२॥ एकसरें आज्ञा केली । असों चाली ते नीती ॥३॥ तुका म्हणे जोहारितों । आहे होतों ते ठायीं ॥४॥

२४८९. ऐका जी देवा माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥१॥ सन्निध पातलों सांडुनियां शंका । सन्मुखचि एकाएकीं पुढें ॥२॥ जाणविलें कोठें पावे पायांपाशीं । केली या जिवासी साटी म्हूण ॥३॥ तुका म्हणे माझे हातीं द्या उद्धार । करीं करकर म्हणवूनि ॥४॥

२४९०. बैसलों तों कडियेवरी । नव्हे दुरी वेगळा ॥१॥ घडलें हें बहुतां दिसां । आतां इच्छा पुरवीन ॥२॥ बहु होता जाला सीण । नाहीं क्षण विसांवा ॥३॥ दु:खी केलें मी तूं पणें । जवळी नेणें होतें तें ॥४॥ पाहात जे होतों वास । तेचि आस पुरविली ॥५॥ तुका म्हणे मायबापा । झणी कोपा विठ्ठला ॥६॥

२४९१. तुझें नाम मुखीं तयासी विपत्ति । आश्चर्य हें चित्तीं वाटतसे ॥१॥ काय जाणों देवा होसील निजला । नेणों जी विठ्ठला मायबापा ॥२॥ भवबंधनाचे तुटतील फांसे । तें कां येथें ऐसें अव्हेरिलें ॥३॥ तुका म्हणे माझें दचकलें मन । वाटे वांयांविण श्रम केला ॥४॥

२४९२. सेवकें करावें सांगितलें काम । सिक्याचा तो धर्म स्वामी राखे ॥१॥ काय देवा नेणों आलें गांढेपण । तुम्ही शक्तिहीन झाले दिसा ॥२॥ विष्णुदास आम्ही निर्भर ज्या बळें । तें दिसे या काळें अव्हेरिलें ॥३॥ तुका म्हणे मूळ पाठवा लौकरी । किंवा करूं हरी काय सांगा ॥४॥

२४९३. खेळतां निजभावें समर्थाचें बाळ । तयाच्या सकळ सत्तेखालीं ॥१॥ तरी लेवविला शोभे अळंकार । नाहीं तरी भार मानाविण ॥२॥ अवघीच दिशा असावी मोकळी । मायबाप बळी म्हणऊनि ॥३॥ तुका म्हणे माझें ऐसें आहे देवा । म्हणऊनि सेवा समर्पिली ॥४॥

२४९४. निरंजनीं एकटवाणें । संग नेणें दुसरा ॥१॥ पाहा चाळविलें कैसें । लावूनि पिसें गोवळें ॥२॥ लपविलें अंगें अंग । दिला संग होता तो ॥३॥ तुका म्हणे नव्हतें ठावें । झालें भावें वाटोळें ॥४॥

२४९५. नव्हती भेटी तोंचि बरें । होता चोरें नाडिलें ॥१॥ अवघियांचा केला झाडा । रिता वाडा खोंकर ॥२॥ चिंतनाचें मूळ चित्त । नेलें वित्त हरुनि ॥३॥ तुका म्हणे मूळा आलें । होतें केलें तैसेंचि ॥४॥

२४९६. जये ठायीं आवडी ठेली । मज ते बोली न संडे ॥१॥ पुरवावें जीवींचें कोड । भेटी गोड तुज मज ॥२॥ आणियलें येथवरी । रूप दुरी न करावें ॥३॥ तुका म्हणे नारायणा । सेवाहीना धिग वृत्ति ॥४॥

२४९७. सरलियाचा सोस मनीं । लाजोनियां राहिलों ॥१॥ आवडीनें बोलावितों । येथें तें तों लपावें ॥२॥ माझें तेंचि मज द्यावें । होतें भावें जोडिलें ॥३॥ तुका म्हणे विश्वंभरा । आळीकरा बुझावा ॥४॥

२४९८. नाचावेंसें वाटे मना । छंद गुणा अधीन ॥१॥ चेष्टविलीं माझीं गात्रें । सत्तासूत्रें हालती ॥२॥ नामरूपें रंगा आली । तेचि चाली स्वभावें ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगें । अंग संगें कवळिलें ॥४॥

२४९९. खेळतों ते खेळ पायांच्या प्रसादें । नव्हती हीं छंदें नासिवंत ॥१॥ माझा मायबाप उभा विटेवरी । कवतुकें करी कृपादान ॥२॥ प्रसादाची वाणी वदती उत्तरें । नाहीं मतांतरें जोडियेलीं ॥३॥ तुका म्हणे रस वाढती या अंगें । छाया पांडुरंगें केली वरी ॥४॥

२५००. अखंड मुडतर । सासुरवास करकर ॥१॥ याची जाली बोळवण । आतां न देखों तो शीण ॥२॥ बहुतांची दासी । तये घरीं सासुरवासी ॥३॥ तुका म्हणे मुळें । खंड झाला एक वेळे ॥४॥

२५०१. अवघा भार वाटे देवा । संतसेवा न करितां ॥१॥ कसोटी हे असे हातीं । सत्य भूतीं भगवंत ॥२॥ चुकलोंसा दिसे पंथ । गेले संत तो ऐसा ॥३॥ तुका म्हणे सोंग वांयां । कारण या अनुभवें ॥४॥

२५०२. आतां तुम्ही कृपावंत । साधु संत जिवलग ॥१॥ गोमटें तें करा माझें । भार ओझें तुम्हांसी ॥२॥ वंचिलें तें पायांपाशीं । नाहीं यासी वेगळें ॥३॥ तुका म्हणे सोडिल्या गांठी । दिली मिठी पायांसी ॥४॥

२५०३. सुख वाटे परी वर्म । धर्माधर्म न कळे ॥१॥ गायें नाचें एवढें जाणें । विठ्ठल म्हणे निर्लज्ज ॥२॥ अवघें माझें एवढें धन । साधनही सकळ ॥२॥ तुका म्हणे पायां पडे ।

तुमच्या कोडें संताच्या ॥४॥

२५०४. धरिलीं जीं होतीं चित्तीं । डोळां तेचि दिसती ॥१॥ आलें आवडीसी फळ । झालें कारण सकळ ॥२॥ घेईन भातुकें । मागोनियां कवतुकें ॥३॥ तुका म्हणे लाड । विठोबा पुरवील कोड ॥४॥

२५०५. बहुतां दिसांची आजि झाली भेटी । झाली होती तुटी काळगती ॥१॥ येथें सावकाश घेईन ते धणी । गेली अडचणी उगवोनि ॥२॥ बहु दुःख दिलें होतें घरीं कामें । वाढला हा श्रमें श्रम होता ॥३॥ बहु दिस होता सांडिला मारग । क्लेशाचा त्या त्याग आजि झाला ॥४॥ बहु होती केली सोंगसंपादणी । लौकिकापासुनि निर्गमलें ॥५॥ तुका म्हणे येथें झालें अवसान । परमानंदीं मन विसावलें ॥६॥

२५०६. पुत्र झाला चोर । मायबापां हर्ष थोर ॥१॥ आतां कशासाठीं जोडी । हाट धांटे गुंडगे घडी ॥२॥ आइते अपहार । आणूनियां भरी घर ॥३॥ मानिली निश्चिंती । नरका जावया उभयतीं ॥४॥ झोंडाझोंडगीचे पोटीं । फळें विजाती करंटीं ॥५॥ तुका म्हणे बेट्या । भांडवल नलगे खट्या ॥६॥

२५०७. एवढी अपकीर्ति । ऐकोनियां फजिती ॥१॥ जरि दाविल वदन । थुंका थुंका तो देखोन ॥२॥ काळिमेचें जिणें । जीवोनियां राहे सुनें ॥३॥ तुका म्हणे गुण । दरुषणें अपशकून ॥४॥

२५०८. समर्थासी नाहीं वर्णावर्ण भेद । सामुग्री ते सिद्ध सर्व घरीं ॥१॥ आदराचे ठायीं बहुच आदर । मागीतले फार ते ते वाढी ॥२॥ न म्हणे सुहृद सोयरा आवश्यक । राजा आणि रंक सारिखेची ॥३॥ भाव देखे तेथें करी लडबड । जडा राखे जड निराळेंची ॥४॥ कोणा न विसंबे याचकाचा ठाव । विनवुनी देव शंका फेडी ॥५॥ तुका म्हणे पोट भरुनी उरवी । आलें ऐसें दावी अनुभवा ॥६॥

२५०९. पुंडलीक भक्तराज । तेणें साधियलें काज । वैकुंठीचें निज । परब्रह्म आणिलें ॥१॥ पांडुरंग बाळमूर्ति । गाई गोपाळ सांगाती । येऊनियां प्रीति । उभें समचि राहिलें ॥२॥ एका आगळें अक्षरें । भूवैकुंठचि दुसरें । म्हणविती येरें । परि तीं ऐसीं नव्हेती ॥३॥ पाप पंचक्रोशीमधीं । येऊं न सकेचि कधीं । कैंची तेथें विधि । निषेधाची वसति ॥४॥ पुराणें बोलती ऐसें । चतर्भुज तीं माणसें । सुदर्शनावरी वसे । न बुडे हे कल्पांतीं ॥५॥ अनुपम्य इची थोरी । महाक्षेत्र महीवरी । धन्य धन्य वारकरी । तुका म्हणे येथींचे ॥६॥

२५१०. देह मृत्याचें भातुकें । कळों आलें कवतुकें ॥१॥ काय मानियेलें सार । हेंचि वाटतें आश्चर्य ॥२॥ नानाभोगांचीं संचितें । करूनि ठेविलें आइतें ॥३॥ तुका म्हणे कोडीं ।

उगवूं न सकती बापुडीं ॥४॥

२५११. त्यागें भोग माझ्या येतील अंतरा । मग मी दातारा काय करूं ॥१॥ आतां असो तुझे पायीं हें मोटळें । इंद्रियें सकळ काया मन ॥२॥ सांडीमांडी विधिनिषेधाचा ठाव । न खळतां भाव जाइल वायां ॥३॥ तुका म्हणे आतां नको उजगरा । लपवीं दातारा अंगीं मज ॥४॥

२५१२. दावूनियां मांड । पुरे न करीती भांड ॥१॥ जळो जळो तैसें जिणें । फटमर लाजिरवाणें ॥२॥ घेतलें तें सोंग । बरवें संपादावें सांग ॥३॥ तुका म्हणे धीरें । देव नुपेक्षील खरें ॥४॥

२५१३. न पालटे जाती जीवाचिये साटीं । बाहे तेंचि पोटीं दावी वरी ॥१॥ अंतर सबाह्य सारिखाचि रंग । वीट आणि भंग नाहीं रसा ॥२॥ घणाचिया घायें पोटीं शिरे हिरा । सांडूं नेणें धीरा आपुलिया ॥३॥ तुका म्हणे कढे करावे शीतळ । ऐसें जातिबळ चंदनाचें ॥४॥

२५१४. दिली मान तरी नेघावी शत्रूसी । शरण आलें त्यासी जतन जीवें ॥१॥ समर्थांसी असे विचाराची आण । भलीं पाप पुण्य विचारावें ॥२॥ काकुळतीसाठीं सत्याचा विसर । पडिलें अंतर न पाहिजे ॥३॥ तुका म्हणे यश कीर्ति आणि मान । करितां जतन देव जोडे ॥४॥

२५१५. विचारिलें आधीं आपुल्या मानसीं । वांचों येथें कैसी कोण्या द्वारें ॥१॥ तंव साह्य जाला हृदयनिवासी । बुद्धि दिली ऐसी नाश नाहीं ॥२॥ उद्वेगाचे होतों पडिलों समुद्रीं । कोणे रीती तीरीं पाविजेल ॥३॥ तुका म्हणे दुःखें आला आयुर्भाव । झाला बहु जीव कासावीस ॥४॥

२५१६. आपुलें वेचूनि खोडा घाली पाव । ऐसा तो हा जीव हीनबुद्धि ॥१॥ विषयांच्या संगें आयुष्याचा नाश । पडियेलें ओस स्वहिताचें ॥२॥ भुलल्याचें अंग आपणा पारिखें । छंदाच सारिखें वर्ततसे ॥३॥ तुका म्हणे दुःख उमटे परिणामीं । लंपटासी कामीं रतलिया ॥४॥

२५१७. केलें शकुनें प्रयाण । आतां मागें फिरे कोण ॥१॥ होय तैसें हो आतां । देह बळी काय चिंता ॥२॥ पडिलें पालवीं । त्याचा धाक वाहे जीवीं ॥३॥ तुका म्हणे जीणें । देवा काय हीनपणें ॥४॥

२५१८. आळणी ऐसें कळों आलें । त्यासी भलें मौनचि ॥१॥ नये कांहीं वेचूं वाणी । वेडे घाणी सांगातें ॥२॥ वेगळें तें देहभावा । भ्रम जीवा माजिरा ॥३॥ तुका म्हणे कवतुक केलें । किंवा भलें दवडितां ॥४॥

२५१९. चित्ताचा चाळक । त्याचें उभय सूत्र एक ॥१॥ नाचवितो नाचेछंदें । सुखें आपुल्या विनोदें ॥२॥ चंद्र कमळणी । नाही धाडीत सांगोनि ॥३॥ तुका म्हणे उठी । लोह चुंबकाचे दृष्टी ॥४॥

२५२०. करितां तडातोडी । वत्स माते सोई ओढी ॥१॥ करित्याचा आग्रह उरे । एक

एकासाटीं झुरे ॥२॥ भुके इच्छी अन्न । तेंहीं त्यासाठीं निर्माण ॥३॥ तुका म्हणे जाती । एक एकाचिये चित्तीं ॥४॥

२५२१. निघालें दिवाळें । झालें देवाचें वाटोळें ॥१॥ आतां वेचूं नये वाणी । विचारावें मनिंच्या मनीं ॥२॥ गुंडाळिलीं पोतीं । भीतरी लावियेली वाती ॥३॥ तुका म्हणे करा । ऐसा राहे माजी घरा ॥४॥

२५२२. तीर्थाचिये आसे पंथें तो निदैव । पाविजेतो ठाव अंतराय ॥१॥ म्हणऊनि भलें निश्चळचि स्थळीं । मनाचिये मुळीं बैसोनियां ॥२॥ संकल्पारूढ तें पराधीन जिणें । कार्यचि कारणें वाढतसे ॥३॥ तुका म्हणे कामा नाहीं एक मुख । जिरवितां सुख होते पोटीं ॥४॥

२५२३. क्षणक्षणा हाचि करावा विचार । तरावया पार भवसिंधु ॥१॥ नाशिवंत देह जाणार सकळ । आयुष्य खातो काळ सावधान ॥२॥ संतसमागमीं धरूनि आवडी । करावी तांतडी परमार्थी ॥३॥ तुका म्हणे इहलोकींच्या वेव्हारें । नये डोळे धुरें भरूनि राहों ॥४॥

२५२४. कोणाशीं विचार करावा शेवटीं । एवढ्या लाभें तुटी झाल्यांतरें ॥१॥ सांभाळितो शूर आला घावडाव । पुढें दिला पाव न करी मागें ॥२॥ घात तो या नांवें येथें अंतराय । अंतरल्या पाय गोविंदाचे ॥३॥ तुका म्हणे गडसंदीचा हा ठाव । केला तो उपाव कार्या येतो ॥४॥

२५२५. असां जी सोंवळे । आहां तैसेचि निराळे ॥१॥ आम्ही नयों तुमच्या वांटा । काय लटिकाची ताठा ॥२॥ चिंतनचि पुरे । काय सलगीसवें धुरे ॥३॥ तुका म्हणे देवा । नका नावडे ते सेवा ॥४॥

२५२६. अहंकार तो नासाभेद । जगीं निंद्य ओंवळा ॥१॥ नातळे तो धन्य यासी । झाला वंशीं दीपक ॥२॥ करवितो आत्महत्या । नेदी आप्ता आतळों ॥३॥ तुका म्हणे गुरुगुरी । माथां थोरी धरोनि ॥४॥

२५२७. इच्छिलें ते शकुनवंती । होय देती तात्काळ ॥१॥ क्षीरानीरा निवाड करीं । वरावरी विठ्ठल ॥२॥ भाग्याविण कैंचे फळ । अंतर मळमूत्राचें ॥३॥ तुका म्हणे संचित कुडें । तें बापुडें करीतसे ॥४॥

२५२८. काशासाटीं आम्ही जाळिला संसार । न करा विचार ऐसा देवा ॥१॥ कैसें नेणों तुम्हां करवतें उदास । माझा प्रेमरस भंगावया ॥२॥ समर्पूनि ठेलों देह हा सकळ । धरितां विटाळ न लजा माझा ॥३॥ तुका म्हणे अवघी मोकलूनि आस । फिरतों उदास कोणासाटीं ॥४॥

२५२९. नाहीं तुम्हां कांहीं लाविलें मागणें । कांटाळ्याच्या भेणें त्रासलेती ॥१॥ एखादिये परी टाळावी करकर । हा नका विचार देखों कांहीं ॥२॥ पायांच्या वियोगें प्राणासंवसाटीं । नघेवेसी तुटी झाली आतां ॥३॥ तुका म्हणे तुम्हां मागणें तें आतां ।

हेंचि कृपावंता चरणीं वास ॥४॥

२५३०. जग अमंगळ । लागे देखतां विटाळ ॥१॥ धर्म भूतांची ते दया । संत कारण ऐसीया ॥२॥ नव्हे माझें मत । साक्षी करूनि सांगे संत ॥३॥ तुका म्हणे जीवें । दावी उमटूनि अनुभवें ॥४॥

२५३१. दंड अन्यायाचे माथां । देखोनि करावा सर्वथा ॥१॥ नये उगे बहुतां घाटूं । सिसें सोनियांत आटूं ॥२॥ पापपुण्यासाटीं । नीत केली आतां खोटी ॥३॥ तुका म्हणे देवा । दोष कोणाचा तो दावा ॥४॥

२५३२. आम्ही पतित तूं पावन । हें तों पूर्वापार जाण ॥१॥ नवें करूं नये जुनें । सांभाळावें ज्याचें त्यानें ॥२॥ मिरासीचा ठाव । राखी करोनि उपाव ॥३॥ वादें मारी हाका । देवा आइकवितो तुका ॥४॥

२५३३. पाडावी ते बरी । गांठी धुरेसवें खरी ॥१॥ नये मरों लंडीपणें । काय बापुडें तें जिणें ॥२॥ लुटावें भांडार । तरी जया नाहीं पार ॥३॥ तुका म्हणे नांवें । कीर्ती आगळीनें ज्यावें ॥४॥

२५३४. भांडणचि झालें । मग जीवाचें काय आलें ॥१॥ येऊं नेदावी पुढती । आड भयाची ते जाती ॥१॥ करितां सरोबरी । कांहीं न ठेवावी उरी ॥३॥ तुका म्हणे शूर । व्हावें धुरेसींच धूर ॥४॥

२५३५. जन्मांतरीं शुद्ध नाहीं आचरण । यालागीं चरण अंतरले । वोढवलें संचित येणें जन्म पाहतां । आतां पंढरिनाथा कृपा करीं ॥१॥ पतितपावन ब्रिद साच करीं देवा । यालागीं कुढावा करीं माझा ॥२॥ अपराधी पातकी दुष्ट दुराचारी । आहाळलों भारी संवसारें । कामक्रोध आधि कल्पनेच्या त्रासें । तुज न पवें ऐसें झालें देवा ॥३॥ हा ना तोसा ठाव झाला पांडुरंगा । नयेचि उपेगा काय करूं । आपुलिया नांवा धांवणिया धांवें । लवकरी यावें तुका म्हणे ॥४॥

२५३६. प्रथमभेटी आलिंगण । मग चरण वंदावे ॥१॥ ऐसा माझा भोळा बाप । हरी ताप कवळोनि ॥२॥ न सांगतां सीण भाग । पांडुरंग जाणतसे ॥३॥ तुका म्हणे कृपावंतें । द्यावें भातें न मागतां ॥४॥

२५३७. वचनाचा अनुभव हातीं । बोलविती देव मज ॥१॥ परि हें न कळे अभाविकां । जडलोकां जीवासी ॥२॥ अनुश्रुतं हे प्रासादिक । कृपा भीक स्वामीची ॥३॥ तुका म्हणे वरावरी । जातों तरी सांगत ॥४॥

२५३८. कां रे तुम्ही ठेवा बहुतां निमित्तें । माझिया संचितें वोढवलें ॥१॥ भक्तिप्रेमगोडी बैसली जिव्हारीं । आनंद अंतरीं येणें झाला ॥२॥ पुसिलें पडळ तिमिर विठ्ठलें । जगचि भरलें ब्रह्मानंदें ॥३॥ तुका म्हणे केलों कामनेवेगळा । आवडी गोपाळा असे वरी ॥४॥

२५३९. आसन शयन भोजन गोविंदें। भरलें आनंदें त्रिभुवन ॥१॥ अवघिया केली काळें तडातोडी। अवसर घडी पुरों नये ॥२॥ वांटणी घातले शरीराचे भाग। दुजियाचा लाग खंडियला ॥३॥ आवडीच्या आलें आहारासी रूप। पृथक संकल्प मावळले ॥४॥ काम तरी क्रोध बुद्धि मन नासे। भ्रमाचे वोळसे गिळिलें शांती ॥५॥ तुका म्हणे मना श्रीरंगाचा रंग। बैसला अभंग एकविध ॥६॥

२५४०. ज्वरल्यासी काढा औषध पाचन। मूढा नारायण स्मरवितो ॥१॥ भवव्याधि येणें तुटेल रोकडा। करूनियां झाडा निश्चयेंसी ॥२॥ आणिकां उपायां अनुपान कठिण। भोगें बरें सीण शीघ्रवत ॥३॥ तुका म्हणे केला उघडा पसारा। भाग्य आलें घरा दारावरी ॥४॥

२५४१. जपाचें निमित्त झोंपेचा पसर। देहाचा विसर पाडूनियां ॥१॥ ऐसें तें भजन अमंगळवाणी। सोंगसंपादणी बहुरूप्याची ॥२॥ सेवेसी विकळ देहाचिया आसे। तया कोठें असें उरला देव ॥३॥ तुका म्हणे मानदंभ जया चित्तीं। तयाची फजीती करूं आम्ही ॥४॥

२५४२. परद्रव्य परकांता। नातळे जयाचिये चित्ता। आणिक कर्मी तो तत्वता। बांधला नवजाय ॥१॥ ऐसा अनुभव रोकडा। विश्वासीतो जीवा जोडा। एकांत त्या पुढां। अवघा करी उकल ॥२॥ सकट आंबलें तें अन्न। शोधी तेंचि मद्यपान। विषमानें भिन्न। केलें शुद्धाशुद्ध ॥३॥ तुका म्हणे नित। बरवें अनुभवें उचित। तरी काय हित। मोलें घ्यावें लागतें ॥४॥

२५४३. भूक पोटापुरती। तृष्णा भरवी वाखती। करवी फजीती। हांवें भार वाढला ॥१॥ कुळिकेसीं लांस फांस। डोई दाढी बोडवी दोष। अविहित नाश। करवीं वचन चुकतां ॥२॥ विधिसेवनें विहितें। कार्य कारणापुरतें। न बाटे जो चित्तें। अधर्माचा तो त्यागी ॥३॥ आज्ञा पाळणें ते सेवा। भय धरोनियां जीवा। तुका म्हणे ठेवा। ठेविला तो जतन ॥४॥

२५४४. कळे न कळे ज्या धर्म। ऐका सांगतों रे वर्म। माझ्या विठोबाचें नाम। अट्टाहासें उच्चारा ॥१॥ तो या दाखवील वाटा। जया पाहिजे त्या नीटा। कृपावंत मोठा। पाहिजे तो कळवळा ॥२॥ पुसतां चुका होतो वाटा। सवें बोळावा गोमटा। मोडों नेदी कांटा। घेऊं सांटा चोरासी ॥३॥ तुका म्हणे मोल। नलगे द्यावें वेचा बोल। विठ्ठल विठ्ठल। ऐसा छंद मनासी ॥४॥

२५४५. तरी कां वोळगणें। राजद्वारीं होती सुने ॥१॥ अंगीं दावूनि निष्कामता। पोकळ पोकळी ते वृथा ॥२॥ कासया मोकळ। भोंवतें शिष्यांचे गाबाळ ॥३॥ तुका म्हणे ढाळे। बाहेर मुदे तें निराळें ॥४॥

२५४६. हरिच्या दासां सोपें वर्म। सर्व धर्म पाऊलें ॥१॥ कडिये देव वाहे खांदी। वैष्णव मांदी क्रीडेसी ॥२॥ सरती येणें आटाआटी। नाहीं तुटी लाभाची ॥३॥ तुका म्हणे समाधान। सदा मन आमुचें ॥४॥

२५४७. भूतांचिये नांदे जीवीं । गोसावीच सकळां ॥१॥ क्षणाक्षणां जागा ठायीं । दृढ पायीं विश्वास ॥२॥ दावूनिया सोंग दुजें । अंतर बीजें वसतसें ॥३॥ तुका म्हणे जाणें धर्म । धरी तें वर्म चिंतन ॥४॥

२५४८. संत आले घरा । तों मी अभागी दातारा ॥१॥ कासयानें पूजा करूं । चरण हृदयींच धरूं ॥२॥ काया कुरवंडी । करून ओवाळून सांडी ॥३॥ तुका म्हणे भावें । हात जोडीं असो ठावें ॥४॥

२५४९. भेद तुटलियावरी । आम्ही तुमचींच हो हरी ॥१॥ आतां पाळावे पाळावे । आम्हां लडिवाळांचे लळे ॥२॥ आणिकांची देवा । नाहीं जाणतचि सेवा ॥३॥ तुका म्हणे हेवा । माझा हेत पायीं देवा ॥४॥

२५५०. आमुची विश्रांति । तुमचे चरण कमळापती ॥१॥ हेंचि एक जाणें । कायावाचा आणि मनें ॥२॥ पुढती पुढती नमन । घालूनियां लोटांगण ॥३॥ नीच जनालोकां । तळिल पायरीस तुका ॥४॥

२५५१. विनवितो शेवटीं । आहे तैसें माझे पोटीं ॥१॥ कंठीं राहावें राहावें । हेंचि मागतसें भावें ॥२॥ पुरली वासना । येणें होईल नारायणा ॥३॥ तुका म्हणे जो देहाडा । तोचि वर्णीन पवाडा ॥४॥

२५५२. आवडीची सलगी पूजा । विषम दुजा भाव तो ॥१॥ ऐसीं उफराटीं वर्मे । कळों भ्रमें न येती ॥२॥ नलगें समाधाना मोला । रुचती बोल प्रीतीचे ॥३॥ तुका म्हणे एका जीवें । सूत्र व्हावें गुंतलें ॥४॥

२५५३. बाळ माते लातेवरीं । मारी तेणें संतोषे ॥१॥ सुख वसे चित्ता अंगीं । तें हें रंगीं मिळालें ॥२॥ भक्षी त्याचा जिवमाग । आला भाग तो बरा ॥३॥ तुका म्हणे ऋणानुबंधें । सांगें सुधें सकळांसी ॥४॥

२५५४. शिजल्यावरी जाळ । वायां जायाचें तें मूळ ॥१॥ ऐसा वारावा तो श्रम । अतिशयीं नाहीं काम ॥२॥ सांभाळावें वर्म । उचिताच्या काळें धर्म ॥३॥ तुका म्हणे कळे । ऐसें कारणाचे वेळे ॥४॥

२५५५. उभा ऐल थडी । तेणें घालूं नये उडी ॥१॥ पुढें गेल्याचे उपाय । करावे ते केले काय ॥२॥ दिसतें आहारीं । नये जाऊं ऐशावरी ॥३॥ आळसाची धाडी । तुका म्हणे बहु नाडी ॥४॥

२५५६. शक्ती द्याव्या देवा । नाहीं पार्थिवाची सेवा ॥१॥ मुख्य आहे ऐसा धर्म । जाणते हो जाणा वर्म ॥२॥ मना पोटीं देव । जाणा जैसा तैसा भाव ॥३॥ तुका म्हणे सोसें । लागे लाविल्याचें पिसें ॥४॥

२५५७. कार्यचि कारण । तृष्णा पाववितें सीण ॥१॥ काय करूनि ऐसा संग । सोसें चिंतूं पांडुरंग ॥२॥ रूपीं नाहीं गोडी । हांवे हांवे ऊर फोडी ॥३॥ तुका म्हणे पडे भरी । ऐशा वरदळाचे थोरी ॥४॥

२५५८. संसाराच्या नांवें घालूनियां शून्य । वाढता हा पुण्य धर्म केला ॥१॥ हरिभजनें हें धवळिलें जग । चुकविला लाग कळिकाळाचा ॥२॥ कोणाही न लगे साधनांचा पांग । करणें केला त्याग देहबुद्धि ॥३॥ तुका म्हणे सुख समाधि हरिकथा । नेणें भवव्यथा गाईल तो ॥४॥

२५५९. विश्वासिया नाहीं लागत सायास । अनायासें रस अंगा येतो ॥१॥ लेंकराच्या हातें घांस मागे माता । वोरसोनि चित्ता सुख पावे ॥२॥ गौरव तो मानी आरुषा वचनीं । भूषण ते वाणी मिरवावी ॥३॥ तुका म्हणे आहे सकळही साक्षी । माझा तो कइपक्षी पांडुरंग ॥४॥

२५६०. वैभवाचे धनी सकळ शरणागत । सत्यभावें चित्त अर्पिलें तें ॥१॥ नेदी उरों देव आपणावेगळें । भावाचिया बळें ठायाठाव ॥२॥ जाणोनि नेणोनि अंगा आली दशा । मग होय इच्छा आपणची ॥३॥ तुका म्हणे बरें धाकुट्याचें जिणें । माता स्तनपानें वाढविते ॥४॥

२५६१. कईं ऐसी दशा येइल माझ्या अंगा । चित्त पांडुरंगा झुरतसे ॥१॥ नाठवूनि देह पायांचें चिंतन । अवसान तें क्षण नाहीं मधीं ॥२॥ कईं ऐसा पात्र होईन लाभासी । नेणों हृषीकेशी तुष्टईल ॥३॥ तुका म्हणे धन्य मानीन संचित । घेईन तें नित्य प्रेमसुख ॥४॥

२५६२. नाहीं वागवीत जाणिवेचें ओझें । स्वामिसेवा काजें निर्धारु हा ॥१॥ आज्ञा ते प्रमाण हा मनीं निर्धार । येणें फिटे भार निश्चयेंसी ॥२॥ आळीकरें आम्ही एकविध चित्तें । तैसें होऊं येतें मायबापें ॥३॥ तुका म्हणे माझी ये जातीची सेवा । घातलासे देवावरी भार ॥४॥

२५६३. काय नाहीं माझे अंतरीं वसति । व्यापक हा भूतीं सकळां नांदे ॥१॥ चित्तासी प्रसाद होईल चळण । तेंचि तें वळण मनासही ॥२॥ सर्व शक्ति जीवीं राहिल्या कुंठित । नाहीं केलें होत आपुलें तें ॥३॥ तुका म्हणे दोरी खांब सूत्र्या हातीं । नाचवी नाचती जडें तैसीं ॥४॥

२५६४. देवाचें निर्माल्य कोण शिवे हातीं । संकल्पासी होती विकल्प ते ॥१॥ वाहिलें देह हें देवा एकसरें । होईल तें बरें तेणें द्वारें ॥२॥ होता भार त्याची निवारली खंती । येथें आतां रिती साठवण ॥३॥ तुका म्हणे इच्छे पावविले कष्ट । म्हणऊनि नष्ट दुरावली ॥४॥

२५६५. देव तीर्थ येर दिसे जया ओस । तोचि तया दोष जाणतिया ॥१॥ तया बरें फावे देवा चुकवितां । संचिताची सत्ता अंतराय ॥२॥ शुद्धाशुद्धठाव पापपुण्यबीज । पाववील दुजे फळभोग ॥३॥ तुका म्हणे विश्वंभराऐसें वर्म । चुकलिया धर्म अवघे मिथ्या ॥४॥

२५६६. काय करूं सांगतांही न कळे तें वर्म । उपस्थित भ्रम उपजवितो ॥१॥ मन आधीं ज्याचें आलें होइल हातां । तयावरी सत्ता केली चाले ॥२॥ अभुकेचे अंगीं चवी

ना सवाद । मिथ्याऐसा वाद दुराग्रह ॥३॥ तुका म्हणे आप राखावें आपणा । संकोचोंचि कोणा नये आतां ॥४॥

२५६७. अमृत अव्हेरें उचंबळलें जातां । विष आर्तभूतां आवश्यक ॥१॥ आदरासी मोल नये लावूं केजें । धीर शुद्धबीजें गोमटा तो ॥२॥ खऱ्याचिये अंगीं आपणचि चाली । लावणी लाविली काय लागे ॥३॥ तुका म्हणे चाडे करा वेवसाव । आम्हांसी तो वाव धीर आहे ॥४॥

२५६८. अनुभवाचे रस देऊं आर्तभूतां । सोडूं चोजवितां पुढें पोतीं ॥१॥ देवाचा प्रसाद रत्नाच्या ओवणी । शोभतील गुणीं आपुलिया ॥२॥ आधीं भाव सार शुद्ध हे भूमिका । बीज आणि पिका चिंता नाहीं ॥३॥ तुका म्हणे ज्याचें नाम गुणवंत । तें नाहीं लागत पसरावें ॥४॥

२५६९. काय मज एवढा भार । हे वेव्हार चालवाया ॥१॥ उकल तो जाणे धनी । मज भोजनीं कारण ॥२॥ चिंता ज्याची तया शिरीं । लेंकरीं तें खेळावें ॥३॥ तुका म्हणे शेवट झाला । देव या बोला भोगिता ॥४॥

२५७०. एकांतीं लोकांतीं करूं गदारोळ । लेश तोही मळ नाहीं येथें ॥१॥ घ्यावें द्यावें आम्हीं आपुलिया सत्ता । न देखों पुसता दुजा कोणी ॥२॥ भांडाराची किल्ली माझे हातीं आहे । पाहिजे तो पाहे वाण येथें ॥३॥ तुका म्हणे आम्हां विश्वासाच्या बळें । ठेविलें मोकळे देवें येथें ॥४॥

२५७१. स्मरणाचें वेळें । व्हावें सावध न कळे ॥१॥ पडिलों विषयांचें ओढी । कोणी न दिसेसें काढी ॥२॥ भांडवल माझें । वेच झालें भूमि ओझें ॥३॥ तुका म्हणे कळे । तूंचि धावें ऐसे वेळे ॥४॥

२५७२. पाहा हो देवा कैसे जन । भिन्न भिन्न संचितें ॥१॥ एक नाहीं एकाऐसे । दावी कैसे शुद्ध हीन ॥२॥ पंचभूतें एकी राशी । सूत्रें कैसीं ओळखावीं ॥३॥ तुका म्हणे जो जे जाती । त्याची स्थिति तैशी ते ॥४॥

२५७३. कोणाचिया न पडो छंदा । गोविंदासी आळवूं ॥१॥ बहुतांचीं बहु मतें । अवघे रिते पोकळ ॥२॥ घटापटा डहुळी मन । होय सीण न करूं तें ॥३॥ तुका म्हणे पांडुरंग । भरूं भाग आला तो ॥४॥

२५७४. एक वेळ करीं या दुःखावेगळें । दुरिताचें जाळें उगवूनि ॥१॥ आठवीन पाय हा माझा नवस । रात्रींही दिवस पांडुरंगा ॥२॥ बहु दूरवरी भोगविलें भोगा । आतां पांडुरंगा सोडवावें ॥३॥ तुका म्हणे काया करीन कुरवंडी । ओंवाळूनि सांडीं मस्तक हें ॥४॥

२५७५. आणीक म्यां कोणा यावें काकुलती । कोण कामा येती अंतकाळीं ॥१॥ तूं वो माझी सखी येसी पांडुरंगे । लवकरी ये गे वाट पाहें ॥२॥ काया वाचा मनें हेचि आस करीं ।

पाउलें गोजिरीं चिंतीतसें ॥३॥ तुका म्हणे माझी पुरवीं हे आस। घालीं ब्रह्मरस भोजन हें ॥४॥

२५७६. आम्हांसी सकळ । तुझ्या नामाचेंचि बळ ॥१॥ करूं अमृताचें पान । दुजें नेणों कांहीं आन ॥२॥ जयाचा जो भोग। सुख दुःख पीडा रोग ॥३॥ तुका म्हणे देवा। तुझे पायीं माझा हेवा ॥४॥

२५७७. आर्त माझ्या बहु पोटीं । व्हावी भेटी पायांची ॥१॥ यासी तुम्ही कृपावंता । माझी चिंता असों द्या ॥२॥ तळमळ करी चित्त । अखंडित वियोगें ॥३॥ तुका म्हणे पंढरीनाथा। जाणे व्यथा अंतरिंची ॥४॥

२५७८. बहु जन्मांतरें फेरे । केले येरे सोडवीं ॥१॥ आळवितों करुणाकरे । विश्वंभरे दयाळे ॥२॥ वहावतों मायापुरीं । येथें करीं कुडावा ॥३॥ तुका म्हणे दुजा कोण । ऐसा सीण निवारी ॥४॥

२५७९. कराल तें काय नव्हे जी विठ्ठला। चित्त द्यावें बोला बोबडिया ॥१॥ सोडवूनि न्यावें काळचक्राहातीं । बहुत विपत्ती भोगविल्या ॥२॥ ज्यालें जीवों नेदी मारिलेंचि मरे । प्रारब्ध तें उरे मागुतालें ॥३॥ तुका म्हणे दुजा खुंटला उपाय। म्हणवूनि पाय आठविले ॥४॥

२५८०. डौरलों भक्तिसुखें। सेवूं अमृत हें मुखें ॥१॥ संतसंगें सारूं काळ। प्रेमसुखाचा कल्लोळ ॥२॥ ब्रह्मादिकांसी शिराणी । तो हा आनंद मेदिनी ॥३॥ नाहीं वैकुंठींचा पांग । धांवे कथे पांडुरंग ॥४॥ मुक्त व्हावें काशासाठीं। कैची येणें रसें तुटी ॥५॥ तुका म्हणे गोड । हेंचि पुरे माझें कोड ॥६॥

२५८१. फोडिलीं भांडारें। माप घेऊनियां खरें ॥१॥ केली हरिनामाची वरो। मागील तें आतां सरो ॥२॥ देशांत सुकाळ। झाला हारपला काळ ॥३॥ घ्यावें धणीवरी। तुका म्हणे लहान थोरीं ॥४॥

२५८२. आनंदाचे डोहीं आनंदतरंग। आनंदचि अंग आनंदाचें ॥१॥ काय सांगों झालें कांहींचियाबाई। पुढें चाली नाहीं आवडीनें ॥२॥ गर्भाचे आवडी मातेचा डोहळा। तेथींचा जिव्हाळा तेथें बिंबे ॥३॥ तुका म्हणे तैसा ओतलासे ठसा। अनुभव सरिसा मुखा आला ॥४॥

२५८३. म्हणऊनि धरिले पाय । अवो माय विठ्ठले ॥१॥ आपुलेंचि करूनि घ्यावें । आश्वासावें ना भीसें ॥२॥ वाढली ते तळमळ चित्ता। शम आतां करावी ॥३॥ तुका म्हणे जीवीं वसे। मज नसे वेगळा ॥४॥

२५८४. कल्याण या आशीर्वादें। जाती द्वंद्वें नासोनि ॥१॥ आश्वासिलें नारायणें। प्रेमदानें अंतरिंच्या ॥२॥ गेली निवारोनि आतां। सकळ चिंता यावरी ॥३॥ तुका म्हणे गातां गीत। आलें हित सामोरें ॥४॥

२५८५. हरिनामवेली पावली विस्तार। फळीं पुष्पीं भार वोल्हावली ॥१॥ तेथें माझ्या मना होईं पक्षिराज। साधावया काज तृप्तीचें या ॥२॥ मुळींचिया बीजें दाखविली गोडी। लवकरचि जोडी झालियाची ॥३॥ तुका म्हणे क्षणक्षणा जातो काळ। गोडी ते रसाळ अंतरेल ॥४॥

२५८६. बरवें ऐसें आलें मना। नारायणा या काळें ॥१॥ देव आम्हा प्राणसखा। झालें दुःखा खंडण ॥२॥ जन्मांतरिंच्या पुण्यरासी। होत्या त्यांसी फळ आलें ॥३॥ तुका म्हणे निज ठेवा। होईल देवा लाधलों ॥४॥

२५८७. जरि आड येती लाज। कैसें काज साधतें ॥१॥ करणें केलें उठाउठी। पायीं मिठी घातली ॥२॥ समर्पिला जीव भाव। धरिला भाव अखंड ॥३॥ तुका म्हणे आड कांहीं। काळ नाहीं घातला ॥४॥

२५८८. पात्र शुद्ध चित्त ग्वाही। नलगे कांहीं सांगणें ॥१॥ शूर तरी सत्य व्हावें। साटी जीवें करूनि ॥२॥ अमुपचि सुखमान। स्वामी जन मानवे ॥३॥ तुका म्हणे जैसी वाणी। तैसा मनीं परिपाक ॥४॥

२५८९. प्रगटलें ज्ञान। नारायण भूतीं तें ॥१॥ अनुभवचि घेऊं हावा। विनंती देवा करूनियां ॥२॥ देखोवेखीं वदे वाणी। पडिल्या कानीं प्रमाण ॥३॥ तुका म्हणे योगक्षेम। घडे तें वर्म साधावें ॥४॥

२५९०. मुख्य आधीं विषयत्याग। विधी भाग पाळणें ॥१॥ मन पावे समाधान। हेंचि दान देवाचें ॥२॥ उदासीन वृत्ति देहीं। चाड नाहीं पाळणें ॥३॥ तुका म्हणे नाहीं भय। सम सोय विषमाची ॥४॥

२५९१. आतां हेंचि सार हेंचि सार। मूळबीज रे आइका ॥१॥ आवडीनें आवडी उरे। जें ज्या झुरे तें त्यासी ॥२॥ प्रेमाचिया सूत्रदोरी। नाहीं उरी उरवी ॥३॥ तुका म्हणे चिंतन बरें। आहे खरें खऱ्यापें ॥४॥

२५९२. केला तैसा अंगीकार। माझा भार चालवीं ॥१॥ होऊं अंतराय बुद्धी। कृपानिधी नेदावी ॥२॥ आम्ही तरी जडजीव। कैंचा भाव पुरता ॥३॥ अनन्यभावें घ्यावी सेवा। आम्हां देवा घडेसी ॥४॥ तुझीं आम्हीं शरणागतें। कृपावंतें रक्षीजे ॥५॥ तुका म्हणे भाकूं कींव। असों जीव जड आम्ही ॥६॥

२५९३. सोसें बहुगर्भवासी। मेलों असों उपवासीं। नाहीं सखीं ऐसीं। येथें कोण भेटलीं ॥१॥ करीं करीं रे स्वहित। देह तंव हे अनित्य। नाहीं दिलें चित्त। सोडवूं मोहापासोनि ॥२॥ पाळी तोंडींचिया घांसें। तेचि होय अनारिसे। ज्या नव्हे ऐसें। खेदी परि सोडवीना ॥३॥ तुका म्हणे धनमानें। माझ्या बाटलों मी पणें। नाहीं दिला मनें। देखों लाभें हा लाभ ॥४॥

२५९४. इच्छिती तयांसी व्हावें जी अरूप। आम्हांसी स्वरूप स्थिती चाड ॥१॥ आतां नव्हे माझा भाव अनारिसा। पाउलांनीं इच्छा गोवियेली ॥२॥ लेंकरासी कोठें जाणत्याची परी। करूं येते दुरी धरावया ॥३॥ लागली न सुटे नामाची आवडी। माझी भावजोडी भंगूं नका ॥४॥ घेसी आढेवेढे मुक्तीच्या अभिळासें। चाळवी जा पिसे ब्रह्मज्ञानी ॥५॥ तुका म्हणे माझा कोठें भक्तिरस। पाडावया ओस चाळविसी ॥६॥

२५९५. आम्हां भाविकांची जाती। एकविध जी श्रीपती। अळंकारयुक्ति। सरों शकेचि ना ॥१॥ जाणे माउली त्या खुणा। क्षोभ उपजों नेदी मना। शांतवूनि स्तना। लावीं अहो कृपाळे ॥२॥ तुज अवघें होऊं येतें। परि मज बाटों नये चित्तें। उपासनेपरतें। नये कांहीं आवडों ॥३॥ करूं रूपाची कल्पना। मुखीं नाम नारायणा। तुका म्हणे जना। जळस्थळ देखता ॥४॥

२५९६. ज्यावें हीनपणें। कासयाच्या प्रयोजनें ॥१॥ प्रारब्धीं संसार। बरी हिमातीची थार ॥२॥ होणार तें कांहीं। येथें अवकळा नाहीं ॥३॥ तुका म्हणे देवें। कृपा केलिया बरवें ॥४॥

२५९७. किती रांडवडे। घालूनि व्हाल रे बापुडे। संसाराचे भिडे। कासावीस झालेती ॥१॥ माझ्या स्वामी शरण रिघा। कृपाळूवा पांडुरंगा। ठेवी अंगसंगा। विश्वासियां जवळी ॥२॥ कांहीं न मागतां भलें। होईल तेंचि काम केलें। नसावें आथिलें। कांहीं एका संकल्पें ॥३॥ तुका म्हणे भाव। पाववील ठायाठाव। एकविध जीव। ठेविलिया सेवेसी ॥४॥

२५९८. बाप करी जोडी लेंकराचे ओढी। आपुली करवंडी वाळवूनी ॥१॥ एकाएकीं केला मिरासींचा धनी। कडिये वागवूनी भार खांदीं ॥२॥ घालूनियां पाहे डोळा अळंकार। ठेवा दावी थोर करूनियां ॥३॥ तुका म्हणे नेदी गांजूं आणिकांसी। उदार जीवासी आपुलिया ॥४॥

२५९९. काय इंद्रावन माखियेलें गुळें। काय जिरें काळें उपचारिलें ॥१॥ तैसी अधमाची जातीच अधम। उपदेश श्रम करावा तो ॥२॥ न कळे विंचासी कुरवाळिलें अंग। आपले ते रंग दावीतसे ॥३॥ तुका म्हणे नये पाकासी दगड। शूकरासी गोड जैसी विष्ठा ॥४॥

२६००. स्तवूनियां नरा। केला आयुष्याचा मातेरा ॥१॥ नारायणाचिया लोपें। घडलीं अवघींच पापें ॥२॥ जीव ज्याचें दान। त्याचा खंडूनियां मान ॥३॥ तुका म्हणे वाणी। आइके त्या दोष कानीं ॥४॥

२६०१. मी तव बैसलों धरुनियां आस। न करीं उदास पांडुरंगा ॥१॥ नको आतां मज दवडूं श्रीहरी। मागाया भिकारी झालों दास ॥२॥ भुकेलों कृपेच्या वचनाकारणें। आशा नारायणें पुरवावी ॥३॥ तुका म्हणे येऊनियां देईं भेटी। कुरवाळुनी पोटीं धरीं मज ॥४॥

२६०२. आतां तुझें नाम गात असें गीतीं। म्हणोनि मानिती लोक मज ॥१॥ अन्नवस्त्रचिंता नाहीं या पोटाची। वारिली देहाची थोर पीडा ॥२॥ सज्जन संबंधी तुटली उपाधी। रोकडा या

बंदी सुटलोंसें ॥३॥ घ्यावा द्यावा कोणें करावा सायास । गेले आशापाश वारोनियां ॥४॥ तुका म्हणे तुज कळेल तें आतां । करा जी अनंता मायबापा ॥५॥

२६०३. कामक्रोध माझे लावियेले पाठीं । बहुत हिंपुटी झालों देवा ॥१॥ आवरितां तुझे तुज नावरती । थोर वाटे चित्तीं आश्चर्य हें ॥२॥ तुझिया विनोदें आम्हां प्राणासाटी । भयाभीत पोटीं सदा दुःखी ॥३॥ तुका म्हणे माझ्या कपाळाचा गुण । तुला हांसे कोण समर्थासी ॥४॥

२६०४. स्वमुखेंचि तुम्हीं सांगा मज सेवा । ऐसे माझे देवा मनोरथ ॥१॥ नेघों आम्ही कांहीं आपल्या उदारें । चित्तवित्त घरें जीवावरी ॥२॥ बोलें परस्परें वाढवावें सुख । पाहावें श्रीमुख डोळेभरी ॥३॥ तुका म्हणे सत्य बोलतों वचन । करुनी चरण साक्ष तुझे ॥४॥

२६०५. मज अनाथाकारणें । करीं येणें केशवा ॥१॥ जीव झुरे तुजसाठीं । वाट पोटीं पहातुसें ॥२॥ चित्त रंगलें चरणीं । तुजवांचूनि न राहे ॥३॥ तुका म्हणे कृपावंता । माझी चिंता असावी ॥४॥

२६०६. कासया वांचूनि झालों भूमिभार । तुझ्या पायीं थार नाहीं तरी ॥१॥ जातां भलें काय डोळियांचें काम । जंव पुरुषोत्तम न देखती ॥२॥ काय मुख पेंव श्वापदांची धांव । नित्य तुझें नांव नुच्चारितां ॥३॥ तुका म्हणे आतां पांडुरंगाविण । न वांचतां क्षण जीव भला ॥४॥

२६०७. नको मज ताठा नको अभिमान । तुजवीण क्षीण होतो जीव ॥१॥ दुर्धर हे माया न होय सुटका । वैकुंठनायका सोडवीं मज ॥२॥ तुका म्हणे तुझें झालिया दरूषण । मग निवारण होईल सर्व ॥३॥

२६०८. चाल घरा उभा राहें नारायणा । ठेवूं दे चरणांवरि माथा ॥१॥ वेळोवेळां देईं क्षेम आलिंगन । करीं अवलोकन कृपादृष्टी ॥२॥ प्रक्षाळूं दे पाय बैस माजघरीं । चित्त स्थिर करीं पांडुरंगा ॥३॥ आहे त्या संचितें करवीन भोजन । काय न जेवून करिसी आतां ॥४॥ करुणाकरें नाहीं कळों दिलें वर्म । दूरी होतां भ्रम कोण वारी ॥५॥ तुका म्हणे आतां आवडीच्या सत्ता । बोलिलों अनंता करवीन तें ॥६॥

२६०९. देवाची ते खूण आला ज्याच्या घरा । त्याचे पडे चिरा संसारासी ॥१॥ देवाची ते खूण करावें वाटोळें । आपणावेगळें राहों नेदी ॥२॥ देवाची ते खूण गुंतों नेदी आशा । ममतेच्या पाशा शिवों नेदी ॥३॥ देवाची ते खूण करावें तोंडाळ । आणिक सकळ जग हरी ॥४॥ देवाची ते खूण झाला ज्यासी संग । त्याचा झाला भंग मनुष्यपणा ॥५॥ देवाची ते खूण गुंतों नेदी वाचा । लागों असत्याचा मळ नेदी ॥६॥ पहा देवें तेंची बळकाविलें स्थळ । तुक्यापें सकळ चिन्हें त्याचीं ॥७॥

२६१०. अनंताचे मुखीं होसील गाइला । अमुप विठ्ठला दास तुम्हां ॥१॥ माझें कोठें आलें

होईल विचारा । तरीच अव्हेरा योग्य झालों ॥२॥ सर्व काळ तुम्ही असां जी संपन्ना । चतुरा नारायणा शिरोमणी ॥३॥ तुका म्हणे असे कलियुगींचे जीव । तरी नये कींव बहुपापी ॥४॥

२६११. न करावी चिंता । भय न धरावें सर्वथा ॥१॥ दासां साहे नारायण । होय रक्षिता आपण ॥२॥ नलगे परिहार । कांहीं योजावें उत्तर ॥३॥ न धरावी शंका । नये बोलों म्हणे तुका ॥४॥

२६१२. भांडवल माझें लटिक्याचे गांठी । उदीमासी तुटी यावी हेचि ॥१॥ कैसी तुझी वाट पाहों कोण्या तोंडें । भोंवतालें भांडे गर्भवास ॥२॥ बहू खाणींचिया रंगलोंसें रंगें । सुष्ट दुष्ट अंगें धरूनियां ॥३॥ बहुतांचे बहु पालटलों साळे । बहु आला काळें रंग अंगा ॥४॥ उकलूनि नये दावितां अंतर । घडिचा पदर सारूनियां ॥५॥ तुका म्हणे आतां करीं गोळ्यासाटीं । आपणा पालटीं संगें देवा ॥६॥

२६१३. संतसंगतीं न करावा वास । एखादे गुणदोष अंगा येती ॥१॥ मग तया दोषा नाहीं परिहार । होय अपहार सुकृताचा ॥२॥ तुका म्हणे नमस्कारावे दुरून । अंतरीं धरून राहें रूप ॥३॥

२६१४. जें ज्याचें जेवण । तेंचि याचकासी दान ॥१॥ आतां जाऊं चोजवीत । जेथें वसतील संत ॥२॥ होतीं धालीं पोटें । मागें उरलीं उच्छिष्टें ॥३॥ तुका म्हणे धांव । पुढें खुंटईल हांव ॥४॥

२६१५. धरावा तो बरा । ठाव वसतीचा थारा ॥१॥ निजलिया जागविती । निज पुरवूनि देती ॥२॥ एक वेवसाव । त्याचा संग त्यांचा जीव ॥३॥ हितें कळे हित । ग्वाही एक एकां चित्त ॥४॥ विषमाचें कांहीं । आड तया एक नाहीं ॥५॥ तुका म्हणे बरीं । घरा येतील त्यापरी ॥६॥

२६१६. त्यांचिया चरणा माझे दंडवत । ज्यांचें धनवित्त पांडुरंग ॥१॥ तेथें माझा जीव पावला विसांवा । म्हणऊनि हांवा भुरलोंसे ॥२॥ चरणींचे रज लावीन कपाळा । जीं पदें राउळा सोई जाती ॥३॥ आणिक तीं भाग्यें येथें कुरवंडी । करूनियां सांडीं इंद्राऐसी ॥४॥ वैष्णवांचे घरीं देवाची वसति । विश्वास हा चित्तीं सर्वभावें ॥५॥ तुका म्हणे सखे हरिचे जे दास । आतां पुढें आस दुजी नाहीं ॥६॥

२६१७. धोंड्यासवें आदळितां फुटे डोकें । तो तों त्याच्या दुःखें गामेजेना ॥१॥ इंगळासी सन्निधान अतित्याई । क्षेम देतां काई सुख वाटे ॥२॥ सप्रेमें कुरवाळी महाफणी व्याळ । आपुले तो ढाळ सांडी केवीं ॥३॥ तुका म्हणे आम्हांसवें जो रुसला । तयाचा अबोला आकाशासीं ॥४॥

२६१८. आतां तळमळ । केली पाहिजे सीतळ ॥१॥ पहा करील तें देव । पायीं ठेवूनियां भाव ॥२॥ तोचि अन्नदाता । नाहीं आणिकांची सत्ता ॥३॥ तुका म्हणे दासा । नुपेक्षील हा भरंवसा ॥४॥

२६१९. लांब धांवे पाय चोरी । भरोवरी जनाच्या ॥१॥ आतां कैसें होय याचें । सिजतां काचें राहिलें ॥२॥ खाय ओकी वेळोवेळां । कैसी कळा राहेल ॥३॥ तुका म्हणे भावहीन । त्याचा सीण पावावा ॥४॥

२६२०. माझ्या इंद्रियांसीं लागलें भांडण । म्हणतील कान रसना धाली ॥१॥ करिती तळमळ हस्त पाद भाळ । नेत्रांसी दुकाळ पडिला थोर ॥२॥ गुण गाय मुख आइकती कान । आमचें कारण तैसें नव्हे ॥३॥ दरुषणें फिटे नेत्रांचा तो पांग । जेथें ज्याचा भाग घेतील तें ॥४॥ तुका म्हणे ऐसें करीं नारायणा । माझी ही वासना ऐसी आहे ॥५॥

२६२१. सिद्धीचा दास नव्हें श्रुतीचा अंकिला । होईन विठ्ठला दास तुझा ॥१॥ सर्व सुख असे माझिये मानसीं । राहिलें तयासी नाश नाहीं ॥२॥ नेणें पुण्य पाप न देखें लोचनीं । आणिका वांचूनि पांडुरंगा ॥३॥ न करीं मी आस साधनीं सायास । भक्तिप्रेमरस वांचुनियां ॥४॥ गर्भवासीं दुःख नाहीं येतां जातां । हृदयीं असतां नाम तुझें ॥५॥ तुका म्हणे तुझा होईन अंकिला । न भें मी विठ्ठला कळिकाळासी ॥६॥

२६२२. जन्मा येऊनि तया लाभ झाला । बिडवई भेटला पांडुरंग ॥१॥ संसारदुःखें नासियेलीं तेणें । उत्तम हें केणें नामघोष ॥२॥ धन्य तेचि संत सिद्ध महानुभाव । पंढरीचा ठाव ठाकियेला ॥३॥ प्रेमदाते तेच पतितपावन । धन्य दरुषण होय त्याला ॥४॥ पावटणि पंथें झालिया सिद्धी । वोळगे समाधि सायुज्यता ॥५॥ प्रेम अराणुक नाहीं भय धाक । मज तेणें सुख काय चिंता ॥६॥ ते दुर्लभ संसारासी । जडजीवउद्धार लोकासी ॥७॥ तुका म्हणे त्यासी । धन्य भाग्य दरुषणें ॥८॥

२६२३. काय दिस गेले अवघेचि वराडें । तें आलें सांकडें कथेमाजी ॥१॥ क्षण एके ठायीं मन स्थिर नाहीं । अराणूक कईं होईल पुढें ॥२॥ कथेचा विसर दोषामुळें होय । तरणोपाय कैंचा मग ॥३॥ काय सांचवुनि उरलें हें मागें । घटिका एक सांगें काय गेली ॥४॥ तेचि वाणी येथें करा उजळणी । काढावीं मथूनि शब्दरत्नें ॥५॥ तुका म्हणे हेंचि बोलावया चाड । नाम घेतां गोड हित असे ॥६॥

२६२४. शुद्धाशुद्ध निवडे कैसें । चर्म मांस भिन्न नाहीं ॥१॥ कांहीं अधिक नाहीं उणें । कवण्या गुणें देवासी ॥२॥ उदक भिन्न असे काई । वोहोळ बावी सरिता नई ॥३॥ सूर्य तेजें निवडे काय । रश्मी रसा सकळा खाय ॥४॥ वर्णां भिन्न दुधा नाहीं । सकळा गाईं सारखें ॥५॥ करितां भिन्न नाहीं माती । मडक्या गति भिन्न नांवें ॥६॥ वर्ते एकविध अग्नि । नाहीं मनीं शुद्धाशुद्ध ॥७॥ तुका म्हणे पात्र चाड । किंवा विष अमृत गोड ॥८॥

२६२५. न धरी प्रतिष्ठा कोणाचीही यम । म्हणतां कां रे राम लाजा झणी ॥१॥ सांपडे हातींचे

सोडवील काळा । तो कां वेळोवेळां नये वाचे ॥२॥ कोण लोक जो हा सुटला तो एक । गेले कुंभपाक रवरवांत ॥३॥ तुका म्हणे हित तों म्हणा विठ्ठल । न म्हणे तो भोगील कळेल तें ॥४॥

२६२६. म्हणवितां हरी न म्हणे तयाला । दरवडा पडिला देहामाजी ॥२॥ आयुष्यधन त्याचें नेलें यमदूतीं । भुलविला निश्चिती कामरंगें ॥२॥ नावडे ती कथा देउळासी जातां । प्रियधनसुता लक्ष तेथें ॥३॥ कोण नेतो तयां घटिका दिवसा एका । कां रे म्हणा तुका नागविसी ॥४॥

२६२७. कथे बैसोनि सादरें । सुखचर्चा परस्परें । नवल काय तो उद्धरे । आणीक तरे सुगंधें ॥१॥ पुण्य घ्यावें रे फुकांचें । पाप दुष्ट वासनेचें । पेरिल्या बीजाचें । फळ घेईं शेवटीं ॥२॥ कथा विरस पाडी आळस । छळण करूनि मोडवी रस । बुडवी आपणासरिसें । विटाळसी नावेसी ॥३॥ सज्जन चंदनाचिये परी । दुर्जन देशत्यागें दुरी । राहो म्हणे हरी । विनंति करी तुका हे ॥४॥

२६२८. कळों आलें तुझें जिणें । देवा तूं माझें पोसणें ॥१॥ वाट पाहासी आमुची । सत्ता सतत कईंची ॥२॥ बोलावितां यावें रूपा । सदा निर्गुणींच लपा ॥३॥ तुका म्हणे तूं परदेशी । येथें आम्हां अंगें जिसी ॥४॥

२६२९. आतां येथें लाजे नाहीं तुझें काम । जाय मज राम आठवूं दे ॥१॥ तुझे भिडे माझे बहु झाले घात । केलों या अंकित दुर्जनाचा ॥२॥ माझें केलें मज पारिखें माहेर । नष्ट तूं साचार चाळविलें ॥३॥ सुखासाठीं एक वाहियेलें खांदीं । तेणें बहु मांदी मेळविली ॥४॥ केला चौघाचार नेलों पांचामधीं । नाहीं दिली शुद्धी धरूं आशा ॥५॥ तुका म्हणे आतां घेईन कांठीवरी । धनी म्यां कैवारी केला देव ॥६॥

२६३०. आजिवरी होतों तुझे सत्तेखालीं । तोंवरी त्वां केली विटंबणा ॥१॥ आतां तुज राहों नेदी या देशांत । ऐसा म्यां समर्थ केला धनी ॥२॥ सापें रिग केला कोठें बाळपणीं । होतीसी पापिणी काय जाणों ॥३॥ तुका म्हणे हा म्यां बुडविला वेव्हार । तुझेचि ढोपर सोलावया ॥४॥

२६३१. देवाच्या निरोपें पिटितों डांगोरा । लाजे नका थारा देऊं कोणी ॥१॥ मोडिले रांडेनें सुपंथ मारग । चालविलें जग यमपंथें ॥२॥ परिचारी केली आपुलीच रूढी । पोटींची ते कुडी ठावी नाहीं ॥३॥ तुका म्हणे आणा राउळा धरून । फजित करून सोडूं मग ॥४॥

२६३२. कां रे तुम्ही निर्मळ हरिगुण गाना । नाचत आनंदरूप वैकुंठासी जाना ॥१॥ काय गणिकेचा याती अधिकार मोठा । पापी अजामेळ ऐसा नेला वैकुंठा ॥२॥ ऐसे मागें नेणों किती अनंत अपार । पंच महादोषी त्यांच्या पातकां नाहीं थार ॥३॥ पुत्राचिया लोभें नष्ट म्हणे नारायण । कोण कर्तव्य तुका म्हणे त्याचें पुण्य ॥४॥

२६३३. बैसोनियां खाऊं जोडी । ओढाओढी चुकवूनि ॥१॥ ऐसें केलें नारायणें । बरवें जिणें सुखाचें ॥२॥ घरींच्या घरीं भांडवल । नलगे बोल वेचावे ॥३॥ तुका म्हणे आटाआटी ।

चुकली दाटी सकळ ॥४॥

२६३४. नाहीं भ्यालों तरी पावलों या ठाया । तुम्हां आळवाया जवळिकें ॥१॥ सत्ताबळें आतां मागेन भोजन । केलें तें चिंतन आजिवरी ॥२॥ नवनीतासाठीं खादला हा जीव । थोड्यासाठीं कींव कोण करी ॥३॥ तुका म्हणे ताक नलगे हें घाटे । पांडुरंगा खोटें चाळवणें ॥४॥

२६३५. सारीन तें आतां एकाचि भोजनें । वारीन मागणें वेळोवेळां ॥१॥ सेवटींचा घास गोड करीं माते । अगे कृपावंते पांडुरंगे ॥२॥ वंचूं नये आतां कांहींच प्रकार । धाकल्याचें थोर झाल्यावरी ॥३॥ तुका म्हणे पोटीं बहु झाला वाव । कांहीं नेदी ठाव उरों मागें ॥४॥

२६३६. पोट धालें मग नलगे पंगती । झालिया निश्चिंती खेळ गोड ॥१॥ आपुलिया हातें देईं वो कवळ । विठ्ठला शीतळ जीवन वरी ॥२॥ घराचा विसर होईल आनंदें । नाचेन मी छंदें प्रेमाचिया ॥३॥ तुका म्हणे तोंचिवरी करकर । मग हें उत्तर खंडईल ॥४॥

२६३७. बोलविसी तरी । तुझ्या येईन उत्तरीं ॥१॥ कांहीं कोड कवतुकें । हातीं द्यावया भातुकें ॥२॥ बोलविसी तैसें । करीन सेवन सरिसें ॥३॥ तुका म्हणे देवा । माझें चळण तुज सवा ॥४॥

२६३८. दिला जीवभाव । तेव्हां सांडिला म्यां ठाव ॥१॥ आतां वर्ते तुझी सत्ता । येथें सकळ अनंता ॥२॥ माझिया मरणें । तुम्हीं बैसविलें ठाणें ॥३॥ तुका म्हणे कांहीं । मी हें माझें येथें नाहीं ॥४॥

२६३९. एकाचिये वेठी । सांपडलों फुकासाठीं ॥१॥ घेतों काम सत्ताबळें । माझें करूनि भेंडोळें ॥२॥ धांवें मागें मागें । जाय तिकडे चालत लागे ॥३॥ तुका म्हणे नेलें । माझें सर्वस्व विठ्ठलें ॥४॥

२६४०. आतां द्यावें अभयदान । जीवन ये कृपेचें ॥१॥ उभारोनि बाहो देवा । हात ठेवा मस्तकीं ॥२॥ नाभी नाभी या उत्तरें । करुणाकरें शांतवीजे ॥३॥ तुका म्हणे केली आस । तो हा दिस फळाचा ॥४॥

२६४१. बराडियाची आवडी पुरे । जया झुरे साठीं ते ॥१॥ तैसें झालें माझ्या मना । नुठी चरणावरूनि ॥२॥ भागलिया पेणें पावे । विसांवे तें ठाकणीं ॥३॥ तुका म्हणे छाया भेटे । बरें वाटे तापे त्या ॥४॥

२६४२. बहुजन्में सोस केला । त्याचा झाला परिणाम ॥१॥ विठ्ठलसें नाम कंठीं । आवडीं पोटीं संचितें ॥२॥ येथुन तेथवरी आतां । नलगे चिंता करावी ॥३॥ तुका म्हणे धालें मन । हेंचि दान शकुनाचें ॥४॥

२६४३. उसंतिल्या कर्मवाटा । बहु मोठा आघात ॥१॥ शीघ्र यावें शीघ्र यावें । हातीं

न्यावें धरूनि ॥२॥ भागलों या खटपटे । घटपटें करितां ॥३॥ तुका म्हणे कृपावंता । माझी चिंता खंडावी ॥४॥

२६४४. तुम्हांसी हें अवघें ठावें । किती द्यावें स्मरण ॥१॥ कां बा तुम्ही ऐसें नेणें । निष्ठुरपणें टाळितसां ॥२॥ आळवितां मायबापा । नये कृपा अझूनि ॥३॥ तुका म्हणे जगदीशा । काय असां निजले ॥४॥

२६४५. नेलें सळेंबळें । चित्तावित्ताचें गांठोळें ॥१॥ साह्य झालीं घरिच्या घरीं । होतां ठायींच कुठोरी ॥२॥ मी पातलों या भावा । कपट तें नेणें देवा ॥३॥ तुका म्हणे उघडें केलें । माझें माझ्या हातें नेलें ॥४॥

२६४६. झाला हा डांगोरा । मुखीं लहानही थोरा ॥१॥ नागविलों जनाचारीं । कोणी बैसों नेदी दारीं ॥२॥ संचिताचा ठेवा । आतां आला तैसा घ्यावा ॥३॥ तुका म्हणे देवें । केलें आतां हें बरवें ॥४॥

२६४७. किती चौघाचारें । येथें गोविलें वेव्हारें ॥१॥ असे बांधविले गळे । होऊं न सकती निराळे ॥२॥ आपलें आपण । केलें कां नाहीं जतन ॥३॥ तुका म्हणे खंडदंडें । येरझारीं लपती लंडें ॥४॥

२६४८. पांडुरंगा सारिखा सांडुनि वेव्हारा । आणिकांची करा आस वायां ॥१॥ बहुतां दिधला उद्धार उदारें । निवडीना खरें खोटें कांहीं ॥२॥ याचिया अंकिता वैकुंठ बंदर । आणीक वेव्हार चालतीना ॥३॥ तुका म्हणे माझे हातींचें वजन । यासी बोल कोण ठेवूं सके ॥४॥

२६४९. ठेवूनि इमान राहिलों चरणीं । म्हणऊनि धनी कृपा करी ॥१॥ आम्हांसी भांडार करणें जतन । आला गेला कोण उंच नीच ॥२॥ करूनि सांभाळीं राहिलों निराळा । एक एक वेळा आज्ञा केली ॥३॥ तुका म्हणे योग्यायोग्य हे विनीत । देवा नाहीं चित्त येथें देणें ॥४॥

२६५०. आतां नव्हे गोड करितां संसार । आणीक संचार झाला माजी ॥१॥ ब्रह्मरसें गेलें भरूनियां अंग । आधील तो रंग पालटला ॥२॥ रसनेचिये रुची कंठीं नारायण । बैसोनियां मन निवविलें ॥३॥ तुका म्हणे आतां बैसलों ठाकणीं । इच्छेची ते धणी पुरईल ॥४॥

२६५१. आतां कशासाठीं दुरी । अंतर उरी राखिली ॥१॥ करीं लवकरी मूळा । लहान तळा मुळींचिया ॥२॥ दोहीं ठायीं उद्वेगवाणें । दरुषणें निश्चिंती ॥३॥ तुका म्हणे वेग व्हावा । ऐसी जीवा उत्कंठा ॥४॥

२६५२. पडिली हे रूढि जगा परिचार । चालविती वेव्हार सत्य म्हूण ॥१॥ मरणाची कां रे नाहीं आठवण । संचिताचें धन लाभ हेवा ॥२॥ देहाचें भय तें काळाचें भातुकें । ग्रासूनि तें एकें ठेविलेंसे ॥३॥ तुका म्हणे कांहीं उघडा रे डोळे । जाणोनि आंधळे होऊं नका ॥४॥

२६५३. हित नाहीं ठावें जननीजनका । दाविला लौकिकाचार तिहीं ॥१॥ अंधळ्याचे काठी लागले अंधळे । घात एके वेळे पुढें मागें ॥२॥ न धरावी चाली करावा विचार । वरील आहारगळी लावी ॥३॥ तुका म्हणे केला निवाड रोकडा । राऊत हा घोडा हातोहातीं ॥४॥

२६५४. जेथें पाहें तेथें कांडिती भूस । चिपाडें चोखूनि पाहाती रस ॥१॥ काय सांगूं देवा भुलले जीव । बहु यांची येतसे कींव ॥२॥ वैकुंठींचें मोटळें लटिकेंची फुगे । पेणिया जाऊनि भिक्षा मागे ॥३॥ तुका म्हणे कां उगेचि खोल । जवळी दाखवी आपणां बोल ॥४॥

२६५५. जाणिवेच्या भारें चेंपला उर । सदा बुरबुर सरेचि ना ॥१॥ किती याचे बोल ऐकों कानीं । मारिलें घाणीं नाळेकरी ॥२॥ मिठेंविण काय आळणी हे बोल । कोरडीच फोल घसघस ॥३॥ तुका म्हणे डेंगा न कळे हित । किती फजित करूं तरी ॥४॥

२६५६. अनुतापयुक्त गेलिया अभिमान । विसरूं वचन मागिलांचें ॥१॥ त्याचे पाय माझे लागोत कपाळीं । भोगे उष्टावळी धन्यकाळ ॥२॥ षड् ऊर्मी जिहीं हाणितल्या लाता । शरण या संता आल्या वेगीं ॥३॥ तुका म्हणे जाती वोळे लवकरी । ठायींचि अंतरीं शुद्ध होती ॥४॥

२६५७. खोल ओली पडे तें पीक उत्तम । उथळाचा श्रम वांयां जाय ॥१॥ लटिक्याचे आम्ही नव्हों सांटेकरी । थीतें घाली भरी पदरींचें ॥२॥ कोणा इहलोकीं पाहिजे पसारा । दंभ पोट भरायाचे चाडे ॥३॥ तुका म्हणे कसीं अंगीं जें उतरे । तेंचि येथें सरे जाति शुद्ध ॥४॥

२६५८. गोमट्या बीजाचीं फळेंही गोमटीं । बाहे तेंचि पोटीं समतुक ॥१॥ जातीच्या संतोषें चित्तासी विश्रांति । परतोनि मागुती फिरों नेणें ॥२॥ खऱ्याचे पारखीं येत नाहीं तोटा । निवडे तो खोटा ढाळें दुरी ॥३॥ तुका म्हणे मज सत्यासी आवडी । करितां तांतडी येत नाहीं ॥४॥

२६५९. मन झालें भाट । कीर्ति मुखें घडघडाट । पडियेली वाट । येचि चाली स्वभावें ॥१॥ बोलें देवाचे पवाडे । नित्य नवेचि रोकडे । ज्यापरी आवडे । तैसी तैसा करूनि ॥२॥ रोखीं राहावें समोर । पुढें मागें चाले भार । करावें उत्तर । सेवा रुजू करूनि ॥२॥ पुरविला देकारें । संतोषाच्या अभय करें । अंगींच्या उत्तरें । तुकया स्वामी शृंगारी ॥४॥

२६६०. दूरि तोंचि होतों आपुले आशंके । नव्हते ठाऊके मूळ भेद ॥१॥ आतां जेथें तेथें येईन सांगातें । लपायापुरतें उरों नेदी ॥२॥ मिथ्या मोहो मज लाविला उशीर । तरी हें अंतर झालें होतें ॥३॥ तुका म्हणे कां रे दाखविसी भिन्न । लटिकाची सीण लपंडाई ॥४॥

२६६१. कळों नये तोंचि चुकवितां बरें । मग पाठमोरें काय काज ॥१॥ धरिलेती आतां द्या जी माझा डाव । सांपडतां भाव ऐसा आहे ॥२॥ होतासी अंतरें झांकिलिया डोळीं । तोचि मी न्याहाळीं भरुनी दृष्टी ॥३॥ तुका म्हणे तुज रडीचीच खोडी । अहाच बराडी तो मी नव्हें ॥४॥

२६६२. विश्वास तो देव । म्हूण धरियेला भाव ॥१॥ माझी वदवितो वाणी । जेणें

धरिली धरणी ॥२॥ जोडिलीं अक्षरें । नव्हती बुद्धीच्या विचारें ॥३॥ नाहीं केली आटी । कांहीं मानदंभासाठीं ॥४॥ कोणी भाग्यवंत । तया कळे हें उचित ॥५॥ तुका म्हणे झरा । आहे मुळींचाचि खरा ॥६॥

२६६३. सुराणीचीं झालों लाडिकीं एकलीं । वडील धाकुलीं आम्ही देवा ॥१॥ म्हणऊनि कांहीं न घडे अव्हेर । गोमटें उत्तर भातुकेंही ॥२॥ कांहीं एक नाहीं वंचिलें वेगळें । मुळींचिया मुळें स्थिरावलें ॥३॥ लेवविलीं अंगीं आपुलीं भूषणें । अळंकार लेणें सकळही ॥४॥ सारितां न सरे अमुप भांडार । धना अंतपार नाहीं लेखा ॥५॥ तुका म्हणे आम्ही आळवूं आवडी । म्हणऊनी जोडी दाखविली ॥६॥

२६६४. एक वेळे केलें रितें कलेवर । आतां दिली थार पांडुरंगा ॥१॥ पाळण पोषण नलगे ते सोई । देहाचे ते काई सर्वभाव ॥२॥ माझीया मरणें झाली हे वसती । लागली ते ज्योती अविनाश ॥३॥ झाला ऐसा एका घायें येथें नाहीं । तुका म्हणे कांहीं बोलों नये ॥४॥

२६६५. पावतों ताडन । जरी हें मोकलितें जन ॥१॥ मग मी आठवितों दुःखें । देवा सावकाश मुखें ॥२॥ होती अप्रतिष्ठा । होतों वरपडा कष्टा ॥३॥ तुका म्हणे मान । होतां उत्तम खंडन ॥४॥

२६३६. धरावें तें भय । अंतरोनि जाती पाय ॥१॥ झाल्या तुटी देवासवें । काय वांचोनि करावें ॥२॥ कोणासी पारिखें । लेखूं आपणासारिखें ॥३॥ तुका म्हणे असो । अथवा हे आतां नसो ॥४॥

२६६७. आनंदाचा थारा । सुखें मोहरला झरा ॥१॥ ऐसी प्रभुची ज्या कळा । त्याच्या कोण पाहे बळा ॥२॥ अंकिता ऐसिया । होईल पावविलें ठाया ॥३॥ तुका म्हणे ऐसें । दिलें आभंड प्रकाशें ॥४॥

२६६८. आम्हांसी सांगाती । होती अराले ते होती ॥१॥ येती आइकतां हाक । दोनी मिळोन म्हणती एक ॥२॥ आणिका उत्तरीं । नसे गोविली वैखरी ॥३॥ तुका म्हणे बोला । खूण पहाती विठ्ठला ॥४॥

२६६९. काहे लकडा घांस कटावे । खोद हि जुमीन मठ बनावे ॥१॥ देवलवासी तरुवरछाया । घरघर माई खपरि सबमाया ॥२॥ कां छांडिये भार फेर सीर भागें । मायाको दुःख मिटलिये अंगें ॥३॥ कहे तुका तुम सुनो हो सिद्धा । रामबिन और झुटा कछु धंदा ॥४॥

२६७०. आणीक पाखांडें असती उदंडें । तळमळिती पिंडे आपुलिया ॥१॥ त्यांचिया बोलाचा नाहीं हा विश्वास । घातलीसे कास तुझ्या नामीं ॥२॥ दृढ एक चित्तें झालों या जीवासी । लाज सर्वविशीं तुम्हांसी ते ॥३॥ पीडों नेदी पशु आपुले अंकित । आहे जें उचित तैसें करा ॥४॥ तुका म्हणे किती भाकावी करुणा । कोप नारायणा येईल तुम्हां ॥५॥

२६७१. व्हावया भिकारी हेंचि आम्हां कारण । अंतरोनि जन जावें दुरी ॥१॥ संबंध तुटावा शब्दाचाही स्पर्श । म्हणउनि आस मोकलिली ॥२॥ तुका म्हणे दुःखें उबगला जीव । म्हणऊनी कींव भाकीं देवा ॥३॥

२६७२. कोरडिया ऐशा काय सारूं गोष्टी । करूं उठाउठीं हित आधीं ॥१॥ खोळंबला राहे आपुला मारग । पहावी ते मग तुटी कोठें ॥२॥ लौकिकाचा आड येईल पसारा । मग येरझारा दुःख देती ॥३॥ तुका म्हणे डांक लागे अळंकारें । मग नव्हे खरे पुटेविण ॥४॥

२६७३. ऐसें ठावें नाहीं मूढा । सोस काकुलती पुढां ॥१॥ माझी नका जाळूं भांडीं । पोटीं भय सोस तोंडीं ॥२॥ पातलिया काळ । तेव्हां काय चाले बळ ॥३॥ संचित तें करी । नरका जाया मेल्यावरी ॥४॥ परउपकार । न घडावा हा विचार ॥५॥ तुका म्हणे लांसी । आतां भेटों नये ऐसी ॥६॥

२६७४. काळाच सारिखीं वाहाती नक्षत्रें । करितां दुसरें फळ नाहीं ॥१॥ ऐसें करत्यानें ठेविलें करून । भरिलें भरून माप नेमें ॥२॥ शीतउष्णकाळीं मेघा वरुषाव । वरुषतां वाव होय शीण ॥३॥ तुका म्हणे विष अमृताचे किडे । पालट न घडे जीणें तया ॥४॥

२६७५. बोलणें तें आम्ही बोलों उपयोगीं । पडिले प्रसंगीं काळा ऐसें ॥१॥ जयामध्यें देव आदि मध्यें अंतीं । खोल पाया भिंती न खचेची ॥२॥ करणें तें आम्ही करूं एक वेळे । पुढिलिया बळें वाढी खुंटे ॥३॥ तुका म्हणे असो आज्ञेचीं धारकें । म्हणऊनि एकें बोलें सारूं ॥४॥

२६७६. तुझिया विनोदें आम्हांसी मरण । सोसियेला शीण बहु फेरे ॥१॥ आतां आपणचि येसी तें करीन । नाम हें धरीन तुझें कंठीं ॥२॥ वियोगेंचि आलों उसंतीत वनें । संकल्प हे मनें वाहोनियां ॥३॥ तुका म्हणे वर्म सांपडलें सोपें । गोवियलों पापें पुण्य होतों ॥४॥

२६७७. पाठीलागे काळ येतसे या लागें । मी माझें वाउगें मध्यें असे ॥१॥ आतां आगी लागो ऐसिया वेव्हारा । तूं माझा सोइरा पांडुरंगा ॥२॥ वागविला माथां नसताचि भार । नव्हतें साचार देखिलें तों ॥३॥ तुका म्हणे केलें जवळील दुरी । मृगजळ वरी आड आलें ॥४॥

२६७८. आपुलिये ठाकीं । करीन कांहीं तरी एकी ॥१॥ करीन पायांशीं वोळखी । करिसी तें करीं सुखीं ॥२॥ कायाक्लेश गंगाजळ । समर्पीन तुळसीदळ ॥३॥ तुका म्हणे देवा । कर जोडीन ते सेवा ॥४॥

२६७९. माझे तों स्वभाव मज अनावर । तुजही देतां भार कांहीं नव्हे ॥१॥ ऐसें कळों आलें मज नारायणा । जागृती स्वपना ताळ नाहीं ॥२॥ संपादितों तो हा अवघा बाह्य रंग । तुझा नाहीं संग अभ्यंतरीं ॥३॥ तुका म्हणे सत्या नाहीं पाठी पोट । असतें निघोंट एकी जाती ॥४॥

२६८०. न व्हावा तो बरा मुळींच संबंध । विश्वासि कां बद्ध बोलिलासे ॥१॥ आतां माझे

हित काय तें विचारा। सत्यत्वें दातारा पांडुरंगा ॥२॥ नाहीं भाव परी म्हणवितों दारा। नको देऊं यास उणें येऊं ॥३॥ तुका म्हणे कां हे उद्धरितां दीन। मानितसां सीण मायबापा ॥४॥

२६८१. काय तुमचि यास वेचते गांठोळी। माझी टाळाटाळी करीतसां ॥१॥ चतुराच्या राया अहो पांडुरंगा। ऐसें तरी सांगा निवडुनि ॥२॥ कोण तुम्हां सुख असे या कौतुकें। भोगितां अनेक दुःखें आम्ही ॥३॥ तुका म्हणे काय झालासी निर्गुण। आम्हां येथें कोण सोडवील ॥४॥

२६८२. निष्ठुर यासाठीं करितों भाषण। आहेसी सर्वज्ञ जाणता तूं ॥१॥ ऐसें दुःख कोण आहे निवारिता। तो मी जाऊं आतां शरण त्यासी ॥२॥ बैसलासि कोण करुनियां धीर। नाहीं येथ उरी दुसऱ्याची ॥३॥ तुका म्हणे आलों अवघेंच पायापें। आतां मायबापें नुपेक्षावें ॥४॥

२६८३. पायांपासीं चित्त। तेणें भेटी अखंडित ॥१॥ असे खेळे भलते ठायीं। प्रेमसूत्रदोरी पायीं ॥२॥ केलेंसे जतन। मुळीं काय तें वचन ॥३॥ तुका म्हणे सर्व जाणा। ठायीं विचारावें मना ॥४॥

२६८४. तुम्हां आम्हां सरी। येथें कइच्याया परी ॥१॥ स्वामिसेवा अळंकार। नाहीं आवडिये थार ॥२॥ खुंटलिया वाचा। मग हा आनंद कइचा ॥३॥ तुका म्हणे कोडें। आम्ही नाचों तुजपुढें ॥४॥

२६८५. कैचें भांडवल खरा हातीं भाव। कळवळ्यानें माव दावीतसें ॥१॥ आतां माझा अंत नको सर्वजाणा। पाहों नारायणा निवडूनि ॥२॥ संतांचें उच्छिष्ट मागिले पंगती। करावी संगती लागे ऐसी ॥३॥ तुका म्हणे आलों दावूनी विश्वास। संचित ते नास पावे ऐसें ॥४॥

२६८६. थोडे तुम्हीं मागें होते उद्धरिले। मज ऐसे गेले वांयां जीव ॥१॥ आतां याचा कांहीं न मनावा भार। कृपेचा सागर आहेसी तूं ॥२॥ तुज आळवितां पापाची वसति। राहे अंगीं किती बळ त्याचें ॥३॥ तुका म्हणे जैसे तारिले दगड। तैसा मीही जड एक देवा ॥४॥

२६८७. आम्ही म्हणों कोणी नाहीं तुज आड। दिसतोसी भ्याड पांडुरंगा ॥१॥ हा गे माझ्या भोगें केलासी परता। विश्वंभरीं सत्ता नाहीं ऐसी ॥२॥ आम्ही तुज असों देउनि आधार। नाम वारंवार उच्चारितों ॥३॥ तुका म्हणे मज धरियेलें काळें। पंचभूतीं खळें करूनियां ॥४॥

२६८८. आहे तें सकळ प्रारब्धाचे हातीं। यावें काकुलती यासी आतां ॥१॥ ऐसा माझ्या मनें सांगितला भाव। तोंवरीच देव दुजा नाहीं ॥२॥ अवघियांची जेव्हां सारावी करकर। भावबळें थार धरूं येसी ॥३॥ तुका म्हणे तुज ठेवावें पूजून। आणीक तो गुण नाहीं येथें ॥४॥

२६८९. शेवट तो होतो तुझियानें गोड। म्हणऊनि चाड धरीतसों ॥१॥ देऊं भोगाभोग

कलिवराचा भार। साहों तुज थार त्याजमधीं ॥२॥ तुझ्या बळें कांहीं खटपट काम। वाढवावा श्रम नलगे तो ॥३॥ तुका म्हणे आम्ही चेंपलों या भारें। तुमचें तें खरें देवपण ॥४॥

२६९०. ऐसाचि तो गोवा। न पाहिजे केला देवा ॥१॥ बहु आली दूरवरी। ओढत हे भरोवरी ॥२॥ आम्हांसी न कळे। तुम्ही झाकुं नये डोळे ॥३॥ तुका म्हणे संगें। असो एक एका अंगें ॥४॥

२६९१. मायलेंकरांत भिन्न। नाहीं उत्तराचा सीण ॥१॥ धाडीं धाडीं वो भातुकें। रंजविल्याचें कौतुकें ॥२॥ करूनि नवल। याचें बोलिलों ते बोल ॥३॥ तुका म्हणे माते। पांडुरंगे कृपावंते ॥४॥

२६९२. आवडी कां ठेवूं। बैसोनियां संगें जेवूं ॥१॥ मागें नको ठेवूं उरी। माझी आण तुजवरी ॥२॥ देखिले प्रकार। त्याचे पाहेन साचार ॥३॥ तुका म्हणे बाळीं। केली चाहाडी सकळीं ॥४॥

२६९३. नव्हेसी तूं लांसी। माया आणिकां त्या ऐसी ॥१॥ जे हें वांयां जाती बोल। होती निर्फळचि फोल ॥२॥ नव्हेसी दुबळी। कांहीं नाहीं तें जवळी ॥३॥ तुका म्हणे खोटी। कांहीं नव्हेसी करंटी ॥४॥

२६९४. आम्हां बोल लावा। तुम्हां अनुचित हें देवा ॥१॥ ऐसें सांगा कां व्यालेती। काय नाहीं तुम्हां हातीं ॥२॥ आतां धरा दुरी। वांयां दवडाया थोरी ॥३॥ तुका म्हणे ठायीं। ऐसें विचारावें पाहीं ॥४॥

२६९५. मरोनियां गेली माया। मग तया कोण पुसे ॥१॥ पोरटियांची दाद कोणा। ऐसा जना प्रवाहो ॥२॥ निढळासी निढळ जोडा। होय कोडा कवतुक ॥३॥ तुका म्हणे देवा ऐसी। आहों सरसीं आपण ॥४॥

२६९६ संसाराची कोण गोडी। दिली जोडी करूनि ॥१॥ निष्ठुर तूं बहु देवा। पुरे हेवा न म्हणवी ॥२॥ पाहोनियां कर्म डोळां। निराळा तो वर्जीना ॥३॥ तुका म्हणे तुज माझें। म्हणतां ओझें फुकट ॥४॥

२६९७. नव्हतें तें कळों आलें। तरी बोलें अबोला ॥१॥ तुज मज घातली तुटी। एका भेटीपासूनि ॥२॥ आतां याची न धरीं चाड। कांहीं कोड कवतुकें ॥३॥ तुका म्हणे यावें जावें। एका भावें खंडलें ॥४॥

२६९८. आतां दोघांमध्यें काय। उरलें होय वाणीजेसें ॥१॥ निष्ठुर हें केलें मन। समाधान करूनि ॥२॥ झुरावें तें तेथींच्या परी। घरिच्याघरीं अवघिया ॥३॥ तुका म्हणे देवपण। गुंडाळून असों दे ॥४॥

२६९९. मागितल्यास आस करा। उरी धरा कांहींबाहीं ॥१॥ म्हणऊनि सारिली आस। होती

यास मूळ ते ॥२॥ माझ्या मोहें तुज पान्हा । लोटे स्तना वोरसे ॥३॥ तुका म्हणे आळवणें । माझ्या देणें उत्तरा ॥४॥

२७००. आतां बरें घरिच्याघरीं । आपली उरी आपणापें ॥१॥ वाईट बरें न पडे दृष्टी । मग कष्टी होइजेना ॥२॥ बोलों जातां वाढे बोल । वायां फोल खटपट ॥३॥ काकुलती यावें देवा । तो तो सेवा इच्छितो ॥४॥ हिशोबाचे खटपटे । चढे तुटे घडेना ॥५॥ तुका म्हणे कळों आलें । दुसरें भलें तों नव्हे ॥६॥

२७०१. आधीं सोज्वळ करावा मारग । चालतां ते मग गोवी नाहीं ॥१॥ ऐसा चालोनियां आला शिष्टाचार । गोवीचा वेव्हार पापपुण्य ॥२॥ पळणें ते पळो सांडूनि कां बळें । उपाधीच्या मुळें लाग पावे ॥३॥ तुका म्हणे येथें शूर तो निवडे । पडिलें बापुडे काळचक्रीं ॥४॥

२७०२. उद्धत त्या जाती । द्रव्यें रंगल्या उद्धती ॥१॥ म्हणऊनि बहु फार । त्यासी असावें अंतर ॥२॥ कैंचें पाठी पोट । गोड विषासी सेवट ॥३॥ तुका म्हणे सापा । न कळे कुरवाळिलें बापा ॥४॥

२७०३. आम्हां कथा आवश्यक । येर संपादूं लौकिक ॥१॥ जैसी तैसी माय बरी । मानिल्या त्या माना येरी ॥२॥ व्यालीचा कळवळा । जीव बहुत कोंवळा ॥३॥ कवतुकें वावरें । तुका म्हणे त्या आधारें ॥४॥

२७०४. पाळितों वचन । परि बहू भीतें मन ॥१॥ करितों पायांशीं सलगी । नये बैसों अंगसंगीं ॥२॥ जोडोनियां कर । उभें असावें समोर ॥३॥ तुका म्हणे संत । तुम्ही मी बहु पतित ॥४॥

२७०५. जैसा तैसा आतां । मज प्रमाण अनंता ॥१॥ पायां पडणें न सोडीं । पोटीं तेंच वर तोंडीं ॥२॥ एका भावें चाड । आदि तेंचि अंतीं गोड ॥३॥ तुका म्हणे आम्हां । टाळणेंचि नाहीं नेमा ॥४॥

२७०६. चुकलों या ऐशा वर्मा । तरी कर्मा सांपडलों ॥१॥ पाठी लागे करी नास । गर्भवास भोगवी ॥२॥ माझें तुझें भिन्नभावें गळां दावें मोहाचें ॥३॥ तुका म्हणे पाठेळ केलों । नसत्या भ्यालों छंदासी ॥४॥

२७०७. देह प्रारब्धाचे शिरीं । असोनि करी उद्वेग ॥१॥ धांव घालीं नारायणा । माझ्या मना जागवीं ॥२॥ ऐसीं चुकोनियां वर्मे । पीडा भ्रमें पावलों ॥३॥ तुका म्हणे कैंचा भोग । नव्हे रोग अंगींचा ॥४॥

२७०८. अनंताच्या ऐकों कीर्ती । ज्याच्या चित्तीं हरिनाम ॥१॥ उल्लंघूनि गेले सिंधु । हा भवसिंधु तोडोनियां ॥२॥ हळुहळु तेचि वाहीं । चालों कांहीं अधिकारें ॥३॥ खुंटूनियां गेले नावा । नाहीं हेवा खोळंबा ॥४॥ नलगे मोल द्यावा रुका । भाव एका कारणें ॥५॥ भीमातिरीं

थडवा केला । उठा चला लवलाहें ॥६॥ तुका म्हणे पाहतो वाट । उभा नीट पाउलीं ॥७॥

२७०९. तरीच म्यां देवां । साटी करूनियां जीवा ॥१॥ येथें बैसलों धरणें । दृढ कायावाचामनें ॥२॥ आवरिल्या वृत्ति । मन घेऊनियां हातीं ॥३॥ तुका म्हणे जरा । बाहेर येऊं नेदीं घरा ॥४॥

२७१०. हें तों एक संतांठायीं । लाभ पायीं उत्तम ॥१॥ म्हणवितां त्यांचे दास । पुढें आस उरेना ॥२॥ कृपादान केलें संतीं । कल्पांतींही सरेना ॥३॥ तुका म्हणे संतसेवा । हेचि देवा उत्तम ॥४॥

२७११. नारायण ऐसा । सेवूं नेणतील रसा ॥१॥ जेणें भवव्याध तुटे । दुःख मागुतें न भेटे ॥२॥ नलगे कांहीं आटी । बाधा राहों न सके पोटीं ॥३॥ कैवल्य तें जोडे । कृपा लवकरी घडे ॥४॥ जन्ममरणदुःख अटे । जाळें अवघेंचि तुटे ॥५॥ तुका म्हणे झाला । याचा गुण बहुतांला ॥६॥

२७१२. मार्ग चुकले विदेशी एकले । तयावरी झाले दिशाभुली । हातीं धरूनियां पावविले घरा । त्यांच्या उपकारा काय द्यावें ॥१॥ तैसा मी कुडकुडा होतों केशीराजा । सेवा न घडे लाजा म्हणऊनि ॥२॥ सांडियेला गर्भ उबगोनि माउली । नाहीं सांभाळिली भूमि शुद्ध । उष्ण तहान भूक एवढे आकांतीं । वोसंगा लाविती काय म्हूण ॥३॥ खांद्यावरीं शूळ मरणाचे वाटे । अन्यायहि मोठे साच केले । हातींचा हिरोनि घातला पाठीसी । तुका म्हणे ऐसी परी जाली ॥४॥

२७१३. अनेक दोषांचे काट । जे जे गादले निघोंट । होती हरिनामें चोखट । क्षण एक न लगतां ॥१॥ तुम्ही हरि म्हणा हरि म्हणा । महादोषांचे छेदना ॥ध्रु०॥ अतिप्रीतीचा बांधला । नष्ट चांडाळी रतला । क्षण न लागतां नेला । वैकुंठासी हरि म्हणतां ॥२॥ अमित दोषांचें मूळ । झालें वाल्मीकासी सबळ । झाला हरिनामें निर्मळ । गंगाजळ पैं जैसा ॥३॥ हरि म्हणतां तरले । महादोषी उद्धरिले । पहा गणिकेसी नेलें । वैकुंठासी हरि म्हणतां ॥४॥ हरिविण जन्म नको वांया । जैसी दर्पणींची छाया । म्हणोनि तुका लागे पायां । शरण तया हरीसी ॥५॥

२७१४. भजन हें नासिलें हेंडी । दंभा लंडी आवडी ॥१॥ जेवीत ना आइता पाक । नासी ताक घुसळूनि ॥२॥ एकाएकीं इच्छी पाट । नेणे चाट काउळें ॥३॥ तुका म्हणे मुलाम्याचें । बंधन साचें सेवटीं ॥४॥

२७१५. जैसा निर्मळ गंगाओघ । तैसा भाग वोगरीं ॥१॥ प्रेम वाढे ग्रासोग्रासीं । ब्रह्मरसीं भोजन ॥२॥ तृप्तीवरि आवडी उरे । ऐसे बरे प्रकार ॥३॥ तुका म्हणे पाख मन । नारायण तें भोगी ॥४॥

२७१६. सुख सुखा विरजण झालें । तें मथिलें नवनीत ॥१॥ हाले डोले हरुषे काया । निवती बाह्या नयन ॥२॥ प्रबळ तो नारायण । गुणें गुण वाढला ॥३॥ तुका म्हणे भरली सीग ।

**वरी मग वोसंडे ॥४॥**

**२७१७. कां रे न भजसी हरी । तुज कोण अंगीकारी । होईल यमपुरीं । यमदंड यातना ॥१॥ कोण झाली लगबग । काय करिसि तेथें मग ॥२॥ कां रे भरला ताठा । करिती वोज नेतां वाटा ॥३॥ तोंडा पडिली खिळणी । जिव्हा पिटिती वोढूनि ॥४॥ कां रे पडिली जनलाज । कोण सोडवील तुज ॥५॥ लाज धरीं म्हणे तुका । नको वांयां जाऊं फुका ॥६॥**

**२७१८. क्षरला सागर गंगा ओघीं मिळे । आपणचि खेळे आपणाशीं ॥१॥ मधील ते वाव अवघी उपाधि । तुम्हां आम्हांमधीं तेचि परी ॥२॥ घट मठ झाले आकाशाचे पोटीं । वचनेंचि तुटी तेथेंचि ते ॥३॥ तुका म्हणे बीजें बीज दाखविलें । पत्र पुष्प आलें गेलें वांयां ॥४॥**

**२७१९. काय विनवावें कोण तो निवाड । केलें माझ्या कोड वचनाचें ॥१॥ अहो कृपानिधि गुणांच्या निधाना । माझ्या अनुमाना नयेचि हें ॥२॥ बहुत करुणा केलेंसे भाषण । एकही वचन नाहीं आलें ॥३॥ माझी कांहीं सेवा होईल पावली । निश्चिंती मानिली होती ऐसी ॥४॥ तुका म्हणे माझी उरली ते आटी । अभय कर कटी न देखेंचि ॥५॥**

**२७२०. लाजोनि या काळें राहिलें लिखित । नेदितांहि चित्त समाधान ॥१॥ कैसें सुख वाटे वचनांचे तुटी । प्रीतिविण भेटी रुचि नेदी ॥२॥ एकाचिये भेटी एकाचा कोंपर । मायेचा पदर कळों येतो ॥३॥ होत्या आपल्या त्या वेचूनियां शक्ती । पुढें झालों युक्तिकळाहीन ॥४॥ तुका म्हणे तुम्ही समर्थ जी देवा । दुर्बळाची सेवा कोठें पावें ॥५॥**

**२७२१. आशाबद्ध बहु असें निलाजिरें । होय म्हणें धीरें फळ टोंकें ॥१॥ कारणापें चित्त न पाहें अपमान । चित्त समाधान लाभासाठीं ॥२॥ तुका म्हणे हातें लोटिलें न कळे । झांकितसे डोळे पांडुरंगा ॥३॥**

**२७२२. सातां पांचा तरी वचनां सेवटीं । निरोप कां भेटी एक तरी ॥१॥ कां नेणें निष्ठुर केलें नारायणा । न देखें हें मना येतां कांहीं ॥२॥ तुका म्हणे ऐसा न देखें निवाड । कडू किंवा गोड फळ पोटीं ॥३॥**

**२७२३. कासया हो माझा राखिला लौकिक । निवाड कां एक केला नाहीं ॥१॥ मग तळमळ न करितें मन । झालें तें कारण कळों येतें ॥२॥ तुका म्हणे केला पाहिजे निवाड । वैद्यासी ते भीड मरण रोग्या ॥३॥**

**२७२४. वायां ऐसा जन्म गेला । हें विठ्ठला दुःख वाटे ॥१॥ नाहीं सरता झालों पायीं । तुम्ही जईं न पुसा ॥२॥ कां मी जीतों संवसारीं । अद्यापवरी भूमिभार ॥३॥ तुका म्हणे पंढरिनाथा । सबळ व्यथा भवरोग ॥४॥**

**२७२५. ऐसें कोण पाप बळी । जें जवळी येऊं नेदी ॥१॥ तुम्हां तंव होईल ठावें । नेदावें कां**

कळों हें ॥२॥ कोण झाला अंतराय। कां ते पाय अंतरले ॥३॥ तुका म्हणे निमित्याचा। आला सुचा अनुभव ॥४॥

२७२६. ब्रह्मज्ञान भरोवरी। सांगे आपण न करी ॥१॥ थू थू त्याच्या तोंडावरी। व्यर्थ सिणविली वैखरी ॥२॥ कथा करी वरी वरी। प्रेम नसेचि अंतरीं ॥३॥ तुका म्हणे कवित्व करी। मान लोभ हे अंतरीं ॥४॥

२७२७. दगडाच्या देवा बगाडी नवस। बाईल कथेस जाऊं नेदी ॥१॥ वेची धनरासी बांधिलें स्मशान। दारीं वृंदावन द्वाड मानी ॥२॥ चोरें नागविला न करी त्याची खंती। परी द्विजा हातीं नेदी रुका ॥३॥ करी पाहुणेर व्याह्याजांवयासी। आल्या अतीतासी पाठीमोरा ॥४॥ तुका म्हणे जळो धिग त्याचें जिणें। भार वाही सीण धरातळीं ॥५॥

२७२८. करूनि विनवणी। माथा ठेवितों चरणीं ॥१॥ होतें तेंचि असों द्यावें। रूप सौम्यचि बरवें ॥२॥ भया भेणें तुमचा ठाव। तुमच्या कोपें कोठें जावें ॥३॥ तुका पायां लागे। दान समुदाय मागे ॥४॥

२७२९. प्रेम नये सांगतां बोलतां दावितां। अनुभव चित्ता चित्त जाणे ॥१॥ कासवीचें बाळ वाढे कृपादृष्टी। दुधा नाहीं भेटी अंगसंगें ॥२॥ पोटामध्यें कोणें सांगितलें सर्पा। उपजत लपा म्हणऊनि ॥३॥ बोलों नेणें परी जाणे गोड क्षार। अंतरीं विचार त्यासी ठावा ॥४॥ तुका म्हणे बरें विचारावें मनीं। आणिक भल्यांनीं पुसों नये ॥५॥

२७३०. आतां मी पतित ऐसा साच भावें। कळों अनुभवें आलें देवा ॥१॥ काय करावें तें रोकडेंचि करीं। राहिली हे उरी नाहीं दोघां ॥२॥ येर येरा दृष्टी द्यावया उत्तरा। यासी काय करा ग्वाही आतां ॥३॥ तुका म्हणे मेलों सांगतसांगतां। तेंचि आलें आतां कळों तुम्हां ॥४॥

२७३१. काय तुज मागें नाहीं जाणवलें। माझें नाहीं केलें हित कांहीं ॥१॥ डोळे झांकुनियां होसी अबोलणा। तेव्हां नारायण आतां कैसा ॥२॥ न कळे उचित न सांगता स्पष्ट। ऐसा क्रियानष्ट काय जाणे ॥३॥ तुका म्हणे माझा घात तुम्हां ठावा। तरि कां आधीं देवा वारूं नये ॥४॥

२७३२. नये ऐसें बोलों कठिण उत्तरें। सलगी लेंकुरें केली पुढें ॥१॥ अपराध कीजे घडला तो क्षमा। सिकवा उत्तमा आमुचिया ॥२॥ धरूं धावे आगी पोळेल तें नेणें। ओढिलिया हाणें माते बाळा ॥३॥ तुका म्हणे भार ज्याचा जार त्यासी। प्रवीण येविशीं असा तुम्ही ॥४॥

२७३३. लडिवाळ म्हणोनि निष्ठुर न बोला। परी सांभाळिला लागे घात ॥१॥ बहु वागवीत आणिलें दुरूनि। दीसांची पोसणी बहु आहे ॥२॥ नाहीं लागों दिला आघाताचा वारा। निष्ठुर उत्तरा कोमेजेना ॥३॥ तुका म्हणे तुम्ही कृपावंत हरि। शांतवा उत्तरीं अमृताच्या ॥४॥

२७३४. आत्मस्थिति मज नको हा विचार। देईं निरंतर चरणसेवा ॥१॥ जन्मोजन्मीं तुझा दास पुरुषोत्तमा। हेचि गोडी आम्हां देईं देवा ॥२॥ काय सायुज्यता मुक्तिची हे चाड। देव भक्त कोड तेथें नाहीं ॥३॥ काय तें निर्गुण पाहों कैशा परी। वर्णूं तुझी हरी कीर्ति कैसी ॥४॥ गोड चरणसेवा देवभक्तपणें। मज देवा झणें दुराविसी ॥५॥ जाणिवेपासूनि सोडवी सत्वर। देईं निरंतर चरणसेवा ॥६॥ तुका म्हणे गोडा गोड नलगे प्रीति। सेवेविण चित्तीं सार नाहीं ॥७॥

२७३५. चालें दंडवत घालीं नारायणा। आपुल्या कल्याणा लागूनियां ॥१॥ बैसविला पदीं पुत्र राज्य करी। पिता वाहे शिरीं आज्ञा त्याची ॥२॥ तुका म्हणे आहे ठायींचाचि मान। आतां अनुमान कायसा तो ॥३॥

२७३६. समर्थाचें बाळ पांघरे वाकळ। हंसती सकळ लोक कोणा ॥१॥ समर्थासी लाज आपुल्या नांवाची। शरण आलियाची लागे चिंता ॥२॥ जरी तुज कांहीं होईल उचित। तरी हा पतित तारीं तुका ॥३॥

२७३७. न करीं रे मना कांहींच कल्पना। चिंतीं या चरणां विठोबाच्या ॥१॥ येथें सुखाचिया अमुपचि रासी। पुढें कल्पनेसी ठाव नाहीं ॥२॥ सुखाचें ओतिलें साजिरें श्रीमुख। शोक मोह दुःख पाहातां नासे ॥३॥ तुका म्हणे येथें होईल विसांवा। तुटतील धांवा पुढिलिया ॥४॥

२७३८. काय करूं मज नागविलें आळसें। बहुत या सोसें पीडा केली ॥१॥ हिरोनियां नेला मुखींचा उच्चार। पडिलें अंतर जवळीच ॥२॥ द्वैताचिया कैसा सांपडलों हातीं। बहुत करती ओढाओढी ॥३॥ तुका म्हणे आतां आपुलिया सवा। न्यावें मज देवा सोडवूनि ॥४॥

२७३९. नाहीं देवाचा विश्वास। करीं संतांचा उपहास ॥१॥ त्याचे तोंडीं पडे माती। हीन शूकराची जाती ॥२॥ घोकुनी अक्षरें। वाद छळणा करीत फिरे ॥४॥ म्हणे देवासी पाषाण। तुका म्हणे भावहीन ॥४॥

२७४०. हेंचि सर्वसुख जपावा विठ्ठल। न दवडावा पळ क्षण वांयां ॥१॥ हेंचि एक सर्व साधनांचें मूळ। आतुडे गोपाळ येणें पंथें ॥२॥ न लगती कांहीं तपाचिया रासी। करणे वाराणसी। नाना तीर्थे ॥३॥ कल्पना हे तिळ देहीं अभिमान। नये नारायण जवळी त्याच्या ॥४॥ तुका म्हणे देव नामीं नेदी भेटी। म्हणे त्याचे होंटीं कुष्ट होय ॥५॥

२७४१. माझे विषयीं तुज पडतो विसर। नको धरूं दूर पांडुरंगा ॥१॥ तुझा म्हणवितों हेचि लाज तुला। आतां झणीं मला विसरसी ॥२॥ तुका म्हणे तुझी माझी नाहीं उरी। आतां केली खरी देवराया ॥३॥

२७४२. अभक्ताचे गांवीं साधु म्हणजे काय। व्याघ्रवाडां गाय सांपडली ॥१॥ कसाबाचे आळी मांडिलें प्रमाण। बस्वणाची आण तया काई ॥२॥ मोतियाची गोणी माळे वोळी नेदी।

पुसती केवढ्या केली पासरी हे ॥३॥ केळी आणी बोरी वसती सेजारीं । संवाद कोणे परी घडे येथें ॥४॥ तुका म्हणे खीर केली कान्हेळ्याची । शुद्ध गोडी कैंची वसे तेथें ॥५॥

२७४३. भागल्यांचा तूं विसांवा । करीन नांवा निंबलोण ॥१॥ परमानंदा पुरुषोत्तमा । हरी या श्रमापासूनि ॥२॥ अनाथांचा अंगीकार । करितां भार न मानिसी ॥३॥ तुका म्हणे इच्छा पुरे । ऐसी धुरे हे विठ्ठले ॥४॥

२७४४. घालूनियां कास । बळें आलों मागायास ॥१॥ प्रेम देईं पाठवूनि । पांडुरंगा सेवाऋणी ॥२॥ होईं रे शाहाणा । कळों नेदावें या जना ॥३॥ तुका म्हणे पायीं । जडलों मग उरलें काई ॥४॥

२७४५. लागे तुझी सोय करी ऐसें कांहीं । माझे विठाबाई माऊलीये ॥१॥ पतितपावन म्हणविसी जरी । अव्हेर न करीं तरी माझा ॥२॥ नाहीं तरी ब्रीद टाकीं सोडूनियां । न धरिसी माया जरी माझी ॥३॥ बोलियला बोल करावा साचार । तरि लोक बरें म्हणतील ॥४॥ करावा संसार लोकलाजे भेणें । वचनासी उणें येऊं नेदीं ॥५॥ तुम्हां आम्हां तैसें नाहीं म्हणे तुका । होशिल तूं सखा जीवलग ॥६॥

२७४६. भेटीलागीं पंढरिनाथा । जीवा लागली तळमळ व्यथा ॥१॥ कधीं कृपा करिसी नेणें । मज दीनाचें धांवणें ॥२॥ सीणलें माझें मन । वाट पाहतां लोचन ॥३॥ तुका म्हणे भूक । तुझें पाहावया मुख ॥४॥

२७४७. सांडियेली काया । वरी ओवाळूनि पायां ॥१॥ शरण शरण नारायणा । मज अंगीकारा दीना ॥२॥ आलों लोटांगणीं । रुळें तुमचें चरणीं ॥३॥ तुका म्हणे शिर । ठेवियेलें पायांवर ॥४॥

२७४८. तुझे दारींचा कुतरा । नको मोकलूं दातारा ॥१॥ धरणें घेतलें द्वारांत । नको धरूनी उठवूं हात ॥२॥ घातली मुरकुंड । झालों शिरोमणी लंड ॥३॥ तुका म्हणे जगजीवना । ब्रीद पाहें नारायणा ॥४॥

२७४९. पाहातां हें बरवें झालें । कळों आलें यावरी ॥१॥ मागिलांचा झाला झाडा । त्या निवाडास्तव हे ॥२॥ विसांवलें अंग दिसे । सरिसे सरिसें अनुभवें ॥३॥ तुका म्हणे बरें झालें । देवें नेलें गवसूनी ॥४॥

२७५०. चक्रफेरीं गळीं गळा । होता गोवियेला माळा ॥१॥ फुटोनियां गेला कुंभ । झालों निष्काम स्वयंभ ॥२॥ धरितचि नाहीं थारा । वेठी भ्रमण खोंकरा ॥३॥ तुका म्हणे कोडें । आगी काय जाणे मढें ॥४॥

२७५१. श्रमपरिहारां । मूळ झालों दातारा ॥१॥ देह निवेदूनि पायीं । झालों निष्काम

उतराई ॥२॥ आपली ते सत्ता । येथें असों नेदी आतां ॥३॥ राहिला निराळा । तुका खटपटी वेगळा ॥४॥

२७५२. पाठवाल तेथें गर्जेन पवाडे । कांहीं देहाकडे नावलोकीं ॥१॥ म्हणउनि मागें कंठींचा सौरस । पावतील नाश विघ्नें पुढें ॥२॥ कृपेच्या कटाक्षें न भें कळिकाळा । येतां येत बळा शक्ती पुढें ॥३॥ तुका म्हणे गुढी आणीन पायांपें । होईल तें सोपें नाम तुझें ॥४॥

२७५३. उपजल्या काळें शुभ कां शकुन । आतां आवरोन राहिलेती ॥१॥ नाहीं मागितली वचनाची जोडी । निष्काम रोकडी वरिवरि ॥२॥ सत्याविण काय उगीच लांबणी । कारियाची वाणी येर भूस ॥३॥ तुका म्हणे ऐसी कोणा चाळवणी । न विचारा मनीं पांडुरंगा ॥४॥

२७५४. नव्हें मी आहाच आशेचें बांधलें । जें हें टोंकविलें नारायणें ॥१॥ अंतर तों तुम्हा बरें कळों येतें । वेव्हार उचितें चाळवीजे ॥२॥ मनें कल्पिलें तें आवरितां पाप । संकल्पी विकल्प याचि नांवें ॥३॥ तुका म्हणे आम्हां न सोसे जळजळ । सिजल्यावरी जाळ कढ खोटा ॥४॥

२७५५. ताकें कृपण तो जेवूं काय घाली । आहाच ते चालीवरी कळे ॥१॥ काय तुम्हां वेच घातलें सांकडें । माझें आलें कोडें आजिवरि ॥२॥ सेवेविण आम्ही न लिंपो त्या कार्या । झाला देवराया निर्धार हा ॥३॥ तुका म्हणे तुझीं राखावया ब्रीदें । येणें अनुवादें गर्जतसें ॥४॥

२७५६. वृत्तीवरी आम्हां येणें काशासाठीं । एवढी हे आटी सोसावया ॥१॥ जाणतसां परी नेणते जी देवा । भ्रमूचि बरवा राखावा तो ॥२॥ मोडुनि क्षरलों अभेदाची मूस । तुम्हा कां आळस वोढवला ॥३॥ तुका म्हणे होईं लवकरि उदार । लांबणीचें फार काम नाहीं ॥४॥

२७५७. सुलभ कीर्तन दिलें ठसावूनि । करितां धरणी उरी कोण ॥१॥ आतां न टळावें केलिया नेमासी । उदाराचा होसी हीन काय ॥२॥ एका नेमें कोठें दुसरा पालट । पादर तो धीट म्हणती त्यासी ॥३॥ तुका म्हणे किती बोलसील उणें । एकाच वचनें खंड करीं ॥४॥

२७५८. जेथें माझी दृष्टि राहिली बैसोन । तेथेंचि हें मन गुंडाळतें ॥१॥ टाळावी ते पीडा आपणापासून । दिठावलें अन्न ओकवितें ॥२॥ तुम्हांसी कां कोडें कोणीये विशीचें । नवलाव याचें वाटतसे ॥३॥ तुका म्हणे वेगीं उभारा जी कर । कीर्ति मुखें थोर गर्जईन ॥४॥

२७५९. इच्छेपाशीं आलों फिरोनि मागुता । स्वामीसेवकता आवडीचे ॥१॥ द्यावें लवकरी मागितलें दान । मुळींचे जतन करुनी असें ॥२॥ उपाय हे करीं एकाचि वचना । दावूनियां खुणा ठाया येतों ॥३॥ तुका म्हणे गांठी किती तुजपाशीं । जगाच्या तोडिसी चिंतनानें ॥४॥

२७६०. कोठें आम्ही आतां वेचावी हे वाणी । कोण मना आणी जाणोनियां ॥१॥ न करावी सांडी आतां टाळाटाळी । दैन हे कळी होईल माझी ॥२॥ घरोघरीं झाल्या ज्ञानाचिया गोष्टी । सत्यासवें गांठी न पडावी ॥३॥ तुका म्हणे आम्हां भाकितां करुणा । भलताचि

शाहाणा शोध काढी ॥४॥

२७६१. डगमगी मन निराशेच्या गुणें। हें तों नारायणें शांतवीजे ॥१॥ धीर तूं गंभीर जीवन जगाचें। जळो विभागाचें अहाच ते ॥२॥ भेईल जीव हे देखोनि कठीण। केला जातो सीण तो तो वांयां ॥३॥ तुका म्हणे आवश्यक हें वचन। पाळावेंचि दान समयो आहे ॥४॥

२७६२. आम्ही पहा कैसीं एकतत्त्वीं झालों। राखणे लागलों वासनेसी ॥१॥ तुम्हांविण कांहीं नावडे या जीवा। केला तोचि देवा दृढ पण ॥२॥ वर्म नेणों परि वृत्ति भंगों नेदूं। वंदिलेंचि वंदूं आवडीनें ॥३॥ तुका म्हणे केलें नामाचें जीवन। वारताही भिन्न नेणों आतां ॥४॥

२७६३. आपण तों असा। समर्थ जी हृषीकेशा ॥१॥ करा करा बुझावणी। काय विलंब वचनीं ॥२॥ हें घे ऐसें म्हणा। उठूनि लागेन चरणा ॥३॥ घेउनियां सुखें। नाचे तुका कवतुकें ॥४॥

२७६४. द्याल ऐसें दिसे। तुमचें साचपण इच्छे ॥१॥ म्हणऊनि न भंगे निर्धार। केले लोचन सादर ॥२॥ मुखाचीच वास। पुरला पाहे अवकाश ॥३॥ तुका म्हणे कळे। काय लाभ कोणे वेळे ॥४॥

२७६५. तुम्ही तों सदैव। अधीरपणें माझी हांव ॥१॥ जळो आशेचें तें जिणें। टोंकतसावें दीनपणें ॥२॥ येथूनि सोडवा। आतां अनुभवें देवा ॥३॥ तुका म्हणे झालें। एक मग हें निमालें ॥४॥

२७६६. कैसे भले देवा अनुभवा कां नये। उशीर तो काय तुम्हांपाशीं ॥१॥ आहे तें मागतों दिसतें जवळी। केल्यामध्यें कळि कोण साध्य ॥२॥ नाहीं सांडीत मी सेवेची मर्यादा। लाविला तो धंदा नित्य करीं ॥३॥ तुका म्हणे हात आवरिला गुंती। माझे तंव चित्तीं नाहीं दुजें ॥४॥

२७६७. हुंदकी पिसवी हलवितो दाढी। माळे मणी ओढी निंदेचे ते ॥१॥ त्याचें फळ पाकीं यमाचे ते दंड। घर केलें कुंड कुंभपाकीं ॥२॥ क्रोध पोटीं मांग आणिला अंतरा। भुंकोनि कुतरा जप करी ॥३॥ तुका म्हणे स्नान केलें मळमूत्रें। जेविलीं पितरें अमंगळें ॥४॥

२७६८. अंगीं भरला ताठा। नये वळणी जैसा खुंटा ॥१॥ कैसें न कळे त्या डेंगा। हित आदळलें अंगा ॥२॥ जीव जाते वेळे। भल्या कडे ताठी डोळे ॥३॥ मुसळाचें अनु। तुका म्हणे नव्हे धनु ॥४॥

२७६९. करूनि कडबिड। जमा घडिला लगड ॥१॥ होतें तेंचि झालें। नाम ठायींचें पडिलें ॥२॥ उतरलें डाईं। उत्तम सुलाख ते ताई ॥३॥ हिंडवितां देशोदेश। तुका म्हणे नाहीं नाश ॥४॥

२७७०. पढीये तें मागा पांडुरंगापाशीं। मज दुर्बळासी काय पीडा ॥१॥ याचसाठीं दुराविला संवसार। वाढे हे अपार माया तृष्णा ॥२॥ कांहीं करितां कोठें नव्हे समाधान। विचारितां पुण्य तेंचि पाप ॥३॥ तुका म्हणे आतां निश्चळचि भलें। तुज आठविलें पांडुरंगा ॥४॥

२७७१. नव्हें मी शाहाणा । तरी म्हणा नारायणा ॥१॥ तुम्हां बोलावया कांहीं । येच भरलोंसे वाहीं ॥२॥ आणावे ते रूपा । कोपलेती तरी कोपा ॥३॥ कळोनि आवडी । तुका म्हणे जाते घडी ॥४॥

२७७२. आम्ही भाविक हे काय जाणों खोडी । आइकोनि प्रौढी विनविलें ॥१॥ नाहीं ऐसें येथें झालेती असतां । वाढविली चिंता अधिक सोस ॥२॥ न कळेचि आधीं करितां विचार । न धरितां धीर आहाचता ॥३॥ तुका म्हणे आतां वचनें वचन । वाढलें तिक्षण बुद्धि झाली ॥४॥

२७७३. कोठें देवा बोलों । तुम्हां भीड घालूं गेलों ॥१॥ करावया सत्वहानी । भांडवलाची टांचणी ॥२॥ दुर्बळा मागतां । त्याच्या प्रवर्तला घाता ॥३॥ तुका म्हणे नाहीं । मज कळले ऐसें कांहीं ॥४॥

२७७४. पाहिजे तें आतां प्रमाण प्रत्यक्ष । आलियानें साक्ष खरें खोटें ॥१॥ काय त्या दिवस उचिताचा आला । मागील जो केला श्रम होता ॥२॥ ठेवियली खूण करोनि संकेत । तयापाशीं चित्त लागलेंसे ॥३॥ जाणसी गे माते लेंकराचा लाड । नये पडों आड निष्ठुरता ॥४॥ तुका म्हणे आम्हीं करावें वचन । तुम्हांसी जतन करणें तें ॥५॥

२७७५. पडिला प्रसंग कां मी ऐसा नेणें । संकल्प तें मनें जिरवले ॥१॥ चेष्टविलें तरी सांगावें कारण । भक्ती ते जीवन करावया ॥२॥ लावूनियां दृष्टि घातली सामोरी । बैसली जिव्हारीं डसोन ते ॥३॥ तुका म्हणे जीवा लाविला तो चाळा । करावें गोपाळा शीघ्र दान ॥४॥

२७७६. मागील विसर होईल सकळ । केली तळमळ दुःखाची ते ॥१॥ दोहींचें ऐक्य घालीं गडसंदीं । स्थिरावली बुद्धी पायांपाशीं ॥२॥ अहाच या केलों देहपरिचारें । तुमचें तें खरें वाटों नये ॥३॥ तुका म्हणे व्हावें लवकरी उदार । मी आहें सादर प्रतिग्रहा ॥४॥

२७७७. वाढवावा पुढें आणीक प्रकार । एकचि तें फार रुचि नेदी ॥१॥ निच नवें लेणें देह हा पवाडा । पालट रोकडा वरावरी ॥२॥ दिसे शोभिवंत सेवेनें सेवक । स्वामीची ते लोकत्रयीं कीर्ति ॥३॥ तुका म्हणे आजी पाववा संतोष । करूनि कीर्तिघोष नाचईन ॥४॥

२७७८. क्षोभ आणि कृपा मातेची समान । विभाग जतन करुनि ठेवी ॥१॥ क्षणभंगुर ते उमजली चिंता । खरी अखंडिता आवडीची ॥२॥ सिकवूं जाणे ते गोमटियासाठीं । लोभें नाहीं तुटी निश्चयेंसी ॥६॥ अवघेंचि मिथ्या समया आरतें । देतां तें उचितें काय जाणे ॥४॥ न करी अव्हेर गांजूं नेदी कोणा । भेडसावी तान्हा हाऊ आला ॥५॥ तुका म्हणे करी जिवासी जतन । दचकूनि मन जवळी आणी ॥६॥

२७७९. संसाराचे धांवे वेठी । आवडी पोटीं केवढी ॥१॥ हागों जातां दगड सांची । अंतरीं हे संकल्प ॥२॥ लाज तेवढी नारायणीं । वांकडी वाणी पोरांपें ॥३॥ तुका म्हणे बेशरमा ।

वरी श्रमा पडिभरू ॥४॥

२७८०. मी त्यांसी अनन्य तीं कोणा असती । ऐसें तंव चित्ती विचारावें ॥१॥ आहे तो विचार आपणयापाशीं । कळा बिंबाऐसी प्रतिबिंबीं ॥१॥ शुभ शकुन तो शुभ लाभे फळे । पुढील तें कळे अनुभवें ॥३॥ तुका म्हणे माझा असेल आठव । तैसा माझा भाव तुझ्या पायीं ॥४॥

२७८१. बहु कृपावंतें माझीं मायबापें । मी माझ्या संकल्पें अंतरलों ॥१॥ संचितानें नाहीं चुकों दिली वाट । लाविलें अदट मजसवें ॥२॥ आतां मी रुसतों न कळतां वर्म । परी ठावे धर्म सर्व देवा ॥३॥ तुका म्हणे उभा राहिला न बैसे । आमुचिया आसे उद्वेग त्या ॥४॥

२७८२. कैसीं दिसों बरीं । आम्ही आळविता हरि ॥१॥ नाहीं सोंग अळंकार । दास झाला संवसार ॥२॥ दुःख आम्हां नाहीं चिंता । हरिचे दास म्हणवितां ॥३॥ तुका म्हणे देवा । ऐसीं झालों करितां सेवा ॥४॥

२७८३. आतां सांडूं तरी हातीं ना पदरीं । सखीं सहोदरीं मोकलिलों ॥१॥ जनाचारामध्यें उडाला पातेरा । झालों निलाजिरा म्हणवूनि ॥२॥ कोणाचिया दारा जावेनासें झालें । म्यांच विटंबिलें आपणासी ॥३॥ कोण झाला माझे बुद्धीसी संचार । नाहीं कोठें थार ऐसे झालें ॥४॥ तुका म्हणे तुज भक्त झाले फार । म्हणोनियां थार नाहा येथें ॥५॥

२७८४. जेथें जातो तेथें पडतो मतोळा । न देखिजे डोळां लाभ कांहीं ॥१॥ कपाळेंचि रेखा असती उत्तम । तरि कां हा श्रम पावतों मी ॥२॥ नव्हेचि तुम्हांस माझा अंगीकार । थीता संवसार अंतरला ॥३॥ भोग तंव झाला खरा भोगावा तो । भांडवल नेतो आयुष्य काळ ॥४॥ कोठें तुझी कीर्ति आइकिली देवा । मुकतों कां जीवा तुका म्हणे ॥५॥

२७८५. कां जी आम्हां होतें दोषाचें दर्शन । तुज समर्पून देहभाव ॥१॥ पांडुरंगा कृपाळुवा दयावंता । धरसील सत्ता सकळही ॥२॥ कां जी आम्हांवरि आणिकांची सत्ता । तुम्हांसी असतां जवळिके ॥३॥ तुका म्हणे पायीं केलें निवेदन । उचित तें दान करीं सत्ता ॥४॥

२७८६. निंदावें हें जग । ऐसा भागा आला भाग ॥१॥ होतें तैसें आलें फळ । गेलें निवडुनि सकळ ॥२॥ दुसऱ्याच्या मता । मिळेनासें झालें चित्ता ॥३॥ तुका झाला सांडा । विटंबिती पोरें रांडा ॥४॥

२७८७. माझे माथां तुझा हात । तुझे पायीं माझें चित्त ॥१॥ ऐसी पडियेली गांठी । शरीरसंबंधाची मिठी ॥२॥ येरयेरांपाशीं । सांपडोन गेलों ऐसी ॥३॥ तुका म्हणे सेवा । माझी कृपा तुझी देवा ॥४॥

२७८८. सत्य त्यागाचि समान । नलगे वेचावें वचन ॥१॥ नारायणा ऐसे दास । येरयेरांचीच आस ॥२॥ मळ नाहीं चित्ता । तेथें देवाचीच सत्ता ॥३॥ तुका म्हणे जाण ।

तेंच भल्याचें वचन ॥४॥

२७८९. माझिये बुद्धीचा खुंटला उपाय । करिसील काय पाहणें तें ॥१॥ सूत्रधारी तूं हें सकळ चाळिता । कासया अनंता भार वाहों ॥२॥ वाहिले संकल्प न पवती सिद्धी । येऊं देहबुद्धीवरि नये ॥३॥ तुका म्हणे दुःखी करिती तरंग । चिंतूं पांडुरंग आवरूनी ॥४॥

२७९०. देखिलें तें धरिन मनें । समाधानें राहेन ॥१॥ भाव माझी सांठवण । जगजीवन कळावया ॥२॥ वोळवीन एकसरें । उत्तरें या करुणेच्या ॥३॥ तुका म्हणे न योन रूपा । काय बापा करिसील ॥४॥

२७९१. वांयां जाय ऐसा । आतां उगवावा फांसा ॥१॥ माझें परिसावें गाऱ्हाणें । सुखदुःखांचीं वचनें ॥२॥ हाचि आम्हां ठाव । पायीं निरोपाया भाव ॥३॥ तुका म्हणे जार । तुझा तुज देवा भार ॥४॥

२७९२. खादलेंच खावें वाटे । भेटलें भेटे आवडी ॥१॥ वीट नाहीं पांडुरंगीं । वाढे अंगीं आर्त तें ॥२॥ हृदयाची हांव पुरे । परि हें उरे चिंतन ॥३॥ तुका म्हणे पोट भरे । परि ते उरे भूक पुढें ॥४॥

२७९३. सत्य आठवितां देव । जातो भेव पळोनि ॥१॥ नलगे काहीं करणें चिंता । धरीं सत्ता सर्व तो ॥२॥ भावें भाव राहे पायीं । देव तै सन्निध ॥३॥ तुका म्हणे कृष्णनामें । शीतळ प्रेमें सर्वांसी ॥४॥

२७९४. ब्रीद ज्याचें जगदानी । तोचि मनीं स्मरावा ॥१॥ सम पाय कर कटी । उभा तटीं भींवरेच्या ॥२॥ पाहिलिया वेध लावी । बैसे जीवीं जडोनि ॥३॥ तुका म्हणे भक्तिकाजा । धांवे लाजा लवलाहें ॥४॥

२७९५. माझिया मनाची बैसली आवडी । अवसान घडी एकी नेघे ॥१॥ पाय चित्तीं रूप डोळांच बैसलें । चिंतनें गोविलें मुख सदा ॥२॥ अवघियांचा झाला विसरु हा मार्गे । वेध हा श्रीरंगें लावियेला ॥३॥ तुका म्हणे कानीं आइकिली मात । तोचि झाला घात जीवपणा ॥४॥

२७९६. याची कोठें लागली चट । बहु तंट झालेंसे ॥१॥ देवपिसी देवपिसी । मज ऐसी जग म्हणे ॥२॥ एकांताचें बाहेर आलें । लपविलें झांकेना ॥३॥ तुका म्हणे याचे भेटी । झाली तुटी आपल्यासी ॥४॥

२७९७. दीन आणि दुर्बळांसीं । सुखरासी हरिकथा ॥१॥ तारूं भवसागरींचें । उंचनीच अधिकारी ॥२॥ चरित्र तें उच्चारावें । केलें देवें गोकुळीं ॥३॥ तुका म्हणे आवडी धरीं । कृपा करी म्हणऊनी ॥४॥

२७९८. संतोषे माउली आरुषा वचनीं । वोरसोनि स्तनीं लावी बाळा ॥१॥ तैसें प्रेमळाचें

अवघेंचि गोड । पुरवितो कोड पांडुरंग ॥२॥ सेवा करी साहे निष्ठुर उत्तरें । त्याचे वाहे बरें तेंची मनीं ॥३॥ तुका म्हणे इच्छावसे खेळे खेळ । चिंता ते सकळ कांहीं नेणें ॥४॥

२७९९. विनविजे ऐसे कांहीं । उरले नाहीं यावरि ॥१॥ आतां असो पंढरीनाथा । पायीं माथां तुमचिये ॥२॥ माग सारियेली युक्ती । कांहीं होती जवळी ते ॥३॥ निराशेची न करी आस । तुका दास माघारी ॥४॥

२८००. आतां येथें झाली जीवा संवसाटी । होतें तैसें पोटीं फळ आलें ॥१॥ आतां धरिले ते न सोडी चरण । सांपडलें धन निजठेवा ॥२॥ आतां हा आळस असो परता दुरी । नेदावी ते उरी उरों कांहीं ॥३॥ आतां याचा मज न व्हावा विसर । भरोनी अंतर राहो रूप ॥४॥ आतां लोकलाज नयो येथें आड । बहु झाला गोड ब्रह्मरस ॥५॥ तुका म्हणे आतां जन्म हा सफळ । अंतरीं गोपाळ स्थिरावला ॥६॥

२८०१. अनंतां जीवांचीं तोडिलीं बंधनें । मज काळें येणें कृपा कीजे ॥१॥ अनंत पवाडे तुझे विश्वंभरा । भक्त करुणाकरा नारायणा ॥२॥ अंतरींचें कळों देईं गुह्य गुज । अंतरींचें बीज राखेन मी ॥३॥ समदृष्टी तुझीं पाहीन पाउलें । धरीन संचलें हृदयांत ॥४॥ तेणें या चित्ताची राहील तळमळ । होतील शीतळ सकळ गात्रें ॥५॥ तुका म्हणे शांति करील प्रवेश । मग नव्हे नाश अखंड तो ॥६॥

२८०२. पराधीन माझें करूनियां जीणें । सांडी काय गुणें केली देवा ॥१॥ उदार हे कीर्ति असे जगामाजी । कां तें ऐसें आजि पालटिलें ॥२॥ आळवितों परी न पुरेचि रीघ । उचित तो त्याग नाहीं तुम्हां ॥३॥ तुका म्हणे कां बा मुळींच व्यालासी । ऐसें कां नेणसी पांडुरंगा ॥४॥

२८०३. नेणपणें केला नाहीं हा बोभाट । आतां आली वाट कळों खरी ॥१॥ आतां बहु शीघ्र यावें लवकरी । वाट पाहें हरी भेटी देईं ॥२॥ समर्थाच्या बाळा करुणेचें भाषण । तरी त्याची कोण नांदणूक ॥३॥ तुका म्हणे बहु बोलिले बडिवार । पडिलें अंतर लौकिकीं तें ॥४॥

२८०४. जें जें केलें तें तें साहे । कैसे पाहें भाविक ॥१॥ ओंवाळूनि माझी काया । सांडिली यावरूनि ॥२॥ काय होय नव्हे करूं । नेण धरूं सत्ता ते ॥३॥ तुका म्हणे कटीं कर । उभें धीर धरूनि ॥४॥

२८०५. नाहीं मज कृपा केली पांडुरंगें । संतांचिया संगें पोट भरीं ॥१॥ चतुराचे सभे पंडित कुशळ । मी काय दुर्बळ विष्णुदास ॥२॥ तुका म्हणे नेणें करूं समाधान । धरिले चरण विठोबाचे ॥३॥

२८०६. तुम्ही माझा देवा करा अंगीकार । हा नाहीं विचार मजपाशीं ॥१॥ आतां दोहीं पक्षीं लागलें लांछन । देवभक्तपण लाजविलें ॥२॥ एकांतीं एकलें न राहे निश्चळ । न बैसे

चपळ मन ठायीं ॥३॥ पायीं महत्त्वाची पडिला शृंखळा । बांधविला गळा स्नेहा हातीं ॥४॥ शरीर सोकलें देखिलिया सुखा । कदान्न हें मुखा रुचेचिना ॥५॥ तुका म्हणे झाला अवगुणांचा थारा । वाढली हे निद्रा आळस बहु ॥६॥

२८०७. बोलिलिया गुणीं नाहीं पाविजेत । देवा नाहीं होत हित तेथें ॥१॥ कवतुक तुझें नकळे यापरी । घेसील तें शिरीं काय नव्हे ॥२॥ नाहीं मिळों येत संतांचिया मता । पुराणीं पाहतां अघटित ॥३॥ तुका म्हणे पायीं निरोपिला भाव । न्याल तैसा जावो सिद्धी देवा ॥४॥

२८०८. हा तो नव्हता दीन । टाळायाचा ऐसा क्षण ॥१॥ कां जी नेणों राखा हात । कैसें देखावें रडत ॥२॥ दावूनियां आस । दूर पळवितां काशास ॥३॥ तुका म्हणे धांव । येतां न पुरेचि हांव ॥४॥

२८०९. लावुनियां गोठी । चुकवूं आदरिली दिठी । देउनियां मिठी । पळे महिया माथुले ॥१॥ पुढें तेचि करी आड । तिचा लोभ तिसी नाड । उरवी चरफड । हात गोऊनि पळावें ॥२॥ आधीं काकुलती । मोहो घालावा पुढती । तोंडीं पडे माती । फिरतां मग कैंचा तो ॥३॥ तुका म्हणे देवा । यासी रडवी याचा हेवा । भावें कां हे सेवा । सुखें तुम्हां नार्पिती ॥४॥

२८१०. आर्तभूतां द्यावें दान । खरें पुण्य त्या नांवें ॥१॥ होणार तें सुखें घडो । लाभ जोडो महाबुद्धि ॥२॥ सत्य संकल्पाचे साटीं । उजळा पोटीं रविबिंब ॥३॥ तुका म्हणे मनीं वाव । शुद्ध भाव राखावा ॥४॥

२८११. कवतुकवाणी बोलतसें लाडें । आरुष वांकडें करूनि मुख ॥१॥ दुजेपणीं भाव नाहीं हे आशंका । जननीबाळकामध्यें भेद ॥२॥ सलगी दुरूनि जवळी पाचारूं । धांवोनियां करूं अंगसंग ॥३॥ धरूनि पालव मागतों भातुकें । आवडीचें निकें प्रेमसुख ॥४॥ तुका म्हणे तुज आमचीच गोडी । ऐसी हे आवडी कळों आली ॥५॥

२८१२. ऐक पांडुरंगा वचन माझें एक । झालों मी सेवक दास तुझा ॥१॥ कळे तैसा आतां करावा उद्धार । खुंटला विचार माझा पुढें ॥२॥ दंभ मान माझा करूं पाहे घात । झालियाही थीत कारणाचा ॥३॥ हीन बुद्धि माझी अधम हे याती । अहंकार चित्तीं वसों पाहे ॥४॥ तुका म्हणे मज विघडतां क्षण । नलगे जतन करीं देवा ॥५॥

२८१३. जेणें माझें चित्त राहे तुझ्या पायीं । अखंड तें देईं प्रेम सुख ॥१॥ देहभाव राखा दीन करूनियां । जनाचारी वांयां जाय तैसा ॥२॥ द्रव्य दारा नको मानाची आवडी । कवणेविशीं गोडी प्रपंचाची ॥३॥ तुझें नाम माझें धरूनियां चित्त । एकांत लोकांत सदा राहो ॥४॥ तुका म्हणे तुझे जडोनियां पायीं । झालों उतराई पांडुरंगा ॥५॥

२८१४. काय सांगो आतां संतांचे उपकार । मज निरंतर जागविती ॥१॥ काय द्यावें त्यासीं

व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥२॥ सहज बोलणें हित उपदेश । करूनि सायास शिकविती ॥३॥ तुका म्हणे वत्स धेनुवेचे चित्तीं । तैसे मज येती सांभाळीत ॥४॥

२८१५. आपण चाळक बुद्धीच्या संचारा । आम्हांसी वेव्हारा पात्र केलें ॥१॥ काय झालें तरी नेघा तुम्ही भार । आणीक कोणां थोर म्हणों सांगा ॥२॥ पंचभूतें तव चर्माचिया मोटा । येथें खरा खोटा कोण भाव ॥३॥ तुका म्हणे नाहीं बोलावया जागा । कां देवा वाउगा श्रम करूं ॥४॥

२८१६. एका एक वर्मे लावूनिया अंगीं । ठेवितों प्रसंगीं सांभाळीत ॥१॥ नेघावा जी आम्हीं वाव बहु फार । धरूनि अंतर ठायाठाव ॥२॥ वेव्हारें आलें तें समानचि होतें । बळ नाहीं येथें चालों येत ॥३॥ तुका म्हणे आतां निवाड्याच साटीं । संसारें तुटी करुनि ठेलों ॥४॥

२८१७. आतां येथें खरें । नये फिरतां माघारें ॥१॥ होय तैसी हो आबाळी । देहनिमित्य या बळी ॥२॥ तुम्हांसवें गांठीं । देवा जीवाचिये साटीं ॥३॥ तुका म्हणे लंड । करूं चौघांमध्यें खंड ॥४॥

२८१८. कां हे वाढवितां देवा । मज घरींच समजावा । केवढा हो गोवा । फार केलें थोड्याचें ॥१॥ ठेवीन पायांवरी डोई । यासी तुमचें वेचे काई । झालों उतराई । जाणा एकएकांचे ॥२॥ निवाड आपणियांपाशीं । असोन कां व्हावें अपेसी । होती गांठी तैसी । सोडूनियां ठेविली ॥३॥ तुका म्हणे गोड । होतें झालिया निवाड । दर्शनेंही चाड । आवडीच वाढेल ॥४॥

२८१९. नव्हों सभाधीट । समोर बोलायाचें नीट । एकलीं एकट । दुजें नाहीं देखिलें ॥१॥ आतां अवघें तुम्ही जाणां । तुमचें माझें नारायणा । येईल करुणा । तेचि पहा तुम्हांसी ॥२॥ ताळ नाहीं माझे बुद्धी । धरली न धरवे शुद्धि । आतां बळ कधीं । कोण्या जन्में निवाड ॥३॥ आतां शेवटीचें । उत्तर हेंचि साचें । शरण आलें त्याचें । तुका म्हणे सांभाळा ॥४॥

२८२०. ऐसा तंव मोळा । तुमचा नसेल गोपाळा ॥१॥ मागत्याची टाळाटाळी । झिंज्या ओढोनि कपाळीं ॥२॥ नसेल ना नवें । ऐसें धरियेलें देवें ॥३॥ तुका म्हणे झाला । उशीर नाहीं तो विठ्ठला ॥४॥

२८२१. माझ्या कपाळाच्या गुणें । किंवा सरलेंसें नेणें ॥१॥ नये वचन बाहेरी । उभें तिष्ठतसें दारीं ॥२॥ काय सांगा यास वेचे । रितें आरंभीं ठायींचे ॥३॥ तुका म्हणे किती । भीड धरावी पुढती ॥४॥

२८२२. कांहीं एक तरी असावा आधार । कासयानें धीर उपजावा ॥१॥ म्हणविल्यासाठीं कैसें पडे रुजू । धणीं नाहीं उजू सन्मुख तो ॥२॥ वेचल्या दिसांचा कोणावरी लेखा । घालावा हा सुखासुखें आम्ही ॥३॥ नाहीं मनोगत तोंवरि हे देवा । तुका म्हणे सेवा नेघेजेतो ॥४॥

२८२३. मनाचिये साक्षी झाली सांगों मात । सकळ वृत्तांत आपला तो ॥१॥ तुम्हां परामृष घेतां सत्ताबळें । धरितां निराळें कैसीं वाचों ॥२॥ मी माझें सांडून यावया पसारा । आणीक दातारा काय काज ॥३॥ तुका म्हणे आम्ही तुजविण एका । निढळ लौकिका माजी असों ॥४॥

२८२४. उरलें तें भक्तिसुख । डोळां मुख पाहावें ॥१॥ अंतरींचें कां हो नेणां । नारायणा माझिया ॥२॥ पुरवा तैसी केली आळी । बळी जगदानिया ॥३॥ हातीं घेउनि चोरां भातें । दावा रितें बाळका ॥४॥ साजत हें थोरपण । नाहीं दीनवत्सला ॥५॥ शाहणें तरी लाड दावी । बाळ जेवीं मातेसी ॥६॥ तुका म्हणे पांडुरंगा । ऐसें पैं गा आहे हें ॥७॥

२८२५. तरी भलें वांयां गेलों । जन्मा आलों मागुता ॥१॥ म्हणऊनि ठेलों दास । सावकास निर्भय ॥२॥ उणें पुरें काय माझें । त्याचें ओझें तुम्हांसी ॥३॥ सांभाळावें तें म्यां काई । अवो आई विठ्ठले ॥४॥ भोग जया जाइन स्थळा । तुज गोपाळा विसरेंना ॥५॥ आपलें म्यां एकसरें । करुनि बरें घेतलें ॥६॥ तुका म्हणे नारायणा । आतां जाणा आपुलें ॥७॥

२८२६. घालूनी लोळणी पडलों अंगणीं । सिंचा सिंचवणी तीर्थवरी ॥१॥ वोल्हावेल तनु होईल शीतळ । झाली हळहळ बहुतापें ॥२॥ पावेन या ठाया कईं झालें होतें । आलों अवचितें उष्ट्यावरि ॥३॥ तुका म्हणे कोणी जाणवा राउळीं । येईल जवळी पांडुरंग ॥४॥

२८२७. धरूनि हें आलों जीवीं । भेटी व्हावी विठोसी ॥१॥ संकल्प तो नाहीं दुजा । महाराजाविण तो ॥२॥ पायांवरि ठेविन भाळ । येणें सकळ पावलों ॥३॥ तुका म्हणे डोळेभरी । पाहिन हरी श्रीमुख ॥४॥

२८२८. तुम्हां उद्धरणें फार । मज दुसरी नाहीं थार ॥१॥ आतां जैसें तैसें सोसा । काय करणें हृषीकेशा ॥२॥ बरें न दिसेल ओळी । एका अन्न एका गाळी ॥३॥ लावितां आभार । तुका विसरलेती फार ॥४॥

२८२९. न कळे जी भक्ती काय करूं सेवा । संकोचोनि देवा राहिलोंसें ॥१॥ जोडोनियां कर राहिलों निवांत । पायांपाशीं चित्त ठेवूनियां ॥२॥ दिशाभुली करीं स्थळीं प्रदक्षणा । भ्रमें नारायणा कष्टविलें ॥३॥ तुका म्हणे झालों आज्ञेचा पाळक । जीवनासी एक ठाव केला ॥४॥

२८३०. एकविध वृत्ति न राहे अंतरीं । स्मरणींच हरी विस्मृति हे ॥१॥ कैसा हा नवलाव वाटतो अनुभवें । मज माझ्या जीवें साक्षित्वेंसी ॥२॥ न राहे निश्चळ जागवितां मना । किती क्षणक्षणा सावरावें ॥३॥ तुका म्हणे बहु केले वेवसाव । तेणें रंगें जीव रंगलासे ॥४॥

२८३१. आतां सोडवणें न या नारायणा । तरि मी वांचेना काळा हातीं ॥१॥ ऐसें सांगोनियां झालों उतराई । आणीक तें काई माझे हातीं ॥२॥ केलियाचें माप न ये सेवटासी । करितील नासि अंतराय ॥३॥ तुका म्हणे भय वाटतसे जीवा । धांवणिया धांवा लवकरी ॥४॥

२८३२. सत्य माप वाढे । गाबाळाची चाली खोडे ॥१॥ उतरे तें न कळे कसीं । विखरोन सर्वदेशीं ॥२॥ घरामध्यें राजा । नोहे व्हावी पट्टपूजा ॥३॥ तुका म्हणे साचें । रूप तें दर्पणींचें ॥४॥

२८३३. नाहीं खंड झाला । माझा तुमचा विठ्ठला ॥१॥ कैसें कैसें हो दुश्चित । आहे चौघांपाशीं नीत ॥२॥ मुळींचें लिहिलें । मज आतां सांपडलें ॥३॥ तुका म्हणे मज । नलगे बोलणें सहज ॥४॥

२८३४. हेचि वादकाची कळा । नाहीं येऊ देत बळा ॥१॥ धीर करावा करावा । तरी तो आहे आम्हां देवा ॥२॥ रिघावें पोटांत । पायां पडोन घ्यावा अंत ॥३॥ तुका म्हणे वरी । गोडा आणावा उत्तरीं ॥४॥

२८३५. एक परि बहिरे बरे । परि तीं ढोरें ग्यानगंडें ॥१॥ कपाळासी लागली आगी । अभागी कां जीतसे ॥२॥ एक परि बरें वेडें । तर्की कुडें जळो तें ॥३॥ तुका म्हणे खातडवासी । अमृतासी नोळखे ॥४॥

२८३६. खेळों मनासवें जीवाच्या संवादें । कौतुकें विनोदें निरंजनीं ॥१॥ पचीं पडिलें तें रुचे वेळोवेळां । होतसे डोहळा आवडीसी ॥२॥ एकांताचें सुख जडलें जिव्हारीं । वीट परिचारीं बरा आला ॥३॥ जगा ऐसी बुद्धि नव्हे आतां कदा । लंपट गोविंदा झालों पायीं ॥४॥ आणिक ते चिंता नलगे करावी । नित्य नित्य नवी आवडी हे ॥५॥ तुका म्हणे धडा राहिला पडोन । पांडुरंगीं मन विसांवलें ॥६॥

२८३७. झाली झडपणी खडतर देवा । संचरली आतां निघों नये ॥१॥ मज उपचार झणीं आतां करा । न साहे दुसरा भार कांहीं ॥२॥ नेऊनियां घाला चंद्रभागे तिरीं । जीवा नाहीं उरी कांहीं आतां ॥३॥ तुका म्हणे कळों आलें वर्तमान । माझें तों वचन आच्छादलें ॥४॥

२८३८. अंगीं देवी खेळे । कां रे तुम्हांसी न कळे । कोणाचे हे चाळे । सुख दुःख न मानितां ॥१॥ मी तों आतां येथें नाहीं । ओळखी वचनाच्या ठायीं । पालटाच घेईं । भाव खरा लोपे ना ॥२॥ आपुलाले तुम्ही पुसा । सोवा पेव्याच सरिसा । स्थिरावल्या कैसा । काय जाणों विचार ॥३॥ तुका म्हणे लाभकाळ । तेथें नसावें शीतळ । मग तैशी वेळ । कोठें जाते सांपडो ॥४॥

२८३९. उचिताचा काळ । साधावया युक्तिबळ । आपलें सकळ । ते प्रसंगीं पाहिजे ॥१॥ नेम नाहीं लाभ हानि । अवचित घडीती दोनी । विचारूनि मनीं । पाहिजें तें प्रयोजावें ॥२॥ जाळा जाळा काळें । करपों नेदावें आगळ । जेवितां वेगळे । ज्याचे त्याचें तेथें शोभे ॥३॥ पाळी नांगर पाभारीं । तन निवडूनि सोंकरी । तुका म्हणे घरीं । सेज जमा सेवटीं ॥४॥

२८४०. पडिलिया ताळा । मग अवघा निर्वाळा । तेथें कोणी बळा । नाहीं येत कोणासी ॥१॥ जोडिलें तें लागे हातीं । आप आपलीं निश्चिंती । हर्ष आणि खंती । तेथें दोनी नासली ॥१॥

सहज सरलिया कारण । मग एकला आपण । दिसे तरी भिन्न । वचनाचा प्रसंग ॥३॥ करूनि झाडा पाडा । तुका वेगळा लिगाडा । निश्चिंतीच्या गोडा । गोष्टी म्हूण लागती ॥४॥

२८४१. जो वितो तो माझा पिता । उखता तो उखत्याचा ॥१॥ जनार्दनीं सरती कर्मे । बाधा भ्रमे अन्यत्र ॥२॥ अपसव्य सव्यामधीं । ऐसी शुद्धी न धरितां ॥३॥ तुका म्हणे खांद्या पानें । सिंचितां भिन्न कोरडीं ॥४॥

२८४२. माउलीची चाली लेंकराचे ओढी । तयालागीं काढी प्राण प्रीती ॥१॥ ऐसी बळिवंत आवडी जी देवा । संतमहानुभावा विनवितों ॥२॥ मोहें मोहियेलें सर्वकाळ चित्त । विसरु तो घेत नाहीं क्षण ॥३॥ तुका म्हणे दिला प्रेमाचा वोरस । सांभाळिले दास आपुले ते ॥४॥

२८४३. केवढा तो अहंकार । माझा तुम्हां नव्हे दूर ॥१॥ आतां कोण पडे पायां । तुमच्या अहो पंढरिराया ॥२॥ कां जी कृपेनें कृपण । वेचतसे ऐसें धन ॥३॥ तुका म्हणे देवें । दुजियाचें पोतें न्यावें ॥४॥

२८४४. अपराधी म्हणोन येतों काकुलती । नाहीं तरी होती काय चाड ॥१॥ येईल तारूं तरी तारी जो जी देवा । नाहीं तरी सेवा घ्यावी भार ॥२॥ कासया मी आतां वंचूं हें शरीर । आहें बारगीर जायजणें ॥३॥ तुका म्हणे मन करूनि मोकळें । आहें साळेंढाळें उदार तें ॥४॥

२८४५. माझे तों फुकाचे काय वेचे कष्ट । नव्हे क्रियानष्ट तुम्हां ऐसा ॥१॥ कांहींच न वंचीं आजिच्या प्रसंगीं । सकळाही अंगीं करीन पूजा ॥२॥ द्यावें तुम्हीं कांहीं हे तों नाहीं आस । असों या उदास देहभावें ॥३॥ तुका म्हणे माझी मावळली खंती । समाधान चित्तीं सर्वकाळ ॥४॥

२८४६. स्वामीचिया सत्ता । आधीं वर्मे येती हाता । पुढती विशेषता । लाभें लाभ आगळा ॥१॥ करीं कवतुकाचे बोल । परि जिव्हाळ्याची ओल । आवडे रसाळ । मायबापा लाडाचें ॥२॥ मन मेळविलें मना । नाहीं अभावी शहाणा । अंतरींच्या खुणा । वरि दिल्या उमटोनि ॥३॥ पराश्रमें काळा । अवघ्या जागविल्या वेळा । देवासी निराळा । तुका क्षण न सोडी ॥४॥

२८४७. एके ठायीं अन्नपाणी । ग्रासोग्रासीं चिंतनीं ॥१॥ वेळोवेळां जागवितों । दुजें येइल म्हूण भीतों ॥२॥ नाहीं गुंतत उपचारीं । मानदंभाचे वेव्हारीं ॥३॥ तुका झालासे शहाणा । आड लपे नारायणा ॥४॥

२८४८. वैरागरापाशीं रत्नाचिया खाणी । हेचि घ्यावी धणी फावेल तों ॥१॥ येथें नाहीं तर्कवितर्काची चाड । होतसे निवाड खऱ्याखोट्या ॥२॥ उगाच सारावा वाढिला तो ठाव । वाढितीया भाव कळतसे ॥३॥ उगाच सारावा वाढिला तो ठाव । वाढितिया भाव कळतसे ॥३॥ तुका म्हणे नव्हे टांचणीचें पाणी । येथें झरवणी जैशा तैसें ॥४॥

२८४९. समर्थ या नांवें दीनांचा कृपाळ । हें तंव सकळ स्वामीअंगीं ॥१॥ मज काय लागे

करणें विनवणी । विदित चरणीं सकळ आहे ॥२॥ दयासिंधु तुम्हां भांडवल दया । सिंचावें आतां या कृपामृतें ॥३॥ तुका म्हणे अहो पंढरीनिवासे । बहु जीव आसे लागलासे ॥४॥

२८५०. लेखिलें कवित्व माझे सहज बोल । न लगेचि ओल जिव्हाळ्याची ॥१॥ नयेचि उत्तर कांहीं परतोनि । झालों नारायणें न सरतें ॥२॥ लाजिरवाणी कां वदली हे वाचा । नव्हेचि ठायींचा मननशीळ ॥३॥ तुका म्हणे फळ नयेचि सायासा । पंढरीनिवासा काय झालें ॥४॥

२८५१. येणें झाला तुझ्या पोतडीचा झाडा । केलासी उघडा पांडुरंगा ॥१॥ भरूनियां घरीं राहिलों वाखती । आपुली निश्चिंती आपुल्यापें ॥२॥ आतां काय उरी उरली ते सांगा । आणिलेति जगाचिया साक्षी ॥३॥ तुका म्हणे कोठें पाहों जासी आतां । माझी झाली सत्ता तुम्हांवरी ॥४॥

२८५२. तुमच्या पाळणा ओढतसे मन । गेलों विसरोन आपणासी ॥१॥ लागेल पालटे फेडावें उसणें । येणेंचि प्रमाणें पांडुरंगा ॥२॥ तुमचे आवडी संबंधाचा त्याग । घेतलासे लाग जगनिंदा ॥३॥ तुका म्हणे जैसा माझा जीव ओढे । तैसेंचि तिकडे पाहिजेल ॥४॥

२८५३. नाहीं मज कोणी उरला दुर्जन । मायबापाविण ब्रह्मांडांत ॥१॥ कासया जिकीर करणें येविसीं । भयाची मानसीं चिंता खंती ॥२॥ विश्वंभराचिये लागलों सांभाळीं । सत्तेनें ती चाली आपुलिये ॥३॥ तुका म्हणे माझें पाळण पोषण । करितां आपण पांडुरंगा ॥४॥

२८५४. मज कांहीं सीण न व्हावा यासाठीं । कृपा तुम्हां पोटीं उपजली ॥१॥ होतें तैसें केलें आपलें उचित । शिकविलें हित बहु बरें ॥२॥ आम्हीं न मनावी कोणाची आशंका । तुम्हां भय लोकां आहे मनीं ॥३॥ तुका म्हणे आतां संचिताचा ठेवा । वोढवला घ्यावा जैसा तैसा ॥४॥

२८५५. कोणाचें चिंतन करूं ऐशा काळें । पायांचिया बळें कंठीतसे ॥१॥ पाहातसें वाट येईंगा विठ्ठला । मज कां हा केला परदेश ॥२॥ बहुतांचे सत्ते झालों कासावीस । जाय रात्रंदिवस वैरियांचा ॥३॥ तुका म्हणे बैसे मनाचिये मुळीं । तरीच हीं जाळीं उगवती ॥४॥

२८५६. कां जी तुम्ही ऐसें नव्हा कृपावंत । निवे माझें चित्त ठायींच्या ठायीं ॥१॥ कांहीं शम नये विषम अंतरा । शांतीचा तो बरा ऐसा योग ॥२॥ दुःखी होतों पंचभूतांच्या विकारें । जडत्व दातारें दाखवीं तीं ॥३॥ तुका म्हणे मोडा अहंकाराची मान । धरितों चरण म्हणऊनि ॥४॥

२८५७. मागत्याची कोठें घडते निरास । लेंकरा उदास नाहीं होत ॥१॥ कासया मी होऊं उतावीळ जीवीं । जाणता गोसावी सर्व आहे ॥२॥ झाला तरी वेळ कवतुकासाठीं । निर्दया तों पोटीं उपजेना ॥३॥ तुका म्हणे त्यासी ठाउकें उचित । होईल संकेत नेमियेला ॥४॥

२८५८. आरुषा वचनीं मातेची आवडी । म्हणऊनि तांतडी घेत नाहीं ॥१॥ काय होइल माझें मांडिलें कवतुक । आदराची भूक रडारोवी ॥२॥ लपोनियां करी चुकुर माऊली । नाहीं होत केली निष्ठा सांडी ॥३॥ तुका म्हणे करी पारखीं वचनें । भेवउनि तान्हें आळवावें ॥४॥

२८५९. प्रीतीच्या भांडणा नाहीं शिरपाव। वचनाचेचि भाव निष्ठुरता॥१॥ जीणें तरि एका जीवें उभयता। पुत्राचिया पिता दुखवे दुःखें॥२॥ काय जाणे तुटों मायेचें लिगाड। विषम तें आड उरों नेणें॥३॥ तुका म्हणे मज करुणा उत्तरें। करितां विश्वंभरें पाविजेल॥४॥

२८६०. नको घालूं झांसां। मना उपाधिवोळसा॥१॥ जे जे वाहावे संकल्प। पुण्य तरी तेंचि पाप॥२॥ उपजतो भेव। होतो कासावीस जीव॥३॥ तुका म्हणे पाहों। होइल तें निवांत साहों॥४॥

२८६१. बीजीं फळाचा भरंवसा। जतन सिंचनासरिसा। चालविलिया आशा। काकुलती ते नाड॥१॥ हा तों गढसंदीचा ठाव। पिके पिकविला भाव। संकोचोनि जीव। दशा केली जतन॥२॥ माती घाली धनावरी। रांडा रोटा वरीवरी। सुखाचे सेजारीं। दुःख भ्रमें भोगीतसे॥३॥ तुका म्हणे दिशाभुली। झाल्या उफराटी चाली। निवाड्याची बोली। अनुभवें साक्षीसी॥४॥

२८६२. काय उरली ते करूं विनवणी। वेंचलों वचनीं पांडुरंगा॥१॥ अव्हेरलों आतां कैचें नामरूप। आदर निरोप तरि तो नाहीं॥२॥ माझा मायबाप ये गेलों सलगी। तों हे तुम्ही जगीं सोयरिका॥३॥ तुका म्हणे आतां जोडोनियां हात। करी दंडवत ठायींचा ठायीं॥४॥

२८६३. आवडी धरूनि करूं गेलों लाड। भक्ति प्रेमकोड न पुरेचि॥१॥ म्हणऊनि जीव ठेला आसावोनि। खेद होतो मनीं बहुसाल॥२॥ वेठीऐसें वाटे निर्फळ कारण। शीतळ होऊन खोडावलों॥३॥ तुका म्हणे सरतें नव्हेंचि पायांपें। बळ केलें पापें नव्हे भेटी॥४॥

२८६४. प्रीतीचा तो कळवळा। जिव्हाळाचि वेगळा॥१॥ बहु नेदी रडों माता। दुश्चित होतां धीर नव्हे॥२॥ वरी वरी तोंडापुरतें। मोहोरिते कळतसे॥३। जाणोनियां नेणता तुका। नव्हे लोकांसारिखा॥४॥

२८६५. हा गे आतां हाचि लाहो। माझा अहो विठ्ठला॥१॥ दंडवत दंडवत। वेगळी मात न बोलें॥२॥ वेगळाल्या कोठें भागें। लाग लागें लावावा॥३॥ तुका म्हणे केल्या जमा। वृत्तिक्षमा भाजूनि॥४॥

२८६६. तुम्हांसी न कळे सांगा काय एक। कासया संकल्प वागवूं मी॥१॥ आहे तेथें सत्ता ठेविलों स्थापूनि। प्रमाणेंचि वाणी वदे आज्ञा॥२॥ कृपा झाली मग नलगे अंगसंग। निजध्यासें रंग चढताहे॥३॥ तुका म्हणे मागें बोलिलों तें वाव। आतां हाचि भाव दृढ झाला॥४॥

२८६७. आवडी न पुरे मायबापापासीं। घडों का येविसीं सकईल॥१॥ होईल नेमिलें आपुलिया काळें। आलीयाचें बळें आग्रहो उरे॥२॥ जाणविलें तेथें थोडें एक वेळा। सकळ ही कळा सर्वोत्तमीं॥३॥ तुका म्हणे निवेदिलें गुह्य गुज। आतां तुझी तुज सर्व चिंता॥४॥

२८६८. झालें आतां साठे। कासयाचें लहान मोठे॥१॥ एक एका पडिलों हातीं। जाली

तेव्हांची निश्चिंती ॥२॥ नाहीं फिरों येत मागें । झालें साक्षीचिया अंगें ॥३॥ तुका म्हणे देवा । आतां येथें नाहीं हेवा ॥४॥

२८६९. वोखटा तरी मी विटलों देहासी । पुरे आतां ऐसी जोडी पुन्हां ॥१॥ किती मरमर सोसावी पुढती । राहिलों संगती विठोबाचे ॥२॥ आतां कोण याचा करील आदर । जावो कलेवर विटंबोनी ॥३॥ तुका म्हणे आतां सांडी तेचि सांडी । कोण फिरे लंडी यासी मागें ॥४॥

२८७०. हेंही ऐसें तेंही तैसें । उभय पिसें अविचार ॥१॥ अभिमानाचे ठेलाठेलीं । मधीं झालीं हिंपुटी ॥२॥ धीरा शांती ठाव नुरे । हाचि उरे आबाळ्या ॥३॥ कौतुक हें पाहे तुका । कढतां लोकां अधणीं ॥४॥

२८७१. हित जाणे चित्त । कळों येतसे उचित ॥१॥ परिहार ते संपादणी । सत्य कारणा कारणीं ॥२॥ वरदळ तें नुतरे कसीं । आगीमध्यें तेथें रसीं ॥३॥ तुका म्हणे करुनी खरें । ठेवितां तें पुढें बरें ॥४॥

२८७२. देवें दिला देह भजना गोमटा । तो या झाला फाटा बाधिकेचा ॥१॥ ताठोनियां मान राहिली वरती । अहंकारा हातीं लवों नेदी ॥२॥ दास म्हणावया न वळे रसना । सइर वचना बा सगळे ॥३॥ तुका म्हणे कोठें ठेवावा विटाळ । स्नानेंचि निर्मळ व्हावयासी ॥४॥

२८७३. काय करूं पोरा लागली चट । धरी वाट देउळाची ॥१॥ सांगितलें नेघे कानीं । दुजें मनीं विठ्ठल ॥२॥ काम घरीं न करी धंदा । येथें सदा दुश्चित ॥३॥ आमचे कुळीं नव्हतें ऐसें । हेंच पिसें निवडलें ॥४॥ लौकिकाची नाहीं लाज । माझें मज पारिखें ॥५॥ तुका म्हणे नरका जाणें । या वचनें दुष्टांचीं ॥६॥

२८७४. कारणापें असतां दृष्टी । शंका पोटीं उपजेना ॥१॥ शूर मिरवे रणांगणीं । मरणींच संतोषे ॥२॥ पाहिजे तो कळवळा । मग बळा काय उणें ॥३॥ तुका म्हणे उदारपणें । काय उणें मनाचें ॥४॥

२८७५. नव्हती हे उसणे बोल । आहाच फोल रंजवण ॥१॥ अनुभव तो वरावरी । नाहीं दुरी वेगळा ॥२॥ पाहिजे तें आलें रुची । काचाकुची काशाची ॥३॥ तुका म्हणे लाजे आड । त्याची चाड कोणासी ॥४॥

२८७६. जों जों घ्यावा सोस । माझे वारीं गर्भवास । लटिक्याचा दोष । अधिक जडे अंगासीं ॥१॥ आतां आहे तैसें असो । अनुताप अंगीं वसो । येवढेंचि नसो । माझें आणि परावें ॥२॥ जागा झालेपणें काय असावें स्वप्नें । शब्दाचिया शिणें । कष्ट मिथ्या मानावे ॥३॥ छाये माकड विटे । धांवे कूपीं काय भेटे । तुका म्हणे फुटे । डोई गुडघे कोंपर ॥४॥

२८७७. गुणांचाचि सांठा । करूं न वजों आणिका वाटा ॥१॥ करिती छंद नानापरी ।

भरोनि सिणती आडभरी ॥२॥ नेमिली पंगती । आम्हां संतांची संगती ॥३॥ तुका म्हणे लीळा । येर कवतुक पाहों डोळां ॥४॥

२८७८. शिकल्या शब्दाचें उत्पादितों ज्ञान । दर्पणींचें धन उपर वांयां ॥१॥ अनुभव कई होईन भोगिता । सांकडें ते आतां हेंचि आलें ॥२॥ गायें नाचें करीं शरीराचे धर्म । बीजनाम वर्म तुझें दान ॥३॥ तुका म्हणे केला उशीर न साहे । द्याल तरी आहे सर्व सिद्ध ॥४॥

२८७९. शिकविले तैसा पढों जाणे पुंसा । कैंची साच दशा तैसी अंगीं ॥१॥ स्वप्नींचीया सुखें नाहीं होत राजा । तैसा दिसे माझा अनुभव ॥२॥ कासया हा केला जिव्हे अळंकार । पायांसीं अंतर दिसतसे ॥३॥ दर्पणींचें धन हातीं ना पदरीं । डोळां दिसे परी सत्याचिये ॥४॥ आस केली तरी लाळचि घोटावी । ठकाठकी तेवीं दिसतसे ॥५॥ कवित्व रसाळ वदविली वाणी । साक्षही पुराणीं घडे ऐसी ॥६॥ तुका म्हणे गुरें राखोनि गोंवारी । माझीं म्हणे परि लाभ नाहीं ॥७॥

२८८०. अनुभव तो नाहीं तुमच्या दर्शनीं । अइकलें कानीं वदे वाणी ॥१॥ जेविल्याचा कैसा अनुभव अंतरीं । म्हणतां मांडे पुरी काय होतें ॥२॥ नाहीं नाहीं गेली तळमळ दातारा । कां जी हरिहरा चाळविलें ॥३॥ पत्रीं कुशलता भेटी अनादर । काय तें उत्तर येईल मानूं ॥४॥ अंतर सबाह्य कां नाहीं सारिखें । करूनि पारिखें वर्ततसां ॥५॥ आलों आलों ऐसी दाऊनियां आस । बुडो बुडत्यास काय द्यावें ॥६॥ तुका म्हणे अहो चतुरा शिरोमणि । किती माझी वाणी तुम्ही कोठें ॥७॥

२८८१. केलें तरी आतां साचचि करावे । विचारिलें द्यावें कृपादान ॥१॥ संकल्पासी नाहीं बोलिला विकल्प । तुम्हां पुण्यपाप कळे देवा ॥२॥ उदार विख्यात तुम्ही भूमंडळीं । ऐसी ब्रीदावळी गर्जतसे ॥३॥ तुका म्हणे अहो रखुमाईच्या वरा । उपरोध धरा माझा आतां ॥४॥

२८८२. अहो पुरुषोत्तमा । तुम्हां काशाची उपमा ॥१॥ सतत तो नाहीं बुद्धी । नाळवितां नाहीं शुद्धि ॥२॥ जागविलें तरी । तुम्हां व्यक्ति येणें हरी ॥३॥ तुका म्हणे देवा । तुम्हां नित्य दिस नवा ॥४॥

२८८३. मथनें भोगे सार । ताकें घडे उपकार ॥१॥ बरवी सायासाची जोडी । अनुभविया ठावी गोडी ॥२॥ पाक आणि रुची । जेथें तेथें ते कइंची ॥३॥ वाढितो पंगती । तुका आवडी संगती ॥४॥

२८८४. चिंतनाची जोडी । हाचि लाभ घडोघडी ॥१॥ तुम्ही वसूनि अंतरीं । मज जागवा निर्धारीं ॥२॥ जेथें जेथें जाय मन । आड घाला सुदर्शन ॥३॥ तुका म्हणे भोजें । मग मी नाचेन निलज्ज ॥४॥

२८८५. आवडीची न पुरे धणी । प्रीत मनीं बैसली ॥१॥ नित्य नवा कळवळा ।

मायबाळामध्यें तो ॥२॥ सुख सुखा भेटों आलें । होय वाल्हें पोटींचें ॥३॥ तुका म्हणे ब्रह्मानंदें । संतवृंदें चरणापें ॥४॥

२८८६. जडलों तों आतां पायीं । होऊं काई वेगळा ॥१॥ तुम्हीं संतीं कृपा केली । गंगे चाली ओघाची ॥२॥ सांभाळिलों मायबापा । केलों तापावेगळा ॥३॥ वोरसें या जीव धाला । तुका ठेला मौन्यचि ॥४॥

२८८७. काळावरी सत्ता । ऐशा करितो वारता ॥१॥ मी तो हीनाहूनि सांडें । देव दुन्हें काळतोंडें ॥२॥ मानूनी भरंवसा । होतों दास म्हणत ऐसा ॥३॥ तुका म्हणे मान । गेलों वाढवूं थोरपण ॥४॥

२८८८. समर्थाचे सेवे कोठें नाहीं घात । पाहों नये अंत पांडुरंगा ॥१॥ आहे तैसी नीत विचारावी बरी । येऊनी भीतरी वासकरा ॥२॥ निढळ राखिलें तरी भयाभीत । हर्षामर्ष चित्त पावतसे ॥३॥ तुका म्हणे तरी कळेल निवाड । दर्शनाची चाड शुभकीर्ति ॥४॥

२८८९. बहु धीर केला । जाण न होसी विठ्ठला ॥१॥ अतां धरीन पदरीं । तुज मज करीन सरी ॥२॥ झालों जीवासी उदार । उभा राहिलों समोर ॥३॥ तुका म्हणे संता । ऐसें सांगा पंढरिनाथा ॥४॥

२८९०. नेदावी सलगी न करावा संग । करी चित्ता भंग वेळोवेळां ॥१॥ सर्प शांतिरूप न म्हणावा भला । झोंबे खवळीला तात्काळ तो ॥२॥ तुका म्हणे दुरी राखावा दुर्जन । करावें वचन न घडे तें ॥३॥

२८९१. अभयदान मज देईं वो दातारा । कृपेच्या सागरा मायबापा ॥१॥ देहभाव तुझ्या ठेवियेला पायीं । आणीक मी कांहीं दुजे नेणें ॥२॥ सेवाभक्तिहीन नेणता पतित । आतां माझें हित तुझ्या पायीं ॥३॥ तुका म्हणे तुझें नाम दीनानाथ । ते मज उचित करी आतां ॥४॥

२८९२. करावा वर्षाव । तृषाकांत झाला जीव ॥१॥ पाहें आकाशाची वास । जाणता तूं जगदीश ॥२॥ संयोगें विस्तार । वाढी लागतो अंकूर ॥३॥ तुका म्हणे फळ । चरणांबुज तें सकळ ॥४॥

२८९३. करीं ऐसी धांवाधांवी । चित्त लावी चरणापें ॥१॥ मग तो माझा मायबाप । घेईल तापहिरूनी ॥२॥ बहुतांच्या मतें गोवा । होऊं जीवा नेदावा ॥३॥ तुका म्हणे करुणाबोलें । धीर विठ्ठलें निघेना ॥४॥

२८९४. काय तुज कैसें जाणावेंगा देवा । आणावें अनुभवा कैशा परी ॥१॥ सगुण निर्गुण स्थूळ कीं लहान । न कळे अनुमान मज तुझें ॥२॥ कोण तो निर्धार करूं हा विचार । भवसिंधु पार तरावया ॥३॥ तुका म्हणे कैसे पाय आतुडती । न पडे श्रीपती वर्म ठावें ॥४॥

२८९५. एकविध नारायण । तेथें विषमाचा सीण । पालटोचि भिन्न । नये अणुप्रमाण ॥१॥ अवघें सारावें गाबाळ । चुकवूनियां कोल्हाळ । आनंदाचें स्थळ । एकाएकीं एकांत ॥२॥ कायावाचामन । स्वरूपींच अनुसंधान । लक्ष भेदी बाण । येणे पाडें लवलाहो ॥३॥ तुका म्हणे आळस निद्रा । येथें देउनिया चिरा । देऊनियां धीरा । मिठी जाणा जागृती ॥४॥

२८९६. हारपोनि गेली निशी । निद्रा कैसी न देखों ॥१॥ नारायणीं वसलें घर । निरंतर आनंद ॥२॥ अवघा रुधविला ठाव । नेला वाव मी माझें ॥३॥ तुका म्हणे एके ठायीं । असों नाहीं क्षण भिन्न ॥४॥

२८९७. देवें केले कैसे कैसे । उद्धरिलें अनायासें ॥१॥ ऐका नवलयाची ठेव । नेणतांही भक्तिभाव ॥२॥ कैलासासी नेला । भिल्ल पानेडी बैसला ॥३॥ पांखांच्या फडत्कारीं । उद्धरुनी नेली घारी ॥४॥ चोरें पिंडी दिला पाव । त्या पूजनें धाय देव ॥५॥ तुका म्हणे भोळा । स्वामी माझा हा कोंवळा ॥६॥

२८९८. अनुभव ऐसा । मज लागला सरिसा ॥१॥ पाठी बैसलीसे जारी । नव्हे शांत कोणे परी ॥२॥ कोठें नलगे जावें । कांहीं घालावया ठावें ॥३॥ तुका म्हणे कोटि । दु:खाच्याच तये पोटीं ॥४॥

२८९९. पाठीवरी भार । जातो वाहूनियां खर ॥१॥ संत नेतील त्या ठाया । माझी आधीन त्यां काया ॥२॥ मोठे चौफळ । अंगीं उच्छिष्टाचें बळ ॥३॥ न संडी मारग । येथें न चोरूनि अंग ॥४॥ आपुलिया सत्ता । चालविलें नाहीं चिंता ॥५॥ कळवळिला तुका । जनाचार येथें नका ॥६॥

२९००. मागें पुढें झालों लाठा । अवघा मोठा सरळ ॥१॥ नाहीं कोठें रितें अंग । नित्य रंग नवाचि ॥२॥ पोसिंद्याचे पडिलों हातीं । ओझें माती चूकली ॥३॥ जोगावलों पोटीं खर । पाठी भार वरि नाहीं ॥४॥ अवघिया मोकळ्या दिशा । नाहीं वोळसा कामाचा ॥५॥ संताचिये लोळे द्वारीं । पळती दुरी गोमाशा ॥६॥ पाहातोगे महाद्वारीं । वरि झुली वाकळा ॥७॥ कांहीं न साहेसा झाला । तुका नेला समर्थें ॥८॥

२९०१. सुनियाचा हाचि भाव । आपुला ठाव राखावा ॥१॥ दुजियाचा येऊं वारा । नेदूं घरावरी देऊं ॥२॥ केली याची फाडाफाडी । तडामोडी क्षेत्राची ॥३॥ पातेजत नाहीं लोकां । देव तुका वांचूनी ॥४॥

२९०२. धन्य तोचि ग्राम जेथें हरिचे दास । धन्य तोचि वंश भक्ति भाग्य ॥१॥ ब्रह्मज्ञान तेथें असे घरोघरीं । धन्य नरनारी चतुर्भुज ॥२॥ नाहीं पापा रिघ काळाचें खंडण । हरिनामकीर्तन घरोघरीं ॥३॥ तुका म्हणे तिहीं तारिलें सकळां । आपल्या कोटिकुळासहित पैं ॥४॥

२९०३. भय होतें आम्हीपणें । पाठी येणे घातलें ॥१॥ अवघा आपुलाचि देश । काळा लेश उरेचि ना ॥२॥ समर्थाचें नाम घेतां । मग चिंता काशाची । तुका म्हणे नारायणें । केलें जिणें सुखाचें ॥४॥

२९०४. मारूं नये सर्प संतांचिया दृष्टी । होतील ते कष्टी व्यापकपणें ॥१॥ एक सूत्र जीवशिवीं आइक्यता । रोम उपडितां अंग कांपे ॥२॥ नाहीं साहो येत दुःखाची ते जाती । परपीडा भूतीं साम्य झाली ॥३॥ तुका म्हणे दिला नीतीचा संकेत । पूजा नांवें चित्त सुखी तेणें ॥४॥

२९०५. विषम वाटे दूरवरी । चालूनि परती धरी । मागील ते उरी । उरली नाहीं भयाची ॥१॥ मुख्य न व्हावा तो नाड । सेवटाचे हातीं गोड । सरलिया चाड । मग कैंचे उद्योग ॥२॥ होता पहिला अभ्यास । समयीं घालावया कास । तेव्हां लटिके दोष । योगें अनुतापाच्या ॥३॥ तुका म्हणे आहे । बुद्धी केलियानें साहे । जवळीच पाहें । देव वाट स्मरणाची ॥४॥

२९०६. आतां कोठें धांवे मन । तुझे चरण देखिलिया ॥१॥ भाग गेला सीण गेला । अवघा झाला आनंदु ॥२॥ प्रेमरसें बैसली मिठी । आवडी लाठी मुखासी ॥३॥ तुका म्हणे आम्हांजोगें । विठ्ठल घोगें खरें माप ॥४॥

२९०७. विश्वी विश्वंभर । बोले वेदान्ताचें सार ॥१॥ जगीं जगदीश । शास्त्रें वदती सावकाश ॥२॥ व्यापिलें हें नारायणें । ऐसीं गर्जती पुराणें ॥३॥ जनीं जनार्दन । संत बोलती वचन ॥४॥ सूर्याचिया परी । तुका लोकीं क्रीडा करी ॥५॥

२९०८. निरोधितों परि न मोडे विकार । बहु हीं दुस्तर विषयद्वारें ॥१॥ राहातेति तुम्ही भरोनि अंतरीं । होतों तदाकारी निर्विषयची ॥२॥ कृपेचिया साक्षी असती जवळी । वचनें मोकळीं सरत नाहीं ॥३॥ तुका म्हणे ताळा मेळवणीपाशीं । विनंती पायांशीं हेचि करीं ॥४॥

२९०९. अद्वयचिद्वय झालेंचि कारण । धरिलें नारायणें भक्तिसुख ॥१॥ अपरोक्ष आकार झाला चतुर्भुज । एकतत्वी बीज भिन्न नाहीं ॥२॥ शून्य निरसूनि राहिलें निर्मळ । तें दिसे केवळ विटेवरी ॥३॥ सुखें घ्यावें नाम वदना ही चाड । सरिता वापी आड एक पाणी ॥४॥ तुका म्हणे मीच आहें तेणें सुखें । भेद नाहीं मुखें नाम गातां ॥५॥

२९१०. उदार चक्रवर्ती । वैकुंठींचा भूपति । पुंडलीकाचिया प्रीती । विटे उभा राहिला ॥१॥ सर्वसिद्धींचा दातार । सवें आणिला परिवार । भक्ता अभयकर । घ्या घ्या ऐसें म्हणतसे ॥२॥ जेणें हें विश्व निर्मिलें । महर्षी देवां संस्थापिलें । एकवीस स्वर्गांतें धरिलें । सत्तामात्रें आपुलिया ॥३॥ तुका म्हणे कृपावंत । इच्छिले पुरवी मनोरथ । रिद्धिसिद्धी मोक्ष देत । शेखीं संग आपुला ॥४॥

२९११. सकळ गुणें संपन्न । एक देवाचें लक्षण ॥१॥ वरकड कोठें कांहीं । एक आहे

एक नाहीं ॥२॥ षड्गुण ऐश्वर्य संपन्न । एक भगवंत जाण ॥३॥ तुका म्हणे जें जें बोला । तें तें साजे या विठ्ठला ॥४॥

२९१२. सुख पंढरिये आलें । पुंडलिकें सांठविलें ॥१॥ घ्या रे घ्या रे माझे बाप । जिव्हा घेउनि खरें माप । करा एक खेप । मग नलगे हिंडणें ॥२॥ विभव गुंडोनी पसारा । धांव घाला पंढरपूरा ॥३॥ आयुष्य वेंच जंव आहे । तोंचि धांवोनियां जाये ॥४॥ आळस न करीं या लाभाचा । तुका विनवी कुणबियाचा ॥५॥

२९१३. देवाचें चरित्र नाठवे सर्वथा । विनोदाची कथा गोड वाटे ॥१॥ हातावरि हात हासोनि आफळी । वाजवितां टाळी लाज वाटे ॥२॥ तुका म्हणे थुंका त्याच्या तोंडावरि । जातो यमपुरी भोगावया ॥३॥

२९१४. अद्वैतीं तों नाहीं माझें समाधान । गोड हे चरण सेवा तुझी ॥१॥ करूनी उचित देईं हेंचि दान । आवडे कीर्तन नाम तुझें ॥२॥ देवभक्तपण सुखाचा सोहळा । ठेवूनि निराळा दावी मज ॥३॥ तुका म्हणे आहे तुझें हें सकळ । कोण्या एका काळें देईं मज ॥४॥

२९१५. हेंचि माझें तप हेंचि माझें दान । हेंचि अनुष्ठान नाम तुझें ॥१॥ हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत । सत्य हें सुकृत नाम तुझें ॥२॥ हेंचि माझे कर्म हाचि माझा धर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें ॥३॥ हाचि माझा योग हाचि माझा यज्ञ । हेंचि तपध्यान नाम तुझें ॥५॥ हाचि कुळाचार हाचि कुळधर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें ॥५॥ हा माझा आचार हा माझा विचार । हा माझा निर्धार नाम तुझें ॥६॥ तुका म्हणे दुजें सांगायासि नाहीं । नामेंविण कांहीं धनवित्त ॥७॥

२९१६. कोणे साक्षीविण । केलें उधारा भजन ॥१॥ ऐसें सांगा जी दातारा । माझी भक्ति परंपरा ॥२॥ कोणें केली नाहीं आळी । ब्रह्मज्ञानाहुनि वेगळी ॥३॥ कोणाचें त्वां कोड । नाहीं पुरविला लाड ॥४॥ कोणाच्या उद्धारा । केला विलंब माघारा ॥५॥ तुका म्हणे भिन्न । कां हे बोला साक्षीविण ॥६॥

२९१७. सुखरूप चाली । हळूहळू उसंतिली ॥१॥ बाळगोपाळांची वाट । सेव्य सेवकता नीट ॥२॥ जरी झाला श्रम । तरी पडों नये भ्रम ॥३॥ तुका म्हणे दासां । देव सरिसासरिसा ॥४॥

२९१८. चुकली ते वाट । पुढें सांपडली नीट ॥१॥ म्हणउनि गर्भवास । नेणती ते हरिचे दास ॥२॥ संचिताचा संग । काय जाणों पावे भंग ॥३॥ तुका म्हणे दृष्टी । उघडि तो नव्हे कष्टी ॥४॥

२९१९. कइं तो दिवस देखेन मी डोळां । कल्याण मंगळामंगळाचें ॥१॥ आयुष्या शेवटीं पायांसवें भेटी । काळवेळ तुटी झाल्या तरें ॥२॥ सरो हें संचित पदरींचा गोवा । उताविळ देवा मन झालें ॥३॥ पाउलापाउलीं करितां विचार । अनंत विकार चित्ता अंगीं ॥४॥ म्हणउनि भयाभीत होतो जीव । भाकितसे कींव अट्टाहासें ॥५॥ दुःखाच्या उत्तरीं आळविले पाय । पाहाणें तो काय

अजून अंत ॥६॥ तुका म्हणे होईल आइकिलें कानीं । तरि चक्रपाणी धांव घाला ॥७॥

२९२०. कळों येतें वर्म । तरी न पवतों श्रम ॥१॥ तुम्हा शिरीं होती भार । आम्हां कैंचा संसार ॥२॥ होतें अभयदान । तरी स्थिर होतें मन ॥३॥ तुका म्हणे पाहें । ऐसी वाट उभा आहें ॥४॥

२९२१. वारंवार हाचि न पडावा विसर । वसावें अंतर तुमच्या गुणीं ॥१॥ इच्छेचा ये दाता तूं एक समर्था । अगा कृपावंता मायबापा ॥२॥ लाभाचिये वोढी उतावीळ मन । त्यापरि चिंतन चरणाचें ॥३॥ तुका म्हणे जीवीं जीवन ओलावा । पांडुरंगे द्यावा शीघ्र आतां ॥४॥

२९२२. आइकावीं माझीं कवतुक उत्तरें । देऊनि सादरें चित्त देवा ॥१॥ वोरसें आवडी आलों पायापाशीं । होय तें मनेंसीं सुख कीजे ॥२॥ तुमचें न भंगे सर्वोत्तमपण । करितां समाधान लेंकराचें ॥३॥ तुका म्हणे जरी बोलतों बोबडें । तरी लाडें कोडें कवतुकें ॥४॥

२९२३. नाहीं गुणदोष लिंपों देत अंगीं । झाडितां प्रसंगीं वरावरी ॥१॥ निकटवासिया आळवितों धांवा । येथूनियां देवा सोडवूनी ॥२॥ उमटे अंतरीं तें करूं प्रगट । कळोनी बोभाट धांव घालीं ॥३॥ तुका म्हणे तरि वांचलों या काळें । समर्थाचें बळें सुखी असों ॥४॥

२९२४. आतां येणें पडिपाडे । रस सेवूं हा निवाडें । मुंगी नेली गोडें । ठेविलिये अडचणी ॥१॥ तैसें होय माझ्या जीवा । चरण न सोडीं केशवा । विषयबुद्धि हेवा । वोस पडो सकळ ॥२॥ भुकेलिया श्वाना । गांठ पडे सवें अन्ना । मुकों पाहें प्राणा । परि तोंडींचें न सोडी ॥३॥ काय जिंकियलें मन । जीवित्व कामातुरा तृण । मागे व्यभिचारिण । भक्ती तुका ये जाती ॥४॥

२९२५. न पवीजे तया ठाया । आलों कायाक्लेशेसीं ॥१॥ आतां माझें आणी मना । नारायणा ओजेचें ॥२॥ बहु रिणें पिडिलों फार । परिहार करावा ॥३॥ तुका म्हणे निर्बळशक्ति । काकुलती म्हूण येतों ॥४॥

२९२६. बहु फिरलों ठायाठाव । कोठें भाव पुरेचि ना ॥१॥ समाधान तों पावलों । उरलों बोलों यावरी ॥२॥ घे गा देवा आशीर्वाद । आमुच्या नांद भाग्यानें ॥३॥ तुका म्हणे जेवूं आधीं । खवखव मधीं सारावी ॥४॥

२९२७. कोण येथें रिता गेला । जो जो आला या ठाया ॥१॥ तातडी ते काय आतां । ज्याची चिंता तयासी ॥२॥ नांवासाठीं नेघें भार । नलगे फार वित्पत्ति ॥३॥ तुका म्हणे नलगे जावें । कोठें देवें सुचेना ॥४॥

२९२८. इंद्रियांचें पुरे कोड । तेंचि गोड पुढतीही ॥१॥ जावें म्हणती पंढरपुरा । हाचि बरा संसार ॥२॥ बैसलें तें मनामुळीं । सुख डोळीं देखिलें ॥३॥ तुका म्हणे देती कान ।

वाणावाण निवडुनी ॥४॥

२९२९. आतां देवा मोकलिलें । तुम्हीं भलें दिसेना ॥१॥ आतां नाहीं जीवभाव । उरला ठाव वेगळा ॥२॥ सांभाळून घ्यावें देवा । आपणासवा यावरि ॥३॥ तुका म्हणे नग्न भाज । तरि ते लाज स्वामीसी ॥४॥

२९३०. आशाबद्ध आम्ही भाकितसों कींव । तत्पर हा जीव कार्यापाशीं ॥१॥ प्रतिउत्तराची पाहातसें वाट । करूनि बोभाट महाद्वारीं ॥२॥ आपुल्या उचितें करूनियां ठेवीं । संबंध गोसावी तोडोनियां ॥३॥ तुका म्हणे एक झालिया निवाड । कोण बडबड करी मग ॥४॥

२९३१. खद्योतें फुलविलें रविपुढें ढुंग । साक्षी तंव जग उभयतां ॥१॥ आपल्या आपण नाहीं शोभों येत । चार करी स्फीत दाखवूनि ॥२॥ खाणार ताकाचें असे तें मांजर । आपणचि अधीर कळों येतें ॥३॥ तुका म्हणे जळों मैंदाची मवाळी । दावूनियां नळी कापी सुखें ॥४॥

२९३२. नाहीं सरों येत कोरड्या उत्तरीं । जिव्हाळ्याची भरी बोली ठायीं ॥१॥ आपुलिया हिता मानिसी कारण । सत्या नारायण साह्य असे ॥२॥ निर्वाणीं निवाड होतो आगीमुखें । तप्त लोह सुखें धरितां हातीं ॥३॥ तुका म्हणे नेमा न टळतां बरें । खऱ्यासीच खरें ऐसें नांव ॥४॥

२९३३. आलों उल्लंघुनि दु:खाचे पर्वत । पायापाशीं हित तुमच्या तरी ॥१॥ न देखेची लासा दु:खी होतें मन । कठिणें कठिण वाटतसें ॥२॥ नव्हे सांडी परि वाटतें निरास । न ये माझ्या दिस संकल्पाचा ॥३॥ तुका म्हणे तुम्ही सदैव जी देवा । माझ्या हाचि जीवा एक ठाव ॥४॥

२९३४. किती सोसिती करंटीं । नेणों संसाराची आटी । सर्वकाळ पोटीं । चिंतेची हळहळ ॥१॥ रिकामिया तोंडें राम । काय उच्चारितां श्रम । उफराटा भ्रम । गोवी विषय माजिरा ॥२॥ कळतां न कळे । उघडे झांकियेले डोळे । भरलें त्याचे चाळे । अंगीं वारें मायेचें ॥३॥ तुका म्हणे जन । ऐसें नांवबुद्धिहीन । बहुरंगें भिन्न । एकीं एक न मिळे ॥४॥

२९३५. मंगळाचा मंगळ सांठा । विट तोटा नेणे तें ॥१॥ हें भरा सातें आलें । भलें भलें म्हणवावें ॥२॥ जनीं जनार्दन वसे । येथें दिसे तें शुद्ध ॥३॥ तुका म्हणे बहुतां मुखें । खरें सुखें ठेवावें ॥४॥

२९३६. नामाचा महिमा बोलिलों उत्कर्ष । अंगीं कांहीं रस न येचि तो ॥१॥ कैसें समाधान राहे पांडुरंगा । नलगेचि अंगा आणी कांहीं ॥२॥ लाभाचिये अंगीं सोस कवतुकें । फिक्याचे ते फिके वेवसाव ॥३॥ तुका म्हणे करा आपुला महिमा । नका जाऊं धर्मावरी माझ्या ॥४॥

२९३७. हेंचि वारंवार । पडताळुनी उत्तर ॥१॥ करितों पायांसी विनंती । नुपेक्षावें कमळापती ॥२॥ गंगोदक गंगे । अर्घ्य द्यावें पांडुरंगे ॥३॥ जोडोनियां हात । तुका करी प्रणिपात ॥४॥

२९३८. अवचित या तुमच्या पायां । देवराया पावलों ॥१॥ बरवें झालें देशाउर ।

आल्या दूर सारिखें ॥२॥ राहोनियां जातों ठाया । आलियाची निशाणी ॥३॥ तुका म्हणे चरण सेवा । जोडी हेवा लाधली ॥४॥

२९३९. आतां पाविजेल घरा । या दातारा संगती ॥१॥ पायावरि ठेवूनि माथा । सर्वथा हा नुपेक्षी ॥२॥ येथून तेथवरि आतां । नाहीं सत्ता आणिकांची ॥३॥ तुका म्हणे चक्रपाणी । शिरोमणी बळियांचा ॥४॥

२९४०. बरवें माझ्या केलें मनें । पंथें येणें निघालें ॥१॥ अभयाचें जावें ठाया । देवराया प्रतापें ॥२॥ साधनाचा नलगे पांग । अवघें सांग कीर्तनें ॥३॥ तुका म्हणे सत्ता थोरी । कोण करी खोळंबा ॥४॥

२९४१. मागें पुढें नाहीं । दुजे यावेगळें कांहीं ॥१॥ नाहीं उरलें आणीक । केला झाडा सकळिक ॥२॥ विश्वासावांचून । नांवें दुजियाचें शून्य ॥३॥ तुका म्हणे कांहीं । बोलायाची उरी नाहीं ॥४॥

२९४२. वैराग्याचा अंगीं झालासे संचार । इच्छी वनांतर सेवावया ॥१॥ कां जी माझें करूं नये समाधान । वियोगानें मन सिणतसे ॥२॥ नयेचि न्यावया पंढरीचें मूळ । न देवेचि माळ कंठींचीही ॥३॥ तुका म्हणे झालें अप्रीतीचें जीणें । लाजिर हें वाणें सेवा करी ॥४॥

२९४३. आळिकरा कोठें साहातें कठीण । आपुला तें प्राण देऊं पाहे ॥१॥ सांभाळावें मायबापें कृपादृष्टी । पीडितां तें दृष्टी देखों नये ॥२॥ अंतरलों मागें संवसारा हातीं । पायापें सरती झालों नाहीं ॥३॥ तुका म्हणे तुम्हीं विचाराजी देवा । ठेवाल तें ठेवा कोणे परी ॥४॥

२९४४. स्वप्नींचें धन हातीं ना पदरीं । प्रत्यक्ष कां हरि होऊं नये ॥१॥ आजुनि का करा चाळवाचाळवी । सावकाशें द्यावी सत्य भेटी ॥२॥ बोलोनियां फेडा जीवींची काजळी । पाहेन कोवळीं चरणांबुजें ॥३॥ तुका म्हणे माझ्या जीवींचिया जीवा । सारूनियां ठेवा पडदा आतां ॥४॥

२९४५. येतील अंतरीं शिष्टांचे अनुभव । तळमळी जीव तया सुखा ॥१॥ आतां माझा जीव घेउनियां बळी । बैसवावे ओळी संतांचिये ॥२॥ विस्तारिली वाचा फळेंविण वेल । कोरडेचि बोल फोस वांझे ॥३॥ तुका म्हणे आलों निर्वाणाचे वरी । राहों नेदीं उरी नारायणा ॥४॥

२९४६. म्हणउनि काय जीऊं भक्तपणें । जायाची भूषणें अळंकार ॥१॥ आपुल्या कष्टाची करोनियां जोडी । निरवीन उघडीं इच्छावसें ॥२॥ तुके तरी तुके खऱ्याचें उत्तम । मुलाम्याचा भ्रम कोठवरी ॥३॥ तुका म्हणे पुढें आणि मागें फांस । पावे ऐसा नास न करीं देवा ॥४॥

२९४७. आपणचि व्हाल साहे । कार्य आहे निर्वाणींचें ॥१॥ भाकिली ते उरली कींव । आहे जीव जीवपणें ॥२॥ आहाच कैंचा बीजा मोड । प्रीति कोड वांचूनि ॥३॥ तुका म्हणे

दंडीन काया । याल तया धावणिया ॥४॥

२९४८. निश्चितीनें होतों करूनियां सेवा । कां जी मन देवा उद्वेगिलें ॥१॥ अनंत उठती चित्ताचे तरंग । करावा हा त्याग वाटतसे ॥२॥ कोण तुम्हांविण मनाचा चाळक । दुजे सांगा एक नारायणा ॥३॥ तुका म्हणे माझा मांडिला विनोद । करवूं नेणें छंद कराल काई ॥४॥

२९४९. आश्वासावे दास । तरी घडतो विश्वास ॥१॥ नाहीं चुकत चाकरी । पुटें लाडेशाची थोरी ॥२॥ स्वामीच्या उत्तरें । सुख वाटे अभय करें ॥३॥ न मगें परि भातें । तुका म्हणे निढळ रितें ॥४॥

२९५०. जेणें होय हित । तें तूं जाणसी उचित ॥१॥ मज नको लावूं तैसें । वांयां जाय ऐसें पिसें ॥२॥ धरितोसी सत्ता । होसी सकळ जाणता ॥३॥ चतुराच्या राया । अंगीकारावें तुकया ॥४॥

२९५१. राहे उभा वादावादीं । तरी फंदीं सांपडे ॥१॥ लव्हाळ्यासी कोठें बळ । करिल जळ आपुलें ॥२॥ कठिणासी बळजोडा । नम्र पीडा देखेना ॥३॥ तुका म्हणे सर्वरसीं । मिळे त्यासी गोत तें ॥४॥

२९५२. म्हणउनि झाली तुटी । नाहीं भेटी अहंकारें ॥१॥ दाखविलें देवें वर्म । अवघा भ्रम नासला ॥२॥ हातें मुरगाळितां कान । नाहीं भिन्न वेदना ॥३॥ तुका म्हणे एकांत सुखें । अवघीं गोतें गुंतलीं ॥४॥

२९५३. न पडो आतां हाडीं घाव । मध्यें कींव नासक ॥१॥ करविली आत्महत्या । जीवा कां त्या द्वंद्वाच्या ॥२॥ आशापाशीं गुंतला गळा । तेणें कळाहीन झालों ॥३॥ तुका म्हणे लावूं मुळी । जीवकुळी थारेसी ॥४॥

२९५४. सामावे कारण । नाहीं सोसत धरणें ॥१॥ लादी थीके लाजिरवाणी । हीन-कमाईची घाणी ॥२॥ पुष्प जवळी नाका । दुर्गंधीच्या नांवें थुंका ॥३॥ तुका म्हणे किती । उपदेशहीन जाती ॥४॥

२९५५. असाल ते तुम्ही असा । आम्ही सहसा निवडों ना ॥१॥ अनुसरलों एका चित्तें । हातोंहातें गिंवसीत ॥२॥ गुणदोष काशासाठीं । तुमचे पोटीं वागवूं ॥३॥ तुका म्हणे दुजें आतां । कोठें चित्ता आतळों ॥४॥

२९५६. सोंवळा होऊं तों वोंवळें जडलें । सांडीमांडी वोले तोंडीं बीजीं ॥१॥ एकसरीं केली कलेवरें साटी । आतां नका तुटीं पायांसवें ॥२॥ संकल्पीं विकल्प पापाचा सुकाळ । रज्जुसर्प मूळ मरणाचें ॥३॥ तुका म्हणे हें तूं ब्रह्मांड चाळिता । मी कां करूं चिंता पांडुरंगा ॥४॥

२९५७. आहें ऐसा आतां आहे ठायीं बरा । ठेविलों दातारा उचितें त्या ॥१॥ वचनाचा भार पडिलीया शिरीं । झालें मग भारी उतरेना ॥२॥ अबोल्याची सवे लावुनियां मना । फांकों नेदी

गुणा ऐसें करूं ॥३॥ तुका म्हणे आम्हां गोंवळ्याचा संग । राखावें तें अंग जाणतसों ॥४॥

२९५८. तूं माझा कोंवसा । परी न कळे या धसां ॥१॥ कूट खाती मागें पुढें । जाती निरयगांवा पुढें ॥२॥ मज म्हणताती कवी । निषेधुनि पापी जेवीं ॥३॥ तुका म्हणे पांडुरंगा । आतां कोण लेखी जगा ॥४॥

२९५९. दर्पणासी बुझे । नकटें तोंड लपवी लाजे ॥१॥ गुण ज्याचे जो अंतरीं । तोचि त्यासी पीडा करी ॥२॥ चोरा रुचे निशी । देखोनियां विटे शशी ॥३॥ तुका म्हणे जन । देवा ऐसे भाग्यहीन ॥४॥

२९६०. म्हणउनि शरण जावें । सर्वभावें देवासी ॥१॥ तो हा उतरील पार भवदुस्तर नदीचा ॥२॥ बहु आहे करुणावंत । अनंत हें नाम ज्या ॥३॥ तुका म्हणे साक्षी आलें । तरी केलें प्रगट ॥४॥

२९६१. ऐसीं वर्मे आम्हां असोनियां हातीं । कां होऊं नेणती दिशाभुली ॥१॥ पोटाळुनी पाय कवळीन उभा । कृपे पद्मनाभा हालों नेदीं ॥२॥ आपुले इच्छेचे घालोनी संपुटीं । श्रीमुख तें दृष्टी न्याहाळीन ॥३॥ तुका म्हणे बहु सांडियेलीं मतें । आपुल्या पुरतें धरूनी ठेलों ॥४॥

२९६२. रत्नाच्या वोवणी कांचे ऐशा धरी । आव्हेरूनी दुरी अधिकारें ॥१॥ जातीचा स्वभाव आला डोळ्यां आड । तया घडे नाड न कळतां ॥२॥ कामधेनु देखे जैशा गाई म्हैसी । आणिका त्या ऐसी करोनियां ॥३॥ तुका म्हणे काय बोलोनियां फार । जयाचा वेव्हार तया साजे ॥४॥

२९६३. तरीच हीं केलीं । दानें वाईट चांगलीं ॥१॥ एक एका शोभवावें । केलें कवतुक देवें ॥२॥ काय त्याची सत्ता । सूत्र आणीक चाळिता ॥३॥ तुका म्हणे धुरें । डोळे भरिले परि खरे ॥४॥

२९६४. करी आणिकांचा अपमान । खळ छळवादी ब्राह्मण । तया देतां दान । नरका जाती उभयतां ॥१॥ तैसें झालें दोघांजणां । मागतिया यजमाना । जाळियलें वना । आपणासहित कांचणी ॥२॥ घडतां दगडाची नाव । मोल क्लेश गेले वाव । तरता नाहीं ठाव । बुडवी तारूं तरतीया ॥३॥ चोरा दिधला सांटा । तेणें मारियेल्या वाटा । तुका म्हणे ताठा । हें तंव दोघे नाडती ॥४॥

२९६५. जळो ते जाणीव जळो ते शाहाणीव । राहो माझा भाव विठ्ठलपायीं ॥१॥ जळो तो आचार जळो तो विचार । राहो मन स्थीर विठ्ठलपायीं ॥२॥ जळो हा लौकिक जळो दंभमान । लागो मना ध्यान विठ्ठलाचें ॥३॥ जळो हें शरीर जळो हा संबंध । राहो परमानंद माझ्या कंठीं ॥४॥ तुका म्हणे येथें अवघेंचि होय । धरीं मना सोय विठोबाची ॥५॥

२९६६. विश्वास धरूनि राहिलों निवांत । ठेवूनियां चित्त तुझे पायीं ॥१॥ तरावें बुडावें तुझिया वचनें । निर्धार हा मनें केला माझ्या ॥२॥ न कळें हें मज साच चाळविलें । देसी

तें उगलें घेइन देवा ॥३॥ मागणें तें सरे ऐसें करीं देवा । नाहीं तरी सेवा सांगा पुढें ॥४॥ करावें कांहीं कीं पाहावें उगलें । तुका म्हणे बोलें पांडुरंगा ॥५॥

२९६७. कोणी एकाचिया पोरें केली आळी । ठावे नाहीं पोळी मागे देखी ॥१॥ बुझाविलें हातीं देउनी खापर । छंद करकर वारियेली ॥२॥ तैसें नको करूं मज कृपावंता । काय नाहीं सत्ता तुझे हातीं ॥३॥ तुका म्हणे मायबापाचें उचित । करावें स्वहित बाळकाचें ॥४॥

२९६८. देवाचिये पायीं देईं मना बुडी । नको धांवों वोढी इंद्रियांचे ॥१॥ सर्व सुखें तेथें होती एकवेळे । न सरती काळें कल्पांतींही ॥२॥ जाणें येणें खुंटे धांव वेरझार । नलगे डोंगर उसंतावे ॥३॥ सांगणें तें तुज इतुलेंचि आतां । मानीं धन कांता विषतुल्य ॥४॥ तुका म्हणे तुझे हातीं उपकार । उतरों हा पार भवसिंधु ॥५॥

२९६९. आम्ही विठ्ठलाचे दास झालों आतां । न चलेचि सत्ता आणिकांची ॥१॥ नावरे तयासी ऐसें नाहीं दुजें । करितां पंढरिराजें काय नव्हे ॥२॥ कोठें तुज ठाव घ्यावयासी धांवा । मना तूं विसावा घेईं आतां ॥३॥ इंद्रियांची वोढी मोडिला व्यापार । ज्या अंगें संचार चाली तुज ॥४॥ तुका म्हणे आम्ही जिंकोनियां काळ । बैसलों निश्चळ होऊनियां ॥५॥

२९७०. सांगतों तुम्हांसी भजा रे विठ्ठला । नाहीं तरि गेला जन्म वांयां ॥१॥ करितां भरोवरी दुरावसी दुरी । भवाचिये पुरीं वाहावसी ॥२॥ कांहीं नलगे एक भावचि कारण । तुका म्हणे आण विठ्ठलाची ॥३॥

२९७१. शब्द झणी येऊं नेदीं दृष्टीपुढें । छळवादी कुडे अभक्त ते ॥१॥ जळो ते जाणीव जळो त्यांचें बंड । जळो तया तोंड दुर्जनाचें ॥२॥ तुका म्हणे येती दाटूनि छळाया । त्यांच्या बोडूं डोया न धरूं भीड ॥३॥

२९७२. भले लोक नाहीं सांडीत ओळखी । हे तों झालीं देखी दुसऱ्याची ॥१॥ असो आतां यासी काय चाले बळ । आपुलें कपाळ वोढवलें ॥२॥ समर्थासी काय कोणें हें म्हणावें । आपुलिया जावें भोगावरी ॥३॥ तुका म्हणे तुम्हां बोल नाहीं देवा । नाहीं केली सेवा मनोभावें ॥४॥

२९७३. देवाचें भजन कां रे न करीसी तैसें । अखंड हव्यासें पीडतोसी ॥१॥ देवासी शरण कां रे नवजासी तैसा । बक मीना जैसा मनुष्यालागीं ॥२॥ देवाचा विश्वास कां रे नाहीं तैसा । पुत्रस्नेहें जैसा गुंतलासी ॥३॥ कां रे नाहीं तैसी देवाची ते गोडी । नागवूनि सोडी पत्नी जैसी ॥४॥ कां रे नाहीं तैसे देवाचे उपकार । माया मिथ्या भार पितृपूजन ॥५॥ कां रे भय वाहासी लोकाचा तो धाक । विसरूनियां एक नारायण ॥६॥ तुका म्हणे कां रे घातलें हें वांयां । अवघें आयुष्य जाया भक्तिविण ॥७॥

२९७४. मुकें होतां काय पदरींचें जातें । मूर्ख तें भोगितें मीमीपण ॥१॥ आपुलिये घरीं मैंद होउनी बैसे । कोणासीही ऐसे बोलों नको ॥२॥ तुका म्हणे तुम्हां सांगतों मी खूण । देवासी तें ध्यान लावुनि बैसा ॥३॥

२९७५. आषाढी निकट । आला कीर्तिकीचा हाट ॥१॥ पुरे दोन्हीच बाजार । नलगे आणीक व्यापार ॥२॥ तेंचि घ्यावें तेंचि द्यावें । कैवल्याच्या रासी भावें ॥३॥ कांहीं कोणा नेणे । विठोवांचुनि तुका म्हणे ॥४॥

२९७६. देउनियां प्रेम मागितलें चित्त । झाली फिटाफिट तुम्हां आम्हां ॥१॥ काशानें उदार तुम्हांसी म्हणावें । एक नेसी भावें एक देसी ॥२॥ देउनियां थोडें नेसील हें फार । कुंठीसी विचार अवघीयांचा ॥३॥ तुका म्हणे आम्हां भांडवल चित्त । नेउनी दुश्चित पाडियेलें ॥४॥

२९७७. तांतडीची धांव आंगा आणी भाग । खोळंबा तो मग निश्चिंतीचा ॥१॥ म्हणउनि बरी विचाराची चाली । उरीची ते बोली कामा येते ॥२॥ कोरडें वैराग्य माजिरा बडिवार । उतरे तो शूर अंगींचें तें ॥३॥ तुका म्हणे बरी झऱ्याची ते चाली । सांठवण्या खोली कासयाची ॥४॥

२९७८. मी तों बहु सुखी आनंदभरित । आहें साधुसंतां मेळींकारी ॥१॥ कांहीं व्हावें ऐसें नाहीं माझ्या जीवा । आणीक केशवा तुजविण ॥२॥ नलगे वैकुंठ मोक्ष सायुज्यता । सुख वाटे घेतां जन्म ऐसें ॥३॥ मृत्युलोकीं कोण धरिल वासना । पावावया जनासवें दुःख ॥४॥ तुका म्हणे तुझा दास ऐसें लोकां । कांहीं सकळिकां कळों यावें ॥५॥

२९७९. घ्या रे लुटी प्रेमसुख । फेडा आजि धणी । चुकला तो मुकला । झाली वेरझारें हाणी ॥१॥ घाला घातला वैकुंठीं । करूनियां जीवें साटी । पुरविली पाठी । वैष्णवीं काळाची ॥२॥ अवघें आणिलें अंबर । विठोसहित तेथें धुर । भेदूनि जिव्हार । नामबाणीं धरियेला ॥३॥ संचित प्रारब्ध क्रियमाण । अवघीं झालीं गहन । केलीं पापपुण्यें । देशधडी बापुडीं ॥४॥ आनंदें गर्जती निर्भर । घोष करिती निरंतर । कांपती असुर । वीर कवणा नागवती ॥५॥ जें दुर्लभ ब्रह्मादिकां । आजि सांपडलें फुका । घ्या रे म्हणे तुका सावचित्त होउनी ॥६॥

२९८०. तुझिया दासांचा हीन झालों दास । न धरीं उदास मायबापा ॥१॥ तुजविण प्राण कैसा राहों पाहे । वियोग न साहे क्षणभरी ॥२॥ आणिक माझ्या जीवें मोकलिली आस । पाहे तुझी वास पांडुरंगा ॥३॥ सर्वभावें तुज आणिला उचित । राहिलों निश्चिंत तुझे पायीं ॥४॥ तुका म्हणे तुज असे माझा भार । बोलतों मी फार काय जाणें ॥५॥

२९८१. तेचि करीं मात । जेणें होईल तुझें हित । काय बडबड निमित्य । सुख जिव्हारीं सिणविसी ॥१॥ जो मूळव्याधि पीडिला । त्यासी देखोन हांसे खरजुला ॥२॥ आराध करी सोसी । त्यासी हांसे तो आळसी ॥३॥ क्षयरोगी म्हणे परता । सर रोगिया कुष्ठता ॥४॥ वडस दोहीं

डोळां वाढले । आणिकां कानें कोंचें बोले ॥५॥ तुका लागे पायां । शुद्ध करा आपणियां ॥६॥

२९८२. कळों आला भाव माझा मज देवा । वांयांविण जीवा आट केली ॥१॥ जोडूनि अक्षरें केली तोंडपिटी । नलगे शेवटीं हातीं कांहीं ॥२॥ देव जोडे म्हणोन सांगतसे लोकां । माझा मीच देखा दु:ख पावें ॥३॥ तुका म्हणे माझे गेले दोन्ही ठाय । संसार ना पाय तुझे देवा ॥४॥

२९८३. आतां तरी मज सांगा साच भावें । काय म्यां करावें ऐसें देवा ॥१॥ चुकलिया वर्म नोहे तें कारण । केला होय सीण अवघाचि ॥२॥ कळे म्हणवुनी करीतसें वाद । दिसे भेदाभेद अंतरींच ॥३॥ तुका म्हणे नको पाहूं तूं निर्वाण । देईं कृपादान याचकासी ॥४॥

२९८४. बोल नाहीं तुझ्या दातृत्वपणासी । आम्हीं अविश्वासी सर्वभावें ॥१॥ दंभें करूं भक्ति सोंग दावूं जना । अंतरीं भावना वेगळिया ॥२॥ चित्ताचा तूं साक्षी तुज कळे सर्व । किती करूं गर्व आतां पुढें ॥३॥ तुका म्हणे देवा तूं काय करिसी । कर्मा दुस्तरासी आमुचिया ॥४॥

२९८५. कां हो पांडुरंगा न करा धांवणें । तरि मज कोणें सोडवावें ॥१॥ तुझा म्हणऊनि आणिकापें उभा । राहों हे तों शोभा नेदी आतां ॥२॥ काळें पुरविली पाठी दूरवर । पुढें पाय स्थिर राहों नेदी ॥३॥ नको आणूं माझें संचित मनासीं । पावन आहेसी पतित तूं ॥४॥ तुका म्हणे चाले आणिकांची सत्ता । तुज आठविता नवल हें ॥५॥

२९८६. कावळ्याच्या गळां मुक्ताफळमाळा । तरी काय त्याला भूषण शोभे ॥१॥ गजालागीं केला कस्तुरीचा लेप । तिचें तो स्वरूप काय जाणे ॥२॥ बकापुढें सांगे भावार्थवचन । वाउगाचि सीण होय त्यासी ॥३॥ तुका म्हणे तैसे अभाविक जन । त्यांसी वायां सीण करूं नये ॥४॥

२९८७. न कळसी ज्ञाना न कळसी ध्याना । न कळसी दर्शना धांडोळितां ॥१॥ न कळसी आगमा न कळसी निगमा । न बोलवे सीमा ब्रह्मादिकां ॥२॥ तुका म्हणे तुझा नाहीं अंतपार । म्हणोनि विचार पडिला मज ॥३॥

२९८८. मायबापें सांभाळिती । लोभाकारणें पाळिती ॥१॥ तैसा नव्हे देवराव । याचा कृपाळू स्वभाव ॥२॥ मनासारिखें न होतां । बाळकासी मारी माता ॥३॥ तुका म्हणे सांगूं किती । बाप लेंकासी मारिती ॥४॥

२९८९. विनवितों चतुरा तुज विश्वंभरा । परियेसीं दातारा पांडुरंगा ॥१॥ तुझे दास ऐसें जगीं वाखाणिलें । आतां नव्हे भलें मोकलितां ॥२॥ माझे गुणदोष कोण जाणे मात । पावनपतित नाम तुझें ॥३॥ लोभ मोह माया आम्हां बाधवितां । तरी हा अनंता बोल कोणा ॥४॥ तुका म्हणे मी तों पतितचि खरा । परि आलों दातारा शरण तुज ॥५॥

२९९०. त्राहे त्राहे त्राहे सोडवीं अनंता । लागों दे ममता तुझे पायीं ॥१॥ एकचि मागणें देईं तुझी गोडी । नलवी आवडी आणिकांची ॥२॥ तुझे गुण नाम वर्णीन पवाडे । आवडीच्या कोडें

नाचों रंगीं ॥३॥ बापा विठ्ठलराया हेंचि देईं दान । जोडती चरण जेणें तुझे ॥४॥ आवडीसारिखें मागितलें जरी । तुका म्हणे करीं समाधान ॥५॥

२९९१. सुगरणीबाई थिता नास केला । गूळ तो घातला भाजीमध्यें ॥१॥ क्षीरीमध्यें हिंग दुधामध्यें बोळ । थितेंचि वोंगळ नाश केला ॥२॥ हिरयाचे पेटे आणियेल्या गारा । खांदीं शिरीं भारा व्यर्थ वाहे ॥३॥ दळण दळोनि भरीयेली पाळी । भरडोनि वोंगळी नास केला ॥४॥ कापुराचे सांते आणिला लसण । वागवितां सीण दुःख होय ॥५॥ रत्नाचा जोहरी रत्नचि पारखी । येर देखोवेखीं हातीं घेती ॥६॥ तुका म्हणे जरी योग घडे निका । न घडतां थुंका तोंडावरी ॥७॥

२९९२. धन मेळवूनि कोटी । सवें नये रे लंगोटी ॥१॥ पानें खाशील उदंड । अंतीं जासी सुकल्या तोंड ॥२॥ पलंग न्याहाल्या सुपती । शेवटीं गोवऱ्या सांगाती ॥३॥ तुका म्हणे राम । एक विसरतां श्रम ॥४॥

२९९३. माझा बाप दीनानाथ । वाट भक्तांची पहात ॥१॥ कर ठेवूनियां कटीं । उभा चंद्रभागेतटीं ॥२॥ गळां वैजयन्तीमाळा । रूप डोळस सांवळा ॥३॥ तुका म्हणे भेटावया । सदा उभारिल्या बाह्या ॥४॥

२९९४. माझें जीवन तुझे पाय । कृपाळू तूं माझी माय ॥१॥ नेदीं दिसों किविलवाणें । पांडुरंगा तुझें तान्हें ॥२॥ जन्ममरण तुजसाठीं । आणीक नेणें दुजी गोठी ॥३॥ तुका म्हणे तुजविण । कोण हरिल माझा सीण ॥४॥

२९९५. कां रे प्रेमें मातलासी । उभें केलें विठ्ठलासी ॥१॥ ऐसा कैसा रे तूं धीट । मागें भिरकाविली वीट ॥२॥ युगें झालीं अठ्ठावीस । अजुनी न म्हणसी बैस ॥३॥ भाव देखोनि निकट । देवें सोडिलें वैकुंठ ॥४॥ तुका म्हणे पुंडलिका । तूंचि भक्त बळिया निका ॥५॥

२९९६. तुज पाहातां सामोरी । दृष्टि न फिरे माघारी ॥१॥ माझ्या चित्ता तुझ्या पायां । मिठी पडली पंढरिराया ॥२॥ नव्हे सारितां निराळें । लवण मेळवितां जळें ॥३॥ तुका म्हणे बळी । जीव दिला पायांतळीं ॥४॥

२९९७. उपदेश किती करावा खळासी । नावडे तयासी बरें कांहीं ॥१॥ शुद्ध कां वासना नव्हे चांडाळाची । होळी संचिताची केली तेणें ॥२॥ नाहीं भाव मनीं नाइके वचन । आपल्या आपण नाडियेलें ॥३॥ तुका म्हणे त्यासी काय व्याली रांड । करी बडबड रात्रंदिवस ॥४॥

२९९८. समर्थासी लाज आपुल्या नामाची । शरण आल्याची लागे चिंता ॥१॥ न पाहे तयाचे गुण दोष अन्याय । सुख देउनि साहे दुःख त्याचे ॥२॥ मान भलेपण नाहीं फुकासाठीं । जयावरि गांठी झीज साहे ॥३॥ तुका म्हणे हे तूं सर्वही जाणसी । मज अधिरासी धीर नाहीं ॥४॥

२९९९. आनंदें कीर्तन कथा करीं घोष । आवडीचा रस प्रेमसुख ॥१॥ मज या आवडे

वैष्णवांचा संग । तेथें नाहीं लाग कळिकाळाचा ॥२॥ स्वल्प मंत्र वाचे बैसलासे निका । रामकृष्ण सखा नारायण ॥३॥ उच्चारितां दुजें वाटे मज लाज । उपदेश काज आन नाहीं ॥४॥ तुका म्हणे मन रंगलेंसे ठायीं । माझें तुझ्या पायीं पांडुरंगा ॥५॥

३०००. आतां पाहाशील काय माझा अंत । आलों शरणागत तुज देवा ॥१॥ करीं अंगीकार राखें पायांपाशीं । झणी दिसों देसी कीविलवाणें ॥२॥ नाहीं आइकिली मागें ऐसी मात । जे त्वां शरणागत उपेक्षिले ॥३॥ तुका म्हणे आतां धरीं अभिमान । आहेसी तूं दानशूर दाता ॥४॥

३००१. होईल तो भोग भोगीन आपुला । न घलीं विठ्ठला भार तुज ॥१॥ तुम्हांपासाव हें इच्छीतसें दान । अंतरींचें ध्यान मुखीं नाम ॥२॥ नये काकुलती गर्भवासासाठीं । न धरीं हें पोटीं भय कांहीं ॥३॥ तुका म्हणे मज उदंड एवढें । नाचेन मी पुढें मायबापा ॥४॥

३००२. करावा संकोच चित्ताचि भोवता । होय तें बहुतां सुख कीजे ॥१॥ देवाची पूजा हे भूताचें पाळण । मत्सर तो सीण बहुताचा ॥२॥ रुसावें फुगावें आपुलिया वरी । उरला तो हरी सकळही ॥३॥ तुका म्हणे संतपण याचि नांव । जरी होय जीव सकळांचा ॥४॥

३००३. नाहीं जप तप जीवासी आटणी । मनासी दाटणी नाहीं केली ॥१॥ निजलिया ठायीं फोकारिला धांवा । सांकडें तें देवा तुज माझें ॥२॥ नाहीं आणूनियां समर्पिलें जळ । सेवा ते केवळ चिंतनाची ॥३॥ तुका म्हणे आम्हीं वेंचिली उत्तरें । घेतलीं उदारें मायबापें ॥४॥

३००४. देह तंव आहे प्रारब्धा अधीन । याचा मी कां सीण वाहूं भार ॥१॥ सरो माझा काळ तुझिया चिंतनें । कायावाचामनें इच्छीतसें ॥२॥ लाभ तो न दिसे याहूनि दुसरा । आणीक दातारा येणें जन्में ॥३॥ तुका म्हणे आलों सोसीत संकटें । मी माझें वोखटें आहे देवा ॥४॥

३००५. सकळ तुझे पायीं मानिला विश्वास । न करीं उदास आतां मज ॥१॥ वाचे गातां गोड आइकतां कानीं । पाहातां लोचनीं मूर्ती तुझी ॥२॥ मन स्थिर माझें झालेंसें निश्चळ । वारिले सकळ आशापाश ॥३॥ जन्मजराव्याधि निवारलें दुःख । वोसंडलें सुख प्रेमधारी ॥४॥ तुका म्हणे मज झाला हा निर्धार । आतां वांयां फार काय बोलों ॥५॥

३००६. नये माझा तुम्हां होऊं शब्दस्पर्श । विप्र तुम्ही विद्वांस ब्राह्मणांसी ॥१॥ म्हणोनियां तुम्हां करितों विनंती । द्यावें शेष हातीं उरलें तें ॥२॥ वेदी कर्म जैसें बोलिलें विहित । करावी ते नीत विचारूनि ॥३॥ तुमचा स्वधर्म माझा अधिकार । भोजन उत्तर तुका म्हणे ॥४॥

३००७. बहुत असती मागें सुखीं केलीं । अनाथा माउली जिवांची तूं ॥१॥ माझिया संकटा न धरीं आळस । लावूनियां कासे पार पावीं ॥२॥ कृपावंता करा ज्याचा अंगीकार । तया संवसार नाहीं पुन्हा ॥३॥ विचारितां नाहीं दुजा बळिवंत । ऐसा सर्वगत व्यापी कोणी ॥४॥

म्हणउनि दिला मुळीं जीवभाव । देह केला वाव समाधिस्थ ॥५॥ तुका म्हणे नाहीं जाणत आणीक । तुजविण एक पांडुरंगा ॥६॥

३००८. आम्हां देणें धरा सांगतों तें कानीं । चिंता पाय मनीं विठोबाचे ॥१॥ तेणें माझे चित्ता होय समाधान । विलास मिष्टान्न नलगे सोनें ॥२॥ व्रत एकादशी दारीं वृंदावन । कंठीं ल्या रे लेणें तुळसीमाळा ॥३॥ तुका म्हणे त्याचे घरींची उष्टावळी । मज ते दिवाळी दसरा सण ॥४॥

३००९. आवडी धरोनी आलेती आकारा । केला हा पसारा याजसाठीं ॥१॥ तें मी तुझें नाम गाईन आवडी । क्षण एक घडी विसंबेना ॥२॥ वर्म जाणावें हा मुख्य धर्मसार । अवघे प्रकार तया पोटीं ॥३॥ वेगळ्या विचारें वेगळाले भाव । धरायासी ठाव बहु नाहीं ॥४॥ तुका म्हणे घालूं इच्छेचिये पोटीं । कवळुनी धाकुटी मूर्ती जीवें ॥५॥

३०१०. भागलों मी आतां आपुल्या स्वभावें । कृपा करोनि देवें आश्वासीजे ॥१॥ देउनि आलिंगन प्रीतीच्या पडिभरें । अंगें हीं दातारें निववावीं ॥२॥ अमृताची दृष्टी घालूनियां वरी । शीतळ हा करीं जीव माझा ॥३॥ घेईं उचलूनि पुसें तहानभूक । पुसीं माझें मुख पीतांबरें ॥४॥ बैसोनियां माझी धरीं हनुवटी । ओवाळुनी दिठी करूनी सांडीं ॥५॥ तुका म्हणे बाप्पा अहो विश्वंभरा । आतां कृपा करा ऐसी कांहीं ॥६॥

३०११. न सरे लुटितां मागें बहुता जनीं । जुनाट हे खाणी उघडिली ॥१॥ सिद्ध महामुनि साधक संपन्न । तीहीं हें जतन केलें होतें ॥२॥ पायाळाच्या गुणें पडिलें ठाऊकें । जगा पुंडलिकें दाखविलें ॥३॥ तुका म्हणे तेथें होतों मी दुबळा । आलें या कपाळा थोडें बहु ॥४॥

३०१२. भगवें तरी श्वान सहज वेष त्याचा । तेथें अनुभवाचा काय पंथ ॥१॥ वाढवुनी जटा फिरे दाही दिशा । तरी जंबु वेषा सहज स्थिति ॥२॥ कोरोनियां भूमी करी मध्यें वास । तरी उंदिरास काय वाणी ॥३॥ तुका म्हणे ऐसे कासया करावें । देहासी दंडावें वाउगेंचि ॥४॥

३०१३. धन्य दिवस आजि डोळियां लाधला । आनंद देखिला धणीवरी ॥१॥ धन्य झालें मुख निवाली रसना । नाम नारायणा घोष करी ॥२॥ धन्य हें मस्तक सर्वांगा शोभलें । संतांचीं पाउलें लागताती ॥३॥ धन्य आजि पंथें चालती पाउलें । टाळिया शोभले कर दोन्ही ॥४॥ धन्य तुका म्हणे आम्हांसी फावलें । पावलों पाउलें विठोबाचीं ॥५॥

३०१४. बरवी हे वेळ सांपडली संधि । साह्य झाली बुद्धि संचितासी ॥१॥ येणें पंथें माझीं चालिलीं पाउलें । दरुषण झालें संतां पायीं ॥१॥ त्रासिलें दरिद्रें दोषा झाला खंड । त्याचि काळें पिंड पुनीत झाला ॥३॥ तुका म्हणे झाला अवघा व्यापार । आली वेरझार फळासी हे ॥४॥

३०१५. आपणा लागे काम वाण्याघरीं गूळ । त्याचें याति कुळ काय कीजे ॥१॥ उकरड्यावरी वाढली तुळसी । टाकावी ते कैसी ठायागुणें ॥२॥ गाईचा जो भक्ष अमंगळ

खाय । तिचें दुध काय सेवूं नये ॥३॥ तुका म्हणे काय सालपटासी काज । फणसांतील बीज काढुनि घ्यावें ॥४॥

३०१६. जयासी नावडे वैष्णवांचा संग । जाणावा तो मांग जन्मांतरींचा ॥१॥ अपवित्र वाचा जातीचा अधम । आचरण धर्म नाहीं जया ॥२॥ मंजूळवदनीं बचनागाची कांडी । शेवटीं विघडी जीवप्राणा ॥३॥ तुका म्हणे ज्याचा पिता नाहीं शुद्ध । तयासी गोविंद अंतरला ॥४॥

३०१७. वांझेनें दाविलें गऱ्हवार लक्षण । चिरगुटें घालून वाथयाला ॥१॥ तेवी शब्द ज्ञणी करिती चावटी । ज्ञान पोटासाटीं विकूनियां ॥२॥ बोलाचीच कढी बोलाचाचि भात । जेवूनियां तृप्त कोण झाला ॥३॥ कागदीं लिहीतां नामाची साखर । चाटितां मधुर गोडी नेदी ॥४॥ तुका म्हणे जळो जळो ते महंती । नाहीं लाज चित्तीं निसुगाला ॥५॥

३०१८. जुंझायाच्या गोष्टी ऐकतांची सुख । करितां देहदु:ख थोर आहे ॥१॥ तैसी हरिभक्ति सुळावरील पोळी । निवडे तो बळी विरळा शूर ॥२॥ पिंड पोसिलिया विषयांचा पाइक । वैकुंठनायक कैंचा तेथें ॥३॥ तुका म्हणे व्हावें देहासी उदार । रखुमादेवीवर जोडावया ॥४॥

३०१९. अंगीं ब्रह्मक्रिया खिस्तीचा व्यापार । हिंडे घरोघर चांडाळांचे ॥१॥ अंत्यजाची खिचडी घेताती मागून । गाळियाप्रदान मायबहिणी ॥२॥ उत्तमकुळीं जन्म क्रिया अमंगळ । बुडविलें कुळ उभयतां ॥३॥ तुका म्हणे ऐसी कलियुगाची चाली । स्वार्थें बुडविली आचरणें ॥४॥

३०२०. पाषाण प्रतिमा सोन्याच्या पादुका । हें तो हातीं एका समर्थाचे ॥१॥ अनामिका हातीं समर्थाचा शिक्का । न मानितां लोकां येइल कळों ॥२॥ तुका म्हणे येथें दुराग्रह खोटा । आपुल्या अदृष्टा शरण जावें ॥३॥

३०२१. बहु या प्रपंचें भोगविल्या खाणी । ठाकोनियां मनीं आला सीण ॥१॥ आतां पायांपाशीं लपवावें देवा । नका पाहूं सेवा भक्ती माझी ॥२॥ बहु भय वाटे एकाच्या बोभाटें । आली घायवटे फिरोनियां ॥३॥ तुका म्हणे सिगे भरूं आलें माप । वियोग संताप झाला तुझा ॥४॥

३०२२. धरूनियां मनीं बोलिलों संकल्प । होसी तरि बाप सिद्धी नेई ॥१॥ उत्कंठा हे आजी झाली माझे पोटीं । मागील या गोठी टाळा टाळी ॥२॥ माझा मज असे ठाउका निर्धार । उपाधि उत्तर न साहे पैं ॥३॥ तुका म्हणे तुज दिली आठवण । तरि अभिमान धरीं माझा ॥४॥

३०२३. आजिवरी होतों संसाराच्या हातीं । आतां ऐसें चित्तीं उपजलें ॥१॥ तुम्हां शरणागत व्हावें नारायणा । अंगिकारा दीना आपुलिया ॥२॥ विसरलों काम याजसाठी धंदा । सकळ गोविंदा माझें तुझें ॥३॥ तुका म्हणे विज्ञापना परिसावी । आवडी हे जीवीं झाली तैसी ॥४॥

३०२४. धन्य धन्य ज्यांस पंढरीचा वास । धन्य ते जन्मास प्राणी आले ॥१॥ चहुं खाणींमध्यें होत कोणी एक । त्रिगुण कीटक पक्षिराज ॥२॥ उत्तम चांडाळ नर नारी बाळ । अवघेचि सकळ चतुर्भुज ॥३॥ अवघा विठ्ठल तेथें दुजें नाहीं । भरला अंतर्बाहीं सदोदित ॥४॥ तुका म्हणे तेथें होउनी राहेन । सांडोवा पाषाण पंढरीचा ॥५॥

३०२५. असंत लक्षण भूतांचा मत्सर । मनासी निष्ठुर अतिवादी ॥१॥ अंतरींचा रंग उमटे बाहेरी । वोळखि यापरी आपेंआप ॥२॥ संत ते समय वोळखती वेळ । संतुष्ट निर्मळ चित्त सदा ॥३॥ तुका म्हणे हित उचित अनुचित । मज लागे नित्य विचारावें ॥४॥

३०२६. विठ्ठलावांचोनि ब्रह्म जें बोलती । वचन तें संतीं मानूं नये ॥१॥ विठ्ठलावांचूनि ज्या ज्या उपासना । अवघिया जाणा श्रमचि तो ॥२॥ विठ्ठलावांचूनि सांगतील गोष्टी । वांयां ते हिंपुटी होती जाणा ॥३॥ विठ्ठलावांचूनि जें कांहीं जाणती । तितुल्या वित्पति वाउगीं या ॥४॥ तुका म्हणे एक विठ्ठलचि खरा । येर तो पसारा वाउगाचि ॥५॥

३०२७. सर्व काळ डोळां बैसो नारायण । नयो अभिमान आड पुढें ॥१॥ धाड पडो माझ्या थोरपणावरि । वाचे हरि हरि उच्चारीन ॥२॥ जळो अंतरींचें सर्व जाणपण । विवादवचन अहंतेचें ॥३॥ सकळां चरणीं गळित माझा जीव । तुका म्हणे भाव एकविध ॥४॥

३०२८. मधुरा उत्तरासवें नाहीं चाड । अंतरंगीं वाढ प्रेम असो ॥१॥ प्राणावेगळा न करी नारायण । मग नसो ज्ञान मूर्ख बरा ॥२॥ जननिंदा होय तो बरा व्यापार । थोरवीचा भार कामा नये ॥३॥ तुका म्हणे भाव निष्ठावंत चित्तीं । दया क्षमा शांती सर्वां भूतीं ॥४॥

३०२९. झाडें वोरपोनि खाऊनियां पाला । आठवी विठ्ठला वेळोवेळां ॥१॥ वल्कलें नेसूनि ढुंगा गुंडाळून । सांडी देहभान जवळूनी ॥२॥ लोकमान वमनासमान मानणें । एकांतीं राहणें विठोसाठीं ॥३॥ सहसा करूं नये प्रपंचीं सौजन्य । सेवावे अरण्य एकांतवास ॥४॥ ऐसा हा निर्धार करी जो मनाचा । तुका म्हणे त्याचा पांग फिटे ॥५॥

३०३०. भक्तिभावें करीं बैसोनि निश्चित । नको गोवूं चित्त प्रपंचासी ॥१॥ एक दृढ करीं पंढरीचा राव । मग तुज उपाव पुढिल सुचे ॥२॥ नको करूं कांहीं देवतापूजन । जप तप ध्यान तेंही नको ॥३॥ मानिसिल झणीं आपलिक कांहीं । येरझारा पाहीं न चुके कदा ॥४॥ ऐसे जन्म किती पावलासी देहीं । अझुनि कां नाहीं कळली सोय ॥५॥ सोय धरीं आतां होय पां सावध । अनुभव आनंद आहे कैसा ॥६॥ सहज कैसें आहे तेथींचें तें गुज । अनुभवें निज पाहे तुकीं ॥७॥ तुका म्हणे आतां होई तूं सावध । तोडीं भवबंध एका जन्में ॥८॥

३०३१. दोराच्या आधारें पर्वत चढला । पाउलासी केला अपघात ॥१॥ अष्टोत्तरशें व्याधी वैद्यें दवडुनि । तो वैद्य मारूनि उत्तीर्णता ॥२॥ नव मास माया वाहिलें उदरीं । ते माता चौबारीं

नग्न केली ॥३॥ गायत्रीचें क्षीर पिळुनी घेउनी । उपवासी बांधोन ताडीतसे ॥४॥ तुका म्हणे गुरुनिंदकाचें तोंड । पाहातां नरककुंड पूर्वजांसी ॥५॥

३०३२. न कळे ब्रह्मज्ञान आचार विचार । लटिका वेव्हार करीतसे ॥१॥ विश्वामित्री पोटीं तयाचा अवतार । नांव महाखर चांडाळाचें ॥२॥ द्रव्यइच्छेसाठीं करीतसे कथा । काय त्या पापिष्टा न मिळे खाया ॥३॥ पोट पोसावया तोंडें बडबडी । नाहीं धडफुडी एक गोष्टी ॥४॥ तुका म्हणे तया काय व्याली रांड । येउनियां भाड जनामध्यें ॥५॥

३०३३. नित्य उठोनियां खावयाची चिंता । आपुल्या तूं हिता नाठवीसी ॥१॥ जननीचे पोटीं उपजलासी जेव्हां । चिंता तुझी तेव्हां केली तेणें ॥२॥ चातकांलागूनि मेघ नित्य वर्षे । तो तुज उदास करील केवीं ॥३॥ पक्षी वनचरें आहेत भूमीवरि । तयांलागीं हरि उपेक्षीना ॥४॥ तुका म्हणे भाव धरुन राहे चित्तीं । तरि तो श्रीपति उपेक्षीना ॥५॥

३०३४. पूर्वींहूनि बहु भक्त सांभाळिले । नाहीं अव्हेरिले दास कोणी ॥१॥ जे जे शरण आले ते ते आपंगिले । पवाडे विठ्ठले ऐसे तुझे ॥२॥ मिरवे चरणीं ब्रीद ऐसीये गोष्टीचें । भक्तसांभाळाचें प्रेम ऐसें ॥३॥ तुका म्हणे आम्हांसाठीं येणें रूपा । माझ्या मायबापा पांडुरंगा ॥४॥

३०३५. भक्तकरुणा बहुत तुझिया अंतरा । मज विश्वंभरा कळों आलें ॥१॥ पक्षीयासी तुझें नाम जें ठेविलें । तयें उद्धरिलें गणिकेसी ॥२॥ कुंटिणी ते दोष बहु आचरली । नाम घेतां आली करुणा तुज ॥३॥ हृदय कोमळ तुझें नारायणा । ऐसें बहुतां जना तारियलें ॥४॥ तुका म्हणे सीमा नाहीं तुझे दये । कोमळ हृदय पांडुरंगा ॥५॥

३०३६. अजामीळा अंत मरणासी आला । तोंवरि स्मरला नाहीं तुज ॥१॥ प्राण जातेवेळे म्हणे नारायण । त्यासाठीं विमान पाठविलें ॥२॥ बहुत कृपाळु होसी जगन्नाथा । त्रैलोक्यसमर्था सोइरिया ॥३॥ तुका म्हणे भक्तकाज तूं कैवारी । तुज साही चारी वर्णिताती ॥४॥

३०३७. धर्म रक्षावया अवतार घेशी । अपुल्या पाळिसी भक्तजना ॥१॥ अंबऋषीसाठीं जन्म सोसियेले । दुष्ट निर्दाळिले किती एक ॥२॥ धन्य तुज कृपासिंधु म्हणतील । आपुला तूं बोल साच करीं ॥३॥ तुका म्हणे तुज वर्णिती पुराणें । होय नारायण दयासिंधु ॥४॥

३०३८. येउनी जाउनी पाहें तुजकडे । पडिल्या सांकडें नारायणा ॥१॥ आणीक कोणाचा मज नाहीं आधार । तुजवरि भार जीवें भावें ॥२॥ निष्ठुर अथवा होईं तूं कृपाळ । तुज सर्वकाळ विसरेना ॥३॥ आपुलें वचन राहें सांभाळून । तुम्हां आम्हां जाण पडिपाडु ॥४॥ ज्याच्या वचनासी अंतर पडेल । बोल तो येईल तयाकडे ॥५॥ तुम्हां आम्हां तैसें नाहीं म्हणे तुका । होशील तूं सखा जीवलग ॥६॥

३०३९. आईकें नारायणा वचन माझें खरें । सांगतों निधारें तुजपाशीं ॥१॥ नाहीं भाव मज

पडिली लोकलाज । राहिलेंसे काज तुझे पायीं ॥२॥ वरदळ भक्ती करितों मी नित्य । परि नाहीं चित्त तुझे पाईं ॥३॥ जरि तुज कांहीं करणें उचित । तारीं तूं पतित तुका म्हणे ॥४॥

३०४०. अनाथ परदेशी हीन दीन भोळें । उगलेंचि लोळे तुझे रंगीं ॥१॥ आपुलें म्हणावें मज नुपेक्षावें । प्रेमसुख द्यावें मायबापा ॥२॥ कासविचे परी पाहे दृष्टीं मज । विज्ञानीं उमज देवुनियां ॥३॥ तुका म्हणे तुझा झालों शरणागत । काया वाचा चित्त दुजें नाहीं ॥४॥

३०४१. पावलों पंढरी वैकुंठभुवन । धन्य आजि दिन सोनियाचा ॥१॥ पावलों पंढरी आनंदगजरें । वाजतील तुरें शंख भेरी ॥२॥ पावलों पंढरी क्षेम आलिंगनीं । संत या सज्जनीं निवविलों ॥३॥ पावलों पंढरी पार नाहीं सुखा । भेटला हा सखा मायबाप ॥४॥ पावलों पंढरी येरझार खुंटली । माउली वोळली प्रेमपान्हा ॥५॥ पावलों पंढरी आपुलें माहेर । नाहीं संवसार तुका म्हणे ॥६॥

३०४२. खिस्तीचा उदीम उदीमांत हीन । करिती ब्राह्मण कलियुगीं ॥१॥ वेवसाव करी पर्वत मांगापासीं । ते पैं विटाळासी न मानिती ॥२॥ मांगिणीशीं नित्य करीतसे लेखा । तोंडावरि थुंका पडतसे ॥३॥ आशा माया रांडा नांव हें कागदीं । आठवीना कधीं नारायण ॥४॥ तुका म्हणे देह झाले पराधीन । पांडुरंगाविण गति नाहीं ॥५॥

३०४३. तूं आम्हां सोयरा सज्जन सांगाती । तुजमज प्रीति चालों सदा ॥१॥ तूं माझा जिव्हाळा जीवाचा जीवलग । होसी अंतरंग अंतरींचा ॥२॥ गण गोत मित्र तूं माझें जीवन । अनन्य शरण तुझ्या पायीं ॥३॥ तुका म्हणे सर्वगुणें तुझा दास । आवडे अभ्यास सदा तुझा ॥४॥

३०४४. आवडेल तैसें तुज आळवीन । वाटे समाधान जीवा तैसें ॥१॥ नाहीं येथें कांहीं लौकिकाची चाड । तुजविण गोड देवराया ॥२॥ पुरवीं मनोरथ अंतरींचे आर्त । धाये वरि गीत गाय तुझें ॥३॥ तुका म्हणे लेंकी आळवी माहेरा । गाऊं या संसारा तुज तैसें ॥४॥

३०४५. माझें मुख नामीं रंगो सर्वकाळ । गोविंद गोपाळ रामकृष्ण ॥१॥ अबद्ध चांगलें गाऊं भलतैसें । बाळ वदे जैसें मायबापा ॥२॥ तुका म्हणे मज न लावी वांकडें । मी तुझें बोबडें बाळ तान्हें ॥३॥

३०४६. यालागीं आवडी म्हणा रामकृष्ण । जोडा नारायण सर्व काळ ॥१॥ सोपें हें साधन लाभ येतो घरा । वाचेसी उच्चारा राम हरि ॥२॥ न लागती कष्ट नलगे सायास । करावा अभ्यास विठ्ठलाचा ॥३॥ नलगे तप तीर्थ करणें महादान । केल्या एक मन जोडे हरि ॥४॥ तुका म्हणे कांहीं न वेचितां धन । जोडे नारायण नामासाठीं ॥५॥

३०४७. पापिया चांडाळा हरिकथा नावडे । विषयी आवडे गाणें त्याला ॥१॥ ब्राह्मणा दक्षणा देतां रडे रुका । विषयालागीं फुका लुटी धन ॥२॥ वीतभरि लंगोटी नेदी

अतिताला । भोरप्यासी शाला वांटीतसे ॥३॥ तुका म्हणे त्याच्या थुंका तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥४॥

३०४८. क्षुधार्थी दुष्काळें अन्नें पीडियेले । मिष्टान्न देखिलें तेणें जैसें ॥१॥ तैसें तुझे पायीं लांचावलें मन । झुरे माझा प्राण भेटावया ॥२॥ मांजरें देखिला लोणियाचा गोळा । लावूनियां डोळां बैसलेंसे ॥३॥ तुका म्हणे आतां झडी घालूं पाहें । पांडुरंगे माय तुझे पायीं ॥४॥

३०४९. स्वामीसी संकट पडे जे गोष्टीचें । काय त्या प्रेमाचें सुख मज ॥१॥ दुखवीना चित्त तुझें नारायणा । कांहींच मागेना तुजपासीं ॥२॥ रिद्धि सिद्धि मोक्ष संपत्ति विलास । सोडियेली आस यांची जीवें ॥३॥ तुका म्हणे एक वेळ देईं भेटी । वोरसोनि पोटीं आळिंगावें ॥४॥

३०५०. देव तिहीं बळें धरिला सायासें । करूनियां नास उपाधीचा ॥१॥ पूर्वपक्षी धातु धिक्कारिलें जन । स्वयें जनार्दन तेचि झाले ॥२॥ तुका म्हणे यासी न चले तांतडी । अनुभवें गोडी येईल कळों ॥३॥

३०५१. भेटीवांचोनियां दुजें नाहीं चित्तीं । येणे काकुलती याजसाठीं ॥१॥ भेटोनियां बोलें आवडीचें गुज । आनंदाच्या भोजे जेवूं संगें ॥२॥ मायलेंकरासी नाहीं दुजी परि । जेवूं बरोबरी बैसोनियां ॥३॥ तुका म्हणे ऐसें अंतरींचें आर्त । यावें जी त्वरित नारायणा ॥४॥

३०५२. जायाचें शरीर जाईल क्षणांत । कां हा गोपीनाथ पावेचि ना ॥१॥ तुम्ही संत सारे कृपेचे सागर । निरोप हा फार सांगा देवा ॥२॥ अनाथ अज्ञान कोणी नाहीं त्याला । पायापें विठ्ठला ठेवीं मज ॥३॥ तुका म्हणे ऐसी करा निरवण । मग तो रक्षण करील माझें ॥४॥

३०५३. त्रासला हा जीव संसारींच्या सुखा । तुजविण सखा नाहीं कोणी ॥१॥ ऐसें माझे मनीं वाटे नारायणा । घालावी चरणावरी मिठी ॥२॥ कइं तें सुंदर देखेन रूपडें । आवडीच्या कोडें आळंगीन ॥३॥ नाहीं पूर्वपुण्य मज पामरासी । म्हणोनि पायांसी अंतरलों ॥४॥ अलभ्य लाभ कैंचा संचितावेगळा । विनवी गोपाळा दास तुका ॥५॥

३०५४. मोलाचें आयुष्य वेचुनियां जाय । पूर्वपुण्यें होय लाभ याचा ॥१॥ अनंत जन्माचा शेवट पाहतां । नरदेह हातां आला तुझ्या ॥२॥ कराल ते जोडी येईल कार्यासी । ध्यावें विठ्ठलासी सुखालागीं ॥३॥ सांचलिया धन होईल ठेवणें । तैसी नारायण जोडी करा ॥४॥ करा हरिभक्ती परलोकीं कामा । सोडविल यमापासोनियां ॥५॥ तुका म्हणे करा आयुष्याचें मोल । नका वेंचूं बोल नामेंविण ॥६॥

३०५५. काय सुख आहे वाउगें बोलतां । ध्यातां पंढरीनाथा कष्ट नाहीं ॥१॥ सर्वकाळ वाचे उच्चारितां हरि । तया सुखा सरी पार नाहीं ॥२॥ रामकृष्णरंगीं रसना रंगली । अमृत उकली नाम तुझें ॥३॥ तुका म्हणे धन्य तयाचें वदन । जया नारायण ध्यानीं मनीं ॥४॥

३०५६. कीर्तनाच्या सुखें सुखी होय देव। पंढरीचा राव संगीं असे ॥१॥ भक्त जाय सदा हरिकीर्ति गात। त्यासवें अनंत हिंडतसे ॥२॥ त्रैलोक्य भ्रमण फिरत नारद। त्यासवें गोविंद फिरतसे ॥३॥ नारद मंजूळ सुस्वरें गीत गाय। मार्गीं चालताहे संगें हरि ॥४॥ तुका म्हणे त्याला गोडी कीर्तनाची। नाहीं आणिकांची प्रीति ऐसी ॥५॥

३०५७. मायेविण बाळ क्षणभरि न राहे। न देखतां होय कासावीस ॥१॥ आणिक उदंड बुझाविती तरी। छंद त्या अंतरीं माउलीचा ॥२॥ नावडती तया बोल आणिकाचे। देखोनियां नाचे माय दृष्टी ॥३॥ तुका म्हणे माझी विठ्ठल माउली। आणिकांचे बोलीं चाड नाहीं ॥४॥

३०५८. हरिचिया भक्ता नाहीं भयचिंता। दुःख निवारिता नारायण ॥१॥ नलगे वाहणें संसार उद्वेग। जडों नेदी पांग देवराव ॥२॥ असों द्यावा धीर सदा समाधान। आहे नारायण जवळीच ॥३॥ तुका म्हणे माझा सखा पांडुरंग। व्यापियेलें जग तेणें एकें ॥४॥

३०५९. दसरा दिवाळी तोचि माझा सण। सखे हरिजन भेटतील ॥१॥ अमुप जोडिल्या पुण्याचिया राशी। पार त्या सुखासी नाहीं लेखा ॥२॥ धन्य दिवस आजी झाला सोनियाचा। पिकली हे वाचा रामनामें ॥३॥ तुका म्हणे काय होऊं उतराई। जीव ठेवूं पायीं संतांचिये ॥४॥

३०६०. हाचि माझा नेम धरिला हा धंदा। यावरि गोविंदा भेटी द्यावी ॥१॥ हाचि माझा ध्यास सदा सर्वकाळ। न्यावयासी मूळ येसी कधीं ॥२॥ डोळियांची भूक पाहतां श्रीमुख। आलिंगनें सुख निवती भुजा ॥३॥ बहु चित्त ओढे तयाचिये सोई। पुरेल हा कईं नवस नेणों ॥४॥ बहुबहु काळ झालों कासावीस। वाहिलें बहुवस कलेवर ॥५॥ तुका म्हणे आतां पडावें हें ओझें। पांडुरंगा माझें इयावरि ॥६॥

३०६१. जेणें माझें हित होईल तो उपाव। करिसील भाव जाणोनियां ॥१॥ मज नाहीं सुख दुःख तया खंती। भावना हे चित्तीं नाना छंदें ॥२॥ तोडीं हे संबंध तोडीं आशापाश। मज हो सायास न करितां ॥३॥ तुका म्हणे मी तों राहिलों निश्चिंत। कवळोनि एकांत सुख तुझें ॥४॥

३०६२. शिखा सूत्र तुझा गुंतला जमान। तोवरि तूं जाण श्रुतिदास ॥१॥ त्याची तुज कांहीं चुकतांचि नीत। होसील पतित नरकवासी ॥२॥ बहु तूं झालासी चतुरशाहाणा। शुद्ध आचरणा चुकों नको ॥३॥ शिखा सूत्र याचा तोडीं तूं संबंध। मग तुज बाध नाहीं नाहीं ॥४॥ तुका म्हणे तरि वर्तूनि निराळा। उमटती कळा ब्रह्मींचिया ॥५॥

३०६३. पतिव्रता ऐसी जगामध्यें मात। भोगी पांच सात अंधारीं ते ॥१॥ भ्रतारासी लेखी श्वानाचे समान। परपुरुषीं मन संभ्रम तो ॥२॥ तुका म्हणे तिच्या दोषा नाहीं पार। भोगील अघोर कुंभपाक ॥३॥

३०६४. सिंदळीस नाहीं पोराची पैं आस। राहे बीज त्यास काय करी ॥१॥ अथवा

सेतीं बीज पेरिलें भाजोन । सारा देईल कोण काका त्याचा ॥२॥ तुका म्हणे नाहीं राखायाची चाड । तरि कां लिगाड करूनि घेतो ॥३॥

३०६५. संसारा आलिया एक सुख आहे। आठवावे पाय विठोबाचे ॥१॥ येणें होय सर्व संसार सुखाचा। नलगे दुःखाचा लेश कांहीं ॥२॥ घेतील तयांसी सोपें आहे सुख। बोलयेले मुखें नारायण ॥३॥ सांगितली सोय करुणासागरें। तुम्हां कां हो बरें न वाटे तें ॥४॥ तुका म्हणे तेणें उपचार केला। भोळ्याभाविकांला तरायासी ॥५॥

३०६६. चाले हें शरीर कोणाचिये सत्ते। कोण बोलवितें हरीविण ॥१॥ देखवी ऐकवी एक नारायण। तयाचें भजन चुकों नको ॥२॥ माणसाची देव चालवी अहंता। मीचि एक कर्ता म्हणो नये ॥३॥ वृक्षाचेही पानें हाले त्याची सत्ता। राहिली अहंता मग कोठें ॥४॥ तुका म्हणे विठो भरला सबाह्य। उणें काय आहे चराचरीं ॥५॥

३०६७. मायारूपें ऐसे मोहिलेसे जन। भोगिती पतन नानाकर्में ॥१॥ काय याची प्रीती करितां आदर। दुरवितां दूर तेंचि भलें ॥२॥ नाना छंदें अंगीं वसती विकार। छळियेले फार तपोनिधी ॥३॥ तुका म्हणे ऐसें सिकवितों तुज। आतां धरीं लाज मना पुढें ॥४॥

३०६८. जे जे कांहीं मज होईल वासना। ते ते नारायणा व्हावें तुम्हीं ॥१॥ काय भाव एक निवडूं निराळा। जाणसी तूं कळा अंतरींची ॥२॥ तुजविण मज कोण आहे सखा। जें सांगों आणिका जीवभाव ॥३॥ अवघें पिशुन झालें असे जन। आपपर कोण नाठवे हें ॥४॥ तुका म्हणे तूंचि जीवांचें जीवन। माझें समाधान तुझे हातीं ॥५॥

३०६९. कैसी करूं आतां सांग तुझी सेवा। शब्दज्ञानें देवा नाश केला ॥१॥ आतां तुझें वर्म न कळे अनंता। तुज न सांगतां बुडूं पाहे ॥२॥ संध्या स्नान केली आचाराची नासी। काय तयापाशीं म्हणती एक ॥३॥ बुडविली भक्ति म्हणती ते पाषाण। पिंडाचे पाळण स्थापुनियां ॥४॥ न करावी कथा म्हणती एकादशी। भजनासी नासी मांडियेली ॥५॥ न जावें देउळा म्हणती देव घरीं। बुडविलें या परी तुका म्हणे ॥६॥

३०७०. नमोनमो तुज माझें हें करणे। काय झालें उणें करितां स्नान ॥१॥ संताचा मारग चालतों झाडूनि। हो कां लाभ हानि कांहीं तरी ॥२॥ न करिसी तरी हेंचि कोडें मज। भक्ति गोड काज आन नाहीं ॥३॥ करीं सेवा कथा नाचेन रंगणीं। प्रेमसुख धणी पुरेल तों ॥४॥ महाद्वारीं सुख वैष्णवांचे मेळीं। वैकुंठ जवळी वसे तेथें ॥५॥ तुका म्हणे नाहीं मुक्तिसवें चाड। हेंचि जन्म गोड घेतां मज ॥६॥

३०७१. होउनि संन्यासी भगवीं लुगडीं। वासना न सोडी विषयांची ॥१॥ निंदिती कदान्न इच्छिती देवान्न। पाहाताती मान आदराचा ॥२॥ तुका म्हणे ऐसें दांभिक भजन। तया

जनार्दन भेटे केवीं ॥३॥

३०७२. लांबवूनि जटा नेसोनि कासोटा । अभिमान मोठा करिताती ॥१॥ सर्वांगा करिती विभूतीलेपन । पाहाती मिष्टान्न भक्षावया ॥२॥ तुका म्हणे त्यांचा नव्हे हा स्वधर्म । न कळतां वर्म मिथ्यावाद ॥३॥

३०७३. कान फाडूनियां मुद्रा ते घालिती । नाथ म्हणविती जगामाजी ॥१॥ घालोनियां फेरा मागती द्रव्यासी । परि शंकरासी नोळखती ॥२॥ पोट भरावया शिकती उपाय । तुका म्हणे जाय नरकलोका ॥३॥

३०७४. कौडीकौडीसाठीं फोडिताती शिर । काढूनि रुधिर मलंग ते ॥१॥ पांघरती चर्म लोहाची सांकळी । मारिती आरोळी धैर्यबळें ॥२॥ तुका म्हणे त्यांचा नव्हेचि स्वधर्म । न कळे तें वर्म गोविंदाचें ॥३॥

३०७५. दाढी डोई मुंडी मुंडुनियां सर्व । पांघुरती बरवीं वस्त्रें काळीं ॥१॥ उफराटी काठी घेऊनियां हातीं । उपदेश देती सर्वत्रांसी ॥२॥ चाळवुनि रांडा देऊनियां भेष । तुका म्हणे त्यास यमदंडी ॥३॥

३०७६. होउनि जंगम विभूति लाविती । शंख वाजविती घरोघरीं ॥१॥ शिवाचें निर्माल्य तीर्था न सेविती । घंटा वाजविती पोटासाठीं ॥२॥ तुका म्हणे त्यांसी नाहीं शिवभक्ति । व्यापार करिती संसाराचा ॥३॥

३०७७. लावूनियां मुद्रा बांधोनियां कंठी । हिंडे पोटासाठीं देशोदेशीं ॥१॥ नेसोनि कोपीन शुभ्रवस्त्र जाण । पाहाती पक्कान्न क्षेत्रींचें तें ॥२॥ तुका म्हणे ऐसे मावेचे मइंद । त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥३॥

३०७८. ऐसे नाना भेष घेउनी हिंडती । पोटासाठीं घेती प्रतिग्रह ॥१॥ परमार्थासी कोण त्यजी संवसार । सांगा पां साचार नांव त्याचें ॥२॥ जन्मतां संसार त्यजियेला शुकें । तोचि निष्कळंक तुका म्हणे ॥३॥

३०७९. स्त्रिया पुत्र कलत्र हे तंव मायावंत । शेवटींचा अंत नपवे कोणी ॥१॥ यमाचिये हातीं बांधोनियां देती । भूषणेंही घेती काढूनियां ॥२॥ ऐसिया चोरांचा कैसा हा विश्वास । धरिली तुझी कास तुका म्हणे ॥३॥

३०८०. न लगती मज शब्दब्रह्मज्ञान । तुझिया दर्शनावांचूनियां ॥१॥ म्हणऊनि तुझें करितों चिंतन । नावडे वचन आणिकांचें ॥२॥ काय तीं महत्त्वें करावी मान्यता । तुज न देखतां पांडुरंगा ॥३॥ तुका म्हणे तुज भेटल्यावांचून । न राहें त्याहून होइन वेडा ॥४॥

३०८१. तुझा म्हणवूनि दिसतों गा दीन । हाचि अभिमान सरे तुझा ॥१॥ अज्ञान बाळका

कोपली जननी । तयासी निर्वाणीं कोण पावे ॥२॥ तैसा विठो तुजविण परदेशी । नको या दु:खासी गोवूं मज ॥३॥ तुका म्हणे मज सर्व तुझी आशा । अगा जगदीशा पांडुरंगा ॥४॥

३०८२. आतां माझ्या दु:खा कोण हो सांगाती । रखुमाईचा पति पावेचि ना ॥१॥ काय विधात्यानें घातलीसे रेखा । सुटका या दु:खा न होयचि ॥२॥ तुका म्हणे माझी विसरूं नको चिंता । अगा पंढरीनाथा पाव वेगीं ॥३॥

३०८३. जन्म मृत्यु फार झाले माझ्या जीवा । ऐक माझा धांवा पांडुरंगा ॥१॥ सिणलों बहुत करितां येरझारा । रखुमाईच्या वरा पावें वेगीं ॥२॥ तुका म्हणे तूं गा पतित पावन । घेई माझा शीण जन्मांतर ॥३॥

३०८४. पंढरीसी जावें ऐसें माझे मनीं । विठाई जननी भेटे केव्हां ॥१॥ नलगे त्याविण सुखाचा सोहळा । लागे मज ज्वाळा अग्निचिया ॥२॥ तुका म्हणे त्याचे पाहिलिया पाय । मग दु:ख जाय सर्व माझें ॥३॥

३०८५. तन मन धन दिलें पंढरिराया । आतां सांगावया उरलें नाहीं ॥१॥ आर्तचाड चिंता नाहीं मनीं आशा । तोडियेला फांसा उपाधीचा ॥२॥ तुका म्हणे एक विठोबाचें नाम । आहे जवळी दाम नाहीं रुका ॥३॥

३०८६. आलिया संसारा उठा वेग करा । शरण जा उदारा पांडुरंगा ॥१॥ देह हें काळाचें धन कुबेराचें । तेथें मनुष्याचें काय आहे ॥२॥ देता देवविता नेता नेवविता । येथें याची सत्ता काय आहे ॥३॥ निमित्याचा धनी केला असे प्राणी । तुका म्हणे म्हणोनि व्यर्थ गेला ॥४॥

३०८७. मायवणीं धाल्या धाय । गर्भ आंवतणें न पाहे ॥१॥ तैसे पूजितां वैष्णव । सुखें संतोषतो देव ॥२॥ पुत्राच्या विजयें । पिता सुखावत जाये ॥३॥ तुका म्हणे अमृतसिद्धि । हरे तृषा आणि व्याधि ॥४॥

३०८८. तुझें अंगभूत । आम्ही जाणतों समस्त ॥१॥ येरा वाटतसे जना । गुढारसें नारायणा ॥२॥ ठावा थारा मारा । घरचिया संवचोरा ॥३॥ तुका म्हणे भेदाभेद । करुनि करितसें वाद ॥४॥

३०८९. तुज दिला देह । आजूनि वागवितों भय ॥१॥ ऐसा विश्वासघातकी । घडली कळतां हे चुकी ॥२॥ बोलतों जें तोंडें । नाहीं अनुभविलें लंडें ॥३॥ दंड लाहे केला । तुका म्हणे जी विठ्ठला ॥४॥

३०९०. सर्वस्वाची साटी । तरिच देवासवें गांठी ॥१॥ नाहीं तरी जया तैसा । भोग भोगविल इच्छा ॥२॥ द्यावें तेंचि घ्यावें । म्हणउनि ज्यावें जीवें ॥३॥ तुका म्हणे उरी । मागें नुरवितां बरी ॥४॥

३०९१. गाढव शृंगारिलें कोडें । कांहीं केल्या नव्हे घोडें ॥१॥ त्याचें भुंकणें न राहे । स्वभावासी करील काय ॥२॥ श्वान शिबिके बैसविलें । भुंकतां न राहे उगलें ॥३॥ तुका म्हणे स्वभावकर्म । कांहीं केल्या न सुटे धर्म ॥४॥

३०९२. आवडे सकळां मिष्टान्न । रोग्या विषा तें समान ॥१॥ काय तया एका साठीं । कामें केलीं अवघीं खोटीं ॥२॥ दर्पण नलगे एका । ठाव नाहीं ज्याच्या नाका ॥३॥ तुका म्हणे खळा । उपदेशाचा कांटाळा ॥४॥

३०९३. अखंड संत निंदी । ऐसी दुर्जनाची बुद्धि ॥१॥ काय म्हणावें तयासी । तो केवळ पापरासी ॥२॥ जो स्मरे रामनामा । त्यासी म्हणती रिकामा ॥३॥ तीर्थव्रत करी । यासी म्हणताती भिकारी ॥४॥ तुका म्हणे विंचाची नांगी । तैसा दुर्जन सर्वांगीं ॥५॥

३०९४. या रे नाचों अवघे जण । भावें आनंदें करून ॥१॥ गाऊं पंढरीचा राणा । क्षेम देऊं संतजना ॥२॥ सुख फुकासाठीं । साधे हरिनाम बोभाटीं ॥३॥ प्रेम वांटितो उदार । देतां नाहीं सान थोर ॥४॥ पापें पळालीं बापुडीं । काळ झाला देशधडी ॥५॥ तुका म्हणे धन्य काळ । आजि प्रेमाचा सुकाळ ॥६॥

३०९५. उपजलें मनीं । हे तों स्वामीची करणी ॥१॥ होइल प्रसादाचें दान । तरि हें कवतुक पाहेन ॥२॥ येइल अभय जरि । तरि हे आज्ञा वंदिन शिरीं ॥ ३॥ भक्तिप्रयोजना । प्रयोजावें बंदीजना ॥ ४॥ यश स्वामिचिये शिरीं । दास्य करावें किंकरीं ॥ ५॥ तुका म्हणे आळीकरा । त्यासी योजावें उत्तरा ॥६॥

३०९६. माझें मन पाहे कसून । चित्त न ढळे तुजपासून ॥१॥ कापुनी देईन शिर । पाहा कृपण कीं उदार ॥ २॥ मजवरि घालीं घण । परि मी न सोडीं चरण ॥३॥ तुका म्हणे अंतीं । तुजवांचूनि नाहीं गति ॥४॥

३०९७. भूमीवरी कोण ऐसा । गांजूं शके हरिच्या दासा ॥१॥ सुखें नाचा हो कीर्तनीं । जयजयकारें गर्जा वाणी ॥२॥ काळा सुटे पळ । जाती दुरितें सकळ ॥३॥ तुका म्हणे चित्तीं । साच माना हे निश्चिंती ॥४॥

३०९८. झाला जीवासी उदार । त्यासी काय भीडभार ॥१॥ करीन आडक्या घोंगडें । उभ्या बाजारीं उघडें ॥२॥ जों जों धरिली भीड । तों तों बहु केली चीड ॥३॥ तुका म्हणे मूळ । तुझें उच्चारीन कुळ ॥४॥

३०९९. मिळे हरिदासांसी दाटी । रीघ न होय शेवटीं ॥१॥ तेथें काय म्यां करावें । माझें कोणें आइकावें ॥२॥ कैसें तुज लाजवावें । भक्त म्हणोनियां भावें ॥३॥ नाचतां नये तालीं । वाजवितां नये टाळी ॥४॥ अति मंडित भूषणें । शरीर माझें दैन्यवाणें ॥५॥

तुका म्हणे कमळापति । मज द्यावें त्यांचे हातीं ॥६॥

३१००. जाणों नेणों काय । चित्तीं धरूं तुझे पाय ॥१॥ आतां हेंचि वर्म । गाऊं धरूनियां प्रेम ॥२॥ काय सांडूं मांडूं । भावें हृदयींच कोंडूं ॥३॥ तुका म्हणे देवा । जन्मोजन्मीं मागें सेवा ॥४॥

३१०१. जाळें घातलें सागरीं । बिंदु न राहे भितरी ॥१॥ तैसें पापियाचें मन । तया नावडे कीर्तन ॥२॥ गाढव गंगेसी न्हाणिलें । जाउनि उकरड्यावरि लोळे ॥३॥ प्रीतीं पोसिलें काउळें । जाउनि विष्ठेवरी लोळे ॥४॥ तुका म्हणे तैसी हरी । कीरव्या नावडे कस्तुरी ॥५॥

३१०२. तरलों म्हणुनि धरिला ताठा । त्यासी चळ झाला फांटा ॥१॥ वांयांविण तुटे दोड । मान सुख इच्छी भांड ॥२॥ ग्वाहीविण मात । स्थापी आपुली स्वतंत्र ॥३॥ तुका म्हणे ऐसीं किती । नरका गेलीं अधोगती ॥४॥

३१०३. कठिण नारळाचें अंग । बाहेरी भीतरीचें चांग ॥१॥ तैसा करी कां विचार । शुद्ध कारण अंतर ॥२॥ वरि कांटे फणसफळा । माजि अंतरीं जिव्हाळा ॥३॥ मिठें रुचविलें अन्न । नये सतत कारण ॥४॥ ऊंस बाहेरी दिसे काळा । आंत रसाचा आगळा ॥५॥ तुका म्हणे मोल गोडी । काय चाड वरिल्या खोडी ॥६॥

३१०४. बाळ माते निष्ठुर होय । परि ते स्नेह करीत आहे ॥१॥ तैसा तूं गा पुरुषोत्तमा । घडी न विसंबसी आम्हां ॥२॥ नेणती भागली । कडे घेता अंग घाली ॥३॥ भूक साहे ताहान । त्याचें राखे समाधान ॥४॥ त्याच्या दुःखें धाये । आपला जीव देऊं पाहे ॥५॥ नांवें घाली उडी । तुका म्हणे प्राण काढी ॥६॥

३१०५. दाता लक्षुमीचा पति । माझे मागणें तें किती ॥१॥ जाणे तान्हेल्याची ताहान । पीतां गंगा नव्हे न्यून ॥२॥ कल्पतरु झाला देता । तेथें पोटाचा मागता ॥३॥ तुका म्हणे संतां ध्यातां । परब्रह्मचि आलें हातां ॥४॥

३१०६. कुरवंडी करीन काया । वरी पायां गोजिरिया ॥१॥ बैसलें तें रूप डोळां । मन चाळा लागलें ॥२॥ परतें न सरवी दुरी । आवडी पुरी बैसली ॥३॥ तुका म्हणे विसावलों । येथें धालों धणीवरी ॥४॥

३१०७. साधनाचे कष्ट मोठें । भय वाटे थोर हें ॥१॥ मुखें गावें भावें गीत । सर्व हित बैसलिया ॥२॥ दासा नव्हे कर्म दान । तन मन निश्चळ ॥३॥ तुका म्हणे आत्मनिष्ठा । भोग चेष्टा मनाची ॥४॥

३१०८. घेतां आणिकांचा जीव । तेव्हां कींव कराना ॥१॥ आपलें तें वरदळ नेदा । हे गोविंदा कृपणता ॥२॥ सेवा तरी इच्छा सांग । चोरिलें अंग साहेना ॥३॥ तुका म्हणे अरे धन्या ।

निसंतान्या विठोबा ॥४॥

३१०९. आम्हां केलें गुणवंत । तें उचित राखावें ॥१॥ तुम्हांसी तों चाड नाहीं । आणिकां कांहीं सुखदुःखा ॥२॥ दासांचें तों देखों नये । उणें काय होईल तें ॥३॥ तुका म्हणे विश्वंभरा । दृष्टि करा सामोरी ॥४॥

३११०. अगत्य ज्या नरका जाणें । वीट मानणें कीर्तनीं ॥१॥ नावडेनासा झाला बाप । आलें पाप वस्तीसी ॥२॥ नारायण नाहीं वाचे । ते यमाचें अंदणे ॥३॥ तुका म्हणे अभक्तासी । माता दासी जगझोडी ॥४॥

३१११. पहा ते पांडव अखंड वनवासी । परि त्या देवासी आठविती ॥१॥ प्रल्हादासी पिता करितो जाचणी । परि तो स्मरे मनीं नारायण ॥२॥ सुदामा ब्राह्मण दरिद्रें पीडिला । नाहीं विसरला पांडुरंगा ॥३॥ तुका म्हणे तुझा न पडावा विसर । दुःखाचे डोंगर झाले तरी ॥४॥

३११२. जन्ममरणांची कायसी चिंता । तुझ्या शरणागतां पंढरीराया ॥१॥ वदनीं तुझें नाम अमृतसंजीवनी । असतां चक्रपाणी भय काय ॥२॥ हृदयीं तुझें रूप बिंबलें साकार । तेथें कोण पार संसाराचा ॥३॥ तुका म्हणे तुझ्या नामाची पाखर । असतां कळिकाळ पायां तळीं ॥४॥

३११३. क्षमाशस्त्र जया नराचिया हातीं । दुष्ट तयाप्रति काय करी ॥१॥ तृण नाहीं तेथें पडिला दावाग्नि । जाय तो विझोनि आपसया ॥२॥ तुका म्हणे क्षमा सर्वांचें स्वहित । धरा अखंडित सुखरूप ॥३॥

३११४. पानें जो खाईल बैसोनि कथेसी । घडेल तयासी गोहत्या ते ॥१॥ तमाखू ओढोनि काढील जो धूर । बुडेल तें घर तेणें पापें ॥२॥ कीर्तनीं बडबड करील जो कोणी । बेडुक होउनि येईल जन्मा ॥३॥ जयाचिये मनीं कथेचा कांटाळा । होती त्या चांडाळा बहु जाच ॥४॥ जाच होती पाठी उडती यमदंड । त्याचें काळें तोंड तुका म्हणे ॥५॥

३११५. कामामध्यें काम । कांहीं म्हणा रामराम । जाइल भवश्रम । सुख होईल दुःखाचें ॥१॥ कळों येईल अंतकाळीं । प्राणप्रयाणाचे वेळीं । राहाती निराळीं । रांडापोरें सकळ ॥२॥ जीतां जीसी जैसा तैसा । पुढें आहेरे वोळसा । उगवुनि फांसा । काय करणें तें करीं ॥३॥ केलें होतें याचि जन्में । अवघें विठोबाच्या नामें । तुका म्हणे वर्मे जाणोनियां तरती ॥४॥

३११६. माऊलीसी सांगे कोण । प्रेमें वाढवी तान्हें ॥१॥ अंतरींचा कळवळा । करीतसे प्रतिपाळा ॥२॥ मायबापांची उपमा । तुज देऊं पुरुषोत्तमा ॥३॥ तेही साजेना पाहातां । जीवलगा पंढरिनाथा ॥४॥ माय पाळीं संसारीं । परलोकीं राहे दूरी ॥५॥ तैसा नव्हेसी अनंता । काळावरी तुझी सत्ता ॥६॥ तुका म्हणे नारायणा । तुज बहुत करुणा ॥७॥

३११७. कोड आवडीचें । पुरविना बाळकाचें ॥१॥ तेव्हां कैसी ते माउली । जाणा

काशासाठीं व्याली ॥२॥ वत्साचिये आसे । धेनु धांवेना वोरसें ॥३॥ तुका म्हणे घरीं । बाळ टाकिलें वानरीं ॥४॥

३११८. अवघ्या पातकांची मीचि एक रासी । अवघा तूं होसी सर्वोत्तम ॥१॥ जैसा तैसा करणें लागे अंगीकार । माझा सर्व भार चालविणें ॥२॥ अवघेंचि मज गिळियेलें काळें । अवघींच बळें तुझे अंगीं ॥३॥ तुका म्हणे आतां खुंटला उपाय । अवघेचि पाय तुझे मज ॥४॥

३११९. सांवळें सुंदर रूप मनोहर । राहो निरंतर हृदयीं माझे ॥१॥ आणीक कांहीं इच्छा आम्हां नाहीं चाड । तुझें नाम गोड पांडुरंगा ॥२॥ जन्मोजन्मीं ऐसें मागितलें तुज । आम्हांसी सहज द्यावें आतां ॥४॥ तुका म्हणे तुज ऐसे जी दयाळ । धुंडितां सकळ नाहीं आम्हां ॥५॥

३१२०. भक्तांहूनि देवा आवडतें काइ । त्रिभुवनीं नाहीं आन दुजें ॥१॥ नावडे वैकुंठ क्षीराचा सागर । धरोनी अंतर राहे दासा ॥२॥ सर्वभावें त्याचें सर्वस्वही गोड । तुळसीदळ कोड करुनी घ्यावें ॥३॥ सर्वस्वही त्याचा म्हणवी विकिला । चित्त द्यावें बोला सांगितल्या ॥४॥ तुका म्हणे भक्तिसुखाचा बांधला । आणीक विठ्ठला धर्म नाहीं ॥५॥

३१२१. हरी तुझें नाम गाईन अखंड । याविण पाखंड नेणें कांहीं ॥१॥ अंतरीं विश्वास अखंड नामाचा । कायामनें वाचा हेंचि देईं ॥२॥ तुका म्हणे आतां देईं संतसंग । तुझे नामीं रंग भरो मना ॥३॥

३१२२. करणें तें हेंचि करा । नरका घोरा कां जातां ॥१॥ जयामध्यें नारायण । शुद्ध पुण्य तें एक ॥२॥ शरणागतां देव राखे । येरां वाखे विघ्नांचे ॥३॥ तुका म्हणे लीन व्हावें । कळे भावें वर्म हें ॥४॥

३१२३. आणीक नका करूं चेष्टा । व्हाल कष्टा वरपडी ॥१॥ सुखें करा हरिकथा । सर्वथा हे तारील ॥२॥ अनाथाचा नाथ देव । अनुभव सत्य हा ॥३॥ तुका म्हणे बहुतां रीती । धरा चित्तीं सकळ ॥४॥

३१२४. सेट्या ना चौधरी । पांडेपण वाहे शिरीं ॥१॥ जकातीचा धंदा । तेथें पाप वसे सदा ॥२॥ गाई म्हैसी हेड । तूप विकी महाद्वाड ॥३॥ तुका म्हणे पाहीं । तेथें पुण्या रीघ नाहीं ॥४॥

३१२५. मागें बहुत झाले खेळ । आतां बळ वोसरलें ॥१॥ हालों नये चालों आतां । घट रिता पोकळ ॥२॥ भाजल्याची दिसे घडी । पट ओढी न साहे ॥३॥ तुका म्हणे पाहतां घडी । जगा जोडी अंगारा ॥४॥

३१२६. आळस आला अंगा । धांव घाली पांडुरंगा ॥१॥ सोसूं शरीराचे भाव । पडती अवगुणांचे घाव ॥२॥ करावीं व्यसनें । दुरी येउनि नारायणें ॥३॥ जवळील दुरी । झालों देवा धरीं करीं ॥४॥ म्हणउनि देवा । वेळोवेळां करीं धांवा ॥५॥ तुका म्हणे पांडुरंगा ।

दुरी धरूं नको अंगा ॥६॥

३१२७. झविली महारें। त्याची व्याली असे पोरें ॥१॥ करी संतांचा मत्सर। कोपे उभारोनि कर ॥२॥ बीज तैसें फळ। वरी आलें अमंगळ ॥३॥ तुका म्हणे ठावें। ऐसें झालें अनुभवें ॥४॥

३१२८. जे जे वहावे संकल्प। तेंचि पुण्य तेंचि पाप ॥१॥ कारण ते मनापासीं। मेळविल्या मिळे रसीं ॥२॥ सांडी मांडी हाली चाली। राहे तरी भली बोली ॥३॥ तुका म्हणे सार। नांव जीवनाचे सागर ॥४॥

३१२९. त्या हरिदासांची भेटी घेतां। नरका उभयतांसी जाणें ॥१॥ माते परिस थोर कथा। भाड घेतां न लाजे ॥२॥ देतां घेतां नरकवासी। उभयतांसी रवरव ॥३॥ तुका म्हणे नरकगांवा। जाती हांवा धरोनि ॥४॥

३१३०. भोगीं झाला त्याग। गीतीं गातां पांडुरंग। इंद्रियांचा लाग। आम्हांवरूनि चुकला ॥१॥ करूनि ठेविलों निश्चळ। भय नाहीं तळमळ। घेतला सकळ। अवघा भार विठ्ठलें ॥२॥ तळीं पक्षिणीचे परी। नखें चोंची चारा धरी। आणुनियां घरीं। मुखीं घाली बाळका ॥३॥ तुका म्हणे ये आवडी। आम्ही पायीं दिली बुडी। आहे तेथें जोडी। जन्मांतरींचें ठेवणें ॥४॥

३१३१. कुंकवाची ठेवाठेवी। बोडक्या देवी काशाला ॥१॥ दिवस गमा भरा पोट। कां गे नट नटावा ॥२॥ दिमाख हा कोणां दावा। लटिकी जीवा चरफड ॥३॥ तुका म्हणे झोडगीं हो। फुंदा कां हो कोरडी ॥४॥

३१३२. आम्ही आइते जेवणार। नलगे सोसावें डोंगर। सुखाचा वेव्हार। तेणेंचि वाढेल ॥१॥ ठेवा जोडला मिरासी। ठाव झाला पायांपासीं। नव्हे आणिकासी। रिघ तेथें यावया ॥२॥ बळी दिला जीवभाव। नेणें आणिकांचें नांव। धरिला एकभाव। तो विश्वास फळला ॥३॥ तुका म्हणे झालों बळी। आम्ही निकट जवळी। बोलिलों तें पाळी। वचन स्वामी आमुचें ॥४॥

३१३३. कोण आमचीं योगतपें। करूं बापें जाणावीं ॥१॥ गीत संतसंगें गाऊं। उभीं ठाऊं जागरणीं ॥२॥ आमुचा तो नव्हे लाग। करूं त्याग जावया ॥३॥ तुका म्हणे इंद्रियांसी। येचि रसीं रंगवूं ॥४॥

३१३४. आम्हां वैष्णवांचा कुळधर्म कुळींचा। विश्वास नामाचा एका भावें ॥१॥ तरीच हरिदास म्हणवितां श्लाघीजे। निर्वासना कीजे चित्त आधीं ॥२॥ गाऊं नाचूं प्रेमें आनंदें कीर्तनीं। भुक्ति मुक्ति दोन्ही न मागों तुज ॥३॥ सगुण निर्गुण एकचि आवडी। चित्तें दिली बुडी चिदानंदीं ॥४॥ वृत्तिसहित मन रिघे प्रेम डोहीं। नाठविती देहीं देहभाव ॥५॥ तुका म्हणे देवा ऐसीयाची सेवा। द्यावी जी केशवा जन्मोजन्मीं ॥६॥

३१३५. उदंड पाहिलें उदंड ऐकिले। उदंड वर्णिले क्षेत्रमहिमे ॥१॥ ऐसी चंद्रभागा ऐसें

भीमातीर। ऐसा विटेवर देव कोठें ॥२॥ ऐसे संतजन ऐसे हरिदास। ऐसा नामघोष सांगा कोठें ॥३॥ तुका म्हणे आम्हां अनाथाकारणें। पंढरी निर्माण केली देवें ॥४॥

३१३६. पावलों हा देह कागटाळी न्याय। न घडे उपायें घडों आलें ॥१॥ आतां माझीं खंडीं देह देहांतरें। अभय दातारें देऊनियां ॥२॥ अंधळ्याचे पायीं धनाची चरवी। अघटित तेंवी घडों आलें ॥३॥ तुका म्हणे योग घडला बरवा। आतां कास देवा न सोडीं मी ॥४॥

३१३७. सांडावी हे भीड अधमाचे चाळे। मद्यपी बरळे भलत्या छंदें ॥१॥ ऐसे तंव तुम्ही नाहीं जी दिसत। कां हे अनुचित वदलेती ॥२॥ फांटा झाला त्यासी नाहीं वोडा वारा। बेरसाचा खरा हा तो गुण ॥३॥ तुका म्हणे नाहीं ज्याच्या बापा ताळ। तो देखे विटाळ संतां अंगीं ॥४॥

३१३८. आवडे हें रूप गोजिरें सगुण। पाहतां लोचन सुखावले ॥१॥ आतां दृष्टीपुढें ऐसाचि तूं राहें। जों मी तुज पाहें पांडुरंगा ॥२॥ लांचावलें मन लागलीसे गोडी। ते जीवें न सोडीं ऐसें झालें ॥३॥ तुका म्हणे आम्ही मागावी लडिवाळी। पुरवावी आळी मायबापें ॥४॥

३१३९. तिळ एक अर्ध राई। सीतबिंदु पावे काई। तया सुखा नाहीं। अंतपार पाहतां ॥१॥ म्हणउनी करा लाहो। नका मागें पुढें पाहों। अवघ्यामध्यें आहों। अवघे सावचित्त तों ॥२॥ तीर्थें न येती तुळणी। आजि या सुखा धणी। कासी गयेहुनी। जीं आगळीं असती ॥३॥ येंथें धरी लाज। वर्णा अभिमान काज। नाडला सहज। तुका म्हणे तो येथें ॥४॥

३१४०. विठोबाचें नाम ज्याचे मुखीं नित्य। त्या देखिल्या पतित उद्धरती ॥१॥ विठ्ठलविठ्ठल भावें म्हणे वाचे। तरी तो काळाचे दांत ठेंची ॥२॥ बहुत तारिले सांगों किती आतां। ऐसा कोणी दाता दुजा नाहीं ॥३॥ तुका म्हणे म्यां ही ऐकोनियां कीर्ती। धरिला एकांतीं हृदयामाजी ॥४॥

३१४१. आड पडे काडी। तरि ते बहुत पाणी खोडी ॥१॥ ऐसे दुर्जन संगती। बहुतांचे घात होती ॥२॥ एक पडे मासी। तरी ते बहु अन्न नासी ॥३॥ तुका म्हणे रांड। ऐसी कां ते व्याली भांड ॥४॥

३१४२. पंढरीचें भूत मोठें। आल्या गेल्या झडपी वाटे ॥१॥ बहु खेचरीचें रान। जातां वेडें होय मन ॥२॥ तेथें जाऊं नका कोणी। गेले नाहीं आले परतोनि ॥३॥ तुका पंढरीसी गेला। पुन्हा जन्मा नाहीं आला ॥४॥

३१४३. काय करूं आतां या मना। न संडी विषयाची वासना। प्रार्थितांही राहेना। आदरें पतना नेऊं पाहे ॥१॥ आतां धांवें धांवें गा श्रीहरी। गेलों वायां नाहीं तरी। न दिसे कोणी आवरी। आणीक दुजा तयासी ॥२॥ न राहे एके ठायीं एक घडी। चित्त तडतडा तोडी। भरलें विषयभोवडीं। घालूं पाहे उडी भवडोहीं ॥३॥ आशा तृष्णा कल्पना पापिणी। घात मांडला

माझा यांणीं । तुका म्हणे चक्रपाणी । काय अजोनि पाहातोसी ॥४॥

३१४४. पाषाण परिस भूमि जांबूनद । वंशाचा संबंध धातयाचा ॥१॥ सोनियाची पुरी समुद्राचा वेढा । समुदाय गाढा राक्षसांचा ॥२॥ ऐसी सहस्त्र ज्या सुंदर कामिनी । माजी मुखरणी मंदोदरी ॥३॥ पुत्रपौत्रांचा लेखा कोण करी । मुख्य पुत्र हरी इंद्रा आणी ॥४॥ चौदा चौकडीया आयुष्यगणना । बंधुवर्ग जाणा कुंभकर्ण ॥५॥ तुका म्हणे ज्याचे देव बांदवडी । सांगातें कवडी गेली नाहीं ॥६॥

३१४५. लाभ पुढें करी । घात नारायण वारी ॥१॥ ऐसी भक्तांची माउली । करी कृपेची साउली ॥२॥ माय बाळकासी । जीव भाव वेची तैसी ॥३॥ तुका म्हणे नाड । नाहीं शरणागता आड ॥४॥

३१४६. तुजविण कांहीं । स्थिर राहे ऐसें नाहीं ॥१॥ कळों आलें बहुता रीती । पांडुरंगा माझ्या चित्तीं ॥२॥ मोकलोनी आस । सर्वभावें झालों दास ॥३॥ तुका म्हणे तूंचि खरा । येर वाउगा पसारा ॥४॥

३१४७. खोंकरी आधण होय पाकसिद्धि । हें तों घडों कधीं शकेचि ना ॥१॥ खापराचे अंगीं घासितां परिस । न पालटे कीस काढिलीया ॥२॥ पालथे घागरी रिचवितां जळ । तुका म्हणे खळ तैसे कथे ॥३॥

३१४८. नागलें देखोनि चांगलें बोले । आपुलें वेचूनि त्यापुढें खुले ॥१॥ अधमाचे ओंगळ गुण । उचित नेणें तो धर्म कोण ॥२॥ आर्तभूता न घली पाण्याची चुळ । न मगे त्यासी घाली साकरगुळ ॥३॥ एकासी धड न बोले वाचा । एकासी म्हणे मी तुझे बांदीचा ॥४॥ एका देखोनि लपवी भाकरी । एकासी आड पडोनि होकरी ॥५॥ तुका म्हणे ते गाढवपशु । लाभेंविण केला आयुष्याचा नाशु ॥६॥

३१४९. पिंडपोषकाच्या जळो ज्ञानगोष्टी । झणी दृष्टिभेटी न हो त्याची ॥१॥ नाहीं संतचिन्हें उमटलीं अंगीं । उपदेशा लागीं पात्र झाला ॥२॥ पोहों नये कासे लावितो आणिका । म्हणावें त्या मूर्खा काय आतां ॥३॥ सिणलें तें गेलें सिणलियापासीं । झाली त्या दोघांसी एक गति ॥४॥ तुका म्हणे अहो देवा दीनानाथा । दरुषण आतां नको त्याचें ॥५॥

३१५०. संतचिन्हें लेउनि अंगीं । भूषण मिरविती जगीं ॥१॥ पडिले दुःखाचे सागरीं । वहावले भवपुरीं ॥२॥ कामक्रोधलोभ चित्तीं । वरि दाविती विरक्ती ॥३॥ आशापाशीं बांधोन चित्त । म्हणती झालों आम्हीं मुक्त ॥४॥ त्यांचे लागले संगती । झाली त्यांसी तेचि गति ॥५॥ तुका म्हणे शब्दज्ञानें । जग नाडियेलें तेणें ॥६॥

३१५१. राम कृष्ण ऐसीं उच्चारीन नामें । नाचेन मी प्रेमें संतांपुढें ॥१॥ काय घडेल तें घडो

या सेवटीं। लाभ आणि तुटी देव जाणे ॥२॥ चिंता मोह आशा ठेवीन निराळीं। देईन हा बळी जीव पायीं ॥३॥ तुका म्हणे कांहीं उरों नेदी उरी। सांडीन हे थोरी ओवाळोनी ॥४॥

३१५२. कांगा कोणी न म्हणे पंढरीची आई। बोलाविते पाहीं चाल नेटें ॥१॥ तेव्हां माझ्या मना होय समाधान। जाय सर्व सीण जन्मांतरिंचा ॥२॥ तुका म्हणे माझी होईल माउली। वोरसोनि घाली प्रेमपान्हा ॥३॥

३१५३. वेद अनंत बोलिला। अर्थ इतुलाचि शोधिला ॥१॥ विठोबासी शरण जावें। निजनिष्ठा नाम गावें ॥२॥ सकळशास्त्रांचा विचार। अंतीं इतुलाचि निर्धार ॥३॥ अठरापुराणीं सिद्धांत। तुका म्हणे हाचि हेत ॥४॥

३१५४. नाहीं पाक होत उफराटे चाली। बोलली ते केली व्हावी नीत ॥१॥ नाहीं मानूं येत वांजटाचे बोल। कोरडेच फोल चवी नहीं ॥२॥ तरुवरा आधीं कोठें आहे फळ। चावटा बरळ म्हणा त्यासी ॥३॥ तुका म्हणे किती ठकलीं तातडी। गव्हीं नाहीं गोडी मांडे पुऱ्या ॥४॥

३१५५. झाली हरिकथा रंग वोसरला। उचितासी आला पांडुरंग ॥१॥ वांटितो हें प्रेम उचिताचा दाता। घेईं रे तूं आतां धणीवरि ॥२॥ प्रेम देऊनियां अवघीं सुखी केलीं। जीं होतीं रंगलीं विठ्ठलीं तीं ॥३॥ तुकें हें दुर्बळ देखियेलें संतीं। म्हणउनि पुढतीं आणियेलें ॥४॥

३१५६. भय नाहीं भेव। अनुतापीं नव्हता जीव ॥१॥ जेथें देवाची तळमळ। तेथें काशाचा विटाळ ॥२॥ उच्चारितां दोष। नाहीं उरों देत लेश ॥३॥ तुका म्हणे चित्त। होय आवडी मिश्रित ॥४॥

२१५७. ध्यानीं ध्यातां पंढरिराया। मनासहित पालटे काया ॥१॥ तेथें बोला कैंची उरी। माझें मीपण झाला हरि ॥२॥ चित्तचैतन्यीं पडतां मिठी। दिसे हरिरूप अवघी सृष्टि ॥३॥ तुका म्हणे सांगों काय। एकाएकीं वृत्ति हरिमय ॥४॥

३१५८. देव तिळीं आला। गोडें गोड जीव धाला ॥१॥ साधला हा पर्वकाळ। गेला अंतरींचा मळ ॥२॥ पापपुण्य गेलें। एका स्नानेंचि खुंटलें ॥३॥ तुका म्हणे वाणी। शुद्ध जनार्दन जनीं ॥४॥

३१५९. अन्यायासी राजा न करितां दंड। बहुत ते लंड पीडिती जना ॥१॥ न करितां निगा न काढितां तन। कैंचे येती कण हातासी ते ॥२॥ तुका म्हणे संतां करूं नये अनृत। पाप नाहीं नीत विचारितां ॥३॥

३१६०. काय उणें मज पांडुरंगा पायीं। रिद्धिसिद्धि ठायीं वोळगती ॥१॥ कोण पाहे सुखा नासिवंताकडे। तृष्णेचीं बापुडें नव्हों आम्ही ॥२॥ सर्व सुखें आम्हीं केलीं पावटणी। पापपुण्यें दोन्ही उडविलीं ॥३॥ तुका म्हणे घरीं आणिलें वैकुंठ। वसविली पेठ वैष्णवांची ॥४॥

३१६१. अर्भकाचे साठीं । पंतें हाती धरिली पाटी ॥१॥ तैसे संत जगीं । क्रिया करूनि दाविती अंगीं ॥२॥ बाळकाचे चाली । माता जाणूनि पाउल घाली ॥३॥ तुका म्हणे नाव । जनासाठीं उदकीं ठाव ॥४॥

३१६२. सारासार विचार करा उठाउठी । नाम धरा कंठीं विठोबाचे ॥१॥ तयाच्या चिंतनें निरसेल संकट । तराल दुर्घट भवसिंधु ॥२॥ जन्मोनियां कुळीं वाचे स्मरे राम । धरी हाचि नेम अहर्निशीं ॥३॥ तुका म्हणे कोटी कुळें तीं पुनीत । भावें गातां गीत विठोबाचें ॥४॥

३१६३. ज्याची जया आस । तया जवळी त्याचा वास । येर जवळीं तें दुरी । वत्स सांडी धेनु घरीं ॥२॥ गोडी प्रियापाशीं । सुख उपजे येरासी ॥३॥ तुका म्हणे बोल । घडे तया ठायीं मोल ॥४॥

३१६४. द्रव्य घेऊनियां कथा जरी करी । तरी भंगो हरी देह माझा ॥१॥ माझी कथा करा ऐसें म्हणे कोणा । तरी नारायणा जिव्हा झडो ॥२॥ साह्य तूं झालासी काय उणें तुपें । आणीक भूतांपें काय मागों ॥३॥ तुका म्हणे सर्व सिद्धि तुझे पायीं । तूं माझा गोसावी पांडुरंगा ॥४॥

३१६५. जरि हा हो कृपा करिल नारायण । तरी हेंचि ज्ञान ब्रह्म होय ॥१॥ कोठोनियां कांहीं नलगे आणावें । नलगे कोठें जावें तरावया ॥२॥ जरी देव कांहीं धरिल पैं चित्तीं । तरि हेचि होती दिव्य चक्षु ॥३॥ तुका म्हणे देव दावील आपणा । तरि जीवपणा ठाव नाहीं ॥४॥

३१६६. रात्री दिवस आम्हां युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन ॥१॥ जीवाही आगोज पडती आघात । येऊनियां नित्य नित्य वारू ॥२॥ तुका म्हणे तुझ्या नामाचिया बळें । अवघियांचें काळें केलें तोंड ॥३॥

३१६७. होईन खडे गोटे । चरणरज साने मोठे । पंढरीचे वाटे । संतचरणीं लागेन ॥१॥ आणीक दुजें कांहीं । मी मागेन तुजपाशीं । आठवितां सुख । भय नास नाहीं ज्यासी ॥२॥ होईन मोचे वाहणा । पायीं सकळां संतजनां । मांजर सुकर सुणा । जवळी शेष घ्यावया ॥३॥ सांडोवा पायरी । वोहळ बावी गंगातिरीं । होईन तयावरी । संतसज्जन चालती ॥४॥ लागें संतां पायीं । ऐसा ठेवीं भलते ठायीं । तुका म्हणे देईं । धाक नाहीं जन्माचा ॥५॥

३१६८. कासयासी व्हावें आम्ही जीवन्मुक्त । सांडुनियां थीत प्रेमसुख ॥१॥ वैष्णवांचा दास झाला नारायण । काय त्या मिळोन असों सुखी ॥२॥ काय त्या गांठीचें पडलें सुटोन । उगेचि बैसोन धीर धरूं ॥३॥ सुख आम्हांसाठीं केलें हें निर्माण । निर्दैव तो कोण हाणे लाता ॥४॥ तुका म्हणे मज नलगे सायुज्यता । राहेन या संतां समागमें ॥५॥

३१६९. आवडे पंढरी भीमा पांडुरंगा । चंद्रभागा लिंग पुंडलीक ॥१॥ कामधेनु कल्पतरु चिंतामणी । आवडीची धणी पुरविती ॥२॥ तुका म्हणे जीवा थोर झालें सुख । नाठवे हे

भूक तहान कांहीं ॥३॥

३१७०. प्रपंच परमार्थ संपादीन दोन्ही । एकही निदानीं नव्हे त्यासी ॥१॥ दोहीं पेंवावरी ठेवूं जातां हात । होय अपघात शरीराचा ॥२॥ तुका म्हणे तया दोहींकडे धक्का । शेवटीं तो नरकामाजी पडे ॥३॥

३१७१. आम्हां भय धाक कोणाचा रे पाहें । काळ मशक काय मानव हे ॥१॥ आम्हांसी ते काय चिंता या पोटाची । माउली आमुची पांडुरंग ॥२॥ काय करावी हे कोणाची मान्यता । करितां अनंता कोण वारी ॥३॥ नाहीं शीण आम्हां झालें कवतुक । पुनीत हे लोक करावया ॥४॥ तुका म्हणे खातों आनंदाचे लाडु । नका चरफडूं घ्या रे तुम्ही ॥५॥

३१७२. तांबियाचें नाणें न चले खऱ्या मोलें । जरी हिंडविलें देशोदेशीं ॥१॥ करणीचें कांहीं न मने सज्जना । यावें लागे मना वृद्धांचिया ॥२॥ हिरियासारिखा दिसे शिरगोळा । पारखी ते डोळां न पाहाती ॥३॥ देऊनियां भिंग कमाविलें मोतीं । पारखिया हातीं घेता नये ॥४॥ तुका म्हणे काय नटोनियां व्यर्थ । आपुलें हें चित्त आपणा ग्वाही ॥५॥

३१७३. चित्ता मिळे त्याचा संग रुचिकर । क्षोभवितें दूर तेंचि भलें ॥१॥ ऐसी परंपरा आलीसे चालत । भलत्याची नीत त्यागावरी ॥२॥ हो कां पिता पुत्र बंधु कोणी तेही । विजाति संग्रहीं धरूं नये ॥३॥ तुका म्हणे सत्य पाळावें वचन । अन्यथा आपण करूं नये ॥४॥

३१७४. आपुली कसोटी शुद्ध राखी कारण । आगीनें भूषण अधिक पुटा ॥१॥ नाहीं कोणासवें बोलणें लागत । निश्चितीनें चित्तसमाधान ॥२॥ लपविलें तेंही ढेंकरे उमटे । खोटियाचें खोटें उर फोडी ॥३॥ तुका म्हणे निंदा स्तुति दोन्ही वाव । आपुलाला भाव फळा येतो ॥४॥

३१७५. आणिकांच्या घातें मानितां संतोष । सुखदुःख दोष अंगीं लागे ॥१॥ ऐसे मनीं वाहूं न येते संकल्प । करूं नये पाप भांडवला ॥२॥ किल्मिषाची चित्तीं राहतां कांचणी । अंगीं तें जडोनी ठाव जाळी ॥३॥ तुका म्हणे कोपें घडे पुण्यक्षय । होणार तें होय प्रारब्धेंची ॥४॥

३१७६. अज्ञानाची भक्ति इच्छिती संपत्ती । तयाचिये चित्तीं बोध कैंचा ॥१॥ अज्ञानाची पूजा कामिक भावना । तयाचिया ध्याना देव कैंचा ॥२॥ अज्ञानाचें कर्म फळीं ठेवी मन । निष्काम साधन तया कैंचें ॥३॥ अज्ञानाचे ज्ञान विषयावरी ध्यान । ब्रह्म सनातन तया कैंचें ॥४॥ तुका म्हणे जळो ऐसियांचें तोंड । अज्ञानाचें बंड वाढविती ॥५॥

३१७७. गुळें माखोनियां दगड ठेविला । वरी दिसे भला लोकाचारी ॥१॥ अंतरीं विषयाचें लागलें पैं पिसें । बाहिरल्या वेषें भुलवी लोकां ॥२॥ ऐसिया दांभिकां कैंची हरिसेवा । नेणेचि सद्भावा कोणे काळीं ॥३॥ तुका म्हणे येणें कैसा होय संत । विटाळलें चित्त कामक्रोधें ॥४॥

३१७८. संतांचा पढियावो कैशापरि लाहो । नामाचा आठवो कैसा राहे ॥१॥ हेचि थोर चिंता लागली मानसीं । निजतां निद्रेसी नलगे डोळा ॥२॥ जेवितां जेवणीं नलगे गोड धड । वाटतें काबाड विषयसुख ॥३॥ ऐसिया संकटीं पावे कृपानिधि । लावीं संतपदीं प्रेमभावें ॥४॥ तुका म्हणे आम्हीं नेणों कांहीं हित । तुजविण अनाथ पांडुरंगा ॥५॥

३१७९. पंढरीचा वास धन्य तेचि प्राणी । अमृताची वाणी दिव्य देह ॥१॥ मूढ मतिहीन दुष्ट अविचारी । ते होती पंढरीं दयारूप ॥२॥ शांति क्षमा अंगीं विरक्ति सकळ । नैराश्य निर्मळ नारी नर ॥३॥ तुका म्हणे नाहीं वर्ण अभिमान । अवघेंचि जीवन्मुक्त लोक ॥४॥

३१८०. देखीचें तें ज्ञान करावें तें काई । अनुभव नाहीं आपणासी ॥१॥ इंद्रियांचे गोडी ठकलीं बहुतें । सोडितां मागुतें आवरेना ॥२॥ युक्तीचा आहार नीतीचा वेव्हार । वैराग्य तें सार तरावया ॥३॥ नाव नावलीतां घाला घाली वारा । तैसा तो पसारा अहंतेचा ॥४॥ तुका म्हणे बुद्धी आपुले अधीन । करी नारायण आतुडे तों ॥५॥

३१८१. नर नारी बाळें अवघा नारायण । ऐसें माझें मन करी देवा ॥१॥ न यो कामक्रोध द्वेष निंदा द्वंद्व । अवघा गोविंद निःसंदेह ॥२॥ असावें म्यां सदा विषयीं विरक्त । काया वाचा चित्त तुझे पायीं ॥३॥ करोनियां साह्य पुरवीं मनोरथ । व्हावें कृपावंत तुका म्हणे ॥४॥

३१८२. जगीं कीर्ति व्हावी । म्हणोनि जालासी गोसावी ॥१॥ बहुत केलें पाठांतर । वर्म राहिलें तें दूर ॥२॥ चित्तीं नाहीं अनुताप । लटिकें भगवें स्वरूप ॥३॥ तुका म्हणे सिंदळीच्या । व्यर्थ श्रमविली वाचा ॥४॥

३१८३. प्राक्तनाच्या योगें आळशावरी गंगा । स्नान काय जगा करूं नये ॥१॥ उभी कामधेनु मांगाचे आंगणीं । तिसी काय ब्राह्मणी वंदूं नये ॥२॥ कोडियाचे हातें परिसें होय सोनें । अपवित्र म्हणोन घेऊं नये ॥३॥ यातिहीन झाला गांवींचा मोकासी । त्याच्या वचनासी मानूं नये ॥४॥ भावारूढ तुका मुद्रा विठोबाची । न मनी तयांचीं तोंडें काळीं ॥५॥

३१८४. बोलिलों उत्कर्षें । प्रेमरसें दासत्वें ॥१॥ साच करिता नारायण । जया शरण गेलों तो ॥२॥ समर्थ तो आहे ऐसा । धरिली इच्छा पुरवीतो ॥३॥ तुका म्हणे लडिवाळाचें । द्यावें साचें करूनियां ॥४॥

३१८५. विचा केला ठोबा । म्हणोनि नांव तो विठोबा ॥१॥ कां रे नेणां त्याचें नांव । काय वेदासि नाहीं ठावें ॥२॥ शेष स्तुती प्रवर्तला । जिव्हा चिरूनि पलंग झाला ॥३॥ तुका म्हणे सत्ता । ज्याची काळाचिये माथां ॥४॥

३१८६. चोरासी चांदणें वेश्येसी सेजार । परिसेसीं खापर काय होय ॥१॥ दुधाचे आधणीं वैरिले पाषाण । कदा काळीं जाण पाक नव्हे ॥२॥ तुका म्हणे जरि पूर्वपुण्यें सिद्धि । तरिच

राहे बुद्धि संतसंगीं ॥३॥

३१८७. मथनासाठीं धर्माधर्म । त्याचें वर्म नवनीत ॥१॥ तेंचि तें घाटूं नये । आलें जाय नासूनि ॥२॥ सांभाळावें वरावर । वर्म दूर नव जावें ॥३॥ तुका म्हणे धालें पोट । मग बोटचाटणी ॥४॥

३१८८. न घडे मायबापा बाळकाचा घात । आपणांदेखत होऊं नेदी ॥१॥ कां मी मनीं चिंता वाहूं भय धाक । काय नव्हे एक करितां तुज ॥२॥ वर्म जाणे त्याच्या हिताचे उपाय । तहान भूक वाहे कडिये खांदीं ॥३॥ तुका म्हणे तूं गा कृपावंत भारी । ऐसें मज हरी कळों आलें ॥४॥

३१८९. करावें कीर्तन । मुखें गावे हरिचे गुण ॥१॥ मग कांहीं नव्हे बाधा । काम दुर्जनाची क्रोधा ॥२॥ शांतिखर्ग हातीं । काळासी ते नागवती ॥३॥ तुका म्हणे दाता सखा । ऐसा अनंतासारिखा ॥४॥

३१९०. साधनाच्या कोटी । केल्या आटी होत्या त्या ॥१॥ देव कृपा करी जरी । होय उजरी स्वरूपीं ॥२॥ केले होती वृथा श्रम । चित्ता उपरम न होतां ॥३॥ तुका म्हणे कळों आलें । सर्व झालें आपरूप ॥४॥

३१९१. तुज काय करूं मज एक सार । अमृतनागर नाम तुझें ॥१॥ काय उणें आम्हां तयाचिये पोटीं । गोवितां हे कंठीं कामधेनु ॥२॥ नोळखे तानुलें माय ऐसी कोण । वोसरे देखून शोक त्याचा ॥३॥ जो नाहीं देखिला याचक नयनीं । तो पावे घेउनि लज्जा दान ॥४॥ नामासाठीं प्राण सांडियेला रणीं । शूर ते भांडणीं न फिरती ॥५॥ तुका म्हणे आम्हीं गातां गीतीं भला । भेटूनि विठ्ठला काय चाड ॥६॥

३१९२. कृपेचे सागर हेचि साधुजन । तिहीं कृपादान केलें मज ॥१॥ बोबडे वाणीचा केला अंगीकार । तेणें माझा स्थिर केला जीव ॥२॥ तेणें सुखें मन स्थिर झालें ठायीं । संतीं दिला पायीं ठाव मज ॥३॥ नाभी नाभी ऐसें बोलिले वचन । तें माझें कल्याण सर्वस्वही ॥४॥ तुका म्हणे झालों आनंदें निर्भर । नाम निरंतर घोष करूं ॥५॥

३१९३. भक्तीचें तें वर्म जयाचिये हातीं । तया घरीं शांति क्षमा दया ॥१॥ अष्ट महा सिद्धि वोळगती द्वारीं । नवजती दूरी दवडितां ॥२॥ तेथें दुष्ट गुण न मिळे नि:शेष । चैतन्याचा वास झाला माजी ॥३॥ संतुष्ट हें चित्त सदा सर्वकाळ । तुटली हळहळ त्रिगुणाची ॥४॥ तुका म्हणे त्याचा देव सर्व भार । चालवी कामार होउनियां ॥५॥

३१९४. साच हा विठ्ठल साच हें करणें । संत जीं वचनें बोलियेले ॥१॥ साच तें स्वहित साच ते प्रचित । साच वेदें नीत सांगितली ॥२॥ तुका म्हणे घेती साच साच भावें । लटिकें वर्म ठावें नाहीं त्यांसी ॥३॥

३१९५. संगें वाढे सीण संगें वाढे भजन । त्रिविध हें जन बहू देवा ॥१॥ याचिमुळें आला संगाचा कंटाळा । दिसताती डोळां नानाछंद ॥२॥ एकविध भाव राहावया ठाव । नेदीं हा संदेह राहों चित्तीं ॥३॥ शब्दज्ञानी हित नेणती आपुलें । आणीक देखिलें नावडे त्यां ॥४॥ तुका म्हणे आतां एकलेंचि भलें । बैसोनि उगलें राहावें तें ॥५॥

३१९६. पुण्यपापा ठाव नाहीं सुखदु:खा । हानिलाभशंका नासलिया ॥१॥ जितां मरण आलें आप पर गेलें । मूळ हें छेदिलें संसाराचें ॥२॥ अधिकार जात वर्णधर्मयात । ठाव नाहीं सत्य असत्याशीं ॥३॥ जन वन भिन्न अचेत चळण । नाहीं दुजेपण ठाव यासी ॥४॥ तुका म्हणे देह वाहिला विठ्ठलीं । तेव्हांच घडली सर्व पूजा ॥५॥

३१९७. संकोचित जीव महत्त्वाच्या भारें । दासत्वचि बरें बहु वाटे ॥१॥ कळावी जी माझी आवडी हे संतां । देणें तरि आतां हेंचि द्यावें ॥२॥ तुमचे चरण पावविलों सेवा । म्हणऊनि हेवा हाचि करीं ॥३॥ विनवुनी तुका वंदितो चरण । लेखा रजरेण चरणींचा ॥४॥

३१९८. देव कैंचा तया दुरी । भाका बरी करुणा ॥१॥ आळवित्या नलगे घर । माय जाणे रे भातुकें ॥२॥ नावेवरी ज्याचा भार । पैल पार जवळी त्या ॥३॥ आतां परदेशी तुका । झाला लोकां वेगळा ॥४॥

३१९९. भक्ति ज्याची थोडी । पूर्ण विषयाची गोडी ॥१॥ तो नरचि नव्हे पाहीं । खर जाणावा तो देहीं ॥२॥ भजन पूजनही नेणे । काय स्वरूपासी जाणे ॥३॥ तुका म्हणे त्याला । भोवंडून बाहेर घाला ॥४॥

३२००. संतांनीं सरता केलों तैशापरी । चंदनीं ते बोरी व्यापियेली ॥१॥ गुण दोष याती न विचारी कांहीं । ठाव दिला पायीं आपुलिया ॥२॥ तुका म्हणे आलें समर्थाच्या मना । तरि होय राणा रंक त्याचा ॥३॥

३२०१. चित्तीं तुझे पाय डोळां रूपाचें ध्यान । अखंड मुखीं नाम तुमचे वर्णावे गुण ॥१॥ हेंचि एक तुम्हां देवा मागणें दातारा । उचित तें करा माझा भाव जाणूनि ॥२॥ खुंटलें जाणीव माझें बोलणें आतां । कळों यावीं तैसी करा बाळाची चिंता ॥३॥ तुका म्हणे आता नको देऊं अंतर । न कळे पुढें काय बोलूं विचार ॥४॥

३२०२. संतांच्या पादुका घेईन मोचे खांदीं । हातीं टाळ दिंडी नाचेन पुढें ॥१॥ भजनविधि नेणें साधन उपाय । सकळ सिद्धि पाय हरिदासांचे ॥२॥ ध्यान गति मति आसन समाधि । हरिनाम गोविंदीं प्रेमसुख ॥३॥ नेणता निर्लज्ज नेणें नादभेद । सुखें हा गोविंद गाऊं गीतीं ॥४॥ सर्व जोडी मज गोत आणि वित्त । तुका म्हणे संतमहंतपाय ॥५॥

३२०३. हरिजनां प्राण विकली हे काया । अंकित मी तया घरीं झालों ॥१॥ म्हणियें सत्वर

करीन सांगतां । घेईन मी देतां शेष त्यांचें ॥२॥ आस करूनियां राहेन अंगणीं । उच्छिष्टाची धणी घ्यावयासी ॥३॥ चालतां ते मार्गीं चरणींचे रज । उडती सहज घेइन आतां ॥४॥ दुरी त्यापासूनि न वजें दवडितां । तुका म्हणे लाता घेइन अंगें ॥५॥

३२०४. पुण्य फळलें बहुतां दिवसां । भाग्यउदयाचा ठसा । झालों सन्मुख तो कैसा । संतचरण पावलों ॥१॥ आजि फिटलें माझें कोडें । भवदु:खाचें सांकडें । कोंदाटलें पुढें । परब्रह्म सांवळें ॥२॥ आलिंगनें संतांचिया । दिव्य झाली माझी काया । मस्तकें हें पायां । वरी त्यांच्या ठेवितां ॥३॥ तुका म्हणे धन्य झालों । सुखें संतांचिया धालों । लोटांगणीं आलों । पुढें भार देखोनी ॥४॥

३२०५. भक्ति आम्हीं केली सांडूनी उद्वेग । पावलों हें संगसुख याचें ॥१॥ सुख आम्हां झालें धरितां याचा संग । पळाले उद्वेग सांडूनियां ॥२॥ तुका म्हणे सुख बहु झालें जीवा । घडली या सेवा विठोबाची ॥३॥

३२०६. इंद्रियांसी नेम नाहीं । मुखीं राम म्हणोनि काई ॥१॥ जेवीं मासीसंगें अन्न । सुख नेदी तें भोजन ॥२॥ कीर्तन करावें । तैसें करूनी दावावें ॥३॥ हें तों अंगीं नाहीं चिन्हें । गाइलें वेश्येच्या ढव्यानें ॥४॥ तुका म्हणे रागा । संत शिवूं नेदिती अंगा ॥५॥

३२०७. नलगे देवा तुझें आम्हांसी वैकुंठ । सायुज्यता पट्ट नलगे मज ॥१॥ देईं तुझें नाम मज सर्वकाळीं । मागणें वनमाळी हेंचि तुज ॥२॥ नारद तुंबर उद्धव प्रल्हाद । बळी रुक्मांगद नाम ध्याती ॥३॥ सिद्ध मुनिगण गंधर्व किन्नर । करिताती गजर रामनामें ॥४॥ तुका म्हणे हरी देईं तुझें नाम । अखंडित प्रेम हेंचि द्यावें ॥५॥

३२०८. पावलों प्रसाद इच्छा केली तैसी । झालें या चित्तासी समाधान ॥१॥ मायबाप माझा उभा कृपादानी । विटे सम जोडूनि पादांबुजें ॥२॥ सांभाळासी येऊं नेदीतां उणीव । अधिकारगौरव राखे तैसा ॥३॥ तुका म्हणे सर्व अंतर्बाह्य आहे । जया तैसा राहे कवळुनी ॥४॥

३२०९. मुखीं विठ्ठलाचें नाम । मग कैंचा भवभ्रम ॥१॥ चालतां बोलतां खातां । जेवितां निद्रा करितां ॥२॥ सुखें असों संसारीं । मग जवळीच हरि ॥३॥ मुक्ति वरील भक्ति जाण । अखंड मुखीं नारायण ॥४॥ मग देवभक्त झाला । तुका तुकीं उतरला ॥५॥

३२१०. क्षुधा तृषा कांहीं सर्वथा नाठवे । पहावया धांवे कोल्हांटासी ॥१॥ कथेसी साक्षेपें पाचारिलें जरी । म्हणे माझ्या घरीं कोणी नाहीं ॥२॥ बलात्कारें जरी आणिला कथेसी । निद्रा घे लोडासी टेंकूनियां ॥३॥ तुका म्हणे थुंका त्याच्या तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥४॥

३२११. आतां वाटों नेदीं आपुलें हें मन । न सोडीं चरण विठोबाचे ॥१॥ दुजियाचा संग लागों नेदीं वारा । आपुल्या शरीरावरूनियां ॥२॥ यावें जावें आम्हीं देवाचे सांगातें । मागूनी

करित हेंचि आलों ॥३॥ काय वायां गेलों करूं तों उद्वेग । उभा पांडुरंग मागें पुढें ॥४॥ तुका म्हणे प्रेम मागतों आगळें । येथें भोगूं फळें वैकुंठींचीं ॥५॥

३२१२. आतां जावें पंढरीसी । दंडवत विठोबासी ॥१॥ चंद्रभागेचिया तिरीं । आम्ही नाचों पंढरपूरीं ॥२॥ जेथें संतांची दाटणी । त्यांचें घेऊं पायवणी ॥३॥ तुका म्हणे आम्ही बळी । जीव दिला पायांतळीं ॥४॥

३२१३. आम्हां नरका जातां काय येइल तुझ्या हातां । ऐसें तूं अनंता विचारीं पां ॥१॥ तुज शरण आलियाचें काय हेंचि फळ । विचारा दयाळ कृपानिधी ॥२॥ तुझे पावनपण न चले आम्हांसीं । ऐसें हृषीकेशी कळों आलें ॥३॥ आम्ही दुःख पावों जन्ममरण व्यथा । काय तुझ्या हाता येत असे ॥४॥ तुका म्हणे तुम्हीं खादली हो रडी । आम्हीं धरली सेंडी नाम तुझें ॥५॥

३२१४. पांडुरंगें पाहा खादलीसे रडी । परि नामसेंडी धरिली आम्हीं ॥१॥ आतां संतांनीं करावी पंचाईत । कोण हा फजितखोर येथें ॥२॥ कोणाचा अन्याय येथें आहे स्वामी । गर्जतसों आम्ही पातकीही ॥३॥ याचें पावनपण सोडवाजी तुम्ही । पतितपावन आम्ही आहों खरे ॥४॥ आम्ही तंव आहों अन्यायी सर्वथा । याची पावन कथा कैसी आहे ॥५॥ तुका म्हणे आम्ही मेलों तरी जाणा । परि तुमच्या चरणा न सोडावें ॥६॥

३२१५. घालूनियां मध्यवर्ती । दाटुनि उपदेश देती ॥१॥ ऐसे पोटभरे संत । तया कैंचा भगवंत ॥२॥ रांडापोरांतें गोविती । वर्षासनें ते लाविती ॥३॥ जैसे बोलती निरोपणीं । तैसी न करिती करणी ॥४॥ तुका म्हणे तयां । तमोगुणियांची क्रिया ॥५॥

३२१६. जीवें जीव नेणें पापी सारिखाची । नळी दुजयाची कापूं बैसे ॥१॥ आत्मा नारायण सर्वां घटीं आहे । पशुमध्यें काय कळों नये ॥२॥ देखत हा जीव हुंबरे वोर्डत । निष्ठुराचे हात वाहाती कैसे ॥३॥ तुका म्हणे तया चांडाळासी नर्क । भोगिती अनेक महादुःखें ॥४॥

३२१७. भागल्याचें तारूं शिणल्याची साउली । भुकेलिया घाली प्रेमपान्हा ॥१॥ ऐसी ही कृपाळु अनाथांचे वेशी । सुखाचीच राशी पांडुरंग ॥२॥ सकळा सन्मुख कृपेचिया दृष्टी । पाहे बहु भेटी उतावीळ । तुका म्हणे येथें आतां उरे कैंचा । अनंता जन्मींचा शीणभाग ॥४॥

३२१८. काय न्यून आहे सांगा । पांडुरंगा तुम्हां पें ॥१॥ आमुची तों न पुरे इच्छा । पिता ऐसा मस्तकीं ॥२॥ कैसी तुम्हां होते सांडी । करुणा तोंडीं उच्चारें ॥३॥ आश्चर्यचि करी तुका । हे नायका वैकुंठींच्या ॥४॥

३२१९. परि आतां माझी परिसावी विनंती । रखमाईच्या पती पांडुरंगा ॥१॥ चुकलिया बाळा न मारावें जीवें । हित तें करावें मायबापीं ॥२॥ तुका म्हणे तुझा म्हणताती मज । आतां आहे लाज हेचि तुम्हां ॥३॥

३२२०. पापाचिया मुळें । झालें सत्याचें वाटोळें ॥१॥ दोष झाले बळिवंत । नाहीं ऐसी झाली नीत ॥२॥ मेघ पडों भीती । पिकें सांडियली क्षिती ॥३॥ तुका म्हणे कांहीं । वेदा वीर्य शक्ति नाहीं ॥४॥

३२२१. ऐसा दुस्तर भवसागर । नेणों कैसा उतरूं पार ॥१॥ कामक्रोधादि सावजें थोर । दिसताती भयंकर ॥२॥ मायाममतेचे भोंवरे । घेती भयानक फेरे ॥३॥ वासनेच्या लहरी येती । उद्योगहेलकावे बैसती ॥४॥ तरावया एक युक्ति असे । तुका नामनावेमधें बैसे ॥५॥

३२२२. हरिदासाचिये घरीं । मज उपजवा जन्मांतरीं ॥१॥ म्हणसी कांहीं मागा । हेंचि देगा पांडुरंगा ॥२॥ संतां लोटांगणीं । जातां लाज नको मनीं ॥३॥ तुका म्हणे अंगीं । शक्ती देईं नाचे रंगीं ॥४॥

३२२३. लटिक्याचे आवतणें जेविलिया साचे । काय त्या विश्वास तोचि खरा ॥१॥ कोल्हाटिणी लागे आकाशीं खेळत । ते काय पावत अमरपद ॥२॥ जळमंडप्याचे घोडे राउत नाचती । ते काय तगती युद्धालागीं ॥३॥ तुका म्हणे तैसें मतवादीचें जिणें । दिसे लाजिरवाणें बोलतांचि ॥४॥

३२२४. एक म्हणती आम्ही देवची पैं जालों । ऐसें नका बोलों पडाल पतनीं ॥१॥ एक म्हणती आम्ही देवाचीं पैं रूपें । तुमचिया बापें न चुके जन्म ॥२॥ देवें उचलिली स्वमुखें मेदिनी । तुमचेनी गोणी नुचलवे ॥३॥ देवें मारियेले दैत्य दानव मोठे । तुमचेनी न तुटे तृणमात्र ॥४॥ राया विठोबाचें पद जो अभिळासी । पातकाची राशी तुका म्हणे ॥५॥

३२२५. काय आम्हीं केलें ऐसें । नुद्धरीजेसें सांगावें ॥१॥ हरण कोल्हें वैकुंठवासी । कोण त्यासी अधिकार ॥२॥ गजा नाड्या सरोवरीं । नाहीं हरी विचारिलें ॥३॥ तुका म्हणे गणिका नष्ट । माझे कष्ट त्याहूनि ॥४॥

३२२६. गुणा आला विटेवरी । पितांबरधारी सुंदर जो ॥१॥ डोळे कान त्याच्या ठायीं । मन पायीं राहो हें ॥२॥ निवारोनि जाय माया । ऐसी छाया जयाची ॥३॥ तुका म्हणे समध्यान । ते हे चरण सुकुमार ॥४॥

३२२७. रंगीं रंगे नारायण । उभा करितों कीर्तन ॥१॥ हातीं घेऊनियां वीणा । कंठीं राहें नारायणा ॥२॥ देखिलीसे मूर्ती । माझ्या हृदयाची विश्रांति ॥३॥ तुका म्हणे देवा । देईं कीर्तनाचा हेवा ॥४॥

३२२८. तुझा भरंवसा आम्हां । फार होता पुरुषोत्तमा ॥१॥ भवसागरसंकटीं । तारिशील जगजेठी ॥२॥ नाम आदित्याचें झाड । त्याचा न पडे उजेड ॥३॥ सिलंगणीचें सोनें । त्यासी गहाण ठेवी कोण ॥४॥ नामासारखी करणी । कोठें नाहीं त्रिभुवनीं ॥५॥ तुका म्हणे देवा ।

ब्रीद सोडूनियां ठेवा ॥६॥

३२२९. विद्या अल्प परी गर्वशिरोमणि । मजहुनी ज्ञानी कोण आहे ॥१॥ अंगीं भरला ताठा कोणातें मानीना । साधूची छळणा स्वयें करी ॥२॥ साधूचे देहाचा मानी जो विटाळ । त्रिलोकीं चांडाळ तोचि एक ॥३॥ संतांची जो निंदा करी मुखें जपे । खतेला सकळ पापें तोचि एक ॥४॥ तुका म्हणे ऐसे मावेचे मइंद । त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥५॥

३२३०. बैसतां चोरापाशीं तैसी होय बुद्धि । देखतांचि चिंधी मन धांवे ॥१॥ व्यभिचाऱ्यापाशीं बैसतां क्षणभरी । देखतांचि नारी मन धांवे ॥२॥ प्रपंचाचा छंद टाकुनियां गोवा । धरावें केशवा हृदयांत ॥३॥ सांडुनियां देईं संसाराची बेडी । कीर्तनाची गोडी धरावी गा ॥४॥ तुका म्हणे तुला सांगतों मी एक । रुक्मिणीनायक मुखीं गावा ॥५॥

३२३१. परिसें गे सुनेबाई । नको वेचूं दूध दहीं ॥१॥ आवा चालली पंढरपुरा । वेसीपासुनि आली घरा ॥२॥ ऐकें गोष्टी सादर बाळे । करीं जतन फुटकें पाळें ॥३॥ माझे हातींचा कलवडू । मजवांचुनि नको फोडूं ॥४॥ वळवटक्षिरीचें लिंपन । नको फोडूं मजवांचून ॥५॥ उखळ मुसळ जातें । माझें मन गुंतलें तेथें ॥६॥ भिक्षुक आल्या घरा । सांग गेली पंढरपुरा ॥७॥ भक्षीं मपित अहारु । नको फारसी वरूं सारूं ॥८॥ सून म्हणे बहुत निकें । तुम्हीं यात्रेसी जावे सुखें ॥९॥ सासूबाई स्वहित जोडा । सर्व मागील आशा सोडा ॥१०॥ सूनमुखींचें वचन कानीं । ऐकोनि सासू विवंची मनीं ॥११॥ सवतीचे चाळे खोटे । म्यां जावेंसें इला वाटे ॥१२॥ आतां कासया यात्रे जाऊं । काय जाउनि तेथें पाहूं ॥१३॥ मुलें लेंकरें घर दार । माझें येथेंचि पंढरपुर ॥१४॥ तुका म्हणे ऐसें जन । गोवियेलें मायेंकरून ॥१५॥

३२३२. पतिव्रतेची कीर्ती वाखाणितां । सिंदळीच्या माथां तिडिक उठे ॥१॥ आमुचें तों आहे सहज बोलणें । नाहीं विचारून केलें कोणीं ॥२॥ अंगें उणें बैसे त्याच्या टाळक्यांत । तेणें ठिणग्या बहुत गाळीतसे ॥३॥ तुका म्हणे आम्हीं काय करणें त्यासी । धका खवंदासी लागतसे ॥४॥

३२३३. आहे ऐसा देव वदवावी वाणी । नाहीं ऐसा मनीं अनुभवावा ॥१॥ आवडी आवडी कलेवरा कलेवरीं । वरिलें अंतरीं ताळा पडे ॥२॥ अपूर्व दर्शन मातेपुत्रा भेटी । रडे मागे तुटी हर्षयोगें ॥३॥ तुका म्हणे एकें कळतें दुसरें । बरियानें बरें आहाचें आहाच ॥४॥

३२३४. हेचि माझे चित्तीं । राहो आतां भाव प्रीति । विठ्ठल सुषुप्तीं । जागृति स्वप्नासी ॥१॥ आणिक नाहीं मागणें । राज्यचाड संपत्ति धनें । जिव्हे सुख तेणें । घेतां देहीं नाम तुझें ॥२॥ तुझें रूप सर्वांठायीं । देखें ऐसें प्रेम देईं । ठेवावा हा पायीं । अनुभव चित्ताचा ॥३॥ जन्ममरणाचा बाध । समूळूनि तुटो कंद । लागो हाचि छंद । हरि गोविंद वाचेसी ॥४॥ काया पालटे दर्शनें । अवघें कोंदाटे चैतन्य । जीवशिव खंडण । होय तरे चिंतितां ॥५॥ तुका म्हणे

याचि भावें । आम्ही धालों तुझ्या नांवें । सुखें होत जन्में । भलते याती भलतैसी ॥६॥

३२३५. मौन कां धरिलें विश्वाच्या जीवना । उत्तर वचना देईं माझ्या ॥१॥ तूं माझें संचित तूंचि पूर्वपुण्य । तूं माझें प्राचीन पांडुरंगा ॥२॥ तूं माझें सत्कर्म तूं माझा स्वधर्म । तूंचि नित्यनेम नारायणा ॥३॥ कृपावचनाची वाट पहातसें । करुणा वोरसें बोला कांहीं ॥४॥ तुका म्हणे प्रेमळाच्या प्रियोत्तमा । बोला सर्वोत्तमा मजसवें ॥५॥

३२३६. काय करूं आतां धरूनियां भीड । नि:शंक हें तोंड वाजविलें ॥१॥ नव्हे जगीं कोणी मुकियाचा जाण । सार्थक लाजोन नव्हे हित ॥२॥ आलें तें उत्तर बोलों स्वामीसवें । धीट नीट जीवें होउनियां ॥३॥ तुका म्हणे मना समर्थासी गांठी । घालावी हे मांडी थापटोनि ॥४॥

३२३७. भ्रतारासी भार्या बोले गुजगोष्टी । मज ऐसी कष्टी नाहीं दुजी ॥१॥ अखंड तुमचें धंद्यावरी मन । माझें तों हेळण करिती सर्व ॥२॥ जोडितसां तुम्ही खाती येरचोरें । माझीं तंव पोरें हळहळती ॥३॥ तुमची व्याली माझे डाईं हो पेटली । सदा दुष्ट बोली सोसवेना ॥४॥ दुष्ट वृत्ती नंदुली सदा द्वेष करी । नांदों मी संसारीं कोण्या सुखें ॥५॥ भावा दीर कांहीं धड हा न बोले । नांदों कोणा खालें कैसी आतां ॥६॥ माझ्या अंगसंगें तुम्हांसी विश्रांति । मग धड गति नाहीं तुमची ॥७॥ ठाकतें ठुमकतें जीव मुठी धरूनि । परि तुम्ही अजूनि न धरा लाज ॥८॥ वेगळें निघतां संसार करीन । नाहीं तरी प्राण देतें आतां ॥९॥ तुका म्हणे झाला कामाचा अंकित । सांगे मनोगत तैसा वर्ते ॥१०॥

३२३८. कामाचा अंकित कांतेतें प्रार्थित । तूं कां हो दुश्चित निरंतर ॥१॥ माझीं मायबापें बंधु हो बहिणी । तुज करिती सीण त्यागीन मी ॥२॥ त्यांचे जरी तोंड पाहेन मागुता । तरी मज हत्या घडो तुझी ॥३॥ सकाळीं उठोन वेगळा निघेन । वाहतों तुझी आण निश्चयेंसी ॥४॥ वेगळें निघतां घडीन दोरे चुडा । तूं तंव माझा जोडा जन्माचा कीं ॥५॥ ताईत सांखळी गळाची दुलडी । बाजुबंदजोडी हातसर ॥६॥ वेणीचे जे नग सर्वही करीन । नको धरूं सीण मनीं कांहीं ॥७॥ नेसावया साडी सेलारी चुनडी । अंगींची कांचोळी जाळिया फुलें ॥८॥ तुका म्हणे केला रांडेनें गाढव । मनासवें धांव घेतलीसे ॥९॥

३२३९. उजळितां उजळे दीपकाची वाती । स्वयंभ ते ज्योती हिऱ्या अंगीं ॥१॥ एकीं महाकष्टें मेळविलें धन । एकासी जतन दैवयोगें ॥२॥ परिमळें कळे चंदनाचें चिन्ह । निवडी ते भिन्न गाढव तो ॥३॥ तुका म्हणे जया अंगीं नामठसा । तो तरे सहसा वंद्य होय ॥४॥

३२४०. सोवळा तो झाला । अंगिकार देवें केला ॥१॥ येर करिती भोजन । पोट पोसावया दुर्जन ॥२॥ चुकला हा भार । तयाचीच येरझार ॥३॥ तुका म्हणे दास । झाला तया नाहीं नास ॥४॥

३२४१. आजि शिवला मांग । माझें विटाळलें आंग ॥१॥ यासी घेऊं प्रायश्चित्त । विठ्ठलविठ्ठल हृदयांत ॥२॥ झाली क्रोधासवें भेटी । तोंडा वाटे नर्क लोटी ॥३॥ अनुतापी न्हाऊं । तुका म्हणे रवी पाहूं ॥४॥

३२४२. ठाव तुम्हांपाशीं । झाला आतां हृषीकेशी ॥१॥ नलगे जागावें सतत । येथें स्वभावें हे नीत ॥२॥ चोरट्यासी थारा । येथें कैंचा जी दातारा ॥३॥ तुका म्हणे मन । आतां झालें समाधान ॥४॥

३२४३. पाळियेले लळे । माझे विठ्ठले कृपाळे ॥१॥ बहुजन्माचें पोसणें । सरतें पायांपाशीं तेणें ॥२॥ सवे दिली लागों । भातें आवडीचें मागों ॥३॥ तुका म्हणे भिन्न । नाहीं दिसों दिलें क्षण ॥४॥

३२४४. जो या गेला पंढरपुरा । आणीक यात्रा न मनी तो ॥१॥ सुलभ माय पंढरिराणा । पुरवी खुणा अंतरींच्या ॥२॥ जन्मांतरिंच्या पुण्यरासी । वारी त्यासी पंढरीची ॥३॥ बाहेर येतां प्राण फुटे । रडें दाटे गहिंवरें ॥४॥ दधिमंगल भोजन सारा । म्हणती करा मुरडींव ॥५॥ मागोता हा पावो ठाव । पंढरिराव दर्शनें ॥६॥ तुका म्हणे भूवैकुंठ । वाळुवंट भींवरा ॥७॥

३२४५. न मिळती एका एक । जये नगरींचे लोक ॥१॥ भलीं तेथें राहूं नये । क्षणें होईल न कळे काय ॥२॥ न करितां अन्याय । बळें करीती अपाय ॥३॥ नाहीं पुराणाची प्रीती । ठायीं ठायीं पंचाइती ॥४॥ भल्या बुऱ्या मारी । होतां कोणी न विचारी ॥५॥ अविचाऱ्या हातीं । देउनि प्रजा नागविती ॥६॥ तुका म्हणे दरी । सुखें सेवावी ते बरी ॥७॥

३२४६. शिकवणें नाक झाडी । पुढिल जोडी कळेना ॥१॥ निरयगांवीं भोग देता । तेथें सत्ता आणिकांची ॥२॥ अवगुणांचा सांठा करी । तेचि धरी जीवासी ॥३॥ तुका म्हणे जडबुद्धि । कर्म शुद्धी सांडवी ॥४॥

३२४७. गोपीचंदन मुद्रा धारणें । आम्हां लेणें वैष्णवां ॥१॥ मिरवूं अळंकार लेणें । ही भूषणें स्वामींचीं ॥२॥ विकलों ते सेवा जीवें । एक्या भावें एकविध ॥३॥ तुका म्हणे शूर झालों । बाहेर आलों संसारा ॥४॥

३२४८. विषयांचे लोलिंगत । ते फजीत होतील ॥१॥ न सरे येथें यातिकुळ । शुद्ध मूळ बीज व्हावें ॥२॥ शिखासूत्र सोंग वरी । दुराचारी दंड पावे ॥३॥ तुका म्हणे अभिमान । नारायणा न सोसे ॥४॥

३२४९. वडिलें दिलें भूमिदान । तें जो मागे अभिळासून ॥१॥ अग्रपूजेचा अधिकारी । श्रेष्ठ दंड यमा घरीं ॥२॥ उभयकुळ समवेत । नरकीं प्रवेशे अद्भुत ॥३॥ तप्तलोहा भेटी । तुका म्हणे कल्पकोटी ॥४॥

३२५०. लटिकी ग्वाही सभेआंत । देतां पतित आगळा ॥१॥ कुंभपाकीं वस्ती करूं । होय धुरु कुळेंसी ॥२॥ रजस्वला रुधिर स्त्रवे । तेंचि द्यावें तृषेसी ॥३॥ तुका म्हणे जन्मा आला । काळ झाला कुळासी ॥४॥

३२५१. आचरे दोष न धरी धाक । परीपाक दुःखाचा ॥१॥ चांडाळ तो दुराचारी । अंगीकारी कोण त्या ॥२॥ नव्हे संतान वोस घर । अंधकार कुळासी ॥३॥ तुका म्हणे त्याचें दान । घेतां पतन दुःखासी ॥४॥

३२५२. कींविलवाणा झाला आतां । दोष करितां न विचारी ॥१॥ अभिलाषी नारी धन । झकवी जन लटिकेंचि ॥२॥ विश्वासिया करितां घात । न धरी चित्त कांटाळा ॥३॥ तुका म्हणे नाहीं आला । वृथा गेला जन्मासी ॥४॥

३२५३. घेऊं नये तैसें दान । ज्याचें धन अभिलाषी ॥१॥ तो येथें कामा नये । नरका जाय म्हणोनि ॥२॥ विकी स्नानसंध्या जप । करी तप पुढिलांचें ॥३॥ तुका म्हणे दांभिक तो । नरका जातो स्वइच्छा ॥४॥

३२५४ सदा नामघोष करूं हरिकथा । तेणें सदा चित्ता समाधान ॥१॥ सर्वसुख ल्यालों सर्व अळंकार । आनंदें निर्भर डुल्लतसों ॥२॥ असों ऐसा कोठें आठवचि नाहीं । देहींच विदेही भोगूं दशा ॥३॥ तुका म्हणे आम्ही झालों अग्निरूप । लागों नेदूं पापपुण्य अंगा ॥४॥

३२५५. वरीवरी बोले युद्धाचिया गोष्टी । परसैन्या भेटी नाहीं झाली ॥१॥ पराव्याचे भार पाहूनियां दृष्टी । कांपतसे पोटीं थरथरा ॥२॥ धनाचा उदार रायाचा जुंझार । फिरंगीचा मार मारीतसे ॥३॥ धन्य त्याची माय धन्य त्याचा बाप । अंगीं अनुताप हरिनामें ॥४॥ तुका म्हणे साधु बोले खर्गधार । खोंचतें अंतर दुर्जनाचें ॥५॥

३२५६. गंधर्वनगरीं क्षण एक न रहावें । तैंचि करावें मूळक्षेत्र ॥१॥ खपुष्पाची पूजा बांधोनि निर्गुणा । लक्ष्मीनारायणा तोषवावें ॥२॥ वंध्यापुत्राच्या लग्नाचा सोहळा । आपुलिया डोळां पाहा वेगीं ॥३॥ मृगजळीं पोहे घालुनि सज्ञाना । तापलिया जना तोषवावें ॥४॥ तुका म्हणे मिथ्या देहेंद्रियकर्म । ब्रह्मार्पण ब्रह्म होय बापा ॥५॥

३२५७. दासीचा जो संग करी । त्याचे पूर्वज नर्कद्वारीं ॥१॥ ऐसें सांगों जातां जना । नये कोणाचिया मना ॥२॥ बरें विचारूनी पाहें । तुज अंतीं कोण आहे ॥३॥ तुका म्हणे रांडलेंका । अंतीं जासी यमलोकां ॥४॥

३२५८. भाग्यवंत आम्ही विष्णुदास जगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥१॥ नाहीं ते पुरवीत आणुनि जवळी । गाउनी माउली गीत सुखें ॥२॥ प्रीति अंगीं असे सदा सर्वकाळ । वोळलीं

सकळ सुखें ठायीं ॥३॥ आपुल्या स्वभावें जैसे जेथें असों । तैसे तेथें दिसों साजिरेचि ॥४॥ वासनेचा कंद उपडिलें मूळ । दुरितें सकळ निवारिलीं ॥५॥ तुका म्हणे भक्तजनांची माउली । करील साउली विठ्ठल आम्हां ॥६॥

३२५९. भोंदावया मीस घेऊनि संतांचें । करी कुटुंबाचें दास्य सदा ॥१॥ मनुष्याचे परी बोल रावा करी । रंजवी नरनारी जगामध्यें ॥२॥ तिमयाचे बैल करी शिकविलें । चित्रींचें बाहुलें गोष्टी सांगे ॥३॥ तुका म्हणे देवा जळो हे महंती । लाज नाहीं चित्तीं निसुंगातें ॥४॥

३२६०. अंगीं घेऊनियां वारें दया देती । तया भक्तां हातीं चोट आहे ॥१॥ देव्हारा बैसोनि हालविती सुपें । ऐसीं पापी पापें लिंपती तीं ॥२॥ एकीबेकीन्यायें होतसे प्रचित । तेणें लोक समस्त भुलताती ॥३॥ तयांचे स्वाधीन दैवतें असती । तरी कां मरती त्यांचीं पोरें ॥४॥ तुका म्हणे पाणी अंगारा जयाचा । भक्त कान्होबाचा तोही नव्हे ॥५॥

३२६१. अधमाचें चित्त अहंकारी मन । उपदेश सीण तया केला ॥१॥ पापियाचें मन न करी आचार । विधवेसी शृंगार व्यर्थ केला ॥२॥ अधमाचे चित्त दुश्चित ऐकेना । वायांशीण मना करुनी काय ॥३॥ गर्दभासी दिली चंदनाची उटी । केशर ललाटी शूकराच्या ॥४॥ पतिवंचकेसी सांगतां उदंड । परि तें पाषांड तिचे मनीं ॥५॥ तुका म्हणे तैसें अभाविका सांगतां । वाउगाचि चित्ता सीण होय ॥६॥

३२६२. संत देखोनियां स्वयें दृष्टी टाळी । आदरें न्याहाळी परस्त्रीसी ॥१॥ वीट ये कर्णासी संतवाक्यामृता । स्त्रीशब्द ऐकतां निवे कर्ण ॥२॥ कथेमाजी नीज वाढे नित्यक्षणीं । स्त्रियेचे कीर्तनीं प्रेमें जागे ॥३॥ तुका म्हणे तुम्हीं क्रोधासी न यावें । स्वभावा करावे काय कोणीं ॥४॥

३२६३. भोळे भाविक हे जुनाट चांगले । होय तैसें केलें भक्तिभावें ॥१॥ म्हणउनि चिंता नाहीं आम्हां दासां । न भ्यों गर्भवासा जन्म घेतां ॥२॥ आपुलिया इच्छा करूं गदारोळ । भोगूं सर्वकाळ सर्व सुखें ॥३॥ तुका म्हणे आम्हां देवाचा सांगात । नाहीं विसंबत येरयेरां ॥४॥

३२६४. नाहीं बळ योगअभ्यास कराया । न कळे ते क्रिया साधनाची ॥१॥ तुझिये भेटीचें प्रेम अंतरंगीं । नाहीं बळ अंगीं भजनाचें ॥२॥ काय पांडुरंगा करूं बा विचार । झुरतें अंतर भेटावया ॥३॥ तुका म्हणे सांगा वडिलपण बुद्धी । तुजविण दयानिधी पुसों कोणा ॥४॥

३२६५. हेंचि सुख पुढतीं मागतों आगळें । आनंदाचीं फळें सेवादान ॥१॥ जन्मजन्मांतरीं तुझाचि अंकिला । करूनि विठ्ठला दास ठेवीं ॥२॥ दुजा भाव आड येऊं नेदीं चित्ता । करावा अनंता नास त्याचा ॥३॥ अभय देऊनि करावें सादर । क्षण तो विसर पडों नेदीं ॥४॥ तुका म्हणे

आम्ही जे जे इच्छा करूं । ते ते कल्पतरू पुरविसी ॥५॥

३२६६. बहुतां जन्मां अंतीं जन्मलासी नरा । देव तो सोइरा करीं आतां ॥१॥ करीं आतां बापा स्वहिताचा स्वार्थ । अनर्थाचा अर्थ सांडीं परता ॥२॥ सांडीं आतां कुडी कल्पनेची वाट । मार्ग आहे नीट पंढरीचा ॥३॥ पंढरीसी जावें सर्व सुख घ्यावें । रूप तें पाहावें विटेवरी ॥४॥ विटेवरी नीट आनंदाचा कंद । तुका नाचे छंदें नामघोषें ॥५॥

३२६७. पवित्र तें कुळ पावन तो देश । जेथें हरिचे दास जन्म घेती ॥१॥ कर्मधर्म त्यांचा झाला नारायण । त्यांचेनि पावन तिन्ही लोक ॥२॥ वर्णअभिमानें कोण झाले पावन । ऐसें द्या सांगून मजपाशीं ॥३॥ अंत्यजादि योनि तरल्या हरिभजनें । तयाची पुराणें भाट झालीं ॥४॥ वैश्य तुळाधार गोरा तो कुंभार । धागा हा चांभार रोहिदास ॥५॥ कबीर मोमीन लतिफा मुसलमान । सेना न्हावी जाण विष्णुदास ॥६॥ कान्होपात्रा खोदु पिंजारी तो दादु । भजनीं अभेदू हरिचे पायीं ॥७॥ चोखामेळा बंका जातीचे महार । त्यासी सर्वेश्वर ऐक्य करी ॥८॥ नामयाची जनी कोण तिचा भाव । जेवी पंढरीराव तियेसवें ॥९॥ मैराळ जनक कोण कुळ त्याचें । महिमान तयाचें काय सांगों ॥१०॥ यातायातीधर्म नाहीं विष्णुदासा । निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं ॥११॥ तुका म्हणे तुम्हीं विचारावे ग्रंथ । तारिले पतित नेणों किती ॥१२॥

३२६८. ऐसे कैसे झाले भोंदू । कर्म करोनि म्हणती साधू ॥१॥ अंगा लावूनियां राख । डोळे झांकुनि करिती पाप ॥२॥ दावुनि वैराग्याची कळा । भोगी विषयांचा सोहळा ॥३॥ तुका म्हणे सांगों किती । जळो तयांची संगती ॥४॥

३२६९. मानूं कांहीं आम्ही आपुलिया इच्छा । ना तरी सरिसा रंकरावो ॥१॥ आपुल्या उदास आहों देहभावीं । मग लज्जा जीवीं चाड नाहीं ॥२॥ तुका म्हणे आम्ही खेळों सहज लीळे । म्हणोनि निराळे सुखदु:खा ॥३॥

३२७०. फिरविलें देऊळ जगामाजी ख्याती । नामदेवा हातीं दूध प्याला ॥१॥ भरियेली हुंडी नरसीमेहत्याची । धनाजी चाट्याचीं सेतें पेरी ॥२॥ मिराबाईसाठीं प्याला तो विषाचा । लाख्या कोलाट्याचा ढोल पिटी ॥३॥ कबिराचे मागीं विणूं लागे शेले । मूल उठविलें कुंभाराचें ॥४॥ आतां तुम्ही दया करा पंढरिराया । तुका विनवी पायां वेळोवेळां ॥५॥

३२७१. निरंजनीं आम्हीं बांधियेलें घर । निराकारीं निरंतर राहिलोंसे ॥१॥ निराभासीं पूर्ण झालों समरस । अखंड ऐक्यास पावलों आम्ही ॥२॥ तुका म्हणे आतां नाहीं अहंकार । झालों तदाकार नित्य शुद्ध ॥३॥

३२७२. पांडुरंगें सत्य केला अनुग्रह । निरसोनि संदेह बुद्धिभेद ॥१॥ जीवशिवा शेज रचिली आनंदें । आउटाविए पदीं आरोहण ॥२॥ निजीं निजरूपीं निजविला तुका । अनुहत

बाळका हल्लरु गाती ॥३॥

३२७३. नाना मतांतरें शब्दाची व्युत्पत्ति । पाठांतरें होती वाचाळ ते ॥१॥ माझ्या विठोबाचें वर्म आहे दुरी । कैंची तेथें उरी देहभावा ॥२॥ यज्ञ याग जप तप अनुष्ठान । राहे ध्येय ध्यान आलीकडे ॥३॥ तुका म्हणे होय उपरति चित्ता । अंगीं सप्रेमता येणें लागे ॥४॥

३२७४. नाहीं शब्दाधीन वर्म आहे दुरी । नव्हे तंत्रीं मंत्रीं अनुभव तो ॥१॥ हर्षामर्षा अंगीं आदळती लाटा । कामक्रोधें तटा सांडियेलें ॥२॥ न सरे ते भक्ति विठोबाचे पायीं । उपरति नाहीं जेथें चित्ता ॥३॥ तुका म्हणे सुख देहनिरसनें । चिंतनें चिंतनें तद्रूपता ॥४॥

३२७५. शोधूनि अन्वय वंश वंशावळी । परस्परा कुळीं उच्चारण ॥१॥ म्हणविलें मागें पुढें चाले कैसें । केला सामरस्य अभिषेक ॥२॥ एकछत्र झळके उन्मनी निशाणी । अनुहात ध्वनी गगन गर्जे ॥३॥ तुकया स्वामी स्थापी निजपदीं दासा । करूनी उल्हासा सप्रेमता ॥४॥

३२७६. प्रवृत्तिनिवृत्तीचे आटूनियां भाग । उतरिलें चांग रसायन ॥१॥ ज्ञानाग्निहुताशीं कडशिले वोजा । आत्मसिद्धिकाजा लागूनियां ॥२॥ ब्रह्मीं ब्रह्मरस सिद्ध झाला पाक । घेतला रुचक प्रतीतीमुखें ॥३॥ स्वानुभव अंगीं झाला समरस । साधनीं निजध्यास ग्रासोग्रासीं ॥४॥ आरोग्यता तुका पावला अष्टांगीं । मिरविला रंगीं निजात्मरंगें ॥५॥

३२७७. पुराणिक म्हणविती । जाणोनि कांदे ते भक्षिती ॥१॥ अगस्तीचें मूत्र मळ । लावुनि म्हणती कृष्णावळ ॥२॥ श्रेष्ठ वर्ण ब्राह्मणाचा । संग न सुटे शूद्रीचा ॥३॥ बदराईच्या पाडी दाढा । लागे तुकयाचा हुंदाडा ॥४॥

३२७८. स्वप्नीं तोही कैसा न पडसी डोळां । सुंदर सांवळा घवघवीत ॥१॥ चतुर्भुज माळा रुळे येकावळी । कस्तुरी निढळीं रेखिलीसे ॥२॥ शंख चक्र गदा रुळे वैजयंती । कुंडलें तळपती श्रवणीं दोन्ही ॥३॥ तुका म्हणे स्वप्नीं दावी आतां पाय । पांडुरंगें माय कृपावंते ॥४॥

३२७९. साता दिवसांचा जरी झाला उपवासी । तरी कीर्तनासी टाकूं नये ॥१॥ फुटो हा मस्तक तुटो हें शरीर । परी नामाचा गजर सोडूं नये ॥२॥ शरीराचे होत दोनी तेही भाग । परि कीर्तनाचा रंग सांडो नये ॥३॥ तुका म्हणे ऐसा नामीं झाला निर्धार । तेथें निरंतर देव वसे ॥४॥

३२८०. पहिली माझी ओवी ओवीन जगत्र । गाईन पवित्र पांडुरंग ॥१॥ दुसरी माझी ओवी दुजें नाहीं कोठें । जनीं वनीं भेटे पांडुरंग ॥२॥ तिसरी माझी ओवी तिला नाहीं ठाव । अवघाचि देव जनीं वनीं ॥३॥ चवथी माझी ओवी वैरिलें दळण । गाईन निधान पांडुरंग ॥४॥ पांचवी माझी ओवी माझिया माहेरा । गाईन निरंतरा पांडुरंगा ॥५॥ साहावी माझी ओवी साहाही आटली । गुरुमूर्ति भेटली पांडुरंग ॥६॥ सातवी माझी ओवी आठवी वेळोवेळां । बैसलासे डोळां पांडुरंग ॥७॥ आठवी माझी ओवी अठ्ठावीस युगें । उभा चंद्रभागे पांडुरंग ॥८॥ नववी

माझी ओवी सरलें दळण । चुकलें मरण संसारींचें ॥९॥ दहावी माझी ओवी दाहा अवतारा । न यावें संसारा तुका म्हणे ॥१०॥

३२८१. अनाथां जीवन । आम्हां तुमचे चरण । करूनि सांठवण । ते धरिले हृदयीं ॥१॥ पुष्ट झाली अंगकांति । आनंद न समाये चित्तीं । कवतुकें प्रीती । गाऊं नाचों उल्हासें ॥२॥ करुणाउत्तरीं । करूं आळवण हरी । जाऊं नेदूं दुरी । प्रेमप्रीतिपडिभरें ॥३॥ मोहो ममता करी गोवा । ऐसें आहे जी केशवा । तुका म्हणे सेवा । आणीक नाहीं जाणत ॥४॥

३२८२. घ्या रे भाई घ्या रे भाई । कोणी कांहीं थोडें बहु ॥१॥ येच हाटीं येच हाटीं । बांधा गांठीं पारखून ॥२॥ वेच आहे वेच आहे । सरलें पाहें मग कोठें ॥३॥ उघडें दुकान उघडें दुकान । रात्री झाली कोण सोडी मग ॥४॥ तुका म्हणे अंतकाळीं । जाती टाळीं बैसोनी ॥५॥

३२८३. गुणांची आवडी वाचेचा पसरु । पडिला विसरु सर्व रसां ॥१॥ आदि मध्य अंतीं नाहीं अवसान । जीवनीं जीवन मिळोनि गेलें ॥२॥ रामकृष्ण नाममाळा हे साजिरी । ओविली गोजिरी कंठाजोगी ॥३॥ तुका म्हणे तनु झालीसे शीतळ । अवघी सकळ ब्रह्मानंदें ॥४॥

३२८४. जैसी तैसी तरि वाणी । मना आणि माउली ॥१॥ लेंकरांच्या स्नेहें गोड । करी कोड त्या गुणें ॥२॥ मागें पुढें रिघे पोटीं । साहे खेटी करी तें ॥३॥ तुका विनवी पांडुरंगा । ऐसें पैंगा आहे हें ॥४॥

३२८५. देवाची भांडारी । आदा विनियोग करी ॥१॥ आतां न माखे हातपाय । नेणों होतें कैसें काय ॥२॥ देवें नेली चिंता । झाला सकळ करिता ॥३॥ तुका म्हणे धणी । त्यासी अवघी पुरवणी ॥४॥

३२८६. पेणावलें ढोर मार खाय पाठी । बैसलें तें नुठी तेथूनियां ॥१॥ तैसी माझ्या मना परी झाली देवा । धांवें अहंभावा सांडवलों ॥२॥ कडां घाली उडी मागिलांच्या भेणें । पडणें मरणें न कळेचि ॥३॥ तुका म्हणे झालों त्यापरी दुःखित । असें बोलावीत पांडुरंगा ॥४॥

३२८७. झालिया दर्शन करीन मी सेवा । आणिक कांहीं देवा नलगे दुजें ॥१॥ प्रारब्धा अधीन अन्न आच्छादन । स्थिर करोनि मन ठेवी पायीं ॥२॥ येगा येगा येगा कृपाळुवा हरी । निववीं अभ्यंतरीं देऊनि भेटी ॥३॥ आसावलें मन जीवनाचे ओढी । नामीं रूपीं गोडी लावियेली ॥४॥ काय तुम्हांपाशीं नाहीं भांडवल । माझे मिथ्या बोल जाती ऐसे ॥५॥ काय लोखंडाचे पाहे गुणदोष । सिवोनि परिस सोनें करी ॥६॥ तुका म्हणे माझें अवघें असों द्यावें । आपुलें करावें ब्रीद साच ॥७॥

३२८८. हरिः ॐ तत्सदिति सूत्राचें जें सार । कृपेचा सागर पांडुरंग ॥१॥ हरिः ॐ दत्त उदात्त अनुदात्त । प्रचुररहित पांडुरंग ॥२॥ सर्वस्व व्यापीलें सर्वांही निराळें । वेदांचें जें मूळ

तुका म्हणे ॥३॥

३२८९. किती सांगों तरी नाइकती बटकीचे । पुढें सिंदळीचे रडतील ॥१॥ नका नका करूं रांडेची संगती । नेईल अधोगती घाली यम ॥२॥ तुका म्हणे जरी देवीं नाहीं चाड । हाणोनि थोबाड फोडी काळ ॥३॥

३२९०. पिकलिया सेंद कडुपण गेलें । तैसें आम्हां केलें पांडुरंगें ॥१॥ काम क्रोध लोभ निमाले ठायींचि । सर्व आनंदाची सृष्टि झाली ॥२॥ आठव नाठव गेले भावाभाव । झाला स्वयमेव पांडुरंग ॥३॥ तुका म्हणे भाग्य या नांवें म्हणीजे । संसारीं जन्मीजे याचि लागीं ॥४॥

३२९१. कारणा कारण वारियेलें जेथें । जातों तेणें पंथें सादावीत ॥१॥ संतीं हें पईल लाविलें निशाण । ते खूण पाहोन नाम गर्जे ॥२॥ तुका म्हणे तुम्ही चला याचि वाटे । पांडुरंग भेटे भरंवसेनी ॥३॥

३२९२. आइत्या भाग्या धणी व्हावें । केणें घ्यावें न सरे तें ॥१॥ केणें आहे पंढरपुरीं । उद्धाराचें लाभिक ॥२॥ बाखराची करूनि रितीं । भरा पोतीं सकळ ॥३॥ तुका म्हणे संतांपाडें । करा पुढें वाखती ॥४॥

३२९३. सिंदळीचें चित्त परपुरुषावरी । पति चुरमुरी रात्रंदिवस ॥१॥ ऐसी ते वोंगळी जाय हो नरका । तिच्या दोषें देखा पति जाय ॥२॥ आपण बुडती पति बुडविती । दोन्ही कुळें नेती अध:पाता ॥३॥ तुका म्हणे तिची न करावी संगती । होइल फजिती मागें पुढें ॥४॥

३२९४. मायबाप सर्वे नये धनवित्त । करावें संचित भोगावें तें ॥१॥ म्हणऊनि लाभ काय तो विचारी । नको चालीवरी चित्त ठेवूं ॥२॥ आयुष्य शेवटीं सांडूनि जाणार । नव्हेचि साचार शरीर हें ॥३॥ तुका म्हणे काळें लावियेलें माप । जमा धरी पापपुण्याचींही ॥४॥

३२९५. मोटळें हाटीं सोडिल्या गांठी । विकर्‍या घातले कण । ज्याचे भाग त्यासी देऊनि निवारिले । सारूनि लिगाड दान । खरें माप हातीं बैसलों । मानिती तेचि चौघे जण । खरें वित्त तेथें आले चोजवित । गिर्‍हाईक संतजन ॥१॥ झाडिला पालव केला हाट वेच । झाली सकळींच अराणूक । याल तरि तुम्हीं करा लगबग । आमचे ते कोणी लोक ॥२॥ एक ते उत्तम मध्यम कनिष्ठ । वित्ताचे प्रकार तीन । बहुतां जनांचे बहुत प्रकार । वेगळाले वाण । लाभ हाणी कोणा मुद्दल झालें । कोणासी पडिलें खाण । अर्धमर्ध कोणी गुंतोनि राहिली । थोडे तैसे बहु जन ॥३॥ एक सांते आले एके गांवींहून । येकामेचि नव्हे जाणें । येतां जातां रुजू नाहीं दिवाणा । काळतोंडीं एकी तेणें । लाग भाग एकी एकानीं गोविली । मागील पुढिलां ऋणें । तुका म्हणे आतां पाहूं नये वास । साधावें आपुलें पेणें ॥४॥

३२९६. आम्हां कांही आम्हां कांही । आतां नाहीं या बोलें ॥१॥ मोल सांगा मोल सांगा ।

घेणें तिहीं गा पुसावें ॥२॥ कैसें घडे कैसें घडे । बडबड तुज मज ॥३॥ मुद्दलें साठीं मुद्दलें साठीं । लाभ पोटीं त्यामधीं ॥४॥ तुका म्हणे सांठवूं घरीं । आडल्या काळें पुसती तरी ॥५॥

३२९७. काय मागावें कवणासी । ज्यासी मागों तो मजपाशीं ॥१॥ जरी मागों पद इंद्राचें । तरी शाश्वत नाहीं त्याचें ॥२॥ जरी मागों ध्रुव पद । तरी त्यासी येथील छंद ॥३॥ स्वर्गभोग मागों पूर्ण । पुण्य सरल्या मागुती येणें ॥४॥ मागों जरी पद वैकुंठ । तें तव येकदेशी करंटें ॥५॥ आयुष्य मागों चिरंजीव । जीवा मरण नाहीं स्वभावें ॥६॥ तुका म्हणे एक मागें । एकपणा नाहीं भंग ॥७॥

३२९८. रुसलों या आम्हीं आपुल्या संसारा । तेथें जनाचारा कोण पाड ॥१॥ आम्हां इष्ट मित्र सज्जन सोयरे । नाहीं या दुसरें देवाविण ॥२॥ दुराविले बंधु सखे सहोदर । आणीक विचार काय तेथें ॥३॥ उपाधिवचन नाइकती कान । त्रासलें हें मन बहु माझें ॥४॥ तुका म्हणे करा ठाकेल ते दया । सुख दुःख वांया न धरावें ॥५॥

३२९९. सांडुनि सुखाचा वांटा । मुक्ति मागे तो करंटा ॥१॥ कां रे न घ्यावे हे जन्म । काय वैकुंठा जाऊन ॥२॥ येथें मिळतो दहीं भात । नाहीं वैकुंठीं ते मात ॥३॥ तुका म्हणे मुक्ति नलगे । राहेन संतांचिये संगें ॥४॥

३३००. तरिच शोभे वेडी । नग्न होय धड फाडी ॥१॥ काय बोलाचें गौरव । आंत वरी दोन भाव ॥२॥ मृगजळ न्याहाळितां । ताहान नवजे सेवितां ॥३॥ न पाहे आणिकांची वास । शूर बोलिजे तयास ॥४॥ तुका म्हणे या लक्षणें । संत अळंकार लेणें ॥५॥

३३०१. आग्रहा नांवें पाप । योगीं सारावें संकल्प ॥१॥ सहज ऐसें भांडवल । असोनि कां सारा बोल ॥२॥ तैं न भेटे तें काय । मना अंगींचे उपाय ॥३॥ तुका म्हणे धरीं सोय । वासनेची फोडा डोय ॥४॥

३३०२. न करी पठन घोष अक्षरांचा । बीजमंत्र आमुचा पांडुरंग ॥१॥ सर्वकाळ नामचिंतन मानसीं । समाधान मनासीं समाधि हे ॥२॥ न करी भ्रमण न रिघें कपाटीं । जाईन तेथें दाटी वैष्णवांची ॥३॥ आन नेणें कांहीं नवजें तपासी । नाचें दिंडीपाशीं जागरणीं ॥४॥ उपवास व्रत न करीं पारणें । रामकृष्ण म्हणे नारायण ॥५॥ आणिकांची स्तुती सेवा नेणें वाणूं । तुका म्हणे आनु दुजें कांहीं ॥६॥

३३०३. पुंडलिकाचे निकटसेवे । कैसा धांवें बराडी ॥१॥ आपुलें तें थोरपण । नारायण विसरला ॥२॥ उभा कटी ठेवुनि कर । न म्हणे पर बैससें ॥३॥ तुका म्हणे जगदीशा । करणें आशा भक्तांची ॥४॥

३३०४. बाळ काय जाणे जीवनउपाय । वाहे बापमाय सर्व चिंता ॥१॥ आइतें भोजन

खेळणें अंतरीं । अंकिताच्या शिरीं भार नाहीं ॥२॥ आपुलें शरीर रक्षितां न कळे । सांभाळूनि लळे पाळी माय ॥३॥ तुका म्हणे माझा विठ्ठल जनिता । आमुची ते सत्ता तयावरी ॥४॥

३३०५. काय करितील केलीं नित्य पापें । वसे नाम ज्यापें विठोबाचें ॥१॥ तृणीं हुताशन लागतां ते रासी । जळतील तैसीं क्षणमात्रें ॥२॥ विष्णुमूर्तिपाद पाहतां चरण । तेथें कर्म कोण राहूं शके ॥३॥ तुका म्हणे नाम जाळी महादोष । जेथें होय घोष कीर्तनाचा ॥४॥

३३०६. माकडा दिसती कंवटी नारळे । भोक्ता तो निराळे वरील सारी ॥१॥ एका रस एका तोंडीं पडे माती । आपुलाले नेती विभाग ते ॥२॥ सुनियासी क्षीर चारिल्या ओकवी । भोक्ता तो सेवी धणीवरी ॥३॥ तुका म्हणे मूर्ख वागविती भार । नेतील तें सार परीक्षक ॥४॥

३३०७. भेटीची आवडी उताविळ मन । लागलेंसे ध्यान जीवीं जीवा ॥१॥ आतां आवडीचा पुरवा सोहळा । येऊनी गोपाळा क्षेम देईं ॥२॥ नेत्र उन्मळित राहिले ताटस्थी । गंगा अश्रुपाती वहावली ॥३॥ तुका म्हणे तुम्ही करा साचपणा । मुळींच्या वचना आपुलिया ॥४॥

३३०८. धवळलें जगदाकार । अंधार तो निरसला ॥१॥ लपों जातां ठाव नाहीं । प्रगट पाहीं पसारा ॥२॥ खरियाचा दिवस आला । वाढी बोला न पुरे ॥३॥ तुका म्हणे जीवें साठीं । पडिली मिठी धुरेसी ॥४॥

३३०९. मातेची अवस्था काय जाणे बाळ । तिसी तों सकळ चिंता त्याची ॥१॥ ऐसा परस्परें आहेजी विचार । भोपळ्याचा तार दगडासी ॥२॥ भुजंग पोटाळी चंदनांचें अंग । निवे परि संगें नव्हे तैसा ॥३॥ तुका म्हणे करा परिसाचे परी । मज ठेवा सरी लोखंडाचे ॥४॥

३३१०. लावूनि कोलित । माझा करितील घात ॥१॥ ऐसे बहुतांचे संधी । सांपडलों खोळेमधीं ॥२॥ पाहातील उणें । तेथें देती अनुमोदनें ॥३॥ तुका म्हणे रिघ । पुढें नाहीं झालें धींद ॥४॥

३३११. ऐसी एकां अटी । रितीं शिणती करंटीं ॥१॥ साच आपुल्या पुरतें । करूनि न घेती कांहीं हितें ॥२॥ कां हीं वेचितील वाणी । निरर्थकचि कारणीं ॥३॥ तुका म्हणे देवा । कांहीं समर्पूनि सेवा ॥४॥

३३१२. चालिले सोबती । काय मानिली निश्चिंती ॥१॥ काय करिसी एकला । काळ सन्निध पातला ॥२॥ कांहीं सावध तों बरवा । करीं आपुला काढावा ॥३॥ चालिले आगळे । हळूच कान केश डोळे ॥४॥ वोसरलें दांत । दाढा गडबडल्या आंत ॥५॥ एकली तळमळे । जिव्हा भलतेंचि चावळे ॥६॥ तुका म्हणे यांनीं । तुझी मांडिली घालणी ॥७॥

३३१३. नका मजपाशीं । वदों प्रपंचाचे विशीं ॥१॥ आतां नाइकवे कानीं । मज देवाविण वाणी ॥२॥ येऊनियां रूपा । कोण पाहे पुण्यपापा ॥३॥ मागें आजिवरी । जालें

माप नेलें चोरीं ॥४॥ सांडियेलीं पानें । पुढें पिका अवलोकनें ॥५॥ पडों नेदी तुका । आड गुंफूं कांहीं चुका ॥६॥

३३१४. माझें मज द्यावें । नाहीं करवीत नवें ॥१॥ सहस्त्र नामाचें रूपडें । भक्तकैवारी चोखडें ॥२॥ साक्षीवीण बोलें । तरि मज पाहिजे दंडिलें ॥३॥ तुका म्हणे माल । माझा खरा हा विठ्ठल ॥४॥

३३१५. आम्हा लडिवाळांचे बोल । करा कवतुकें नवल ॥१॥ करूं स्तुती तरि ते निंदा । तुम्ही जाणा हे गोविंदा ॥२॥ बोबड्या उत्तरीं । तुम्हां रंजवितो हरी ॥३॥ मागतों भातुकें । तुका म्हणे कवतुकें ॥४॥

३३१६. न लाहिजे जपें न लाहिजे तपें । आम्हांसी हें सोपें गीतीं गातां ॥१॥ न करितां ध्यान न करितां धारणा । तो नाचे कीर्तनामाजी हरी ॥२॥ जयासी नाहीं रूप आणि आकार । तोचि कटीं कर उभा विटे ॥३॥ अनंत ब्रह्मांडें जयाचिया पोटीं । तो आम्हां संपुष्टीं भक्तिभावें ॥४॥ तुका म्हणे वर्म जाणती लडिवाळें । जीं होतीं निर्मळ अंतर्बाहीं ॥५॥

३३१७. जालों बळिवंत । होऊनियां शरणागत ॥१॥ केला घरांत रिघावा । ठायीं पाडियेला ठेवा ॥२॥ हातां चढे धन । ऐसें रचिलें कारण ॥३॥ तुका म्हणे मिठी । पायीं देउनी केली सुटी ॥४॥

३३१८. लागपाठ केला । आतां वांटा नीट त्याला ॥१॥ करा जोडीचा हव्यास । आलें दुरील घरास ॥२॥ फोडिलीं भांडारें । मोहोरलीं एकसरें ॥३॥ अवघियांपुरतें । तुका म्हणे घ्यावें हातें ॥४॥

३३१९. एकीं असे एक हेवा । येर अनावडी जीवां ॥१॥ देवें केल्या भिन्न जाती । उत्तम कनिष्ठ मध्यस्ती ॥२॥ प्रीतीसाठीं भेद । कोणी पूज्य कोणी निंद्य ॥३॥ तुका म्हणे लळा । त्याचा जाणे हा कळवळा ॥४॥

३३२०. स्वामीचें हें देणें । येथें पावलों दर्शनें ॥१॥ करूं आवडीनें वाद । तुमच्या सुखाचा संवाद ॥२॥ कळावया वर्म । हा तो पायांचाचि धर्म ॥३॥ तुका म्हणे सिद्धी । हेचि पावविली बुद्धी ॥४॥

३३२१. रुसलों संसारा । आम्ही आप आणि परा ॥१॥ म्हणऊनि केली सांडी । देउनि पडिलों मुरकुंडी ॥२॥ परतेचि ना मागें । मोहों निष्ठुर झालों अंगें ॥३॥ सांपडला देव । तुका म्हणे गेला भेव ॥४॥

३३२२. हें तों वाटलें आश्चर्य । तुम्हां धरवला धीर ॥१॥ माझा फुटतसे प्रण । धांवा धांवा म्हणऊन ॥२॥ काय नेणों दिशा । झाल्या तुम्हांविण वोसा ॥३॥ तुका म्हणे कांगा ।

नाइकिजे पांडुरंगा ॥४॥

३३२३. धांवा केला धांवा । श्रम होऊं नेदी जीवा ॥१॥ वर्षे अमृताच्या धारा । घेईं वोसंगा लेंकुरा ॥२॥ उशीर तो आतां । न करावा हेचि चिंता ॥३॥ तुका म्हणे त्वरें । वेग करीं विश्वंभरे ॥४॥

३३२४. जोडिले अंजुळ । असें दाना उताविळ ॥१॥ पहा पहा कृपादृष्टी । आणा अनुभवा गोष्टी ॥२॥ तूं स्वामी मी सेवक । आइक्य तो एका एक ॥३॥ करितो विनंती । तुका सन्मुख पुढती ॥४॥

३३२५. ऐका महिमा आवडीची । बोरें खाय भिल्लटीचीं ॥१॥ थोर प्रेमाचा भुकेला । हाचि दुष्काळ तयाला ॥२॥ पोहे सुदामदेवाची । फके मारी कोरडेचि ॥३॥ न म्हणे उच्छिष्ट अथवा थोडें । तुका म्हणे भक्तीपुढें ॥४॥

३३२६. कुंभ अवघा एक आवा । पाकीं एकीं गू फेडावा ॥१॥ ऐसे भिन्न भिन्न साटे । केले प्रारब्धानें वांटे ॥२॥ हिरे दगड एक खाणी । कैंचें विजातीला पाणी ॥३॥ तुका म्हणे शिरीं । एक एकाची पायरी ॥४॥

३३२७. मांडे पुऱ्या मुखें सांगों जाणे मात । तोंडीं लाळ हात चोळी रिते ॥१॥ ऐसियाच्या गोष्टी फिक्या मिठेंविण । रुचि नेदी अन्न चवी नाहीं ॥२॥ बोलो जाणे अंगीं नाहीं शूरपण । काय तें वचन जाळावें तें ॥३॥ तुका म्हणे बहु तोंडें जे वाचाळ । तें गे तेंचि मूळ लटिक्याचें ॥४॥

३३२८. न लगे चंदना पुसावा परिमळ । वनस्पतिमेळ हाकारुनी ॥१॥ अंतरींचें धांवे स्वभाव बाहेरी । धरितांही परी आवरेना ॥२॥ सूर्य नाहीं जागें करीत या जना । प्रकाशकिरणा कर म्हूण ॥३॥ तुका म्हणे मेघ नाचवी मयूरें । लपवितां खरें येत नाहीं ॥४॥

३३२९. चंदनाचे हात पायही चंदन । परिसा नाहीं हीन कोणी अंग ॥१॥ दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार । सर्वांगीं साकर अवघी गोड ॥२॥ तुका म्हणे तैसा सज्जनापासून । पहातां अवगुण मिळेचि ना ॥३॥

३३३०. मन करा रे प्रसन्न । सर्व सिद्धींचें कारण । मोक्ष अथवा बंधन । सुख समाधान इच्छा ते ॥१॥ मनें प्रतिमा स्थापिली । मनें मन पूजा केली । मनें इच्छा पुरविली । मन माउली सकळांची ॥२॥ मन गुरु आणि शिष्य । करी आपुलेंचि दास्य । प्रसन्न आपआपणास । गति अथवा अधोगति ॥३॥ साधक वाचक पंडित । श्रोते वक्ते ऐका मात । नाहीं नाहीं आन दैवत । तुका म्हणे दुसरें ॥४॥

३३३१. मायबापें जरी सर्पीण कीं बोका । त्यांचे संगें सुखा नपवे बाळ ॥१॥ चंदनाचा

शूळ सोनियाची बेडी । सुख नेदी फोडी प्राण नाशी ॥२॥ तुका म्हणे नरकीं घाली अभिमान । जरी होय ज्ञान गर्व ताठा ॥३॥

३३३२. शिकल्या बोलाचे सांगतील वाद । अनुभव भेद नाहीं कोणा ॥१॥ पंडित हे ज्ञानी करितील कथा । न मिळती अर्था निजसुखा ॥२॥ तुका म्हणे जैसी लांचासाठीं ग्वाही । देतील हे ठावी नाहीं वस्तु ॥३॥

३३३३. प्रारब्ध क्रियमाण । भक्ता संचित नाहीं जाण ॥१॥ अवघा देवचि झाला पाहीं । भरोनियां अंतर्बाहीं ॥२॥ सत्वरजतम बाधा । नव्हे हरिभक्तांसी कदा ॥३॥ देवभक्तपण । तुका म्हणे नाहीं भिन्न ॥४॥

३३३४. शास्त्रांचें जें सार वेदांची जो मूर्ति । तो आम्हां सांगाती प्राणसखा ॥१॥ म्हणउनि नाहीं आणिकांचा पांग । सर्व झालें सांग नामें एका ॥२॥ सगुण निर्गुण जयाचिये अंगें । तोचि आम्हांसंगें क्रीडा करी ॥३॥ तुका म्हणे आम्ही विधीचे जनिते । स्वयंभ आइते केले नव्हों ॥४॥

३३३५. कोणें तुझा सांग केला अंगीकार । निश्चिंति त्वां थोर मानियेली ॥१॥ कोणें ऐसा तुज उपदेश केला । नको या विठ्ठला शरण जाऊं ॥२॥ तेव्हां तुज कोण घालील पाठीसी । घांसील भूमीसी वदन यम ॥३॥ कारे नागवसी आयुष्य खातो काळ । दिवसेंदिवस बळ क्षीण होतें ॥४॥ तुका म्हणे यासी सांगा कोणी तरी । विसरला हरी मायबाप ॥५॥

३३३६. साधूनी बचनाग खाती तोळा तोळा । आणिकातें डोळां न पहावे ॥१॥ साधुनी भुजंग धरतील हातीं । आणिकें कांपती देखोनियां ॥२॥ असाध्य तें साधे करितां सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ॥३॥

३३३७. आमुची गोसावी अयाचित वृत्ती । करवी शिष्या हातीं उपदेश ॥१॥ दगडाची नाव आधींच ते जड । ते काय दगड तारूं जाणे ॥२॥ तुका म्हणे वेष विटंबिला त्यांनीं । सोंग संपादणी करिती परी ॥३॥

३३३८. मृगजळा काय करावा उतार । पावावया पार पैलथडी ॥१॥ खापराचे होन खेळती लेंकुरें । काय त्या वेव्हारें लाभ हानी ॥२॥ मंगळदायकें करिती कुमारी । काय त्यांची खरी सोयरीक ॥३॥ स्वप्नींचें जें सुख दुःख झालें कांहीं । जागृती तो नाहीं साच भाव ॥४॥ सारी झाली मेलीं लटिकें वचन । बद्ध मुक्त शीण तुका म्हणे ॥५॥

३३३९. अंधळ्यासी जन अवघेचि आंधळे । आपणासि डोळे दृष्टी नाहीं ॥१॥ रोग्या विषतुल्य लागे हे मिष्टान्न । तोंडासि कारण चवी नाहीं ॥२॥ तुका म्हणे शुद्ध नाहीं जों आपण । तया त्रिभुवन सर्व खोटें ।३॥

३३४०. बोलविसी तैसें आणी अनुभवा । नाहीं तरी देवा विटंबना ॥१॥ मिठेंविण काय

करावें मिष्टान्न । शव जीवेंविण शृंगारिलें ॥२॥ संपादणीविण विटंबिलें सोंग । गुणेंविण चांग रूप हीन ॥३॥ कन्यापुत्रेंविण मंगळदायकें । वेचिलें हें फिकें द्रव्य तरी ॥४॥ तुका म्हणे तैसी होते मज परी । न देखे अंतरीं प्रेमभाव ॥५॥

३३४१. नाहीं आम्ही विष्णुदास । करीत आस कोणाची ॥१॥ कां हे नष्ट करिती निंदा । नेणो सदा आमुची ॥२॥ असों भलते ठायीं मनें । समाधानें आपुल्या ॥३॥ तुका म्हणे करूं देवा । तुझी सेवा धंदा तो ॥४॥

३३४२. काय माता विसरे बाळा । कळवळा प्रीतीचा ॥१॥ आवडीनें गळां मिठी । घाली उठी बैसवी ॥२॥ लावूं धांवे मुख स्तना । नये मना निराळें ॥३॥ भावंडाचें भातें दावी । आपुलें लावी त्यास जी ॥४॥ माझें थोडें त्याचें फार । उत्तर हें वाढवी ॥५॥ तुका म्हणे नारायणा । तुम्ही जाणा बुझावूं ॥६॥

३३४३. वचन तें नाहीं तोडीत शरीरा । भेदतें अंतरा वज्राऐसें ॥१॥ कांही न सहावें काशाही कारणें । संदेह निधान देह बळी ॥२॥ नाहीं शब्द मुखीं लागत तिखट । नाहीं जड होत पोट तेणें ॥३॥ तुका म्हणे जरी गिळी अहंकार । तरी वसे घर नारायण ॥४॥

३३४४. मायेचा मारिला अंगीं नाहीं घाव । दुःखें तरी लव धडधडी ॥१॥ न लभे हा काळ न सुटे हातींचा । न बोलवे वाचा वेडावली ॥२॥ न पवे धांवणें न पवेचि लाग । न लगेचि माग धरावया ॥३॥ भेणें तरि अंगा लावियेल्या राखा । तरी त्यासी वाखा करितसें ॥४॥ तुका म्हणे हाका मारूं नेदी देवा । लोकांपाठी हेवा लागलासे ॥५॥

३३४५. ढालतरवारे गुंतले हे कर । म्हणे मी झुंजार कैसा झुंजों ॥१॥ पोटीं पडदाळें सिले टोप ओझें । हें तों झालें दुजें मरणमूळ ॥२॥ बैसविलें मला येणें अश्वावरी । धांवूं पळूं तरी कैसा आतां ॥३॥ असोनि उपाय म्हणे हे अपाय । म्हणे हाय हाय काय करूं ॥४॥ तुका म्हणे हा तों स्वयें परब्रह्म । मूर्ख नेणे वर्म संतचरण ॥५॥

३३४६. काय करूं न करी धंदा । चित्त गोविंदा तुझे पायीं ॥१॥ ऐशा संकल्पाचे संधी । माझे बुद्धी धीर द्यावा ॥२॥ कुटुंबाचा तुम्हां भार । मज व्यवहार निमित्त ॥३॥ तुका म्हणे करितां काम । हृदयीं नाम धरीन ॥४॥

३३४७. येऊनि नरदेहा विचारावें सार । धरावा पैं धीर भजनमार्गीं ॥१॥ चंचळ चित्तासी ठेवुनियां ठायीं । संतांचिये पायीं लीन व्हावें ॥२॥ भावाच्या पैं हातें धरावा निश्चय । तेणें भवभय देशधडी ॥३॥ नामापरतें जगीं साधन सोपें नाहीं । आवडीनें गाई सर्वकाळ ॥४॥ तुका म्हणे वंश धन्य त्या नराचा । ऐशा निश्चयाचा मेरू झाला ॥५॥

३३४८. बीज जाळुनि केली लाही । आम्हां जन्ममरण नाहीं ॥१॥ आकारासी कैंचा

ठाव । देह प्रत्यक्ष झाला देव ॥२॥ साकरेचा नोहे ऊस । आम्हा कैंचा गर्भवास ॥३॥ तुका म्हणे अवघा जोग । सर्वांघटीं पांडुरंग ॥४॥

३३४९. वैकुंठींचा देव आणिला भूतळा । धन्य तो आगळा पुंडलीक ॥१॥ धारिष्ट धैर्याचा वरिष्ठ भक्तांचा । पवित्र पुण्याचा एकनिष्ठ ॥२॥ पितृसेवापुण्यें लाधला निधान । ब्रह्म सनातन अंगसंगें ॥३॥ अंगसंगें रंग क्रीडा करी जाणा । ज्या घरीं पाहुणा वैकुंठींचा ॥४॥ धन्य त्याची शक्ति भक्तीची हे ख्याती । तुका म्हणे मुक्ति पायीं लोळे ॥५॥

३३५०. रक्त श्वेत कृष्ण पीत प्रभा भिन्न । चिन्मय अंजन सुदलें डोळां ॥१॥ तेणें अंजनगुणें दिव्यदृष्टि झाली । कल्पना निमाली द्वैताद्वैत ॥२॥ देशकाळवस्तुभेद मावळला । आत्मा निर्वाळला विश्वाकार ॥३॥ न झाला प्रपंच झाला परब्रह्म । अहंसोहं ब्रह्म आकळलें ॥४॥ तत्त्वमसि विद्या ब्रह्मानंदी सांग । तेंचि झाला अंगें तुका आतां ॥५॥

३३५१. एक ब्रह्मचारी गाढवा झोंबतां । हाणोनियां लाता पळालें तें ॥१॥ गाढवही गेलें ब्रह्मचर्य गेलें । तोंड काळें झालें जगामाजी ॥२॥ हें ना तैसें झालें हें ना तैसें झालें । तुका म्हणे गेलें वांयाचि तें ॥३॥

३३५२. पंडित वैदिक अथवा दशग्रंथी । परि सरी न पवती तुकयाची ॥१॥ शास्त्रेंही पुराणें गीता नित्य नेम । वाचिताती वर्म न कळे त्यांसी ॥२॥ कर्मअभिमानें वर्णअभिमानें । नाडले ब्राह्मण कलियुगीं ॥३॥ तैसा नव्हे तुका वाणी व्यवसाई । भाव त्याचा पायीं विठोबाचे ॥४॥ अमृताची वाणी वरुषला शुद्ध । करित्या अशुद्ध ऐसा कोण ॥५॥ चहूं वेदांचें हें केलें विवरण । अर्थही गहन करूनियां ॥६॥ उत्तम मध्यम कनिष्ठ वेगळे । करूनि निराळे ठेविले ते ॥७॥ भक्ति ज्ञान आणि वैराग्य आगळा । ऐसा नाहीं डोळां देखियला ॥८॥ जपतप यज्ञ लाजविलीं दानें । हरिनाम कीर्तनें करूनियां ॥९॥ मागें कवीश्वर झाले थोरथोर । नेलें कलेवर कोणें सांगा ॥१०॥ म्हणे रामेश्वर सकळा पुसोनी । गेला तो विमानीं बैसोनियां ॥११॥

३३५३. माझी मज आली रोकडी प्रचित । होऊनि फजित दुःख पावे ॥१॥ कांहीं द्वेष त्याचा करितां अंतरीं । व्यथा या शरीरीं बहुत झाली ॥२॥ ज्ञानेश्वरें मज केला उपकार । स्वप्नीं सविस्तर सांगितलें ॥३॥ तुका सर्वां श्रेष्ठ प्रिय आम्हां थोर । कां जो अवतार नामयाचा ॥४॥ त्याची तुज कांहीं घडली रे निंदा । म्हणोनि हे बाधा जडली तुज ॥५॥ आतां एक करीं सांगेन तें तुला । शरण जाईं त्याला निश्चयेंसी ॥६॥ दर्शनेंचि तुझ्या दोषा परिहार । होय तो विचार सांगितला ॥७॥ तोचि हा विश्वास धरोनि मानसीं । जाय कीर्तनासी नित्य काळ ॥८॥ म्हणे रामेश्वर त्याच्या समागमें । झालें हें आराम देह माझें ॥९॥

३३५४. वैष्णवांची याती वाणी जो आपण । भोगी तो पतन कुंभपाकीं ॥१॥ ऐशी वेदश्रुती

बोलती पुराणें। नाहीं तीं दूषणें हरिभक्ता ॥२॥ उंच नीच वर्ण न म्हणावा कोणीं। जे कां नारायणीं प्रिय झाले ॥३॥ चहूं वर्णासीही असे अधिकार । करितां मनस्कार दोष नाहीं ॥४॥ जैसा शालिग्राम न म्हणावा पाषाण। होय पूज्यमान सर्वत्रांसी ॥५॥ गुरु परब्रह्म देवाचाही देव। त्यासी तो मानव म्हणूं नये ॥६॥ म्हणे रामेश्वर नामीं जे रंगले। स्वयें तेचि झाले देवरूप ॥७॥

३३५५. भक्त भागवत जीवन्मुक्त संत। महिमा अत्यद्भुत चराचरीं ॥१॥ ऐसिया अनंतामाजी तूं अनंत। लीलावेश होत जगत्राता ॥२॥ ब्रह्मानंदे तुकें तुळे आला तुका। तो हा विश्वसखा क्रीडे जनीं ॥३॥ शास्त्र शिष्टाचार अविरुद्ध क्रिया। तुझी भक्तराया देखियेली ॥४॥ देउनि तिळांजुळी काम्य निषिद्धासी । विधिविनियोगेंशी ब्रह्मार्पण ॥५॥ संत-ग्रहमेळीं जगदांध्या गिळी । पैल ऊदयाचळीं भानु तुका ॥६॥ संतवृंदें तीर्थें गौतमी हरिकथा। तुकया नरसिंहस्ता भेटों आली ॥७॥ शांतिपतिव्रते झालें परिणयन। कामसंतर्पण निष्कामता ॥८॥ क्षमा क्षमेपणें प्रसिद्ध प्रथा जगीं। तें तों तुझ्या अंगीं मूर्तिमंत ॥९॥ दया दीनानाथा तुवां जीवविली। विश्वीं विस्तारली कीर्ति तुझी ॥१०॥ वेदवाक्य बाहो उभारिला ध्वज। पूजिले देव द्विज सर्व भावें ॥११॥ अधर्मक्षय व्याधी धर्मांशीं स्पर्शला। तो त्वां उपचारिला अनन्य भक्ति ॥१२॥ ब्रह्म ऐक्यभावें भक्ति विस्तारिली। वाक्यें सफल केलीं वेदविहितें ॥१३॥ देहबुद्धि जात्याभिमानें वंचलों। तो मी उपेक्षिलों न पाहिजे ॥१४॥ न घडो याचे पायीं बुद्धीचा व्यभिचार। मागें रामेश्वर रामचंद्रा ॥१५॥

३३५६. स्वर्गींचे अमर इच्छिताती देवा । मृत्युलोकीं व्हावा जन्म आम्हां ॥१॥ नारायणनामें होऊं जीवन्मुक्त। कीर्तनीं अनंत गाऊं गीतीं ॥२॥ वैकुंठींचे जन सदा इच्छिताती। कइं येथें येती हरिचे दास ॥३॥ यमधर्म वाट पाहे निरंतर । जोडोनियां कर तिष्ठतसे ॥४॥ तुका म्हणे पावावया पैल पार। नाममंत्र सार भाविकासी ॥५॥

३३५७. आमुची मिरासी पंढरी । आमुचें घर भीमातिरीं ॥१॥ पांडुरंग आमुचा पिता । रखुमाई आमुची माता ॥२॥ भाऊ पुंडलीक मुनि । चंद्रभागा आमुची बहिणी ॥३॥ तुका जुनाट मिराशी। ठाव दिला पायांपाशीं ॥४॥

३३५८. गंगा गेली सिंधुपाशीं । जरी तो ठाव नेदी तिशी ॥१॥ तिणें जावें कवण्या ठाया । मज सांगा पंढरिराया ॥२॥ जळ क्षोभलें जळचरां । माता बाळा नेदी थारा ॥३॥ तुका म्हणे आलों शरण। देवा त्वां कां धरिलें मौन ॥४॥

३३५९. संदेह गमला । कैसा रेडा बोलविला ॥१॥ सांगा देव कां न होती । निर्जिव चालविली भिंती ॥२॥ कोरडे कागद । उदकीं न लागती बुंद ॥३॥ निळा म्हणे खरा । देवा संतापायीं थारा ॥४॥

३६६०. नाम वाचे श्रवणीं कीर्ती । पाउलें चित्तीं समान ॥१॥ काळ सार्थक केला

त्यांनीं । धरिला मनीं विठ्ठल ॥२॥ कीर्तनाचा समारंभ । निर्दंभ सर्वदा ॥३॥ निळा म्हणे स्वरूपसिद्धी । नित्य समाधी हरिनामें ॥४॥

३३६१. कामधेनूचें वासरूं । खाया न मिळे काय करूं ॥१॥ ऐसें आम्हा मांडियेलें । विठो त्वां का सांडियेलें ॥२॥ बैसुनी कल्पद्रुमातळीं । पोटासाठीं तळमळी ॥३॥ तुका म्हणे नारायणा । भलें लोकीं हें दिसेना ॥४॥

३३६२. वेठी ऐसा भाव । न करी आहाच उपाव ॥१॥ रूप डसवीन जीवा । अवघा येच ठायीं हेवा ॥२॥ कृपणाचे परी । लेखा पळनिमेषवरी ॥३॥ तुका म्हणे असा । सन्निधचि जगदीशा ॥४॥

३३६३. सर्वसुखा अधिकारी । मुखें उच्चारी हरिनाम ॥१॥ सर्वांगीं तो सर्वोत्तम । मुखीं नाम हरीचें ॥२॥ ऐशी उभविली बाहे । वेदीं पाहें पुराणीं ॥३॥ तुका म्हणे येथें कांहीं । संदेह नाहीं भरंवसा ॥४॥

३३६४. कोडियाचें गोरेपण । तैसें अहंकारी ज्ञान ॥१॥ त्यासी आतां रिझे कोण । जवळी जातां चिळसवाणें ॥२॥ प्रेत देह गौरविलें । तैसें विटंबवाणें झालें ॥३॥ तुका म्हणे खाणें विष्ठा । तैशा देहबुद्धिचेष्टा ॥४॥

३३६५. व्यापक हा विश्वंभर । चराचर ज्याचेनी ॥१॥ पंढरिराय विटेवरी । त्याचीं धरीं पाउलें ॥२॥ अवघियांचा हाचि ठाव । देवीं देव सकळ ॥३॥ तुका म्हणे न करीं सोस । भेदे दोष उफराटे ॥४॥

३३६६. भुंकुनियां सुनें लागे हत्तीपाठीं । होऊनि हिंपुटी दुःख पावे ॥१॥ काय त्या मशकें तयासी करावें । आपुल्या स्वभावें पीडतसे ॥२॥ मातलें माकड विटवी पंचानना । घेतलें मरणा धरणे तेणें ॥३॥ तुका म्हणे संतां पीडितील खळ । घेती तोंड काळें करूनियां ॥४॥

३३६७. गर्जत जावी नामावळी । प्रेमें टाळी वाहोनि ॥१॥ येणें सुखें पुढती धांवे । भेटी सवें गोपाळ ॥२॥ लोटांगण घाला तळीं । वंदा धुळी संतांची ॥३॥ तुका म्हणे विठ्ठल लाहो । ऐसा बाहो उभारा ॥४॥

३३६८. पदोपदीं पायां पडणें । करुणा जाण भाकावी ॥१॥ ये गा ये गा विसांविया । करुणादयासागरा ।२॥ जोडोनियां करकमळ । नेत्रीं जळ भरोनि ॥३॥ तुका उभा दान पात्र । पुरवीं आर्त विठोबा ॥४॥

३३६९. मृगाचिया अंगीं कस्तुरीचा वास । असे ज्याचा त्यास नसे ठावा ॥१॥ भाग्यवंत घेती वेचूनियां मोल । भारवाही मेले वाहतां ओझें ॥२॥ चंद्रामृतें तृप्ति पारणें चकोरा । भ्रमरासी चारा सुगंधाचा ॥३॥ अधिकारी येथें घेती हातवटी । परीक्षवंतां दृष्टी रत्न जैसें ॥४॥ तुका म्हणे काय अंधळिया हातीं । दिलें जैसें मोतीं वांयां जाय ॥५॥

३३७०. करा करा लागपाठ। धरा पंढरीची वाट। जंव नाहीं चपेट। घात पडिला काळाचा ॥१॥ दुजा ऐसा नाहीं कोणी। जो या काढी भयांतूनि। करा म्हणऊनि। हा विचार ठायींचा ॥२॥ होती गात्रें बेंबळीं। दिवस अस्तमान काळीं। हातें वाहे टाळी। जंव मोकळीं आहेती ॥३॥ कां रे घेतलासी सोस। तुज वाटताहे कैसें। तुका म्हणे ऐसें। पुढें कैं लाहासी ॥४॥

३३७१. सुखाची वस्ती झाली माझे जीवीं। तुमच्या गोसावी कृपादानें ॥१॥ रूप वेळोवेळां आठवीं अंतरीं। बैसोनि जिव्हारीं राहिलें तें ॥२॥ विसावलें मन विटलें प्रपंचा। गोडावली वाचा येणें रसें ॥२॥ तुका म्हणे कांहीं नाठवेसें झालें। दुसरें विठ्ठलें मज आतां ॥४॥

३३७२. येथें आड कांहीं न साहे आणीक। प्रमाण तें एक हेंचि झालें ॥१॥ गाऊं नाचूं टाळी वाहूं गीत छंदें। डोलवूं विनोदें अंग तेणें ॥२॥ मथुनियां सार काढिलें बाहेरी। उपाधि त्या येरी निवडिल्या ॥३॥ तुका म्हणे जना लाविली शिराणी। सेवितां हे धणी होत नाहीं ॥४॥

३३७३. तुझें मजपाशीं मन। माझी तूज भूक तहान ॥१॥ जिव्हा रते एके ठायीं। दुजें बोलायाचें काई ॥२॥ माझिया कवतुकें। उभा पाहासी भातुकें ॥३॥ तुका म्हणे साचें। तेथें मागील कईचें ॥४॥

३३७४. हेचि व्हावी माझी आस। जन्मोजन्मीं तुझा दास ॥१॥ पंढरीचा वारकरी। वारी चुकों नेदी हरी ॥२॥ संतसंग सर्वकाळ। अखंड प्रेमाचा सुकाळ ॥३॥ चंद्रभागे स्नान। तुका मागे हेंचि दान ॥४॥

३३७५. आतां हे शेवटीं असो पायांवरी। वदती वैखरी वागपुष्पें ॥१॥ नुपेक्षावें आम्हां दीनां पांडुरंगा। कृपादानी जगामाजी तुम्हीं ॥२॥ बोळवुनी देह सांडियेली शुद्ध। तोडियेले भेद जीवशिव ॥३॥ तुका म्हणे मन तुमचे चरणीं। एवढी आयणी पुरवावी ॥४॥

३३७६. तुजवांचुनी मागणें काय कोणा। महीमंडळीं व्यापक विश्व जाणा। जीवभावना पूरवूं कोण जाणे तूजवांचुनी होत कां रावराणे ॥१॥ नसे मोक्षदाता तिहींमाजि लोकां। भवतारकु तुजवांचूनि एका। मनीं मानसीं चिंतितां रूपनाम। पळे पाप ताप भयें नासे काम ॥२॥ हरी नाम हें साच तूझें पुराणीं। हरी हातिचें काळगर्भादियोनी। करूं मुखवाणी कसी देशधाडी। तुजवांचुनी वर्णितां व्यर्थ गोडी ॥३॥ भवभंजना व्यापका लोक तिन्ही। तुज वर्णितां शीणला शेषफणी। असो जीव भाव तुझ्या सर्व पायीं। दुजें मागणें आणिक व्यर्थ काई ॥४॥ दीनानाथ हे साक्ष तूझी जनासी। दिनें तारिलीं पातकी थोर दोषी। तुका राहिला पायिं तो राख देवा। असें मागतों तूमची पादसेवा ॥५॥

३३७७. उभा भींवरेच्या तिरीं राहिलाहे। असे सन्मुख दक्षिणे मूख वाहे। पळे पाप महा सुटे कांप थोर। कसे गर्जती घोष हे नामवीर ॥१॥ गुणगंभीर धीर हा हास्यमूख। वदे

वदनीं अमृत सर्वसूख । मुनि लागिं लागे बहू गोड चित्तीं । देहभावना तुटलियाचि खंती ॥२॥ ठसा घातला ये भूमिमाजी थोर । इच्छादान तें द्यावयासी उदार । सिद्धि वोळगती जया सर्वठायीं । तुझें नाम हें चांगलें गे विठाई ॥३॥ असे उघडा हा विटेवरि उभा । धरुनि कटसूत्र हें भक्तिलोभा । पुढें वाट दावी भवसागराची । विठो माउली सिद्ध हे साधकाची ॥४॥ करा वेगु हा तो धरा पंथ आधीं । जया पार नाहीं सुखा तें च साधीं । म्हणे तुका पंढरीये सर्व आलें । असे विश्व हें जीवनें त्याच ज्यालें ॥५॥

३३७८. धना गुंतलें चित्त माझें मुरारी । मन घेउनि हिंडवी दारोदारीं । मन हिंडतां न पुरे यासि कांहीं । मही ठेंगणी परि तें तृप्ती नाहीं ॥१॥ पाहतां न दिसे निज शुद्ध मती । पुढें पडिलों इंद्रियां थोर घातीं । जिवा नास त्या संगतीं दंड बेडी । हरी शीघ्र या दुष्टसंगासि तोडी ॥२॥ असीं आणिकें काय सांगों अनंता । मोहो पापिणी दुष्टमायाममता । काम क्रोधही यातना थोर करी । तुजवांचुनी सोडवी कोण हरी ॥३॥ निज देखतां निज हे दूरि जाये । निज आळस दंभ या भीत आहे । तयां वस्ति देहीं नको देऊं देवा । तुजवांचुनी आणिक नास्ति हेवा ॥४॥ करीं घातपात भय लाज थोरी । असे सत्य भाव बहू भक्ति दूरी । नको मोकलूं दीनबंधु अनाथा । तुका विनवी ठेउनी पायीं माथा ॥५॥

३३७९. पैल सांवळे तेज पुंजाळ कैसें । सिरीं तुर्बिलीं साजिरीं मोरपीसें । हरे त्यासि देखतां ताप माया । भजा रे भजा यादवा योगिराया ॥१॥ जया कामिनी लुब्धल्या सहस्रसोळा । सुकुमार त्या गोपिका दिव्य बाळा । शोभे मध्यभागीं कळा चंद्रकोटी । रुपा मीनली साजिरी माळ कंठीं ॥२॥ तया यादवां श्रेष्ठ हा चक्रपाणी । जया वंदिती कोटी तेहतीस तीन्ही । महाकाळ हे कांपति दैत्य ज्यासी । पाहा सांवळें रूप हेणं पापनासीं ॥३॥ कसीं पाउलें साजिरीं कुंकमाचीं । कसी वीट हे लागली दैवाची । जया चिंतितां अग्नि हा शांति नीवे । धरावा मानसीं आपल्या दृढभावें ॥४॥ मुनी देखतां मूख हें चित्त माये । देह मांडला भाव हा बाप माय । तुक्या लागलें मानसीं देवपीसें । चित्त चोरटें सांवळें रूप कैसें ॥५॥

३३८०. असे नांदतु हा हरी सर्वजीवीं । असे व्यापुनी अग्नि काष्ठांत तेवीं । घटीं बिंबलें बिंब हें ठायिंठायीं । तया संगती नासु हा त्यासि नाहीं ॥१॥ तृण वाटितां क्षीर हें होत नाहीं । पशू भक्षितां पालटे तेंचि देहीं । तया वर्म तों जाणता एक आहे । असे व्यापक व्यापुनी अंतर्बाहे ॥२॥ फळ कर्दळीं सेवटीं येत आहे । असे शोधितां पोकळीमाजि काये । धीर नाहीं तें वाउगें धीग झालें । फळ पुष्प ना यत्न ते व्यर्थ गेले ॥३॥ असे नाम हें दर्पणें सिद्ध केलें । असे बिंब तें या मळासह ठेलें । कसें शुद्ध नाही दिसे माजि रूप । नका वाढवूं सीण हा पुण्यपाप ॥४॥ करा वर्म ठावें नका सोंग वांयां । तुका वीनवितो पडों काय पायां । त्यजी पुत्र

दारा धन वासना हे । मग ऊरलें शेवटीं काय पाहें ॥५॥

३३८१. मना सांडिं हे वासना दुष्ट खोडी । मती मानसीं एक हे व्यर्थ गोडी । असे हीत माझें तुज कांही एक । धरीं विठ्ठलीं प्रेम हें पायिं सूख ॥१॥ असा सर्वभावें तुज शरण आलों । देहदु:ख हें भोगितां फार भ्यालों । भवतारितें दूसरें नाहीं कोणी । गुरु होत कां देव आणीक तिन्ही ॥२॥ जना वासना हे धना थोरि आहे । तुज लागली संगती तेचि सोये । करी सर्व संगीं परित्यागु ठायीं । तुका वीनवी ठेवूनि शीर पायीं ॥३॥

[ धरणेकराचे अभंग ]

३३८२. श्रीपंढरीशा पतिपावना । एक विज्ञापना पायांपाशीं ॥१॥ अनाथां जीवांचा तूं काजकैवारी । ऐसी चराचरीं ब्रीदावळी ॥२॥ न सांगतां कळे अंतरींचें गुज । आतां तुझी लाज तुज देवा ॥३॥ आळिकर त्याचें करिसी समाधान । अभयाचें दान देऊनियां ॥४॥ तुका म्हणे तूंचि खेळें दोहीं ठायीं । नसेल तो देईं धीर मना ॥५॥

३३८३. अगा ये उदारा अगा विश्वंभरा । रखुमाईच्या वरा पांडुरंगा ॥१॥ अगा सर्वोत्तमा अगा कृष्णा रामा । अगा मेघश्यामा विश्वजनित्या ॥२॥ अगा कृपावंता जीवन तूं दाता । अगा सर्वसत्ता धरतिया ॥३॥ अगा सर्वजाणा अगा नारायणा । करुणावचना चित्त द्यावें ॥४॥ तुका म्हणे नाहीं अधिकार तैसी । सरती पायांपाशीं केली मागें ॥५॥

३३८४. नोहे दास खरा । परि हा झालासे डांगोरा ॥१॥ यासी काय करूं आतां । तूं हें सकळ जाणता ॥२॥ नाहीं पुण्य गांठीं । जें हें वेचूं कोणासाठीं ॥३॥ तुका म्हणे कां उपाधि । वाढविली कृपानिधि ॥४॥

३३८५. तुजविण सत्ता । नाहीं वाचा वदविता ॥१॥ ऐसे आम्ही जाणों दास । म्हणोनि जालों उदास ॥२॥ तुम्ही दिला धीर । तेणें मन झालें स्थिर ॥३॥ तुका म्हणे आड । केलें मीं हें तुझें कोड ॥४॥

३३८६. काय मी जाणता । तुम्हाहूनी जी अनंता ॥१॥ जो हा करूं अतिशय । कांहो तुम्हां दया नये ॥२॥ काय तुज नाहीं कृपा । विश्वाचिया मायबापा ॥३॥ तुका म्हणे वाणी । माझी वदे तुम्हाहूनी ॥४॥

३३८७. काय ज्ञानेश्वरीं उणें । तिहीं पाठविलें धरणें ॥१॥ ऐकोनियां लिखित । म्हुण जाणविली हे मात ॥२॥ जरी जाणे धणी । वदे सेवकाची वाणी ॥३॥ तुका म्हणे ठेवा । होतां सांभाळावा देवा ॥४॥

३३८८. ठेवोनियां डोई । पायीं झालों उतराई ॥१॥ कारण तें तुम्हीं जाणां । मी तराळ नारायणा ॥२॥ प्रसंगीं वचन । दिलें तेंचि खावें अन्न ॥३॥ तुका म्हणे भार ।

तुम्ही जाणा थोडा फार ॥४॥

३३८९. नको कांहीं पडो ग्रंथाचिये भरी । शीघ्रवत करीं हेंचि एक ॥१॥ देवाचिये चाडे आळवावें देवा । ओस देहभावा पाडोनिया ॥२॥ साधनें घालिती काळाचिये मुखीं । गर्भवास सेखीं नचुकती ॥३॥ उधाराचा मोक्ष होय नोहे ऐसा । पतनाची इच्छा आवश्यक ॥४॥ रोकडी पातली अंगसंगें जरा । आतां उजगरा कोठवरी ॥५॥ तुका म्हणे घाली नामासाठीं उडी । पांडुरंग थडी पाववील ॥६॥

३३९०. नाहीं देवापाशीं मोक्षाचें गांठोळें । आणूनी निराळें द्यावें हातीं ॥१॥ इंद्रियांचा जय साधूनियां मन । निर्विषय कारण असे तेथें ॥२॥ उपवास पारणीं अक्षरांची आटी । सत्कर्मा शेवटीं असे फळ ॥३॥ आदरें संकल्प वारीं अतिशय । सहज तें काय दुःख जाणे ॥४॥ स्वप्नींचिया घायें विवळसी वायां । रडे रडतिया सवें मिथ्या ॥५॥ तुका म्हणे फळ आहे मूळापाशीं । शरण देवासी जाय वेगीं ॥६॥

३३९१. त्यजिलें भेटवीं आणुनी वासना । दाविल्याचें जना काय काज ॥१॥ आळवावें देवा भाकूनी करुणा । आपुलिया मना साक्ष करीं ॥२॥ नाहीं यावें जावें दुरूनी लागत । आहे साक्षभूत अंतरींचा ॥३॥ तुका म्हणे हा तो आहे कृपासिंधु । तोडी भवबंधु तात्काळिक ॥४॥

३३९२. गोविंद गोविंद । मना लागलिया छंद ॥१॥ मग गोविंद ते काया । भेद नाहीं देवा तया ॥२॥ आनंदलें मन । प्रेमें पाझरती लोचन ॥३॥ तुका म्हणे आळी । जीवें नुरेचि वेगळी ॥४॥

३३९३. ज्याचें जया ध्यान । तेंचि होय त्याचें मन ॥१॥ म्हणऊनी अवघें सारा । पांडुरंग दृढ धरा ॥२॥ सम खुण ज्याचे पाय । उभा व्यापक विटे ठाय ॥३॥ तुका म्हणे नभा । परता अणूचाही गाभा ॥४॥

३३९४. पाहूनियां ग्रंथ करावें कीर्तन । तेव्हां आलें जाण फळ त्याचें ॥१॥ नाहीं तरी वांयां केली तोंडपिटी । उरी ते शेवटीं उरलीसे ॥२॥ पढोनियां वेद हरिगुण गावे । ठावें तें जाणावें तेव्हां जालें ॥३॥ तपतीर्थाटणें तेव्हां कार्यसिद्धि । स्थिर राहे बुद्धि हरिच्या नामीं ॥४॥ यज्ञयागादिक काय दान धर्म । तरी फल नाम कंठीं राहे ॥५॥ तुका म्हणे नको काबाडाचे भरी । पडों सार धरी हेंचि एक ॥६॥

३३९५. सुखें खावें अन्न । त्याचें करावें चिंतन ॥१॥ त्याचें दिलें त्यासी । पावे फळ आपणासी ॥२॥ आहे हा आधार । नाम त्याचें विश्वंभर ॥३॥ नाहीं रिता ठाव । तुका म्हणे पसरीं भाव ॥४॥

३३९६. संकोचोनी काय झालासी लहान । घेई आपोशन ब्रह्मांडाचें ॥१॥ करोनी पारणें आंचवूं संसारा । उशीर उशीरा लावूं नको ॥२॥ घरकुलीनें होता पाडिला अंधार । तेणें केलें फार कासावीस ॥३॥ झुगारूनी दुरी लपविलें काखे । तुका म्हणे वाखे कौतुकाचे ॥४॥

३३९७. माझ्या बापें मज दिधलें भातुकें । म्हणोनी कवतुकें क्रीडा करीं ॥१॥ केली आळी पुढें बोलिलों वचन । उत्तम हे गुण आले त्याचे ॥२॥ घेऊनी विभाग जावें लवलाह्या । आलेती त्या ठाया आपुलिया ॥३॥ तुका म्हणे ज्ञानदेवीं समुदाय । करावा मी पाय येईन वंदूं ॥४॥

३३९८. ज्ञानियांचा गुरु राजा महाराव । म्हणती ज्ञानदेव तुम्हां ऐसें ॥१॥ मज पामरा हें काय थोरपण । पायींची वाहाण पायीं बरी ॥२॥ ब्रह्मादिक जेथें तुम्हां वोळगणें । इतर तुळणे काय पुढें ॥३॥ तुका म्हणे नेणें युक्तीची ते खोली । म्हणोनी ठेवीली पायीं डोई ॥४॥

३३९९. बोलिलीं लेंकुरें । वेडीं वांकुडीं उत्तरें ॥१॥ करा क्षमा अपराध । महाराज तुम्ही सिद्ध ॥२॥ नाहीं विचारिला । अधिकार म्यां आपुला ॥३॥ तुका म्हणे ज्ञानेश्वरा । राखा पायांपें किंकरा ॥४॥

३४००. काय तुम्ही जाणा । करूं अव्हेर नारायणा ॥१॥ तरी या लटिक्याची ग्वाही । निवडिली दुसरे ठायीं ॥२॥ कळों अंतरींचा गुण । नये फुटल्यावांचून ॥३॥ आणिलें अनुभवा । जनाच्या हें ज्ञानदेवा ॥४॥ आणिक कोणी भिती । त्यांच्या चिंतनें विश्रांति ॥५॥ तुका म्हणे बीज पोटीं । फळ तैसेंचि शेवटीं ॥६॥

३४०१. अविश्वासीयाचें शरीर सुतकी । विटाळ पातकी भेद वाहे ॥१॥ काय त्याचा वेल जाईल मांडवा । होता तैसा ठेवा आला पुढें ॥२॥ मातेचा संकल्प व्हावा राजबिंडा । कपाळींचा धोंडा उभा ठाके ॥३॥ तुका म्हणे जैसा कुचराचा दाणा । परिपाकीं जाणा खोटा तैसा ॥४॥

३४०२. तामसाचीं तपें पापाची सिदोरी । तमोगुणें भरी घातलेसे ॥१॥ राज्यपदा आड सुखाची संपत्ति । उल्लंघूनि जाती निरयगांवा ॥२॥ इंद्रियें दमिलीं इच्छा जीती जीवीं । नागविती ठावीं नाहीं पुढें ॥३॥ तुका म्हणे हरिभजनावांचून । करिती तो सीण पाहों नये ॥४॥

३४०३. हरिकथेवीण इच्छिती स्वहित । हरिजन चित्त न घला तेथें ॥१॥ जाईल भंगोन आपुला विश्वास । अवघीया नास कारणांचा ॥२॥ ज्याचिया बैसावें भोजना पंगती । त्याचिया संगती तैसें खावें ॥३॥ तुका म्हणे काय झालेती जाणते । देवाही परते थोर तुम्ही ॥४॥

३४०४. सेवकें करावें स्वामीचें वचन । त्यासी हूंतूपण कामा नये ॥१॥ घेईल जीव कां सारील परतें । भंगलिया चित्तें सांदीजेना ॥२॥ खद्योतें दावावी रवी केवीं वाट । आपुलें तें नीट उसंतावें ॥३॥ तुका म्हणे तो आहे ज्ञानाचा सागर । नेदीसी अगर भिजों भेदें ॥४॥

३४०५. जयाचिये द्वारीं सोन्याचा पिंपळ । अंगीं ऐसें बळ रेडा बोले ॥१॥ करील तें काय

नव्हे महाराज। परि पाहे बीज शुद्ध अंगीं ॥२॥ जयानें घातली मुक्तीची गवांदी। मेळविली मांदी वैष्णवांची ॥३॥ तुका म्हणे तेथें सुखा काय उणें। राहे समाधानें चित्ताचिया ॥४॥

३४०६. बहुतां छंदांचें बहु असे जन। नये वाटूं मन त्यांच्या संगें ॥१॥ करावा जतन आपुला विश्वास। अंगा आला रस आवडीचा ॥२॥ सुखाची समाधि हरिकथा माउली। विश्रांति साउली सिणलियांची ॥३॥ तुका म्हणे बुडे बांधोनी दगड। तेथें काय कोड धांवायाचें ॥४॥

३४०७. हरिकथे नाहीं। विश्वास ज्याचे ठायीं ॥१॥ त्याची वाणी अमंगळ। कान उंदराचें बीळ ॥२॥ सांडूनी हा रस। करि आणीक सायास ॥३॥ तुका म्हणे पिसीं। वांयां गेलीं किती ऐसीं ॥४॥

३४०८. अमृताची धार। वाहे देवाचे समोर ॥१॥ उर्ध्ववाहिनी हरिकथा। मुकुटमणि सकळां तीर्थां ॥२॥ शिवाचें जीवन। जाळी महादोष कीर्तन ॥३॥ तुका म्हणे हरि। इची स्तुति वाणी थोरी ॥४॥

३४०९. आतां माझ्या मना। ईची घडो उपासना ॥१॥ ऐसें करीं गा पांडुरंगा। प्रेम वोसंडेसें अंगा ॥२॥ सर्व काळ नये। वाचे वीट आड भये ॥३॥ तुका वैष्णवांसंगती। हेंचि भोजनपंगती ॥४॥

४३१०. उपास कराडी। तिहीं करावी बापुडीं ॥१॥ आम्ही विठोबाचे दास। चिंता झुगारिली आस ॥२॥ भक्तीच्या उत्कर्षें। नाहीं मुक्तीचें तें पिसें ॥३॥ तुका म्हणे बळ। अंगीं आमुच्या सकळ ॥४॥

३४११. करविली तैसी केली कटकट। वांकडें कीं नीट देव जाणे ॥१॥ कोणाकारणें हें झालेंसे निर्माण। देवाचें कारण देव जाणे ॥२॥ तुका म्हणे मी तो अभिमाना वेगळा। घालुनि गोपाळा भार असें ॥३॥

३४१२. तुम्हीं येथें पाठविला धरणेकरी। त्याची झाली परी आइका ते ॥१॥ आतां काय पुढें वाढवूं विस्तार। झाला समाचार आइका तो ॥२॥ देवाचें उचित एकादश अभंग। महाफळ त्याग करूनी गेला ॥३॥ तुका म्हणे सेवा समर्पूनी पायीं। झालों उतराई ठावें असो ॥४॥

[ शिवाजी राजे यांनी तुकोबास आपले येथें आणण्याकरितां अबदागिरी, घोडा, कारकून पाठविला त्या वेळचे अभंग. ]

३४१३. दिवट्या छत्री घोडे। हें तों बऱ्यांत न पडे ॥१॥ आतां येथें पंढरिराया। मज गोविसी कायसा ॥२॥ मान दंभ चेष्टा। हे तो शूकराची विष्ठा ॥३॥ तुका म्हणे देवा। माझे सोडवणे धांवा ॥४॥

३४१४. नावडे जें चित्ता। तेंचि होसी पुरविता ॥१॥ कां रे पुरविली पाठी। माझी केली

**जीवें साठी ॥२॥ न करावा संग । वाटे दुरवावें जग ॥३॥ सेवावा एकांत । वाटे न बोलावी मात ॥४॥ जन तन धन । वाटे लेखावें वमन ॥५॥ तुका म्हणे सत्ता । हातीं तुझ्या पंढरिनाथा ॥६॥**

**३४१५. जाणोनी अंतर । टाळिसील करकर ॥१॥ तुज लागली हे खोडी । पांडुरंगा बहू कुडी ॥२॥ उठविसी दारीं । धरणें एखादिये परी ॥३॥ तुका म्हणे पाय । कैसे सोडीन तें पाहें ॥४॥**

**३४१६. नाहीं विचारीत । मेघ हगणदारी सेत ॥१॥ नये पाहों त्याचा अंत । ठेवी कारणापें चित्त ॥२॥ वर्जीत गंगा । नाहीं उत्तम अधम जगा ॥३॥ तुका म्हणे मळ । नाहीं अग्निसी विटाळ ॥४॥**

**३४१७. मुंगी आणि राव । आम्हां सारिखाचि जीव ॥१॥ गेला मोह आणि आशा । कळिकाळाचा हा फांसा ॥२॥ सोनें आणि माती । आम्हां समान हें चित्तीं ॥३॥ तुका म्हणे आलें । घरा वैकुंठ सांवळें ॥४॥**

**३४१८. सोन्याचे पर्वत करविती पाषाण । अवघे रानोरान कल्पतरू ॥१॥ परिया दुर्लभ विठोबाचे पाय । तेथें हे उपाय न सरती ॥२॥ अमृतें सागर भरवती गंगा । म्हणवेल उगा राहे काळा ॥३॥ भूतभविष्य कळों येईल वर्तमान । करवती प्रसन्न ऋद्धि सिद्धी ॥४॥ ठानमान कळों येती योगमुद्रा । नेववेल वारा ब्रह्मांडासी ॥५॥ तुका म्हणे मोक्ष राहे ऐलीकडे । इतर बापुडें काय तेथें ॥६॥**

**३४१९. तिहीं त्रिभुवनीं । आम्ही वैभवाचे धनी ॥१॥ हातां आला घाव डाव । आमुचा मायबाप देव ॥२॥ काय त्रिभुवनीं बळ । अंगी आमुच्या सकळ ॥३॥ तुका म्हणे सत्ता । अवघी आमुचीच आतां ॥४॥**

**३४२०. काय दिला ठेवा । आम्हां विठ्ठलचि व्हावा ॥१॥ तुम्ही कळलेती उदार । साटीं परिसाची गार ॥२॥ जीव देतां तरी । वचना नये येका सरी ॥३॥ गोमांसासमान । तुका म्हणे आम्हां धन ॥४॥**

**३४२१. आम्हीं तेणें सुखी । म्हणा विठ्ठल विठ्ठल मुखीं ॥१॥ तुमचें येर वित्त धन । तें मज मृत्तिकेसमान ॥२॥ कंठीं मिरवा तुळसी । व्रत करा एकादशी ॥३॥ म्हणवा हरिचे दास । तुका म्हणे मज हे आस ॥४॥**

[ व्यभिचाराचे अभंग ]

**३४२२. वाळो जन मज म्हणोत शिंदळी । परि हा वनमाळी न विसंबें ॥१॥ सांडूनी लौकिक झालियें उदास । नाहीं भय आस जीवित्वाची ॥२॥ नाइकें वचन बोलतां या लोकां । म्हणे झालें तुका हरिरत ॥३॥**

**३४२३. आधिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा । म्हणोनि व्यभिचारा टेकलियें ॥१॥ रात्रंदिवस**

मज पाहिजे जवळी । क्षण त्यानिराळी न गमे घडी ॥२॥ नाम गोष्टी माझी सोय सांडा आतां । रतलें अनंता तुका म्हणे ॥३॥

३४२४. हाचि नेम आतां न फिरें माघारी । बैसलें शेजारीं गोविंदाचे ॥१॥ घररिघी झालें पट्टराणी बळें । वरिलें सांवळें परब्रह्म ॥२॥ बळियाचा अंगसंग झाला आतां । नाहीं भय चिंता तुका म्हणे ॥३॥

३४२५. नाहीं काम माझें काज तुम्हांसवें । होतें गुप्त ठावें केलें आतां ॥१॥ व्यभिचार माझा पडिला ठाऊका । न सरती लोकांमाजी झालें ॥२॥ न धरावा लोभ कांहीं माझेविशीं । जाले देवपिशी तुका म्हणे ॥३॥

२४२६. विसरलें कुळ आपुला आचार । पति भावे दीर घर सोय ॥१॥ सांडिला लौकिक लाज भय चिंता । रतलें अनंता चित्त माझें ॥२॥ मज जातां कोणी आळवाल झणी । तुका म्हणे कानीं बहिर झालें ॥३॥

३४२७. न देखें न बोलें नाइकें आणीक । बैसला हा एक हरिचित्तीं ॥१॥ सासुरें माहेर मज नाहीं कोणीं । एक केलें दोन्ही मिळोनियां ॥२॥ आळ आला होता आम्ही भांडखोरी । तुका म्हणे खरी केली मात ॥३॥

३४२८. दुजा ऐसा कोण बळी आहे आतां । हरि या अनंतापासूनियां ॥१॥ बळियाच्या आम्ही झालों बळिवंता । करूं सर्व सत्ता सर्वांवरी ॥२॥ तुका म्हणे आम्ही जिवाच्या उदारा । झालों प्रीतिकरा गोविंदासी ॥३॥

३४२९. क्षणभरी आम्ही सोसिलें वाईट । साधिलें अवीट निजसुख ॥१॥ सांडीमांडी मागें केल्या भरोवरी । अधिकचि परी दुःखाचिया ॥२॥ तुका म्हणे येणें जाणें नाहीं आतां । राहिलों अनंताचिये पायीं ॥३॥

३४३०. आम्हां आम्ही आतां वडील धाकुटीं । नाहीं पाठीं पोटीं कोणी दुजें ॥१॥ फावला एकांत एकविध भाव । हरि आम्हांसवें सर्व भोगी ॥२॥ तुका म्हणे अंगसंग एके ठायीं । असों जेथें नाहीं दुजें कोणी ॥३॥

३४३१. सर्व सुख आम्ही भोगूं सर्व काळ । तोडियेलें जाळ मोहपाश ॥१॥ याचसाठीं सांडियेले भरतार । रतलों या परपुरुषाशीं ॥२॥ तुका म्हणे आतां गर्भ नये धरूं । औषध जें करूं फळ नव्हे ॥३॥

३४३२. एका जीवें आतां जिणें जालें दोहीं । वेगळीक कांहीं नव्हे आतां ॥१॥ नारायणा आम्हां नाहीं वेगळीक । पूर्वील हे भाक सांभाळिली ॥२॥ तुका म्हणे झालें सायासाचें फळ । सरली ते वेळ काळ दोन्ही ॥३॥

३४३३. हासों रुसों आतां वाढवूं आवडी । अंतरींची गोडी अवीट ते ॥१॥ सेवा सुखें करूं विनोदवचन । आम्ही नारायण एकाएकीं ॥२॥ तुका म्हणे आम्ही झालों उदासीन । आपुल्या आधीन केला पति ॥३॥

३४३४. मजसवें आतां येऊं नका कोणी । सासुरवासिनी बाइयांनो ॥१॥ न साहावे तुम्हां या जनाची कूट । बोलती वाईट ओखटें तें ॥२॥ तुका म्हण झालों उदास मोकळ्या । विचरों गोवळ्यासवें आम्ही ॥३॥

३४३५. शिकविलें तुम्ही तें राहे तोंवरी । मज आणि हरी वियोग तो ॥१॥ प्रसंगीं या नाहीं देहाची भावना । तेथें या वचना कोण मानी ॥२॥ तुका म्हणे चित्तीं बैसला अनंत । दिसों नेदी नित्य अनित्य तें ॥३॥

३४३६. सांगतों तें तुम्ही आइकावें कानीं । आमुचे नाचणीं नाचूं नका ॥१॥ जोंवरी या तुम्हां मागिलांची आस । तोंवरी उदास होऊं नका ॥२॥ तुका म्हणे काय वांयांविण धिंद । पति ना गोविंद दोन्ही नाहीं ॥३॥

३४३७. आजीवरी तुम्हां आम्हां नेणपणें । कौतुकें खेळणें संग होता ॥१॥ आतां अनावर झालों अगुणाची । करूं नये तेंचि करूं सुखें ॥२॥ तुका म्हणे आतां बुडविलीं दोन्ही । कुळें एक मनीं नारायण ॥३॥

३४३८. सासुरियां वीट आला भरतारा । इकडे माहेरा स्वभावेंचि ॥१॥ सांडवर कोणी न धरिती हातीं । प्रारब्धाची गति भोगूं आतां ॥२॥ न व्हावी ते झाली आमुची भंडाई । तुका म्हणे काई लाजों आतां ॥३॥

३४३९. मरणाही आधीं राहिलों मरोनी । मग केले मनीं होतें तैसें ॥१॥ आता तुम्ही पाहा आमुचें नवल । नका वेचूं बोल वांयांविण ॥२॥ तुका म्हणे तुम्ही भयभीत नारी । कैसी संग सरी तुम्हां आम्हां ॥३॥

३४४०. परपुरुषाचें सुख भोगे तरी । उतरोनी करीं घ्यावें सीस ॥१॥ संवसारा आगी आपुलेनि हातें । लावूनी मागुतें पाहूं नये ॥२॥ तुका म्हणे व्हावें तयापरी धीट । पतंग हा नीट दीपा सोई ॥३॥

३४४१. आइकाल परी ऐसें नव्हे बाई । न संडावी सोई भ्रताराची ॥१॥ नव्हे आराणुक लौकिकापासून । आपुल्या आपण गोविलें तें ॥२॥ तुका म्हणे मन कराल कठीण । त्या या निवडोन मजपाशीं ॥३॥

३४४२. आहाच वाहाच आंत वरी दोन्ही । न लगा गडणी आम्हां तैश्या ॥१॥ भेऊं नये तेथें भेडसावूं कोणा । आवरूनी मना बंद द्यावा ॥२॥ तुका म्हणे कांहीं अभ्यासावांचूनी ।

नव्हे हे करणी भलतीची ॥३॥

३४४३. बहुतांच्या आम्ही न मिळों मतासी । कोणी कैसी कैसी भावनेच्या ॥१॥ विचार करितां वांयां जाय काळ । लटिकें तें मूळ फजितीचें ॥२॥ तुका म्हणे तुम्ही करा घटापटा । नका जाऊं वाटा आमुचिया ॥३॥

३४४४. त्याचें सुख नाहीं आलें अनुभवा। कठीण हें जिवा तोंचिवरी॥१॥ मागिलांचें दुःख लागों नेदी अंगा। अंतर हें सांगा नेदी पुढें॥२॥ तुका म्हणे सर्वविशीं हा संपन्न। जाणाती महिमान श्रुति ऐसें ॥३॥

३४४५. न राहे रसना बोलतां आवडी । पायीं दिली बुडी माझ्या मनें ॥१॥ मानेल त्या तुम्ही आइका स्वभावें । मी तों माझ्या भावें अनुसरलें ॥२॥ तुका म्हणे तुम्हीं फिरावें बहुतीं । माझी तों हे गति झाली आतां ॥३॥

३४४६. न बोलतां तुम्हां कळों ये जे गुज । म्हणऊनि लाज सांडियेली ॥१॥ आतां तुम्हां पुढें जोडीतसें हात । नका कोणी अंत पाहों माझा ॥२॥ तुका म्हणे आम्ही बैसलों शेजारीं । करील तें हरि पाहों आतां ॥३॥

[ तुकोबास मंबाजी गोसाव्याने मारलें त्याबद्दल देवाजवळ परिहार. ]

३४४७. न सोडीं न सोडीं । विठोबा चरण न सोडीं ॥१॥ भलतें जड पडो भारी । जीवावरी आगोज ॥२॥ शतखंड देह शस्त्रधारी । करितां परी न भीयें ॥३॥ तुका म्हणे केली आधी । दृढ बुद्धि सावध ॥४॥

३४४८. बरवें बरवें । केलें विठोबा बरवें ॥१॥ पाहोनिबा अंत क्षमा । अंगीं कांटीवरी मारविलें ॥२॥ शिव्या गाळी नीत नाहीं । बहु फार विटंबिलें ॥३॥ तुका म्हणे क्रोधा हातीं । सोडवूनी घेतलें रे ॥४॥

३४४९. पावलों पावलों । देवा पावलों रे ॥१॥ बरवें संचित होतें तैसें झालें ते । आतां काय बोलों रे ॥२॥ सोज्वळा कंटकवाटा भावें करूं गेलों रे । तुका म्हणे करूनी वेगळा केलों रे ॥३॥

३४५०. कां होती कां होती। देवा एवढी फजीती ॥१॥ मुळीं वर्म नसतों चुकलों। तो मी ऐसें चित्तीं ॥२॥ होणार तें होऊनि गेलें। मिथ्या आतां खंती रे ॥३॥ तुका म्हणे पुरे आतां। दुर्जनाची संगती रे ॥४॥

३४५१. सोडवा सोडवा सोडवा अनंता । तुजविण ऐसा कोण दुजा प्राणदाता ॥१॥ कोणा लाज नेणां ऐसें । आणिका शरण आम्ही जातां ॥२॥ तुका म्हणे सखया । माझ्या रखुमाईच्या कांता ॥३॥

**३४५२. पुत्राचीया वार्ता । शुभ ऐके जेवीं माता ॥१॥ तैसें राहो माझें मन । गातां ऐकतां हरिगुण ॥२॥ नादें लुब्ध झाला मृग । देह विसरला अंग ॥३॥ तुका म्हणे पाहे । कासवीचें पिलें माय ॥४॥**

[ देवांनी बाबाजी चैतन्याचें रूप धरून स्वामीस स्वप्नामध्यें उपदेश केला तेंविषयी. ]

**३४५३. सत्यगुरुरायें कृपा मज केली । परि नाहीं घडली सेवा कांहीं ॥१॥ सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा ठेविला कर ॥२॥ भोजना मागती तूप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजी ॥३॥ काय कळे उपजला अंतराय । म्हणोनियां काय त्वरा झाली ॥४॥ राघवचैतन्य केशवचैतन्य । सांगितली खूण माळिकेची ॥५॥ बाबाजी आपुलें सांगितलें नाम । मंत्र दिला राम कृष्ण हरि ॥६॥ माहो शुद्ध दशमी पाहुनी गुरुवार । केला अंगीकार तुका म्हणे ॥७॥**

**३४५४. माझिये मनींचा जाणोनियां भाव । तो करी उपाव गुरुरावो ॥१॥ आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेणें नोहे गुंफा कांहीं कोठें ॥२॥ जाती पुढें एक उतरले पार । हा भवसागर साधुसंत ॥३॥ जाणत्या नेणत्या ज्या जैसी आवडी । उतार सांगडी तापे पेटे ॥४॥ तुका म्हणे मज दावियेला तारू । कृपेचा सागरू पांडुरंग ॥५॥**

**३४५५. घालूनियां भार राहिलों निश्चिंतीं । निरविलें संतीं विठोबासी ॥१॥ लावूनियां हात कुरवाळिली माथा । सांगितलें चिंता न करावी ॥२॥ कटीं कर सम चरण साजिरे । राहिला भीवरेतीरीं उभा ॥३॥ खुंटले सायास आणीक या जीवा । धरिले केशवा पाय तुझे ॥४॥ तुज वाटे आतां तें करीं अनंता । तुका म्हणे संतां लाज माझी ॥५॥**

**३४५६. माझिये मनींचा जाणा हा निर्धार । जिवासी उदार झालों आतां ॥१॥ तुजविण दुजें न धरीं आणिका । भय लज्जा शंका टाकियेली ॥२॥ ठायींचा संबंध तुज मज होता । विशेष अनंता केला संतीं ॥३॥ जीवभाव तुझ्या ठेवियेला पायीं । हेचि आतां नाहीं लाज तुम्हां ॥४॥ तुका म्हणे संतीं घातला हवाला । न सोडीं विठ्ठला पाय तुझे ॥५॥**

[ शाक्तावर अभंग ]

**३४५७. टंवकारूनी दृष्टि लावूनिया रग । दावी झगमग डोळ्यापुढें ॥१॥ म्हणती शिष्यासी लागली समाधि । लटकीच उपाधि झकविती ॥२॥ दीपाचिया ज्योती कोंडियेलें तेज । उपदेश सांजरात्रीमाजी ॥३॥ रांगोळिया चौक शृंगारूनी वोजा । आवरणपूजा यंत्र करी ॥४॥ पडदा लावोनियां दीप चहूं कोनीं । बैसोनी आसनीं मुद्रा दावी ॥५॥ नैवेद्यासी म्हणे करावें पक्वान्न । पात्रासी दिव्यान्न परवडी ॥६॥ झाला उपदेश कवळ घ्या रे मुखीं । आपोशन शेखीं बुडविलें ॥७॥ पाषांड करोनी मांडिली जीविका । बुडवी भाविकां लोकाप्रती ॥८॥ कायावाचामनें सोडवी संकल्प । गुरु गुरु जप प्रतिपादी ॥९॥ शुद्ध परमार्थ बुडविला तेणें । गुरुत्वभूषणें मग भोगी**

॥१०॥ विधीचाही लोप बुडविला वेद। शास्त्रांचाही बोध हरविला ॥११॥ योगाची धारणा नाहीं प्राणायाम। सांडी यम नेम नित्यादिक ॥१२॥ वैराग्याचा लोप हरिभजनीं विक्षेप। वाढविलें पाप मतिलंडें ॥१३॥ तुका म्हणे गेलें गुरुत्व गुखाडी। पूर्वजांसी धाडी नरकवासा ॥१४॥

३४५८. गुरुमार्गामुळें भ्रष्ट झाले सकळ। म्हणती यातीकुळ नाही ब्रह्मीं ॥१॥ पवित्राला म्हणती नको हा कंटक। मानिती आत्मिक अनामिका ॥२॥ डोहोर लोहार दासी बलुती बारा। उपदेशिती फारा रांडापोरें ॥३॥ कांहीं टाण्या टोण्या विप्रशिष्य होती। उघडी फजिती स्वधर्माची ॥४॥ नसता करूनी होम खातीं एके ठायीं। म्हणती पाप नाहीं मोक्ष येणें ॥५॥ इंद्रियांचे पेटे भला कौल देती। मर्यादा जकाती माफ केली ॥६॥ नाहीं शास्त्राधार पात्रापात्र नेणें। उपदेशून घेणें द्रव्य कांहीं ॥७॥ तुका म्हणे ऐसे गुरुशिष्य जाण। विठोबाची आण नरका जाती ॥८॥

३४५९. शाक्त गधडा जये देशीं। तेथें राशी पापाच्या ॥१॥ सुकृताचा उदो केला। गोंधळ घाला इंद्रियें ॥२॥ क्रोधरूपें वसे काम। तीचें नाम जपतसे ॥३॥ मद्यभक्षण मांगिणजाती। विटाळ चित्तीं सांठविला ॥४॥ स्तवूनियां पूजी रांड। न लगे भांड दाढीसी ॥५॥ तुका म्हणे भगवती। नेइल अंतीं आपणापें ॥६॥

३४६०. राजा प्रजा द्वाड देश। शाक्त वास करिती तो ॥१॥ अधर्माचें उघड पीक। धर्म रंक ते गांवीं ॥२॥ न पिके भूमि कांपे भारें। मेघ वारें पीतील ॥३॥ तुका म्हणे अवघीं दु:खें। येती सुखें वस्तीसी ॥४॥

३४६१. ऐका कलीचें हें फळ। पुढें होइल ब्रह्मघोळ ॥१॥ चारी वर्ण अठरा याती। भोजन करिती एके पंक्ती ॥२॥ पूजिती असुरा रांडा। मद्य प्राशितील पेंडा ॥३॥ वाम कवळ मार्जन। जन जाईल अध:पतन ॥४॥ तुका हरिभक्ती करी। शक्ति पाणी वाहे घरी ॥५॥

३४६२. ऐसें कलियुगाच्या मुळें। झालें धर्माचें वाटोळें ॥१॥ सांडुनियां रामराम। ब्राह्मण म्हणती दोमदोम ॥२॥ शिवों नये तीं निळीं। वस्त्रें पांघरती काळीं ॥३॥ तुका म्हणे वृत्ति। सांडुनि गदा मागत जाती ॥४॥

३४६३. अवघ्या पापें घडला एक। उपासक शक्तीचा ॥१॥ त्याचा विटाळ नको अंगा। पांडुरंगा माझिया ॥२॥ काम क्रोध मद्य अंगीं। रंगला रंगीं अवगुणी ॥३॥ करितां पाप न धरी शंका। म्हणे तुका कोणीही ॥४॥

३४६४. वारितां बळें धरितां हातीं। जुलुमें जाती नरकामधीं ॥१॥ रंडीदासाप्रति कांहीं। उपदेश तोही चालेना ॥२॥ जन्म गेला वाताहात। थोर घात ये ठायीं ॥३॥ तुका म्हणे पंढरीनाथा। तुझी कथा दूषीती ॥४॥

३४६५. शाक्ताची शूकरी माय। विष्ठा खाय बिदीची ॥१॥ तिची त्या पडली सवे।

मागें धांवे म्हणोनि ॥२॥ शाक्ताची गाढवी माय । भुंकत जाय वेसदारा ॥२॥ तुका म्हणे सिंदळीचे । बोलतां वाचे निंद्य ते ॥४॥

३४६६. हरिहर सांडूनि देव । भरिती भाव क्षुल्लकीं ॥१॥ ऐका त्याची विटंबना । देवपणा भक्तांची ॥१॥ अंगीं कवडे घाली गळां । परडी कळाहीन हातीं ॥३॥ गळा गाठा हिंडे द्वारीं । मनुष्य परी कुतरीं तीं ॥४॥ माथां सेंदुर दांत खाती । जेंगट हातीं सटवीचे ॥५॥ पूजिती विकट दोंद । पशु सोंड गजाची ॥६॥ ऐशा छंदें चुकलीं वाटा । भाव खोटा भजन ॥७॥ तुका म्हणे विष्णु शिवा । वांचुनि देवा भजती ते ॥८॥

३४६७. कांद्यासाठीं झालें ज्ञान । तेणें जन नाडिलें ॥१॥ काम क्रोध बुचबुची । भुंके पुची व्यालीची ॥२॥ पूजेलागीं द्रव्य मागे । काय सांगे शिष्यातें ॥३॥ तुका म्हणे कैंचें ब्रह्म । अवघा भ्रम विषयांचा ॥४॥

३४६८. सांडूनियां पंढरीराव । कवणातें म्हणों देव ॥१॥ बहु लाज वाटे चित्ता । आणिकांतें देव म्हणतां ॥२॥ सांडूनियां हिरा । कोणें वेचाव्या त्या गारा ॥३॥ तुका म्हणे हरिहर । ऐसी सांडूनियां धुर ॥४॥

३४६९. बहुत गेली वांयां । न भजतां पंढरीराया ॥१॥ करिती कामिकांची सेवा । लागोन मागोन खात्या देवा ॥२॥ अवघियांचा धनी । त्यासी गेलीं विसरोनी ॥३॥ तुका म्हणे अंतीं । पडती यमाचिया हातीं ॥४॥

३४७०. असो आतां ऐसा धंदा । तुज गोविंदा आठवूं ॥१॥ रक्षिता तूं होसी जरी । तरि काय येरीं करावें ॥२॥ काया वाचा मन पायीं । राहे ठायीं करूं तें ॥३॥ तुका म्हणे गाइन गीतीं । रूप तें चित्तीं धरूनियां ॥४॥

[ भूपाळ्या अभंग ]

३४७१. बोलोनियां दाऊं कां तुम्ही नेणा जी देवा । ठेवाल तें ठेवा ठायीं तैसा राहेन ॥१॥ पांगुळलें मन कांहीं नाठवे उपाय । म्हणऊनी पाय जीवीं धरूनी राहिलों ॥२॥ त्याग भोग दुःख काय सांडावें मांडावें । ऐसी धरियेली जीवें माझ्या थोर आशंका ॥३॥ तुका म्हणे माता बाळ चुकलिया वनीं । न पवतां जननी दुःख पावे विठ्ठले ॥४॥

३४७२. ऐसी वाट पाहे कांहीं निरोप कां मूळ । कांहो कळवळा तुम्हां उमटेचि ना ॥१॥ अहो पांडुरंगे पंढरीचे निवासे । लावुनियां आसे चाळवूनी ठेविलें ॥२॥ काय जन्मा येऊनियां केली म्यां जोडी । ऐसें घडोघडी चित्ता येते आठवूं ॥३॥ तुका म्हणे खरा न पवेचि विभाग । धिक्कारितें जग हेंचि लाहें हिशोबें ॥४॥

३४७३. कां गा किविलवाणा केलों दीनाचा दीन । काय तुझी हीन शक्ति जालीसे दिसे

॥१॥ लाज येते मना तुझा म्हणवितां दास । गोडी नाहीं रस बोलिलीयासारिखी ॥२॥ लाजविलीं मागें संतांचीं हीं उत्तरें । कळों येतें खरें दुजें एकावरूनी ॥३॥ तुका म्हणे माझी कोणी वदविली वाणी । प्रसादावांचूनी तुमचिया विठ्ठला ॥४॥

३४७४. जळो माझें कर्म वांयां केली कटकट । झालें तैसें तंट नाहीं आलें अनुभवा ॥१॥ आतां पुढें धीर काय देऊं या मना । ऐसें नारायणा प्रेरिलें तें पाहिजे ॥२॥ गुणवंत केलों दोष जाणायासाठीं । माझें माझें पोटीं बळकट दूषण ॥३॥ तुका म्हणे अहो केशीराजा दयाळा । बरवा हा लळा पाळियेला शेवटीं ॥४॥

३४७५. कामें नेलें चित्त नेदी अवलोकूं मुख । बहु वाटे दुःख फुटों पाहे हृदय ॥१॥ कां गा सासुरवासी मज केलें भगवंता । आपुलिया सत्ता स्वाधीनता ते नाहीं ॥२॥ प्रभातेसी वाटे तुमच्या यावें दर्शना । येथें न चले चोरी उरली राहे वासना ॥३॥ येथें अवघे वांयां गेले दिसती सायास । तुका म्हणे नास दिसे झाल्या वेचाचा ॥४॥

३४७६. जळोत तीं येथें उपजविती अंतराय । सायासाची जोडी माझी तुमचे पाय ॥१॥ आतां मज साह्य येथें करावें देवा । तुझी घेईं सेवा सकळ गोवा उगवूनी ॥२॥ भोगें रोगा जोडोनियां दिलें आणिकां । अरुचि ते हो कां आतां सकळांपासूनी ॥३॥ तुका म्हणे असो तुझें तुझे मस्तकीं । नाहीं ये लौकिकीं आतां मज वर्तणें ॥४॥

३४७७. न सांगतां तुम्हां कळों येतें अंतर । विश्वीं विश्वंभर परिहारचि नलगे ॥१॥ परि हे अनावर आवरितां आवडी । अवसान ते घडी पुरों एकी देत नाहीं ॥२॥ काय उणें मज येथें ठेविलीये ठायीं । पोटा आलों तईंपासूनियां समर्थें ॥३॥ तुका म्हणे अवघी आवरिली वासना । आतां नारायणा दुसरियापासूनी ॥४॥

३४७८. तुजसवें आम्ही अनुसरलों अबळा । नको अंगीं कळा राहों हरी हीन देऊं ॥१॥ सासुरवासा भीतो जीव ओढे तुजपाशीं । आतां दोहींविशीं लज्जा राखें आमुची ॥२॥ न कळतां संग झाला सहज खेळतां । प्रवर्तली चिंता मागिलाचि यावरी ॥३॥ तुका म्हणे असतां जैसें तैसें बरवें । वचन या भावें वेचूनियां विनटलों ॥४॥

[ तुकोबाचे अभंगांतील नांव काढून सालोमालो यांनी आपलें नांव घातलें त्याबद्दल त्यांचा निषेध. ]

३४७९. नाहीं घाटावें लागत । एका सितें कळे भात ॥१॥ क्षीर निवडितें पाणी । चोंची हंसाचिये आणी ॥२॥ आंगडें फाडुनि घोंगडें करीं । अवकळा तयापरी ॥३॥ तुका म्हणे कण । भुसीं निवडे कैंचा सीण ॥४॥

३४८०. सालोमालो हरिचे दास । म्हणउन केला अवघा नास ॥१॥ अवघें बचमंगळ केलें । म्हणती एकाचें आपुलें ॥२॥ मोडूनी संतांचीं वचनें । करिती आपणां भूषणें ॥३॥

**तुका म्हणे कवी । जगामधीं रूढी दावी ॥४॥**

**३४८१. जायाचें अळंकार । बुडवूनी होती चोर ॥१॥ त्यांसी ताडणाची पूजा । योग घडे बऱ्या वोजा ॥२॥ अभिळासाच्या सुखें । अंती होती काळीं मुखें ॥३॥ तुका म्हणे चोरा । होय भूषण मातेरा ॥४॥**

**३४८२. कालवूनी विष । केला अमृताचा नास ॥१॥ ऐशी अभाग्याची बुद्धि । सत्य लोपी नाहीं शुद्धि ॥२॥ नाक कापुनि लावी सोनें । कोण अळंकार लेणें ॥३॥ तुका म्हणे बावी । मोडूनि मदार बांधावी ॥४॥**

**३४८३. कण भुसाच्या आधारें । परि तें निवडितां बरें ॥१॥ काय घोंगाणी पाधाणी । ताकामध्यें घाटी लोणी ॥२॥ सुइणीपुढें चेटा । काय लपविसी चाटा ॥३॥ तुका म्हणे ज्ञान । दिमाखाची भणभण ॥४॥**

**३४८४. विकाल तेथें विका । माती नांव ठेवूनि बुका ॥१॥ हा तो निवाड्याचा ठाव । खरा खोटा निवडे भाव ॥२॥ गऱ्हवारे हा विधी । पोट वाढविलें चिंधी ॥३॥ लाऊं जाणे विल्हे । तुका साच आणि कल्हे ॥४॥**

**३४८५. विषयीं अद्वय । त्यासी आम्हां शिवों नये ॥१॥ देव तेथूनि निराळा । असे निष्काम वेगळा ॥२॥ वासनेची बुंथी । तेथें कैंची ब्रह्मस्थिति ॥३॥ तुका म्हणे असतां देहीं । हा जमे ती तेथें नाहीं ॥४॥**

**३४८६. नमितों या देवा । माझी एके ठायीं सेवा ॥१॥ गुण अवगुण निवाडा । म्हैस म्हैस रेडा रेडा ॥२॥ जनीं जनार्दन । साक्ष त्यासी लोटांगण ॥३॥ तुका म्हणे खडे । निवडूं दळणीं घडघडे ॥४॥**

[ हिंदुस्थानी भाषेचे अभंग ]

**३४८७. क्या गाऊं कोई सुननेवाला । देखें तो सब जगही भुला ॥१॥ खेलों आपने रामहिसात । जैसी वैसी कररहूं मात ॥२॥ काहांसे लाऊं मधुरा बानी । रीझे ऐसी लोक बिरानी ॥३॥ गिरिधर लाल तो भावका भुका । राग कला नहिं जानत तुका ॥४॥**

**३४८८. छोडे धन मंदिर बन वसाया । मांगत टुका घरघर खाया ॥१॥ तीनसों हम करवों सलाम । ज्यामुख बैठा राजाराम ॥२॥ तुलसीमाला बभूत चऱ्हावे । हरजीके गुन निर्मल गावे ॥३॥ कहे तुका जो सांई हमारा । हिरनकश्यप जिन्हे मारहि डारा ॥४॥**

**३४८९. मंत्रतंत्र नहिं मानत साखी । प्रेमभाव नहिं अंतर राखी ॥१॥ राम कहे त्याके पग हूं लागूं । देखत कपट अभिमान दुर भागूं ॥२॥ अधिक जाती कुल नहिं जानूं । जाने नारायन सो मानी मानूं ॥३॥ कहे तुका जीव तन धन डारूं वारी । राम उपासिहुं बलियारी ॥४॥**

३४९०. चुराचुराकर माखन खाया । गौलनीका नंद कुमर कन्हया ॥१॥ काहे बराई दिखावत मोहि । जानतहुं प्रभुपना तेरा सबही ॥२॥ और मात सुन उखलसुं गला । बांधलिया तूं आपना गोपाला ॥३॥ फिरत बनबन गाऊं धरावत । कहे तुकयाबंधु लकरी लेले हात ॥४॥

३४९१. हरिसूं मिल दे एकही बेर । पाछें तूं फेर नावे घर ॥१॥ मात सुनों दुति आवे मनावन । जाया करती भर जोवन ॥२॥ हरिसुखमोही कहिया न जाय । तव तूं बुझे आगो पाय ॥३॥ देखहि भाव कछु पकरी हात । मिलाई तुका प्रभुसात ॥४॥

३४९२. क्या कहूं नहिं बुझत लोका । लिजावे जम मारत धका ॥१॥ क्या जीवनेकी पकरी आस । हातों लिया नहिं तेरा घास ॥२॥ किसे दिवाने कहता मेरा । कछु जावे तब तूं सब ल्या न्यारा ॥३॥ कहे तुका तूं भया दिवाना । अपना विचार करले जना ॥४॥

३४९३. कब मरूं पाऊं चरण तुम्हारे । ठाकुर मेरे जीवन प्यारे ॥१॥ जग डरे ज्याकुं सो मोहि मीठा । मीठा दर आनंदसाहि पैठा ॥२॥ भला पाऊं जनम इन्हे बेर । सब मायाके असंग फेर ॥३॥ कहे तुका धन मानहि दारा । वोहि लिये गुंडली पसारा ॥४॥

३४९४. दासों पाछें दौरे राम । सोवे खडा आपे मुकाम ॥१॥ प्रेम रसडी बांधी गले । खैच चले तब मोही उधर ॥२॥ आपने जनसुं भुल न देवे । कर हि धर आगे बाट बतावे ॥३॥ तुकाप्रभु दीनदयाला । वारि रे तुज पर हुं गोपाला ॥४॥

३४९५. ऐसा कर घर आवे राम । और धंदा सब छोर हि काम ॥१॥ इतने गोते काहे खाता । जब तूं आपना भूल न होता ॥२॥ अंतरजामी जानत साचा । मनमे एक उपर वाचा ॥३॥ तुकाप्रभु देशविदेश । भरिया खाली नहि लेस ॥४॥

३४९६. मेरे रामको नाम जो लेवे बारोबार । त्याके पाऊं मेरे तनकी पैजार ॥१॥ हांसत खेलत चालत बाट । खाना खाते सोतें खाट ॥२॥ जातनसुं मुजे कछु नहिं प्यार । असतके नहिं हिंदु धेड चंभार ॥३॥ ज्याका चित्त लगा मेरे रामको नाम । कहे तुका मेरा चित्त लगा त्याके पाव ॥४॥

३४९७. आप तर त्याकी कोन बऱ्हाई । औरनकुं भलो नाम धराई ॥१॥ काहे भूमि इतना भार राखे । दुभत धेनु नहिं दुध चाखे ॥२॥ बरसत मेघ फलतहि विरखा । कोन काम आपनी उन्हो तिरखा ॥३॥ काहे चंदा सुरज खावे फेरा । खिन एक बैठ न पावत घेरा ॥४॥ काहे परिस कंचन करे धातु । नहिं मोल तुटत पावत घातु ॥५॥ कहे तुका उपकार हि काज । सब कर रहिया रघुराज ॥६॥

३४९८. जग चले उस घाट कोन जाय । नहिं समजत फिरफिर गोते खाय ॥१॥ नहिं एक दो सब संसार । जो बुझे सो आगला स्वार ॥२॥ उपर स्वार बैठे तृष्णापीठ । नहिं वाचे कोई

जावे लूट ॥३॥ देखहि डर फेर बैठा तुका । जोवत मारग रामहि एका ॥४॥

३४९९. भले रे भाई जिन्हें किया चीज । अच्छा नहिं मिलत बीज ॥१॥ फीरतफीरत पाया सारा । मीठत लोले धन किनारा ॥२॥ तीरथ बरत फिर पाया जोग । नहिं तलमल तुटत भवरोग ॥३॥ कहे तुका मैं ताको दास । नहिं सिरभार चलावे पास ॥४॥

३५००. लाल कंबली वोढे पेनाये । मोसु हरिथे कैसें बनाये ॥१॥ कहे सखि तुह्मे करीते सोर । हिरदा हरिका कठिन कठोर ॥२॥ नहिं क्रिया सरम कछु लाज । और सुनाउं बहुत हे भाज ॥३॥ और नामरूप नहिं गोवलिया । तुका प्रभु माखन खाया ॥४॥

३५०१. राम कहो जीवना फल सो ही । हरिभजनसुं विलंब न पाई ॥१॥ कवनका मंदिर कनक झोपरी । एकरामबिन सबही फुकरी ॥२॥ कवनकी काया कवनकी माया । एक रामबिन सब हि जाया ॥३॥ कहे तुका सबहि चलनार । एक रामबिन नहिं वोसार ॥४॥

३५०२. काहे भुला धनसंपत्ती घोरे । रामनाम सुन गाउ हो बापु रे ॥१॥ राजे लोक सब कह तूं आपना । जब काल नहिं पाया ठाना ॥२॥ माया मिथ्या मनका सब धंदा । तेजो अभिमान भजो गोविंदा ॥३॥ राना रंक डोंगरकी राई । कहे तुका सब करहिलाई ॥४॥

३५०३. काहे रोवे आगले मरना । गंव्हार तूं भुला आपना ॥१॥ केते मालुम नहिं पडे । नन्हे बडे गये सो ॥२॥ बाप भाई लेखा नहिं । पाछें तूं हि चलनार ॥३॥ काले बाल सोपत भये । खबर पकरो तुका कहे ॥४॥

३५०४. क्या मेरे राम कवन सुख सारा । कहकर दे पुछूं दास तुम्हारा ॥१॥ तनजोवनकी कोन बऱ्हाई । व्याधिपीडा दिस काटहि खाई ॥२॥ कीर्त बधाऊं तो नाम न मेरा । काहे छुटा पछताऊं घेरा ॥३॥ कहे तुका नहिं समजत मात । तुम्हारे शरन जोरत ही हात ॥४॥

३५०५. देखत अखों झुटा कोरा । तो काहे छोरा घरबार ॥१॥ मनसुं किया चाहिये पाख । उपर खाक पसारा ॥२॥ कामक्रोधसो संसार । वो सिरभार चलावे ॥३॥ कहे तुका सो संन्यास । छोड आस तनकी हि ॥४॥

३५०६. रामभजन सब सार मिठाई । हरि संताप जनमदुख राई ॥१॥ दुधभात घृत साकरपारे । हरते भुक नहिं अंततारे ॥२॥ खावते जुग सब चलिजावे । खाटमिठा फिर परचत आवे ॥३॥ कहे तुकाराम रस जो पावे । बहुरी फेरा वो कबहु न खाये ॥४॥

३५०७. बारबार काहे मरत अभागी । बहुरी मरनसे क्या तोरे भागी ॥१॥ ये हि तन करते क्या ना होय । भजन भगति कर वैकुंठ जाय ॥२॥ रामनाम मोल नहिं बेचे कबरि । वो हि सब माया छुरावत झगरी ॥३॥ कहे तुका मनसुं मिल राखो । रामरस जिव्हा नित चाखो ॥४॥

३५०८. हूं दास तीन्हके सुनाऊ लोकां । रावण मार बिभीषन दिई लंका ॥१॥ गोवरधन

**नखपर गोकुल राखा। बर्सन लगा जब मेंहुं फत्तरका ॥२॥ वैकुंठनायक काल कौंसासुरका। दैत डुबाय सब मंगाय गोपिका ॥३॥ स्तंभ फोड पेट चिरीया कश्यपका। प्रल्हादके लियें कहे भाई तुकया का ॥४॥**

[ हिंदुस्थानी दोहोरा ]

३५०९. **तुका बस्तर बिचारा क्या करो रे। अंतर भगवान होय। भीतर मैला कब मिटो रे। मरे उपर धोय ॥१॥ रामराम कहे रे मन। औरसुं नहिं काज। बहुत उतारे पार। आगें राखे तुकाकी लाज ॥२॥ लोभीके चित्त धन बैठे। कामिनीके चित्त काम। माताके चित्त पूत बैठें। तुकाके मन राम ॥३॥ तुका पंखि बहिर न मानुं। वोहि जनावर बाग। असंतनकुं संतन मानुं। जे वर्म कुंदाग ॥४॥ तुका राम बहुत मिठा रे। भर राखुं शरीर। तनकी करूं नावरि। उतारूं पैल तीर ॥५॥ संत पन्हयां लेखडा। राहुं ठाकुरद्वार। चलत पाछें हुं फिरों। रज उडत लेऊं सीर ॥६॥ तुका प्रभु बडो न मनूं न मानूं बडो। जिसपास बहु दाम। बलिहारी उस मुखकी। जिस्ते निकले राम ॥७॥ राम कहे सो मुख भलारे। खाये खीर खांड। हरिबिन मुखमो धूल परी रे। क्या जनी उस रांड ॥८॥ राम कहे सो मुख भला रे। बिन रामसे बीख। अब न जानूं मते बेरों। जब काल लगावे सीख ॥९॥ कहे तुका मैं सवदा बेचूं। लेवेके तन हार। मिठा साधुसंतजन रे। मुरखके सिर मार ॥१०॥ तुका दास तिनका रे। रामभजन निरास। क्या बिचारे पंडित करो रे। हात पसारे आस ॥११॥ तुका प्रीत रामसुं। तैसी मिठा राख। पतंग जाय दीपपरे। करे तनकी खाक ॥१२॥ कहे तुका जग भुला रे। कह्या न मानत कोय। हात परे जब कालके। मारत फोरत डोय ॥१३॥ तुका सुरा नहिं सबदका रे। जब कमाई न होय। चोट साहे घनकी रे। हिरा नीबरे तोय ॥१४॥ तुका सुर बहुत कहावे। लडत बिरला कोय। एक पावे ऊंच पदवी। एक खौंसा जोय ॥१५॥ तुका मान्या पेटका। और न जाने कोय। जपतां कछु रामनाम। हरिभगतनकी सोय ॥१६॥ काफर सोही आपन बुझे। अल्ला दुनियां भर। कहे तुका तुम्ही सुनो रे भाई। हिरदा जिन्हका कठोर ॥१७॥ भीस्त न पाइये मालथी। पढिया लोक रिझाये। निचा जथें कमतारिव। सोही सो फल खाये ॥१८॥ फळ पाया तो सुख भया। किन्होसो न करे वेवाद। बान न देखे मिरगी। चित्त मिलाया नाद ॥१९॥ तुका दास रामका। मनमें एक हि भाव। तो न पलटे आब। ये हित तन जाव ॥२०॥ तुका रामसुं चित्त बांधराखो। तैसा आपने हात। धेनु बछरा छोर जावे। प्रेम न सुटे सात ॥२१॥ चित्तसुं चित्त जब मिले। तब तन थंडा होय। तुका मिलना जिन्हेसुं। ऐसा बिरला कोय ॥२२॥ चित्त मिले तो सब मिले। नहिं तो फुकट संग। पानी पाथर एक ठोर। कोरा न भिजे अंग ॥२३॥ तुका संगत तिनसें कहिये। जिनसे मुख दुनाय। दुर्जन तेरा मुख काला। थीता प्रेम घटाये ॥२४॥ तुका मिलना तो भला। मनसुं मन मिल जाय। उपर उपर मट्टी घसनी। उनकी कोन बऱ्हाई ॥३५॥ तुका कुटुंब छोरे रे। लरके जोरों सिर मुंदाय। जबथे इच्छा**

**नहिं मुई। तब तूं किया काय ॥२६॥ तुका इच्छा मिटाई तो। काहा करे जट खाक। मथीया गोला डारदिया तो। नहिं मिले फेरन ताक ॥२७॥ ब्रीद मेरे साइंयाके। तुका चलावे पास। सुरा सु हि लरे हमसें। छोरे तनकी आस ॥२८॥ कहे तुका भला भया। हम हूं संतनका दास। क्या जानूं केते मरते। वोन मिटती मनकी आस ॥२९॥ तुका और मिठाई क्या करूं रे। पाले विकार पिंड। राम कहावे सो भली रुखी। माखनखीर खांड ॥३०॥**

[ तुकारामाचा स्त्रीस उपदेश ]

**३५१०. कोण येतें घरा आमुच्या काशाला। काय ज्याचा त्याला नाहीं धंदा ॥१॥ देवासाठीं जालें ब्रह्मांड सोईरें। कोवळ्या उत्तरें काय वेंचे ॥२॥ मानें पाचारितां नव्हे अराणूक। ऐसे येति लोक प्रीतीसाठीं ॥३॥ तुका म्हणे रांडे नावडे भूषण। कातेलें तें श्वान लागे पाठीं ॥४॥**

**३५११. देव पहावया करीं वो सायास। न धरीं हे आस नाशिवंत ॥१॥ दिन शुद्ध सोम सकाळीं पातला। द्वादशी घडला पर्वकाळ ॥२॥ द्विजां पाचारूनी शुद्ध करीं मन। देईं वो हें दान यथाविध ॥३॥ नको चिंता करूं वस्त्रा या पोटाची। माउली आमुची पांडुरंग ॥४॥ तुका म्हणे दुरी सांगतों पाल्हाळीं। परी तो जवळी आहे आम्हां ॥५॥**

**३५१२. सुख हें नावडे आम्हां कोण्या बळें। नेणसी अंधळे झालीशी तूं ॥१॥ भूक ताहान कैसी राहिली निश्चळ। खुंटलें चपळ मन ठायीं ॥२॥ द्रव्य जीवाहूनी आवडे या जना। आम्हांसी पाषाणाहूनी हीन ॥३॥ सोइरे सज्जन जन आणि वन। अवघें समान काय गुणें ॥४॥ तुका म्हणे आम्हां जवळीच आहे। सुख दुःख साहे पांडुरंग ॥५॥**

**३५१३. गुरुकृपे मज बोलविलें देवें। होईल हें घ्यावें हित कांहीं ॥१॥ सत्य देवें माझा केला अंगीकार। आणिक विचार नाहीं दुजा ॥२॥ होई बळकट घालुनियां कास। हाचि उपदेश तुज आतां ॥३॥ सडा समार्जन तुळसी वृंदावन। अतीतपूजन ब्राह्मणांचें ॥४॥ वैष्णवांची दासी होई सर्वभावें। मुखीं नाम घ्यावें विठोबाचें ॥५॥ पूर्णबोध स्त्रीभ्रतारसंवाद। धन्य जिहीं वाद आइकिला ॥६॥ तुका म्हणे आहे पांडुरंगकथा। तरेल जो चित्ता धरील कोणी ॥७॥**

[ कवित्वाचा निषेध व त्याचा परिहार ]

**३५१४. भूतबाधा आम्हां घरीं। हें तों आश्चर्य गा हरी ॥१॥ झाला भक्तीचा कळस। आले वसतीस दोष ॥२॥ जागरणाचें फळ दिली जोडोनी तळमळ ॥३॥ तुका म्हणे देवा। आहाच कळों आली सेवा ॥४॥**

**३५१५. नाहीं जो वेचलों जिवाचिया त्यागें। तोंवरी वाउगें काय बोलों ॥१॥ जाणवलें आतां करी ये उद्देश। जोडी किंवा नाश तुमची जीवें ॥२॥ ठायींचेंचि आलें होतें ऐसें मना। जावें ऐसें वना दृढ झालें ॥३॥ तुका म्हणे मग वेचीन उत्तरें। उद्देशिलें खरें झाल्यावरी ॥४॥**

३५१६. करूं कवित्व आतां काय नाहीं लाज। मज भक्तराज हांसतील ॥१॥ आतां आला एका निवाड्याचा दिस। सत्याविण रस विरसला ॥२॥ अनुभवाविण कोण करी पाप। रितेचि संकल्प लाज लावी ॥३॥ तुका म्हणे आतां न धरवे धीर। नव्हे जीव स्थिर माझा मज ॥४॥

३५१७. नाहीं आइकत तुम्ही माझे बोल। कासया हें फोल उपणूं भूस ॥१॥ येसी ते करीन बैसलिया ठाया। तूंचि बुझावया जवळी देवा ॥२॥ करावे ते केले सकळ उपाय। आतां पाहों काय अझुनी वास ॥३॥ तुका म्हणे आला आज्ञेसी शेवट। होऊनियां नीट पायां पडें ॥४॥

३५१८. नोहे तुम्हां जरी। येवढें कारण मुरारी ॥१॥ मग जैसा तैसा काळ। दाट सारावा पातळ ॥२॥ स्वामीचें तें सांडें। पुत्र होतां काळतोंडें ॥३॥ शब्दा नाहीं रुचि। मग कोठें तुका वेची ॥४॥

३५१९. केल्यापुरती आळी। कांही होते टाळाटाळी ॥१॥ सत्यसंकल्पाचें फळ। होतां न दिसेचि बळ ॥२॥ दळणाच्या ओंव्या। रित्या खड्या मापें घ्याव्या ॥३॥ जाती उखळें चाटूं। तुका म्हणे राज्य घाटूं ॥४॥

३५२०. पावावे संतोष। तुम्ही यासाठीं सायास ॥१॥ करीं आवडी वचनें। पालटूनी क्षणक्षणें ॥२॥ द्यावें अभयदान। भूमी न पडावें वचन ॥३॥ तुका म्हणे परस्परें। कांहीं वाढवी उत्तरें ॥४॥

३५२१. बोलतां वचन असा पाठमोरे। मज भाव बरे कळों आले ॥१॥ मागितलें नये अरुचिनें हातां। नाहीं बरी सत्ता आदराची ॥२॥ समाधानासाठीं लाविलासे कान। चोरलेंसे मन दिसतसा ॥३॥ तुका म्हणे आम्हां तुमचेचि फंद। वरदळ छंद कळों येती ॥४॥

३५२२. कशासाठीं बैसों करूनियां हाट। वाउगा बोभाट डांगोरा हा ॥१॥ काय आलें एका जीवाच्या उद्धारें। पावशी उच्चारें काय होतें ॥२॥ नेदी पट्ट परी अन्नें तो न मारी। आपुलिये थोरीसाठीं राजा ॥३॥ तुका म्हणे आतां अव्हेरिलें तरी। मग कोण करी दुकान हा ॥४॥

३५२३. माझा मज नाहीं। आला उबग तो कांहीं ॥१॥ तुमच्या नामाचें जतन। नव्हतां थोर वाटे सीण ॥२॥ न पडावी निंदा। कानीं स्वामीची गोविंदा ॥३॥ तुका म्हणे लाज। आम्हां स्वामीचें तें काज ॥४॥

३५२४. कांही मागणें हें आम्हां अनुचित। वडिलांची रीत जाणतसों ॥१॥ देह तुच्छ झालें सकळ उपाधी। सेवेपाशीं बुद्धि राहिलीसे ॥२॥ शब्द तो उपाधि अचळ निश्चय। अनुभव हा काय नाहीं अंगीं ॥ ३॥ तुका म्हणे देह फांकिला विभागीं। उपकार अंगीं उरविला ॥ ४॥

३५२५. मागितल्यास पसरी कर। पळतां भरी वाखती ॥१॥ काय आम्ही नेणों वर्म। केला श्रम नेणतां ॥२॥ बोलतां बरें येतां रागा। कठीण लागा मागेंमागें ॥३॥ तुका म्हणे येथें बोली।

असे चाली उफराटी ॥४॥

३५२६. असो तुझें तुजपाशीं । आम्हां त्यासी काय चाड ॥१॥ विरोधें कां कोंडूं मन । समाधान असोनी ॥२॥ करावा तो उरे आट । खटपट वाढतसे ॥३॥ तुका म्हणे येउनि रागा । कां मी विभागा मुकेन ॥४॥

३५२७. आहे तेंचि पुढें पाहों । बरें आहों येथेंचि ॥१॥ काय वाढवूनी काम । उगाच श्रम तृष्णेचा ॥२॥ स्थिरावतां ओघीं बरें । चाली पुरें पडेना ॥३॥ तुका म्हणे वळितां मन । आम्हां क्षण न लगे ॥४॥

३५२८. सांगा दास नोहे तुमचा मी कैसा । ऐसें पंढरीशा विचारूनी ॥१॥ कोणासाठीं केली प्रपंचाची होळी । या पाया वेगळी मायबापा ॥२॥ नसेल तो द्यावा सत्यत्वासी धीर । नये भाजूं हीर उफराटे ॥३॥ तुका म्हणे आम्हां आहिक्य परत्रीं । नाहीं कुळगोत्रीं तुजविण ॥४॥

३५२९. अनन्यासी ठाव एक सर्वकाज । एकाविण दुजें नेणें चित्त ॥१॥ न पुरतां आळी देशधडी व्हावें । हें काय बरवें दिसतसे ॥२॥ लेंकराचा भार माउलीचे शिरीं । निढळ तें दुरी धरिलिया ॥३॥ तुका म्हणे किती घातली लांबणी । समर्थ होऊनी केवढ्यासाठीं ॥४॥

३५३०. स्तुती तरी काय करूं कोणापाशीं । कीर्ति तरी कैसी वाखाणावी ॥१॥ खोट्या तंव नाहीं अनुवादाचें काम । उरला तो भ्रम वरी बरा ॥२॥ म्हणवावें त्याची खूण नाहीं हातीं । अवकळा फजिती सावकाश ॥३॥ तुका म्हणे हें गे तुमचें माझें तोंड । होऊनिया लंड आळवितों ॥४॥

३५३१. कांहींच न लगे आदि अवसान । बहुत कठिण दिसतसा ॥१॥ अवघ्याच माझ्या वेचविल्या शक्ति । न चलेसी युक्ति झाली पुढें ॥२॥ बोलिलें वचन हारपलें नभीं । उरलों तों उभीं आहों तैसीं ॥३॥ तुका म्हणे कांहीं न करावेंसें झालें । थकितचि ठेलें चित्त उगें ॥४॥

३५३२. रूपीं गोवियेलें चित्त । पायीं राहिलें निश्चिंत ॥१॥ तुम्हीं देवा अवघेचि गोमटे । मुख देखतां दुःख न भेटे ॥२॥ झाली इंद्रियां विश्रांति । भ्रमतां पीडित होती ॥३॥ तुका म्हणे भेटी । सुटली भवबंदाची गांठी ॥४॥

[ कोरड्या कविता उदकांतून काढणें. ]

३५३३. थोर अन्याय केला । तुझा अंत म्यां पाहिला । जनाचिया बोला । साठीं चित्त क्षोभविलें ॥१॥ भागविलासी केला सीण । अधम मी यातीहीन । झांकुनी लोचन । दिवस तेरा राहिलों ॥२॥ अवघें घालूनियां कोडें । तहानभुकेचें सांकडें । योगक्षेम पुढें । तुज करणें लागलें ॥३॥ उदकीं राखिले कागद । चुकविला जनवाद । तुका म्हणे ब्रीद । साच केलें आपुलें ॥४॥

३५३४. तूं कृपाळु माउली । आम्हां दीनाची साउली । न स्वरित आली । बाळवेषें जवळी

॥१॥ माझें केलें समाधान। रूप गोजिरें सगुण। निववलें मन। आळिंगन देऊनी॥२॥ कृपा केली जना हातीं। पायीं ठाव दिला संतीं। कळों नये चित्तीं। दुःख कैसे आहे तें॥३॥ तुका म्हणे मी अन्यायी। क्षमा करी वो माझे आई। आतां पुढें काई। तुज घालूं सांकडें॥४॥

३५३५. कापो कोणी माझी मान। सुखें पीडोत दुर्जन। तुज होय सीण। तें मी न करीं सर्वथा॥१॥ चुकी जाली एकवेळा। मजपासूनी चांडाळा। उभें करोनियां जळा। माजी वह्या राखविल्या॥२॥ नाहीं केला हा विचार। माझा कोण अधिकार। समर्थासी भार। न कळे कैसा घालावा॥३॥ गेलें होऊनियां मागें। नये बोलों तें वाउगें। पुढिलिया प्रसंगें। तुका म्हणे जाणावें॥४॥

३५३६. काय जाणें मी पामर। पांडुरंगा तुझा पार। धरिलीया धीर। काय एक न करिसी॥१॥ उतावीळ झालों आधीं। मतिमंद हीन बुद्धि। परि तूं कृपानिधि। नाहीं केला अव्हेर॥२॥ तूं देवाचाही देव। अवघ्या ब्रह्मांडाचा जीव। आम्हां दासा कींव। कां भाकणें लागली॥३॥ तुका म्हणे विश्वंभरा। मी तो पतितचि खरा। अन्याय दुसरा। दारीं धरणें बैसलों॥४॥

३५३७. नव्हती आली सीसा सुरी। अथवा घाय पाठीवरी। तों म्यां केला हरी। एवढा तुम्हां आकांत॥१॥ वांटिलासी दोहीं ठायीं। मजपाशीं आणि डोहीं। लागों दिला नाहीं। येथें तेथें आघात॥२॥ जीव घेती मायबापें। थोड्या अन्यायाच्या कोपें। हें तों नव्हे सोपें। साहों त्वांचि जाणितलें॥३॥ तुका म्हणे कृपावंता। तुजऐसा नाहीं दाता। काय वाणूं आतां। वाणी माझी खुंटली॥४॥

३५३८. तूं माउलीहून मायाळ। चंद्राहूनी शीतळ। पाणियाहूनि पातळ। कल्लोळ प्रेमाचा॥१॥ देऊं काशाची उपमा। दुजी तुज पुरुषोत्तमा। ओंवाळूनी नामा। तुझ्यावरुनी टाकीलों॥२॥ तुवां केलें रे अमृता। गोड त्याही तूं परता। पांचां तत्त्वांचा जनिता। सकळ सत्तानायक॥३॥ कांहीं न बोलोनी आतां। उगाच चरणीं ठेवितों माथा। तुका म्हणे पंढरिनाथा। क्षमा करी अपराध॥४॥

३५३९. मी अवगुणी अन्यायी। किती म्हणोन सांगो काई। आतां मज पायीं। ठाव देईं विठ्ठले॥१॥ पुरे पुरे हा संसार। कर्म बळिवंत दुस्तर। राहों नेदी स्थिर। एके ठायीं निश्चळ॥२॥ अनेक बुद्धीचे तरंग। क्षणक्षणा पालटती रंग। धरूं जाता संग। तंव तो होतो बाधक॥३॥ तुका म्हणे आतां। अवघी तोडीं माझी चिंता। येऊनी पंढरीनाथा। वास करीं हृदयीं॥४॥

[ पंढरीस जाणाऱ्या वारकऱ्यांकडे देवांस पत्र. ]

३५४०. कोणा मुखें ऐसी ऐकेन मी मात। चाल तुज पंढरिनाथ बोलावितो॥१॥ मग मी न धरीं आस मागील बोभाट। वेगीं धरीन वाट माहेराची॥२॥ निलाजिरें चित्त करी तळमळ। केधवां देखती मूळ आलें डोळे॥३॥ तुका म्हणे कईं भाग्याची उजरी। होईल पंढरी देखावया॥४॥

३५४१. कां माझा विसर पडिला मायबापा । सांडियेली कृपा कोण्या गुणें ॥१॥ कैसा कंठूनियां राहों संवसार। काय एक धीर देऊं मना॥२॥ नाहीं निरोपाची पावली वारता। न करावी ते चिंता ऐसी कांहीं ॥३॥ तुका म्हणे एक वेंचूनि वचन। नाहीं समाधान केलें माझें ॥४॥

३५४२. कांहीं माझे कळों आले गुणदोष। म्हणऊनी उदास धरिलें ऐसें ॥१॥ नाहीं तरी येथें न घडे अनुचित । नाहीं ऐसी रीत तया घरीं ॥३॥ कळावें तें मना आपुलिया सवें । ठायींचें हें घ्यावें विचारूनी ॥३॥ तुका म्हणे मज अव्हेरिलें देवें। माझिया कर्तव्यें बुद्धीचिया ॥४॥

३५४३. नव्हे धीर कांहीं पाठवूं निरोप । आला तरी कोप येऊं सुखें ॥१॥ कोपोनियां तरी देईल उत्तर। जैसें तैसें पर फिरावूनी ॥२॥ नाही तया तरी काय एक पोर। मज तों माहेर आणीक नाहीं ॥३॥ तुका म्हणे असे तयामध्यें हित। आपण निवांत असों नये ॥४॥

३५४४. आतां पंथ पाहें माहेराची वाट। कामाचा बोभाट पडों सुखें ॥१॥ काय करूं आतां न गमेसें झालें । बहुत सोसिलें बहु दिस ॥२॥ घर लागे पाठी चित्ता उभें वारें । आपुलें तें झुरे पहावया ॥३॥ तुका म्हणे जीव गेला तरी जावो। धरिला तो देव भाव शुद्ध ॥४॥

३५४५. विनवीजे ऐसें भाग्य नाहीं देवा । पायांशीं केशवा सलगी केली ॥१॥ धीटपणें पत्र लिहिलें आवडी । पार नेणें थोडी मति माझी ॥२॥ जेथें वेदा तुझा न कळेचि पार । तेथें मी पामर काय वाणूं ॥३॥ जैसे तैसे माझे बोल अंगीकारी । बोबड्या उत्तरीं गौरवितों ॥४॥ तुका म्हणे विटेवरी जीं पाउलें। तेथें म्यां ठेविलें मस्तक हें ॥५॥

३५४६. देवाचिया देवा गोपिकांच्या पति । उदार हे ख्याति त्रिभुवनीं ॥१॥ पातकांच्या रासी नासितोसी नामें । जळतील कर्में महादोष ॥२॥ सर्व सुखें तुझ्या वोळगती पायीं । रिद्धि सिद्धि ठायीं मुक्ति चारी ॥३॥ इंद्रासी दुर्लभ पाविजे तें पद । गीतीं गातां छंद वाहतां टाळी ॥४॥ तुका म्हणे जड जीव शक्तिहीन। त्यांचें तूं जीवन पांडुरंगा ॥५॥

३५४७. काय झालें नेणों माझिया कपाळा । न देखिजे डोळां मूळ येतां ॥१॥ बहु दिस पाहें वचनाची वास। धरिलें उदास पांडुरंगा ॥२॥ नाहीं निरोपाचें पावलें उत्तर। ऐसें तों निष्ठुर न पाहिजे ॥३॥ पडिला विसर किंवा कांहीं धंदा । याहूनी गोविंदा जरूरसा ॥४॥ तुका म्हणे आलें वेचाचें सांकडे। देणें घेणें पुढें तोही धाक ॥५॥

३५४८. एवढा संकोच तरी कां व्यालासी। आम्ही कोणापाशीं तोंड वासूं ॥१॥ कोण मज पुसे सिणलें भागलें। जरी मोकलिलें तुम्ही देवा ॥२॥ कवणाची वास पाहों कोणीकडे। कोण मज ओढे जीवलग ॥३॥ कोण जाणे माझे जीवींचें सांकडें । उगवील कोडें संकटाचें ॥४॥ तुका म्हणे तुम्ही देखिली निश्चिंती। काय माझे चित्तीं पांडुरंगा ॥५॥

३५४९. देई डोळे भेटी न धरीं संकोच। न घलीं कांहीं वेच तुजवरी ॥१॥ तुज बुडवावें ऐसा

कोण धर्म । अहर्निशीं नाम घेतां थोडें ॥२॥ फार थोडें कांहीं करुनी पातळ । त्याजमध्यें काळ कडे लावूं ॥३॥ आहे माझी तेचि सारीन सिदोरी । भार तुजवरी नेदीं माझा ॥४॥ तुका म्हणे आम्हां लेंकरांची जाती । भेटावया खंती वाटतसे ॥५॥

३५५०. सीण भार हरे तेर्थींच्या निरोपें । देखिलिया रूप उरी नुरे ॥१॥ इंद्रियांची धांव होईल कुंठित । पावेल हें चित्त समाधान ॥२॥ माहेर आहेसें लौकिकीं कळावें । निढळ बरवें शोभा नेदी ॥३॥ आस नाहीं परि उरी बरी वाटे । आपलें तें भेटे आपणासी ॥४॥ तुका म्हणे माझी अवीट आवडी । खंडणा तांतडी होऊं नेदी ॥५॥

३५५१. धरितों वासना परि न ये फळ । प्राप्तीचा तों काळ नाहीं आला ॥१॥ तळमळीं चित्त घातलें खापरीं । फुटतसे परी लाहीचिया ॥२॥ प्रकार ते कांहीं नावडती जीवा । नाहीं पुढें ठावा काळ हातीं ॥३॥ जातो तळा येतो मागुता लवकरी । वोळशाचे फेरी सांपडलों ॥४॥ तुका म्हणे बहु करितों विचार । उतरें डोंगर एक चढें ॥५॥

३५५२. कां माझे पंढरी न देखती डोळे । काय हें न कळे पाप यांचें ॥१॥ पाय पंथ कां हे न चलती वाट । कोण हें अदृष्ट कर्म बळी ॥२॥ कां हें पायांवरी न पडे मस्तक । क्षेम कां हस्तक न पवती ॥३॥ कां या इंद्रियांची न पुरे वासना । पवित्र होईना जिव्हा कीर्ती ॥४॥ तुका म्हणे कईं जाऊनि मोटळें । पडेन हा लोळें महाद्वारीं ॥५॥

३५५३. काय पोरें झालीं फार । किंवा न साहे करकर ॥१॥ म्हणऊनी केली सांडी । घांस घेऊं न लाहे तोंडीं ॥२॥ करूं कलागती । तुज भांडणें भोवतीं ॥३॥ तुका म्हणे टांचें । घरीं झालेंसे वरोचें ॥४॥

३५५४. कांहीं चिंतेविण । नाहीं उपजत सीण ॥१॥ तरी हा पडिला विसर । माझा तुम्हां झाला भार ॥२॥ आली कांहीं तुटी । गेली सुटोनियां गांठी ॥३॥ तुका म्हणे घरीं । बहु बैसले रिणकरी ॥४॥

३५५५. निरोपासी वेंचे । काय बोलतां फुकाचें ॥१॥ परि हें न घेवेचि यश । भिऊं नको सुखी आस ॥२॥ सुख समाधानें । कोण पाहे देणें घेणें ॥३॥ न लगे निरोपासी मोल । तुका म्हणे वेंचे बोल ॥४॥

३५५६. जोडीच्या हव्यासें । लागे धनाचेंचि पिसें ॥१॥ मग आणीक दुसरें । लोभ्या नावडती पोरें ॥२॥ पाहे रुक्याकडे । मग अवघें ओस पडे ॥३॥ तुका म्हणे देवा । तुला बहुताचा हेवा ॥४॥

३५५७. मव्हिलें मविती । नेणों रासी पडिल्या किती ॥१॥ परि तूं धालाचि न धासी । आलें उभाउभीं घेसी ॥२॥ अवघ्या अवघा काळ । वाटा वाहाती सकळ ॥३॥ तुका म्हणे नाहीं ।

अराणूक तुज कांहीं ॥४॥

३५५८. न बैससी खालीं । सम उभाच पाउलीं ॥१॥ ऐसे झाले बहुत दिस । झालीं युगें अठ्ठावीस ॥२॥ नाहीं भाग सीण । अराणूक एक क्षण ॥३॥ तुका म्हणे किती । मापें केलीं देती घेती ॥४॥

३५५९. जोडी कोणासाठीं । एवढी करितोसी आटी ॥१॥ जरी हें आम्हां नाहीं सुख । रडों पोरें पोटीं भूक ॥२॥ करूनी जतन । कोणा देसील हें धन ॥३॥ आमचे तळमळे । तुझें होईल वाटोळें ॥४॥ घेसील हा शाप । माझा होऊनियां बाप ॥५॥ तुका म्हणे उरी । आतां न ठेवी यावरी ॥६॥

३५६०. करूनी चाहाडी । अवघी बुडवीन जोडी ॥१॥ जरी तूं होऊनी उदास । माझी बुडविसी आस ॥२॥ येथें न करीं काम । मुखें नेघें तुझें नाम ॥३॥ तुका म्हणे कुळ । तुझें बुडवीन समूळ ॥४॥

३५६१. समर्थाचे पोटीं । आम्ही जन्मलों करंटीं ॥१॥ ऐसी झाली जगीं कीर्ति । तुझ्या नामाची फजिती ॥२॥ येथें नाहीं खाया । न ये कोणी मूळ न्याया ॥३॥ तुका म्हणे जिणें । आतां खोटें जीवपणें ॥४॥

३५६२. पुढें तरी चित्ता । काय येईल तें आतां ॥१॥ मज सांगोनियां धाडी । वाट पहातों बराडी ॥२॥ कंठीं धरिला प्राण । पायांपाशीं आलें मन ॥३॥ तुका म्हणे चिंता । बहु वाटतसे आतां ॥४॥

३५६३. कैंचा मज धीर । कोठें बुद्धि माझी स्थिर ॥१॥ जें या मनासीं आवरूं । आंत पोटीं वाव धरूं ॥२॥ कैंची शुद्ध मति । भांडवल असे हातीं ॥३॥ तुका म्हणे अंगा । कोण दशा आली सांगा ॥४॥

३५६४. समर्पक वाणी । नाहीं ऐकिजेसी कानीं ॥१॥ आतां भावें करूनी साचा । पायां पडिलों विठोबाच्या ॥२॥ न कळे उचित । करूं समाधान चित्त ॥३॥ तुका म्हणे विनंती । विनविली धरा चित्तीं ॥४॥

३५६५. येती वारकरी । वाट पाहातों तोंवरी ॥१॥ घालूनियां दंडवत । पुसेन निरोपाची मात ॥२॥ पत्र हातीं दिलें । तयां तेथें पाठविलें ॥३॥ तुका म्हणे येती । जाईन सामोरा पुढती ॥४॥

३५६६. रुळे महाद्वारीं । पायांखालील पायरी ॥१॥ तैसें माझें दंडवत । निरोप सांगतील संत ॥२॥ पडे दंडकाठी । देह भलतीसवा लोटी ॥३॥ तुका म्हणे बाळ । लोळे न धरितां सांभाळ ॥४॥

३५६७. तुम्ही संतजनीं । माझी करा विनवणी ॥१॥ काय तुक्याचा अन्याय । त्यासी अंतरले पाय ॥२॥ भाका बहुतां रीती । माझी कींव काकुलती ॥३॥ न देखें पंढरी ।

**तुका चरण विटेवरी ॥४॥**

**३५६८. होईल कृपा दान । तरी मी येईन धावोन ॥१॥ होतिल संतांचिया भेटी । आनंदें नाचों वाळवंटीं ॥२॥ रिघेन मातेपुढें । स्तनपान करीन कोडें ॥३॥ तुका म्हणे ताप । हरती देखोनियां बाप ॥४॥**

**३५६९. परिसोनी उत्तर । जाब देईं सत्वर ॥१॥ जरी तूं होसी कृपावंत । तरी हा बोलावीं पतित ॥२॥ नाणीं कांहीं मना । करूनी पापाचा उगाणा ॥३॥ तुका म्हणे नाहीं । काय शक्ति तुझे पायीं ॥४॥**

**३५७०. ऐकोनियां कीर्ति । ऐसी वाटती विश्रांति ॥१॥ मा तें सुख डोळां पडे । तेथें कोण लाभ जोडे ॥२॥ बोलतां ये वाचे । वीट नये जिव्हा नाचे ॥३॥ तुका म्हणे धांवे । वासना ते रस घ्यावे ॥४॥**

**३५७१. किती करूं शोक । पुढें वाढें दुःखे दुःख ॥१॥ आतां जाणसी तें करीं । माझें कोण मनीं धरी ॥२॥ पुण्य होतें गांठी । तरी कां लागती हे आटी ॥३॥ तुका म्हणे बळ । माझी राहिली तळमळ ॥४॥**

**३५७२. करील आबाळी । माझ्या दांताची कसाळी ॥१॥ जासी एखादा मरोन । पाठी लागेल हें जन ॥२॥ घरीं लागे कळ । नाहीं जात तो शीतळ ॥३॥ तुका म्हणे पोरवडे । मज येतील रोकडे ॥४॥**

**३५७३. आतां आशीर्वाद । माझा असो सुखें नांद ॥१॥ म्हणसी कोणे तरी काळें । आहेतसीं माझीं बाळें ॥२॥ दुरी दूरांतर । तरी घेसी समाचार ॥३॥ नेसी कधीं तरी । तुका म्हणे लाजे हरी ॥४॥**

**३५७४. आतां हे शेवटी । माझी आईकावी गोष्टी ॥१॥ आतां द्यावा वचनाचा । जाब कळे तैसा याचा ॥२॥ आतां करकर । पुढें न करीं उत्तर ॥३॥ तुका म्हणे ठसा । तुझा आहे राखें तैसा ॥४॥**

**३५७५. बोलिलों तें आतां । कांहीं जाणतां नेणतां ॥१॥ क्षमा करावे अन्याय । पांडुरंगे माझे माय ॥२॥ स्तुति निंदा केली । लागे पाहिजे साहिली ॥३॥ तुका म्हणे लाड । दिला तैसें पुरवा कोड ॥४॥**

[ वारकरी परत येईतोंपर्यंतची मनाची स्थिति. ]

**३५७६. माहेरींचा काय येईल निरोप । म्हणऊनी झोंप नाहीं डोळां ॥१॥ वाट पाहें आस धरूनियां जीवीं । निढळा हे ठेवीं वरी बाहे ॥२॥ बोटावरी माप लेखितों दिवस । होतो कासावीस धीर नाहीं ॥३॥ काय नेणों संतां पडिला विसर । कीं नव्हे सादर मायबाप**

॥४॥ तुका म्हणे तेथें होईल दाटणी । कोण माझें आणी मना तेथें ॥५॥

३५७७. परि तो आहे कृपेचा सागर । तोंवरी अंतर पडों नेदी ॥१॥ बहु कान दृष्टी आइके देखणा । पुरोनियां जना उरलासे ॥२॥ सांगितल्याविणें जाणे अंतरींचें । पुरवावें ज्याचें तैसें कोड ॥३॥ बहुमुखें कीर्ति आइकिली कानीं । विश्वासही मनीं आहे माझ्या ॥४॥ तुका म्हणे नाहीं जात वांयांविण । पाळितो वचन बोलिलों तें ॥५॥

३५७८. यावरी न कळे संचित आपुलें । कैसें वोढवलें होइल पुढें ॥१॥ करील विक्षेप धाडितां मुळासी । किंवा धाडा ऐसी तांतडी हे ॥२॥ जोंवरी हे डोळां देखें वारकरी । तों हें भरोवरी करी चित्त ॥३॥ आस वाढविते बुद्धीचे तरंग । चित्ताचे ते वेग वावडती ॥४॥ तुका म्हणे तेव्हा होतील निश्चळ । इंद्रियें सकळ निरोपानें ॥५॥

३५७९. होईल निरोप घेतला यावरी । राऊळाभीतरी जाऊनियां ॥१॥ करूनियां दधिमंगळभोजन । प्रयाण शकुनसुमुहूर्तें ॥२॥ होतील दाटले सद्गदीत कंठीं । भरतें त्या पोटीं वियोगाचें ॥३॥ येरयेरां भेटी क्षेम आळिंगनें । केलीं समाधानें होतीं संतीं ॥४॥ तुका म्हणे चाली न साहे मनास । पाहाती ते कळस परतोनी ॥५॥

३५८०. ऐसी ते सांडिली होईल पंढरी । येत वारकरी होते वाटे ॥१॥ देखिले सोहळे होती आठवत । चालती ते मात करूनियां ॥२॥ केली आइकिली होईल जे कथा । राहिलें तें चित्ता होईल प्रेम ॥३॥ गरुडटके टाळ मृदंग पताका । सांगताती एकांएक सुख ॥४॥ तुका म्हणे आतां येती लवलाहीं । आळिंगूनी बाहीं देईन क्षेम ॥५॥

३५८१. क्षेम मायबाप पुसेन हें आधीं । न घलीं हें मधीं सुख दुःख ॥१॥ न करीं तांतडी आपणापासूनी । आइकेन कानीं सांगती ते ॥२॥ अंतरींचें संत जाणतील गुज । निरोप तो मज सांगतील ॥३॥ पायांवरी डोई ठेवीन आदरें । प्रीतिपडिभरें आळिंगून ॥४॥ तुका म्हणे काया करीन कुरवंडी । ओवाळून सांडीं त्यावरून ॥५॥

३५८२. होईल माझी संती भाकिली करुणा । जे त्या नारायणा मनीं बैसे ॥१॥ शृंगारूनी माझी बोबडीं उत्तरें । होतील विस्तारें सांगितलीं ॥२॥ क्षेम आहे ऐसें होईल सांगितलें । पाहिजे धाडिलें शीघ्र मूळ ॥३॥ अवस्था जे माझी ठावी आहे संतां । होईल कृपावंता निरोपिली ॥४॥ तुका म्हणे सवें येईल मुऱ्हाळी । किंवा कांही उरी राखतील ॥५॥

३५८३. दोहींमध्यें एक घडेल विश्वासें । भातुके सरिसें मूळ तरी ॥१॥ करिती निरास निःशेष न घडे । कांहीं तरी ओढे चित्त माये ॥२॥ लौकिकाची तरी धरितील लाज । काय माझ्या काज आचरणें ॥३॥ अथवा कोणाचें घेणें लागे रीण । नाहीं तरी हीन कर्मी कांहीं ॥४॥ व्यालीचिये अंगीं असती वेदना । तुका म्हणे मना मन साक्ष ॥५॥

३५८४. बैसतां कोणापें नाहीं समाधान । विवरे हें मन तेचि सोई ॥१॥ घडीघडी मज आठवे माहेर । न पडे विसर क्षणभरी ॥२॥ न बोलावें ऐसा करितों विचार । पडतो विसर प्रसंगीं तो ॥३॥ इंद्रियांसी वाहो पडिली ते चाली । होती विसांवली येचि ठायीं ॥४॥ एकसरें सोस माहेरासी जावें । तुका म्हणे जीवें घेतलासे ॥५॥

३५८५. नाहीं हाति परि न राहावे निसुर । न पडे विसर काय करूं ॥१॥ पुसाविसी वाटे मात कापडियां । पाठविती न्याया मूळ मज ॥२॥ आणीक या मना नावडे सोहळा । करिते टकळा माहेरींचा ॥३॥ बहु कामें केलें बहु कासावीस । बहु झालें दिस भेटी नाहीं ॥४॥ तुका म्हणे त्याचें न कळे अंतर । अवस्था ते फार होते मज ॥५॥

३५८६. तोंवरी म्यां त्यास कैसें निषेधावें । जों नाहीं बरवें कळों आलें ॥१॥ कोणाचिया मुखें तंट नाहीं नागें । वचन वाउगें बोलों नये ॥२॥ दिसे हानि परी निरास न घडे । हे तंव रोकडे अनुभव ॥३॥ आपुलिया भोगें होईल उशीर । तोंवरी कां धीर केला नाहीं ॥४॥ तुका म्हणे गोड करील सेवट । पाहिली तें वाट ठावी आहे ॥५॥

३५८७. माहेरींचें आलें तें मज माहेर । सुखाचें उत्तर करीन त्यासी ॥१॥ पायांवरी माथा आळिंगीन बाहीं । घेईन लवलाहीं पायवणी ॥२॥ सुख समाचार पुसेन सकळ । कैसा पर्वकाळ आहे त्यास ॥३॥ आपुले जीवींचें सुखदुःख भावें । सांगेन आघवें आहे तैसें ॥४॥ तुका म्हणे वीट नेघें आवडीचा । बोलिलीच वाचा बोलवीन ॥५॥

३५८८. वियोग न घडे सन्निध वसलें । अखंड राहिलें होय चित्तीं ॥१॥ विसर न पडे विकल्प न घडे । आलें तें आवडे तया पंथें ॥२॥ कामाचा विसर नाठवे शरीर । रसना मधुर नेणें फिकें ॥३॥ निरोपासी काज असो अनामिक । निवडितां एक नये मज ॥४॥ तुका म्हणे हित चित्तें ओढियलें । जेथें तें उगलें जावें येणें ॥५॥

३५८९. आतां माझे सखे येती वारकरी । जीवा आस थोरी लागलीसे ॥१॥ सांगितील माझ्या निरोपाची मात । सकळ वृत्तांत माहेरींचा ॥२॥ काय लाभ झाला काय होतें केणें । काय काय कोणें सांठविलें ॥३॥ मागणें तें काय धाडिलें भातुकें । पुसेन तें सुखें आहेतसीं ॥४॥ तुका म्हणे काय सांगती ते कानीं । ऐकोनियां मनीं धरुनी राहें ॥५॥

३५९०. काय करावें म्यां केले ते विचार घडले साचार काय पाहों ॥१॥ काय मन नाहीं धरीत आवडी । प्रारब्धें जोडी तेचि खरी ॥२॥ काय म्यां तेथींचें रांधिलें चाखोनी । तें हें करी मनीं विवंचना ॥३॥ आणीकही त्यासी बहुत कारणें । बहु असे जिणें ओढीचेंही ॥४॥ तुका म्हणे आम्हां बोळविल्यावरी । परती माघारी केली नाहीं ॥५॥

३५९१. आम्हां अराणूक संवसारा हातीं । पडिली नव्हती आजीवरी ॥१॥ पुत्रदाराधन होता

मनीं धंदा । गोवियेलों सदा होतों कामें ॥२॥ वोढवलें ऐसें दिसतें कपाळ । राहिलें सकळ आवरोनी ॥३॥ मागें पुढें कांहीं न दिसे पाहातां । येथूनियां चिंता उपजली ॥४॥ तुका म्हणे वाट पाह्याचें कारण । येथींचिया हीन झालें भाग्य ॥५॥

३५९२. बहु दिस नाहीं माहेरींची भेटी । जाली होती तुटी व्यवसायें ॥१॥ आपुलाल्या होतों गुंतलों व्यासंगें । नाहीं त्या प्रसंगें आठवलें ॥२॥ तोडिलें तुटतें जडीतें जडलें । आहे तें आपुलें आपणापें ॥३॥ बहु निरोपाचें पावलें उत्तर । जवळीच फार एक तेंही ॥४॥ काय जाणों मोह होईल सांडिला । बहु दिस तुटला तुका म्हणे ॥५॥

३५९३. होतीं नेणों झालीं कठिणें कठीण । जवळीच मनें मन ग्वाही ॥१॥ आम्ही होतों सोई सांडिला मारग । घडलें तें मग तिकूनही ॥२॥ निश्चिंतीनें होते पुढिलांची सांडी । न चले ते कोंडी मायबापा ॥३॥ आम्हां नाहीं त्याचा घडला आठव । त्याचा बहु जीव विखुरला ॥४॥ तुका म्हणे झालें धर्माचें माहेर । पडिलें अंतर आम्हांकूनी ॥५॥

३५९४. आतां करावा कां सोस वांयांविण । लटिकाचि सीण मनासी हा ॥१॥ असेल तें कळों येईल लवकरी । आतां वारकरी आल्यापाठीं ॥२॥ बहु विलंभाचें सन्निध पातलें । धीराचें राहिलें फळ पोटीं ॥३॥ चालिलें तें ठाव पावेल सेवटीं । पुरलिया तुटी पाउलांची ॥४॥ तुका म्हणे आसे लागलासे जीव । म्हणऊनी कींव भाकीतसें ॥५॥

[ वारकरी परत आल्यानंतरचे अभंग. ]

३५९५. भागलेती देवा । माझा नमस्कार घ्यावा ॥१॥ तुम्ही क्षेम कीं सकळ । बाळ अवघे गोपाळ ॥२॥ मारगीं चालतां । श्रमलेती येतां जातां ॥३॥ तुका म्हणे कांहीं । कृपा आहे माझ्या ठायीं ॥४॥

३५९६. घालूनियां ज्योती । वाट पाहें दिवसराती ॥१॥ बहु उताविळ मन । तुमचें व्हावें दरुषण ॥२॥ आलों बोळवीत । तैसे याचि पंथें चित्त ॥३॥ तुका म्हणे पेणी । येतां जातां दिवस गणीं ॥४॥

३५९७. आजी दिवस धन्य । तुमचें झालें दर्शन ॥१॥ सांगा माहेरींची मात । अवघा विस्तारें वृत्तांत ॥२॥ आइकतों मनें । करुनी सादर श्रवण ॥३॥ तुका म्हणे नाम । माझा सकळ संभ्रम ॥४॥

३५९८. बोलिलेती काय । माझा बाप आणि माय ॥१॥ ऐसें सांगा जी झडकरी । तुम्ही सखे वारकरी ॥२॥ पत्राचें वचन । काय दिलें फिरावून ॥३॥ तुका म्हणे कांहीं । मना आणिलें कीं नाहीं ॥३॥

३५९९. काय पाठविलें । सांगा भातुकें विठ्ठलें ॥१॥ आसे लागेलासे जीव । काय

**केली माझी कींव ॥२॥ फेडिलें मुडतर । किंवा कांहीं जरजर ॥३॥ तुका म्हणे सांगा । कैसें आर्त पांडुरंगा ॥४॥**

**३६००. आजीचिया लाभे ब्रह्मांड ठेंगणें । सुखी झालें मन कल्पवेना ॥१॥ आर्तभूत माझा जीव जयांसाठीं । त्याच्या झाल्या भेटी पायांसवें ॥२॥ वाटुली पाहातां शिणले नयन । बहु होते मन आर्तभूत ॥३॥ माझ्या निरोपाचें आणिलें उत्तर । होईल समाचार सांगती तो ॥४॥ तुका म्हणे भेटी निवारला ताप । फळले संकल्प संत आले ॥५॥**

**३६०१. आजी बरवें झालें । माझें माहेर भेटलें ॥१॥ डोळां देखिले सज्जन । निवारला भाग सीण ॥२॥ धन्य झालों आतां । क्षेम देउनियां संतां ॥३॥ इच्छेचें पावलों । तुका म्हणे धन्य झालों ॥४॥**

**३६०२. वोरसोनि येती । वत्स धेनुवेचे चित्तीं ॥१॥ माझा करावा सांभाळ । वोरसोनियां कृपाळ ॥२॥ स्नेह भूक ताहान । विसरती झाले क्षीण ॥३॥ तुका म्हणे कवतुकें । दिलें प्रेमाचें भातुकें ॥४॥**

**३६०३. आलें तें आधीं खाईन भातुकें । मग कवतुकें गाईन ओव्या ॥१॥ सांगितला आधीं आइकों निरोप । होईल माझा बाप पुसे तो तें ॥२॥ तुका म्हणे माझे सखे वारकरी । आले हे माहेरींहून आजि ॥३॥**

**३६०४. अमुप जोडल्या सुखाचिया रासी । पार त्या भाग्यासी नाहीं आतां ॥१॥ काय सांगों सुख झालें आलिंगनें । निवाली दर्शनें कांति माझी ॥२॥ तुका म्हणे याच्या उपकारासाठीं । नाहीं माझे गांठीं कांहीं एक ॥३॥**

**३६०५. पवित्र व्हावया घालीन लोळणी । ठेवीन चरणीं मस्तक हें ॥१॥ जोडोनि हस्तक करीन विनवणी । घेईन पायवणी धावोनियां ॥२॥ तुका म्हणे माझें भांडवल सुचें । संतां हें ठायींचें ठावें आहे ॥३॥**

[ निर्याणाचे अभंग ]

**३६०६. शोधितांचि नये । म्हणोनी वोळगतों पाय ॥१॥ आतां दिसों नये जना । ऐसें करा नारायणा ॥२॥ परतोनी मन । गेलें ठायींच मुरोन ॥३॥ विसरला तुका । बोलों चालों झाला मुका ॥४॥**

**३६०७. रज्जुसर्पाकार । भासयलें जगडंबर ॥१॥ म्हणोनी आवडती पाय । घेतों आलाय बलाय ॥२॥ दृश्य द्रुमाकार लाणी । केलों सर्वस्वासी धनी ॥३॥ तुकीं तुकला तुका । विश्वीं भरोनी उरला लोकां ॥४॥**

**३६०८. म्हणवितों दास । परि मी असें उदास ॥१॥ हाचि निश्चय माझा । परी मी**

निश्चयाहुनी दुजा ॥२॥ सरतें कर्तृत्व माझ्यानें । परि मी त्याहून असें भिन्न ॥३॥ तुका तुकासी तुकला । तुका तुकाहुनी निराळा ॥४॥

३६०९. घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं । मुक्तां आत्मस्थिती सांडवीन ॥१॥ ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनीं । भाग्य तरी ऋणी देव ऐसा ॥२॥ तीर्थभ्रामकासी आणीन आळस । कडू स्वर्गवास करिन भोग ॥॥ सांडवीन तपोनिधा अभिमान । यज्ञ आणि दान लाजवीन ॥४॥ भक्तिभाग्यसीमा साधीन पुरुषार्थ । ब्रह्मींचा जो अर्थ निजठेवा ॥५॥ धन्य म्हणवीन येह लोकीं लोकां । भाग्य आम्हीं तुका देखियेला ॥६॥

३६१०. संसाराचे अंगीं अवघींच व्यसनें । आम्ही या कीर्तनें शुद्ध झालों ॥१॥ आतां हें सोंवळें झालें त्रिभुवन । विषम धोऊन सांडियेलें ॥२॥ ब्रह्मपुरीं वास करणें अखंड । न देखिजे तोंड विटाळाचें ॥३॥ तुका म्हणे आम्हां एकांताचा वास । ब्रह्मीं ब्रह्मरस सेवूं सदा ॥४॥

३६११. गरुडाचे पायीं । ठेवीं वेळोवेळां डोई ॥१॥ वेगीं आणावा तो हरी । मज दीनातें उद्धरीं ॥२॥ पाय लक्ष्मीच्या हातीं । म्हणोन येतों काकुलती ॥३॥ तुका म्हणे शेषा । जागें करा हृषीकेशा ॥४॥

३६१२. तुम्ही सनकादिक संत । म्हणवितां कृपावंत ॥१॥ एवढा करा उपकार । देवा सांगा नमस्कार ॥२॥ भाकावी करुणा । विनवा वैकुंठींचा राणा ॥३॥ तुका म्हणे मज आठवा । मूळ लवकरी पाठवा ॥४॥

३६१३. आपुल्या माहेरा जाईन मी आतां । निरोप या संतां हातीं आला ॥१॥ सुख दुःख माझें आइकिलें कानीं । कळवळा मनीं करुणेचा ॥२॥ करुनी सिद्ध मूळ साउलें भातुकें । येती दिसे एकें न्यावयासी ॥३॥ त्याचि पंथें माझें लागलेंसे चित्त । वाट पाहे नित्य माहेराची ॥४॥ तुका म्हणे आतां येतील न्यावया । अंगें आपुलिया मायबाप ॥५॥

३६१४. चिन्हें उमटती अंगीं । शकुनाजोगीं उत्तम ॥१॥ आठवला बापमाय । येईल काय मूळ नेणों ॥२॥ उत्कंठित झालें मन । हीच खूण तेथींचि ॥३॥ तुका म्हणे कामा वारीं । आळस घरीं करमेना ॥४॥

३६१५. आरोनियां पाहें वाट । कटकट सोसेना ॥१॥ आलियास पुसें मात । तेथें चित्त लागलें ॥२॥ दळीं कांडीं लोकांऐसें । परि मी नसे ते ठायीं ॥३॥ तुका म्हणे येथें पिसे । येथें तैसें असेल ॥४॥

३६१६. येथीलिया अनुभवें । कळों जीवें येतसे ॥१॥ दोहीं ठायीं एक जीव । माझी कींव त्या अंगीं ॥२॥ भुके भूकची खाऊनि धाय । नाहीं हाय अन्नाची ॥३॥ तुका म्हणे सुख झालें । अंतर धालें त्यागुणें ॥४॥

३६१७. पैल आले हरि । शंख चक्र शोभे करीं ॥१॥ गरुड येतो फडत्कारें । ना भी ना भी म्हणे त्वरें ॥२॥ मुगुटकुंडलांच्या दीप्ति । तेजें लोपला गभस्ति ॥३॥ मेघश्यामवर्ण हरि । मूर्ति डोळस साजिरी ॥४॥ चतुर्भुज वैजयंती । गळां माळ हे रूळती ॥५॥ पीतांबर झळके कैसा । उजळल्या दाही दिशा ॥६॥ तुका झालासे संतुष्ट । घरा आलें वैकुंठपीठ ॥७॥

३६१८. शंखचक्रगदापद्म । पैल आला पुरुषोत्तम ॥१॥ ना भी ना भी भक्तराया । वेगीं पावलों सखया ॥२॥ दुरूनि येतां दिसे दृष्टीं । धाकें दोष पळती सृष्टी ॥३॥ तुका देखोनि एकला । वैकुंठींहुनि हरि आला ॥४॥

३६१९. पैल दिसतील भार । दिंड्या पताका अपार ॥१॥ आला पंढरीचा राणा । दिसतील त्याच्या खुणा । सुख वाटे मना । डोळे बाह्या स्फुरती ॥२॥ उठिले गजर नामाचे । दळभार वैष्णवांचे ॥३॥ तुका करी रिता ठाव । त्यांसी बैसावया वाव ॥४॥

३६२०. चला जाऊं रे सामोरे । पुढें भेटों विठ्ठल धुरे ॥१॥ तुका आनंदला मनीं । कैसा जातो लोटांगणीं । फेडावया धणी । प्रेमसुखाची आजी ॥२॥ पुढें आले कृपावंत । मायबाप साधुसंत ॥३॥ तुका आळंगिला बाहीं । ठेविला विठोबाचे पायीं ॥४॥

३६२१. पाहुणे घरासी । आजी आले हृषीकेशी ॥१॥ काय करूं उपचार । कोंप मोडकी जर्जर ॥२॥ दरदरीत पाण्या- । माजी रांधियेल्या कण्या ॥३॥ घरीं मोडकिया बाजा । वरी वाकळांच्या शेजा ॥४॥ मुखशुद्धि तुळसीदळ । तुका म्हणे मी दुर्बळ ॥५॥

३६२२. संतीं केला अंगीकार । त्यांसी अभिमान थोर ॥१॥ कांहीं ठेविलें चरणीं । घेती तेंचि पुरवूनी । तुका पायवणी । घेउनियां निराळा ॥२॥ नसतां कांहीं संचित । भेटी झाली अवचित ॥३॥ देव मिळोनियां भक्त । तुका केलासे सनाथ ॥४॥

३६२३. अवघियांच्या आलों मूळ । एक वेळ न्यावया ॥१॥ सिद्ध व्हावें सिद्ध व्हावें । आधीं ठावें करितों ॥२॥ जोंवरी ते घटिका दुरी । आहे उरी तो काळ ॥३॥ मंगळाचे वेळे उभे । असा शोभे सावध ॥४॥ अवघियांचा योग घडे । तरी जोडे श्लाघ्यता ॥५॥ तुका म्हणे पाहें वाट । बहु आट करूनी ॥६॥

३६२४. सकळही माझी वोळवण करा । परतोनी घरा जावें तुम्हीं ॥१॥ कर्मधर्में तुम्हां असावें कल्याण । घ्या माझें वचन आशीर्वाद ॥२॥ वाढवूनि दिलें एकाचिये हातीं । सकळ निश्चिंती झाली तेथें ॥३॥ आतां मज जाणें प्राणेश्वरासवें । मी माझीया भावें अनुसरलों ॥४॥ वाढवितां लोभ होईल उसीर । अवघींच, स्थिर करा ठायीं ॥५॥ धर्म अर्थ काम झाला एके ठायीं । मेळविला जिहीं हाताहात ॥६॥ तुका म्हणे तुम्हां आम्हां हेचि भेटी । उरल्या त्या गोष्टी बोलावया ॥७॥

३६२५. बोलिलों तें आतां पाळावें वचन । ऐसें पुण्य कोण माझे गाठीं ॥१॥ जातों आतां आज्ञा घेऊनियां स्वामी । काळक्षेप आम्ही करूं कोठें ॥२॥ न घडे यावरी न धरवे धीर । पीडतां हें राष्ट्र देखोनी जग ॥३॥ हातीं धरोनियां देवें नेला तुका । जेथें नाहीं लोकां पराश्रम ॥४॥

३६२६. करावें तें काम । उगाच वाढवावा श्रम ॥१॥ अवघें एकमय । राज्य बोलों चालों नये ॥२॥ दुजियाची सत्ता नचलेसी झाली आतां ॥३॥ आतां नाहीं तुका । पुन्हा हरपला या लोका ॥४॥

३६२७. आम्हीं जातों तुम्ही कृपा असों द्यावी । सकळां सांगावी विनंती माझी ॥१॥ वाड वेळ झाला उभा पांडुरंग । वैकुंठा श्रीरंग बोलावितो ॥२॥ अंतकाळीं विठो आम्हांसी पावला । कुडीसहित झाला गुप्त तुका ॥३॥

३६२८. न देखिजे ऐसें केलें । या विठ्ठलें दुःखासी ॥१॥ कृपेचिये सिंहासनीं । अधिष्ठानीं बैसविलें ॥२॥ वाजतां तो नलगे वारा । क्षीरसागरा शयनीं ॥३॥ तुका म्हणे अवघे ठायीं । मज पायीं राखिलें ॥४॥

[ पाईक अभंग ]

३६२९. पाईकपणें जोतिला सिद्धांत । शूर धरी मात वचन चित्तीं ॥१॥ पाइकीवांचून नव्हे कधीं सुख । प्रजामध्यें दुःख न सरे पीडा ॥२॥ तरि व्हावें पाईक जिवाचे उदार । सकळ त्यांचा भार स्वामी वाहे ॥३॥ पाइकीचें सूख जया नाहीं ठावें । धिग त्यांनीं ज्यावें वांयांविण ॥४॥ तुका म्हणे एका क्षणाचा करार । पाईक अपार सुख भोगी ॥५॥

३६३०. पाईकीचें सुख पाइकासी ठावें । म्हणोनियां जीवें केली साटी ॥१॥ येतां गोळ्या बाण साहिले भडिमार । वर्षतां अपार वृष्टि वरी ॥२॥ स्वामीपुढें व्हावें पडतां भांडण । मग त्या मंडण शोभा दावी ॥३॥ पाईकांनीं सुख भोगिलें अपार । शूर आणि धीर अंतर्बाहीं ॥४॥ तुका म्हणे याही सिद्धांताच्या खुणा । जाणे तो शहाणा करी तो भोगी ॥५॥

३६३१. पाईक तो जाणे पाइकीचा भाव । लागबग ठाव चोरवाटा ॥१॥ आपणां राखोनी ठकावें आणीक । घ्यावें सकळीक हिरूनियां ॥२॥ येऊं नेदी लाग लागों नेदी माग । पाईका त्या जग स्वामी मानी ॥३॥ ऐसें जन केलें पाइकें पाईक । जया कोणी भीक न घालिती ॥४॥ तुका म्हणे ऐसें जयाचें पाईक । बळिया तो नाईक त्रैलोकींचा ॥५॥

३६३२. पाईकांनीं पंथ चालविल्या वाटा । पारख्याचा सांठा मोडोनियां ॥१॥ पारखिये ठायीं घेऊनियां खाण । आपलें तें जन राखियेलें ॥२॥ आधारेंविण जें बोलतां चावळे । आपलें तें कळे नव्हे ऐसें ॥३॥ सांडितां मारग मारिती पाईक । आणिकांसी शीक लागावया

॥४॥ तुका म्हणे विश्वा घेऊनी विश्वास । पाईक तयास सुख देती ॥५॥

३६३३. पाईक तो प्रजा राखोनियां कुळ । पारखिया मूळ छेदी दुष्टा ॥१॥ तो एक पाईक पाईका नाईक । भाव सकळीक स्वामिकाजीं ॥२॥ तृणवत तनु सोनें ज्या पाषाण । पाईका त्या भिन्न नाहीं स्वामी ॥३॥ विश्वासावांचूनी पाईकासी मोल । नाहीं मिथ्या बोल बोललिया ॥४॥ तुका म्हणे नये स्वामी उणेपण । पाईक जतन करी त्यासी ॥५॥

३६३४. धनी ज्या पाईका मानितो आपण । तया भितें जन सकळिक ॥१॥ जिवाचे उदार शोभती पाइक । मिरविती नाईक मुगुटमणी ॥२॥ आपुलिया सत्ता स्वामीचे वैभव । भोगिती गौरव सकळसुख ॥३॥ कमाईचीं हीणें पडिलीं उदंड । नाहीं तया खंड येती जाती ॥४॥ तुका म्हणे तरी पाईकीच भली । थोडीबहु केली स्वामिसेवा ॥५॥

३६३५. पाईकपणें खरा मुशारा । पाईक तो खरा पाईकीनें ॥१॥ पाईक तो जाणे मारितें अंग । पाईकासी भंग नाहीं तया ॥२॥ एके दोहीं घरीं घेतलीं खाणें । पाईक तो पणें निवडला ॥३॥ करूनी कारण स्वामी यश द्यावें । पाईका त्या नांवें खरेपण ॥४॥ तुका म्हणे ठाव पाईका निराळा । नाहीं स्वामिस्थळ गेल्याविण ॥५॥

३६३६. उंच नीच कैसी पाईकाची ओळी । कोण गांड्या बळी निवडिला ॥१॥ स्वामिकाजीं एक सर्वस्वें तत्पर । एक ते कुचर आशाबद्ध ॥२॥ प्रसंगावांचूनी आणिती आविर्भाव । पाईक तो नांव मिरवी वांयां ॥३॥ गणतीचे एक उंच नीच फार । तयांमध्यें शूर विरळा थोडा ॥४॥ तुका म्हणे स्वामी जाणे त्यांचा मान । पाईक पाहोन मोल करी ॥५॥

३६३७. एकाच स्वामीचे पाईक सकळ । जैसें तैसें बळ मोल तया ॥१॥ स्वामिपदीं एका ठाव उंच स्थळीं । एक तीं निराळी जवळी दुरी ॥२॥ हीन कमाईचा हीन आन ठाव । उंचा सर्व भाव उंच पद ॥३॥ पाईकपणें तो सर्वत्र सरता । चांग तरी परता गांड्या वाव ॥४॥ तुका म्हणे मरण आहे या सकळां । भेणें अवकळा अभयें मोल ॥५॥

३६३८. प्रजी तो पाईक ओळीचा नाईक । पोटासाठीं एक जैसे तैसे ॥१॥ आगळें पाऊल आणिकासी तारी । पळतीं माघारीं तोडिजेती ॥२॥ पाठीवरी घाय म्हणती फटमर । निधडा अंगें शूर मान पावे ॥३॥ घेईल दरवडा देहा तो पाईक । मारी सकळिक सर्व हरी ॥४॥ तुका म्हणे नव्हे बोलाचे कारण । कमाईचा पण सिद्धी पावे ॥५॥

३६३९. जातीचा पाईक ओळखे पाईका । आदर तो एका त्याचे ठायीं ॥१॥ धरितील पोटासाठीं हतियारें । कळती तीं खरें वेठीचींसीं ॥२॥ जातीचें तें असे खरें घायडाय । पारखिया काय पाशीं लोपे ॥३॥ तुका म्हणे नमूं देव म्हूण जना । झालियांच्या खुणा जाणतसों ॥४॥

[ सीताशोक ]

३६४०. रामा वनवास। तेणें वसे सर्व देश ॥१॥ केलें नामाचें जतन। समर्थ तो नव्हे भिन्न ॥२॥ वनांतरीं रडे। ऐसे पुराणीं पवाडे ॥३॥ तुका म्हणे ऋषिनेम। ऐसा कळोनी कां भ्रम ॥४॥

३६४१. राम म्हणे वाट चाली। यज्ञ पाउलापाउलीं ॥१॥ धन्य धन्य तें शरीर। तीर्थव्रतांचें माहेर ॥२॥ राम म्हणे करितां धंदा। सुखसमाधी त्या सदा ॥३॥ राम म्हणे ग्रासोग्रासीं। तोचि जेविला उपवासी ॥४॥ राम म्हणे भोगीं त्यागीं। कर्म न लिंपे त्या अंगीं ॥५॥ ऐसा राम जपे नित्य। तुका म्हणे तो जीवन्मुक्त ॥६॥

३६४२. तारी ऐसे जड। उदकावरी जो दगड ॥१॥ तो हा न करी तें काई। कां रे लीन व्हाना पायीं ॥२॥ शिळा मनुष्य झाली। ज्याच्या चरणाचे चाली ॥३॥ वानरां हातीं लंका। घेवविली म्हणे तुका ॥४॥

३६४३. राम म्हणतां रामचि होइजे। पदीं बैसोन पदवी घेईजे ॥१॥ ऐसें सुख वचनीं आहे। विश्वासें अनुभव पाहें ॥२॥ रामरसाचिया चवी। आन रस न रुचती केवीं ॥३॥ तुका म्हणे चाखोनी सांगें। मज अनुभव आहे अंगें ॥४॥

३६४४. रामराम उत्तम अक्षरें। कंठीं धरिलीं आपण शंकरें ॥१॥ कैसीं तारक उत्तम तिहीं लोकां। हळाहळ सीतळ केलें शिवा देखा ॥२॥ हाचि मंत्र उपदेश भवानी। तिच्या चुकल्या गर्भांधयोनि ॥३॥ जुनाट नागर नीच नवें। तुका म्हणे म्यां धरिलें जीवें भावें ॥४॥

३६४५. राम म्हणतां तरे जाणता नेणता। हो का यातिभलता कुळहीन ॥१॥ राम म्हणतां न लगे आणीक सायास। केले महा दोष तेही जळती ॥२॥ राम म्हणे तया नये जवळी भूत। कैंचा यमदूत म्हणतां राम ॥३॥ राम म्हणतां तरे भवसिंधुपार। चुके येरझार म्हणतां राम ॥४॥ तुका म्हणे हेंचि सुखाचे साधन। सेवीं अमृतपान एका भावें ॥५॥

३६४६. पैल आला राम रावणासी सांगती। काय निदसुरा निजलासी भूपति ॥१॥ अवघे लंकेमाजी झाले रामाचे दूत। व्यापिलें सर्वत्र बाहेरी भीतरी आंत ॥२॥ अवघे अंगलग तुझे वधियेले वीर। होई शरणागत किंवा युद्धासी सादर ॥३॥ तुका म्हणे एक्या भावें रामासी भेटी। करूनी घेई आतां या संबंधेंशीं तुटी ॥४॥

३६४७. समरंगणा आला। रामें रावण देखिला ॥१॥ कैसे भिडतील दोन्हीं। नांव सारूनियां रणीं ॥२॥ प्रेमसुखाचें संधान। बाणें निवारिती बाण ॥३॥ तुकयास्वामी रघुनाथ। वर्म जाणोनि केली मात ॥४॥

३६४८. केला रावणाचा वध। अवघा तोडिला संबंध ॥१॥ लंकाराज्य बिभीषणा। केली चिरकाळ स्थापना ॥२॥ औदार्याची सीमा। काय वर्णूं रघुरामा ॥३॥ तुका म्हणे

माझा दाता । रामें सोडविली सीता ॥४॥

३६४९. रामरूप केली । रामें कौसल्या माउली ॥१॥ राम राहिला मानसीं । ध्यानीं चिंतनीं जयासी । राम होय त्यासी । संदेह नाहीं भरंवसा ॥२॥ अयोध्येचे लोक । राम झाले सकळिक ॥३॥ स्मरतां जानकी । रामरूप झाले कपि ॥४॥ रावणेंशीं लंका । राम आपण झाला देखा ॥५॥ ऐसा नित्य राम ध्याय । तुका वंदी त्याचे पाय ॥६॥

३६५०. आनंद झाला अयोध्येसी आला रघुनाथ । अवघा जयजयकार आळंगिला भरत ॥१॥ आनंदले लोक नरनारी परिवार । शंखभेरीतुरें वाद्याचे गजर ॥२॥ करिती अक्षयवाणें ओंवाळिती रघुवीरा । लक्ष्मीसहित लक्ष्मण दुसरा ॥३॥ झालें रामराज्य आनंदलीं सकळें । तुका म्हणे गाईवत्सें नरनारी बाळें ॥४॥

३६५१. झालें रामराज्य काय उणें आम्हांसी । धरणी धरी पीक गाई वोळल्या म्हैसी ॥१॥ राम वेळोवेळां आम्ही गाऊं ओवियें । दळितां कांडितां जेवितां गे बाइये ॥२॥ स्वप्नींही दुःख कोणी न देखे डोळां । नामाच्या गजरें भय सुटलें कळिकाळा ॥३॥ तुका म्हणे रामें सुख दिलें आपलें । तयां गर्भवासीं येणें जाणें खुंटलें ॥४॥

३६५२. अहल्या जेणें तारिली रामें । गणिका परलोका नेली नामें ॥१॥ रामहरे रघुराजहरे । रामहरे महाराजहरे ॥२॥ कंठ शीतळ जपतां शूळपाणी । राम जपे अविनाश भवानी ॥३॥ तारक मंत्र श्रवण काशी । नाम जपतां वाल्मिक ऋषि ॥४॥ नामजप बीजमंत्र नळा । सिंधु तरती ज्याच्या प्रतापें शिळा ॥५॥ नामजप जीवन मुनिजना । तुकयास्वामी रघुनंदना ॥६॥

३६५३. मी तो अल्प मतिहीन । काय वर्णुं तुझे गुण । उदकीं तारिले पाषाण । हें महिमान नामाचें ॥१॥ नाम चांगलें चांगलें । माझे कंठीं राहो भलें । कपिकुळ उद्धरिलें । मुक्त केलें राक्षसां ॥२॥ द्रोणागिरि कपिहातीं । आणविला सीतापती । थोर केली ख्याती । भरतभेटीसमयीं ॥३॥ शिळा होती मनुष्य झाली । थोर कीर्ति वाखाणिली । लंका दहन केली । हनुमंते काशानें ॥४॥ राम जानकीजीवन । योगियांचें निजध्यान । राम राजीवलोचन । तुका चरण वंदितो ॥५॥

[ घोंगडीचे अभंग ]

३५५४. ठकिलें काळा मारिली दडी । दिली कुडी टाकोनि ॥१॥ पांघरलों बहु काळें । घोंगडें बळें सांडवलें ॥२॥ नये ऐसा लाग वरी । परतें दुरी लपालें ॥३॥ तुका म्हणे आड सेवा । लाविला हेवा धांदली ॥४॥

३६५५. घोंगडियांचा पालट केला । मुलांमुलां आपुल्यांत ॥१॥ कान्होबा तो मीच दिसें । लाविलें पिसें संवगडियां ॥२॥ तो बोले मी उगाच बैसें । अनारिसें न दिसे ॥३॥ तुका म्हणे दिलें सोंग । नेदी व्यंग जाऊं देऊं ॥४॥

३६५६. खेळों लागलों सुरकवडी। माझी घोंगडी हारपली ॥१॥ कान्होबाचे पडिलों गळां। घेईं गोपाळा देईं झाडा ॥२॥ मी तों हागे उघडा जालों। अवघ्या आलों बाहेरी ॥३॥ तुका म्हणे बुद्धि काची। नाहीं ठायींची मजपाशीं ॥४॥

३६५७. घोंगडियांची एकी राशी। त्याजपाशीं तेंही होतें ॥१॥ माझियाचा माग दावा। केला गोवा उगवूं द्या ॥२॥ व्हावें ऐसें निसंतान। घेईन आण तुजपाशीं ॥३॥ तुका म्हणे लहान मोठा। सांडा ताठा हा देवा ॥४॥

३६५८. नाहीं तुझे उगां पडत गळां। पुढें गोपाळा जाऊं नको ॥१॥ चाहाड तुझे दाविन घरीं। बोलण्या उरी नाहीं ऐसी ॥२॥ तुम्हां आम्हां पडदा होता। सरला आतां सरोवरी ॥३॥ तुका म्हणे उरती गोठी। पडिली मिठी न सुटे ॥४॥

३६५९. तुम्हां आम्हां उरी तोंवरी। जनाचारी आहे तैसी ॥१॥ माझें घोंगडें टाकुन देईं। एके ठायीं मग असों ॥२॥ विरोधानें पडे तुटी। कपट पोटीं नसावें ॥३॥ तुका म्हणे तूं जाणता हरी। मज वेव्हारीं बोलविसी ॥४॥

३६६०. मुळींचा तुम्हां लागला चाळा। तो गोपाळा न संडा ॥१॥ घ्यावें त्याचें देणेंचि नाहीं। येचि वाहीं देखतसों ॥२॥ माझी तरी घोंगडी मोठी। गांडीची लंगोटी सोडिशी ना ॥३॥ तुका म्हणे म्यां सांडिली आशा। हुंगिला फांसा येथुनियां ॥४॥

३६६१. घोंगडियास घातली मिठी। न सोडी साटी केली जीवें ॥१॥ हा गे चोर धरा धांवा कोणी। घरांत राहाटे चहूं कोनी ॥२॥ नोळखवे म्यां धरिला हातीं। देहा दीप माया लाविली वाती ॥३॥ न पवे धांवणें मारितो हाका। जनाचारीं तुका नागवला ॥४॥

३६६२. आतां मी देवा पांघरों काई। भिकेचें तेंही उरेचि ना ॥१॥ सदैव दुबळें नेणें चोर। देखोनि सुनाट फोडितो घर ॥२॥ नाहीं मजपाशीं पुटकी कवडी। पांचांनीं घोंगडी दिली होती ॥३॥ तुका म्हणे जना वेगळें जालें। एकचि नेलें एकल्याचें ॥४॥

३६६३. मी माझें करीत होतों जतन। भीतरल्या चोरें घेतलें खान ॥१॥ मज आल्याविण आधींच तो होता। मज न कळतां मजमाजी ॥२॥ घोंगडें नेलें घोंगडें नेलें। उघडें केलें उघडेंचि ॥३॥ तुका म्हणे चोरटाचि झाला साव। सहज न्याय नाहीं तेथें ॥४॥

३६६४. घोंगडें नेलें सांगो मी कोणा। दुबळें माझें नाणीती मना ॥१॥ पुढें तें मज न मिळे आतां। जवळी सत्ता दाम नाहीं ॥२॥ शेटे महाजन ऐका कोणी। घोंगडियाची करा शोधणी ॥३॥ घोंगडियाचा करा बोभाट। तुका म्हणे जंव भरला हाट ॥४॥

३६६५. माझें घोंगडें पडिलें ठायीं। माग तया पायीं सांपडला ॥१॥ चोर तो भला चोर तो भला। पाठिसी घातला पुंडलिकें ॥२॥ चोर कुठोरी एकेचि ठायीं। वेगळें पाहावें

**न लगे कांहीं ॥३॥ आणिकांचीं चोरलीं आधीं । माझें तयामधीं मेळविलें ॥४॥ आपल्या आपण शोधिलें तिहीं । करीन मींहि तेचि परी ॥५॥ तुका म्हणे माझें हितचि झालें । फाटकें जाऊन धडकें आलें ॥६॥**

[ कलियुगातील लोकांचें वर्तन. ]

३६६६. **पाहा हो कलिचें महिमान । असत्यासी रिझलें जन । पापा देती अनुमोदन । करिती हेळण संतांचें ॥१॥ ऐसें अधर्माचें बळ । लोक झकविले सकळ । केलें धर्माचें निर्मूळ । प्रळयकाळ आरंभला ॥२॥ थोर या युगाचें आश्चर्य । ब्रह्मकर्म उत्तम सार । सांडुनियां द्विजवर । दावलपीर स्मरताती ॥३॥ ऐसे यथार्थाचे अनर्थ । जाला बुडाला परमार्थ । नाहीं ऐसी झाली नीत । हाहा भूत पातलें ॥४॥ शांति क्षमा दया । भावभक्ति सत्क्रिया । ठाव नाहीं सांगावया । सत्त्वधैर्य भंगलें ॥५॥ राहिले वर्णावर्णधर्म । अन्योन्य विचरती कर्म । म्हणवितां रामराम । महा श्रम मानिती ॥६॥ येर भोरप्याचेविशीं । धांवती भूतें आमिषां तैसीं । कथा पुराण म्हणता सिसी । तिडिक उठे नकरियाची ॥७॥ विषयलोभासाठीं । सर्वार्थेंसीं प्राण साटी । परमार्थी पीठ मुठीं । मागतां उठती सुनींसीं ॥८॥ धनाढ्य देखोनि अनामिक । तयातें मानिती आवश्यक । अपमानिले वेदपाठक । शास्त्रज्ञ सात्विक संपन्न ॥९॥ पुत्र ते पितियापाशीं । सेवा घेती सेवका ऐसी । सुनांचिया दासी । सासा झाल्या आंदण्या ॥१०॥ खोटें झालें आली विवसी । केली मर्यादा नाहींसी । भार्या ते भ्रतारासी । रंक तैसी मानिती ॥११॥ नमस्कारावया हरिदासां । लाजती धरिती कांहीं गर्वसा । पोटासाठीं खौसा । वंदिती म्लेच्छाच्या ॥१२॥ बहुत पाप झालें उचंबळ । उत्तम न म्हणती चांडाळ । अभक्ष भक्षिती विटाळ । कोणी न धरिती कोणाचा ॥१३॥ कैसें झालें नष्ट वर्तमान । एकादशीस खाती अन्न । विडे घेऊनि ब्राह्मण । अविंधवाणी वदताती ॥१४॥ कामिनी विटंबिल्या कुळवंती । वदनें दासींचीं चुंबिती । सोंवळ्याच्या स्फीती । जगीं मिरविती पवित्रता ॥१५॥ मद्यपानाची शिराणी । नवनीता न पुसे कोणी । केळवल्या व्यभिचारिणी । दैन्यवाणी पतिव्रता ॥१६॥ केवढी दोषाची सबळता । झाली पाहा हो भगवंता । पुण्य धुडावोनी संता । तीर्थां हरी आणिली ॥१७॥ भेणें मंद झाली मेघवृष्टि । आकांतली कांपे सृष्टी । देव रिघाले कपाटीं । आटाआटी प्रवर्तली ॥१८॥ अपीकें धान्य दिवसेंदिवसें । गाई म्हैसी चेवल्या रसें । नगरें दिसती उदासें । पिकलें बहुवसें पाखांडें ॥१९॥ होम हरपलीं हवनें । यज्ञयाग अनुष्ठानें । जपतपादि साधनें । आचरणें भ्रष्टलीं ॥२०॥ अठरा यातींचा व्यापार । करिती तस्कराई विप्र । सांडोनियां शुद्ध शुभ्र । वस्त्रें निळीं पांघरती ॥२१॥ गीता लोपली गायत्री । भरले चमत्कार मंत्रीं । अश्वाचियेपरी विकिती । कुमारी वेदवक्ते ॥२२॥ वेदाध्ययनसंहितारुचि । भकांद्या करिती तयांची । आवडी पंडितांची । मुसाफावरी बैसली ॥२३॥ मुख्य सर्वोत्तम साधनें । तीं उच्छेदुनि केलीं दीनें । कुडीं कपटी महा मोहनें । शठ दुर्जनें मिरविताती ॥२४॥ कळाकुशलता चतुराई ।**

तर्कवादी भेदनिंदेठायीं । विधिनिषेधाच्या वाही । एकही ऐसी नाडलीं ॥२५॥ जे संन्यासी तापसी ब्रह्मचारी । होती वैरागी दिगांबरी । निस्पृही कामक्रोधें व्यापिलें भारी । इच्छेकरीं न सुटती ॥२६॥ कैसें विनाशकाळाचें कौतुक । राजे झाले प्रजांचे अंतक । पिते पुत्र सहोदर एकाएक । शत्रुघातें वर्तताती ॥२७॥ केवढी ये रांडेची अंगवण । भ्रमविलें अवघें जन । याती अठरा चाऱ्ही वर्ण । कर्दम करूनि विटाळविले ॥२८॥ पूर्वी होतें भविष्य केलें । संतीं तें यथार्थ झालें । ऐकत होतों तें देखिलें । प्रत्यक्ष लोचनीं ॥२९॥ आतां असो हें आघवें । गति नव्हे कळीमध्यें । करुणा भाका वेगें । देवासी स्मरावें अंतरीं ॥३०॥ अगा ये वैकुंठनायका । काय पाहातोसि या कौतुका । धांव कलीने गांजिलें लोकां । देतो हाका सेवक तुकयाचा ॥३१॥

[ गति आणि अधोगतीचे उपाय ]

३६६७. ऐका संतजन उत्तर माझे बोबडे बोल । करीं लाड तुम्हांपुढें हो कोणी झणी कोपाल ॥१॥ उपाय साधन आइका कोण गति अवगति । दृढ बैसोनि सादर तुम्हीं धरावें चित्तीं ॥२॥ धर्म तयासीच घडे रे ज्याचे स्वाधीन भाज । कर्म तयासी जोडे रे भीत नाहीं लाज ॥३॥ पुण्य तें जाणा रे भाइनों परोपकाराचें । परपीडा परनिंदा रे खरें पाप तयाचें ॥४॥ लाभ तयासीच झाला रे मुखीं देव उच्चारी । प्रपंचा पाठी गुंतला रे हानी तयासी थोरी ॥५॥ सुख तें जाणा रे भाईनो संतसमागम । दुःख तें जाणा रे भाइनों सम तेथें विषम ॥६॥ साधन तयासि साधे रे ज्याची स्वाधीन बुद्धि । पराधीना आहे घात रे थोर जाण संबंधी ॥७॥ मान पावे तो आगळा मुख्य इंद्रियें राखे । अपमानी तो अधररसस्वाद चाखे ॥८॥ जाणता तयासी बोलती जाणे सारलक्षण । नेणता तया बोलिजे वाद करी भूषण ॥९॥ भला तोचि एक जाणा रे गयावर्जन करी । बुरा नष्ट धन मेळवी परद्वार जो करी ॥१०॥ आचारी अन्न काढी रे गाई अतितविभाग । अनाचारी करी भोजन ग्वाही नसतां संग ॥११॥ स्वहित तेणेंचि केलें रें भूतीं देखिला देव । अनहित तयाचें झालें रे आणी अहंभाव ॥१२॥ धन्य तेचि जन्मा आले रे एक हरीचे दास । धिग ते विषयी गुंतले केला आयुष्याचा नाश ॥१३॥ जोहरी तोचि एक जाणा रे जाणे सिद्धलक्षणें । वेडसरु तो भुले रे वरदळभूषणें ॥१४॥ बळियाढा तोचि जाणा रे भक्ति दृढ शरीरीं । गांढ्या तयासी बोलिजे एक भाव न धरी ॥१५॥ खोल तो वचन गुरुचें जो गिळूनी बैसे । उथळ धीर नाहीं अंगीं रे म्हणे होईल कैसें ॥१६॥ उदार तोचि जीवभाव रे ठेवी देवाचे पायीं । कृपण तयासी बोलिजे पडे उपाधिठायीं ॥१७॥ चांगलें पण तेंचि रे ज्याचें अंतर शुद्ध । ओंगळ मळीन अंतरीं वाणी वाहे दुर्गंध ॥१८॥ गोड तेंचि एक आहे रे सार विठ्ठल नाम । कडु तो संसार रे लक्षचौऱ्यांशीं जन्म ॥१९॥ तुका म्हणे मना धरीं रे संतसंगतिसोई । नलगे कांहीं करावें राहे विठ्ठल पायीं ॥२०॥

[ एकाखडी ]

३६६८. करावा कैवाड । नाहीं तरी आला नाड ॥१॥ स्मरा पंढरीचा देव । मनीं धरोनियां भाव

॥२॥ खचविलें काळें। उगवा लवलाहें जाळें ॥३॥ गजर नामाचा। करा लवलाहें वाचा ॥४॥ घरटी चक्रफेरा। जन्ममृत्यूचा भोंवरा ॥५॥ नानाहव्यासांची जोडी। तृष्णा करी देशधडी ॥६॥ चरणीं ठेवा चित्त। म्हणवा देवाचें अंकित ॥७॥ छंदें नानापरी। कळा न पविजे हरी ॥८॥ जगाचा जनिता। भुक्तिमुक्तींचाही दाता ॥९॥ झणी माझें माझें। भार वागविसी ओझें ॥१०॥ यांची कां रे गेली बुद्धि। नाहीं तरायाची शुद्धि ॥११॥ टणक धाकुलीं। अवघीं सरती विठ्ठलीं ॥१२॥ ठसा त्रिभुवनीं। उदार हा शिरोमणि ॥१३॥ डगमगी तो वांयां जाय। धीर नाहीं गोता खाय ॥१४॥ ढळों नये जरी। लाभ घरींचिया घरीं ॥१५॥ नाहीं ऐसें राहे। कांहीं नासिवंत देहे ॥१६॥ तरणा भाग्यवंत। नटे हरिकीर्तनांत ॥१७॥ थडी टाकी पैलतीर। बाहे ठोके होय वीर ॥१८॥ दया तिचें नांवें। अहंकार जाय जिवें ॥१९॥ धनधान्य हेवा। नाड कुटुंबाची सेवा ॥२०॥ नाम गोविंदाचें। घ्या रे हेंचि भाग्य साचें ॥२१॥ परउपकारा। वेंचा शक्ति निंदा वारा ॥२२॥ फळ भोग इच्छा। देव आहे जैसा तैसा ॥२३॥ बरवा ऐसा छंद। वाचे गोविंद गोविंद ॥२४॥ भविष्याचे माथां। भजन नेदावें सर्वथा ॥२५॥ माग लागला न संडीं। आळस माती घालीं तोंडीं ॥२६॥ यश कीर्ति मान। तरी जोडे नारायण ॥२७॥ रवि लोपे तेजें। जरी हारपे हें दुजें ॥२८॥ लकार लाविला। असतांनसतांचि उगला ॥२९॥ वासनेची धाडी। बंद खोड्या नाड्या बेडी ॥३०॥ सार तें न कळे। काय झांकियेले डोळे ॥३१॥ खंती ते न धरा। होणें गाढव कुतरा ॥३२॥ सायासाची जोडी। पिकें काढिलिया पडी ॥३३॥ हातीं हित आहे। परि न करिसी पाहें ॥३४॥ अलंकार लेणें। तुळसीमुद्रांचीं भूषणें ॥३५॥ ख्याति केली विष्णुदासीं। तुका म्हणे पाहा कैसी ॥३६॥

[ काला ]

३३६९. झेला रे झेला वरचेवरी झेला। हातिचें गमावी तो पाठीसी खाय टोला ॥१॥ त्रिगुणांचा चेंडू हातें झुगारी निराळा। वरिलिया मुखें मन लावी तेथें डोळा ॥२॥ आगळा होऊनि धरी वरिचिया वरी। चपळ तो जिंके गांढ्या ठके येरझारीं ॥३॥ हातीं सांपडलें उभें बैसों नेदी कोणी। सोरीमागें सोरी घेती ओणवें करूनी ॥४॥ डाईं पडिलिया सोसी दुःखाचे डोंगर। पाठीवरीं भार उभा भोंवताही फेर ॥५॥ तुका म्हणे सुख पाहे तयाचें आगळें। जिंकी तो हरीसी कोणी एका तरी काळें ॥६॥

३६७०. अझुनि कां थीर पोरा न म्हणसी कीर। धरूनियां धीर लाजे बुर निघाला ॥१॥ मोकळा होतासी कां रे पडिलासी डाईं। वरिलांचा भार आतां उतरेसा नाहीं ॥२॥ मेळवूनी मेळा एकाएकीं दिली मिठी। कवळिल एक बहु बैसविलीं पाठीं ॥३॥ तळील तें वरी वरील तें येतें तळा। न सुटें तोंवरी येथें गुंतलिया खेळा ॥४॥ सांडितां ठाव पुढें सईल धरी हात। चढेल तो पडेल ऐसी ऐका रे मात ॥५॥ तुका म्हणे किती आवरावे हात पाय। न खेळावें तोंच बरें वरी न ये डाय ॥६॥

३६७१. पुसतसे सांगा मी हें माझें ऐसें काई । रुसूं नका नुगवे तो झवे आपुली आई ॥१॥ कोडें रे कोडें ऐका हें कोडें । उगवूनी फार राहे गुंफोनियां थोडें ॥२॥ सांगतों हें मूळ कांहीं न धरावी खंती । ज्यालें जीवो मेलें मरों प्रारब्धा हातीं ॥३॥ तुका म्हणे अभिमान सांडावा सकळीं । नये अंगावरी वांयां येऊं देऊं कळी ॥४॥

३६७२. नुगवे तें उगवून सांगितलें भाई । घालूनियां ताळा आतां शुद्ध राखा घाई ॥१॥ आतां कांहीं नाहीं राहिलें । म्यां आपणा आपण पाहिलें ॥२॥ कमाईस मोल येथें नका रीस मानूं । निवडूं नये मज कोणा येथें वानूं ॥३॥ तुका म्हणे पदोपदीं कान्हो वनमाळी । जयेजत मग सेवटिला एक वेळीं ॥४॥

३६७३. हा रस आनंदाचा । घोष करा हरिनामाचा । कोण हा दैवाचा । भाग पावे येथील ॥१॥ पुण्य पाहिजे बहुत । जन्मांतरींचें संचित । होईल करीत । आला अधिकारी तो ॥२॥ काय पाहातां हे भाई । हरुषें नाचा धरा घाई । पोटभरी कांहीं । घेतां उरी न ठेवा ॥३॥ जें सुख दृष्टि आहे । तेंच अंतरीं जो लाहे । तुका म्हणे काय । कळिकाळ तें बापुडें ॥४॥

३६७४. अवघे गोपाळ म्हणती या रे करूं काला । काय कोणाची सिदोरी ते पाहों द्या मला । नका कांहीं मागें पुढें ठेवूं रे तुम्ही खरेंच बोला । वंची वंचला तोचि रे येथें भोवंडा त्याला ॥१॥ घेतल्यावांचून झाडा रे नेदी आपुलें कांहीं । एकां एक ग्वाही बहुत देती मोकळे नाहीं । ताक सांडी येकरे येक रे काला भात भाकरी दहीं । आलें घेतो मध्यें बैसला नाहीं आणवीत तें ही ॥२॥ एका नाहीं धीर तांतडी दिल्या सोडोनी मोटा । एक सोडितील गांठीं रे एक चालती वाटा । एक उभा भार वाहोनि पाहे उगाचि खोटा । एक ते करूनि आराले आतां ऐसेंचि घाटा ॥३॥ एकीं स्थिरावल्या गाई रे एक वळत्या देती । एकांच्या फांकल्या वोढाळा फेरे भोवतीं घेती । एक चाराबोरा गुंतले नाहीं जीवन चित्तीं । एक एका चला म्हणती एक हुंबरी घेती ॥४॥ एकीं एकें वाटा लाविलीं भोळीं नेणतीं मुलें । आपण घरींच गुंतले माळा नासिलीं फुलें । गांठींचें तें सोडूं नावडे खाय आइतें दिलें । सांपडलें वेठी वोढी रे भार वाहतां मेलें ॥५॥ एक ते माया गुंतले घरीं बहुत कामें । वार्ता ही नाहीं तयाची तया कांहींच ठावें । जैसें होतें शिळें संचित तैसें लागलें खावें । हातोहातीं गेलें वेचुनी मग पडिलें ठावें ॥६॥ एका हातीं पायीं पट्टे रे अंगी लाविल्या राखा । एक ते सोलिव बोडके सपाट केल्या शिखा । एक ते अळसी तळीं रे वरी वाढिल्या काखा । सीदोरी वांचून बुद्धि रे केल्या अवघ्यां वाखा ॥७॥ तुका म्हणे आतां कान्होबा आम्हां वांटोनी द्यावें । आहे नाहीं आम्हांपाशीं तें तुज अवघेंचि ठावें । मोकलितां तुम्हीं शरण आम्हीं कवणासी जावें । कृपावंतें कृपा केली रे पोट भरे तों खावें ॥८॥

३६७५. बैसवूनी फेरी । गढिया मध्यभागीं हरी । अवघियांचें करी । समाधान सारिखें ॥१॥

पाहे तो देखे समोर। भोगी अवघे प्रकार। हरुषें झेली कर। कवळ मुखीं देती ते ॥२॥ बोले बोलतिया सर्वे। देतील तें त्यांचें घ्यावें। एक एका ठावें। येर येरा अदृश्य ॥३॥ तुका म्हणे देवा। बहु आवडीचा हेवा। कोणाचिया जीवा। वाटों नेदी विषम ॥४॥

३६७६. आम्हां निकट वासें। कळों आलें जैसें तैसें। नाहीं अनारिसें। कान्होबाचे अंतरीं ॥१॥ पीडती आपुल्याला भावना। जैसी जयाची वासना। कर्माचा देखणा। पाहे लीळा कौतुक ॥२॥ खेळ खेळे न पडे ठाईं। ज्याचा भार त्याच्या ठायीं। कोणी पडतील डाईं। कोणी कोडीं उगविती ॥३॥ तुका म्हणे कवळ। हातीं घेउनी गोपाळ। देतों ज्याचें बळ। त्यासी तैसा विभाग ॥४॥

३६७७. काम सारूनी सकळ। आले अवघे गोपाळ। झाली आतां वेळ। म्हणती आणा सिदोऱ्या ॥१॥ देती आपुलाला झाडा। गाई बैसविल्या वाडां। दोंदिल बोबडा। वांकड्याचा हरि मेळीं ॥२॥ आपुलाली ये आवडी। मुदा बांधल्या परवडी। निवडूनि गोडी। हरी मेळवी त्यांत तें ॥३॥ भार वागविला खांदीं। नव्हती मिळाली तों मांदीं। सकळांचे संधी। ओझीं अवघीं उतरलीं ॥४॥ मागे जो तांतडी। त्यासी रागा येती गडी। तुझी कां रे कुडी। येथें मिथ्या भावना ॥५॥ एक एकाच्या संवादें। कैसे धाले ब्रह्मानंदें। तुका म्हणे पदें। या रे वंदूं हरीचीं ॥६॥

३६७८. यमुने पाबळीं। गडियां बोले वनमाळी। आणा सिदोऱ्या सकळी। काला करूं आजी ॥१॥ अवघें एके ठायीं। करूनी स्वाद त्याचा पाहीं। मजपाशीं आहे तेंही। तुम्हांमाजी देतों ॥२॥ म्हणती बरवें गोपाळ। म्हणती बरवें गोपाळ। वाहाती सकळ। मोहरी पांवे आनंद ॥३॥ खडकीं सोडियेल्या मोटा। अवघा केला एकवटा। काला करूनियां वांटा। गडियां देतो हरि ॥४॥ एकापुढें एक। घाली हात पसरी मुख। गोळा पांवे तया सुख। अधिकचि वाटे ॥५॥ म्हणती गोड झालें। म्हणती गोड झालें। आणिक देईं धालें। नाहीं पोट आमुचें ॥६॥ हात नेतो मुखापासीं। येर आशा तोंड वासी। खाय आपण तयासी। दावी वांकुलिया ॥७॥ देऊनियां मिठी। पळे लागतील पाठीं। धरूनी काढितील ओठीं। मुखामाजी खाती ॥८॥ म्हणती ठकडा रे कान्हा। लावी घांस भरी राना। दुम करी तो शहाणा। पाठोवाठीं तयाच्या ॥९॥ अवघियांचे खाय। कवळ कृष्ण माझी माय। सुरवर म्हणती हाय हाय। सुखा अंतरलों ॥१०॥ एक एका मारी। ढुंगा पाठी तोंडावरी। गोळा न सहावे हरी। म्हणे पुरें आतां ॥११॥ येतो काकुलती। गोळा न सहावे श्रीपती। म्हणे खेळों आतां नीती। सांगों आदरिलें ॥१२॥ आनंदाचे फेरी। माजी घालूनियां हरी। एक घालिती हुंबरी। वाती सिंगें पांवें ॥१३॥ वांकडे बोबडे। खुडे मुडे एक लुडे। कृष्णा आवडलीं पुढें। बहु भाविक तीं ॥१४॥ करी कवतुक। त्यांचें देखोनियां मुख। हरीसी वाटतें सुख। खदखदां हांसे ॥१५॥ एक एकाचें उच्छिष्ट। खातां न मानिती वीट। केली लाजतांही

धीट । आपुलिया संगें ॥१६॥ नाहीं गेली ज्याची भूक । त्याचें पसरवितो मुख । अवघियां देतो सुख । सारिखें हरि ॥१७॥ म्हणती भला भला हरी । तुझी संगती रे बरी । आतां चाळविसी तरी । न वजों आणिकां सवें ॥१८॥ गाई विसरल्या चार । पक्षी श्वापदांचे भार । झालें यमुनेचें स्थिर । जळ वाहों ठेलें ॥१९॥ देव पाहाती सकळ । मुखें घोटूनियां लाळ । धन्य म्हणती गोपाळ । धिग झालों आम्ही ॥२०॥ म्हणती कैसें करावें । म्हणती कैसें करावें । यमुनाजळीं व्हावें । मत्स्य शेष घ्यावया ॥२१॥ सुरवरांचे थाट । भरले यमुनेचे तट । तंव अधिकचि होंट । मटमटां वाजती ॥२२॥ आनंदे गोपांसहित । क्रीडा करी गोपीनाथ । म्हणे यमुनेत हात । नका धुऊं कोणी ॥२३॥ म्हणती जाणे जीवींचें । लाजे त्यास येथें कैंचें । शेष या कृष्णाचें । लाभे थोरिवे ॥२४॥ धन्य दिवस काळ । आजी फावला गोपाळ । म्हणती धालों रे सकळ । तुझियानी हातें ॥२५॥ मानवले गडी । एक एकांचे आवडी । दहीं खादले परवडी । धणीवरी आजी ॥२६॥ तुझा संग बरवा । नित्य आम्हांसी द्यावा । ऐसें करूनियां जीवा । नित्य देवा चालावें ॥२७॥ तंव म्हणे वनमाळी । घ्यारे काठीया कांबळी । आता जाऊं खेळीमेळीं । गाई चारावया ॥२८॥ आजी झाला आनंदू । न वर्णवे ब्रह्मानंदू । चाले परमानंदू । सवें आम्हांसहित ॥२९॥ तुका म्हणे प्रेमें धालीं । कोणा न साहवे चाली । गाई गोपाळांसी केली । आपणयांसरी ॥३०॥

३६७९. या हो चला जाऊं सकळा । पाहों हा सोहळा आजि वृंदावनींचा ॥१॥ वाहिला गोपाळें वेणुनाद पडे कानीं । धीर नव्हे मनीं चित्त झालें चंचळ ॥२॥ उरलें तें सांडा काम नका करूं गोवी । हीच वेळ ठावी मज कृष्णभेटीची ॥३॥ निवतील डोळे याचें श्रीमुख पाहातां । बोलती तें आतां घरींचें सोसूं वाईट ॥४॥ कृष्णभेटी आड कांहीं नावडे आणिक । लाज तरी लोक मन झालें उदास ॥५॥ एकाएकीं चालिल्या सादावीत सवें । तुका म्हणे देवें रूपें केल्या तन्मय ॥६॥

३६८०. फुगडी फू फुगडी घालितां उघडी राहे । लाज सांडोनी एकाएकी पाहे ॥१॥ फुगडी गे अवघें मोडी गे । तरीच गोडी गे संसार तोडी गे ॥२॥ मागें जें शिकलीस होती पोटीं । तेंचि विचारूनी आतां उच्चारी ओठीं ॥३॥ त्रिगुणांची वेणी तुझे उडते पाठीं । सावरूनी धरी घाली मूळबंदीं गांठी ॥४॥ आगळें पाउल जिंकी एकाएक । पावसी मान हें मानवती तिन्ही लोक ॥५॥ तुका म्हणे तुजमजमध्यें एक भाव । सम तुकें बार घेऊं पावों उंच ठाव ॥६॥

३६८१. फुगडी फू सवती माझे तूं । हागुनी भरलें धू तुझ्या ढुंगा तोंडावरी थू ॥१॥ फुगडी घेतां आली हरी । ऊठ जा वो जगनोवरी ॥२॥ हात पाय बेंबळ जाती । ढुंगण घोळितां लागे माती ॥३॥ सात पांच आणिल्या हरी । वांचूनी काय तगसी पोरी ॥४॥ सरला दम पांगले पाय । अझुनी तरी घोळिसी काय ॥५॥ तुका म्हणे अझुन तरी । सांगितलें तें गधडी करी ॥६॥

३६८२. तुर्शी कोण घाली हुंबरी । साही पांगल्या अठरा चारी । सहस्त्र मुखावरी हरी ।

शेष शिणविलें ॥१॥ चेंडुवासवें घातली उडी । नाथिला काळिया देऊनी बुडी ॥२॥ अशुद्ध पीता करुणा नाहीं । तुवां आपुली माउशीही मारियेली ॥३॥ रावणाचें घर बुडविलें सारें । त्याची रांडापोरें मारियेलीं ॥४॥ जाण तूं ठावा आहेसी आम्हां । तुवां आपुला मामा मारियेला ॥५॥ याशीं खेळतां नाश थोरू । तुकया स्वामी सारंग धरू ॥६॥

३६८३. मशीं पोरा घे रे बार । तुझे बुजीन खालील द्वार ॥१॥ पोरा हमामा रे हमामा रे ॥२॥ मशीं हमामा तूं घालीं । पोरा वरी सांभाळी खालीं ॥३॥ तरीच मशीं बोल । पोरा जिव्हाळ्याची ओल ॥४॥ मशीं घेतां भाष । जीवा मीतूंपणा नास ॥५॥ मजसवें खरा । पण जाऊं नेदीं घरा ॥६॥ आमुचिये रंगीं । दुजें तगेना ये संगीं ॥७॥ तुकयासवें भास । हरी जीवा करी नास ॥८॥

३६८४. हमामा रे पोरा हमामा रे । हमामा घालितां ठकलीं पोरें । करी येरझार चौऱ्यांशींची ॥१॥ पहिले पहारा रंगासी आलें । सोहं सोहं सें बार घेतलें । देखोनि गडी तें विसरलें । डाईं पडिलें आपणचि ॥२॥ दुसऱ्या पहारा महाआनंदें । हमामा घाली छंदछंदें । दिसे वाढे तों गोड वाटे । परि पुढें नेणें पोर काय होतें तें ॥३॥ तिसऱ्या पहारा घेतला बार । अहंपणें पाय न राहे स्थिर । सोसे सोस करितां डाईं पडसी । सत्य जाणें हा निर्धार ॥४॥ चौथ्या पहारा हमामा घालिसी । कांपविसी हातपाय । सुऱ्यापाटिलाचा पोर यम्या । त्याचे पडसील डाईंरे ॥५॥ हमामा घालितां भ्याला तुका । त्यानें सांडिली गड्याची सोई । यादवाचा मूल एक विठोबा । त्यासवें चारितो गाईरे ॥६॥

३३८५. सिद्ध करूनियां ठेविल कांडण । मज सांगातीण शुद्ध बुद्धि गे ॥१॥ आठव हा धरीं मज जागें करीं । मागिलें पहारीं सेवटींचा गे ॥२॥ सम तुकें घाव घालीं वो साजणी । मी तुजमिळणी जिवें मिळें ॥३॥ एक कशी पाखडी दुसरी निवडी । नि:शेष ते सडी ओज करी ॥४॥ सरलें कांडण पाकसिद्धि करी । मेळवण क्षिरीसाकरेचें ॥५॥ उद्धव अक्रूर बंधु दोघेजण । बाप नारायण जेवणार ॥६॥ तुका म्हणे मज माहेरीं आवडी । म्हणोनि तांतडी मूळ केलें ॥७॥

३६८६. सावडीं कांडण ओवी नारायण । निवडे आपण भूस सार ॥१॥ मुसळ आधारीं आवरूनी धरीं । सांवरोनी थोरी घाव घालीं ॥२॥ वाजती कांकणें अनुहात गजरें । छंद माहियेरे गाऊं गीतीं ॥३॥ कांडितां कांडण नव्हे भाग शीण । तुजमजपण निवडे तो ॥४॥ तुका म्हणे रूप उमटे आरीसा । पाक त्यासरिसा सिद्ध झाला ॥५॥

३६८७. उपजोनियां पुढती येऊं । काला खाऊं दहींभात ॥१॥ वैकुंठीं तों ऐसें नाहीं । कवळ कांहीं काल्याचे ॥२॥ एकमेकां देऊं मुखीं । सुखीं घालूं हुंबरी ॥३॥ तुका म्हणे वाळवंट । बरवें नीट उत्तम ॥४॥

३६८८. याल तरी या रे लागें । अवघे माझ्या मागें मागें ॥१॥ आजी देतों पोटभरी ।

पुरें म्हणाल तोंवरी ॥२॥ हळूहळू चाला । कोणी कोणासीं न बोला ॥३॥ तुका म्हणे सांडा घाटे । तेणें नका भरूं पोटें ॥४॥

३६८९. शिंकें लावियेलें दुरी । होतों तिघांचे मी वरी ॥१॥ तुम्ही व्हा रे दोहींकडे । मुख पसरूनी गडे ॥२॥ वाहाती त्या धारा । घ्यारे दोहींच्या कोंपरा ॥३॥ तुका म्हणे हातीं टोका । अधिक उणें नेदी एका ॥४॥

३६९०. पळाले ते भ्याड । त्यांसी येथें झाला नाड ॥१॥ धीट घेती धणीवरी । शिंकीं उतरितो हरी ॥२॥ आपुलिया मतीं । पडली विचारीं तीं रितीं ॥३॥ तुका म्हणे घ्या रे पया । कैं पावाल या ठाया ॥४॥

३६९१. धालें मग पोट । केला गड्यांनी बोभाट ॥१॥ ये रे ये रे नारायणा । बोलों अबोलण्या खुणा ॥२॥ खांद्यावरी भार । तीं शिणती बहु फार ॥३॥ तुकयाच्या दातारें । नेलीं सुखी केलीं पोरें ॥४॥

३६९२. पाहाती गौळणी । तंव ती पालथी दुधाणी ॥१॥ म्हणती नंदाचिया पोरें । आजी चोरी केली खरें ॥२॥ त्याविण हे नासी । नव्हे दुसरिया ऐसी ॥३॥ सवें तुकया मेला । त्याणें अगुणा आणिला ॥४॥

३६९३. आतां ऐसें करूं । दोघां धरूनियां मारूं ॥१॥ मग टाकितील हे खोडी । तोंडीं लागली ते गोडी ॥२॥ कोंडूं घरामधीं । न बोलोनी जागो बुद्धी ॥३॥ बोलावितो देवा । तुका गडियांचा मेळावा ॥४॥

३६९४. लये लये लखोटा । मूळबंदी कासोटा । भावा केलें साहें । आतां माझें पाहें ॥१॥ हातोहातीं गुंतली । जीवपणा मुकली । धीर माझा निका । सांडीं बोला फिका ॥२॥ अंगीकारी हरि । नको पडों फेरी । लाज धरीं भांडे । जगझोडी रांडे ॥३॥ बैस भावापाठीं । ऐक माझ्या गोष्टी । केला सांडीं गोहो । धरीं येथें मोहो ॥४॥ पाठिमोरा डोल । आवरीं ते बोल । पांगलीस बाळा । पुढें अवकळा ॥५॥ आतां उभी ठायीं । उभाउभीं पाहीं । नको होऊं डुकरी । पुढें गाढव कुतरी ॥६॥ नाम केलें खरें । आपुलें म्यां बरें । तुका म्हणे येरी । पांगविल्या पोरी ॥७॥

३६९५. गडी गेले रडी । कान्हो नेदीच तूं चढी ॥१॥ आम्ही न खेळों न खेळों । आला भाव तुझा कळों ॥२॥ न साहावे भार । बहु लागतो उशीर ॥३॥ तुका आला रागें । येऊं नेदी मागें मागें ॥४॥

३६९६. यमुनेतटीं मांडियेला खेळ । म्हणे गोपाळ गडियांसी ॥१॥ हाल मांडा हाल मांडा । वाऊगी सांडा मोकळी ॥२॥ नांवें ठेवूनि वांटा गडी । न वजे रडी मग कोणी ॥३॥ तुका म्हणे कान्हो तिळयातांदळ्या । जिंके तो करी आपुला खेळ्या ॥४॥

३६९७. बळें डाईं न पडे हरी। बुद्धि करी शाहाणा तो ॥१॥ मोकळें देवा खेळों द्यावें। सम भावें सांपडावया ॥२॥ येतो जातो वेळोवेळां। न कळे कळा सांपडती ॥३॥ तुका म्हणे धरा ठायींच्या ठायीं। मिठी जीवें पायीं घालूनियां ॥४॥

३६९८. कवळाचिया सुखें। परब्रह्म झालें गोरखें। हात गोवूनि खाय मुखें। बोटांसादीं लोणचीं ॥१॥ कोण जाणे तेथें कोण लाभ। कां तें ब्रह्मादिकां दुर्लभ ॥२॥ घाली हमामा हुंबरी। पांवा वाजवी मोहरी। गोपाळांचे फेरी। हरी छंदें नाचतसे ॥३॥ काय नव्हतें त्या घरीं खावया। रिघे लोणी चोरावया। तुका म्हणे सवें तया। आम्हीही सोंकलों ॥४॥

३६९९. कान्होबा आतां तुम्ही आम्हीच गडे। कोणाकडे जाऊं नेदूं ॥१॥ वाहीन तुझी भारशिदोरी। वळतीवरी येऊं नेदूं ॥२॥ ढवळे गाईचें दूध काढूं। एकल्या एक ठोंबे मारूं ॥३॥ तुका म्हणे टोकवूं त्यांला। जे तुझ्या बोला मानिती ना ॥४॥

३७००. बहु काळीं बहु काळीं। आम्ही देवाची गोवळीं ॥१॥ नाहीं विट देतो भाते। जेवूं बैसवूं सांगातें ॥२॥ बहु काळें बहु काळें। माझें पांघरे कांबळें ॥३॥ तुका म्हणे नाहीं नाहीं। त्याचें आमचेंसें कांहीं ॥४॥

३७०१. बहु बरा बहु बरा। या सांगातें मिळे चारा ॥१॥ म्हणोनी जीवेंसाठीं। घेतली कान्होबाची पाठी ॥२॥ बरवा बरवा दिसे। समागम याचा निमिषें ॥३॥ पुढती पुढती तुका। सोंकला सोंकवितो लोकां ॥४॥

३७०२. घेती पाण्यासी हुंबरी। त्यांचें समाधान करी ॥१॥ ऐशी गोपाळांची सवे। जाती तिकडे मागें धांवे ॥२॥ स्थिरावली गंगा। पांगविली म्हणे उगा ॥३॥ मोहरी पांवा काठी। तुका म्हणे याजसाठीं ॥४॥

३७०३. वळत्या गाई धांवे घरा। आमच्या करी येरझारा ॥१॥ नांव घेतां तो जवळी। बहु भला कान्हो बळी ॥२॥ नेदी पडों उणें पुरें। म्हणे अवघेंचि बरें ॥३॥ तुका म्हणे चित्ता। वाटे न व्हावा परता ॥४॥

३७०४. म्हणती धालों धणीवरी। आतां नलगे शिदोरी। नये क्षणभरी। आतां यास विसंबों ॥१॥ चाल चालरे कान्होबा। खेळ मांडूं रानीं। बैसवूं गोठणी। गाई जमा करूनी ॥२॥ न लगे जावे घरा। चुकलिया येरझारा। सज्जन सोयरा। मायबाप तूं आम्हां ॥३॥ तुका म्हणे धालें पोट। आतां काशाचा बोभाट। पाहाणें ते वाट। मागें पुढें राहिली ॥४॥

३७०५. तुझिये संगती। झाली आमुची निश्चिंती ॥१॥ नाहीं देखिलें तें मिळे। भोग सुखाचे सोहळे ॥२॥ घरीं ताकाचें सरोवर। येथे नवनीताचे पूर ॥३॥ तुका म्हणे आतां। आम्ही न वजों दवडितां ॥४॥

३७०६. कामें पीडिलों माया। बहू मारी नाहीं दया ॥१॥ तुझ्या राहिलों आधारें। झालें अवघेंचि बरें ॥२॥ तुझे लागलों संगती। आतां येतो काकुलती ॥३॥ तुका म्हणे तुझ्या भिडा। कान्होबा हे गेली पीडा ॥४॥

३७०७. खेळ मांडियेला वाळवंटी घाईं। नाचती वैष्णव भाई रे। क्रोध अभिमान केला पावटणी। एक एका लागतील पायीं रे ॥१॥ नाचती आनंदकल्लोळीं। पवित्र गाणें नामावळीरे। कळिकाळावरि घातली कास। एक एकाहुनी बळी रे ॥२॥ गोपीचंदनउटी तुळसीच्या माळा। हार मिरवती गळांरे। टाळ मृदंग घाई पुष्पांचा वरुषाव। अनुपम्य सुखसोहळा रे ॥३॥ लुब्धलीं नादीं लागली समाधि। मूढ जन नर नारी लोकांरे। पंडित ज्ञानी योगी महानुभाव। एकचि सिद्धसाधकां रे ॥४॥ वर्णाभिमान विसरली याति। एक एकां लोटांगणीं जातींरे। निर्मळ चित्तें झालीं नवनीतें। पाषाणा पाझर सुटती रे ॥५॥ होतो जयजयकार गर्जत अंबर। मातले वैष्णव वीर रे। तुका म्हणे सोपी केली पायवाट। तरावया भवसागर रे ॥६॥

३७०८. एकें घाईं खेळतां न पडसी डाईं। दुचाळ्यानें ठकसील भाई रे। त्रिगुणांचे फेरी थोर कष्टी होसी। या चौघांची तरी धरीं सोई रे ॥१॥ खेळ खेळोनियां निराळाचि राहीं। सांडीं या विषयाची घाई रे। येणेंचि खेळे बसवंत होसी। ऐसें सत्य जाण माझ्या भाई रे ॥२॥ सिंपियाचा पोर एक खेळिया नामा। तेणें विठ्ठल बसवंत केला रे। आपुल्या सवंगडिया सिकवूनी घाईं। तेणें सतत फड जागविला रे। एके घाईं खेळता न चुकेचि कोठें। तया संत जन मानवले रे ॥३॥ ज्ञानदेव मुक्ताबाई वटेश्वर चांगा। सोपान आनंदें खेळती रे। कान्हो गोवारी त्यांनीं बसवंत केला। आपण भोंवतीं नाचती रे। सकळिकां मिळोनी एकचि घाईं। त्याच्या ब्रह्मादिक लागती पायीं रे ॥४॥ रामा बसवंत कबिर खेळिया। जोडा बरवा मिळाला रे। पांचा संवगडियां एकचि घाईं। तेथें नाद बरवा उमटला रे। ब्रह्मादिक सुरवर मिळोनियां त्यांनीं। तो ही खेळिया निवडिला रे ॥५॥ ब्राह्मणाचा पोर खेळिया एका भला। तेणें जन खेळकर केला रे। जनार्दन बसवंत करूनियां। तेणें वैष्णवांचा मेळ मेळविला रे। एकचि घाईं खेळतां खेळतां आपणचि बसवंत जाला रे ॥६॥ आणीक खेळिये होऊनियां गेले। वर्णावया वाचा मज नाहीं रे। तुका म्हणे गडे हो हुशारूनी खेळा। पुढिलांची धरूनियां सोई रे। एकचि घाईं खेळतां जो चुकला। तो पडे संसारडाईं रे ॥७॥

३७०९. बाराही सोळा गडियांचा मेळ। सतरावा बसवंत खेळियारे। जतिस्पद राखों जाणें टिपरिया घाईं। अनुहात वाय मांदळा रे ॥१॥ नाचत पंढरिये जाऊं रे खेळिया। विठ्ठल रखुमाई पाहूं रे ॥२॥ सा चहूं वेगळा अठरा निराळा। गाऊं वाजवूं एक चाळा रे। विसरती पक्षी चारा नेघे पाणी। तारुण्य देहभाव बाळा रे ॥३॥ आनंद तेथींचा मुकियासी वाचा। बहिरे ऐकती कानीं रे। आंधळ्यांसीं डोळे पांगुळांसी पाय। तुका म्हणे वृद्ध होती तरणे रे ॥४॥

३७१०. दोन्ही टिपरीं एकचि नाद । सगुण निर्गुण नाहीं भेद रे । कुसरी अंगें मोडितील परी । मेळविती एकएका छंदें रे ॥१॥ कांहींच न वजे वांयां रे खेळिया । एकचि बसवंत अवघियां रे । सम विषम तेथें होऊंच नेदी । जाणऊनि आगळिया रे ॥२॥ संत महंत सिद्ध खेळतील घाईं । तेच सांभाळी माझ्या भाई रे । हात राखोन हाणिती टिपऱ्या टिपरी । मिळोनि जाय त्याची सोई रे ॥३॥ वितालाचें अवघें जाईल वांयां । काय तें शृंगारूनि काया रे । निवडूनि बाहेर काढिती निराळा । जो न मिळे संतांचियां घाई रे ॥४॥ प्रकाराचें काज नाहीं सोडीं लाज । नि:शंक होऊनियां खेळें रे । नेणतीं नेणतींच एकें पावलीं मान । विठ्ठल नामाचिया बळें रे ॥५॥ रोमांच गुढिया डोलविती अंगें । भावबळें खेळविती सोंगें रे । तुका म्हणे कंठ सद्गदित दाटे । या विठोबाच्या अंगसंगें रे ॥६॥

३७११. या रे गडे हो धरूं घाई जाणतांही नेणतां । नाम गाऊं टाळी वाहूं आपुलिया हिता ॥१॥ फावलें ते घ्यारे आतां प्रेमदाता पांडुरंग । आजी दिवस सोनियाचा वोडवला रंग ॥२॥ हिंडती रानोरान बुजंग ते कांट्यावन । सुख तयाहून आम्हां गातां नाचतां रे ॥३॥ तुका म्हणे ब्रह्मादिकां सांवळें दुर्लभ सुखा । आजी येथें आलें फुका नाम मुखा कीर्तनीं ॥४॥

३७१२. भीमातीरीं एक वसविलें नगर । त्याचें नांव पंढरपुर रे । तेथील मोकासी चार भुजा त्यासी । बाइला सोळा हजार रे ॥१॥ नाचत जाऊं त्याच्या गांवा रे खेळिया । सुख देईल विसावा रे । पुढें गेले ते निधाई झाले । वाणितील त्याची सीमा रे ॥२॥ बळियां आगळा पाळी लोकपाळां । रिघ नाहीं कळिकाळा रे । पुंडलिक पाटील केली कुळवाडी । तो झाला भवदुःखा वेगळा रे ॥३॥ संतसज्जनीं मांडिलीं दुकानें । जे जया पाहिजे तें आहे रे । भुक्ति मुक्ति फुकाच साठीं । कोणी तयाकडे न पाहे रे ॥४॥ दोन्हीच हाट भरले घनदाट । अपार मिळाले वारकरी रे । न वजों म्हणती आम्ही वैकुंठा । जिहीं देखिली पंढरी रे ॥५॥ बहुत दिस होती मज आस । आजी घडलें सायासीं रे । तुका म्हणे होय तुमचेनी पुण्यें । भेटी तया पायांसी रे ॥६॥

३७१३. ब्रह्मादिकां न कळे खोळ । ते हे आकळ धरियेली ॥१॥ मोहरी पांवा वाहे काठी । धांवे पाठीं गाईचे ॥२॥ उच्छिष्ट जें न लभे देवा । तें हें सदैवां गोवळ्यां ॥३॥ तुका म्हणे जोडी झाली । ते हे माउली आमुची ॥४॥

३७१४. शुद्ध दळणाचें सुख सांगों काईं । मानवत असे सईबाई ॥१॥ शुद्ध तें वळण लवकरी पावे । डोलवितां निवे अष्टांग तें ॥२॥ शुद्ध हें जेवितां तन निवे मन । अल्प त्या इंधन बुडा लागे ॥३॥ शुद्ध त्याचा पाक शुद्धचित्त चांगला । अविट तयाला नाश नाहीं ॥४॥ तुका म्हणे शुद्ध आवडे सकळां । भ्रतार वेगळा न करी जीवें ॥५॥

३७१५. कान्होबा तूं आलगट । नाहीं लाज बहु धीट । पाहिलें वाईट । बोलोनियां वोखटें

॥१॥ परि तूं न संडिसी खोडी। करिसी केली घडीघडी। पाडिसी रोकडी। तुटी माये आम्हांसी ॥२॥ तूं ठायींचा गोवळ। अविचारी अनर्गळ। चोरटा शिंदळ। ऐसा पिटूं डांगोरा ॥३॥ जरी तुझी आई। आम्ही घालूं सर्वा ठायीं। तुका म्हणे तेंहीं। तुज वाटे भूषण ॥४॥

३७१६. भोजनाच्या काळीं। कान्हो मांडियेली आळी। काला करी वनमाळी। अन्नें एकवटा। देईं निवडूनी। माते म्हणतो जननी। हात निपटूनी मेदिनी-। वरी अंग घाली ॥१॥ कैसा आळी घेसी। नव्हे तेंचि करिसी। घेईं दुसरें तयेसी। वारी म्हणे नको ॥२॥ आतां काय करूं। नये यासी हाणूं मारूं। नव्हे बुझावितां स्थिरू। कांहीं करितांही। हातेंचि केलें एके ठायीं। आतां निवडूनी खाईं। आम्हां जाचितोसी काईं। हरिसी म्हणे माता ॥३॥ त्याचे तयाकुन। करवितां तुटे भान। तंव झालें समाधान। उठोनियां बैसे। मातें बरें जाणविलें। अंग चोरूनी आपुलें। तोडियेलें एका बोलें। कैसें सुखदुःख ॥४॥ ताट पालवें झाकिलें। होतें तैसें तेथें केलें। भिन्नाभिन्न निवडिलें। अन्नें वेगळालीं। विस्मित जननी। भाव देखोनियां मनीं। म्हणे नाहीं ऐसा कोणी। तुज सारिखा रे ॥५॥ हरुषली माये। सुख अंगीं न सामये। कवळुनी बाहे। देती आलिंगन। आनंद भोजनीं। तेथें फिटलीसे धणी। तुका म्हणे कोणी। सांडा शेष मज ॥६॥

३७१७. चला वळूं गाई। बैसों जेऊं एके ठायीं ॥१॥ बहु केली वणवण। पायपिटी जाला सिण ॥२॥ खांदीं भार पोटीं भूक। काय खेळायाचें सुख ॥३॥ तुका म्हणे धावें। मग अवघें बरवें ॥४॥

३७१८. नेणों वेळ काळ। धालों तुझ्यानें सकळ ॥१॥ नाहीं नाहीं रे कान्होबा भय आम्हांपाशीं। वळूनी पुरविसी गाई पोटा खावया ॥२॥ तुजपाशीं भय। हें तों बोलों परी नये ॥३॥ तुका म्हणे बोल। आम्हां अनुभवें फोल ॥४॥

३७१९. सारा विटीदांडू। आणीक कांहीं खेळ मांडूं ॥१॥ बहु अंगा आले डाव। स्थिर नाहीं कोठें पाव ॥२॥ कोली हाणे टोला। झेली तेणे तो गोविला ॥३॥ एकमेकां हाका मारी। शेल जाळी एक धरी ॥४॥ राजी आलें नांव। फेरा न चुकेचि धांव ॥५॥ पुढें एक पाठी। एक एका दोघां आटी ॥६॥ एका सोस पोटीं। एक धांवे हात पिटी ॥७॥ तुका म्हणे आतां। खेळ मोडावा परता ॥८॥

३७२०. कोंडिला गे माज। निरोधुनि द्वार। राखण तें बरें। येथें करा कारण ॥१॥ हा गे हा गे हरी। करितां सांपडला चोरी। घाला गांठी धरी। जीवें माया त्रासाया ॥२॥ तेंचि पुढें आड। तिचा लोभ तिला नाड। लावुनी चरफड। हात गोउनि पळावें ॥३॥ संशयाचें बिरडें। याचे निरसलें भेटी। घेतली ते तुटी। आतां देतां घेतां फावेल ॥४॥ तुका येतो काकुळती। वाउगिया सोड। यासीचि निवाड। आम्ही भारवाहिका ॥५॥

३७२१. अनंत ब्रह्मांडें उदरीं । हरि हा बाळक नंदाघरीं ॥१॥ नवल केव्हडें केव्हडें । न कळे कान्होबाचें कोडें ॥२॥ पृथ्वी जेणें तृप्त केली । त्यासी यशोदा भोजन घाली ॥३॥ विश्वव्यापक कमळापती । त्यासी गौळणी कडिये घेती ॥४॥ तुका म्हणे नटधारी । भोग भोगून ब्रह्मचारी ॥५॥

३७२२. कृष्ण गोकुळीं जन्मला । दुष्टां चळकांप सुटला ॥१॥ होतां कृष्णाचा अवतार । आनंद करिती घरोघर ॥२॥ सदा नाम वाचे गाती । प्रेमें आनंदें नाचती ॥३॥ तुका म्हणे हरती दोष । आनंदानें करिती घोष ॥४॥

३७२३. मेळउनि सकळ गोपाळ । कांहीं करिती विचार ॥१॥ जाऊं चोरू लोणी । आजी घेऊं चंद्रधणी । चला वेळु लाविला अझुनी । काय करितां गडे हो ॥२॥ वाट काढिली गोविंदीं । मागें गोपाळांची मांदी ॥३॥ अवघाचि वावरे । कळों नेदी कोणां खरें ॥४॥ घर पाहोनि एकांताचें । नवविधा नवनीताचें ॥५॥ रिघे आपण भीतरी । पुरवी माथुलियाच्या हरी ॥६॥ बोलों नेदी म्हणे स्थीर । खुण दावी खा रे क्षीर ॥७॥ जोगावल्यावरी । तुका करितो चाकरी ॥८॥

३७२४. कां रे गमाविल्या गाई । आली वळती तुझी जाई । मागें झालें काई । एका तें कां नेणसी ॥१॥ केलासी फजित । मागें पुढेंही । बहुत । लाज नाहीं नित्य । नित्य दंड पावतां ॥२॥ वोला खोडा खिळ गाढी । ऐसा कोण तया काढी । धांवले कापडी । तुझी आधीं ओढाळा ॥३॥ चालें चाल धावें । मीही येतों तुजसवें । तुका म्हणे जंव । तेथें नाहीं पावली ॥४॥

३७२५. कंठीं धरिला कृष्णमणी । अवघा जनीं प्रकाश ॥१॥ काला वांटूं एकमेकां । वैष्णव निका संभ्रम ॥२॥ वांकुलिया ब्रह्मादिकां । उत्तम लोकां दाखवूं ॥३॥ तुका म्हणे भूमंडळीं । आम्ही बळी वीर गाढे ॥४॥

३७२६. पाहातां गोवळी । खाय त्यांची उष्टावळी ॥१॥ करिती नामाचें चिंतन । गडी कान्होबाचें ध्यान ॥२॥ आली द्यावी डाई । धांवे वळत्या मागें गाई ॥३॥ एके ठायीं काला । तुका म्हणे भाविकाला ॥४॥

३७२७. पैल आली आगी कान्हो कायरे करावें । नकळे तें कैसें आजी वांचों आम्हीं जीवें ॥१॥ धांव रे हरी सांपडलों संधी । वोणव्याचे मधीं बुद्धि काय करावी ॥२॥ अवचितां ज्वाळा येतां देखिल्या वरी । परतोनि पाहातां अवघे होतों पाठमोरी ॥३॥ सभोवतां फेर रीघ न होय पळतां । तुका म्हणे जाणसी तें करावें अनंता ॥४॥

३७२८. भिऊं नका बोले झांकुनियां राहा डोळे । वांचविल देव धाक नाहीं येणे वेळे ॥१॥ बापरे हा देवांचाही देव । कळों नेदी माव काय करी करवीतो ॥२॥ पसरूनि मुख विश्वरूप खाय ज्वाळ । सारूनियां संधि अवघे पाहाती गोपाळ ॥३॥ तुका म्हणे आम्ही मागें भ्यालों वांयांविण । कळों आलें आतां या सांगातें नाहीं शिण ॥४॥

३७२९. नेणती तयांसी साच भाव दावी हरी। लाज नाहीं नाचे पांवा वाजवी मोहरी ॥१॥ चला रे याच्या पायां लागो आतां। राखिलें जळतां महा आगीपासूनी ॥२॥ कैसीरे कान्होबा एवढी गिळियेली आगी। न देखों पोळला तुज तोंडीं कोठें अंगीं ॥३॥ तुका म्हणे कां रे तुम्ही करितां नवल। आमची सिदोरी खातो त्याचें आलें बळ ॥४॥

३७३०. त्यांनीं धणीवरी संग केला हरीसवें। देऊनी आपुलें तोचि देईल तें खावें ॥१॥ न ठेवी आभार प्रेमाचा भुकेला। बहु दिस संग हाचि निर्धार त्याला ॥२॥ कान्होबा तूं जेवीं घासोघासीं। आरूष गोपाळे त्यांची बहु देवा प्रीति ॥३॥ तुका म्हणे आतां जाऊं आपुलिया घरा। तोये वांचविलें ऐसें सांगों रे दातारा ॥४॥

३७३१. घ्या रे भोकरें भाकरी। दहींभाताची सिदोरी। ताक सांडा दुरी। असेल तें तयापें ॥१॥ येथें द्यावें तैसें घ्यावें। थोडें परि निरें व्हावें। सांगतों हें ठावें। असों द्या रे सकळां ॥२॥ माझें आहे तैसें पाहे। नाहीं तरी घरा जाये। चोरोनियां माये। नवनीत आणावें ॥३॥ तुका म्हणे घरीं। माझें कोणी नाहीं हरी। नका करूं दुरी। मज पायां वेगळें ॥४॥

३७३२. काल्याचिये आसे। देव जळीं जाले मासे। पुसोनियां हांसें। टिरीसांगातें हात ॥१॥ लाजे त्यासी वांटा नाहीं। जाणे अंतरींचें तें ही। दीन होतां कांहीं। होऊं नेदी वेगळें ॥२॥ उपाय अपाय यापुढें। खोटे निवडितो कुडे। जोडूनियां पुढें। हात उभे नुपेक्षी ॥३॥ तें घ्या रे सावकाशें। जया फावेल तें तैसें। तुका म्हणे रसें। प्रेमाचिया आनंदें ॥४॥

३७३३. गोपाळ म्हणती कान्होबा या रे कांहीं मागों। आपुलाले आम्ही जीवींचे तया आवडी सांगों। एक म्हणती उगे रे उगे रे उगे मागेंचि लागों। निजों नका कोणी घरीं रे आजी अवघेचि जागों ॥१॥ जाणोनि नेणता हरि रे मध्यें उगाचि बैसे। नाइकोनी बोल आइके कोण कोणाचे कैसे। एक एकाच्या संवादें जाणे न मिळती ऐसें। पोटांतील होटा आणवी देतो तयांसी तैसें ॥२॥ एक म्हणती बहु रे आम्ही पीडियलों माया। नेदी दहींभातसिदोरी ताक घालिती पिया। तापलों वळितां गोधनें नाहीं जीवन छाया। आतां मागों पोटभरी रे याच्या लागोनि पायां ॥३॥ एक म्हणती तुमचें अरे पोट तें किती। मागों गाई म्हैसी घोडे रे धन संपत्ति। हातीं देव गडी कान्होबा आमुचा आम्हां काय विपत्ति। कन्याकुमरें दासी रे बाजावरी सुपती ॥४॥ एक म्हणती बेटे हो कोण करी जतन। गाढव तैसेंचि घोडें रे कोण तयाचा मान। लागे भवरोग खांदीं वाहतां चवघे जण। हातीं काठ्या डोया बोडक्या हिंडो मोकळें रान ॥५॥ एक म्हणती रानीं रे बहु सावजें फार। फाडफाडूं खाती डोळे रे पाय नेतील कर। राखोनि राखे आपणां ऐसा कइचा शूर। बैसोनी राहों घरीं रे कोण करी हे चार ॥४॥ घरीं बैसलिया बहुतें बहु सांगती कामें। रिकामें कोणासि नावडे ऐसें आम्हासी ठावें। चौघांमध्यें बरें दिसे तेथें नेमकें व्हावें। लपोनी

खेळतां सहज भलें गडियासवें ॥७॥ एक म्हणती गडी ते भले मिळती मता। केली तयावरी चाले रे बरी आपुली सत्ता। नसावे तेथें तैसे रे खेळ हाणिती लाता। रडी एकाएकीं गेलिया गोंधळ उडती लाता ॥८॥ एक म्हणे खेळतां उगीं राहती पोरें। ऐसें काय घडों शके रे कोणी लहान थोरें। अवघीं येती रागा एक म्हणती बरें। संगें वाढे कलह करावा एकाएकींच खरें ॥९॥ एक म्हणती एकला रे तूं जासील कोठें। सांडी मांडी हें वाउगें तुझे बोलचि खोटे। ठायीं राहा उगे ठायींच कां रे सिणसी वाटे। अवघियांची सिदोरी तुझी बरी भरियेली मोट ॥१०॥ तुका म्हणे अरे काहण्या काय सांगाल गोष्टी। चाटावे तुमचे बोल रे भुका लागल्या पोटीं। जागा करूं या रे कान्होबा मागों कवळ ताटीं। धाले गडी तुका ढेकर देतो विठ्ठल कंठीं ॥११॥

३७३४. आजी ओस अमरावती। काला पाहावया येती। देव विसरती। देहभाव आपुला ॥१॥ आनंद न समाये मेदिनी। चारा विसरल्या वाणी। तटस्थ त्या ध्यानीं। गाई जाल्या श्वापदें ॥२॥ जें देवांचें दैवत। उभें आहे या रंगांत। गोपाळांसहित। क्रीडा करी कान्होबा ॥३॥ जया सुखाची शिराणी। तींच पाउलें मेदिनी। तुका म्हणे मुनी। धुंडितांही न लभती ॥४॥

३७३५. चला बाई पांडुरंग पाहूं वाळवंटीं। मांडियेला काला भोंवतीं गोपाळांची दाटी ॥१॥ आनंदें कवळ देती एकामुखीं एक। न म्हणती सान थोर अवघीं सकळिक ॥२॥ हमामा हुंबरी पावा वाजविती मोहरी। घेतलासे फेरा माजी घालूनियां हरी ॥३॥ लुब्धल्या नारी नर अवघ्या पशुयाती। विसरल्या देहभाव शंका नाहीं चित्तीं ॥४॥ पुष्पांचा वरुषाव झाली आरतियांची दाटी। तुळसी गुंफोनियां माळा घालितील कंठीं ॥५॥ यादवांचा राणा गोपी मनोहर कान्हा। तुका म्हणे सुख वाटे देखोनियां मना ॥६॥

३७३६. माझे गडी कोण कोण। निवडा भिन्न यांतुनी ॥१॥ आपआपणामध्यें मिळों। एक खेळों एकाशीं ॥२॥ घाबरियांच्या मोडा काड्या। धाडा भ्याडा वळतियां ॥३॥ तुका म्हणे देवापाशीं। विटाळशी नसावी ॥४॥

३७३७. हेचि अनुवाद सदा सर्व काळ। करूनि गोपाळकाला सेवूं ॥१॥ वोरसलें कामधेनूचें दुभतें। संपूर्ण आइतें गगनभरी ॥२॥ संत सनकादिक गोमट्या परवडी। विभाग आवडी इच्छेचिये ॥३॥ तुका म्हणे मधीं घालूं नारायण। मग नव्हे सीण कोणा खेळे ॥४॥

३७३८. अधिकाचा मज कांटाळा। तुम्हां गोपाळा संगती ॥१॥ काय नाहीं तुम्हांपाशीं। सकळांविशीं संपन्न ॥२॥ उद्वेगाचा नेघे भार। भागल्या सार पुरतें ॥३॥ तुका म्हणे अधीर जिणें। नारायणें न करावें ॥४॥

३७३९. झालों आतां एके ठायीं। न वंचूं कांहीं एकमेकां ॥१॥ सरलों हेंगे देउनि मोट। कटकट काशाची ॥२॥ सोडोनियां गांठी पाहें। काय आहे त्यांत तें ॥३॥ तुका म्हणे झालों

निराळा । आतां गोपाळा देऊं बोभा ॥४॥

३७४०. या रे करूं गाई । जमा निजलेती काई । बोभाट्यानें आई । घरा गेल्या मारिल ॥१॥ घाला घाला रे कुकारे । ज्याची तेणेंचि मोहरे । एवढेंचि पुरे । केलियानें सावध ॥२॥ नेणोनियां खेळा । समय समयाच्या वेळा । दुश्चिताजवळा । मिळाले ते दुश्चित ॥३॥ तुका म्हणे शीक । न धरितां लागे भीक । धरा सकळिक । मनेरी धांवा वळतियां ॥४॥

३७४१. वोळलीचा दोहूं पान्हां । मज कान्हा सांगितलें ॥१॥ घ्या जी हेंगे क्षीर हातीं । निगुतीनें वाढावें ॥२॥ केलें सांगितलें काम । नव्हे धर्म सत्तेचा ॥३॥ तुका म्हणे नवें जुनें । ऐसें कोणें सोसावें ॥४॥

३७४२. येईल तें घेइन भागा । नव्हे जोगा दुसरिया ॥१॥ आवडी ते तुम्ही जाणा । बहु गुणांसारिखी ॥२॥ मज घेती डांगवरी । सवें हरि नसलिया ॥३॥ तुका म्हणे राबवा देवा । करीन सेवा सांगितली ॥४॥

३७४३. अंतरली खुटी मेटी । भय धरूनियां पोटीं । म्हणतां जगजेठी । धांवे करुणाउत्तरीं ॥१॥ बाप बळिया शिरोमणी । उताविळ या वचनीं । पडलिया कानीं । धांवा न करी आळस ॥२॥ बळ दुनी शरणागता । स्वामी वाहों नेदी चिंता । आइतेंचि दाता । पंगतीस बैसवी ॥३॥ वाहे खांदी पाववी घरा । त्याच्या करी येरझारा । बोबड्या उत्तरा । स्वामी तुकया मानवे ॥४॥

३७४४. शुद्धीचें सारोनी भरियेली पाळी । भरडोनी वोंगळी नाश केला ॥१॥ आडसोनी शुद्ध करीं वो साजणी । सिद्ध कां पापिणी नासियेलें ॥२॥ सुपीं तोंचि पाहें धड उगटिलें । नव्हता नासिलें जग झोडी ॥३॥ सुपीं तोंचि आहे तुज तें आधीन । दळिल्या जेवण जैसें तैसें ॥४॥ सुपीं तोंची संग घेईं धडफुडी । एकसा गधडी नास केला ॥५॥ दळितां आदळे तुज कां न कळे । काय गेले डोळे कान तुझे ॥६॥ सुपीं तोंचि वोज न करितां सायास । पडसी सांदीस तुका म्हणे ॥७॥

३७४५. धन्य तीं गोधनें कांबळी काष्ठिका । मोहरी पांवा निका ब्रीद वांकी ॥१॥ धन्य तें गोकुळ धन्य ते गोपाळ । नर नारी सकळ धन्य झाल्या ॥२॥ धन्य ते देवकी जसवंती दोहींचें । वसुदेवनंदाचें भाग्य झालें ॥३॥ धन्य त्या गोपिका सोळा सहस्त्र बाळा । यादवां सकळां धन्य झालें ॥४॥ धन्य म्हणे तुका जन्मा तींचि आलीं । हरिरंगीं रंगली सर्वभावें ॥५॥

३७४६. गौळणी बांधिती धारणासी गळा । खेळे त्या गोपाळामाजी ब्रह्म ॥१॥ धांवोनियां मागे यशोदे भोजन । हिंडे रानोरान गाईपाठीं ॥२॥ तुका म्हणे सर्व कळा ज्याचे अंगीं । भोळेपणालागीं भीक मागे ॥६॥

३७४७. देखिलासी माती खातां । दावियानें बांधी माता ॥१॥ जाळी घेउनि कांबळी काठी । गाई वळी वेणू पाठीं ॥२॥ मोठें भावार्थाचें बळ । देव झाला त्याचें बाळ ॥३॥

**तुका म्हणे भक्तासाठीं । देव धांवे पाठोवाठीं ॥४॥**

**३७४८. हा गे माझे हातीं । पाहा कवळ सांगती ॥१॥ देवें दिला खातों भाग । कराल तरी करा लाग ॥२॥ धालें ऐसें पोट । वरी करूनियां बोभाट ॥३॥ तुका म्हणे घरीं । मग कैंच्या या परी ॥४॥**

**३७४९. अवघे अवघीकडे । दिलें पाहें मजकडे । अशा संवगडे । सहित थोरी लागली ॥१॥ कां रे धरिला अबोला । माझा वांटा देईं मला । सिदोरीचा केला । झाडा आतां निवडेना ॥२॥ भूक लागली अनंता । कां रे नेणसी जाणतां । भागलों वळितां । गाई सैरा ओढाळा ॥३॥ तुका करुणा भाकी । हरि पाहे गोळा टाकी । घेता झाला सुखी । भीतरींवांटी आणीकां ॥४॥**

**३७५०. "अवघियां दिला गोर । मजकरे पाहीना" ॥१॥ फुंदे गोपाळ डोळे चोळी । ढुंगा थापली हाणे तोंडा ॥२॥ आवडती थोर मोटे । मी रे पोरटें दैन्यवाणें ॥३॥ तुका म्हणे जाणों भाव । जीवींचा देव बुझावूं ॥४॥**

[ मृदंग पाट्या ]

**३७५१. मागें पुढें पाहें सांभाळूनी दोनी ठाय । चुकावूनी जाय गडी राखे गडियांसी ॥१॥ मुरडे दंडा दोहीं तोंडा गडियां सावध करी । भेडतियासंगे तया हाल तुजवरी ॥२॥ गडियां गडी वांटुनी देईं ज्याचा सोडी तेचि ठायीं । आगळ्या बळें करील काय तुज देणें लागे डाय ॥३॥ नवां घरीं पाउला करीं सांपडे तो तेथें धरीं । जिंकोनी डाव करीं ठाव सत्ता आणिकांवरी ॥४॥ सांपडोनि डाईं बहु काळ गुंतलासी । बळिया गडी फळी फोडी न धरितां त्यांसी ॥५॥ चुकांडी जो खाय मिळोनी अंगी जाय । गुंतलासी काय तुका म्हणे अझूनी ॥६॥**

**३७५२. आम्ही गोवळीं रानटें । नव्हों जनांतील धीटें ॥१॥ सिदोरीचा करूं काला । एक वाटितो एकाला ॥२॥ खेळों आपआपणाशीं । आमचीं तीं आम्हांपाशीं ॥३॥ म्हणे मिळालें नेणतें । तुका कान्होबा भोंवते ॥४॥**

**३७५३. पाहा रे तमासा तुमचा नव्हे येथें लाग । देईन तो भाग आलियाचा बाहेरी ॥१॥ जागा रे गोपाळानों ठायीं ठायीं जागा । चाहुलीनें भागा दूर मजपासूनी ॥२॥ न रिघतां ठाव आम्हां ठावा पाळतियां । भयाभीत वांयां तेथें काय चांचपाल ॥३॥ तुका म्हणे हातां चढे जीवाचिये साटीं । मिटक्या देतां गोड मग लागतें शेवटीं ॥४॥**

**३७५४. डाईं घालूनियां पोरें । त्यांचीं गुरें चुकविलीं ॥१॥ खेळ खेळतां फोडिल्या डोया । आपण होय निराळा ॥२॥ मारिती माया घेती जीव । नाहीं कींव अन्याया ॥३॥ तुका कान्होबा मागें । तया अंगें कळों आलें ॥४॥**

**३७५५. आतां हेंचि जेऊं । सवें घेऊं सिदोरी ॥१॥ हरिनामाचा खिचडी काला । प्रेमें**

मोहिला साधनें ॥२॥ चवीं चवीं घेऊं घास । ब्रह्मरस आवडी ॥३॥ तुका म्हणे गोड लागे । तों तों मागे रसना ॥४॥

३७५६. अवघेंचि गोड झालें । मागीलिये भरी आलें ॥१॥ साह्य झाला पांडुरंग । दिला अभ्यंतरीं संग ॥२॥ थडिये पावतां तो वाव । मागें पाहतां तो ठाव ॥३॥ तुका म्हणे गेलें । स्वप्नींचें जागें झालें ॥४॥

३७५७. तुज सवें येतों हरी । आम्हां लाज नाहीं तरी । उचलिला गिरी । चांग तईं वांचलों ॥१॥ मोडा आतां खेळ गाई । गेल्या झाला वेळ । फांकल्या ओढाळ । नाहीं तोचि आवरा ॥२॥ चांग दैवें यमुनेसी । वांचलों बुडतां । निलाजिरीं आम्ही नाहीं । भय धाक या अनंता ॥३॥ खातों आगी माती । आतां पुरें हा सांगाती । भोंवतां भोवेल । आम्हां वाटतें हें चित्तीं ॥४॥ तुका म्हणे उरी नाहीं तुजसवें । शाहाणिया दुरी छंद भोळियां भावें ॥५॥

३७५८. नको आम्हांसवें गोपाळा । येऊं ओढाळा तुझ्या गाई ॥१॥ कोण धांवे त्यांच्या लागें । मागें मागें येरझारी ॥२॥ न बैसती एके ठायीं । धांवती दाही दाहा वाटां ॥३॥ तुका म्हणे तूं राख मनेरी । मग त्या येरी आम्ही जाणों ॥४॥

३७५९. मागायास गेलों सिदोरी । तुझ्या मायेघरीं गांजियेलों ॥१॥ तुजविणें ते नेदी कोणा । सांगतां खुणा जिवें गेलों ॥२॥ वांयांविण केली येरझार । आतां पुरे घर तुझी माया ॥३॥ तुका म्हणे तूं आम्हां वेगळा । राहे गोपाळा म्हणउनी ॥४॥

३७६०. काकुलती येतो हरी । क्षणभरी निवडितां ॥१॥ तुमची मज लागली सवे । ठायींचें नवे नव्हों गडी ॥२॥ आणीक बोलाविती फार । बहु थोर नावडती ॥३॥ भाविकें त्याची आवडी मोठी । तुका म्हणे मिठी घाली जिवें ॥४॥

३७६१. वरता वेंघोनी घातली उडी । कळंबाबुडी यमुनेसी ॥१॥ हरी बुडाला बोंब घाला । घरचीं त्याला ठावा नाहीं ॥२॥ भवनदीचा न कळे पार । काळिया माजी थोर विखार ॥३॥ तुका म्हणे वाउग्या हाका । हातींचा गमावुनि थिंका ॥४॥

३७६२. अवघीं मिळोनि कोल्हाळ केला । आतां होता म्हणती गेला ॥१॥ आपुल्याला रडती भावें । जयासवें जयापरी ॥२॥ चुकलों आम्ही खेळतां खेळ । गेला गोपाळ हातींचा ॥३॥ तुका म्हणे धांवती थडी । न घली उडी आतां कोणी ॥४॥

३७६३. भ्यालीं जिवा चुकलीं देवा । नाहीं ठावा जवळी तो ॥१॥ अहाकटा करिती हाय । हात डोकीं पिटिती पाय ॥२॥ जवळी होतां न कळे आम्हां । गेल्या सीमा नाहीं दुःखा ॥३॥ तुका म्हणे हा लाघवी मोटा । पाहे खोटा खरा भाव ॥४॥

३७६४. काळिया नाथूनी आला वरी । पैल हरी दाखविती ॥१॥ दुसरीया भावें न कळे

कोणा । होय नव्हेसा संदेह मना ॥२॥ रूपा भिन्न पालट झाला । गोरें सांवळेंसा पैं देखिला ॥३॥ आश्वासीत आला करें । तुका खरें म्हणे देवा ॥४॥

३७६५. हरि गोपाळांसवें सकळां । भेटे गळ्या गळा मेळवूनी ॥१॥ भाविकें त्यांची आवडी मोठी । सांगे गोष्टी जीवींचिया ॥२॥ योगियांच्या ध्याना नये । भाकरी त्यांच्या मागोनी खाय ॥३॥ तुका म्हणे असे शाहाणियां दुरी । बोबडिया दासां हाका मारी ॥४॥

३७६६. धांव कान्होबा गेल्या गाई । न म्हणें मी कोणा काई ॥१॥ आपुलियांचें वचन देवा । गोड सेवा करीतसे ॥२॥ मागतां आधीं द्यावा डाव । बळिया मी तो नाहीं भाव ॥३॥ तुका म्हणे ऐशा सवें । अनुसरावें जीवेंभावें ॥४॥

३७६७. आणीकें काय थोडीं । परि तीं फार खोटीं कुडीं ॥१॥ सदा मोकळींच गुरें । होतीं फजीत तीं पोरें ॥२॥ सदा घालिती हुंबरी । एक एकाचें न करी ॥३॥ तुका म्हणे घरीं । माय वेळोवेळां मारी ॥४॥

३७६८. बहुतांचे संगती । बहु पावलों फजिती ॥१॥ बरें केलें नंदबाळें । मागिलांचें तोंड काळें ॥२॥ माझा करितील तंटा । लपती आलिया बोभाटा ॥३॥ तुका म्हणे काई । किती म्हणो बाप आई ॥४॥

३७६९. गाईन ते लीळा चरित्र पवाडे । राखिले संवगडे सहित गाई ॥१॥ चोरिलें नवनीत बांधविला गळा । जे तुम्हीं गोपाळा छंद केले ॥२॥ मोहिल्या गोपिका पांवयाच्या छंदें । केली ते गोविंदें क्रीडा गाऊं ॥३॥ मायबापा लाडें दाविलें कौतुक । तें या आणूं सुख अंतरासी ॥४॥ निर्दाळिले दुष्ट भक्तां प्रतिपाळी । ऐसा म्हणों बळी आमुचा स्वामी ॥५॥ तुका म्हणे सरसी असों येणें बोधें । जाणोनी संबंध सर्वकाळ ॥६॥

३७७०. विचार करिती बैसोनि गौळणी । ज्या कृष्णकामिनी कामातुरा ॥१॥ एकांती एकल्या एकाच सुखाच्या । आवडती त्यांच्या गोष्टी त्याला ॥२॥ तर्कवितर्किणी दुराविल्या दुरी । मौन त्या परि चोरी आरंभिली ॥३॥ कुशळा कवित्या कथित्या लोभिका । त्याही येथें नका आम्हापाशीं ॥४॥ बोलक्या वाचाळा कृष्णरता नाहीं । त्यां चोरोनी तिहीं खेट केली ॥५॥ भेऊनियां जना एकीं सवा झाल्या । वाती विझविल्या दाटो बळें ॥६॥ कृष्णसुख नाहीं कळलें मानसीं । निंदिती त्या त्यासी कृष्णरता ॥७॥ तो नये जवळी देखोनी कोल्हाळ । म्हणउनि समेळ मेळविला ॥८॥ अंतरीं कोमळा बाहेरी निर्मळा । तल्लीन त्या बाळा कृष्णध्यानीं ॥९॥ हरिरूपीं दृष्टि कानीं त्याची गोष्टी । आळंगिती कंठीं एकाएकीं ॥१०॥ न साहे वियोग करिती रोदना । भ्रमिष्ट भावना देहाचिया ॥११॥ विसरल्या मागें गृह सुत पती । अवस्था याचिती गोविंदाची ॥१२॥ अवस्था लागोनी निवळचि ठेल्या । एकाएकीं झाल्या

कृष्णरूपा ॥१३॥ कृष्ण म्हणवूनी देती आळिंगण । विरहताप तेणें निवारेना ॥१४॥ ताप कोण वारी गोविंदावांचूनी । साच तो नयनीं न देखतां ॥१५॥ न देखतां त्यांचा प्राण रिघों पाहे । आजी कामा सये उशिर केला ॥१६॥ रित्या ज्ञानगोष्टी तयां नावडती । आळिंगण प्रीति कृष्णाचिया ॥१७॥ मागें आम्हीं कांहीं चुकलों त्याची सेवा । असेल या देवा राग आला ॥१८॥ आठविती मागें पापपुण्यदोष । परिहार एकीस एक देती ॥१९॥ अनुतापें जाल्या संतप्त त्या बाळा । टाकिती विव्हळा धरणीं अंग ॥२०॥ जाणोनी चरित्र जवळीच होता । आली त्या अनंता कृपा मग ॥२१॥ होऊनि प्रगट दाखविलें रूप । तापत्रयताप निवविलें ॥२२॥ निवाल्या देखोनी कृष्णाचें श्रीमुख । शोक मोह दुःख दुरावला ॥२३॥ साच भाव त्यांचा आणूनियां मना । आळंगितो राणा वैकुंठींचा ॥२४॥ हरिअंगसंगें हरिरूप झाल्या । बोलों विसरल्या तया सुखा ॥२५॥ व्यभिचारभावें भोगिलें अनंता । वर्तोनी असतां घराचारी ॥२६॥ सकळां चोरोनी हरि जयां चित्तीं । धन्य त्या नांदती तयामध्यें ॥२७॥ उणें पुरें त्यांचें पडो नेदी कांहीं । राखे सर्वां ठायीं देव तयां ॥२८॥ न कळे लाघव ब्रह्मादिकां माव । भक्तिभावें देव केला तैसा ॥२९॥ तुका म्हणे त्याचा धन्य व्यभिचार । साधिलें अपार निजसुख ॥३०॥

३७७१. स्वयें सुखाचे झाले अनुभव । एक एकीपाशीं सांगतील भाव । अवघ्यां अवघा हा कैसा नवलाव । सर्वसाक्षी तेथेंचि त्याचा जीव वो ॥१॥ आपआपणाशीं करिती नवल । परि वादावाद न सांडिती बोल । एका मेघश्यामें जळधर वोल । रसीं उतावीळ हृदय सखोल वो ॥२॥ एक विषय तो सकळांचा हरि । त्याचा आवडीनें आवडी इतरीं । अंध बहिर हे प्रेतलोकाचारी । त्यांची कीर्ति गाइली पुराणांतरीं वो ॥३॥ स्तुति पराविया मुखें रुचिकर । प्रीतिपात्राचा गौरवीं आदर । परस्परें हें सादरासादर । योग सज्जनाच्या सुखा नाहीं पार वो ॥४॥ भक्तिवालभ न तुटे चराचरीं । आप्त अनाप्त हे ऐशी नाहीं उरी । दुरी जवळी संचिताऐसें धरी । रंगा रंगा ऐसें होणें लागे हरि वो ॥५॥ तुका लाधला हें उच्छिष्ट भोजन । आला बाहेरीं प्रेमें वोसंडून । कानीं पडिलें त्या जीवाचें जतन । धरी एका भावें हृदयीं चरण वो ॥६॥

३७७२. आजी कां वो तूं दिससी दुश्चिती । म्हणिये काम न लगे तुझ्या चित्तीं । दिलें ठेवूं तें विसरसी हातीं । नेणों काय बैसला हरि चित्तीं वो ॥१॥ सर सर परती झालीस आतां भांड । कैसें दाखविसी जगासी या तोंड । व्याली माय ते लाजविली रांड । नाहीं थारा दो ठायीं झाला खंड वो ॥२॥ होतें तैसें ते उमटलें वरी । बाह्य संपादणी अंतरींची चोरी । नाहीं मर्यादा निःसंग बावरी । मन हें गोविंदीं देह काम करी वो ॥३॥ नाहीं करीत उत्तर कोणासवें । पराधीन भोजन दिलें खावें । नाहीं अचळ सावरावा ठावें । देखों उदासीन तुझे गे देहभाव वो ॥४॥ कोठें नेणों हा फावला एकांत । सदा किलकिल भोंवतीं बहुत । दोघे एकवत बोलावया मात । नाहीं लाज धरिली दिला हात वो ॥५॥ करी कवतुक खेळ खेळे कान्हा । दावी लाघव भांडवी

सासुसुना । परा भक्ति हे शुद्ध तुम्ही जाणा । तुका म्हणे ऐसें कळों यावें या जना वो ॥६॥

३७७३. भरिला उलंडूनी रिता करी घट । मीस पाणियाचें गोविंदाची चट । चाले झडझडां उसंतूनी वाट । पाहे पाळतूनी उभा तोंचि नीट वो ॥१॥ चाळा लावियेला गोप गोपीनाथें । जाणे आवडीचें रूप जेथें तेथें । दावी बहुतांच्या बहुवेषपंथें । गुणातीतें खेळ मांडियेला येथें वो ॥२॥ मनीं आवडे तें करावें उत्तर । कांहीं निमित्ताचा पाहोनी आधार । उगा राहे कां मारिसी कंकर । मात वाढविसी उत्तरा उत्तर वो ॥३॥ धरिली खोडी दे टाकोनियां मागें । न ये विनोद हा कामा मशीं संगें । मिठी घालीन या जीवाचिया त्यागें । नाहीं ठाउकीं पडिलीं तुझीं सोंगें वो ॥४॥ सुख अंतरींचें बाह्य ठसठसी । म्हणे विनोद हा काय सोंग यासी । तुज मज काय सोयरीक ऐसी । नंदानंदन या थोरपणें जासी रे ॥५॥ करी कारण तें कळों नेदी कोणा । सुख अंतरींचें बाह्य रंग जना । मन मिनलें रे तुका म्हणे मना । भोग अंतरींचा पावे नारायणा वो ॥६॥

३७७४. आजी नवल मी आलें येणें रानें । भेटी अवचिती नंदाचिया कान्हें । गोवी सांगती वो सकळ ही जन । होतें संचित आणियेलें तेणें वो ॥१॥ गेलें होऊनी न चले आतां कांहीं । साद घालितां जवळी दुजें नाहीं । अंगीं जडला मग उरलें तें काई । आतां राखतां गुमान भलें बाई वो ॥२॥ बहुत कामें मज नाहीं आराणूक । एक सारितां तों पुढें उभें एक । आजी मी टाकोनी आलें सकळीक । तंव रचिलें आणीक कवतुक वो ॥३॥ चिंता करितां हरिली नारायणें । संतसंगें मिनता दोघेजणें । सुखें निर्भर झालियें त्याच्या गुणें । तुका म्हणे खुंटलें येणें जाणें वो ॥४॥

३७७५. मैं भुली घरजानी बाट । गोरस बेचन आयें हाट ॥१॥ कान्हा रे मनमोहन लाल । सबही बिसरूं देखें गोपाल ॥२॥ काहां पग डारूं देखे आनेरा । देखें तो सब वोहिने घेरा ॥३॥ हुं तों थकित भईरे तुका । भागा रे सब मनका धोका ॥४॥

३७७६. हरिबिन रहियां न जाये जिहिरा । कबकी ठाडी देखें राहा ॥१॥ क्या मेरे लाल कवन चुकी भई । क्या मोहिपासिती बेर लगाई ॥२॥ कोई सखी हरी जावे बुलावन । वार हि डारूं उसपर तन ॥३॥ तुका प्रभु कब देखें पाऊं । पासीं आऊं फेर न जाऊं ॥४॥

३७७७. भलो नंदाजीको डिकरो । लाज राखीलीन हमारो ॥१॥ आगळ आवो देवजी कान्हा । मैं घर छोडी आये मान्हा ॥२॥ उनसुं कलना नव्हे तो भला । खसम अहंकार दादुला ॥३॥ तुका प्रभु परबली हरी । छेपी आहे हुं जगाथी न्यारी ॥४॥

३७७८. नका कांहीं उपचार माझ्या शरीरा । करूं न साहावे मज बहु होतो उबारा । मनोजन्य व्यथा वेध झाला अंतरा । लवकरी आणा नंदाचिया कुमरा वो ॥१॥ सखिया वेशिया तुम्ही प्राणवल्लभा । निवेदिला भाव आर्तभूत या लोभा । उमटली अंगीं वो सांवळी प्रभा । साच हे अवस्था कळे मज माझ्या क्षोभा वो ॥२॥ कळों नेदावी हें दुजियासी मात । घडावा तयासी

उत्कंठा एकांत। एकाएकीं साक्षी येथें आपुलें चित्त। कोण्या काळें नेणों होईल भाग्य उदित वो ॥३॥ स्वाद सीण देहभान निद्रा खंडण। पाहिले ताटस्थ उन्मळित लोचन। अवघें वोसाऊन उरले ते चरण। तुका म्हणे दर्शनापें आलें जीवन वो ॥४॥

३७७९. पडिली भुली धांवती सैराट। छंद गोविंदाचा चोजविती वाट। मागें सारुनी सकळ बोभाट। वंदीं पदांबुजें ठेवूनी ललाट वो ॥१॥ कोणी सांगा या गोविंदाची शुद्धि। होतें वाहिलें लपाला आतां खांदीं। कोठें आड आली हे देहबुद्धि। धांवा आळवा करुणा कृपानिधि वो ॥२॥ मागें बहुतांचा अंतरला संग। मुळें जयाचिया तेणें केला त्याग। पैल पाहातां तें हरपलें अंग। खुंटली वाट नाहींसें झालें जग वो ॥३॥ शोक वियोग घडला सकळांचा। गेल्या शरण हा अन्याय आमुचा। केला उच्चार घडल्या दोषांचा। झाला प्रगट स्वामी तुकयाचा वो ॥४॥

३७८०. काय उणें कां करितोसी चोरी। किती सांगों तूं नाइकसी हरी। परेपरता तूं पळोनी जासी दुरी। अनावर या लौकिका बाहेरी वो ॥१॥ माया करुणा हे करिते बहुत। किती सोसूं या जगाचे आघात। नपुरे अवसरु हेंचि नित्यानित्य। तूंचि सोडवीं करूनी स्थिर चित्त वो ॥२॥ बहुत कामें मी गुंतलियें घरीं। जासी डोळा तूं चुकवूनी हरी। करितां लाग न येसी चपळ भारी। नाहीं सायासाची उरों दिली उरी वो ॥३॥ तुज म्हणीयें मी न संगें अनंता। नको जाऊं या डोळियां परता। न लगे जोडी हे तुजविण आतां। तुकया स्वामी कान्होबा गुणभरिता वो ॥४॥

३७८१. आलिये धांवती धांवती भेट होईल म्हूण। तंव ते टळली वेळ वो माझा उरला सीण ॥१॥ आतां काय करूं सांगा वो मज भेटेल कैसा। हरिलागीं प्राण फुटे वो थोरी लागली आशा ॥२॥ लाविती उशीर बहु ओढिती ओढा। सांभाळितां सांग असांग दुःख पावल्यें पीडा ॥३॥ जळो आतां संसारु वो कईं शेवट पुरे। तुकयाच्या स्वामी गोपाळालागीं जीव झुरे ॥४॥

३७८२. घाली कवाड टळली वाड राती। कामें व्यापिली कां पडिली दुश्चिती। कोणे लागला गे सदैवेचे हातीं। आजी शून्य शेजे नाहीं दिसे पति वो ॥१॥ बोले दूतिकेशीं राधा हें वचन। मशीं लाघव दाखवी नारायण। म्हणे कोमळ परी बहु गे निर्गुण। याशीं न बोलें कळला मज पूर्ण वो ॥२॥ धाडिलें गरुडा आणिलें हनुमंता। तैं पाचारिलें होउनि ये वो सीता। लाजिन्नली रूप न ये पालटितां। झाला भीमकी आपण राम सीता वो ॥३॥ सत्यभामा दान करी नारदासी। तैं कळला वो मज हृषीकेशी। तुळे घालितां वो न ये कनक रासी। सम तुकें एक पान तुळसी वो ॥४॥ मज भुली पडली कैशापरी। आम्हां भोगूनी म्हणे मी ब्रह्मचारी। दिली वाट यमुने माये खरी। तुम्हां आम्हां न कळे अद्यापवरी वो ॥५॥ जाणे जीवींचें सकळ नारायण। असे व्यापूनी परि न दिसे लपून। राधा संबोखिली प्रीती आलिंगून। तुका म्हणे येथें भावचि कारण वो ॥६॥

३७८३. मिळोनी गौळणी देती यशोदे गाऱ्हाणीं। दहीं दूध तूप लोणी शिंका नुरेचि कांहीं।

मेळवूनी पोरें तेथें रिघे एकसरें वेगीं आणोनी सामोरें तेथें लोणी खाय ॥१॥ हरि सोंकला वो हरि सोकला वो । सोकला तो वारी तुज लाज नाहीं तरी । आम्हां सांपडतां उरी तुज मज नाहीं ॥२॥ तुज वाटतसे कोड यासी लागतसे गोड । काय हांसतेसी वेड तुज लागलें वो । आम्ही जाऊं तुजवरी पोरें चाळविल्या पोरी । काय सांगों भांडखोरी लाज वाटे आम्हांसी ॥३॥ मुख मळिण वदन उभा हाडतिये घोणे । तंव दसवंती म्हणे आणा शीक लावूं । थोर आणिला कांटाळा घरीं दारीं लोकपाळां । डेरा रिघोनि घुसळा तेथें लोणी खाय ॥४॥ मिळोनीयां सकळा दावें लावूनियां गळा । कैशा बांधिती उखळा येथें राहे उगा । बरा सांपडलासी हरी आजिच्यानें करिसिल चोरी । डोळे घालूनियां येरी येरीकडे हांसे ॥५॥ फांकल्या सकळा उपडूनियां उखळा । मोडी वृक्ष विमळार्जुन दोन्ही । उठिला गजर दसवंती नव्हे धीर । धांवे तुकयाचा दातार आळंगिला वेगीं ॥६॥

३७८४. आंत हरि बाहेर हरि । हरिनें घरीं कोंडिलें ॥१॥ हरिनें कामा घातला चिरा । वित्तवरा मुकविलें ॥२॥ हरिनें जीवें केली साटी । पाडिली तुटी सकळांसी ॥३॥ तुका म्हणे वेगळा नव्हे । हरि हा भोंवे भोंवताला ॥४॥

३७८५. हरिनें माझें हरिलें चित्त । भार वित्त विसरलें ॥१॥ आतां कैसी जाऊं घरा । नव्हे बरा लौकिक ॥२॥ पारखियासी सांगतां गोष्टी । घरची कुटी खातील ॥३॥ तुका म्हणे निवांत राहीं । पाहिलें पाहीं परतूनी ॥४॥

३७८६. बाळपणीं हरी । खेळे मथुरेमाझारीं । पायीं घागरीया सरी । कडदोरा वांकी । मुख पाहे माता । सुख न समाये चित्ता । धन्य मानवे संचिता । वोढवलें आजी ॥१॥ बाळ चांगलें वो । बाळ चांगलें वो । म्हणतां चांगलें । वेळ लागे तया बोलें । जीवापरीस तें वाल्हें । मज आवडतें ॥२॥ मिळोनियां याती । येती नारी कुमरी बहुती । नाहीं आठव त्यां चित्तीं । देहभाव कांहीं । विसरल्या घरें । तान्हीं पारठीं लेंकुरें । धाक सांडोनियां येरें । ताहान भूक नाहीं ॥३॥ एकी असतील घरीं । चित्त तयापासीं परी । वेगीं करोनी वोसारी । तेथें जाऊं पाहे । लाज सांडियेली वोज । नाहीं फजितीचें काज । सुख सांडोनियां सेज । तेथें धांव घाली ॥४॥ वेधियेल्या बाळा । नर नारी या सकळा । बाळा खेळती अबला । त्याही विसरल्या । कुमर कुमरी । नाहीं भाव हा शरीरीं । दृष्टी न फिरे माघारी । तया देखतां ही ॥५॥ वैरभाव नाहीं । आप पर कोणी कांहीं । शोक मोह दुःख ठायीं । तया निरसलीं । तुका म्हणे सुखी । केलीं आपणासारिखीं । स्वामी माझा कवतिकीं । बाळवेषें खेळे ॥६॥

३७८७. होतें बहुत दिवस मानसीं । आजी नवस फळले नवसीं । व्हावी भेटी ते जाली गोविंदासीं । आतां सेवा करीन निश्चयेसीं वो ॥१॥ स्थिर स्थिर मजसि साहे करा । बहु कष्ट सोसिल्या येरझारा । येथें आड मज न साहावे वारा । देऊनि कपाट आलें तें दुसरें वारा वो ॥२॥ मूळ सत्ता हे सायासाची जोडी । नेदी वेगळें होऊं एकी घडी । नाहीं लौकिक स्मरला आवडी ।

आतां येणें काळें या लोभें वेडी वो ॥३॥ उदयीं उदयो साधिला अवकाश। निश्चिंतीनें निश्चिंती सावकाश। धरिये गोडी बहुत आला रस। तुका म्हणे हा मागुता न ये दिवस वो ॥४॥

३७८८. एकली राना गोविंदा सवें। गेलें ठावें तें झालें ॥१॥ मज न म्हणा न म्हणा शिंदळी। नाहीं विषम जवळी आतळलें ॥२॥ नव्हती देखिली म्यां वाट। म्हणोनी हा धीट संग केला ॥३॥ सलगी धरी पयोधर। साहाते कुरमुर सवें ॥४॥ भेणें मिठी दिधली गळां। सेजेजवळा दडालें ॥५॥ आहेव मी गर्भीणपणें। हें सांगणें कां लागे ॥६॥ तुका म्हणे सेवटा नेलें। संपादिलें उभयतां ॥७॥

३७८९. गोरस घेऊनी सातें निघाल्या गौळणी। तंव ती कृष्णाची करणी काय करी तेथें। झाला पानसरा मिठी घातली पदरा। आधीं दान माझें सारा मग चाला पंथें ॥१॥ सर जाऊं दे रे। सर जाऊं दे रे। सर जाऊं दे परता। मुळीं भेटलासी आतां। नाट लागलें संचिता। खेपा खुंटलिया ॥२॥ आसुडी पदरा धरी आणीक दुसरा। येरी झोंबतील करा काय वेडा होसी। आलों गेलों बहु वेळां नेणों गोरा कीं सांवळा। सर परता गोवळा काय बोलतोसी ॥३॥ आम्ही तेथें अधिकारी मागें केली तुम्हीं चोरी। आतां कळलियावरी मागें केलें तयाचें। बोलिल्या हांसुनी आम्ही सासुरवासिनी। कां रे झोंबसी दुरूनी करी मात कांहीं ॥४॥ वांयां परनारी कैसा धरिसी पदरीं। तयां कळलिया उरी तुज मज नाहीं। जडला जिव्हारीं फांको नेदी तया नारी। जेथें वर्म तेथें घरी जाऊं पाहे तियेचें ॥५॥ तया हातीं सांपडल्या हाटीं पाटीं चुकविल्या। कृष्णमिळणीं मिळाल्या त्याही न फिरती। तुका म्हणे खंती वांयां न धरावी चित्तीं। होतें तुमच्या संचितीं वोढवलें आजी ॥६॥

३७९०. हरी तुझी कांति रे सांवळी। मी रे गोरी चांपेकळी। तुझ्या दर्शनें होइन काळी। मग हें वाळी जन मज ॥१॥ उगला राहें न करीं चाळा। तुज किती सांगों रे गोवळा। तुझा खडबड कांबळा। अरे नंदबाळा आलगटा ॥२॥ तुझिये अंगीं घुरट घाणी। बहु खासी दूध तूप लोणी। घरिचें बाहेरिल आणोनी। मी रे चांदणी सुकुमार ॥३॥ मज ते हांसतील जन। धि:कारिती मज देखोन। अंगींचें तुझें देखोनी लक्षण। मग विटंबणा होईल रे ॥४॥ तुज तंव लाज भय शंका नाहीं। मज तंव सज्जन पिशुन व्याही। आणीक मात बोलूं कांहीं। कसी भीड नाहीं तुज माझी ॥५॥ वचन मोडी नेदी हात। कळलें न साहेची मात। तुकयास्वामी गोपीनाथ। जीवन्मुक्त करूनी भोगी ॥६॥

३७९१. सात पांच गौळणी आलिया मिळोनि यशोदे गाऱ्हाणें देती कैसें। काय व्यालीस पोर चोरटें सिरजोर जनावेगळेंचि कैसें। दहीं दूध तूप लोणी शिंकां नुरेचि कांहीं कवाड जैसेंची तैसें। चाळवूनी नाशिलीं कन्याकुमरें आमुच्या सुनांसी लाविलें पिसें गे बाइये ॥१॥ अझुनी तरी यासी सांगे बरव्या परी। नाहीं तरी नाहीं उरी जीवेसाटी। मिळोनी सकळ जणी करूं

वाखा । सेखीं तुज मज होईल तुटी गे बाइये ॥२॥ नेणे आपपर लौकिक वेव्हार । भलते ठायीं भलतें करी । पाळतुनी घरीं आम्ही नसतां । तेथें आपण संचार करी । सोगया चुंबन देतो आलिंगन । लोळे आमुच्या सेजाबाजावरी । शिंकीं कडाडा फोडी गोरसाचे डेरे धरितां न सांपडे करीं गे बाइये ॥३॥ आतां याची चाड नाहीं आम्हां भीड । सांपडतां कोड पुरवूं मनींचें । सोसिलें बहु दिस नव्हता केला निस म्हणुनि एकुलतें तुमचें । चरण खांबीं बांधेन जीवें सरिसा जव न चले कांहीं याचें । अर्थ प्राण देतां न सोडी सर्वथा । भलतें हो या जिवाचें गे बाइये ॥४॥ घेउनी जननी हातीं चक्रपाणी देतसे गौळणी वेळोवेळां । निष्ठुर वाद झणीं बोलाल सकळा । क्षोभ जाइल माझ्या बाळा । जेथें लागे हात वाढतें नवनीत अमृताच्या कल्लोळा । देखोनि तुकयास्वामी देश देहभाव विसरल्या सकळा गे बाइये ॥५॥

३७९२. विरहतापें फुंदे छंद करित जाती । हा गे तो गे सावधान सवेंचि दुश्चिती । न सांभाळुनि अंग लोटी पाहे भोंवतीं । वेगळीच पडों पाहे कुळाहुनि याती वो ॥१ । खुंटलीसी झाली येथें अवघियांची गती । आपले परावे कोण नेणें भोंवतीं । त्यांच्या नांवें बोभे बोभे हाहो श्रीपती । नवलाव हा येरां वाटोनियां हांसती ॥२॥ बाहेरीच धांवे रानां न धरीच घर । नाकळे बंधना झाला तेणें संचार । विसरूनी गेली सासुरें कीं माहेर । एक अवलोकी एका पडिला विसर ॥३॥ तुका म्हणे तुम्ही अवघ्या राहा निश्चळा । नये आतां येऊं येथें सर्वथा बळा । त्याचा त्याच्या मुखें अवघियांचा निर्वाळा । बहुतां मतें येथें तर्कवाद निराळा वो ॥४॥

३७९३. ये रे कृष्णा खुणाविती खेळों भातुकें । मिळालिया बाळा एके ठायीं कवतुकें । कळों नेदी माया त्यासचि तें ठाऊकें । खेळतोंसे दावी लक्षलक्षापें मुकें ॥१॥ अखंडित चटे त्यांनीं लावियेला कान्हा । आवडे तया ते संकल्प वहाती मना । काया वाचा मनें रूपीं गुंतल्या वासना । एकांताचें सुख जाती घेउनियां राना ॥२॥ अवघियांचा जाणें झाला मेळासा हरी । मिळोनियां जावें तेथें तया भीतरी । कळों नेदी घरिंच्या करी गोवूनियां चोरी । हातोहातें नेती परेपरत्या दुरी ॥३॥ आनंदें निर्भर आपणाशीं आपण । क्रीडतील बाळा त्यजिलें पारखें जन । एकाएकीं तेथें नाहीं दुसरें भिन्न । तुका म्हणे एका नारायणावांचून ॥४॥

३७९४. खेळतां मुरारी जाय सरोवरातिरीं । तंव नग्नचि नारी तेथें देखियेल्या । मांडिलें विंदान ख्याल सुखाचें संधान । अंग लपवूनी मान पिलंगत चाले ॥१॥ ख्याल मांडिला रे ख्याल मांडिला रे । पायां पडतां न सोडी नेदी साउलां रे ॥२॥ साड्या साउलीं पातळें गोंडे कसणियाच्या चोळ्या । बुंथी घेउनी सकळां कळंबावरी पळे । खांदी घालूनियां करीं दृष्टि घालोनि सामोरी । बैसे पाला ओढी वरी खदखदां हांसे ॥३॥ आनंदें कल्लोळा बाळा खेळती सकळा । देती उलटिया चपळा एकी एकीहूनी । म्हैस वेले सुरकाडी एकी नागविती कोडीं । नाना

परीच्या विकडी खेळ मांडियेला ॥४॥ एकी आलिया बाहेरी पाहे लुगडें तंव नारी । म्हणे नाहीं नेलें चोरी काय जाणों केव्हां । केला सकळीं हाकारा तंव आलिया बाहेरा । आतां म्हणतील घरा जावे कैशा परी ॥५॥ तंव हांसे वनमाळी वरी पाहोनी सकळी । लाजा रिघालिया जळीं मागें पुढें हात । लाज राखावी गोपाळा आम्हां जणींची सकळां । काय मागसी ये वेळां देऊं गुळवाटी ॥६॥ जोडोनियां कर या गे सकळी समोर । वांयां न बोलावें फार बडबड कांहीं । भातुकें भूषण नाहीं चाड नेघें धन । करा एक चित्त मन या गे मजपाशीं ॥७॥ एक एकीकडे पाहे लाज सोंडूनियां राहे । म्हणे चला आतां सये जाऊं तयापाशीं । जोडोनियां हात कैशा राहिल्या निवांत । तुका म्हणे केली मात लाज राखिली तयांची ॥८॥

३७९५. धरिला पालव न सोडी माझा येणें । कांहीं करितां या नंदाचिया कान्हें । एकली न येतें मी ऐसें काय जाणें । कोठें भरलें या अवघड रानें रे ॥१॥ सोडीं पालव जाऊं दे मज हरी । वेळ लागल्या रे कोपतील घरीं । सासू दारुण सासरा आहे भारी । तुज मज सांगतां नाहीं उरी रे ॥२॥ सखया वेशिया होत्या मजपाशीं । तुज फावलें रे फांकता तयांसी । होतें अंतर तईं सांपडतें कैसी । एकाएकीं अंगीं जडलासी रे ॥३॥ ऐसी भागली हे करितां उत्तर । शक्ति मावळल्या आसुडितां कर । स्वामी तुकयाचा भोगिया चातुर । भोग भोगी त्यांचा राखे लोकाचार वो ॥४॥

३७९६. गाई गोपाळ यमुनेचे तटीं । येती पाणिया मिळोनि जगजेठी । चेंडू चौगुणा खेळती वाळवंटीं । चला चला म्हणती पाहूं दृष्टी वो ॥१॥ ऐशा गोपिका त्या कामातुरा नारी । चित्त विव्हळतें देखावया हरी । मिस पाणियाचें करितील घरीं । बारा सोळा मिळोनि परस्परीं वो ॥२॥ चिरें चोळिया त्या धुतां विसरती । ऊर्ध्व लक्ष लागलें कृष्णमूर्ती । कोणा नाठवे हा कोण कुळ याती । झाल्या तटस्थ सकळां नेत्रापातीं वो ॥३॥ दंतधावनाचा मुखामाजी हात । वाद्यें वाजती नाइके जनमात । करी श्रवण श्रीकृष्णवेणुगीत । स्वामी तुकयाचा पुरवी मनोरथ वो ॥४॥

३७९७. कोठें मी तुझा धरूं गेलें संग । लावियेलें जग माझ्या पाठीं ॥१॥ सर सर रे परता अगुणाच्या गोवळा । नको लावूं चाळा खोटा येथें ॥२॥ रूपाच्या लावण्यें नेली चित्त वृत्ति । न देखें भोंवती मी ते माझी ॥३॥ तुकयाचा स्वामी माझे जीवींच बैसला । बोलींच अबोला करूनियां ॥४॥

३७९८. गोड लागे परी सांगतांचि नये । बैसे मिठी सये आवडीची ॥१॥ वेधलें वो येणें श्रीरंगरंगें । मी हे माझीं अंगें हारपलीं ॥२॥ परतेचि ना दृष्टि बैसली ते ठायीं । विसावोनी पायीं ठेलें मन ॥३॥ तुकयाच्या स्वामीसवें झाली भेटी । तेव्हां झाली तुटी मागिलाची ॥४॥

३७९९. पाहावया माजी नभा । दिसे शोभा चांगली ॥१॥ बैसला तो माझे मनीं । नका कोणी लाजवूं ॥२॥ जीवीं आवडे जीवाहूनी । नव्हे क्षण वेगळा ॥३॥ झालें विश्वंभरा ऐसी ।

तुकया दासी स्वामीची ॥४॥

३८००. कोणी एकी भुलली नारी । विकितां गोरस घ्या म्हणे हरी ॥१॥ देखिला डोळां बैसला मनीं । तोचि वदनीं उच्चारीं ॥२॥ आपुलियाचा विसरभोळा । गोविंद कळा कौतुकें ॥३॥ तुका म्हणे हांसे जन । नाहीं कान ते ठायीं ॥४॥

३८०१. करूनी आइती सत्यभामा मंदिरीं । वाट पाहे तंव टळोनी गेली रात्री । न येतां देव येती कामलहरी । पडिली दुश्चिती तंव तो कवाड टिमकारी वो ॥१॥ सर परता कळला तुझा भाव । कार्यापुरतें दाविसी लाघव । बोल बोलतोसी ते अवघी तुझी माव । जाणोनी आलासी उजडता समयो रे ॥२॥ मीच वेडी तुजलागी बोल नाहीं । दानावेळे विटंबना झाली काई । मागुती रुद्रासी भेटी दिली तईं । विश्वास तो तुझ्या बोला अझूनी तरी नाहीं रे ॥३॥ भ्रम होता तो अवघा कळों आला । मानवत होतें मी भला भला । नष्टा क्रिया नाहीं मा तुझिया बोला । तुकयाबंधु स्वामी कानड्या कौसाल्या रे ॥४॥

३८०२. तंव तो हरि म्हणे निजांगने वो । लइ नीच कां देसील दोहणे वो । मजपें दुजें आलें तें देव जाणें वो । शब्द काय बोलसील ते उणे वो ॥१॥ पाहा मनीं विचारूनी आधीं वो । सांडूनि देह भ्रांति करीं स्थिर बुद्धि वो । तंट केलें हें माझें तुझें उपाधि वो । उघडीं डोळे अझुनी तरी धरीं शुद्धि वो ॥२॥ कोठें तरी दुनियांत वर्तलें वो । स्त्रियांनी भ्रतारा दानासी दिलें वो । कैसा मी भला नव्हे तें सोसिलें वो । रुससी तें तूं उरफाटें नवल झालें वो ॥३॥ काय सांग म्यां दैन्य केली कैसी वो । तुझ्या गर्वे आणिलें हनुमंतासी वो । कष्टी केलें मज गरुडा भीमकेसी वो । तुकयाबंधु म्हणे खरें खोटें नव्हे यासी वो ॥४॥

३८०३. तंव ते म्हणे ऐका हृषीकेशी वो । नावाजलें तुम्ही म्हणा आपणांसी वो । तरी कां वंचनुक सुमनासी वो । नट नाट्य बरें संपादूं जाणसी वो ॥१॥ सर परता आतां वो हरी । म्हणे सत्राजिताची कुमरी । जाणतें मी या शब्दाच्या कुसरी । ऐसेंच करून ठकविलें आजीवरी वो ॥२॥ भावें गेलें म्हूण न व्हावा वियोग । मनींचें आर्त जन्मांतरीं व्हावा संग । तंव त्वां केलें पाटमोरे हें जग । ऐसें काय जाणें वो तुझे रंग ॥३॥ काय करूं मज या नागविलें कामें । लागलें तयास्तव इतुकें सोसावें । नाहीं तरी कां नव्हती ठायीं तुझीं वर्में । परद्वारींसा हाकलिती प्रसिद्ध नामें वो ॥४॥ काय किती सांगावे तुझे गुण । न फुटे वाणी ऐसा निष्ठुर निर्गुण । आप पर न म्हणसी माय बहीण । सासुसुनांस लावूनी पाहासी भांडण वो ॥५॥ इतुकियावरी म्हणे वैकुंठींचा राणा । होऊन गेलें तें नये आणूं मना । आतां न करीं तैसें करी क्रिया आणा । भक्तवत्सल म्हणे तुकयाबंधु कान्हा वो ॥६॥

३८०४. कान्हो ऐकली रे तुजसवें चुकलें रे । भय वाटे जनी मज अबळा धाकली रे ॥१॥

निघतां घरीं आई बा वारी । तुजसवें कां आलियें हरी ॥२॥ लोक वाटा सांगती खोटा । परी मी चटा लागलियें ॥३॥ पिकल्या बोरी झालें सामोरी । काय जाणों कोठें राहिला हरी ॥४॥ आड खुंटा झालिया जाळी । काय जाणो कान्हें मांडिली रळी ॥५॥ तुका म्हणे जाऊं आलिया वाटा । पाहों हरी पायीं न मोडें कांटा ॥६॥

३८०५. क्याला मज आयो वारितेसी घरा । खेळतों सोकरा नंदाचा मी ॥१॥ बहु दिसीं झाली यासीं मज भेटी । आतां वाटे तुटी न परावी ॥२॥ कोवळें बोलतो मना आवरतें । डोळियाचें पातें ढापवेना ॥३॥ आजी सकळांसी आलें चोलूनियां । कां गो पाठी वांयां पुलविली ॥४॥ तुमचें तें काय खोलंबलें काज । बल्या कां गो मज कोंडा घरीं ॥५॥ तुकयाचा धनी वैकुंठनायक । सरा कांहीं एक बोलतों मी ॥६॥

३८०६. आतां न यें मागें । मी आलें याच्या रागें । काय माझें जगें । कोपोनियां करावें ॥१॥ कां गो कलित्या कोल्हाळा । तुम्ही भलत्याच सकळ । वेचाल ते बोल । झुटे होती बोलिले ॥२॥ याचे भेटी माझें मन । स्वरूपीं ठाकले लोचन । वेगळें तें क्षण । आतां होऊं नावरे ॥३॥ काज काम नको झालें । बीजें नावरे बोलिलें । याचिया भेदिलें । कामबाणें अंतर ॥४॥ या वेगळें होणें । आतां जळो तैसें जिणें । घेतलें तें मनें । आतां मागें न फिरे ॥५॥ आतां मोटी वार । माझी नका धरूं चार । सवें तुकयाचा दातार । शेजे तो मी सुतलों ॥६॥

३८०७. हरिता चपळा नारी । लागवरी न रिघती ॥१॥ अवघ्या अंगें सर्वोत्तम । भोगी काम भोगता ॥२॥ वाचा वाच्यत्वासी न ये । कोठें काय करावें ॥३॥ तुका म्हणे देवा ऐशा । देवपिशा उदारा ॥४॥

३८०८. गौळणी आल्या वाज । म्हणती या गे राखों आज । सांपडवूनी माज । घरांत धरूं कोंडुनी ॥१॥ उभें कवाड । उभ्या काळोशाचे आड । साता पांचा एक भीड । मौनेंची ठेल्या ॥२॥ नित्य सोंकवला । नेदी सांगो चित्त बोला । आतां सांपडतां याला । कोण सोडी जीवें ॥३॥ जाणोनियां हरी । त्याच घरा आला चोरी । गडियां ठेवूनी बाहेरी । पूर्वद्वारें शिरे ॥४॥ त्यांच्या भयाभीत चाले । पिलंगत भोंवतालें । पाहें तंव देखियेलें । नवनीत पुढें ॥५॥ उतरोनी सिंकें । पाहे चाखोनियां निकें । गोड तेंचि एका एकें । हातीं लांबवितो ॥६॥ जाणे राखती तयांसी । तेथें अधिकचि नासी । माग लावी हात पुसी । चोरी जाणावया ॥७॥ जाणोनियां नारी । मूळ वर्मद्वार धरी । माज कोंडुनी भीतरी । घरांत धरियेला ॥८॥ कां रे नागविसी । माझे मुळीं लागलासी । आतां आणवीन तुजपाशीं । मागें खादलें तें ॥९॥ दोहीं संधी बाहे । धरूनी नेती माते पाहे । काय नासी केली आहे । घरामाजी येणें ॥१०॥ तुका म्हणे मुख । त्याचें वाटों नेदी दुःख । दसवंती कवतुक । करूनी रंजविल्या ॥११॥

[ बाळक्रीडेचे अभंग ]

३८०९. देवा आदिदेवा जगत्रया जीवा । परियेसी केशवा विनंती माझी ॥१॥ माझी वाणी तुझे वर्णी गुण नाम । ऐसें देईं प्रेम कांहीं कळा ॥२॥ कळा तुजपाशीं आमुचें जीवन । उचित करून देईं आम्हां ॥३॥ आम्हां शरणागतां तुझाचि आधार । तूं तंव सागर कृपासिंधु ॥४॥ सिंधु पायवाट होय तुझ्या नामें । जळतील कर्मे दुस्तरें तीं ॥५॥ तें फळ उत्तम तुझा निजध्यास । नाहीं गर्भवास सेविलिया ॥६॥ सेविलिया रामकृष्ण नारायण । नाहीं त्या बंधन संसाराचें ॥७॥ संसार तो काय तृणवतमय । अग्नि त्यासी खाय क्षणमात्रें ॥८॥ क्षणमात्रें जाळी दोषांचिया रासी । निंद्य उत्तमासी वंद्य करी ॥९॥ करीं ब्रीद साचें आपलें आपण । पतितपावन दीनानाथ ॥१०॥ नाथ अनाथाचा पति गोपिकांचा । पुरवी चित्तींचा मनोरथ ॥११॥ चित्तीं जें धरावें तुका म्हणे दासीं । पुरविता होशी मनोरथ ॥१२॥

३८१०. मनोरथ जैसे गोकुळींच्या जना । पुरवावी वासना तयापरी ॥१॥ रीण फेडावया अवतार केला । अविनाश आला आकारासी ॥२॥ सीण जाला वसुदेवदेवकीस । वधी बाळें कंस दुराचारी ॥३॥ दुराचारियासी नाहीं भूतदया । आप पर तया पाप पुण्य ॥४॥ पुण्यकाळ त्याचा राहिलासे उभा । देवकीच्या गर्भा देव आले ॥५॥ गर्भासी तयांच्या आले नारायण । तुटली बंधनें आपोआप ॥६॥ आपोआप बेड्या तुटल्या शृंखळा । बंदाच्या आर्गळा कुलुपें कोंडें ॥७॥ कोंडमारा केला होता बहु दिस । सोडवी निमिष नलगतां ॥८॥ न कळे तो तया सांगितला भाव । आपणासी ठाव नंदाघरीं ॥९॥ नंदाघरीं जातां येतां वसुदेवा । नाहीं झाला गोवा सवें देव ॥१०॥ सवें देव तया आड नये कांहीं । तुका म्हणे नाहीं भय चिंता ॥११॥

३८११. चिंता ते पळाली गोकुळाबाहेरी । प्रवेश भीतरी केला देवें ॥१॥ देव आला घरा नंदाचिया गांवा । धन्य त्याच्या दैवा देव आले ॥२॥ आले अविनाश धरूनी आकार । दैत्यांचा संहार करावया ॥३॥ करावया भक्तजनांचें पाळण । आले रामकृष्ण गोकुळासी ॥४॥ गोकुळीं आनंद प्रगटलें सुख । निर्भर ते लोक घरोघरीं ॥५॥ घरोघरीं झाला लक्ष्मीचा वास । दैन्यदारिद्र्यास त्रास आला ॥६॥ आला नारायण तयांच्या अंतरा । दया क्षमा नरा नारीलोकां ॥७॥ लोकां गोकुळींच्या झालें ब्रह्मज्ञान । केलियावांचून जपतप ॥८॥ जपतप काय करावीं साधनें । जे त्या नारायणें कृपा केली ॥९॥ केली नारायणें आपुलीं अंकित । तोचि त्यांचें हित सर्व जाणें ॥१०॥ सर्व जाणे एक विष्णु साच खरा । आणीक दुसरा नाहीं नाहीं ॥११॥ नाहीं भक्त दुजा तिहीं त्रिभुवनी । एका चक्रपाणीवांचुनी त्यां ॥१२॥ त्याच्या सुखासंगें घेती गर्भवास । तुका म्हणे आस त्यजूनियां ॥१३॥

३८१२. त्यांच्या पूर्वपुण्या कोण लेखा करी । जिहीं तो मुरारी खेळविला ॥१॥ खेळविला

जिहीं अंतर्बाह्यसुखें । मेळवूनि मुखे चुंबन दिलें ॥२॥ दिलें सुख त्यांसी अंतरींचें देवें । जिहीं एका भावें जाणितला ॥३॥ जाणितला तिहीं कामातुरा नारी । कृष्ण भोगावरी चित्त ज्यांचें ॥४॥ ज्यांचें कृष्णीं तन मन झालें रत । गृह परि सुख विसरल्या ॥५॥ विष तयां झालें धन मान जन । वसविती वन एकांत त्या ॥६॥ एकांती त्या जाती हरिसी घेऊनी । भोगइच्छा धणी फेडावया ॥७॥ वयाच्या संपन्ना तैसा त्यांकारणें । अंतरींचा देणें इच्छाभोग ॥८॥ भोग त्याग दोन्ही नाहीं तयापासीं । तुका म्हणे जैसि स्फटिकशिळा ॥९॥

३८१३. शिळा स्फटिकाची न पालटे भेदें । दाउनियां छंदे जैसी तैसी ॥१॥ जैसा केला तैसा होय क्षणक्षणा । फेडावी वासना भक्तिभावें ॥२॥ फेडावया आला अवघियांची धणी । गोपाळ गौळणी मायबाप ॥३॥ मायबाप सोडविलें बंदीहुनी । चाणूर मर्दनी कंसादिक ॥४॥ अधिक नाहीं देणें अरिमित्रा एक । पूतना कंटक मुक्त केली ॥५॥ मुक्त केला मामा कंस महादोषी । बाळहत्या रासी पातकांच्या ॥६॥ पाप कोठें राहे हरी आठवितां । भक्ती द्वेषें चिंता जैसा तैसा ॥७॥ साक्षी तयापाशीं पूर्वील कर्माचा । बांधला सेवेचा ऋणी देव ॥८॥ देव भोळा धांवे भक्ता पाठोपाठी । उच्चारितां कंठीं मागेंमागें ॥९॥ मानाचा कांटाळा तुका म्हणे त्यासी । धांवतो घरासी भाविकांच्या ॥१०॥

३८१४. चारी वेद ज्याची कीर्ति वाखाणिती । बांधवी ती हातीं गौळणींच्या ॥१॥ गौळणी त्या गळा बांधिती धारणी । पायां चक्रपाणी लागे तया ॥२॥ तयाघरीं रिघे चोरावया लोणी । रितें पाळतुनी शिरे माजी ॥३॥ माजी शिरोनियां नवनीत खाय । कवाड तें आहे जैसें तैसें ॥४॥ जैसा तैसा आहे अंतर्बाह्यात्कारीं । म्हणउनि चोरी न संपडे ॥५॥ न संपडे तया करितां खटपट । वाउगे बोभाट वर्माविण ॥६॥ वर्म जाणती त्या एकल्या एकटा । बैसतील वाटा निरोधूनी ॥७॥ निवांत राहिल्या निःसंग होऊनी । निश्चळ त्या ध्यानीं कृष्णध्यानें ॥८॥ न ये क्षणभरी योगियांचे ध्यानीं । धरिती गौळणी भाविका त्या ॥९॥ भाविका तयांसी येतो काकुलती । शहाण्या मरती न संपडे ॥१०॥ नलगे वेचावी टोली धनानांवे । तुका म्हणे भावें चाड एका ॥११॥

३८१५. चाड अन्यायाची धरी नारायण । आपणासमान करी रंका ॥१॥ रंक होती राजे यमाचिये घरीं । आचरणें बरीं नाहीं म्हूण ॥२॥ नसंपडे इंद्रचंद्रब्रह्मादिकां । अभिमानें एका तिळमात्रें ॥३॥ तिळमात्र जरी होय अभिमान । मेरु तो समान भार देवा ॥४॥ भार पृथिवीचा वाहिला सकळ । जड होती खळ दुष्ट लोक ॥५॥ दुष्ट अभक्त जे निष्ठुर मानसीं । केली हे तयांसी यमपुरी ॥६॥ यमदूत त्यांसी करिती यातना । नाहीं नारायणा भजले जे ॥७॥ जे नाहीं भजले एका भावें हरी । तयां दंड करी यमधर्म ॥८॥ यमधर्म म्हणे तयां दोषियांसी । कां रे केशवासी चुकलेती ॥९॥ चुकलेती कथा पुराणश्रवण । होते तुम्हां कान डोळे मुख ॥१०॥

कान डोळे मुख संतांची संगती । न धराच चित्तीं सांगितलें ॥११॥ सांगितलें संतीं तुम्हां उगवूनी । गर्भासी येऊनी यमदंड ॥१२॥ दंडूं आम्हीं रागें म्हणे यमधर्म । देवा होय श्रम दुर्जनांचा ॥१३॥ दुर्जनांचा येणें करूनी संहार । पूर्णअवतार रामकृष्ण ॥१४॥ रामकृष्णनामें रंजले जे नर । तुका म्हणे घर वैकुंठीं त्या ॥१५॥

३८१६. वैकुंठींच्या लोकां दुर्लभ हरिजन । तया नारायण समागमें ॥१॥ समागम त्यांचा धरिला अनंतें । जिहीं चित्तवित्तें समर्पिलीं ॥२॥ समर्थ ते गाती हरीचे पवाडे । येर ते बापुडे रावराणे ॥३॥ रामकृष्णें केलें कवतुक गोकुळीं । गोपाळांचे मेळीं गाई चारी ॥४॥ गाई चारी मोहोरी पांवा वाहे पाठीं । धन्य जाळी काठी कांबळी ते ॥५॥ काय गौळियांच्या होत्या पुण्यरासी । आणिक त्या म्हैसी गाई पशु ॥६॥ सुख तें अमुप लुटिलें सकळीं । गोपिका गोपाळीं धणीवरी ॥७॥ धणीवरी त्यांसी सांगितली मात । ज्याचें जैसें आर्त तयापरी ॥८॥ परी याचें तुम्ही आइका नवल । दुर्गम जो खोल साधनासी ॥९॥ शिक लावूनियां घालिती बाहेरी । पाहातां भीतरी सवेंची तो ॥१०॥ तोंडाकडे त्यांच्या पाहें कवतुकें । शिव्या देतां सुखें हांसतसे ॥११॥ हांसतसे शिव्या देतां त्या गौळणी । मरतां जपध्यानीं न बोले तो ॥१२॥ तो जें जें करी तें दिसे उत्तम । तुका म्हणे वर्म दावी सोपें ॥१३॥

३८१७. वर्म दावी सोपें भाविकां गोपाळां । वाहे त्यांच्या गळां पाले माळा ॥१॥ मान देती आधीं मागतील डाव । देव तें गौरव सुखें मानी ॥२॥ मानती ते मंत्र हमामा हुंबरी । सिंतोडिती वरी स्नान तेणें ॥३॥ वस्त्रें घोंगडिया घालूनियां तळीं । वरी वनमाळी बैसविती ॥४॥ तिहीं लोकांसी जो दुर्लभ चिंतना । तो धांवे गोधना वळतियां ॥५॥ त्यांच्या वचनाचीं पुष्पें वाहे शिरीं । नैवेद्य त्यांकरीं कवळ मागें ॥६॥ त्यांचिया मुखींचें हरोनियां घ्यावें । उच्छिष्ट तें खावें धणीवरी ॥७॥ वरी माथां गुंफे मोरपिसांवेटी । नाचे टाळी पिटी त्यांच्या छंदें ॥८॥ छंदें नाचतील जयासवें हरी । देहभाव वरी विसरली ॥९॥ विसरली वरी देहाची भावना । तेचि नारायणा सर्वपूजा ॥१०॥ पूजा भाविकांची न कळतां घ्यावी । न मागतां दावी निज ठाव ॥११॥ ठाव पहावया हिंडे मागें मागें । तुका म्हणे संगें भक्तांचिया ॥१२॥

३८१८. भक्तजना दिलें निजसुख देवें । गोपिका त्या भावें आळंगिल्या ॥१॥ आळंगिल्या गोपी गुणवंता नारी । त्यांच्या जन्मांतरीं हरि ऋणी ॥२॥ रुसलिया त्यांचें करी समाधान । करविता आपण क्रिया करी ॥३॥ क्रिया करी तुम्हां न वजे पासूनी । अवघिया जणी गोपिकांसी ॥४॥ गोपिकांसी म्हणे वैकुंठींचा पति । तुझी माझ्या चित्तीं सर्वभावें ॥५॥ भाव जैसा तुम्ही माझ्या ठायीं धरा । तैसाच मी खरा तुम्हांलागीं ॥६॥ तुम्हांसी कळों द्या माझा साच भाव । तुमचाचि जीव तुम्हां ग्वाही ॥७॥ ग्वाही तुम्हां आम्हा असे नारायण । आपुलीच आण वाहतसे

॥८॥ सत्य बोले देव भक्तिभाव जैसा । अनुभव सरसा आणूनियां ॥९॥ त्यासी बुझावितो वेगळाल्या भावें । एकींचें तें ठावें नाहीं एकी ॥१०॥ एक क्रिया नाहीं अवघियांचा भाव । पृथक ते देव देतो तैसें ॥११॥ तैसें कळों नेदी जो मी कोठें नाहीं । अवघियांचे ठायीं जैसा तैसा ॥१२॥ जैसा मनोरथ जया चित्तीं काम । तैसा मेघश्याम पुरवितो ॥१॥ पुरविले मनोरथ गोपिकांचे । आणीक लोकांचे गोकुळींच्या ॥१४॥ गोकुळींच्या लोकां लावियेला छंद । बैसला गोविंद त्यांचें चित्तीं ॥१५॥ चित्तें चोरूनियां घेतलीं सकळा । आवडी गोपाळावरी तयां ॥१६॥ तयांसि आवडे वैकुंठनायक । गेलीं सकळीक विसरोनी ॥१७॥ निंदा स्तति कोणी न करी कोणाची । नाहीं या देहाची शुद्धि कोणा । कोणासी नाठवे कन्या पुत्र माया । देव म्हणुनिया चुंबन देती ॥१९॥ देती टाकूनियां भ्रतारांसी घरीं । लाज ते अंतरीं आथीच ना ॥२०॥ नाहीं कोणा धाक कोणासी कोणाचा । तुका म्हणे वाचा काया मनें ॥२१॥

३८१९. मनें हरिरूपीं गुंतल्या वासना । उदास त्या सुना गौळियांच्या ॥१॥ त्यांच्या भ्रतारांचीं धरूनियां रूपें । त्यांच्या घरीं त्यांपें भोग करी ॥२॥ करी कवतुक त्यांचें तयापरी । एका दिसे हरि एका लेंक ॥३॥ एक भाव नाही सकळांच्या चित्तीं । म्हणवूनि प्रीति तैसें रूप ॥४॥ रूप याचें आहे अवघेंचि एक । परि कवतुक दाखविलें ॥५॥ लेंकरू न कळे स्थूळ कीं लहान । खेळे नारायण कवतुकें ॥६॥ कवतुक केलें सोंग बहु रूप । तुका म्हणे बाप जगाचा हा ॥७॥

३८२०. जगाचा हा बाप दाखविलें माय । माती खातां जाय मारावया ॥१॥ मारावया तिणें उगारिली काठी । भुवनें त्या पोटीं चौदा देखे ॥२॥ देखे भयानक झांकियेले डोळे । मागुता तो खेळे तियेपुढें ॥३॥ पुढें रिघोनियां घाली गळां कव । कळों नेदी माव मायावंता ॥४॥ मायावंत हरीरूप काय जाणे । माझें माझें म्हणे देवा बाळ ॥५॥ बाळपणीं रिठा दगडिला दाढे । मारियेले गाढे कागबग ॥६॥ गळा बांधूनियां उखळासी दावें । उन्मळी त्या भावेंविमळार्जून ॥७॥ न कळे जुनाट जगाचा जीवन । घातलें मोहन गौळियांसी ॥८॥ सिंकीं उतरूनी खाय नवनीत । न कळे बहुत होय तरी ॥९॥ तरी दुध डेरे भरले रांजण । खाय ते भरून दावी दुणी ॥१०॥ दुणी झालें त्याचा मानिती संतोष । दुभत्याची आस धरूनियां ॥११॥ आशाबद्ध देव असोनि जवळी । नेणती ते काळीं स्वार्थामुळें ॥१२॥ मूळ यांचा देव न कळे तयांसी । चित्त अशापाशीं गोंवियेलें ॥१३॥ लेंकरूं आमुचें म्हणे दसवंती । नंदाचिये चित्तीं तोचि भाव ॥१४॥ भाव दावावया चरित्र दाखवी । घुसळितां रवी डेरियांत ॥१५॥ डेरियांत लोणी खादलें रिघोनी । पाहे तों गौळणी हातीं लागे ॥१६॥ हातीं धरूनियां काढिला बाहेरी । देखोनियां करी चोज त्यासी ॥१७॥ सिकवी विचार नेणे त्याची गती । होय कोणे रिती डेरियांत ॥१८॥ यांसी पुत्रलोभें न कळे हा भाव । कळों नेदी माव देव त्यांसी ॥१९॥ त्यांसी मायामोहजाळ घालीत फांसा । देव आपणसा कळों नेदी ॥२०॥ नेदी भाव राहों लोभिकांचे चित्तीं । जाणतांचि होतीं अंधळीं तीं ॥२१॥ अंधळीं तीं तुका म्हणे संवसारीं ।

जिहीं नाही हरी ओळखिला ॥२२॥

३८२१. ओळखी तयाची होय एका भावें। दुसरीया देवें न पविजे ॥१॥ न पविजे कदा उन्मत्त झालिया। दंभ तोचि वांयां नागवण ॥२॥ वनवास देवाकारणें एकांत। करावीं हीं व्रततपें याग ॥३॥ व्रत याग यांसी फळलीं बहुतें। होतीं या संचितें गौळियांचीं ॥४॥ यांसी देवें तारियेलें न कळतां। मागील अनंता ठावें होतें ॥५॥ होतें तें द्यावया आला नारायण। मायबापां ऋण गौळियांचें ॥६॥ गौळियांचें सुख दुर्लभ आणिकां। नाहीं ब्रह्मादिकां तुका म्हणे ॥७॥

३८२२. नेणतियांसाठीं नेणता लहान। थिंकोनी भोजन मागे माये ॥१॥ माया दोनी यास बाप नारायणा। सारखी भावना तयांवरी ॥२॥ तयांवरी त्याचा समचित्त भाव। देवकीवसुदेव नंद दोघे ॥३॥ घेऊनियां एके ठायीं अवतार। एकीं केला थोर वाढवूनी ॥४॥ उणा पुरा यासी नाहीं कोणी ठाव। सारिखाची देव अवघियांसीं ॥५॥ यासी दोनी ठाव सारिखे अनंता। आधील मागता वाढला तो ॥६॥ वाढला तो सेवाभक्तिचिया गुणें। उपचारमिष्टान्नें करूनियां ॥७॥ करूनी सायास मेळविलें धन। तेंही कृष्णार्पण केलें तिहीं ॥८॥ कृष्णासी सकळ गाई घोडे म्हैसी। समर्पिले दासीं जीवें भावें ॥९॥ जीवें भावें त्याची करितील सेवा। न विसंबती नांवा क्षणभरी ॥१०॥ क्षणभरी होता वेगळा तयांस। होती कासावीस प्राण त्यांचे ॥११॥ त्यांचे ध्यानीं मनीं सर्वभावें हरि। देह काम करी चित्त त्यापें ॥१२॥ त्याचेंचि चिंतन कृष्ण कोठें गेला। कृष्ण हा जेविला नाहीं कृष्ण ॥१३॥ कृष्ण आला घरा कृष्ण गेला दारा। कृष्ण हा सोयिरा भेटों कृष्ण ॥१४॥ कृष्ण गाती ओंव्या दळणी कांडणीं। कृष्ण हा भोजनीं पाचारिती ॥१५॥ कृष्ण तयां ध्यानीं आसनीं शयनीं। देखती त्या स्वप्नीं कृष्णरूप ॥१६॥ कृष्ण त्यांस दिसे आभास दुश्चित्ता। धन्य मातापिता तुका म्हणे ॥१७॥

३८२३. कृष्ण हा परिचारी कृष्ण हा व्यवहारी। कृष्ण घ्यावो नारी आणिकी म्हणे ॥१॥ म्हणे कृष्णाविण कैसें तुम्हां गमे। वेळ हा करमे वांयांविण ॥२॥ वांयांविण तुम्ही पिटितां चावटी। घ्या गे जगजेठी क्षणभरी ॥३॥ क्षणभरी याच्या सुखाचा सोहळा। पाहा एक वेळा घेऊनियां ॥४॥ याचें सुख तुम्हा कळलियावरी। मग दारोदारीं न फिराल ॥५॥ लटिकें हें तुम्हां वाटेल खेळणें। एका कृष्णाविण अवघेंचि ॥६॥ अवघ्याच तुम्ही टाकाल सांगात। घेऊनी अनंत जाल राना ॥७॥ नावडे हें तुम्हां आणीक बोलिलें। मग हें लागलें कृष्णध्यान ॥८॥ न करा हा मग या जीवा वेगळा। टोंकवाल बाळा आणिक ही ॥९॥ आणिक ही तुम्हां येती काकुलती। जवळी इच्छिती क्षण बैसों ॥१०॥ बैसों चला पाहों गोपाळाचें मुख। एकी एक सुख सांगतील ॥११॥ सांगे जंव ऐसी मात दसवंती। तंव त्या धरिती चित्तीं बाळा ॥१२॥ बाळा येती घरा घेऊनियां जाती। नाहीं त्या परती तुका म्हणे ॥१३॥

३८२४. तुका म्हणे पुन्हा न येती मागुत्या । कृष्णासीं खेळतां दिवस गमे ॥१॥ दिवस राती कांहीं नाठवे तयांसी । पाहातां मुखासी कृष्णाचिया ॥२॥ याच्या मुखें नये डोळ्यासी वीट । राहिले हे नीट तटस्थचि ॥३॥ तटस्थ राहिलें सकळ शरीर । इंद्रिये व्यापार विसरलीं ॥४॥ विसरलीं तहान भूक घर दार । नाहीं हा विचार असों कोठें ॥५॥ कोठें असों कोण झाला वेळ काळ । नाठवे सकळ विसरल्या ॥६॥ विसरल्या आम्ही कोणीये जातीच्या । वर्णाही चहूंच्या एक झाल्या ॥७॥ एक झाल्या तेव्हां कृष्णाचिया सुखें । नि:शंक भातुकें खेळतील ॥८॥ खेळती भातुकें कृष्णाच्या सहित । नाहीं आशंकित चित्त त्यांचें ॥९॥ चित्तीं तो गोविंद लटिकें दळण । करिती हें जन करिती तैसें ॥१०॥ जन करीं तैसा खेळतील खेळ । अवघा गोपाळ करूनियां ॥११॥ करूनी आपला अवघा गोविंद । जना साच छंद लटिका त्या ॥१२॥ त्यांणीं केला हरी सासुरें माहेर । बंधु हे कुमर दीर भावें ॥१३॥ भावना राहिली एकाचिया ठायीं । तुका म्हणे पायीं गोविंदाचे ॥१४॥

३८२५. गोविंद भ्रतार गोविंद मूळहारी । नामें भेद परि एकचि तो ॥१॥ एकाचींच नामें ठेवियेलीं दोनी । कल्पितील मनीं यावें जावें ॥२॥ जावें यावें तिहीं घरींचिया घरीं । येथींची सिदोरी तेथें न्यावी ॥३॥ विचारितां दिसे येणें जाणें खोटें । दाविती गोमटें लोकां ऐसें ॥४॥ लोक करूनियां साच वर्तताती । तैशा त्या खेळती लटिक्याची ॥५॥ लटिकें करिती मंगळदायकें । लटिकींच एकें एकां व्याही ॥६॥ व्याही भाई हरि सोयरा जावयी । अवघियांच्या ठायीं केला एक ॥७॥ एकासीच पावे जें काहीं करिती । उपचार संपत्ति नाना भोग ॥८॥ भोग देती सर्व एका नारायणा । लटिक्या भावना व्याही भाई ॥९॥ लटिकाचि त्यांणीं केला संवसार । जाणती साचार वेगळा त्या ॥१०॥ त्यांणीं मृत्तिकेचें करूनी अवघें । खेळतील दोघे पुरुषनारी ॥११॥ पुरुषनारी त्यांणीं ठेवियेलीं नांवें । कवतुकभावें विचरती ॥१२॥ विचरती जैसे साच भावें लोक । तैसें नाहीं सुख खेळती त्या ॥१३॥ त्यांणीं जाणितलें आपआपणया । लटिकें हें वांयां खेळतों तें ॥१४॥ खेळतों ते आम्ही नव्हों नारीनर । म्हणोनी विकार नाहीं तयां ॥१५॥ तयां ठावें आहे आम्ही अवघीं एक । म्हणोनी नि:शंक खेळतील ॥१६॥ तयां ठावें नाहीं हरीचिया गुणें । आम्ही कोणकोण काय खेळों ॥१७॥ काय खातों आम्ही कासया सांगातें । कैसें हें लागतें नेणों मुखीं ॥१८॥ मुखीं चवी नाहीं तोंवरी अंगी लाज । वर्ण याती काज न धरिती ॥१९॥ न धरिती कांहीं संकोच त्या मना । हांसता या जना नाइकती ॥२०॥ नाइकती बोल आणिकांचे कानीं । हरि ध्यानीं मनीं बैसलासे ॥२१॥ बैसलासे हरि जयांचिया चित्तीं । तयां नावडती मायबापें ॥२२॥ मायबापें त्यांचीं नेती पाचारूनी । बळें परि मनीं हरि वसे ॥२३॥ वसतील बाळा आपलाले घरीं । ध्यान त्या अंतरीं गोविंदाचें ॥२४॥ गोविंदाचें ध्यान निजलिया जाग्या । आणीक वाउग्या न बोलती ॥२५॥ न बोलती निजलिया हरिविण । जागृति स्वप्न एक झालें ॥२६॥ एकविध सुख घेतील त्या बाळा । भ्रमर परिमळालागीं जैसा ॥२७॥ जैसा ज्याचा

भाव घेतला त्यांपरी । तुका म्हणे हरि बाळलीला ॥२८॥

३८२६. लीळाविग्रही तो लेववी खाववी । यशोदा बैसवी मांडीवरी ॥१॥ मांडीवरी भार पुष्पाचिये परी । बैसोनियां करी स्तनपान ॥२॥ नभाचाही साक्षी पाताळापरता । कुर्वाळिते माता हातें त्यासी ॥३॥ हातें कुर्वाळूनी मुखीं घाली घास । पुरे म्हणे तीस पोट धालें ॥४॥ पोट धालें मग देतसे ढेंकर । भक्तिचें तें फार तुळसीदळ ॥५॥ तुळसीदळ भावें सहित देवा पाणी । फार तें त्याहुनी क्षीरसागर ॥६॥ क्षीराचा कांटाळा असे एक वेळ । भक्तीचें तें जळ गोड देवा ॥७॥ देवा भक्त जिवांहुनी आवडती । सकळहि प्रीति त्यांच्या ठायीं ॥८॥ त्यांचा हा अंकित सर्व भावें हरि । तुका म्हणे करी सर्व काज ॥९॥

३८२७. जियेवेळीं चोरूनियां नेलीं वत्सें । तयालागीं तैसें होणें लागे ॥१॥ लागे दोहों ठायीं करावें पाळण । जगाचा जीवन मायबाप ॥२॥ माय झाला हरी अवघ्या वत्सांची । घरीं वत्सें जीची तैसा झाला ॥३॥ झाला तैसा जैसे घरींचे गोपाळ । आणिक सकळ मोहरी पांवे ॥४॥ मोहरी पांवे सिंगें वाहिल्या काहाळा । देखिला सोहळा ब्रह्मादिकीं ॥५॥ ब्रह्मादिकां सुख स्वप्नीं तेंही नाहीं । तैसें दोहीं ठायीं वोसंडलें ॥६॥ वोसंडल्या क्षीर अमुप त्या गायी । जैसी ज्याची आई तैसा झाला ॥७॥ लाघव कळलें ब्रह्मयासी याचें । परब्रह्म साचें अवतरलें ॥८॥ तरले हे जन सकळही आतां । ऐसें तो विधाता बोलियेला ॥९॥ लागला हे स्तुति करूं अनंताची । चतुर्मुखें वाची भक्तिस्तोत्रें ॥१०॥ भक्तिकाजें देवें केला अवतार । पृथिवीचा भार फेडावया ॥११॥ पृथिवी दाटिली होती या असुरीं । न साहावे वरी भार तये ॥१२॥ तया काकुलती आपल्या दासांची । तयालागीं वेंची सर्वस्वही ॥१३॥ स्वहित दासांचें करावया लागीं । अव्यक्त हें जगीं व्यक्ती आलें ॥१४॥ लेखा कोण करी त्यांचिया पुण्याचा । जयांसवें वाचा बोले हरी ॥१५॥ हरी नाममात्रें पातकांच्या रासी । तो आला घरासी गौळियांच्या ॥१६॥ गौळिये अवघीं झालीं कृष्णमय । नामें लोकत्रय तरतील ॥१७॥ तरतील नामें कृष्णाचिया दोषी । बहुत ज्यांपाशीं होइल पाप ॥१८॥ पाप ऐसें नाहीं कृष्णनामें राहे । धन्य तोचि पाहे कृष्णमुख ॥१९॥ मुख माझें काय जो मी वर्णूं पार । मग नमस्कार घाली ब्रह्मा ॥२०॥ ब्रह्मा नमस्कार घाली गोधनासी । कळला तयासी हाचि देव ॥२१॥ देवचि अवघा झालासे सकळ । गाई हा गोपाळ वत्सें तेथें ॥२२॥ तेथें जें पाहाणें आणीक दुसरें । मूर्ख त्यानंतरें दुजा नाहीं ॥२३॥ दुजा भाव तुका म्हणे जया चित्तीं । रवरव भोगिती कुंभपाक ॥२४॥

३८२८. कुंभपाक लागे तयासी भोगणें । अवघाचि नेणे देव ऐसा ॥१॥ देव ऐसा ठावा नाहीं जया जना । तयासी यातना यम करी ॥२॥ कळला हा देव तयासीच खरा । गाई वत्सें घरा धाडी ब्रह्मा ॥३॥ ब्रह्मादिकां देव ऐसा अगोचर । कैसा त्याचा पार जाणवेल ॥४॥ जाणवेल देव गौळियांच्या भावें । तुका म्हणे व्हावें संचित हें ॥५॥

३८२९. संचित उत्तम भूमि कसूनियां । जाऊं नेदी वांयां पेरी त्याचें ॥१॥ त्याचिया पिकासी आलिया घुमरी । आल्या गाईवरी आणिक गाई ॥२॥ गाई दडवूनी घालिती बाहेर । तंव म्हणे हरि बांधा त्याही ॥३॥ त्याही तुम्ही बांधा तुमच्या सारिख्या । भोवंडा पारिख्या वाड्यांतुनी ॥४॥ पारिख्या न येती कोणाचिया घरा । सूत्रधारी खरा नारायण ॥५॥ नारायण नांदे जयाचिये ठायीं । सहज तेथें नाहीं घालमेली ॥६॥ मेलीं हीं शहाणीं करितां सायास । नाहीं सुखलेश तुका म्हणे ॥७॥

३८३०. तुका म्हणे सुख घेतलें गोपाळीं । नाचती कांबळीं करुनी ध्वजा ॥१॥ करूनियां टिरी आपुल्या मांदळ । वाजविती टाळ दगडांचे ॥२॥ दगडांचे टाळ कोण त्यांचा नाद । गीतीं गातां छंद ताल नाहीं ॥३॥ ताल नाहीं गातां नाचतां गोपाळा । घननीळ सांवळा तयांमध्यें ॥४॥ मध्यें जयां हरि तें सुख आगळें । देहभाव काळें नाहीं तयां ॥५॥ तयांसी आळंगी आपुलिया करीं । जाती भूमीवरी लोटांगणीं ।६॥ निजभाव देखे जयांचिये अंगीं । तुका म्हणे संगीं क्रीडे तयां ॥७॥

३८३१. तयांसवें करी काला दहींभात । सिदोऱ्या अनंत मेळवुनी ॥१॥ मेळवुनी अवघियांचे एके ठायीं । मागें पुढें कांहीं उरों नेदी ॥२॥ नेदी चोरी करूं जाणे अंतरींचें । आपलेंही साचें द्यावें तेथें ॥३॥ द्यावा दहींभात आपला प्रकार । तयांचा व्यवहार सांडवावा ॥४॥ वांटी सकळांसी हातें आपुलिया । जैसें मागे तया तैसें द्यावें ॥५॥ द्यावें सांभाळुनी सम तुकभावें । आपणहि खावें त्यांचे तुकें ॥६॥ तुक सकळांचें गोविंदाचे हातीं । कोण कोणे गति भला बुरा ॥७॥ राखी त्यांस तैसा आपुलाल्या भावें । विचारूनी द्यावें जैसें तैसें ॥८॥ तैसें सुख नाहीं वैकुंठींच्या लोकां । तें दिलें भाविकां गोपाळांसी ॥९॥ गोपाळांचे मुखीं देऊनी कवळ । घांस माखे लाळ खाय त्यांची ॥१०॥ त्यांचिये मुखींचे हिरोनियां घांस । झोंबती हातास खाय बळें ॥११॥ बळें जयाचिया ठेंगणें सकळ । तयातें गोपाळ पाडितील ॥१२॥ पाठीं उचलूनी वाहातील खांदीं । नाचतील मांदीं मेळवूनी ॥१३॥ मांदी मेळवूनी धणी दिली आम्हां । तुका म्हणे जमा केल्या गाई ॥१४॥

३८३२. केला पुढें हरि अस्तमाना दिसे । मागें त्यासरिसे थाट चाले ॥१॥ थाट चाले गाई गोपाळांची धूम । पुढें कृष्णराम तयां सोयी ॥२॥ सोयी लागलीया देवाची आवर्ती । न बोलावितां येती मागें तयां ॥३॥ तयांचिये चित्तीं बैसला अनंत । घेती नित्य नित्य तेंचि सुख ॥४॥ सुख नाहीं कोणा हरीच्या वियोगें । तुका म्हणे युगें घडी जाय ॥५॥

३८३३. जाय फांकोनियां निवडोनी गाई । आपलाले सोयी घराचिये ॥१॥ घराचिये सोयी अंतरला देव । गोपाळांचा जीव गोविंदापें ॥२॥ गोविंदें वेधिलें तुका म्हणे मन ।

वियोगेंही ध्यान संयोगाचें ॥३॥

३८३४. संयोग सकळां असे सर्वकाळ। दुश्चित गोपाळ आला दिसे ॥१॥ गोपाळ गुणाचा म्हणे गुणमय। निंबलोण मायें उतरिलें ॥२॥ उतरूनी हातें धरी हनुवटी। ओवाळुनी दिठी सांडियेली ॥३॥ दिठी घाली माता विश्वाच्या जनका। भक्तीचिया सुखा गोडावला ॥४॥ लहान हा थोर जीवजंतु भूतें। आपण दैवतें झाला देवी ॥५॥ देवी म्हैसासुर मुंजिया खेचर। लहान हा थोर देव हरि ॥६॥ हरी तुका म्हणे अवघा एकला। परी हा धाकुला भक्तीसाठीं ॥७॥

३८३५. भक्तीसाठीं करी यशोदेसी आळी। थुंकोनियां चोळी डोळे दैव ॥१॥ देव गिळूनियां धरिलें मोहन। माय म्हणे कोण येथें दुजा ॥२॥ दुजें येथें कोणी नाही कृष्णाविण। निरुते जाणोन पुसे देवा ॥३॥ देवापाशीं पुसे देव काय झाला। हांसें आलें बोला याचे हरि ॥४॥ यांचे मी जवळी देव तो नेणती। लटिकें मानिती साच खरें ॥५॥ लटिकें तें साच साच तें लटिकें। नेणती लोभिकें आशाबद्ध ॥६॥ सांग म्हणे माय येरू वासी तोंड। तंव तें ब्रह्मांड देखे माजी ॥७॥ माजी जया चंद्र सूर्य तारांगणें। तो भक्तांकारणें बाळलीळा ॥८॥ लीळा कोण जाणे याचें महिमान। जगाचें जीवन देवा देव ॥९॥ देवें कवतुक दाखविलें तयां। लागतील पायां मायबाप ॥१०॥ मायबाप म्हणे हाचि देव खरा। आणीक पसारा लटिका तो ॥११॥ तोही त्यांचा देव दिला नारायणें। माझें हें करणें तोही मीच ॥१२॥ मीच म्हणउनी जें जें जेथें ध्याती। तेथें मी श्रीपती भोगिता तें ॥१३॥ तें मज वेगळें मी तयां निराळा। नाहीं या सकळा ब्रह्मांडांत ॥१४॥ तद्भावना इच्छा भावितसे त्यांचें। फळ देता साचें मीच एक ॥१५॥ मीच एक खरा बोले नारायण। दाविलें निर्वाण निजदासां ॥१६॥ निजदासां खूण दाविली निरुती। तुका म्हणे भूतीं नारायण ॥१७॥

३८३६. नारायण भूतीं न कळे जयांसी। तयां गर्भवासीं येणेंजाणें ॥१॥ येणें जाणें होय भूतांच्या मत्सरें। न कळतां खरें देव ऐसा ॥२॥ देव ऐसा जया कळला सकळ। गेली तळमळ देहबुद्धि ॥३॥ बुद्धिचा पालट नव्हे कदा काळीं। हरि जळीं स्थळीं तयां चित्तीं ॥४॥ चित्त तें निर्मळ जैसें नवनीत। जाणिजे अनंत तयामाजी ॥५॥ तयामाजी हरि जाणिजे त्या भावें। आपुलें परावें सारिखेंचि ॥६॥ चिंतनें तयाच्या तरती अनेक। जो हें सकळीक देव देखे ॥७॥ देव देखे तोही देव कैसा नव्हे। उरला संदेह काय त्यासी ॥८॥ काया वाचा मनें पूजावे वैष्णव। मनीं शुद्ध भाव धरूनीयां ॥९॥ यांसी कवतुक दाखविलें रानीं। वोणवा गिळूनी गोपाळांसीं ॥१०॥ गोपाळांचें डोळे झाकविले हातें। धरिलें अनंतें विश्वरूप ॥११॥ पसरूनी मुख गिळियेली ज्वाळ। पाहाती गोपाळ बोटां सांदी ॥१२॥ संधि सारूनियां पाहिलें अनंता। म्हणती ते आतां कळलासी ॥१३॥ कळला हा तुझा देह नव्हे देवा। गिळीला वोणवा आणीक तो ॥१४॥ तों तयां कळला आरुष गोपाळां। दुर्गम सकळां साधनांसी ॥१५॥ सीण उरे तुका म्हणे साधनाचा।

भाविकासी साचा भाव दावी ॥१६॥

३७३७. भाव दावी शुद्ध देखोनियां चित्ता । आपल्या अंकिता निजदासां ॥१॥ सांगे गोपाळांसी काय पुण्य होतें । वांचलों जळते आगीहातीं ॥२॥ आजी आम्हां येथें वांचविलें देवें । नाहीं तरी जीवें न वांचतों ॥३॥ न वांचत्या गाई जळतों सकळें । पूर्वपुण्यबळें वांचविलें ॥४॥ पूर्वपुण्य होतें तुमचिया गांठीं । बोले जगजेठी गोपाळांसी ॥५॥ गोपाळांसी म्हणे वैकुंठनायक । भले तुम्ही एक पुण्यवंत ॥६॥ करी तुका म्हणे करवी आपण । द्यावें थोर पण सेवकांसी ॥७॥

३८३८. काय आम्हां चाळविसी वांयांविण । म्हणती दुरून देखिलासी ॥१॥ लावूनियां डोळे नव्हतों दुश्चित । तुज परचित्त माव होती ॥२॥ होती दृष्टि आंत उघडी आमची । बाहेरी ती वाची कुची झाकूं ॥३॥ झालासी तूं थोर थोरल्या तोंडाचा । गिळियेला वाचा धूर आगी ॥४॥ आगी खातो ऐसा आमचा सांगाती । आनंदें नाचती भोंवतालीं ॥५॥ भोंवतीं आपणा मिळविलीं देवें । तुका म्हणे ठावें नाहीं ज्ञान ॥६॥

३८३९. नाहीं त्याची शंका वैकुंठनायका । नेणती ते एकाविण दुजा ॥१॥ जाणतियां सवें येऊं नेदी हरि । तर्कवादी दुरी दुराविले ॥२॥ वादियांसीं भेद निंदा अहंकार । देऊनियां दूर दुराविले ॥३॥ दुराविले दूर आशाबद्ध देवा । करितां या सेवा कुटुंबाची ॥४॥ चित्तीं द्रव्यदारा पुत्रादि संपत्ती । समान ते होती पशु नर ॥५॥ नरक साधिला विसरोनी देवा । बुडाले ते भवनदीमाजी ॥६॥ जिहीं हरिसंग केला संवसारी । तुका म्हणे खरी खेप त्यांची ॥७॥

३८४०. खेळींमेळीं आले घरा गोपीनाथ । गोपाळांसहित मातेपाशीं ॥१॥ मातेपाशीं एक नवल सांगती । झाली तैसी ख्याती वोणव्याची ॥२॥ ओवाळिलें तिनें करूनी आरती । पुसे दसवंती गोपाळांसी ॥३॥ पुसे पडताळुनी मागुती मागुती । गोपाळ सांगती कवतुक ॥४॥ कवतुक कानीं आइकतां त्यांचे । बोलतां ये वाचे वीट नये ॥५॥ नयन गुंतले श्रीमुख पाहतां । न साहे लवतां आड पातें ॥६॥ तेव्हां कवतुक कळों आलें कांहीं । हळूहळू दोहीं मायबापां ॥७॥ हळूहळू त्यांचें पुण्य झालें वाड । वारलें हें जाड तिमिराचें ॥८॥ तिमिर हें तेथें राहों शके कैसें । झालिया प्रकाशें गोविंदाच्या ॥९॥ दावी तुका म्हणे देव ज्या आपणा । पालटे तो क्षणामाजी एका ॥१०॥

३८४१. काय आतां यासी म्हणावें लेंकरूं । जगाचा हा गुरु मायबाप ॥१॥ माया याची यासी राहिली लपून । कळों नये क्षण एक होतां ॥२॥ क्षण एक होतां विसरली त्यासी । माझें माझें ऐसें करी बाळा ॥३॥ करुनी कवतुक कळों नेदी कोणा । योजूनी कारणा तेंचि खेळे ॥४॥ तें सुख लुटिलें घरींचिया घरीं । तुका म्हणे परी आपुलाल्या ॥५॥

३८४२. आपुलाल्यापरी करितील सेवा । गीत गाती देवा खेळवूनी ॥१॥ खेळ मांडियेला यमुनेपाबळीं । या रे चेंडूफळी खेळूं आतां ॥२॥ आणविल्या डांगा चवगुणांतु काठी । बैसोनियां

वांटी गडियां गडी ॥३॥ गडी जंव पाहे आपणासमान। नाहीं नारायण म्हणे दुजा ॥४॥ जाणोनी गोविंदें सकळांचा भाव। तयांसी उपाव तोचि सांगे ॥५॥ सांगे सकळांसी व्हा रे एकीठाईं। चेंडू राखा भाई तुम्ही माझा ॥६॥ मज हा नलगे आणीक सांगाती। राखावी बहुतीं हाल माझी ॥७॥ माझे हाके हाक मेळवा सकळ। न वजा बरळ एकमेकां ॥८॥ एका समतुकें अवघेचि राहा। जाईल तो पाहा धरा चेंडू ॥९॥ चेंडू धरा ऐसें सांगतों सकळां। आपण निराळा एकलाचि ॥१०॥ चिंतूनियां चेंडू हाणे ऊर्ध्वमुखें। ठेलीं सकळिक पाहातचि ॥११॥ पाहातचि ठेलीं न चलतां कांहीं। यारे लवलाहीं म्हणे धरा ॥१२॥ धरावा तयानें त्याचें बळ त्यासी। येरा आणिकांसी लाग नव्हे ॥१३॥ नव्हे काम बळ बुद्धि नव्हे त्याचें। न धरवे नीचें उंचाविण ॥१४॥ विचारी पडिले देखोनी गोपाळ। या म्हणे सकळ माझ्या मागें ॥१५॥ मार्ग देवाविण न दिसे आणिका। चतुर होत का बहुत जन ॥१६॥ चतुर चिंतिती बहुत मारग। हरि जाय माग पाहोनियां ॥१७॥ यामागें जे आले गोविंदा गोपाळ। ते नेले सीतळ पंथ ठायां ॥१८॥ पंथ ते चुकले आपले मतीचे। तयांमागें त्यांचे तेचि हाल ॥१९॥ हाल दोघां एक मोहरे मागिलां। चालतां चुकला वाट पंथ ॥२०॥ पंथ पुढिलांसी चालतां न कळे। मागिलांनीं डोळे उघडावे ॥२१॥ वयाच्या प्रबोधें विचार ज्या नाहीं। समान तो देहीं बाळकासी ॥२२॥ सिकविलें हित नाइके जो कानीं। त्यामागें भल्यांनीं जाऊं नये ॥२३॥ नये तेंचि करी श्रेष्ठाचिया मना। मूर्ख एक जाणा तोचि खरा ॥२४॥ रानभरी झाले न कळे मारग। मग तो श्रीरंग आठविला ॥२५॥ लाज सांडूनियां मारितील हाका। कळलें नायका वैकुंठींच्या ॥२६॥ चारी वेद ज्याची कीर्ती वाखाणिती। तया अति प्रीति गोपाळांची ॥२७॥ गोपाळांचा धांवा आइकिला कानीं। सोयी चक्रपाणी पावविलें ॥२८॥ सोयी धरूनियां आले हरिपासीं। लहान थोरांसी सांभाळिलें ॥२९॥ सांभाळिलें तुका म्हणे सकळही। सुखी झाले तेही हरिमुखे ॥३०॥

३८४३. मुखें सांगे त्यांसी पैल चेंडू पहा। उदकांत डोहाचिया माथा ॥१॥ माथां कळंबाचे अवघडा ठायीं। दावियेला डोहीं जळामाजी ॥२॥ जळांत पाहाती हाडतीये दृष्टि। म्हणे जगजेठी ऐसें नव्हे ॥३॥ नव्हे साच चेंडू छाया दिसे आंत। खरें तेथें चित्त लावा वरी ॥४॥ वरी देखियेला अवघ्यांनीं डोळां। म्हणती गोपाळा आतां कैसें ॥५॥ कैसें करूनियां उतरावा खालीं। देखोनियां भ्यालीं अवघीं डोहो ॥६॥ डोहो बहु खोल काळ्या भीतरीं। सरलीं माघारीं अवघीं जणें ॥७॥ जयाचें कारण तयासींच ठावें। पुसे त्याच्या भावें त्यास हरी ॥८॥ त्यासी नारायण म्हणे रहा तळीं। चढे वनमाळी झाडावरी ॥९॥ वरी जातां हरि पाहाती सकळ। म्हणती गोपाळ आम्ही नेणों ॥१०॥ नेणों म्हणती हें करितोसी काई। आम्हां तुझी आई देईल सिव्या ॥११॥ आपुलिया काना ठेवुनियां हात। सकळीं निमित्य टाळियेलें ॥१२॥ निमित्याकारणें रचिलें कारण। गेला नारायण खांदीवरी ॥१३॥ खांदीवरी पाव ठेवियेला देवें। पाडावा त्या

भावें चेंडू तळीं ॥१४॥ तळील नेणती तुका म्हणे भाव । अंतरींचा देव कळों नेदी ॥१५॥

३८४४. नेदी कळों केल्याविण तें कारण । दाखवी आणून अनुभवा ॥१॥ न पुरेसा हात घाली चेंडूकडे । म्हणितलें गडे सांभाळावें ॥२॥ सांभाळ करिता सकळ जीवांचा । गोपाळांसी वाचा म्हणे बरें ॥३॥ बरें विचारूनी करावें कारण । म्हणे नारायण बऱ्या बरें ॥४॥ बरें म्हणूनियां तयांकडे पाहे । सांडविला जाय चेंडू तळा ॥५॥ तयासवें उडी घातली अनंतें । गोपाळ रडत येती घरा ॥६॥ येता त्यांचा लोकीं देखिला कोल्हाळ । सामोरीं सकळ आलीं पुढें ॥७॥ पुसती ते मात तया गोपाळांसी । हरिदु:खें त्यांसी न बोलवे ॥८॥ न बोलवे हरि बुडालासें मुखें । कुटितील दु:खें ऊर माथे ॥९॥ मायबापें तुका म्हणे न देखती । तैसें दु:ख चित्तीं गोपाळांच्या ॥१०॥

३८४५. गोपाळां उभडु नावरे दु:खाचा । कुंठित हे वाचा झाली त्यांची ॥१॥ झालें काय ऐसें न कळे कोणासी । म्हणती तुम्हांपासीं देव होता ॥२॥ देवासवें दु:ख न पवतें ऐसें । कांही अनारिसें दिसे आजी ॥३॥ आजी दिसे हरि फांकला यांपाशीं । म्हणऊनि ऐशी परी झाली ॥४॥ जाणविल्याविण कैसें कळे त्यांसी । शहाणे तयांसी कळों आलें ॥५॥ कळों आलें तिहीं स्फुंद शांत केला । ठायींचाच त्याला थोडा होता ॥६॥ होता तो विचार सांगितला जना । गोपाळ शहाणा होता त्याणें ॥७॥ सांगे आतां हरि तुम्हां आम्हां नाहीं । बुडालासे डोहीं यमुनेच्या ॥८॥ यासी अवकाश नव्हेचि पुसता । झालिया अनंता कोण परी ॥९॥ परी त्या दु:खाची काय सांगों आतां । तुका म्हणे माता लोकपाळा ॥१०॥

३८४६. पाषाण फुटती तें दु:ख देखोनी । करितां गौळणी शोक लोकां ॥१॥ काय ऐसें पाप होतें आम्हांपासीं । बोलती एकासी एक एका ॥२॥ एकांचिये डोळां असू बाह्यात्कारीं । नाहीं ती अंतरीं जळतील ॥३॥ जळतील एकें अंतर्बाह्यात्कारें । टाकिलीं लेंकुरें कडियेहूनी ॥४॥ निवांतचि एकें राहिलीं निश्चिंत । बाहेरी ना आंत जीव त्याचे ॥५॥ त्याचे जीवावरी आले त्या सकळा । एका त्या गोपाळावांचूनियां ॥६॥ वांचणें तें आतां खोटें संवसारीं । नव्हे भेटी जरी हरीसवें ॥७॥ सवें घेऊनियां चालले गोपाळां । अवघींच बाळा नर नारी ॥८॥ नर नारी नाहीं मनुष्याचें नांव । गोकुळ हें गांव सांडियेलें ॥९॥ सांडियेलीं अन्नें संपदा सकळ । चित्तीं तो गोपाळ धरुनी जाती ॥१०॥ तिरीं माना घालूनियां उभ्या गाई । तटस्थ या डोही यमुनेच्या ॥११॥ यमुनेच्या तिरीं झाडें वृक्ष वल्ली । दु:खें कोमाइलीं कृष्णाचिया ॥१२॥ यांचें त्यांचें दु:ख एक झालें तिरीं । मग शोक करी मायबाप ॥१३॥ मायबाप तुका म्हणे सहोदर । तोंवरीच तीर न पवतां ॥१४॥

३८४७. तीर देखोनियां यमुनेचें जळ । कांठींच कोल्हाल करीताती ॥१॥ कड्वाड नव्हे घालावया उडी । आपणासी ओढी भय मागें ॥२॥ मागें सरे माय पाउलापाउलीं । आपलेंच घाली धाकें अंग ॥३॥ अंग राखोनियां माय खेद करी । अंतरीं हें हरी जाणवलें ॥४॥ जाणवलें मग

देवें दिली बुडी । तुका म्हणे कुडी भावना हे ॥५॥

३८४८. भावनेच्या मुळें अंतरला देव । शिरला संदेह भय पोटीं ॥१॥ पोटीं होतें मागें जीव द्यावा ऐसें । बोलिल्या सरिसें न करवे ॥२॥ न करवे त्याग जीवाचा या नास । नारायण त्यास अंतरला ॥३॥ अंतरला बहु बोलतां वाउगें । अंतरींच्या त्यागेंविण गोष्टी ॥४॥ गोष्टी सकळांच्या आइकिल्या देवें । कोणकोणा भावें रडती तीं ॥५॥ तीं गेली घरासी आपल्या सकळ । गोधनें गोपाळ लोक माय ॥६॥ मायबापांची तों ऐसी झाली गति । तुका म्हणे अंतीं कळों आलें ॥७॥

३८४९. आला त्यांचा भाव देवाचिया मना । अंतरीं कारणांसाठीं होता ॥१॥ होता भाव त्यांचा पाहोनी निराळा । नव्हता पाताळा गेला आधीं ॥२॥ आधीं पाठीमोरीं झालीं तीं सकळें । मग या गोपाळें बुडी दिली ॥३॥ दिली हाक त्याणें जाऊनी पाताळा । जागविलें काळा बुजंगासी ॥४॥ भुजंग हा होता निजला मंदिरीं । निर्भर अंतरीं गर्वनिधि ॥५॥ गर्व हरावया आला नारायण । मिस या करून चेंडुवाचें ॥६॥ चेंडुवाचें मिसें काळया नाथावा । तुका म्हणे देवा कारण हें ॥७॥

३८५०. काळयाचे मागें चेंडू पत्नीपाशीं । तेज:पुंज रासी देखियेला ॥१॥ लावण्यपुतळा मुखप्रभाराशी । कोटि रवि शशी उगवले ॥२॥ उगवला खांब कर्दळीचा गाभा । ब्रीदें वांकी नभा देखे पायीं ॥३॥ पाहिला सकळ तिनें न्याहाळूनी । कोण या जननी विसरली ॥४॥ विसरु हा तीस कैसा याचा झाला । जीवाहूनी वाल्हा दिसतसे ॥५॥ दिसतसे रूप गोजिरें लहान । पाहातां लोचन सुखावले ॥६॥ पाहिलें परतोनी काळा दुष्टाकडे । मग म्हणे कुडें झालें आतां ॥७॥ आतां उठोनियां खाईल या बाळा । देईल वेल्हाळा माय जीव ॥८॥ जीव याचा कैसा वांचे म्हणे नारी । मोहिली अंतरीं हरिरूपें ॥९॥ रूपें अनंताचीं अनंत अपार । न कळे साचार तुका म्हणे ॥१०॥

३८५१. म्हणे चेंडू कोणें आणिला या ठाया । आलों पुरवावया कोड त्याचें ॥१॥ त्याचें आइकोन निष्ठुर वचन । भयाभीत मन झालें तिचें ॥२॥ तिची चित्तवृत्ति होती देवावरी । आधीं ते माघारी फिरली वेगीं ॥३॥ वेगीं मन गेलें भ्रताराचे सोयी । विघ्न आलें कांहीं आम्हांवरी ॥४॥ वरी उदकासी नाहीं अंतपार । अक्षोभ सागर भरलासे ॥५॥ संचार करूनि कोण्या वाटे आला । ठायींच देखिला अवचिता ॥६॥ अवचिता नेणों येथें उगवला । दिसे तो धाकुला बोल मोठे ॥७॥ मोठ्यानें बोलतो भय नाहीं मनीं । केला उठवूनी काळ जागा ॥८॥ जागविलें काळसर्पा तये वेळीं । उठिला कल्लोळीं विषाचिये ॥९॥ यमुनेच्या डोहावरी आला ऊत । काळयाकृतांत धुधुकारें ॥१०॥ कारणें ज्या येथें आला नारायण । झाले दरुषण दोघांमध्यें ॥११॥ दोघांमधें झालें बोल परस्परें । प्रसंग उत्तरें युद्धाचिया ॥१२॥ चिंतावला चित्तीं तोंडे बोले काळ । करीन सकळ ग्रास

तुझा ॥१३॥ झाला सावकाश झेंप घाली वरी। तव हाणे हरि मुष्टिघातें ॥१४॥ तेणें काळें त्यासी दिसे काळ तैसा। हरावया जैसा जीव आला ॥१५॥ आठवलें काळा हाकारिलें गोत। मिळाली बहुत नागकुळें ॥१६॥ कल्हारीं संघानीं वेष्टियेला हरि। अवघा विखारीं व्यापियेला ॥१७॥ यांस तुका म्हणे नाहीं भक्ताविण। गरुडाचें चिंतन केलें मनीं ॥१८॥

३८५२. निजदास उभा तात्काळ पायापें। स्वामी देखे सर्पें वेष्टियेला ॥१॥ लहानथोरें होतीं मिळालीं अपारें। त्याच्या धुधुकारें निवारलीं ॥२॥ निघातें आपटी धरुनी घावामधीं। एकातेचि वधी माथा पाय ॥३॥ एकीं जीव दिले येतांच त्या धाकें। येतील तीं एकें काकुलती ॥४॥ यथेष्ट भक्षिले पोट धाये वरी। तंव म्हणे हरि पुरे आतां ॥५॥ आतां करूं काम आलों जयासाठीं। हरि घाली मिठी काळयासी ॥६॥ यासी नाथूनियां नाकीं दिली दोरी। चेंडू भार शिरीं कमळांचा ॥७॥ चालविला वरी बैसे नारायण। गरुडा आळंगूनी बहुडविलें ॥८॥ विसरु न पडे सवंगड्या गाई। यमुनेच्या डोहीं लक्ष त्यांचें ॥९॥ त्यांच्या गोष्टी कांठीं बैसोनी सांगती। बुडाला दाविती येथें हरि ॥१०॥ हरीचें चिंतन करिता आठव। तुका म्हणे देव आला वरी ॥११॥

३८५३. अवचिता त्यांनीं देखिला भुजंग। पळतील मग हाउ आला ॥१॥ आला घेऊनियां यमुनेबाहेरी। पालवितो हरी गडियांसी ॥२॥ गडियांसी म्हणे वैकुंठनायक। या रे सकळीक मजपाशीं ॥३॥ मजपाशीं तुम्हां भय काय करी। जवळी या दुरी जाऊं नका ॥४॥ कानीं आईकिले गोविंदाचे बोल। म्हणती नवल चला पाहों ॥५॥ पाहों आलें हरीजवळी सकळ। गोधनें गोपाळ आळिंगिले ॥६॥ आल्या गाई वरी घालितील माना। ओरसलें स्तना क्षीर लोटे ॥७॥ लोटती सकळें एकावरी एक। होऊनी पृथक कुर्वाळलीं ॥८॥ कुर्वाळलीं आनंदें घेती चारा पाणी। तिहीं चक्रपाणी देखियेला ॥९॥ त्यांचपाशीं होता परी केली माव। न कळे संदेह पडलिया ॥१०॥ याति वृक्ष वल्ली होत्या कोमेलिया। त्यांसी कृष्णें काया दिव्य दिली ॥११॥ दिलें गोविंदें त्या पदा नाहीं नाश। तुका म्हणे आस निरसली ॥१२॥

३८५४. आस निरसली गोविंदाचे भेटी। संवसारा तुटी पुढिलिया ॥१॥ पुढें पाठविले गोविंदें गोपाळ। देऊनी चपळ हातीं गुढी ॥२॥ हाका आरोळिया देऊनी नाचती। एक सादाविती हरि आला ॥३॥ आरंभीं पडिलीं होतीं तया घरीं। संकीर्ण त्या नारी नर लोकां ॥४॥ लोकां भूक तहान नाहीं निद्रा डोळां। रूप वेळोवेळां आठविती ॥५॥ आहाकटा मग करिती गेलिया। आधीं ठावा तयां नाहीं कोणा ॥६॥ आधीं चुकी मग घडे आठवण। तुका म्हणे जन परिचय ॥७॥

३८५५. जननी हे म्हणे आहा काय झालें। शरीर रक्षिलें काय काजें ॥१॥ काय काज आतां हरिविण जिणें। नित्य दुःख कोणें सोसावें हें ॥२॥ हें दुःख न सरे हरि न भेटे तों। त्यामागेंचि जातों एका वेळे ॥३॥ एक वेळ जरी देखतें मी आतां। तरी जीवापरता न करितें ॥४॥ करिताहे माता

हरीचें चिंतन । शुभ तो शकुन तुका म्हणे ॥५॥

३८५६. शुभ मात तिहीं आणिली गोपाळीं । चेंडू वनमाळी घेउनी आले ॥१॥ आली दारा देखे हरुषाची गुढी । सांगितली पुढें हरुषें मात ॥२॥ हरुषली माता केलें निंबलोण । गोपाळा वरून कुरवंडी ॥३॥ गोपाळां भोंवतें मिळालें गोकुळ । अवघीं सकळ लहान थोर ॥४॥ थोर सुख झालें ते काळीं आनंद । सांगती गोविंद वरी आला ॥५॥ आले वरी बैसोनियां नारायण । काळया नाथून वहन केलें ॥६॥ नगराबाहेरी निघाले आनंदें । लावूनियां वाद्यें नाना घोष ॥७॥ नारायणापुढें गोपाळ चालती । आनंदें नाचती गाती गीत ॥८॥ तंव तो देखिला वैकुंठींचा पति । लोटांगणीं येती सकळही ॥९॥ सकळही एका भावें आळिंगिले । अवघियां झाले अवघे हरि ॥१०॥ हरि आळिंगुनी हरिरूप झालीं । आप विसरली आपणास ॥११॥ सकळांसी सुख एक दिलें देवें । मायबापभावें लोकपाळां ॥१२॥ मायबाप देवा नाहीं लोकपाळ । सारखीं सकळ तुका म्हणे ॥१३॥

३८५७. नेणे वर्ण धर्म जीं आलीं सामोरीं । अवघींच हरी आळिंगिलीं ॥१॥ हरि लोकपाळ आले नगरांत । सकळांसहित मायबाप ॥२॥ पारणें तयांचें झालें एक वेळे । देखिलें सांवळें परब्रह्म ॥३॥ ब्रह्मानंदें लोक सकळ नाचती । गुढिया उभविती घरोघरीं ॥४॥ घरोघरीं सुख आनंद सोहळा । सडे रंगमाळा चौकदारीं ॥५॥ दारीं वृंदावनें तुळसीचीं बनें । रामकृष्णगाणें नारायण ॥६॥ नारायण तिहीं पूजिला बहुतीं । नाना पुष्पयाती करूनियां ॥७॥ याचे ऋण नाहीं फिटलें मागील । पुढें भांडवल जोडिती हीं ॥८॥ हीं नव्हतीं कधीं या देवा वेगळीं । केला वनमाळी सेवाऋणी ॥९॥ सेवाऋणें तुका म्हणे रूप धरी । भक्तांचा कैवारी नारायण ॥१०॥

३८५८. नारायण आले निजमंदिरासी । जावया लोकांसी बहुडविले ॥१॥ बहुडविले बहु केलें समाधान । विसरूं हा क्षण नका माझा ॥२॥ मात सांगितली सकळ वृत्तांत । केलें दंडवत सकळांनीं ॥३॥ सकाळां भातुकें वांटिल्या साखरा । आपुलाल्या घरा लोक गेले ॥४॥ लोक गेले कामा गाईपें गोपाळ । वारली सकळ लोभासाठीं ॥५॥ लोभ दावूनियां आपला विसर । पाडितो कुमर धनआशा ॥६॥ आशेचे बांधले तुका म्हणे जन । काय नारायण ऐसा जाणे ॥७॥

३८५९. झाला कवतुक करिता रोकडें । आणीकही पुढें नारायण ॥१॥ येऊनियां पुढें धरिला मारग । हरावया भाग इंद्रयाजीं ॥२॥ इंद्रा दहीं दूध तूप नेतां लोणी । घेतले हिरोनी वाटे त्यांचें ॥३॥ हिरोनी घेतल्या कावडी सकळा । म्हणती गोपाळा बरें नव्हे ॥४॥ नव्हे तेंचि करी न भे कळिकाळा । तुका म्हणे लीळा खेळे देव ॥५॥

३८६०. खेळ नव्हे बरा इंद्र कोपलिया । देव म्हणे तयां भीऊं नका ॥१॥ नका धरूं भय धाक कांहीं मनीं । बोले चक्रपाणि गौळियांसी ॥२॥ गौळियांसी धीर नाहीं या वचनें ।

आशंकित मनें वेडावलीं ॥३॥ वेडावलीं त्यांस न कळतां माव । देवाआदिदेव नोळखतां ॥४॥ नोळखतां दु:खें वाहातील शिरीं । तुका म्हणे वरी भारवाही ॥५॥

३८६१. भारवाही नोळखती या अनंता । जवळी असतां अंगसंगें ॥१॥ अंगसंगें तयां न कळे हा देव । कळोनी संदेह मागुताला ॥२॥ मागुते पडती चिंतेचिये डोहीं । जयाची हे नाहीं बुद्धि स्थिर ॥३॥ बुद्धि स्थिर राहों नेदी नारायण । आशाबद्ध जन लोभिकांची ॥४॥ लोभिकां न साहे देवाचें करणें । तुका म्हणे तेणें दु:खी होती ॥५॥

३८६२. दु:खी होती लोभी करावें तें काई । बुडतील गाई म्हैसी आतां ॥१॥ आणीकही कांहीं होईल अरिष्ट । नाइके हा धीट सांगितलें ॥२॥ सांगों चला याच्या मायबापांपाशीं । निघाली घरासी देवा रागें ॥३॥ रागें काला देतां न घेती कवळ । टोकवी गोपाळ क्रोधियांसी ॥४॥ क्रोध देवावरी धरियेला राग । तुका म्हणे भाग न लभती ॥५॥

३८६३. भाग त्या सुखाचे वांकड्यां बोबड्यां । आपुलिया गड्यां भाविकांसी ॥१॥ भारवाही गेले टाकूनी कावडी । नवनीत गोडी भाविकांसी ॥२॥ काला करूनियां वांटिती सकळां । आनंदें गोपाळांमाजी खेळे ॥३॥ खेळींमेळीं दहीं दूध लोणी खाती । भय नाहीं चित्तीं कवणाचें ॥४॥ कवणाचें चाले तुका म्हणे बळ । जयासी गोपाळ साह्य झाले ॥५॥

३८६४. जाणवलें इंद्रा चरित्र सकळ । वाकुल्या गोपाळ दाविताती ॥१॥ तांतडीनें मेघां आज्ञा करी राव । गोकुळींचा ठाव उरों नेदा ॥२॥ नेदाविया गाई म्हैसी वांचों लोक । पुरावे सकळीक सिळाधारीं ॥३॥ धाक नाहीं माझा गौळियांच्या पोरां । सकळीक मारा म्हणे मेघां ॥४॥ म्हणविती देव आपणां तोंवरी । नाहीं जंव वरी कोपलों मी ॥५॥ मीपणें हा देव न कळेचि त्यांसी । अभिमान रासी गर्वाचिया ॥६॥ अभिमानराशि जयाचिये ठायीं । तुका म्हणे तईं देव दुरी ॥७॥

३८६५. देव त्यां फावला भाविकां गोपाळां । नाहीं तेथें कळा अभिमान ॥१॥ नाडलीं आपल्या आपणचि एकें । संदेहदायकें बहुफार ॥२॥ फार चाळविलीं कळो नेदी भाव । देवाआदिदेव विश्वंभर ॥३॥ विश्वासावांचूनी कळों नये खरा । अभक्तां अधीरा जैसा तैसा ॥४॥ जैसा भाव तैसा जवळी त्या दुरी । तुका म्हणे हरि देतो घेतो ॥५॥

३८६६. तो या साच भाव न कळेचि इंद्रा । म्हणउनी धारा घाली मेघा ॥१॥ घाली मेघ धारा कडाडिला माथां । वरी अवचिता देखियेला ॥२॥ देखती पाऊस वोळला गोपाळ । भ्याले हे सकळ विचारिती ॥३॥ विचारीं पडलीं विसरलीं खेळ । अन्याय गोपाळ म्हणती केला ॥४॥ लागलेंसे गोड न कळे त्या काळीं । भेणें वनमाळी आठविती ॥५॥ आतां काय कैसा करावा विचार । गोधनासी थार आपणिया ॥६॥ यांचिया विचारें होणार तें काई ।

तुका म्हणे ठायीं वेडावलीं ॥७॥

३८६७. वेडावलीं काय करावें या काळीं। म्हणे वनमाळी गोपाळांसी ॥१॥ गोवर्धन धरूं शिरीं उचलूनी। म्हणे तुम्ही कोणी भिऊं नका ॥२॥ नका सांडूं कोणी आपला आवांका। मारितां या हाका आरोळिया ॥३॥ आशंकित चित्तें न वाटे त्या खरें। धाकेंच ते बरें म्हणती चला ॥४॥ चित्तीं धाक परि जवळी अनंत। तुका म्हणे घात होऊं नेदी ॥५॥

३८६८. नेदी दुःख देखों दासा नारायण। ठेवी निवारून आल्या आधीं ॥१॥ आधीं पुढें शुद्ध करावा मारग। दासांमागें मागें सुखरूप ॥२॥ पर्वतासी हात लाविला अनंतें। तो जाय वरतें आपेंआप ।३॥ आपल्या आपण उचलिला गिरी। गोपाळ हे करी निमित्यासी ॥४॥ निमित्य करूनी करावें कारण। करितां आपण कळों नेदी ॥५॥ दीनाचा कृपाळू पतितपावन। हें करी वचन साच खरें ॥६॥ सांगणें न लगे सुखदुःख दासा। तुका म्हणे ऐसा कृपावंत ॥७॥

३८६९. कृपावंतें हाक दिली सकळिकां। माजि या रे नका राहों कोणी ॥१॥ निघाले या भेणें पाउसाच्या जन। देखे गोवर्धन उचलिला ॥२॥ लाविले गोपाळ फेरीं चहूंकडे। हासे फुंदे रडे कोणी धाकें ॥३॥ धाकें ही सकळ निघाली भीतरीं। उचलिला गिरी तयाखालीं ॥४॥ तयाखालीं गाई वत्सें आलीं लोक। पक्षी सकळिक जीवजाति ॥५॥ जिहीं म्हणविलें हरीचे अंकित। जातीचे ते होत कोणी तरी ॥६॥ जाति कुळ नाहीं तयासी प्रमाण। अनन्या अनन्य तुका म्हणे ॥७॥

३८७०. म्हणविती भक्त हरीचे अंकित। करितो अनंत हित त्यांचें ॥१॥ त्यांसी राखे बळें आपुले जे दास। कळिकाळासी वास पाहों नेदीं ॥२॥ पाऊस न येतां केली यांची थार। लागला तुषार येऊं मग ॥३॥ येऊनी दगड बैसतील गिरी। वरुषला धारीं शिळांचिये ॥४॥ शिळांचिया धारी वरुषला आकांत। होता दिवस सात एक सरें ॥५॥ एक सरें गिरि धरिला गोपाळीं। होता भाव बळी आम्ही ऐसा ॥६॥ ऐसें कळों आलें देवाचिया चित्ता। म्हणे तुम्ही आतां हात सोडा ॥७॥ हांसती गोपाळ करूनी नवल। ऐकोनीयां बोल गोविंदाचे ॥८॥ दावितील डोया गुडघे कोपर। फुटले ते भार उचलितां ॥९॥ भार आम्हांवरी घालूनी निराळा। राहीलासी डोळा चुकवूनी ॥१०॥ निमित्य अंगुळी लावियेली वरी। पाहों कैसा गिरी धरितोसी ॥११॥ सिणले हे होते ठायींच्या त्या भारें। लटिकेंचि खरें मानूनियां ॥१२॥ याणीं अंत पाहों आदरिला याचा। तुका म्हणे वाचा वाचाळ ते ॥१३॥

३८७१. वाचाळ लटिके अभक्त जे खळ। आपुलें तें बळ वाखाणावें ॥१॥ बळें हुंबरती सत्य त्यां न कळे। नुघडती डोळे अंधळ्यांचे ॥२॥ आसुडिल्या माना हात पाय नेटें। तंव भार बोटें उचलिला ॥३॥ लटिकाचि आम्हीं सीण केला देवा। कळों आलें तेव्हां सकळांसी ॥४॥ आलें कळों तुका म्हणे अनुभवें। मग अहंभावें सांडवले ॥५॥

३८७२. सांडवले सकळांचे अभिमान। आणिले शरण लोटांगणीं ॥१॥ लोटांगणीं आले होऊनियां दीन। मग नारायण म्हणे भलें ॥२॥ भला आजी तुम्हीं केला साचपण। गिरी गोवर्धन उचलिला ॥३॥ लागती चरणा सकळ ते काळीं। आम्हांमध्यें बळी तूंचि एक ॥४॥ एका तुजविण न यों आम्ही कामा। कळों कृष्णा रामा आलें आजी ॥५॥ आजिवरी आम्हां होता अभिमान। नेणतां चरण महिमा तुझा ॥६॥ तुझा पार आम्ही नेणों नारायणा। नखीं गोवर्धना राखियेलें ॥७॥ राखियेलें गोकुळ आम्हां सकळांसी। दगडाच्या रासी वरुषतां ॥८॥ वर्णावें तें काय तुझें महिमान। धरिती चरण सकळही ॥९॥ सकळही तहान विसरली भूक। सकळही सुख दिलें त्यांसी ॥१०॥ त्यांसी कळों आला वैकुंठनायक। तुका म्हणे लोक निर्भर ते ॥११॥

३८७३. लोकां कळों आला देव आम्हांमधीं। टाकिली उपाधि तिहीं शंका ॥१॥ शंका नाहीं थोरां लहानां जीवासी। कळला हृषीकेशी तेव्हां मग ॥२॥ मग मनीं झाले निर्भर सकळ। संगे लोकपाळ कृष्णाचिया ॥३॥ कृष्णाचिया ओंव्या गाणें गाती गीत। कृष्णमय चित्त झालें त्यांचें ॥४॥ त्यासी ठावा नाहीं बाहेरील भाव। अंतरींच वाव झालें सुख ॥५॥ सुखें तया दीस न कळे हे राती। अखंड त्या ज्योती गोविंदाची ॥६॥ चिंतनेंचि धालीं न लगे अन्नपाणी। तुका म्हणे मनीं समाधान ॥७॥

३८७४. समाधान त्यांचीं इंद्रियें सकळ। जयां ते गोपाळ समागमें ॥१॥ गोविंदाचा झाला प्रकाश भीतरीं। मग त्या बाहेरीं काय काम ॥२॥ काम काज त्यांचे सरले व्यापार। नाहीं आप पर माझें तुझें ॥३॥ माया सकळांची सकळांही वरी। विषम तें हरि दिसों नेदी ॥४॥ दिसे तया आपपरावें सारिखें। तुका म्हणे सुखें कृष्णाचिया ॥५॥

३८७५. कृष्णाचिया सुखें भूक नाहीं तहान। सदा समाधान सकळांचें ॥१॥ कळलेंचि नाहीं झाले किती दिस। बाहेरील वास विसरली ॥२॥ विसरू कामाचा तुका म्हणे झाला। उद्वेग राहिला जावें यावें ॥३॥

३८७६. जावें बाहेरी हा नाठवे विचार। नाहीं समाचार ठावा कांहीं ॥१॥ कांहीं न कळे तें कळों आलें देवा। मांडिला रिघावा कवतुक ॥२॥ कवतुकासाठीं भक्त देहावरी। आणिताहे हरि बोलावया ॥३॥ यांसी नांव रूप नाहीं हा आकार। कळला साचार भक्तां मुखें ॥४॥ मुखें भक्तांचिया बोलतो आपण। अंगसंग भिन्न नाहीं दोघां ॥५॥ दोघे वेगळाले लेखील जो कोणी। तयाचा मेदिनी बहु भार ॥६॥ तयासी घडलीं सकळही पापें। भक्तांचिया कोपें निंदा द्वेषें ॥७॥ द्वेषियाचा संग न घडावा कोणा। विष जेंवी प्राणा नाश करी ॥८॥ करितां जो आइके निंदा या संतांची। तया होती तेचि अध:पात ॥९॥ पतन उद्धार संगाचा महिमा। त्यजावें अधमा संत सेवीं ॥१०॥ सेवीं संत जोडे महा लाभरासी। तुका म्हणे यासी नाश नाहीं ॥११॥

३८७७. नाही नाश हरि आठवितां मुखें । जोडतील सुखें सकळही ॥१॥ सकळही सुखें वोळली अंतरीं । मग त्याबाहेरी काय काज ॥२॥ येऊं विसरलीं बाहेरी गोपाळें । तल्लीन सकळ कृष्णसुखें ॥३॥ सुख तें योगियां नाहीं समाधीस । दिलें गाई वत्स पशु जीवा ॥४॥ वारला पाऊस कोणा नाहीं ठावा । तुका म्हणे देवावांचूनियां ॥५॥

३८७८. यांसी समाचार सांगतों सकळां । चलावें गोपाळां म्हणे देव ॥१॥ देव राखे तया आडलिया काळें । देव सुखफळें देतो दासां ॥२॥ दासां दु:ख देखों नेदी आपुलिया । निवारी आलिया न कळतां ॥३॥ नाहीं मेघ येतां जातां देखियेला । धारीं वरुषला शिळाचिये ॥४॥ येवढें भक्तांचें सांकडें अनंता । होय निवारिता तुका म्हणे ॥५॥

३८७९. काकुळती एकें पाहाती बाहेरी । तया म्हणे हरि वोसरला ॥१॥ वोसरला मेघ आला होता काळ । बाहेरी सकळ आले लोक ॥२॥ कवतुक झालें ते काळीं आनंद । कळला गोविंद साच भावें ॥३॥ भावें तयापुढें नाचती सकळें । गातील मंगळें ओंव्या गीत ॥४॥ गीत गाती ओंव्या रामकृष्णावरी । गोपाळ मोहरी वाहाती पांवे ॥५॥ वत्सें गाई पशु नाचती आनंदें । वेधलिया छंदें गोविंदाच्या ॥६॥ चित्त वेधियेलें गोविंदें जयाचें । कोण तें दैवाचें तयाहुनी ॥७॥ तयाहुनी कोणी नाहीं भाग्यवंत । अखंड सांगात गोविंदाचा ॥८॥ गोविंदाचा संग तुका म्हणे ध्यान । गोविंद ते जन गोकुळींचें ॥९॥

३८८०. गोकुळींची गति कोण झाली परी । पाहों आला वरी इंद्रराव ॥१॥ इंद्रापाशीं मेघ बोलती बडिवार । सकळ संहार करूनी आलों ॥३॥ आतां जीव नाहीं सांगावया रानीं । पुरिलें पाषाणीं शिळाधारीं ॥३॥ रिता कोठें नाहीं उरों दिला ठाव । जल्पती तो भाव न कळतां ॥४॥ न कळतां देव बळें हुंबरती । साच ते पावती अपमान ॥५॥ भाव न कळतां केली तोंडपिटी । इंद्र आला दृष्टी पाहावया ॥६॥ पाहातां तें आहे जैसें होतें तैसें । नाचती विशेषें तुका म्हणे ॥७॥

३८८१. नाचतां देखिली गाई वत्सें जन । विस्मित होऊन इंद्र ठेला ॥१॥ लागला पाऊस शिळांचिये धारीं । वांचलीं हीं परी कैसीं येथें ॥२॥ येथें आहे नारायण संदेह नाहीं । विघ्न केलें ठायीं निर्विघ्न तें ॥३॥ विचारितां उचलिला गोवर्धन । अवतार पूर्ण कळों आला ॥४॥ आला गौळियांच्या घरा नारायण । करितो स्तवन इंद्र त्याचें ॥५॥ त्यांच्या पुण्या पार कोण करी लेखा । नव्हे चतुर्मुखा ब्रह्मयासी ॥६॥ सीणतां जो ध्याना न ये एक वेळा । तो तया गोपाळां समागमें ॥७॥ समागमें गाई वत्स पुण्यवंता । देह कुर्वाळितां अंगसंग ॥८॥ संग झाला मायबापां लोकपाळा । आलिंगिती गळा कंठाकंठ ॥९॥ करिते हे झाले स्तुति सकळिक । देव इंद्रादिक गोविंदाची ॥१०॥ करितील वृष्टि पुष्पवरुषाव । देवाआदिदेव पूजियेला ॥११॥ पुष्पांजुळी मंत्रघोष जयजयकार । दुमदुमी अंबर तेणें नांदें ॥१२॥ नामाचा गजर गंधर्वांची

गाणीं । आनंद त्रिभुवनीं न समाये ॥१३॥ तो सुखसोहळा अनुपम्य रासी । गोकुळीं देवासी दोन्हीं ठायीं ॥१४॥ दोहीं ठायीं सुख दिलें नारायणें । गेला दरुषणें वैरभाव ॥१५॥ भावना भेदाची जाय उठाउठी । तुका म्हणे भेटी गोविंदाचे ॥१६॥

३८८२. गोविंदाचें नाम गोड घेतां वाचे । तेथें राहे कइंचे वैरभाव ॥१॥ भावें नमस्कार घातला सकळीं । लोटांगणें तळीं महिवरी ॥२॥ वरी हातबाहे उभारिली देवें । कळलीया भावें सकळाच्या ॥३॥ सकळही वरी बहुडविले स्थळा । चलावें गोपाळां म्हणे घरा ॥४॥ राहिलीं हीं नाचों गोविंदाच्या बोलें । पडलीया डोल छंदें होतीं ॥५॥ छंद तो नावरे आपणा आपला । आनंदाचा आला होता त्यांसी ॥६॥ त्यांसी तुका म्हणे आनंद सकळां । ठेंगण्या गोपाळां समागमें ॥७॥

३८८३. समागमें असे हरि नेणतियां । नेदी जाऊं वांयां अंकितांसी ॥१॥ अंकितां सावध केलें नारायणें । गोपाळ गोधनें सकळही ॥२॥ सकळही जन आले गोकुळासी । आनंद मानसीं सकळांच्या ॥३॥ सकळांचा केला अंगीकार देवें । न कळतां भावें वांचवी त्यां ॥४॥ त्यां झाला निर्धार हरि आम्हांपासीं । निवांत मानसीं निर्भर ते ॥५॥ निर्भर हे जन गोकुळींचे लोक । केलें सकळीक नारायणें ।६॥ नारायण भय येऊं नेदी गांवा । तुका म्हणे नांवा अनुसरे त्या ॥७॥

३८८४. अनुसरे तया फिरों नेदी मागें । राहे अंगसंगें समागमें ॥१॥ अंगसंगें असे कर्म साक्ष देव । जैसा ज्याचा भाव तैसें फळ ॥२॥ फळपाकीं भोग देतील प्राणीये । तुका म्हणे नये सवें कांहीं ॥३॥

३८८५. ये दशे चरित्र केलें नारायणें । रांगतां गोधनें राखिताहे ॥१॥ हें सोंग सारिलें या रूपें अनंतें । पुढेंहि बहुत करणें आहे ॥२॥ आहे तुका म्हणे धर्मसंस्थापणें । केला नारायणें अवतार ॥३॥

६८८६. अवतार केला संहाराया दुष्ट । करिती ते नष्ट परपीडा ॥१॥ परपीडा करी दैत्य कंसराव । पुढें तोही भाव आरंभिला ॥२॥ लाविलें लाघव पाहोनियां संधि । सकळांही वधी दुष्ट जना ॥३॥ दुष्टजन परपीडक जे कोणी । ते या चक्रपाणी न साहती ॥४॥ न साहावे दुःख भक्तांचें या देवा । अवतार घ्यावा लागे रूप ॥५॥ रूप हें चांगलें राम कृष्ण नाम । हरे भवश्रम उच्चारितां ॥६॥ उच्चारितां नाम कंस वैरभावें हरोनियां जीवें कृष्ण केला ॥७॥ कृष्णरूप त्यासी दिसे अवघे जन । पाहे तों आपण कृष्ण झाला ॥८॥ पाहिलें दर्पणीं आधिल्या मुखाची । चतुर्भुज त्यासी तोचि झाला ॥९॥ झालीं कृष्णरूप कन्या पुत्र भाज । तुका म्हणे राज्य सैन्य जन ॥१०॥

३८८७. सैन्य जन हांसे राया जालें काई । वासपे तो ठायीं आपणासी ॥१॥ आपणा आपण जाय सती जैसी । वैरभाव ज्यांसी भक्ति नाहीं ॥२॥ नाहीं याचा त्याचा भाव एकविध । म्हणऊनी

छंद वेगळाले ॥३॥ वेगळाल्या भावें ते तया हांसती । तयास दिसती अवघीं हरि ॥४॥ हरिला कंसाचा जीवभाव देवें । द्वेषाचिया भावें तुका म्हणे ॥५॥

३८८८. द्वेषाचिया भावें हरिरूप झाले । भाव हरपले देहादिक ॥१॥ देहादिक कर्म अभिमान वाढे । तया कैसा जोडे नारायण ॥२॥ नारायण जोडे एकविध भावें । तुका म्हणे जीवें जाणें लागे ॥३॥

३८८९. जीवभाव त्याचा गेला अभिमान । म्हणऊनी जन हांसे कंसा ॥१॥ सावध करितां नये देहावरी । देखोनियां दूरी पळे जन ॥२॥ जन वन हरि झालासे आपण । मग हे लोचन झांकियेले ॥३॥ झांकूनी लोचन मौन्येंचि राहिला । नाहीं आतां बोलायाचें काम ॥४॥ बोलायासी दुजें नाहीं हें राहिलें । जन कृष्ण झालें स्वयें रूप ॥५॥ रूप पालटलें गुण नाम याति । तुका म्हणे भूतीं देव झाला ॥६॥

३८९०. झालों स्वयें कृष्ण आठव हा चित्तीं । भेद भयवृत्ति उरली आहे ॥१॥ उरली आहे रूप नांव दिसे भिन्न । मी आणि कृष्ण आठवतो ॥२॥ तोंवरी हा देव नाहीं तयापासीं । आला दिसे त्यासी तोचि देव ॥३॥ देवरूप त्यासी दिसे वरी काया । अंतरीं तो भयाभीत भेदे ॥४॥ भेदे तुका म्हणे अंतरे गोविंद । साचविण छंद वांयां जाय ॥५॥

३८९१. वांयां तैसे बोल हरिसी अंतर । केले होती चार भयभेदें ॥१॥ भेदभय गेलें नोळखे आपणा । भेटी नारायणा कंसा झाली ॥२॥ झाली भेटी कंसा हरीशीं निकट । सन्मुखचि नीट येरयेरां ॥३॥ येरयेरां भेटी युद्धाच्या प्रसंगीं । त्याचें शस्त्र अंगीं हाणितलें ॥४॥ त्याचें वर्म होतें ठावें या अनंता । तुका म्हणे सत्तानायक हा ॥५॥

३८९२. नारायणें कंस चाणूर मर्दिले । राज्यीं स्थापीयेलें उग्रसेना ॥१॥ उग्रसेन स्थापीयेला शरणागत । पुरविला अंत अभक्ताचा ॥२॥ अवघेंचि केलें कारण अनंतें । आपुलिया हातें सकळही ॥३॥ सकळही केलीं आपुलीं अंकित । राहे गोपीनाथ मथुरेसी ॥४॥ मथुरेसी आला वैकुंठनायक । झालें सकळिक एक राज्य ॥५॥ राज्य दिलें उग्रसेना शरणागता । सोडविलीं मातापिता दोन्ही ॥६॥ सोडवणें धांवे भक्तांच्या कैवारें । तुका म्हणे करें शस्त्र धरी ॥७॥

३८९३. धरी दोहीं ठायीं सारखाचि भाव । देवकी वसुदेव नंद दोघे ॥१॥ दोघे एके ठायीं केलीं नारायणें । वाढविला तिणें आणि व्याली ॥२॥ व्याला वाढला हा आपणा आपण । निमित्या कारणें मायबाप ॥३॥ माय हा जगाची बाप नारायण । दुजा करी कोण यत्न यासी ॥४॥ कोण जाणे याचे अंतरींचा भाव । तुका म्हणे भाव कळों नेदी ॥५॥

३८९४. दीनाचा कृपाळू दुष्ट जना काळ । एकला सकळ व्यापक हा ॥१॥ हांसे बोले तैसा नव्हे हा अनंत । नये प्राकृत म्हणों यासी ॥२॥ यासी कळावया एक भक्तिभाव । दुजा नाहीं ठाव

धांडोळितां ॥३॥ धांडोळितां श्रुति राहिल्या निश्चित । तो करी संकेत गोपींसवें ॥४॥ गोपिकांची वाट पाहे द्रुमातळीं । मागुता न्याहाळी न देखतां ॥५॥ न देखतां त्यांसी उठे बैसे पाहे । वेडावला राहे वेळोवेळां ॥६॥ वेळोवेळां पाहे पंथ गोपिकांचा । तुका म्हणे वाचा नातुडे तो ॥७॥

३८९५. तो बोले कोमळ निष्ठुर साहोनी । कोपतां गौळणी हास्य करी ॥१॥ करावया दास्य भक्तांचें निर्लज्ज । कवतुकें रज माथां वंदी ॥२॥ दिलें उग्रसेना मथुरेचें राज्य । सांगितलें काज करी त्याचें ॥३॥ त्यासी कांहीं होतां अरिष्ट निर्माण । निवारी आपण शरणागतां ॥४॥ शरणागतां राखे सर्वभावें हरि । अवतार धरी तयांसाठीं ॥५॥ तयांसाठीं वाहे सुदर्शन गदा । उभा असे सदा सांभाळीत ॥६॥ तळमळ नाहीं तुका म्हणे चित्ता । भक्तांचा अनंता भार माथां ॥७॥

३८९६. मारिले असुर वाढल्या मेदिनी । होते कोणा कोणी पीडित ते ॥१॥ तया नारायण पाठवी अघोरा । संतांच्या मत्सरा घातावरी ॥२॥ वरिले ते दूतीं यमाचिये दंडीं । नुच्चारितां तोंडीं नारायण ॥३॥ नारायण नाम नावडे जयांसी । ते झाले मिरासी कुंभपाकीं ॥४॥ कुंभपाकीं सेल मान तो तयांचा । तुका म्हणे वाचा संतनिंदा ॥५॥

३८९७. वास नारायणें केला मथुरेसी । वधूनी दुष्टांसी तये ठायीं ॥१॥ ठायीं पितयाचे मानी उग्रसेना । प्रतिपाळी जनासहित लोकां ॥२॥ लोकां दुःख नाहीं मागील आठव । देखियेला देव दृष्टी त्यांणीं ॥३॥ देखोनियां देवा विसरली कंसा । ठावा नाहीं ऐसा होता येथें ॥४॥ येथें दुजा कोणी नाहीं कृष्णाविणें । ऐसें वाटे मनें काया वाचा ॥५॥ काया वाचा मनें कृष्णीं रत झाले । सकळां लागलें कृष्णध्यान ॥६॥ ध्यान गोविंदाचें लागलेंसे लोकां । निर्भर हे तुका म्हणे चित्तीं ॥७॥

३८९८. चिंतिलें पावलीं जया कृष्णभेटी । एरवीं ते आटी वांयांविण ॥१॥ वासना धरिती कृष्णाविणें कांहीं । सीण केला तिहीं साधनांचा ॥२॥ चाळविलीं दंभें एक अहंकारें । भोग जन्मांतरें न चुकती ॥३॥ न चुकती भोग तपें दानें व्रतें । एका त्या अनंतेंवांचूनियां ॥४॥ चुकवुनी जन्म दाखवी आपणा । भजा नारायणा तुका म्हणे ॥५॥

३८९९. भजल्या गोपिका सर्व भावें देवा । नाहीं चित्तीं हेवा दुजा कांहीं ॥१॥ दुजा छंद नाहीं तयांचिये मनीं । जागृती स्वप्नीं कृष्णध्यान ॥२॥ ध्यान ज्यां हरीचें हरीसी तयांचें । चित्त ग्वाही ज्याचें तैशा भावें ॥३॥ भाग्यें पूर्वपुण्यें आठविती लोक । अवघे सकळीक मथुरेचे ॥४॥ मथुरेचे लोक सुखी केले जन । तेथें नारायण राज्य करी ॥५॥ राज्य करी गोपी यादवांसहित । कर्मिले बहुत काळ तेथें ॥६॥ तेथें दैत्यीं उपसर्ग केला लोकां । रचिली द्वारका तुका म्हणे ॥७॥

३९००. रचियेला गांव सागराचे पोटीं । जडोनी गोमटीं नानारत्नें ॥१॥ रत्नें खणोखणी सोनियाच्या भिंती । लागलीया ज्योती नानाकळा ॥२॥ कळा सकळही गोविंदाचे हातीं । मंदिरें

निगुतीं उभारिलीं ॥३॥ उभारिलीं दुर्गें दारवंटे फांजी। कोटि चर्या माजी शोभलिया ॥४॥ शोभलें उत्तम गांव सागरांत। सकळांसहित आले हरि ॥५॥ आले नारायण द्वारकानगरा। उदार या शूरा मुगुटमणी ॥७॥ निवडीना याति समानचि केली। टणक धाकुलीं नारायणें ॥८॥ सकळही धर्मशीळ पुण्यवंत। पवित्र विरक्त नारीनर ॥९॥ रचिलें तें देवें न मोडे कवणा। बळियांचा राणा नारायण ॥१०॥ बळबुद्धीनिती देवाचसारिखीं। तुका म्हणे मुखीं गाती ओंव्या ॥११॥

३९०१. गाती ओंव्या कामें करितां सकळें। हालवितां बाळें देवावरी ॥१॥ ऋद्धिसिद्धि दासी द्वारीं ओळंगती। सकळ संपत्ति सर्वां घरीं ॥२॥ घरीं बैसलीया जोडलें निधान। करिती कीर्तन नारी नर ॥३॥ नारीनर धन्य धन्य त्यांची याति। जयांसी संगति गोविंदाची ॥४॥ गोविंदें गोविंद केले लोकपाळ। चिंतनें सकळ तुका म्हणे ॥५॥

३९०२. कांहीं चिंता कोणा नाहीं कोणेविशीं। करी द्वारकेसी राज्य देव ॥१॥ द्वारकेसी राज्य करी नारायण। दुष्ट संहारून धर्म पाळी ॥२॥ पाळी वेद आज्ञा ब्रह्मणांचा मान। अतीतपूजन वैष्णवांचें ॥३॥ अतीत अलिप्त अवघियां वेगळा। नाहीं या गोपाळा अभिमान ॥४॥ अभिमान तुका म्हणे नाहीं त्यासी। नेदी आणिकांसी धरूं देव ॥५॥

३९०२. धरियेलें रूप कृष्ण नाम बुंथी। परब्रह्म क्षिती उतरलें ॥१॥ उत्तम हें नाम राम कृष्ण जगीं। तरावयालागीं भवनदी ॥२॥ दीनानाथ ब्रिदें रुळती चरणीं। वंदितील मुनि देव ऋषि ॥३॥ ऋषी मुनी भेटी दिली नारायणें। आणीक कारणें बहु केलीं ॥४॥ बहु कासावीस झाला भक्तांसाठीं। तुका म्हणे आटी सोसियेली ॥५॥

३९०४. सोसियेली आटी गर्भवास फेरे। आयुधांचे भारे वागवितां ॥१॥ वाहोनी सकळ आपुलिये माथां। भार दासां चिंता वाहों नेदी ॥२॥ नेदी काळाचिये हातीं सेवकांसी। तुका म्हणे ऐसी ब्रीदावळी ॥३॥

३९०५. ब्रीदावळी ज्याचे रूळते चरणीं। पाउलें मेदिनी सुखावे त्या ॥१॥ सुखावे मेदिनी कृष्णाचिये चाली। कुंकुमें शोभली होय रेखा ॥२॥ होऊनी भ्रमर पाउलांचें सुख। घेती भक्त मुख लावूनियां ॥३॥ याचसाठीं धरियेला अवतार। सुख दिलें फार निज दासां ॥४॥ निजसुख तुका म्हणे भक्तां ठावें। तिहींच जाणावें भोगूं त्यासी ॥५॥

३९०६. भोगिला गोपिकां यादवां सकळां। गौळणी गोपाळां गाई वत्सां ॥१॥ गाती धणीवरी केला अंगसंग। पाहिला श्रीरंग डोळेभरी ॥२॥ भक्ति नवविधा तयांसी घडली। अवघींच झालीं कृष्णरूप ॥३॥ रूप दाखविलें होतां भिन्नभाव। भक्त आणि देव भिन्न नाहीं ॥४॥ नाहीं राहों दिलें जातां निजधामा। तुका म्हणे आम्हांसहित गेला ॥५॥

३९०७. गेला कोठें होता कोठूनियां आला। सहज व्यापला आहे नाहीं ॥१॥ आहे

साच भावें सकळव्यापक । नाहीं अभाविक लोकां कोठें ॥२॥ कोठें नाहीं ऐसा नाहीं रिता ठाव । अनुभवी देव स्वयें झाले ॥३॥ जातों येतों आम्ही देवाचे सांगात । तुका म्हणे गात देवनाम ॥४॥

३९०८. मना वाटे तैसीं बोलिलों वचनें । केली धीटपणें सलगी देवा ॥१॥ वाणी नाहीं शुद्ध याति एक ठाव । भक्ति नेणें भाव नाहीं मनीं ॥२॥ नाहीं झालें ज्ञान पाहिलीं अक्षरें । मानिजेसी थोर थोरी नाहीं ॥३॥ नाहीं मनीं लाज धरिली आशंका । नाहीं भ्यालों लोकां चतुरांसी ॥४॥ चतुरांच्या राया मी तुझे अंकीत । झालों शरणागत देवदेवा ॥५॥ देवा आतां करीं सरतीं हीं वचनें । तुझ्या कृपादानें बोलिलों तीं ॥६॥ तुझें देणें तुझ्या समर्पूनी पायीं । झालों उतरायी पांडुरंगा ॥७॥ रंकाहूनी रंक दास मी दासांचें । सामर्थ्य मज कैचें बोलावया ॥८॥ बोलावया पुरे माझी वाचा कायी । तुका म्हणे पायीं ठाव द्यावा ॥९॥

३९०९. पांडुरंगा करूं प्रथम नमन । दुसरें चरणा संतांचिया ॥१॥ त्याच्या कृपादानें कथेचा विस्तारू । बाबाजीसद्‌गुरूदास तुका ॥२॥ काय माझी वाणी मानेल संतांसी । रंजवूं चित्तासी आपुलिया ॥३॥ या मनासी लागो हरिनामाचा छंद । आवडी गोविंद गावयासी ॥४॥ सीण झाला मज संसारसंभ्रमें । सीतळ या नामें झाली काया ॥५॥ या सुखा उपमा नाहीं द्यावयासी । आला आकारासी निर्विकार ॥६॥ नित्य धांवे तेथें नामाचा गजर । घोष जयजयकार आइकतां ॥७॥ तांतडी ते काय हरिगुण गाय । आणीक उपाय दु:खमूळ ॥८॥ मूळ नरकाचें राज्य मदें माते । अंतरे बहुत देव दुरी ॥९॥ दुरी अंतरला नामनिंदकासी । जैसें गोचिडासी क्षीर राहे ॥१०॥ हे वाट गोमटी वैकुंठासी जातां । रामकृष्णकथा दिंडी ध्वजा ॥११॥ जाणतें तयांनीं सांगितलें करा । अहंतेसी वारा आडूनियां ॥१२॥ यांसी आहे ठावें परी अंध होती । विषयांची खंती वाटे जना ॥१३॥ नाहीं त्या सुटलीं द्रव्य लोभ माया । भस्म दंड छाया तरुवराची ॥१४॥ चित्त ज्याचें पुत्रपत्नीबंधूवरी । सुटेल हा परि कैसें जाणा ॥१५॥ जाणते नेणते करा हरिकथा । तराल सर्वथा भाक माझी ॥१६॥ माझी मज असे घडली प्रचित । नसेल पतित ऐसा कोणी ॥१७॥ कोणी तरी कांहीं केलें आचरणें । मज या कीर्तनेंविण नाहीं ॥१८॥ नाहीं भक्ता भय तराया पोटाचें । देवासी तयाचें करणें लागे ॥१९॥ लागे पाठोवाठी पाहे पायांकडे । पीतांबरें खडे वाट झाडी ॥२०॥ डिंकोनियां काय राहिले हे लोक । हेंचि कवतुक वाटे मज ॥२१॥ जयानें तारिले पाषाण सागरीं । तो ध्या रे अंतरीं स्वामी माझा ॥२२॥ माझीया जीवाची केली सोडवण । ऐसा नारायण कृपाळू हा ॥२३॥ हाचि माझा नेम हाचि माझा धर्म । नित्य वाचे नाम विठोबाचें ॥२४॥ चेतवला अग्नि तापत्रयजाळ । तो करी शीतळ रामनाम ॥२५॥ मना एक करी चित्तीं दृढ धरीं । तारील श्रीहरि मायबाप ॥२६॥ बाप हा कृपाळू भक्तां भाविकांसी । घरीं होय दासी कामारी त्या ॥२७॥ त्याचा भार माथां चालवी आपुला । जिहीं त्या दिधला सर्व भाव ॥२८॥ भावेंविण नाहीं तयाची ते

प्राप्ति । पुराणें बोलती ऐसी मात ॥२९॥ मात त्याची सदा आवडे जयासी । तया गर्भवासी नाहीं येणें ॥३०॥ यावें विष्णुदासीं तरीच गर्भवासीं । उद्धार लोकांसी पूज्य होती ॥३१॥ होती आवडते जीवाचे ताइत । त्यां घडी अच्यु न विसंबे ॥३२॥ भेदाभेद कांहीं चिंता दुःख नाहीं । वैकुंठ त्या ठायीं सदा वसे ॥३३॥ वसे तेथें देव सदा सर्वकाळ । करिती निर्मळ नामघोष ॥३४॥ संपदा तयांची न सरे कल्पांतीं । मेळविला भक्ती देवलाभ ॥३५॥ लाभ तयां झाला संसारा येऊनी । भगवंत ऋणी भक्तीं केला ॥३६॥ लागलेंसे पिसेंकाय मूढ जना । काय नारायणा विसरलीं ॥३७॥ विसरलीं तयां थोर झाली हाणी । पचतील खाणी चौऱ्यांसीच्या ॥३८॥ शिकवितां तरी नाहीं कोणा लाज । लागलीसे भाज धन गोड ॥३९॥ गोड एक आहे अविट गोविंद । आणीक ते छंद नाशिवंत ॥४०॥ तळमळ त्याची कांहीं तरी करा । कां रे निदसुरा बुडावया ॥४१॥ या जनासी भय यमाचें कां नाहीं । सांडियेलीं तिहीं एकीं राज्य ॥४२॥ जेणें अग्निमाजी घातलासे पाव । नेणतां तो राव जनक होता ॥४३॥ तहान भूक जिहीं साहिले आघात । तयां पाय हात काय नाहीं ॥४४॥ नाहीं ऐसा तिहीं केला संवसार । दुःखाचे डोंगर तोडावया ॥४५॥ याच जन्मे घडे देवाचें भजन । आणीक हें ज्ञान नाहीं कोठें ॥४६॥ नाहीं पुढें कोठें घ्यावया विसांवा । फिरोनी या गांवा आल्याविण ॥४७॥ विनवितां दिवस बहुत लागती । म्हणऊनी चित्तीं देव धरा ॥४८॥ धरा पाय तुम्ही संतांचे जीवेंसी । वियोग देवासी तयां नाहीं ॥४९॥ नाहीं चाड देवा आणिका सुखाची । आवडी तयाची त्याची तया ॥५०॥ त्याचींच उच्छिष्ट बोलतों उत्तरें । सांगितलें खरें व्यासादिकीं ॥५१॥ व्यासें सांगितलें भक्ति हेंचि सार । भवसिंधु पार तरावया ॥५२॥ तरावया जना केलें भागवत । गोवळें गोपी भक्त माता पिता ॥५३॥ तारूनियां खरें नेलीं एकसरें । निमित्तें उत्तरें ऋषीचिया ॥५४॥ यासी वर्म ठावें भक्त तरावया । जननी बाळ माया राखे तान्हें ॥५५॥ तान्हेलें भुकेलें म्हणे वेळोवेळां । न मागतां कळा जाणोनियां ॥५६॥ जाणोनियां वर्म देठ लावियेला । द्रौपदीच्या बोलासवें धांवे ॥५७॥ धांवें सवें तान्ही धेनु जैसी वत्सा । भक्तालागीं तैसा नारायण ॥५८॥ नारायण व्हावा हे हांव जया जीवा । धन्य त्याच्या दैवा पार नाहीं ॥५९॥ नाहीं पार सुखा तें दिलें तयासी । अखंड वाचेसी रामराम ॥६०॥ रामराम दोनी उत्तम अक्षरें । भवानीशंकरें उपदेशिलीं ॥६१॥ उपदेश करी विश्वनाथ कानीं । वाराणसी प्राणी मध्यें मरे ॥६२॥ मरणाचे अंतीं राम म्हणे जरी । न लगे यमपुरी जावें तया ॥६३॥ तयासी उत्तम ठाव पैं वैकुंठीं । वसे नाम कंठीं सर्वकाळ ॥६४॥ सर्वकाळ वसे वैष्णवांच्या घरीं । नसे क्षणभरी स्थिर कोठें ॥६५॥ कोठें नका पाहों करा हरिकथा । तेथें अवचिता सांपडेल ॥६६॥ सांपडे हा देव भाविकांचे हातीं । शाहाणे मरती तरी नाहीं ॥६७॥ नाहीं भक्ति भली केलियावांचूनी । अहंता पापिणी नागवण ॥६८॥ नागवला म्हणे देव मी आपणा । लाभ दिला जना ठकला तो ॥६९॥ तोचि देव येर नव्हे ऐसें कांहीं । जनार्दन ठायीं चहूं खाणी ॥७०॥ खाणी भरूनियां राहिलासे आंत । बोलावया मात ठाव

नाहीं ॥७१॥ ठाव नाहीं रिता कोणी देवाविण । ऐसी ते सज्जन संतवाणी ॥७२॥ वाणी बोलोनियां एक गेले पुढें । तयासी वांकुडें जातां ठके ॥७३॥ ठकला नाहीं अर्थ ठाउका वेदांचा । होऊनी भेदाचा दास ठेला ॥७४॥ दास ठेला पोट अर्थ दंभासाठीं । म्हणउनि तुटी देवासवें ॥७५॥ सवे देव द्विजातीही दुराविला । आणिकांचा आला कोण पाड ॥७६॥ पाड करूनियां नागविलीं फार ।पंडित वेव्हार खळवादी ॥७७॥ वादका निंदका देवाचे दर्शन । नव्हे झाल्या पूर्ण षडकर्मी ॥७८॥ षडकर्म हीन रामनाम कंठीं । तयासवें भेटी सत्य देवा ॥७९॥ देवासी आवडे भाविक जो भोळा । शुद्ध त्या चांडाळा करूनि मानी ॥८०॥ मानियेला नाहीं उदार या बोला । नाम घेतां मला युक्ति थोडी ॥८१॥ युक्ति थोडी माझी दुर्बळाची वाचा । प्रताप नामाचा बोलावया ॥८२॥ बोलतां पांगल्या श्रुति नेति नेति । खुंटलिया युक्ति पुढें त्याच्या ॥८३॥ त्याचा पार पुढें न कळेचि जातां । पाउलें देखतां ब्रह्मादिकां ॥८४॥ काय भक्ति पिसें लागले देवासी । इच्छा ज्याची जैसी तैसा होय ॥८५॥ होय हा सगुण निर्गुण आवडी । भक्तिप्रिय गोडी फेडावया ॥८६॥ मायबापापाशीं बाळ बोले लाडें । करूनी वांकुडें मुख तैसें ॥८७॥ तैसें याचकाचें समाधानदाता । होय हा राखतां सत्वकाळीं ॥८८॥ सत्वकाळींकामा न येती आयुधें । सोयरीं संबंधें सैन्य लोक ॥८९॥ सैन्य लोक तया दाखवी प्रताप । लोटला हा कोप कोपावरी ॥९०॥ कोपा मरण नाहीं शांत होय त्यासी । प्रमाण भल्यासी सत्व गुण ॥९१॥ सत्वरजतम आपण नासती । करितां या भक्ति विठोबाची ॥९२॥ चित्त रंगलिया चैतन्यचि होय । तेथें उणें काय निजसुखा ॥९३॥ सुखाचा सागरु आहे विटेवरी । कृपादान करी तोचि एक ॥९४॥ एक चित्त करूं विठोबाचे पायीं । तेथें उणें कांहीं एक आम्हां ॥९५॥ आम्हांसी विश्वास त्याचिया नामाचा । म्हणउनि वाचा घोष करूं ॥९६॥ करूं हरिकथा सुखाची समाधि । आणिकाची बुद्धि दुष्ट नासे ॥९७॥ नासे संवसार लोभमोहो माया । शरण जातां या विठोबासी ॥९८॥ सिकविलें मज मूढा संतजनीं । दृढ या वचनी राहिलोंसें ॥९९॥ राहिलोंसें दृढ विठोबाचे पायीं । तुका म्हणे कांही न लगे आतां ॥१००॥

३९१०. गाईन ओंविया पंढरीचा देव । आमुचा तो जीव पांडुरंग ॥१॥ रंगलें हें चित्त माझें तया पायीं । म्हणउनि घेईं हाचि लाहो ॥२॥ लाहो करीन मी हाचि संवसारीं । राम कृष्ण हरि नारायण ॥३॥ नारायण नाम घालितां तुकासी । न येती या रासी तप तीर्थें ॥४॥ तीर्थें माथां रज वंदिती संतांचें । जे गाती हरीचे गुणवाद ॥५॥ गुणवाद ज्याचे गातां पूज्य झाले । बडिवार बोले कोण त्यांचा ॥६॥ त्याचा नाहीं पार कळला वेदांसी । आणीकही ऋषि विचारितां ॥७॥ विचारितां तैसा होय त्यांच्या भावें । निजरूप ठावें नाहीं कोणा ॥८॥ कोणा कवतुक न कळे हे माव । निजलिया जीव करी धंदा ॥९॥ करूनि कवतूक खेळे हाचि लीळा । व्यापूनि वेगळा पाहतसे ॥१०॥ सेवटीं आपण वेगळाचि खरा । सोंग हा पसारा नट केला ॥११॥ लावियेलें चाळा

मीपणें हें जन। भोग तया कोण भोगवितो ॥१२॥ विषयीं गुंतलीं विसरलीं तुज। कन्या पुत्र भाज धनलोभें ॥१३॥ लोभें गिळी फांसा आमिषाच्या आशा। सांपडोनी मासा तळमळी ॥१४॥ तळमळ त्यांची तरीच शमेल। जरी हा विठ्ठल आठविती ॥१५॥ आठवे तरी देव संतांच्या सांगातें। किंवा हें संचित जन्मांतर ॥१६॥ जन्मांतरें तीन भोगितां कळती। केलें तें पावती करितां पुढें ॥१७॥ पुढें जाणोनियां करावें संचित। पूजावे अतीत देव द्विज ॥१८॥ जन्म तुटे ऐसें नव्हे तुम्हां जनां। पुढिल्या पावना धर्म करा ॥१९॥ करा जप तप अनुष्ठान याग। संतीं जे मारग स्थापियेले ॥२०॥ लावियेलीं कर्मीं शुद्ध आचरणीं। कोणा एका जन्मीं केलें पावे ॥२१॥ पावले सत्वर निष्काम उद्धार। जिंकिली अपार वासना हे ॥२२॥ वासनेचें मूळ छेदिल्यावांचूनी। तरलोंसें कोणीं न म्हणावें ॥२३॥ न म्हणावें झालों पंडित वाचक। करुनि मंत्रघोष अक्षरांचा ॥२४॥ चाळविलीं एकें तेचि आवडीनें। लोक दंभमानें देहसुखें ॥२५॥ सुख तरीच घडे भजनाचे सार। वाचे निरंतर रामनाम ॥२६॥ राम हा उच्चार तरीच बैसे वाचे। अनंता जन्मींचें होइल पुण्य ॥२७॥ पुण्य ऐसें काय रामनामापुढें। काय ते बापुडे यागयज्ञ ॥२८॥ यागयज्ञ तप संसारदायकें। न सुटे एके नामेंविण ॥२९॥ नामेंविण भवसिंधू पावे पार। अइसा हा विचार नाहीं दुजा ॥३०॥ जाणती हे भक्तराज महामुनी। नाम सुखधणी अमृताची ॥३१॥ अमृताचें सार निजतत्त्व बीज। गुह्याचें तें गुज रामनाम ॥३२॥ नामें असंख्यात तारिले अपार। पुराणीं हे सार प्रसिद्ध हे ॥३३॥ हेंचि सुख आम्ही घेऊं सर्वकाळ। करूं हे निर्मळ हरिकथा ॥३४॥ कथाकाळीं लागे सकळा समाधि। तात्काळ हे बुद्धि दुष्ट नासे ॥३५॥ नासे लोभ मोहो आशा तृष्णा माया। गातां गुण तया विठोबाचे ॥३६॥ विठोबाचे गुण मज आवडती। आणिक हे चित्तीं न लगे कांहीं ॥३७॥ कांहीं कोणी नका सांगों हा उपाव। माझ्या मनीं भाव नाहीं दुजा ॥३८॥ जाणोनियां आम्हीं दिला जीवभाव। दृढ याचे पाव धरियेले ॥३९॥ धरियेले आतां न सोडीं जीवेसीं। केला हा सेवेसीं निरधार ॥४०॥ निरधारें आम्हीं राहिलों ये नेटीं। संवसारतुटी करूनियां ॥४१॥ येणें अंगीकार केला पांडुरंगें। रंगविलें रंगें आपुलिया ॥४२॥ आपुली पाखर घालूनियां वरी। आम्हांसी तो करी यत्न देव ॥४३॥ देव राखे तया आणिकांचे काय। करितां उपाय चाले येथें ॥४४॥ तेथें नाहीं रिघ कळिकाळासी येतां। दास म्हणवितां विठोबाचे ॥४५॥ विठोबाचे आम्ही लाडिके डिंगर। कांपती असुर काळ धाकें ॥४६॥ धाक तिहीं लोकीं जयाचा दरारा। स्मरण हें करा त्याचें तुम्ही ॥४७॥ तुम्ही निदसुरे नका राहूं कोणी। चुकवा जाचणी गर्भवास ॥४८॥ गर्भवासीं दुःख यमाचें दंडण। थोर होय शीण येतां जातां ॥४९॥ तहान भूक पीडा जीतां हे आघात। मेल्या यमदूत जाच करिती ॥५०॥ जाच करिती हें म्हणसी कोणा ठावें। नरकीं कौरवें बुडी दिली ॥५१॥ बुडी दिली कुंभपाकीं दुर्योधनें। दाविना लाजेनें मुख धर्मा ॥५२॥ धर्म हा कृपाळू आलासे जवळी। बैसला पाताळीं वरी नये ॥५३॥ न ये वरी कांहीं करितां उपाव। भोगवितो देव तेंची

त्यासी ॥५४॥ त्यासी अभिमान गर्व या देहाचा । नुच्चारिती वाचा नारायण ॥५५॥ नारायण जे विसरलीं संवसारीं । तयांसीं अघोरीं वास सत्य ॥५६॥ सत्य मानूनियां संतांच्या वचना । जा रे नारायणा शरण तुम्ही ॥५७॥ तुम्ही मानूं नका कोणी हा विश्वास । पुत्र पत्नी आस धन वित्त ॥५८॥ धन वित्त लोभ माया मोहपाश । मांडियेले फांसे यमदूतीं ॥५९॥ दूतीं याच्या मुखा केलेंसे कुडण । वाचे नारायण येऊं नेदी ॥६०॥ नेदी शुद्धबुद्धि आतळों चित्तासी । नाना कर्मे त्यासी दुरावती ॥६१॥ दुराविलीं एके जाणतींच फार । निंदा अहंकार वादभेद ॥६२॥ वादभेद निंदा हे फंद काळाचे । गोवितील वाचे रिकामिकें ॥६३॥ रिकामिका देहा होय नव्हे मना । चिंतेचिये घाणा जुंपिजेसीं ॥६४॥ सेवटीं हे गळा लावूनियां दोरी । सांभाळ ये करीं वासनेचा ॥६५॥ वासनेचा संग होय अंतकाळीं । तरी तपोबळी जन्म धरी ॥६६॥ धरूनियां देव राहतील चित्तीं । आधींलिया गती आठवाया ॥६७॥ आठवावा देव मरणाचे काळीं । म्हणउनि बळी जीव दिले ॥६८॥ दिले टाकूनियां भोग ऋषेश्वरीं । खाती वनांतरीं कंदमुळें ॥६९॥ मुळें सुखाचिया देव अंतरला । अल्पासाठीं गेला अधोगती ॥७०॥ गति हे उत्तम व्हावया उपाव । आहे धरा पाय विठोबाचे ॥७१॥ विठोबाचे पायीं राहिलिया भावें । न लगे कोठें जावें वनांतरा ॥७२॥ तरती दुबळीं विठोबाच्या नांवें । संचित ज्या सवें नाहीं शुद्ध ॥७३॥ शुद्ध तरायाचें काय तें नवल । म्हणतां विठ्ठल वेळोवेळां ॥७४॥ वेळकाळ नाहीं कवणाचे हातीं । न कळे हे गति भविष्याची ॥७५॥ भविष्य न सुटे भोगिल्यावांचूनी । संचित जाणोनी शुद्ध करा ॥७६॥ करावे सायास आपुल्या हिताचे । येथें आलियाचें मनुष्यपण ॥७७॥ मनुष्यपण तरी साधी नारायण । नाहीं तरी हीन पशुहूनी ॥७८॥ पशु पाप पुण्य काय हे जाणती । मनुष्या या रीति ठाउकिया ॥७९॥ ठाउकें हें असें पाप पुण्य लोकां । देखतील एकां भोगितिया ॥८०॥ भोगतील एक दुःख संवसारीं । काय सांगों परी वेगळाल्या ॥८१॥ ल्यावें खावें बरें असावें सदैव । हेचि करी हांव संवसारीं ॥८२॥ संवसारें जन गिळीले सकळ । भोगितील फळें गर्भवास ॥८३॥ वासनेचें मूळ छेदिल्यावांचून । नव्हे या खंडण गर्भवासा ॥८४॥ सायास केलियावांचूनी तें नाहीं । भविष्यावरी कांहीं घालूं नये ॥८५॥ नये बळें धड घालूं कांट्यावरी । जाय जीवें धरी सर्प हातीं ॥८६॥ हातीं आहे हित करील तयासी । म्हणउनि ऋषीं सांगितलें ॥८७॥ सांगितलें लोका फजित करूनी । आपण जे कोणी तरले ते ॥८८॥ तेणें वाळवंटीं उभारीला कर । कृपेचा सागर पांडुरंग ।८९॥ गंगाचरणीं करी पातकांची धुनी । पाउलें तीं मनीं चिंतिलिया ॥९०॥ चिंतने जयाच्या तरती पाषाण । उद्धरी चरण लावूनियां ॥९१॥ लावूनियां टाळीं नलगे बैसावें । प्रेमसुख घ्यावें संतसंगें ॥९२॥ संतसंगें कथा करावें कीर्तन । सुखाचें साधन रामनाम ॥९३॥ मग कोठें देव जाऊं न सके दुरी । बैसोनी भीतरीं कंठीं राहे ॥९४॥ राहे व्यापुनियां सकळ शरीर । आपुला विसर पडों नेदी ॥९५॥ नेदी दुःख देखों आपुलिया दासा । वारी गर्भवासा

**यमदूता ॥९६॥ तहान भूक त्यासी वाहों नेदी चिंता । दुश्चित हे घेतां नाम होती ॥९७॥ होती जीव त्याचे सकळही जंत । परी ते अंकित संचिताचे ॥९८॥ चेविले जे कोणी देह अभिमानें । त्यांसी नारायणें कृपा केली ॥९९॥ कृपाळू हा देव अनाथा कोंवसा । आम्ही त्याच्या आशा लागलोंसे ॥१००॥ लावियेले आसे येणें पांडुरंगें । तुका म्हणे संगें भक्तांचिया ॥१०१॥**

[ डाकाचे अभंग ]

**३९११. चौक भरियेला आसनीं । पाचारिली कुळस्वामिनी । वैकुंठवासिनी । ये धांवोनी झडकरी ॥१॥ रंगा येई वो विठाई । सांवळिये डोळसे । तुझें श्रीमुख साजिरें । तें मी केधवां देखेन ॥२॥ रजतमधुपारती । पंचप्राणांची आरती । अवघी सारोनि आइती । ये धांवती इडकरी ॥३॥ मन मारोनि मेंढा मुठीं । आशा मनसा तृष्णा सुटी । भक्तिभाव नैवेद्य ताटीं । भरोनी केला हाकारा ॥४॥ डाका अनुहात गजरें । येउनि अंगासी संचरे । आपुला घेऊनी पुरस्कार । आरोग्य करी तुकयासी ॥५॥**

**३९१२. साच माझा देव्हारा । भाक ठेवा भाव खरा । त्रिगुणांचा फुलवरा । आणा विनंती सांगतों ॥१॥ माझें दैवत हें रंगीं । नाचे वैष्णवांच्या संगीं । भरलें मग अंगीं । निवाड करीं दोहींचा ॥२॥ तुझे आहे तुजपाशीं । परि तूं जागा चुकलासी । चिवडूनियां नासी । तुझ्या घरिच्यांनीं केली ॥३॥ आतां न पडे ठावें । वांचूनियां माझ्या देवें । अंधकार व्हावें । नासु ठाव शोधावा ॥४॥ आंधळ्यासी डोळे । देते पांगुळासी पाय । वांजा पुत्र होय । नवस पुरविते विठाई ॥५॥ उगविलीं कोडीं । मागें कित्येकांचीं बापुडीं । तुका म्हणे घडी । न लगे नवस द्या आधीं ॥६॥**

**३९१३. विनंति घातली अवधारीं । मज देईं वो अभय करीं । पीडिलों खेचरीं । आणिका वारी नांवांची ॥१॥ रंगा येईं वो एकला । रंग वोढवला । हरिनामें उठिला । गजर केला हाकारा ॥२॥ देवांचे दैवते । तुज नमिलें आदिनाथें । ये वो कृपावंतें । भोगा माझ्या धांवत ॥३॥ न लवीं आतां वेळ । आइती सारिली सकळ । तुका म्हणे कुळ । आमुचिये दैवते ॥४॥**

**३९१४. माझा देव्हारा साचा । नाहीं आणीक कोणाचा । त्रिभुवनीं याचा । ठसा नलगें पुसावें ॥१॥ या रे लोटांगणीं । कांहीं करा विनवणी । करील झाडणी । भूत काढील संसार ॥२॥ पडिले विषयांचे गोंधळी । ते त्रिगुण आखळी । हरिनाम आरोळी । कानीं पडतां ते उठी ॥३॥ घेतला अहंकारें । काम क्रोध या मत्सरें । पळती प्रेमभरें । अवघी ठाव सांडूनी ॥४॥ घेतलासे पुरा । माया ममता आसरा । अवघ्या एक सरा । पळती रंग देखोनी ॥५॥ तुका म्हणे द्यावा भाव । फिटेल मनींचा संदेह । आणीक नलगे ठाव । कांहीं कोठें हिंडावें ॥६॥**

**३९१५. पुढें येते देवी । तिची जती जालों द्यावी । मागील झाडावी । झाडा मान आसडी ॥१॥ एकवीरा आली अंगा । आतां निवारील रोगा । माझ्या भक्तापाशीं सांगा । पूजा भावें**

करावी ॥२॥ मेंढा मारावा लोहाळ । पूजा पावली सकळ । तुम्हीं केलें बळ । मग मी ठायीं न पडें ॥३॥ तुका म्हणे मुळीं । लागली ते आली कुळीं । वंदूनी सकळीं । जीवें भावें ओवाळा ॥४॥

३९१६. अवघ्या ज्येष्ठा देवी । कोण पूजनाचा ठाव । धरितांचि भाव । कोठें नाहींसें झालें ॥१॥ दिसे सारिखें सारिखें । परि तें कारणीं पारिखें । तळीं गेलें देखें । वरी टोले न साहाती ॥२॥ पट एका शिरीं । यथाविधिनें त्या येरी । बसकोळ्या घागरी । डेरे रांजण गाडगीं ॥३॥ तुका म्हणे माना । येथें कोणी रुसावें ना । आपुलाल्या स्थानां । जेथें त्याची शोभल्या ॥४॥

३९१७. खेचर खडतर । काळ कांपती असुर । नांदें भीमातीर । पंढरपुरपाटणीं ॥१॥ आतां करी कां रे हाकारा । सहस्रनामें एकसरा । दवडिते खेचरा । अंगसंगें धरूनी ॥२॥ सीते झाली झडपणी । राहणें वासुगीच्या वनीं । पावलीं जननी । झोंटि मोकळीया केशी ॥३॥ लाविले कावरें । प्रल्हादासी म्हैसासुरें । आली येकसरें । दांत खात रंगासी ॥४॥ वसुदेवाची बाळें । सात खादलीं ज्या काळें । आली भोगवेळे । तया कारणें तेथें ॥५॥ पांडवें बापुडीं । वांज केलीं फिरती वेडीं । धांवोनियां काढी । अंगसंगें त्राहाटविलीं ॥६॥ नामाचें चिंतन । तेथें धांवते आपण । न विचारितां हीण । भाव देखे जयाचा ॥७॥ कुळींची कुळदेवता । तुका म्हणे आम्हां माता । काय भय भूतां । काळ यमदूताचें ॥८॥

३९१८. देवी देव झाले भोग सरले यावरी । सांगाया दुसरी ऐसी नाहीं उरली ॥१॥ हरिनाम देवनाम तुम्ही गाऊनियां जागा । पेंठवणी मागा नका ठेवूं लिगाड ॥२॥ शेवटीं सुताळी बरवी वाजवावी डांक । ताळा घाली एक सरलियाचे शेवटीं ॥३॥ गुंडाळा देव्हारा मान नेती मानकरी । तुका म्हणे बरीं आजी कोडीं उगविलीं ॥४॥

[ पांगुळ ]

३९१९. पांगुळ झालों देवा नाहीं हात ना पाय । बैसलों जयावरी सैराट तें जाय । खेटितां कुंप कांटी खुंट दरडी न पाहे । आधार नाहीं मज कोणी बाप ना माय ॥१॥ दाते हो दान करा जाते पंढरपुरा । न्या मज तेथवरी अखमाचा सोयरा ॥२॥ हिंडतां गव्हानें गा शिणलों येरझारी । न मिळेचि दाता कोणी जन्मदुःख निवारी । कीर्ति हे संतां मुखीं तोचि दाखवा हरी । पांगुळा पाय देतो नांदे पंढरपुरीं ॥३॥ या पोटाकारणें गा झालों पांगिला जना । न सरेचि मायबाप भीक नाहीं खंडणा । पुढारा म्हणती एक तया नाहीं करुणा । श्वान हें लागे पाठी आशा बहु दारुणा ॥४॥ काय मी चुकलो गा । मागें नेणवेचि कांहीं । न कळेचि पापपुण्य येथें आठव नाहीं । मी माजी भुललों गा दीप पतंगासोयी । द्या मज जीवदान संत महानुभाव कांहीं ॥५॥ दुरोनी आलों मी गा दुःख झालें दारुण । यावया येथवरी होतें हेंचि कारण । दुर्लभ भेटी तुम्हां पायीं झालें दरुषण । विनवितो तुका संतां दोन्ही कर जोडून ॥६॥

३९२०. देखत होतों आधीं मागें पुढें सकळ। मग हे दृष्टि गेली वरी आलें पडळ। तिमिर कोंदलेंसे वाढे वाढतां प्रबळ। भीत मी झालों देवा काय ज्याल्याचें फळ ॥१॥ आतां मज दृष्टि देईं पांडुरंगा मायबापा। शरण मी आलों तुज निवारूनियां पापा। अंजन लेववूनी करीं मारग सोपा। जाईन सिद्धपंथें अवघ्या चुकतील खेपा ॥२॥ होतसे खेद चित्ता कांहीं नाठवे विचार। जात होतों जनामागें तो हि सांडिला आधार। हा ना तो ठाव झाला अवघा पडिला अंधार। फिरलीं माझीं मज कोणी न देती आधार ॥३॥ जोंवरी चळण गा तोंवरी म्हणती माझा। मानिती लहान थोर देहसुखाचीया काजा। इंद्रियें मावळलीं आला बागुल आजा। कैसा विपरीत झाला तोचि देह नव्हे दुजा ॥४॥ गुंतलों या संवसारें कैसा झालोंसे अंध। मी माझें वाढवूनी मायातृष्णेचा बाध। स्वहित न दिसेचि केला आपुला वध। लागले काळ पाठीं सवें काम हे क्रोध ॥५॥ लागती चालतां गा गुणदोषाच्या ठेंसा। सांडिली वाट मार्ग झालों निराळा कैसा। पाहातों वास तुझी थोर करूनी आशा। तुका म्हणे वैद्यराजा पंढरीच्या निवासा ॥६॥

३९२१. आंधळ्या पांगळ्यांचा एक विठोबा दाता। प्रसवला विश्व तोचि सर्व होय जाणता। घडी मोडी हेळामात्रें पापपुण्यसंचिता। भवदुःख कोण वारी तुजवांचुनी चिंता ॥१॥ धर्म गा जागो तुझा तूंचि कृपाळू राजा। जाणसी जीवींचें गा न सांगतां सहजा ॥२॥ घातली लोळणी गा पुंडलीकें वाळवंटीं। पंढरी पुण्य ठाव नीरे भींवरे तटीं। न देखें दुसरें गा झाली अदृश्यदृष्टि। वोळला प्रेमदाता केली अमृतवृष्टि ॥३॥ आणीक उपमन्यु एक बाळ धाकुटें। न देखे न चलवे जना चालते वाटे। घातली लोळणी गा हरिनाम बोभाटे। पावला त्या कारणें धांव घातली नेटें ॥४॥ बैसोनी खोळी शुक राहे गर्भीं आंधळा। शीणला येरझारी दुःख आठवी वेळा। मागील सोसिलें तें ना मीं म्हणे गोपाळा। पावला त्याकारणें लाज राखिली कळा ॥५॥ न देखे जो या जना तया दावी आपणा। वेगळा सुखदुःखा मोहो नाठवी धना। आपपर तेंही नाहीं बंधुवर्ग सज्जना। तुकया तेचि परी झाली पावें नारायणा ॥६॥

३९२२. सहज मी आंधळा गा। निजनिराकार पंथें। वृत्ति हे निवृत्ति झाली जन न दिसे तेथें। मी माझें हारपलें ठायी जेथींच्या तेथें। अदृश्य तेंचि झालें कांही दृश्य जें होतें ॥१॥ सुखें मी निजलों गा शून्य सारूनी तेथें। त्रिकूटशिखरीं गा दान मिळे आइतें ॥२॥ टाकिली पात्र झोळी धर्म अधर्म आशा। कोल्हाळ चुकविला त्रिगुणांचा वोळसा। न मागें भीक आतां हाचि झाला भरंवसा। वोळली सत्रावी गा तिणें पुरविली इच्छा ॥३॥ ऊर्ध्वमुखें आळविला सोहं शब्दाचा नाद। अरूप जागविला दाता घेऊनी छंद। घेऊनि आला दान निजतत्त्व निजबोध। स्वरूपीं मेळविलें नांव ठेवियला भेद ॥४॥ शब्द हा बहुसार उपकाराची राशी। म्हणोनि चालविला मागें येतील त्यांसी। मागोनी आली वाट सिद्ध ओळीची तैसी। तरले तरती गा

आणिकही विश्वासी ॥५॥ वर्म तें एक आहे दृढ धरावा भाव । जाणीव नागवण नेदी लागो ते ठाव । म्हणोनि संग टाकीं सेवीं अद्वैत भाव । तुका म्हणे हाचि संतीं मागे केला उपाव ॥६॥

३९२३. भगवंता तुजकारणें मेलों जीताचि कैसी । निष्काम बुद्धि ठेली चळन नाहीं तयेसी । न चलती हात पाय दृष्टि फिरली कैसी । जाणतां न देखों गा क्षर आणि अक्षरासी ॥१॥ विठोबा दान दे गा तुझ्या साररिखें नामा । कीर्ति हे वाखाणिली थोर वाढली सीमा ॥२॥ भुक्ति मुक्ति तूंचि एक होसि सिद्धीचा दाता । म्हणोनि सांडवली शोक भय लज्जा चिंता । सर्वस्वें त्याग केला धांव घातली आतां । कृपादान देईं देवा येउनि सामोरा आतां ॥३॥ संसारसागरु गा भवदुःखाचें मूळ । जनवाद अंथरूण माजी काय केले इंगळ । इंद्रियें वज्रघातें तपेउष्ण वरी ज्वाळ । सोसिलें काय करूं दुर्भर हें चांडाळ ॥४॥ तिहीं लोकीं तुझें नाम वृक्ष पल्लव शाखा । वेंधलो वरि खोडा भाव धरुनी टेंका । जाणवी नरनारी जागों धर्म लोकां । पावती पुण्यवंत सोई आमुचिये हाका ॥५॥ नाठवे आपपर आतां काय बा करूं । सारिखा दोहीसवा हारपला विचारु । घातला योगक्षेम तुज आपुला भारु । तुकया शरणागता देईं अभयकरु ॥६॥

३९२४. देश वेष नव्हें माझा सहज फिरत आलों । करूं सत्ता कवणावरीं कोठें स्थिर राहिलों । पाय डोळे म्हणतां माझे तिहीं कैसा मोकलिलों । परदेशीं नाहीं कोणी अंध पांगुळ झालों ॥१॥ आतां माझी करीं चिंता दान देईं भगवंता । पाठीं पोटीं नाहीं कोणी निरवीं सज्जन संतां ॥२॥ चालतां वाट पुढें भय वाटतें चित्तीं । बहुत जन गेले नाहीं आले मागुती । न देखों काय झालें कान तरी ऐकती । बैसलों संधिभागीं तुज धरूनी चित्तीं ॥३॥ भाकितों करुणा गा जैसा सांडिला ठाव । न भरेचि पोट कधीं नाहीं निश्चळ पाव । हिंडतां भागलों गा लक्ष चौऱ्यांशीं गांव । धरूनी राहिलों गा हाचि वसता ठाव ॥४॥ भरंवसा काय आतां कोण आणी अवचिता । तैसीच झाली कीर्ति तया मज बहुतां । म्हणऊनी मारी हाका सोयी पावें पुण्यवंता । लागली भूक थोरी तूंचि कृपाळू दाता ॥५॥ संचित सांडवलें कांहीं होतें तें जवळी । वित्त गोत पुत माया तुटली हे लागावळी । निष्काम झालों देवा होतें माझे कपाळीं । तुका म्हणे तूंचि आतां माझा सर्वस्वें बळी ॥६॥

[ वासुदेव ]

३९२५. मनु राजा ऐक देहपुरी । असे नांदतु ज्यासी दोघी नारी । पुत्रपौत्र संपन्न भारी । तेणें कृपा केली आम्हांवरी गा ॥१॥ म्हणऊनी आलों या देशा । होतों नाहीं तरी भुललों दिशा । दाता तोही मज भेटला इच्छा । येऊनि मारग दाविला सरिसा गा ॥२॥ सवें घेऊनि चौघेजण आला कुमर सुलक्षण । कडे चुकवूनी कांटे वन । ऐका आणिलीं तीं कोणकोण गा ॥३॥ पुढें भक्तीनें धरिलें हातीं । मागें ज्ञान वैराग्य धर्म येती । स्थिर केलीं जीं आचपळें होतीं । सिद्ध आणुनि

लाविलीं पंथी गा ॥४॥ केले उपकार सांगों काय । बाप न करी ऐसी माय । धर्में त्यांच्या हे देखिले पाय । दिलें अखय अभय दान गा ॥५॥ होतों पीडित हिंडतां गांव । पोट न भरे न रहावया ठाव । तो येणें अवघा संदेह । म्हणे फेडियेला तुकयाचा बांधव गा ॥६॥

३९२६. गातों वासुदेव मी ऐका । चित्त ठायीं ठेवुनि भावें एका । डोळे झांकुनि रात्र करूं नका । काळ करीत बैसलासे लेखा गा ॥१॥ राम राम स्मरा आधीं । लाहो करा गांठ घाला मूळबंदीं । सांडा वाउगिया उपाधी । लक्ष लावुनि राहा गोविंदीं गा ॥२॥ अल्प आयुष्य मानवी देह । शत गणिलें तें अर्ध रात्र खाय । मध्यें बालत्व पीडा रोग क्षय । काय भजनासी उरलें तें पाहें गा ॥३॥ क्षणभंगुर नाहीं भरंवसा । व्हा रे सावध तोडा माया आशा । कांहीं न चले पडेल मग गळां फासा । पुढें हुशार थोर आहे ओळसा गा ॥४॥ कांहीं थोडा बहुत लागपाठ । करा भक्तिभाव धरा बळकट । तन मन ध्यान द्या लावुनियां नीट । जरी असेल करणें गोड शेवट गा ॥५॥ विनवितों सकळां जनां । कर जोडोनि थोरां लहानां । दान इतुलें द्या मज दीना । म्हणे तुकया बंधु राम म्हणा गा ॥६॥

३९२७. गेले टळले पहार तीन । काय निदसुरा अझून । जागे होउनि करा कांहीं दान । नका ऐकों झांकुनी लोचन गा ॥१॥ हरी राम कृष्णा । वासुदेव जाणवितसे जना । चिपळ्या टाळ हातीं विणा । मुखीं घोष नारायणा गा ॥२॥ जे ठाकेल कोणा कांहीं । फळ पुष्प अथवा तोयी । द्या परी मीस घेऊं नका भाई । पुढें विन्मुख होतां बरें नाहीं गा ॥३॥ देवाकारणें भाव तस्मात । द्यावें न लगे फारसें वित्त । झालें एक चित्त तरी बहुत । येवढ्यासाठीं नका करूं वाता हात गा ॥४॥ आलों येथवरी बहु सायास । करितां दान हेंचि मागावयास । नका भार घेऊं करूं निरास । धर्म सारफळ संसारास गा ॥५॥ आतां मागुतां येईल फेरा । हें तों न घडे या नगरा । म्हणे तुकयाबंधु राम धरा । ओळखी नाहीं तरी जाल अघोरा गा ॥६॥

३९२८. राम राम दोनी अक्षरें । सुलभ आणिसोपारें । जागा मागिले पहारें । सेवटिचें गोड तेंचि खरें गा ॥१॥ राम कृष्ण वासुदेवा । जाणवीतसे जनासी वाजवी चिपळिया । टाळ घागऱ्याघोषें गा ॥२॥ गाय वासुदेव वासुदेवा । भिन्न नाहीं आणिकां नांवा । दान जाणोनियां करीं हावा । न ठेवीं उरी कांहीं ठेवा गा ॥३॥ नीज घेउनीयां फिरती । एक वेळा जाणविती । धरूनियां राहा चित्तीं । नेघें भार सांडीं कामा हातीं गा ॥४॥ सुपात्रीं सर्व भाव । मी तो सर्व वासुदेव । जाणती कृपाळु संत महानुभाव । जया भिन्न भेद नाहीं ठाव गा ॥५॥ शूर दान जीवें उदार । नाहीं वासुदेवीं विसर । कीर्ति वाढे चराचर । तुका म्हणे तया नमस्कार गा ॥६॥

३९२९. बोल अबोलणें बोले । जागें बाहेर आंत निजेले । कैसें घरांत घरकुल केलें । नेणों अंधार ना उजेडलें गा ॥१॥ वासुदेव करितो फेरा । वाडियांत बाहेर दारा । कोणी

कांहीं तरी दान पुण्य करा । जाव नेदा तरी जातों माघारा गा ॥२॥ हातीं टाळ दिंडी मुखीं नाम गाणें । गजर होतो बहु मोठ्यानें । नाहीं निवडिलीं थोर लहानें । नका निजों भिकेच्या भेणें गा ॥३॥ मी वासुदेव तत्त्वतां । कळों येईल विचारितां । आहे ठाउका सभाग्य संतां । नाहीं दुजा आणीक मागता गा ॥४॥ कांहीं जागा कीं निजलासी । सुने जागवूनि दारापासीं । तुझ्या हितापाठी करी वसवसी । भेटी न घेसी वासुदेवासी गा ॥५॥ ऐसें जागविलें अवघें जन । होतें संचित तिहीं केलें दान । तुका म्हणे दुबळी कोणकोण । गेलीं वासुदेवासी विसरून गा ॥६॥

३९३०. राम कृष्ण गीतीं गात । टाळ चिपळ्या वाजवीत । छंदें आपुलीया नाचत । नीज घेऊनी फिरत गा ॥१॥ जनीं वनीं अवघा देव । वासनेचा पुसावा ठाव । मग वोळगा तो वासुदेव । ऐसा मनीं वसूं द्या भाव गा ॥२॥ निज दानाची थोर आवडी । वासुदेवासी लागली गोडी । मुखीं नाम उच्चारीं घडोघडीं । ऐसी करा वासुदेवी जोडी गा ॥३॥ अवघा सारूनि सेवट झाला । प्रयत्न न चले कांहीं केला । जागा होईं सांडुनि झोपेला । दान देईं वासुदेवाला गा ॥४॥ तुका म्हणे धन्य त्याचें जिणें । जिहीं वासुदेवीं घातले दान । त्या न लगे येणें जाणें । झालें वासुदेवीं राहणें गा ॥५॥

३९३१. जग जोगी जग जोगी । जागेजागे बोलती ॥१॥ जागता जगदेव । राखा कांहीं भाव ॥२॥ अवघा क्षेत्रपाळ । पूजावा सकळ ॥३॥ पूजापत्र कांहीं । फल पुष्प तोय ॥४॥ बहुतां दिसां फेरा । आला या नगरा ॥५॥ नका घेऊं भार । धर्म तोचि सार ॥६॥ तुका मागे दान । द्यावें जी अनन्य ॥७॥

[ सरवदा ]

३९३२. ऐका गा ए भाई । सरवदा सांगतो काई । येथें नाडेल माई । दोघां पुत्रांची ॥१॥ ते करिती तिची विटंबना । अवघ्या प्रसिद्ध जना । एक न मारितां शाहाणा । तो जाणा सुख न पवे ॥२॥ आणीक ऐका गा ये । सरवदा सांगतो काय । खरें बोले तो जाय । नरकामध्यें अधोगती ॥३॥ हें चौघांच्या मुखें । मना आणावे सुखें । अवघीं चुकतील दुःखें । खोटें बोला नरनारी ॥४॥ आणीक नाडेल एक जाण । सरवदा बोलतो वचन । जागें माझें चित्त म्हणोन । पडिलें खान तया घरीं ॥५॥ म्हणोन न म्हणा माझें कांहीं । निजीं निजा सुखें ठायीं । यत्न होइल तईं । चोराठायीं विश्वास ॥६॥ आणीक एक परी । सरवदा सांगतो थोरी । दुःख पावेल नारी । परिव्रता यामध्यें ॥७॥ पांचांनीं दिधली हातीं । म्हणोनी न मनावी निश्चिंती । परपुरुषीं होय रती । सुखगती ते पावे ॥८॥ आणीक एकी परी । सरवदा सांगतो तें करीं । दान देतां जो वारी । नव्हे भला भला तो ॥९॥ तुका म्हणे आई । येथें नांव काई । सांगसी तें ठायीं । मरो रांडेचें ॥१०॥

[ मुंढा ]

३९३३. संबाल यारा उपर तलें दोन्हों मारकी चोट। नजर करे सो ही राखे पश्चा जावे लुट ॥१॥ प्यार खुदाई प्यार खुदाई प्यार खुदाई। प्यार खुदाईरे बाबा जिकिर खुदाई ॥२॥ उडे कुदे ढुंग नचावे आगल भुलन प्यार। लडबड खडखड कांहें कांख चलावत भार ॥३॥ कहे तुका सुनो एका हम जिन्होंके सात। मिलावे तो उसे देना तो ही चढावे हात ॥४॥

३९३४. सब संबाल म्याने लौंडे खडा केऊं गुंग। मदिरथी माता हुवा भुलि पाडी भंग ॥१॥ आपसकुं संवाल आपसकुं संवाल मुंढे खुब राख ताल। मुथिवोहि बोला नहीं तो करूंगा हाल ॥२॥ आवलका तो पीछें नहीं मुदल बिसर जाय। फिरते नहीं लाज रंडी गद्धी गोते खाय ॥३॥ जिन्हों खातिर इतना होता सो नहीं दुजे बेकाम। उचा जोरो लिया तुंबा तुंबा बुरा काम ॥४॥ निकल जावे चिकल जोरा मुंढे दिलदारी। जबानीकी छोड दे बात फिर एक तारी ॥५॥ कहे तुका पिसल रुका मेरेको तो दान देख। पक्कड धका गांडगुढघी मार चलाऊं आलेख ॥६॥

३९३५. नजर करे सो हि जिंके बाबा दुरथी तमासा देख। लकडी फांसा लेकर बैठा आगले ठकण भेख ॥१॥ काहें भुला एक देखत। आंखो मारतडांगो बाजार ॥२॥ दमरी चमरी जो नर भुला। सोत आघो हिलत खाय ॥३॥ नहि बुलावत किसे बाबा आप हि मत जाय। कहे तुका उस असाके संग फिरफिर गोते खाये ॥४॥

३९३६. अल्ला करे सो होय बाबा करतारका सिरताज। गाऊ बछरे तिस चलावे यारी भाघो न सात ॥१॥ ख्याल मेरा साहेबका बाबा हुवा करतार। व्हांटें आघे चले पीठ आपे हुवा असिवार ॥२॥ जिकिर करो अल्लाकी बाबा सबल्या अंदर भेस। कहे तुका जो नर बुझे सोहि भया दरवेस ॥३॥

३९३७. अल्ला देवे अल्ला दिलावे। अल्ला दारु अल्ला खिलावे। अल्ला बिगर नहीं कोय। अल्ला करे सोहि होय ॥१॥ मर्द होय वो खडा फीर। नामर्दकुं नहीं धीर। आपने दिलकूं करना खुसी। तीन दामकी क्या खुमासी ॥२॥ सब रसोंका किया मार। भजनगांली एक हि सार। इमान तो सबहि सखा। थोडी तोभी लेकर ज्या ॥३॥ जिन्हों पास नीत सोय। वो हि बसकर ते रोवे। सांतो पांचो मार लगावे। उतार सो पीछे खावे ॥४॥ सब ज्वानी निकल जावे। पीछे गधडी मटी खावे। गांवढाल सो क्या लेवे। हगवनी भरी नहीं धोवे ॥५॥ मेरी दारु जिन्हें खाया। दिदार दरगां सो हि पाया। तल्हे मुढी झाल जावे। बिगारी सोवे क्या लेवे ॥६॥ बजारका बुझे भाव। वो हि पुसत आवे ठाव। फुकट बाटु कहे तुका। लेवे सोहि लेवो सखा ॥७॥

३९३८. अवल्ल नाम आल्ला बडा लेते भुल न जाये। इलाम त्याकालजमुपरताही तुंब बजाये ॥१॥ अल्ला एक तुं नबी एक तुं। काटतें सिर पावों हाते नहीं जीव डराये ॥२॥ आगले

देखे पिछे बुझो । आपे हुजुर आय ॥३॥ सब सवरी नचाव म्याने खडा आपनी सात । हात पाव रखते जबाब । नहीं आगली बात ॥४॥ सुनो भाई बजार नहीं सबहि नर चलावे । नन्हा बडा नहीं कोये एक ठोर मिलावे ॥५॥ एक तीर नहीं प्यार जीवनकी आस । कहे तुका सो हि मुंढा राखलिये पायेनपास ॥६॥

३९३९. तम भज्याय ते बुरा जिकीर तै करे । सीर काटे ऊर कुटे ताहां झडकरे ॥१॥ ताहां एक तु ही ताहां एक तु ही । ताहां एक तु ही रे बाबा हम तुम्ह नहीं ॥२॥ दिदार देखो भले नहीं किसे पछाने कोय । सच्चा नहीं पकड सके झुटा झुटे रोय ॥३॥ किसे कहे मेरा किन्हे सती लिया बास । नहीं मेलों मिले जीवना झुटा किया नास ॥४॥ सुनो भाई कैसा तो ही होय तैसा होय । बाट खाना अल्ला कहना एकबारां तो हे ॥५॥ भला लिया भेक मुंढे अपना नफा देख । कहे तुका सो ही सखा हाक अल्ला एक ॥६॥

[ गोंधळ ]

३९४०. राजस सुंदर बाळा पाहो आलिया सकळा वो । बिंबीं बिंबोनि ठेली माझी परब्रह्म वेल्हाळा वो । कोटि रविशशि जिच्या अंगींचिया किळा वो ॥१॥ राजस विठाबाई माझें ध्यान तुझे पायीं वो । त्यजूनियां चौघांसी लावी आपुलिये सोई वो ॥२॥ सुकुमार साजिरी कैसीं पाउलें गोजिरीं वो । कंठीं तुळसीमाळा उभी भीवरेच्या तिरीं वो । दंत हिरया ज्योति शंखचक्र मिरवे करीं वो ॥३॥ निर्गुण निराकार वेदां न कळेचि आकार वो । शेषादिक श्रमले श्रुति न कळे तुझा पार वो । उभारोनी बाहे भक्तां देत अभयकर वो ॥४॥ येऊनी पंढरपुरा अवतरली सारंगधरा वो । देखोनी भक्ति भाव वोसरली अमृतधारा वो । देऊनी प्रेमपान्हा तुकया स्वामिनें किंकरा वो ॥५॥

३९४१. सुदिन सुवेळ तुझा मांडिला गोंधळ वो । पंच प्राण दिवटे दोनी नेत्रांचे हिल्लाळ वो ॥१॥ पंढरपूरनिवासे तुझे रंगीं नाचत असें वो । नवस पुरवीं माझा मनींची जाणोनियां इच्छा वो ॥२॥ मांडिला देव्हारा तुझा त्रिभुवनामाझारी वो । चौक साधियेला नाभिकळस ठेविला वरी वो ॥३॥ बैसली देवता पुढें वैष्णवाचें गाणें वो । उद्गारें गर्जती कंठी तुळसीचीं भूषणें वो ॥४॥ स्वानंदाचे ताटीं धूप दिप पंचारती वो । ओवाळिली माता विठाबाई पंचभूतीं वो ॥५॥ तुझें तुज पावलें माझा नवस पुरवी आतां वो । तुका म्हणे राखें आपुलिया शरणागता वो ॥६॥

३९४२. सुंदर मुख साजिरें कुंडलें मनोहर गोमटीं वो । नागर नागखोपा केशर कस्तुरी मळवटीं वो । विशाळ व्यंकट नेत्र वैजयंती तळपे कंठीं वो । कास पितांबराची चंदन सुगंध साजे उटी वो ॥१॥ अतिबरवंटा बाळा आली सुलक्षणा गोंधळा वो । राजस तेजोराशी मिरवे

शिरोमणी वेल्हाळा वो । कोटि रविशशिप्रभा तेजें लोपल्या सकळा वो । न कळे ब्रह्मादिकां अनुपम्य इची लीळा वो ॥२॥ सावळी सुकुमार गोरी भुजा शोभती चारी वो । सखोल वक्षस्थळसुढाळ पदक झळके वरी वो । कटीं क्षुद्र घंटिका शब्द करिताती माधुरी वो । गर्जती चरणीं वाकी अभिनव संगीत नृत्य करी वो ॥३॥ अष्टांगी मंडित काय वर्णावी रूपठेवणी वो । सोलिव शुद्ध रसाची ओतिव लावण्याची खाणी वो । सर्वकळासंपन्न मंजुळ बोले हास्यवदनी वो । बहु रूपें नटली आदिशक्ति नारायणी वो ॥४॥ घटस्थापना केली पंढरपुरमहानगरीं वो । अस्मानी मंडप दिला तिन्ही तालांवरी वो । आरंभिला गोंधळ इनें चंद्रभागेतिरीं वो । आली भक्तिकाजा कृष्णाबाई योगेश्वरी वो ॥५॥ तेहतीस कोटी देव चामुंडा अष्ट कोटि भैरव वो । आरत्या कुरवंड्या करिती पुष्पांचा वरुषाव वो । नारद तुंबर गायन ब्रह्मानंद करिती गंधर्व वो । वंदी चरणरज तेथें तुकयाचा बांधव वो ॥६॥

३९४३. ऐक बाई तुज वो कांहीं सांगते शकुन । निजलिया भुर होसी जागें म्हणऊन ॥१॥ मान्य माझें केलें सांगतें एका बोलें । न येतां हें भलें कळों कोणा लोकांसी ॥२॥ सांगते गुण जीवींची खूण ऐक माझी मात । बैस एका भावें माझें हातीं दे वो हात ॥३॥ बरवा घराचार तुज सांपडला ठाव । फळ नाहीं पोटीं येथें दिसे खोटा भाव ॥४॥ आहे तुझे हातीं एका नवसाचें फळ । भावा करी साह्य चहूं अठरांच्या बळें ॥५॥ करीं लागपाठ चित्त वित्त नको पाहों । अखई तो चुडा तुज भोगईल नाहो ॥६॥ कुळींची हे मुळी तुझे लागलीसे देवी । पडिला विसर नेदी फळ नाहीं ठावी ॥७॥ तुका म्हणे नांद सुखें धरीं आठवण । माझे येती कोणी त्यांचा राखे बहु मान ॥८॥

३०४४. देव ते संत देव ते संत । निमित्य त्या प्रतिमा ॥१॥ मी तों सांगतसें भावें । असो ठावें सकळां ॥२॥ निराकारी ओस दिशा । येथें इच्छा पुरतसे ॥३॥ तुका म्हणे रोकडें केणें । सेवितां येणें पोट धाय ॥४॥

३९४५. न कळे हो माव मुनि मागें एकी अंतुरीं । साठी संवत्सरा जन्म तया उदरीं ॥१॥ कैसा आकळ वो माय चपळ वो । त्रिभुवनव्यापक हरि सकळ वो ॥२॥ हनुमंता भेटी गर्व हरिला दोहींचा । गरुडा विटंबना रूपा सत्यभामेचा ॥३॥ द्रौपदीचा भेद पुरविला समयीं । ऋषि फळ वनीं देंठीं लावितां ठायीं ॥४॥ अर्जुनाच्या रथीं कपिध्वजा स्तंभी ठेविला । दोही पैज तेथें गर्व हरी हा दादुला ॥५॥ भावभक्ति सत्वगुण झाला दुर्जना । तुका म्हणे सकळां छंदें खेळे आपणा ॥६॥

३९४६. उदारा कृपाळा अगा देवांच्या देवा । तुजसवें पण आतां आमुचा दावा ॥१॥ कैसा जासी सांग आतां मजपासूनी । केलें वाताहात दिले संसारा पाणी ॥२॥ अवघीं आवरूनी तुझें लाविली पाठीं । आतां त्या विसर सोहंकोहंच्या गोष्टी ॥३॥ तुका म्हणे आतां चरणीं घातली

मिठी । पडिली ते पडो तुम्हां आम्हांसी तुटी ॥४॥

३९४७. करूनी विनवणी पायीं ठेवितों माथा । परिसावी विनंती माझी पंढरीनाथा ॥१॥ अखंडित असावेसें वाटतें पायीं । साहोनी संकोच ठाव थोडासा देईं ॥२॥ असो नसो भाव आलों तुझिया ठाया । कृपादृष्टी पाहे मजकडे पंढरीराया ॥३॥ तुका म्हणे तुझीं आम्हीं वेडीं वाकुडीं । नामें बहुपाश हातें आपुल्या तोडी ॥४॥

३९४८. झाली होती काया । बहु मळीन देवराया ॥१॥ तुझ्या उजळली नामें । चित्त प्रक्षाळिलें प्रेमें ॥२॥ अनुतापें झाला झाडा । प्रारब्धाचा नितोडा ॥३॥ तुका म्हणे देह पायीं । ठेवुनि झालों उतराई ॥४॥

३९४९. आजी आनंदु रे एकी परमानंदु रे । जया श्रुति नेती नेति म्हणती गोविंदु रे ॥१॥ विठोबाची वेडीं आम्हां आनंदु सदा । गाऊं नाचूं वाहूं टाळी रंजवूं गोविंदा ॥२॥ सदा सण सांत आम्हां नित्य दिवाळी । आनंदें निर्भय आमचा कैवारी बळी ॥३॥ तुका म्हणे नाहीं जन्ममरणाचा धाक । संत सनकादिक हे तों आमचें कवतुक ॥४॥

३९५०. विठ्ठल कीर्तनाचे अंतीं । जय जय हरी जे म्हणती ॥१॥ तेंचि सुकृताचें फळ । वाचा रामनामें निखळ ॥२॥ बैसोनी हरिकथेसी । होय सावध चित्तासी ॥३॥ तुका म्हणे त्याचा जन्म । सुफळ झाला भवश्रम ॥४॥

३९५१. प्राणिया एक बीजमंत्र उच्चारी । प्रतिदिनीं रामकृष्ण म्हण कां मुरारी ॥१॥ हेंचि साधन रे तुज सर्व सिद्धींचें । नाम उच्चारीं रे गोपाळाचें वाचे ॥२॥ उपास पारणें नलगे वनसेवन । नलगे धूम्रपान पंचाग्नितापणें ॥३॥ सुखाचें फुकाचें कांहीं न वेचे भांडार । कोटियज्ञांपरिस तुका म्हणे हें सार ॥४॥

३९५२. न चलवे पंथ वचन नसतां पालवीं । शरीर विटंबिलें वाटे भीक मागावी ॥१॥ न करीं रे तैसें आपआपणां । नित्य राम राम तुम्ही सकळही म्हणा ॥२॥ राम म्हणवितां रांडा पोरें निरविशी । पडसी यमा हातीं जाचविती चौऱ्यांशीं ॥३॥ मुखीं नाहीं राम तोही आत्महत्यारा । तुका म्हणे लाज नाहीं तया गव्हारा ॥४॥

३९५३. थडियेसी निघतां पाषाणाच्या सांगडी । बुडतां मध्यभागीं तेथें कोण घाली उडी ॥१॥ न करीं रे तैसें आपआपणिया । पतंग जाय वांया जीवें ज्योति घालूनिया ॥२॥ सावधपणें सोमल वाटी भरोनियां प्याला । मरणाअंतीं वैद्य बोलावितो वहिला ॥३॥ तुका म्हणे करीरे ठायींचाचि विचार । जंव नाहीं पातला यमाचा किंकर ॥४॥

३९५४. शंख करिशी ज्याच्या नांवें । त्याचें तुज नाहीं ठावें । ऐक सांगतों एका भावें । सांपडे तें घरीं जीवऊनि खावें रे विठ्ठल ॥१॥ टिळे माळा करंडी सोंग । धरूनी चाळविलें जग । पसरी हात

नाहीं त्याग। दाविती दगड पुजीती भगल रे विठ्ठल ॥२॥ राख लावुनि अंग मळी। वांयां टोके मी एक बळी। वासने हातीं बांधवी नळी। त्यासी येऊनी काळ गिळी उगळी रे विठ्ठल ॥३॥ कोण तें राहडीचें सुख। वरते पाय आरतें मुख। करवी पीडा भोगवी दुःख। पडे नरकीं परि न बळेचि मूर्ख रे विठ्ठल ॥४॥ सिकला फाग मारी हाका। रांडा पोरें मेळवी लोकां। विटंबी शरीर मागे रुका। केलें तें गेलें अवघें फुका रे विठ्ठल ॥५॥ कळावें जनां मी एक बळी। उभा राहोनी मांडी फळी। फोडोनी गुडघे कोंपर चोळी। आपला घात करोनी आपणचि तळमळी रे विठ्ठल ॥६॥ फुकट खेळे ठकलीं वायां। धरूनि सोंगें बोडक्या डोया। शिवों नये ती अंतरीं माया। संपादणीविण विटंबिली काया रे विठ्ठल ॥७॥ धुळी माती कांहीं खेळोंच नका। जवादि चंदन घ्यावा बुका। आपणा परिमळ आणिकां लोकां। मोलाचा महिमा फजिती ते फुका रे विठ्ठल ॥८॥ बहु दुःखी झालियां खेळें। अंगीं बुद्धि नाहीं बळ। पाठीवरी तोबा तोंड काळें। रसना द्रव्य उपस्थाच्या मुळें रे विठ्ठल ॥९॥ काय सांगतो तें ऐका तुका। मोडा खेळ कांहीं अवगोंच नका। चला जेवूं आधीं पोटीं लागल्या भुका। धाल्यावरी मग बरा टाकमटिका रे विठ्ठल ॥१०॥

[ कावडे ]

३९५५. आहा आहा रे भाई प्रथम नमूं तो विनायक। ठेवूनि गुरुचरणीं मस्तक। वदेल प्रासादिक। वाणी हरिहरांचे पवाडे ॥१॥ माझी ऐसी ब्रीदावळी। दासें दासत्वें आगळी। पान्हेरीनें मार्ग मळी। जीवन घ्या रे कापडी हो ॥२॥ जें सितळाहुनी सीतळ। पातळाहुनी पातळ। प्रेमामृत रसाळ। तें आधीं सेवा हो भाग्याचे नु ॥३॥ जिंकाल तरी जिंका अभिमान। दवडाल तरी दवडा लज्जा आधी मान। धराल ते धरा शंभूचें ध्यान। दावाल पण ऐसा दावा तो ॥४॥ काळ घेऊं नेदीं वाव। आला तो राखें घावडाव। शुद्ध सत्वीं राखोनी भाव। म्हणा महादेव हरहर वाणी गर्जो द्या ॥५॥ पराविया नारी माउलीसमान। परधनीं बाटों नेदी मन। जीवित्व तें तृणासमान। स्वामीकाजीं जाण शूर म्हणों तया आम्ही ॥६॥ शक्ति वेचाविया पर उपकारा। खोटें खोट्याचा पसारा। सत्य तें भवनदीचा तारा। आळस तो न करा येथें आले हो सांगतों ॥७॥ व्रत करा एकादशी सोमवार। कथा पूजन हरिजागर। पुण्य तें असे गातां नाचतां फार। पुन्हा बोलिला संसार नाहीं नाहीं सत्यत्वें ॥८॥ संग संतांचा करतां बरवा। उत्तमोत्तम कीर्तीचा ठेवा। पंथ तो सुपंथें चालावा। उगवा वासना लिगाड ॥९॥ तुका चालवितो कावडी। प्रवृत्ति निवृत्ति चोखडी। पुढती पुढती अधिक गोडी। भरूनि कळस भजन आवडी। केशवदास नटतसे ॥१०॥

३९५६. आहा आहा रे भाई हें अन्नदानाचें सत्र। पव्हे घातली सर्वत्र। पंथीं अवघे पंथ मात्र। इच्छाभोजनाचें आर्त पुरवावया ॥१॥ यावें तेणें घ्यावें। न सरेसें केलें सदाशिवें। पात्र

शुद्ध पाहिजे बरवें । मंगळभावें सकळ हर म्हणा रे ॥२॥ नव्हे हें कांहीं मोकळें । साक्षी चौघांचिया वेगळे । नेदी नाचों मताचिया वळें । अणु अणोरणीया आगळें । महदि महदा साक्षित्वें हर म्हणा रे ॥३॥ हे हरि नामाची आंबिली । जगा पोटभरी केली । विश्रांति कल्पतरूची साउली । सकळां वर्णां सेवितां भली । म्हणा हर हर महादेव ॥४॥ तुका हरिदास तराळ । अवघे हाकारी सकळ । या रे वंदू शिखरातळ । चैत्रमास पर्वकाळ महादेवदर्शनें ॥५॥

३९५७. आहा आहा रे भाई तयावरी माझी ब्रीदावळी । भ्रष्ट ये कली क्रियाहीन ॥१॥ थुंका थुंका रे त्याच्या तोंडावरी । वाणिली ते थोरी दवडा वांयां बाहेरी ॥२॥ बाइलेचा दास पित्रांस उदास । भीक भिकाऱ्यास नये दारा ॥३॥ विद्याबळें वाद करूनियां छळी । आणिकांसी फळी मांडोनियां ॥४॥ गांवींचिया देवा नाहीं दंडवत । ब्राह्मण अतीत घडेचि ना ॥५॥ सर्वकाळ करि संतांचिया निंदा । स्वप्नींही गोविंदा आठवीना ॥६॥ खाचेमध्यें धन पोटासी बंधन । नेणें ऐसा दानधर्म कांहीं ॥७॥ तुका म्हणे नटें दावूनियां सोंग । लवों नेदी अंग भक्तिभावें ॥८॥

३९५८. आहा आहा रे भाई नमो उदासीन झाले देहभावा । आळविती देवा तया नमो ॥१॥ नमो तीर्थपंथें चालती तयांसी । येती बोळवित त्यांसी नमो ॥२॥ नमो तया संतवचनीं विश्वास । नमों भावें दास्य गुरूचें त्या ॥३॥ नमो तयां मात्यापित्यांचें पाळण । नमो त्या वचन सत्य वदे ॥४॥ नमो तया जाणे आणिकांचें सुखदुःख । राखे तहान भूक तया नमो ॥५॥ परोपकारी नमो पुण्यवंता । नमो त्या दमित्या इंद्रियांसी ॥६॥ तुका म्हणे नमो हरिचिया दासा । तेथें सर्व इच्छा पुरलीसे ॥७॥

३९५९. आहा आहा रे भाई गंगा नव्हे जळ । वृक्ष नव्हे वड पिंपळ । तुळसी रुद्राक्ष नव्हे माळ । श्रेष्ठ तनु देवाचिया ॥१॥ समुद्र नदी नव्हे पैं गा । पाषाण म्हणों नये लिंगा । संत नव्हती जगा । माणसा त्या सारिखे ॥२॥ काठी म्हणों नये वेतु । अन्न म्हणों नये सातु । राम राम हे मातु । नये म्हणो हे शब्द ॥३॥ चंद्र सूर्य नव्हती तारांगणें । मेरु तो नव्हे पर्वतासमान । शेष वासुकी सर्प नव्हे जाण । विखाराच्या सारिखे ॥४॥ गरुड नव्हे पाखरूं । ढोर नव्हे नंदिकेश्वरू । झाड नव्हे कल्पतरु । कामधेनु गाय न म्हणावी ॥५॥ कूर्म नव्हे कासव । डुकर नव्हे वराह । ब्रह्मा नव्हे जीव । स्त्री नव्हे लक्ष्मी ॥६॥ गवाक्ष नव्हे हाड । पाटाव नव्हे कापड । परीस नव्हे दगड । सगुण ते ईश्वरीचे ॥७॥ सोनें नव्हे धातु । मीठ नव्हे रेतु । नाहीं नाहीं चर्मांआतु । कृष्णाजिन व्याघ्रांबर ॥८॥ मुक्ताफळें नव्हेती गारा । खड्याऐसा नव्हे हिरा । जीव नव्हे सोइरा । बोळवीजे स्वइच्छेनें ॥९॥ गांव नव्हे द्वारावती । रणछोड नव्हे मूर्ति । तीर्थ नव्हे गोमती । मोक्ष घडे दर्शनें ॥१०॥ कृष्ण नव्हे भोगी । शंकर नव्हे जोगी । तुका म्हणे पांडुरंगीं । हा प्रसाद लाधला ॥११॥

[ सौऱ्या ]

३९६०. वेसन गेलें निष्काम झालें नर नव्हे नारी । आपुल्या तुटी पारख्या भेटी सौरियांच्या फेरी ॥१॥ त्याचा वेध लागला छंद हरि गोविंद वेळोवेळां । आपुलेमागें हांसत रागें सांवले घालिती गळा ॥२॥ जनवेषा भीतें तोंडा आमुच्या भांडणा । कर कटीं भीमातटीं पंढरीचा राणा ॥३॥ वेगळ्या याति पडिलों खंतीं अवघ्या एका भावें । टाकियेली चाड देहभावें जीवें शिवें ॥४॥ सकळांमधीं आगळी बुद्धि तिची करूं सेवा । वांया तुवां मुंडासवे भक्ती नाचो भावा ॥५॥ म्हणे तुका टाक रुका नाचों निर्लज्जा । बहु झालें सुख कामें चुकलिया काजा ॥६॥

३९६१. आणिकां उपदेशूं नेणें नाचों आपण । मुंडा वांयां मार गेली वांयां हांसे जन ॥१॥ तैसा नव्हे चाळा आवरीं मन डोळा । पुढिलांच्या कळा कवतुक जाणोनि ॥२॥ बाहिरल्या वेषें आंत जैसें तैसें । झांकलें तों पोट भरे तेणें वेसें ॥३॥ तुका म्हणे केला तरी करीं शुद्ध भाव । नाहीं तरी जासी वांयां हा ना तोसा ठाव ॥४॥

३९६२. टाक रुका चाल रांडे कां गे केली गोवी । पुसोनियां आलें ठाव म्हणोनी देतें सीवी ॥१॥ आतां येणें छंदें नाचों विनोदें । नाहीं या गोविंदें माझें मजसी केलें ॥२॥ कोरडे ते बोल कां गे वेचितेसी वांयां । वर्तें करूनि दावीं तुझ्या मुळींचिया ठाया ॥३॥ याजसाठीं डौर म्यां धरियेला हातीं । तुका म्हणे तुम्ही गांठी सोडायाची खंती ॥४॥

३९६३. मोकळी गुंते रिती कुंथे नाहीं भार दावें । धेडवाडा बैसली खोडा घेतली आपुल्या भावें ॥१॥ ऐका बाई लाज नाहीं आणिकां त्या गरतीची । समाधानीं उंच स्थानीं जाणे सेवा पतीची ॥२॥ न बोलतां करी चिंता न मारितां पळे । दाह्मा सेजे नावडे निजे जगझोडीचे चाळे ॥३॥ देखत आंध बहिर कानीं बोल बोलतां मुके । तुका म्हणे पतन सोयरीं ऐसीं झालीं एकें ॥४॥

३९६४. सातें चला काजळ घाला तेल फणी करा । दिवाणदारीं बैसले पारीं नाचों फेर धरा ॥१॥ या साहेबाचें झालें देणें वेळोवेळां न लगे येणें । आतां हाटीं कशासाठीं हिंडों पाटी दुकानें ॥२॥ अवघ्या जणी मुंडा धणी नाचों एके घाईं । सरसावलें सुख कैसा चाळा एके ठायीं ॥३॥ म्हणे तुका वोळगें एका तोड चिंता माया । देउनियां उद्गार जाऊं मुळींचिया ठाया ॥४॥

३९६५. सौरी सुर झालें दूर डौर घेतला हातीं । माया मोह सांडवलें तीहीं लोकीं झालें सरती ॥१॥ चाल विठाबाई अवघी पांच देहीं । न धरीं गुज कांहीं वाळवंटीं सांपडतां ॥२॥ हिंडोनी चौऱ्यांशीं घरे आलें तुझ्या दारा । एक्या रुक्यासाठीं आंचवलें संसारा ॥३॥ लाज मेली शंका गेली नाचों महाद्वारीं । भ्रांति सावलें फिटोनि गेलें आतां कैंची उरी ॥४॥ झालें भांडी जगा सांडी नाहीं भीड चाड । घालीन चरणीं मिठी पुरवीन जीवींचें तें कोड ॥५॥ तुका म्हणे रुका करी संसारतुटी । आतां तुम्हां आम्हां कैसी झाली जीवें साटी ॥६॥

३९६६. सम सपाट वेसनकाट नि:संग झालें सौरी । कुडपीयेला देश आतां येऊं नेदीं दुसरी ॥१॥ गाऊं रघुरामा हेंचि उरलें आम्हां । नाहीं जीवतमा वित्त गोतासहित ॥२॥ ठाव झाला रिता झाकुनि काय आतां । कोणासवें लाज कोण दुजें पाहतां ॥३॥ सौरीयांचा संग आम्हां दुरावलें जग । भिन्न झालें सुख देहभाव पालटला रंग ॥४॥ लाज भय शंका जनीं नाहीं तजियेलीं दोन्ही । फिराविला वेष नव्हों कोणाचींच कोणी ॥५॥ तुका म्हणे हा वेष दिला आम्हां जेणें । जना प्रतीत सवें असो एकपणें ॥६॥

३९६७. अहो नरनारी संवसारीं अंतरलों । निर्लज्ज निष्काम जना वेगळेचि ठेलों ॥१॥ चाल रघुरामा ने आपल्या गांवा । तुजविण आम्हां कोण सोयरा सांगाती ॥२॥ जनवाद लोकनिंद्य पिशुनाचे चेरे । सांहू तुजसाठीं अंतरलीं सहोदरे ॥३॥ बहुतां पाठीं निरोप हाटीं पाठविला तुज । तुका म्हणे आतां सांडुनि लौकिकाची लाज ॥४॥

[ ललित ]

३९६८. आजी दिवस झाला । धन्य सोनियाचा भला ॥१॥ झालें संतांचे पंगती । बरवें भोजन निगुती ॥२॥ रामकृष्णनामें । बरवीं मोहियेलीं प्रेमें ॥३॥ तुका म्हणे आला । चवी रसाळ हा काला ॥४॥

३९६९. तुम्ही ये तरी सांगा काहीं । आम्हांविशीं रखुमाबाई ॥१॥ कांहीं उरलें तें ठायीं । वेगीं पाठवूनी देईं ॥२॥ टोंकत बैसलों देखा । इच्छीतसें ग्रासा एका ॥३॥ प्रेम देउनी बहुडा झाला । तुका म्हणे विठ्ठल बोला ॥४॥

३९७०. वाट पाहे बाहे निढळीं ठेवूनियां हात । पंढरीचे वाटे दृष्टि लागलेंसें चित्त ॥१॥ कईं येता देखेन माझा मायबाप । घटिका बोटें दिवस लेखीं धरूनियां माप ॥२॥ डावा डोळा लवे उजवी स्फुरतसे बाहे । मन उताविळ भाव सांडूनियां देहे ॥३॥ सुखसेज गोड चित्तीं न लगे आणीक । नाठवे घरदार तहान पळाली भूक ॥४॥ तुका म्हणे धन्य ऐसा दिवस तो कोण । पंढरीचें वाटे येतां मूळ देखेन ॥५॥

३९७१. तुझें दास्य करूं आणिका मागों खावया । धिग् झालें जिणें माझें पंढरीराया ॥१॥ काय गा विठोबा तुज आतां म्हणावें । शुभाशुभ गोड तुम्हां थोरांच्या दैवें ॥२॥ संसाराचा धाक निरंतर आम्हांसी । मरण भलें परि काय अवकळा ऐसी ॥३॥ तुझा शरणागत शरण जाऊं आणिकांसी । तुका म्हणे लाज कवणा हें कां नेणसी ॥४॥

३९७२. पुरविली आळी । जे जे केली ते ते काळीं ॥१॥ माय तरी ऐसी सांगा । कृपाळुवा पांडुरंगा ॥२॥ घेतलें नुतरी । उचलोनी कडियेवरी ॥३॥ तुका म्हणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ॥४॥

३९७३. पतित पतित । परि मी त्रिवाचा पतित ॥१॥ परि तूं आपुलिया सत्ता । मज करावें सरता ॥२॥ नाहीं चित्तशुद्धि । स्थिर पायांपाशीं बुद्धि ॥३॥ अपराधाचा केलों । तुका म्हणे किती बोलों ॥४॥

३९७४. कथेची सामग्री । देह अवसानावरी ॥१॥ नको जाऊं देऊं भंगा । गात्रें माझीं पांडुरंगा ॥२॥ आयुष्य करीं उणें । परि मज आवडो कीर्तन ॥३॥ तुका म्हणे हाणी । या वेगळी मना नाणीं ॥४॥

३९७५. गळित झाली काया । हेंचि लळित पंढरीराया ॥१॥ आलें अवसानापासीं । रूप राहिलें मानसीं ॥२॥ वाहिला कळस । तेथें स्थिरावला रस ॥३॥ तुका म्हणे गोड झालें । नारायणीं पोट धालें ॥४॥

३९७६. रत्नजडित सिंहासन । वरी बैसले आपण ॥१॥ कुंचे ढळती दोहीं बाहीं । जवळी राही रखुमाई ॥२॥ नाना उपचारीं । सिद्धि वोळगती कामारी ॥३॥ हातीं घेउनी पादुका । उभा बंदिजन तुका ॥४॥

३९७७. हिरा शोभला कोंदणीं । जडित माणिकांची खाणी ॥१॥ तैसा दिसे नारायण । मुख सुखाचें मंडण ॥२॥ कोटी चंद्रलीळा । पूर्णिमेच्या पूर्णकळा ॥३॥ तुका म्हणे दृष्टि धाये । परतोनी माघारी ते न ये ॥४॥

३९७८. उभारिला हात । जगीं जाणविली मात ॥१॥ देव बैसले सिंहासनीं । आल्या याचकासी पुरे धनी ॥२॥ एकाच्या कैवाडे । उगवे बहुतांचें कोडें ॥३॥ दोहीं ठायीं तुका । नाहीं पडों देत चुका ॥४॥

३९७९. जीवेंसाठीं यत्नभाव । त्याची नाव बळकट ॥१॥ पैल तीरा जातां कांहीं । संदेह नाहीं भवनदी ॥२॥ विश्वासाची धन्य जाती । तेथें वस्ती देवाची ॥३॥ तुका म्हणे भोळियांचा । देव साचा अंकित ॥४॥

३९८०. आशीर्वाद तया जाती । आवडी चित्तीं देवाची ॥१॥ कल्याण तीं असो क्षेम । वाढो प्रेम आगळें ॥२॥ भक्तिभाग्य गांठी धन । त्या नमन जीवासी ॥३॥ तुका म्हणे हरिचे दास । तेथे आस सकळ ॥४॥

३९८१. तया साठीं वेचूं वाणी । आइकों कानीं वार्ता त्या ॥१॥ क्षेम माझे हरिजन । समाधान पुसतां त्यां ॥२॥ परत्रींचे जे सांगाती । त्यांची याती न विचारीं ॥३॥ तुका म्हणे धैर्यवंतें । निर्मळ चित्तें सखीं तीं ॥४॥

३९८२. उभय उत्तरीं संतीं केलें दान । झालें समाधान चित्त तेणें ॥१॥ आतां प्रेमरसें न घडे खंडण । द्यावें कृपादान नारायणा ॥२॥ आलें जें उचित देहविभागासी । तेणें पायांपासीं उभीं

असों ॥३॥ तुका म्हणे करी पूजन वैखरी । बोबड्या उत्तरीं गातों गीत ॥४॥

३९८३. असो मंत्रहीन क्रिया । नका चर्या विचारूं ॥१॥ सेवेमधीं जमा धरा । कृपा करा शेवटीं ॥२॥ विचारूनी ठायाठाव । येथें भाव राहिला ॥३॥ आतां तुकयापाशीं हेवा । नाहीं देवा तांतडी ॥४॥

३९८४. ऐकें वचन कमळापति । मज रंकाची विनंती ॥१॥ कर जोडितों कथेकाळीं । आपण असावें जवळी ॥२॥ घेईं ऐसी भाक । मागेन जरी कांहीं एक ॥३॥ तुकयाबंधु म्हणे देवा । शब्द इतुकाचि राखावा ॥४॥

३९८५. आली ललिताची वेळ । असा सावध सकळ ॥१॥ लाहो करा वेगीं स्मरा । टाळी वाउनि विश्वंभरा ॥२॥ झालिया अवसान । न संपडती चरण ॥३॥ तुकयाबंधु म्हणे थोडे । अवधि उरली आहे पुढें ॥४॥

३९८६. नेणें गाऊं कांहीं धड बोलतां वचन । कायावाचामनेंसहित आलों शरण ॥१॥ करीं अंगीकार नको मोकलूं हरी । पतितपावन ब्रीदें करावीं खरीं ॥२॥ नेणें भक्तिभाव तुझा म्हणवितों दास । जरी देसी अंतर तरी लज्जा कोणास ॥३॥ म्हणे तुकयाबंधु तुझे धरियेले पाय । आतां कोण दुजा ऐसा आम्हांसी आहे ॥४॥

३९८७. तूंच मायबाप बंधु सखा आमचा । वित्त गोत जिवलग जीवाचा ॥१॥ आणीक प्रमाण नाहीं दुसरें आतां । योगक्षेमभार तुझे घातला माथां ॥२॥ तूंच क्रियाकर्म धर्म देव तूं कुळ । तूंच तप तीर्थ व्रत गुरु सकळ ॥३॥ म्हणे तुकयाबंधु कर्ता कार्यता देवा । तूंच भावभक्ति पूजा नमस्कार आघवा ॥४॥

३९८८. करूनी उचित । प्रेम घालीं हृदयांत ॥१॥ आलों दान मागायास । थोर करूनियां आस ॥२॥ चिंतनसमयीं । सेवा आपलीच देईं ॥३॥ तुकयाबंधु म्हणे भावा । मज निरवावें देवा ॥४॥

३९८९. गाऊं वाहूं टाळी रंगीं नाचों उदास । सांडोनी भय लज्जा शंका आस निरास ॥१॥ बळियाचा बळी तो कैवारी आमुचा । भुक्तिमुक्तिदाता सकळांही सिद्धींचा ॥२॥ मारूं शब्दशस्त्रें बाण निःशंक अनिवार । कंटकांचा चूर शिर फोडूं काळाचें ॥३॥ म्हणे तुकयाबंधु नाहीं जीवाची चाड । आपुलिया तेथें काय आणिकांची भीड ॥४॥

३९९०. सांडूनी वैकुंठ । उभा विटेवरी नीट ॥१॥ आला आला रे जगजेठी । भक्ता पुंडलिकाचे भेटी ॥२॥ पैल चंद्रभागे तिरीं । कट धरूनिया करीं ॥३॥ तुकयाबंधु म्हणे अंबर । गजर होतो जयजयकार ॥४॥

३९९१. कृपाळु भक्तांचा । ऐसा पति गोपिकांचा ॥१॥ उभा न पाचारितां दारीं । न संगतां

कामें करी ॥२॥ भाव देखोनि निर्मळ । रजां वोढवी कपाळ ॥३॥ तुकयाबंधु म्हणे न भजा । कां रे ऐसा भोळा राजा ॥४॥

३९९२. केला अंगिकार पंढरीच्या देवें । आतां काय करितील काळ मशक मानवें ॥१॥ घातलीं बाहेर तीं भयें होतें ज्याच्यानें । बैसला आपण तेथें घालुनियां ठाणें ॥२॥ लागों नेदी वारा दुजियाचा अंगासी । हा पुरता निर्धार कळों आला आम्हांसी ॥३॥ म्हणे तुकयाबंधु नलगे करावी चिंता । कोणेविशीं आतां बैसलों हस्तीवरी माथां ॥४॥

३९९३. अगोचरीं बोलिलों आज्ञेविण आगळें । परी तें आतां न संडावें कृपाळु राउळें ॥१॥ जाईल रोकडा बोल न पुसती आम्हां । तुझा तुझें म्हणविलें पाहा पुरुषोत्तमा ॥२॥ न व्हावा न वजावा न कळतां अन्याय । न धरावें मनीं भलता करी उपाय ॥३॥ म्हणे तुकयाबंधु हीन मी म्हणोनि लाजसी । वारा लागों पाहताहे उंच्या झाडासी ॥४॥

३९९४. झाली पाकसिद्धि वाट पाहे रखुमाई । उदक तापलें डेरा चीकसा मर्दूंद्या पाईं ॥१॥ उठा पांडुरंगा उशीर झाला भोजनीं । उभ्या आंचवणा गोपिका कळस घेउनी ॥२॥ अवघ्या सावचित्त सेवेलागीं सकळा । उद्धव अक्रूर आले पाचारूं मूळा ॥३॥ सावरिली सेज सुमनयाति सुगंधा । रत्नदीप ताटीं वाळा विडिया विनोदा ॥४॥ तुका विनंती करी पाहे पंढरीराणा । असा सावचित्त सांगे सकळ जनां ॥५॥

३९९५. उठा सकळ जन उठिले नारायण । आनंदले मुनिजन तिन्ही लोक ॥१॥ करा जयजयकार वाद्यांचे गजर । मृदंग अपार टाळ घोळ ॥२॥ जोडोनियां कर मुख पाहा सादर । पायांवरी शिर ठेवूनियां ॥३॥ तुका म्हणे काय पढियें तें तें मागा । आपुलालें सांगा सुख दुःख ॥४॥

३९९६. घडिया घालुनी तळीं चालती वनमाळी । उमटती कोवळीं कुंकुमाचीं ॥१॥ वंदा चरणरज अवघे सकळ जन । तारियेले पाषाण उदकीं जेणें ॥२॥ पैस धरूनी चाला ठाकत ठायीं ठायीं । मौन्य धरूनी कांहीं न बोलावें ॥३॥ तुका अवसरु जाणवितो पुढें । उघडलीं महाल मंदिरें कवाडें ॥४॥

३९९७. भीतरी गेले हरी रहा क्षणभरी । होइल फळ धीर करावा ॥१॥ न करीं त्वरा ऐकें मात । क्षण एक निवांत बैसावें ॥२॥ करूनियां मर्दन सारिलें पाणी । न्हाले देव अंग पुसी भवानी ॥३॥ नेसला सोनसळा विनवी रखुमाई । वाढिलें आतां ठायीं चलावें जी ॥४॥ करूनियां भोजन घातलें आंचवण । आनंदें नारायण पहुडले ॥५॥ तुका मात जाणवी आतां । सकळां बहुतां होती चित्तीं ॥६॥

३९९८. द्या जी आम्हां कांहीं सांगा जी रखुमाई । शेष उरलें तें ठायीं सनकादिकां ॥१॥

टोकत बाहेरी बैसलो आशा । पुराया ग्रासा एकमेकां ॥२॥ येथवरी आलों तुझिया नांवें । आस करूनी आम्ही दातारा ॥३॥ प्रेम देउनी बहुडा दिला । तुका म्हणे आतां विठ्ठल बोला ॥४॥

३९९९. बहुडविले जन मन झालें निश्चळ । चुकवूनी कोल्हाळ आला तुका ॥१॥ पर्यंकी निद्रा करावें शयन । रखुमाई आपण समवेत ॥२॥ घेउनियां आलों हातीं टाळ वीणा । सेवेसी चरणा स्वामीचिया ॥३॥ तुका म्हणे आतां परिसावीं आदरें । बोबडीं उत्तरें पांडुरंगा ॥४॥

४०००. नाचे गाणें माझा जवळील ठाव । निरोपिन भाव होईल तो ॥१॥ तुम्हां निद्रा मज आज्ञा ते स्वभावें । उतरूनी जिवें जाइन लोण ॥२॥ एकाएकीं बहु करीन सुस्वरें । मधुर उत्तरें आवडीनें ॥३॥ तुका म्हणे तूं जगदानी उदार । फेडशील भार एक वेळे ॥४॥

४००१. शिणलेती सेविकां देऊनी इच्छादान । केला अभिमानें अंगिकार ॥१॥ अहो दीनानाथा आनंदमूर्ती । तुम्हांसी शोभती ब्रीदें ऐसीं ॥२॥ बहुतांनीं विनविलें बहुतां प्रकारीं । सकळां ठायीं हरी पुरलेती ॥३॥ तुका म्हणे अगा कुटुंबवत्सला । कोण तुझी लीळा जाणे ऐसी ॥४॥

४००२. उठा भागलेती उजगरा । चला स्वामी निद्रा करा ॥१॥ वाट पाहाते रुक्मिणी । उभी मंचक सांवरुनी ॥२॥ केली करा क्षमा । बडबड पुरुषोत्तमा ॥३॥ लागतो चरणा । तुकयाबंधु नारायणा ॥४॥

४००३. पावला प्रसाद आता उठोनी जावें । आपुलाले श्रम कळों येताती भावें ॥१॥ आतां स्वामी सुखें निद्रा करा गोपाळा । पुरले मनोरथ जातों आपुलिया स्थळा ॥२॥ तुम्हांसी जागवूं आम्ही आपुलिया चाडा । शुभाशुभ कर्मे दोष हरावया पीडा ॥३॥ तुका म्हणे दिल उच्छिष्टाचें भोजन । नाहीं निवडिलें आम्हां आपणा भिन्न ॥४॥

४००४. शब्दांचीया रत्नें करूनी अलंकार । तेणें विश्वंभर पूजियेला ॥१॥ भावाच्या उपचारें करूनी भोजन । तेणें नारायण जेवविला ॥२॥ संवसारा हातीं दिलें आंचवण । मुखशुद्धी मन समर्पिलें ॥३॥ रंगलीं इंद्रियें सुरंग तांबुलें । माथां तुळसीदळ समर्पिलें ॥४॥ एकभावदीप करूनी निरांजन । देऊनी आसन देहाचें या ॥५॥ न बोलोनी तुका करी चरणसेवा । निजविलें देवा माजघरीं ॥६॥

४००५. उठोनियां तुका गेला निजस्थळा । उरले राउळामाजी देव ॥१॥ नेउल झालें सेवका स्वामीचें । आज्ञे करूनी चित्त समाधान ॥२॥ पहुडले हरी अनंतशयनावरी । तेथें नाहीं उरी कांहीं काम ॥३॥ अवघियां बाहेर घालूनि गेला तुका । सांगितलें लोकां निजले देव ॥४॥

४००६. पवित्र सुदिन उत्तम दिवस दसरा । सांपडला तो साधा आजि मुहूर्त बरा । गर्जा जयजयकार हरि हृदयीं धरा । आळस नका करूं लहाना सांगतों थोरां ॥१॥ या हो या हो बाइयांनों

निघाले हरी । सिलंगणा वेगीं घेऊनी आरत्या करीं । ओवाळूं श्रीमुख वंदूं पाउलें शिरीं । आम्हां दैव आलें तेथें घरिंच्या घरीं ।२॥ अक्षय मुहूर्त औटामध्यें साधतें । मग येरी गर्जे जैसें तैसें होत जातें । म्हणोनि मागें पुढें कोणी न पाहावें येथें । सांडा परतें काम जाऊं हरी सांगातें ॥३॥ बहुतां बहुतां रीतीं चित्तीं धरा हे मनीं । नका गई करूं आइकाल ज्या कानीं । मग हें सुख तुम्ही कधीं न देखाल स्वप्नीं । उरेल हायाहाय मागें होईल काहाणी ॥४॥ ऐसियास वंचता त्याच्या अभाग्या पार । नाहीं नाहीं नाहीं सत्य जाणा निर्धार । मग हे वेळ घटिका न ये अजरामर । कळलें असों द्या मग पडतील विचार ॥५॥ जयासाठीं ब्रह्मादिक झाले ते पिसे । उच्छिष्टाकारणें देव जळीं झाले मासे । अर्धांगीं विश्वमाता लक्षुमी वसे । तो हा तुकयाबंधु म्हणे आलें अनायासें ॥६॥

४००७. करूनी आरती । आतां ओवाळूं श्रीपती ॥१॥ आजी पुरले नवस । धन्य काळ हा दिवस ॥२॥ पाहा वो सकळा । पुण्यवंता तुम्ही बाळा ॥३॥ तुका वाहे टाळी । होता सन्निध जवळी ॥४॥

४००८. द्याल माळ तरी पडेन मी पायां । दंडवत वायां कोण वेंची ॥१॥ आलें तें हिशोबें अवघिया प्रमाण । द्याल तरी दान मान होतो ॥२॥ मोकळिया मनें घ्याल जरी सेवा । प्रसाद पाठवा लवकरी ॥३॥ तुका म्हणे तुम्हीं झालिया कृपण । नामाचें जतन मग कैंचें ॥४॥

४००९. तुम्हीं जावें निजमंदिरा । आम्ही जातों आपल्या घरा ॥१॥ विठोबा लोभ असों देईं । आम्ही असों तुमचे पाईं ॥२॥ चित्त करी सेवा । आम्ही जातों आपुल्या गांवा ॥३॥ तुका म्हणे दिशा भुललों । फिरोन पायापाशीं आलों ॥४॥

४०१०. पाहें प्रसादाची वाट । द्यावें धोवोनियां ताट ॥१॥ शेष घेऊनी जाईन । तुमचें झालिया भोजन ॥२॥ झालों एकसवा । तुम्हां आडूनियां देवा ॥३॥ तुका म्हणे चित्त । करुनी राहिलों निश्चिंत ॥४॥

४०११. केली कटकट गाऊं नाचों नेणतां । लाज नाहीं भय आम्हां पोटाची चिंता ॥१॥ बैसा सिणलेती पाय रगडूं दातारा । जाणवूं द्या वारा उब झाली शरीरा ॥२॥ उशिरा उशीर किती काय म्हणावा । जननिये बाळका कोप कांहीं न धरावा ॥३॥ तुझिये संगतीं आम्ही करूं कोल्हाळ । तुका म्हणे बाळें अवघे मिळोन गोपाळ ॥४॥

४०१२. आरुष शब्द बोलों मनीं न धरावें कांहीं । लडिवाळ बाळकें तूंचि आमुची आई ॥१॥ देईं गे विठाबाई प्रेमभातुकें । अवघियां कवतुकें लहानां थोरां सकळां ॥२॥ सांडूनियां भीड धीटपणातें वाणी । घेतलें पाहिजे केलें लेंकुरें तें कानीं ॥३॥ तुका म्हणे थोड्यासाठीं काशाची अटी । झाली असे भेटी धुरेसंवसाटी ॥४॥

४०१३. कळस वाहियेला शिरीं । सहस्त्रनामें पूजा करी ॥१॥ पीक पिकलें पिकलें । घन

दाटोनियां आलें ॥२॥ शेवटचें दान । भागा आला नारायण ॥३॥ तुका म्हणे पोट । भरलें वारला बोभाट ॥४॥

४०१४. आड केलें देवद्वार । व्यर्थ काय करकर ॥१॥ आतां चला जाऊं घरा । नका करूं उजगरा ॥२॥ देवा लागलीसे निज । येथें उभ्या काय काज ॥३॥ राग येतो देवा । तुका म्हणे नेघे सेवा ॥४॥

[ नाट ]

४०१५. विठ्ठल आमुचें जीवन । आगम निगमाचें स्थान । विठ्ठल सिद्धीचें साधन । विठ्ठल ध्यानविसावा ॥१॥ विठ्ठल कुळींचे दैवत । विठ्ठल वित्त गोत चित्त । विठ्ठल पुण्य पुरुषार्थ । आवडे मात विठ्ठलाची ॥२॥ विठ्ठल विस्तारला जनीं । सप्तही पाताळें भरूनी । विठ्ठल व्यापक त्रिभुवनीं । विठ्ठल मुनिमानसीं ॥३॥ विठ्ठल जीवाचा जिव्हाळा । विठ्ठल कृपेचा कोंवळा । विठ्ठल प्रेमाचा पुतळा । लावियला चाळा विश्व विठ्ठलें ॥४॥ विठ्ठल बाप माय चुलता । विठ्ठल भगिनी आणि भ्राता । विठ्ठलेंविण चाड नाहीं गोता । तुका म्हणे आतां नाहीं दुसरें ॥५॥

४०१६. बरवा झाला वेवसाव । पावलों चिंतिलाचि ठाव । दृढ पायीं राहिला भाव । पावला जीव विश्रांती ॥१॥ बरवा फळला शकुन । अवघा निवारला सीण । तुमचें झालिया दरुषण । जन्ममरण नाहीं आतां ॥२॥ बरवें झालें आलों या ठाया । होतें संचित ठायींचें पाया । देहभाव पालटली काया । पडली छाया ब्रह्मींची ॥३॥ जोडिलें हें न सरें धन । अविनाश आनंदघन । अमूर्तमूर्ति मधुसूदन समचरणी देखियला ॥४॥ जुनाट जुगादिचें नाणें । बहुता काळाचें ठेवणें । लोपलें होतें पारिखेपणें । ठाव चळणें चुकविला ॥५॥ आतां या जीवाचियासाठीं । न सोडीं पडलिया मिठी । तुका म्हणे सीणलों जगजेठी । न लवीं दिठी दुसऱ्याची ॥६॥

४०१७. मी तंव अनाथ अपराधी । कर्महीन मतिमंदबुद्धि । तुज म्यां आठविलें नाहीं कधीं । वाचे कृपानिधि मायबापा ॥१॥ नाहीं ऐकिलें गाईलें गीत । धरिली लाज सांडिलें हित । नावडे पुराण बैसले संत । केली बहुत परनिंदा ॥२॥ नाहीं केला करविला परोपकार । नाहीं दया आली पीडितां पर । करूं नये तो केला व्यापार । वाहिला भार कुटुंबाचा ॥३॥ नाहीं केलें तीर्थाचें भ्रमण । पाळिला पिंड कर चरण । नाहीं संतसेवा घडलें दान । पूजावलोकन मूर्तीचें ॥४॥ असंगसंग घडले अन्याय । बहुत अधर्म उपाय । न कळे हित करावें तें काय । नये बोलूं आठवूं तें ॥५॥ आप आपण्या घातकर । शत्रु झालों मी दावेदार । तूं तंव कृपेचा सागर । उतरीं पार तुका म्हणे ॥६॥

४०१८. आतां पावेन सकळ सुखें । खादलें कदा तें न देखें । अवघें सरलें पारिखें । सकळ देखें माहियेर ॥१॥ जवळी विठ्ठल रखुमाई । बहिण बंधु बाप आई । सकळ गोताचीच साई ।

पारिखें काई ऐसें नेणिजे ॥२॥ जगदाकारीं झाली सत्ता । वारोनी गेली पराधीनता । अवघें आपुलेंचि आतां । लाज आणि चिंता दुरावली ॥३॥ वावरे इच्छा वसे घरीं । आपुले सत्तेचे माहेरीं । करवी तैसें आपण करीं । भीड न धरीं चुकल्याची ॥४॥ सोसिला होता सासुरवास । बहुतांचा बहुत दिवस । बहु कामें पुरविला सोस । आतां उदास आपुल्यातें ॥५॥ करिती कवतुक लाडें । मज बोलविती कोडें मायबाप उत्तरें गोडें । बोले बोबडें पुढें तुका ॥६॥

४०१९. सर्व सुखाचिया आशा जन्म गेला । क्षण एक मुक्ती यत्न नाहीं केला । हिंडता दिशा सीण पावला । माथा वेष्टिला जीव माझा ॥१॥ माझें स्वहित नेणती कोणी । कांहींच न करिती मजवांचूनी । सज्जन तंव सुखाची मांडणी । नेणती कोणी आदि अंत ॥२॥ काय सांगों गर्भींची यातना । मज भोगितां नारायणा । मांस मळ मूत्र जाणा । तुज क्षणक्षणा ध्यात असें ॥३॥ मज चालतां प्रयाणकाळीं । असतां न दिसती जवळी । मृत्तिके मृत्तिका कवळी । एकले मेळीं संचिताचे ॥४॥ आतां मज ऐसें करीं गा देवा । कांहीं घडे तुझी चरणसेवा । तुका विनवीतसे केशवा । चालवी दावा संसारें ॥५॥

४०२०. अगा ए सांवळ्या सगुणा । गुणनिधिनाम नारायणा । आमची परिसावी विज्ञापना । सांभाळीं दीना आपुलिया ॥१॥ बहु या उदराचे कष्ट । आम्हांसी केलें कर्मभ्रष्ट । तुमची चुकविली वाट । करीं वटवट या निमित्यें ॥२॥ झालों पांगिला जनासी । संसाराची आदणी दासी । न कळे कधीं सोडविसी । दृढपाशीं बहु बांधलों ॥३॥ येथें तो नये आठव कांहीं । विसावा तो क्षण एक नाहीं । पडिलों आणिके प्रवाहीं । हित तों कांहीं दिसेचि ना ॥४॥ जीवित्व वेचिलें वियोगें । हिंडतां प्रवास वाउगें । कांहीं व्याधि पीडा रोगें । केलिया भोगें तडातोडी ॥५॥ माझा मीच झालों शत्रु । कैंचे पुत्र दारा कैंचा मित्रु । कासया घातला पसरु । अहो जगद्‌गुरु तुका म्हणे ॥६॥

४०२१. आतां मज धरवावी शुद्धि । येथूनी परतवावी बुद्धि । घ्यावें सोडवूनी कृपानिधि । सांपडलों संधीं काळचक्रीं ॥१॥ करिसील तरी नव्हे काई । राईचा डोंगर पर्वत राई । आपुले करुणेची साई । करीं वो आई मजवरी ॥२॥ मागील काळ अज्ञानपणें । सरला स्वभावें त्या गुणें । नेणें आयुष्य होतें उणें । पुढील पेणें अंतरलों ॥३॥ आतां मज वाटतसे भय । दिसेंदिवस चालत जाय । येथें म्यां येउनी केलें काय । नाहीं तुझे पाय आठविले ॥४॥ करूनी अपराध क्षमा । होतील केले पुरुषोत्तमा । आपुले नामीं द्यावा प्रेमा । सोडवीं भ्रमापासूनियां ॥५॥ हृदय वसो तुमच्या गुणीं । ठाव हा पायांपें चरणीं । करूं हा रस सेवन वाणी । फिटे तों धणी तुका म्हणे ॥६॥

४०२२. जेणें हा जीव दिला दान । तयाचें करीन चिंतन । जगज्जीवन नारायण । गाईन गुण तयाचे ॥१॥ जो या भीवरेच्या तिरीं । कट धरुनियां करीं । पाउलें समचि साजिरीं । अंतरीं धरोनी राहेन ॥२॥ जो या असुरांचा काळ । भक्तजनप्रतिपाळ । खेळे हा लाघवें सकळ । तयाच्या

भाळ पायांवरी ॥३॥ जो या गोपाळांच्या मेळीं। खेळु खेळे वनमाळी। रसातळा नेला बळी। राहे पाताळीं स्वामी माझा ॥४॥ जो हा लावण्यपुतळा। जयाचें अंगी सकळ कळा। जयाचे गळां वैजयंती माळा। तया वेळोवेळां दंडवत ॥५॥ जयाचें नाम पाप नासी। लक्ष्मी ऐसी जयाची दासी। जो हा तेज:पुंज रासी। सर्वभावें त्यासी तुका शरण ॥६॥

४०२३. काय मी उद्धार पावेन। काय कृपा करील नारायण। ऐसें तुम्ही सांगा संतजन। करा समाधान चित्त माझें ॥१॥ काय हें खंडईल कर्म। पारुषतील धर्माधर्म। कासयानें तें कळेल वर्म। म्हणउनी श्रम वाटतसे ॥२॥ काय हे स्थिर राहेल बुद्धि। कांहीं अरिष्ट न येल कीं मधीं। धरिलें जाईल तें सिद्धि। शेवट तो कधीं मज न कळे ॥३॥ काय ऐसें पुण्य होईल गांठीं। घालीन पायीं देवाचे मिठी। मज तो कुरवाळील जगजेठी। दाटईन कंठीं सद्गदित ॥४॥ काय हे निवतील डोळे। सुख तें देखोनी सोहळे। संचित कैसें तें न कळे। होतील डोहळे वासनेसीं ॥५॥ ऐसी चिंता करीं सदा सर्वकाळ। रात्रंदिवस हेचि तळमळ। तुका म्हणे नाहीं आपुलें बळ। जेणें फळ पावेन निश्चयेंसी ॥६॥

४०२४. अगा ये वैकुंठनायका। अगा ये त्रैलोक्यतारका। अगा जनार्दना जगव्यापका। अगा पाळका भक्तांचिया ॥१॥ अगा ये वसुदेवदेवकीनंदना। अगा ये गोपिकारमणा। अगा बळिबंध वामना। अगा निधाना गुणनिधि ॥२॥ अगा ये द्रौपदी बांधवा। अगा ये सखया पांडवा। अगा जिवाचिये जीवा। अगा माधवा मधुसूदना ॥३॥ अगा महेश्वरा महाराजा। अगा श्रीहरी गरुडध्वजा। अगा सुंदरा सहस्त्रभुजा। पार मी तुझा काय वर्णूं ॥४॥ अगा आंबऋषिपरंपरा। निरालंबा निर्विकारा। अगा गोवर्धनधरणीधरा। अगा माहेरा दीनाचिया ॥५॥ अगा धर्मराया धर्मशीळा। अगा कृपासिंधु कृपाळा। अगा प्रेमाचिया कल्लोळा। सकळकळाप्रवीणा ॥६॥ अगा चतुरा सुजाणा। मधुरा गिरा सुलक्षणा। अगा उदारा असुरमर्दना। राखें शरण तुकयाबंधु ॥७॥

४०२५. तूंचि अनाथाचा दाता। दु:ख मोह नासावया चिंता। शरण आलों तुज आतां। तारी कृपावंता मायबापा ॥१॥ संतसंगति देईं चरणसेवा। जेणें हा तुझा विसर न पडावा। हाची भाव माझिया जीवा। पुरवीं देवा मनोरथ ॥२॥ मज भाव प्रेम देईं प्रीति। गुण नाम वर्णावया स्तुती। विघ्ना सोडवूनी हातीं। विनंती माझी परिसावी हे ॥३॥ आणीक कांहीं नाहीं मागणें। सुखसंपत्तिराज्यचाड धनें। सांकडें न पडे तुज जेणें। दुजें भक्तीविण मायबापा ॥४॥ जोडोनि कर पायीं ठेवितों माथा। तुका विनवी पंढरीनाथा। रंगीं वोढवावी रंगकथा। पुरवीं मनोरथा मायबापा ॥५॥

४०२६. सेंदरींहदरीं दैवतें। कोण तीं पूजी भूतेंखेतें। आपुल्या पोटा जीं रडतें। मागती

शितें अवदान ॥१॥ आपुले इच्छे आणिकां पीडी । काय तें देईल बराडी । कळों ही आली तयाची जोडी । अल्प रोकडी बुद्धि अधिरा ॥२॥ दासीचा पाहुणेर उखीतें । धणी देईल आपुल्या हातें । करुणाभाषण उचितें । हें तों रितें सतत शक्तिहीन ॥३॥ काय तें थिल्लरीचें पाणी । ओठे न भिजे न फिटे धणी । सीण तरी आदीं अवसानीं । क्षोभे पुरश्चरणीं दिलें फळ ॥४॥ विलेपनें बुजविती तोंड । भार खोळ वाहाती उदंड । करविती आपआपणयां दंड । ऐसियास भांड म्हणे देव तो ॥५। तैसा नव्हे नारायण । जगव्यापक जनार्दन । तुका म्हणे त्याचें करा चिंतन । वंदूं चरण येती सकळ ॥६॥

४०२७. विषयओढीं भुलले जीव । आतां यांची कोण करील कींव । नुपजे नारायणीं भाव । पावोनी ठाव नरदेह ॥१॥ कोण सुख धरिलें संसारीं । पडोनी काळाचे आहारीं । माप या लागलें शरीरीं । झालियावरी सळे ओढती ॥२॥ बापुडी होतील शेवटीं । आयुष्यासवें झालिया तुटी । भोगिलें मागें पुढें ही कोटी । होईल भेटी जन्मासी ॥३॥ जुंतिलें घाणां बांधोनी डोळे । मागें जोडी आर तेणेंही पोळे । चालिलों किती तें न कळे । दुःखें आरंबळे भूक तहान ॥४॥ एवढें जयाचें निमित्त । प्रारब्ध क्रियमाण संचित । तें हें देह मानूनी अनित्य । न करिती कां नित्यनामस्मरण ॥५। तुका म्हणे न वेचतां मोल । तो हा यासी महाग विठ्ठल । वेंचितां फुकाचें बोल । केवढें खोल अभागियां ॥६॥

४०२८. आले हो संसारा तुम्ही एक करा । मुक्तिमारग हळूचि धरा । काळदंड कुंभयातना थोरा । कां रे अघोरा दचकसी ना ॥१॥ नाहीं त्या यमासी करुणा । बाहेर काढितां कुडी प्राणा । ओढाळ सांपडे जैसें धान्या । चोर यातना धरिजेतो ॥२॥ नाहीं दिलें पावईल कैसा । चालतां पंथे तेणें वळसा । नसेल ठाउकें ऐकतो कैसा । नेती बंद जैसा धरोनियां ॥३॥ क्षण एक नागीवा पायीं । न चलवे तया करितां कांहीं । ओढिती कांठवणा सोई । अग्निस्तंभ बाहीं कवटाळविती ॥४॥ देखोनी अंगें कांपती । तये नदीमाजी चालविती । लागे ठाव ना न चलवे बुडविती । वरि मारिती यमदंड ॥५॥ तहानभूक न सहावे वेळ । तो राखिती किती एक काळ । पिंड पाळूनी कैसा सीतळ । तो तप्तभूमीं ज्वाळ लोळविती ॥६॥ म्हणउनी करा कांहीं सायास । व्हावेल तरी व्हा रे उदास । करवेल तर करा नामघोष । सेवा भक्तिरस तुका म्हणे ॥७॥

४०२९. न बोलसी तेंही कळलें देवा । लाजसी आपुलिया नांवा । तुज मी घालीत नाहीं गोवा । भीड केशवा कासयाची ॥१॥ उतरीं आपुला हा भार । मजशीं बोलोनी उत्तर । माझा तुज नव्हे अंगीकार । मग विचार करीन मी ॥२॥ दात्या आणि मागत्यासी । धर्मनीति तरी बोलिली ऐसी । यथानशक्ति ठाकेल तैसी । बाधी दोघांसी विन्मुखता ॥३॥ म्हणोनी करितों मी आस । तुझिया वचनाची वास । धीर हा करूनि सायास । न टळें नेमास आपुलिया ॥४॥

तुझे म्यां घेतल्यावांचून । येथूनी न वजें वचन । हाचि माझा नेम सत्य जाण । आहे नाहीं म्हण तुका म्हणे ॥५॥

४०३०. आतां मी न पडें सायासीं । संसारदु:खाचिये पाशीं । शरण रिघेन संतांसी । ठाव पायांपाशीं मागेन त्यां ॥१॥ न कळे संचित होतें काय । कोण्या पुण्यें तुझे लाधती पाय । आतां मज न विसंबें वो माय । मोकलूनी धाय विनवीतसें ॥२॥ बहुत जाचलों संसारें । मोहमायाजाळाच्या विखारें । त्रिगुण येताती लहरें । तेणें दु:खें थोर आक्रंदलों ॥३॥ आणीक दु:खें सांगों मी किती । सकळ संसाराची स्थिति । न साहे पाषाण फुटती । भय कांप चित्तीं भरलासे ॥४॥ आतां मज न साहावे सर्वथा । संसारगंधीची हे वार्ता । झालों वेडा असोनी जाणता । पावे अनंता तुका म्हणे ॥५॥

४०३१. आतां तुज कळेल तें करीं । तारिसी तरी तारीं मारीं । जवळी अथवा दुरी धरीं । घालीं संसारीं अथवा नको ॥१॥ शरण आलों नेणतपणें । भाव आणि भक्ति कांहींच नेणें । मतिमंद सर्वज्ञानें बहु रंक उणें रंकाहुनी ॥२॥ मन स्थिर नाहीं माझिये हातीं । इंद्रियें धांवता नावरती । सकळ खुंटलिया युक्ति । शांति निवृत्ति जवळी नाहीं ॥३॥ सकळ निवेदिला भाव । तुझिये पायीं ठेविला जीव । आतां करीं कळे तो उपाव । तूंचि सर्व ठाव देवा माझा ॥४॥ राहिलों धरूनी विश्वास । आधार नेटीं तुझी कास । आणीक नेणें मी सायास । तुका म्हणे यास तुझें उचित ॥५॥

४०३२. देवा तूं कृपाकरुणासिंधु । होसी मायबाप आमुचा बंधु । जीवनसिद्धि साधनसिंधु । तोडिसी भवबंधु काळपाश ॥१॥ शरणागता वज्रपंजर । अभयदाना तूं उदार । सकाळां देवा तूं अगोचर । होसी अविकार अविनाश ॥२॥ भागलीं स्तुति करितां फार । तेथें मी काय तें गव्हार । जाणावया तुझा विचार । नको अंतर देऊं आतां ॥३॥ नेणें भाव परि म्हणवितों तुझा । नेणें भक्ति परि करितों पूजा आपुलिया नामाचिया काजा । तुज केशीराजा लागे धांवणें ॥४॥ तुझिया बळें पंढरीनाथा । झालों निर्भर तुटली व्यथा । घातला भार तुझिया माथां । न मीं सर्वथा तुका म्हणे ॥५॥

४०३३. कोण सुख धरोनी संसारीं । राहों सांग मज बा हरी । अवघ्या नाशिवंता परी । थिता दुरी तूंही अंतरसी ॥१॥ प्रथम केला गर्भीं वास । काय ते सांगावे सायास । दु:ख भोगिलें नवही मास । आलों जन्मास येथवरी ॥२॥ बाळपण गेलें नेणतां । तारुण्यदशे विषयव्यथा । वृद्धपणीं प्रवर्तली चिंता । मरें मागुता जन्म धरीं ॥३॥ क्षण एक तोही नाहीं विसावा । लक्ष चौऱ्यांशी घेतल्या धांवा । भोवंडिती पाठीं लागल्या हांवा । लागो आगी नांवा माझ्या मीपणा ॥४॥ आतां पुरे ऐसी भरोवरी । रंक होऊनी राहेन द्वारीं । तुझा दास मी

दीन कामारी । तुका म्हणे करीं कृपा आतां ॥५॥

४०३४. सुख या संतसमागमें । नित्य दुणावे तुझिया नामें । दहन होती सकळ कर्मे । सर्वकाळ प्रेमें डुल्लतसों ॥१॥ म्हणोनी नाहीं कांहीं चिंता । तूंचि आमुचा मातापिता । बहिणी बंधु आणि चुलता । आणिकां गोतां सर्वांठायीं ॥२॥ ऐसा हा कळला निर्धार । माझा तुज न पडे विसर । अससी देऊनियां धीर । बाह्य अभ्यंतर मजजवळी ॥३॥ दुःख तें कैसें नये स्वप्नासी । भुक्तिमुक्ति झाल्या कामारी दासी । त्यांचें वर्म तूं आम्हांपाशीं । सुखें राहिलासी प्रेमाचिया ॥४॥ जेथें तुझ्या कीर्तनाचा घोष । जळती पापें पळती दोष । काय तें उणें आम्हां आनंदास । सेवूं ब्रह्मरस तुका म्हणे ॥५॥

४०३५. न पवे सन्निध वाटते चिंता । वरि या बहुतांची सत्ता । नुगवे पडत जातो गुंता । कर्मा बळिवंता सांपडलों ॥१॥ बहु भार पडियेला शिरीं । मी हें माझें मजवरी । उघड्या नागविलों चोरीं । घरिंच्याघरीं जाणतजाणतां ॥२॥ तुज मागणें इतुलें आतां । मज या निरवावें संतां । झाला कंठस्फोट आळवितां । उदास आतां न करावें ॥३॥ अति हा नकट समय । मग म्यां करावें तें काय । दिवस गेलिया ठाकईल छाय । उरईल हाय रातिकाळीं ॥४॥ होईल संचिताची सत्ता । अंगा येईल पराधीनता । ठाव तो न दिसे लपतां । बहु चिंता प्रवर्तली ॥५॥ ऐसी या संकटाचे संधी । धांव घालावी कृपानिधी । तुका म्हणे माझी बळबुद्धी । सकळ सिद्धी पाय तुझे ॥६॥

४०३६. देवा तूं आमचा कृपाळ । भक्तप्रतिपाळ दीनवत्सल । माय तूं माउली स्नेहाळ । भार सकळ चालविसी ॥१॥ तुज लागली सकळ चिंता । राखणें लागे वांकडें जातां । पुढतीं निरविसी संतां । नव्हे विसंबतां धीर तुज ॥२॥ आम्हां भय चिंता नाहीं धाक । जन्ममरण कांहीं एक । झाला इहलोकीं परलोक । आलें सकळिक वैकुंठ ॥३॥ न कळे दिवस कीं राती । अखंड लागलीसे ज्योती । आनंदलहरीची गती । वर्णूं मी किती तया सुखा ॥४॥ तुझिया नामाचीं भूषणें । तोयें मज लेवविलीं लेणें । तुका म्हणे तुझिया गुणें । काय तें उणें एक आम्हां ॥५॥

४०३७. आतां धर्माधर्मीं कांहीं उचित । माझें विचारावें हित । तुज मी ठाउका पतित । शरणागत परि झालों ॥१॥ येथें राया रंका एकी सरी । नाहीं भिन्नाभिन्न तुमच्या घरीं । पावलों पाय भलत्या परी । मग बाहेरी न घालावें ॥२॥ ऐसें हें चालत आलें मागें । नाहीं मी बोलत वाउगें । आपुलिया पडिल्या प्रसंगें । कीर्ति हे जगें वाखाणिजेती ॥३॥ घालोनियां माथां बैसलों भार । सांडिला लौकिक वेव्हार । आधीं हें विचारिली थार । अविनाशपर पद ऐसें ॥४॥ येथें एक वर्म पाहिजे धीर । परि म्यां लेखिलें असार । देह हा नाशिवंत जाणार । धरिलें सार नाम तुझें ॥५॥ केली आराणूक सकळां हातीं । धरावें तें धरिलें चित्तीं । तुका म्हणे सांगितलें संतीं । देई अंतीं ठाव मज देवा ॥६॥

४०३८. बरवें झालें आलों या जन्मासी । जोड जोडिली मनुष्यदेहाऐसी । महालाभाची उत्तम रासी । जेणें सर्व सुखासी पात्र होइजे ॥१॥ दिलें इंद्रियें हात पाय कान । डोळे मुख बोलावया वचन । जेणें तूं जोडसी नारायण । नासे जीवपण भवरोग ॥२॥ तिळेंतिळें पुण्य सांचा पडे । तरि हें बहुतां जन्मीं जोडे । नाम तुझें वाचेसी आतुडे । समागम घडे संतांचा ॥३॥ ऐसिये पावविलों ठायीं । आतां मी काय होऊं उतराई । येवढा जीव ठेवीन पायीं । तूं वो माझे आई पांडुरंगे ॥४॥ फेडिला डोळियांचा कवळ । धुतला गुणदोषांचा मळ । लावूनी स्तनीं केलों सीतळ । निजविलों बाळ निजस्थानीं ॥५॥ नाहीं या आनंदासी जोडा । सांगतां गोष्टी लागती गोडा । आलासी आकारा आमुच्या चाडा । तुका म्हणे भिडा भक्तीचिया ॥६॥

४०३९. अल्प भाव अल्प मती । अल्प आयुष्य नाहीं हातीं । अपराधाची ओळिलों मूर्ती । अहो वेदमूर्ति परियेसा ॥१॥ किती दोषा देऊं परिहार । गुणदोषें मळिलें अंतर । आदि वर्तमान भविष्याकार । लागे अंतपार ऐसें नाहीं ॥२॥ विविध कर्म चौऱ्यांशीं फेरा । त्रिविध भोग या शरीरा । कर्मकोठार पांजरा । जन्म जरा मरण सांठवण ॥३॥ जीवा नाहीं कुडीचें लाहातें । ये भिन्न भिन्न पंचभूतें । रचतें खचतें संचितें । असार रिते फलकट ॥४॥ पुत्र पत्नी सहोदर । मायाबाप गोताचा पसर । मिळती काष्ठें लोटतां पूर । आदळे दूर होती खल्लाळीं ॥५॥ म्हणोनि नासावें अज्ञान । इतुकें करीं कृपादान । कृपाळू तूं जनार्दन । धरूनी चरण तुका विनवी ॥६॥

४०४०. ऐसी हे गर्जवूं वैखरी । केशवा मुकुंदा मुरारी । राम कृष्ण नामें बरीं । हरी हरी दोष सकळ ॥१॥ जनार्दना जगजीवना । विराटस्वरूपा वामना । महदादि मधुसूदना । भवबंधना तोडितिया ॥२॥ चक्रपाणी गदाधरा । असुरमर्दना वीर्यवीरा । सकळमुगुटमणि शूरा । अहो दातारा जगदानिया ॥३॥ मदनमूर्ति मनमोहना । गोपाळगोपिकारमणा । नटनाट्यकौशल्य कान्हा । अहो संपन्ना सर्वगुणें ॥४॥ गुणवंता आणि निर्गुणा । सर्वसाक्षी सर्वजाणा । करोनी अकर्ता आपणा । नेदि अभिमाना आतळों ॥५॥ कासयानें घडे याची सेवा । काय एक समर्पावें या देवा । वश्य तो नव्हे वांचूनी भावा । पाया वेगळे जीवा न करी तुका ॥६॥

४०४१. होतों तें चिंतित मानसीं । नवस फळलें नवसीं । जोडी ते नारायणा ऐसी । अवीट ज्यासी नाश नाहीं ॥१॥ धरिलें जीवें न सोडी पाय । आलें या जीवित्वाचें काय । कैं हे पाविजेती ठाय । लाविली सोय संचितानें ॥२॥ मज तों पडिली होती भुली । चित्ताची अपसव्य चाली । होती मृगजळेंगोवी केली । दृष्टि उघडली बरवें झालें ॥३॥ आतां हा सिद्धि पावो भाव । मध्यें चांचल्य न व्हावा जीव । ऐसी तुम्हां भाकीतसे कींव । कृपाळुवा जगदानिया ॥४॥ कळों येतें आपुली बुद्धी । ऐसें तों न घडे कधीं । येवढे आघात ते मधीं । लज्जा रिद्धी उभी आड ठाके ॥५॥ कृपा या केली संतजनीं । माझी अळंकारिली वाणी । प्रीति हे लाविली कीर्तनीं ।

तुका चरणीं लोळतसे ॥६॥

४०४२. मज ते हांसतील संत। जिहीं देखिलेती मूर्तिमंत। म्हणोनी उद्वेगलें चित्त। आहाच भक्त ऐसा दिसें ॥१॥ ध्यानीं म्यां वर्णावेती कैसे। पुढें एकीं स्तुति केली असे। येथूनी जीव निघत नसे। ऐसिये आसे लागलोंसें ॥२॥ कासया पडिला जी धडा। उगाचि वेडा आणि वांकडा। आम्हां लेंकरांसी पीडा। एका मागें जोडा दुसऱ्याचा ॥३॥ सांगा कोणाचा अन्याय। ऐसें मी धरितों पाय। तूं तंव समचि सकळां माय। काय अन्याय एक माझा ॥४॥ नये हा जरी कारणा। तरी कां व्यालेती नारायणा। वचन द्यावें जी वचना। मज अज्ञाना समजावीं ॥५॥ बहुत दिवस केला बोभाट। पाहातां श्रमलों वाट। तुका म्हणे विस्तारलें ताट। काय वीट आला नेणों स्वामीया ॥६॥

४०४३. बरवें झालें आजीवरी। नाहीं पडिलों मृत्याचे आहारीं। वांचोन आलों एथवरी। उरलें तें हरि तुम्हां समर्पण ॥१॥ दिला या काळें अवकाश। नाहीं पावलें आयुष्या नाश। कार्या कारण उरलें शेष। गेलें तें भूस जावो परतें ॥२॥ बुडणें खोटें पावतां थडी। स्वप्नीं झाली ओढाओढी। नासली जागृती घडी। साच जोडी शेवटीं गोड घास ॥३॥ तुम्हां पावविली हाक। तेणें निरसला धाक। तुमचें भातें हें कवतुक। जे शरणागत लोक रक्षावे ॥४॥ रवीच्या नांवें निशीचा नाश। उदय होतांचि प्रकाश। आतां कैंचा आम्हां दोष। तूं जगदीश कैवारी ॥५॥ आतां जळो देह सुख दंभ मान। न करी तयाचें साधन। तूं जगदीश नारायण। आलों शरण तुका म्हणे ॥६॥

४०४४. आतां माझा नेणों परतों भाव। विसावोनी ठायीं ठेविला जीव। सकळ लाभांचा हा ठाव। ऐसा वाव झाला चित्ताठायीं ॥१॥ भांडवल गांठीं तरि विश्वास। झालों तें झालों निश्चयें दास। न पाहें मागील ते वास। पुढती सोस सेवेचाचि ॥२॥ आहे तें निवेदिलें सर्व। माझा मोडियेला गर्व। अकाळीं काळ आघवें पर्व। झाला भरंवसा कृपें लाभाचा ॥३॥ वेव्हारीं वेव्हारा अनंत। नाहीं यावांचुनी जाणत। तरीं हें समाधान चित्त। लाभहानी नाहीं येत अंतरा ॥४॥ करूनी नातळों संसारा। अंग भिन्न राखिला पसारा। कळवळा तो जीवनीं खरा। बीजाचा थारा दुरी आघात ॥५॥ बहु मतापासूनी निराळा। होऊनी राहिलों सोंवळा। बैसला रूपाचा कळवळा। तुका म्हणे डोळा लेईलों तें ॥६॥

४०४५. बरवें झालें लागलों कारणीं। तुमचे राहिलों चरणीं। फेडीन संतसंगती धणी। गर्जईल गुणीं वैखरी ॥१॥ न वंचे शरीर सेवेसी। काया वाचा आणि मनेसीं। झालों संतांची आंदणी दासी। केला येविशीं निर्धार ॥२॥ जीवनीं राखिला जिव्हाळा। झालों मी मजसी निराळा। पंचभूतांचा पूतळा। सहज लीळा वर्ततसे ॥३॥ जयाचें जया होईल ठावें। लाहो या साधियेला

भावें । ऐसें होतें राखियेलें जीवें । येथूनी देवे भोवंडूनी ॥४॥ आस निरसली ये खेपे । अवघे पंथ झाले सोपे । तुमचे दीनबंधु कृपें । दुसरें कांपे सत्ताधाकें ॥५॥ अंकिलेपणें आनंदरूप । आतळों नये पुण्यपाप । सारूनी ठेविले संकल्प । तुका म्हणे आपेंआप एकाएकीं ॥६॥

४०४६. अवघ्या दशा येणेंचि साधती । मुख्य उपासना सगुणभक्ति । प्रगटे हृदयींची मूर्ति । भावशुद्धि जाणोनियां ॥१॥ बीज आणि फळ हरीचें नाम । सकळ पुण्य सकळ धर्म । सकळा कळांचें हें वर्म । निवारी श्रम सकळही ॥२॥ जेथें कीर्तन हें नाम घोष । करिती निर्लज्ज हरीचे दास । सकळ वोथंबले रस । तुटती पाश भवबंधाचे ॥३॥ येती अंगा वसती लक्षणें । अंतरीं देवें धरिलें ठाणें । आपणचि येती तयाचे गुणें । जाणें येणें खुंटे ये वस्तीचें ॥४॥ न लगे सांडावा आश्रम । उपजले कुळींचे धर्म । आणीक न करावे श्रम । एक पुरें नाम विठोबाचें ॥५॥ वेदपुरुष नारायण । योगियांचें ब्रह्म शून्य । मुक्त आत्मा परिपूर्ण । तुका म्हणे सगुण भोळ्या आम्हां ॥६॥

४०४७. श्रीअनंता मधुसूदना । पद्मनाभा नारायणा । जगव्यापका जनार्दना । आनंदघना अविनाशा ॥१॥ सकळदेवाधिदेवा । कृपाळुवा जी केशवा । महानंदा महानुभवा । सदाशिवा सहजरूपा ॥२॥ चक्रधरा विश्वंभरा । गरुडध्वजा करुणाकरा । सहस्त्रपादा सहस्त्रकरा । क्षीरसागरा शेषनयना ॥३॥ कमलनयना कमलापति । कामिनीमोहना मदनमूर्ति । भवतारका धरित्या क्षिती । वामनमूर्ति त्रिविक्रमा ॥४॥ अगा ये सगुणा निर्गुणा । जगज्जनित्या जगजीवना । वसुदेवदेवकीनंदना । बाळरांगणा बाळकृष्णा ॥५॥ तुका आला लोटांगणीं । मज ठाव द्यावा जी चरणीं । हेचि करीतसे विनवणी । भवबंधनीं सोडवावें ॥६॥

४०४८. माझा तंव खुंटला उपाव । जेणें तुझे आतुडती पाव । करूं भक्ति तरि नाहीं भाव । नाहीं हातीं जीव कवणेविशीं ॥१॥ धर्म करूं तरि नाहीं चित्त । दान देऊं तरि नाहीं वित्त । नेणें पुजों ब्राह्मण अतीत । नाहीं भूतदया पोटा हातीं ॥२॥ नेणें गुरुदास्य संतसेवन । जप तप अनुष्ठान । नव्हे वैराग्य वनसेवन । नव्हे दमन इंद्रियांसी ॥३॥ तीर्थ करूं तरि मन नये सवें । व्रत करूं तरि विधि नेणें स्वभावें । देव जवळी आहे म्हणों मजसवें । तरि आपपरावे न वचे ॥४॥ म्हणोनि झालों शरणागत । तुझा दास मी अंकित । यास न लगे संचित । जालों निश्चिंत तुका म्हणे ॥५॥

४०४९. तरी म्यां आळवावें कोणा । कोण हे पुरवील वासना । तुज वांचून नारायणा । लावीं स्तना कृपावंतें ॥१॥ आपुला न विचारी सीण । न धरी अंगसंगें भिन्न । अंगिकारिलें राखें दीन । देई जीवन आवडीचें ॥२॥ माझिया मनासी हे आस । नित्य सेवावा ब्रह्मरस । अखंड चरणींचा वास । पुरवी आस याचकाची ॥३॥ माझिया संचिताचा ठेवा । तेणें हे वाट दाविली देवा । एवढ्या आदराचा हेवा । मागें सेवादान आवडीचें ॥४॥ आळवीन करुणावचनीं । आणिक गोड नलगे मनीं । निद्रा जागृती आणि स्वप्नीं । धरिलें ध्यानीं मनीं रूप ॥५॥ आतां भेट न भेटतां आहे । किंवा

नाहीं ऐसें विचारूनी पाहें । लागला झरा अखंड आहे । तुका म्हणे साहे केलें अंतरीं ॥६॥

४०५०. हेंचि भवरोगाचें औषध । जन्म जरा तुटे व्याध । आणीक कांहीं नव्हे बाध । करील वध षड्वर्गा ॥२॥ सांवळें रूप ल्यावें डोळां । सहा चौ अठरांचा मेळा । पदर लागों नेदी खळा । नाममंत्रमाळा विष्णुसहस्र ॥२॥ भोजना न द्यावें आन । जेणें चुके अनुपान । तरीच घेतल्याचा गुण । होईल जाण सत्य भाव ॥३॥ नये निघों आपुलिया घरा । बाहेर लागों नये वारा । बहु बोलणें तें सारा । संग दुसरा वर्जावा ॥४॥ पासी तें एक द्यावें वरी । नवनीताची होईल परी । होईल घुसळिलें तें निवारी । सार भीतरी नाहीं तया ॥५॥ न्हायें अनुतापीं पांघरें दिशा । स्वेद निघों दे अवघी आशा । होसील आधीं होतासी तैसा । तुका म्हणे दशा भोगी वैराग्य ॥६॥

४०५१. मागुता हाचि जन्म पावसी । भोगिलें सुखदुःख जाणसी । हें तों न घडे रे सायासीं । कां रे अंध होसी जाणोनियां ॥१॥ लक्ष चौऱ्यांशीं न चुके फेरा । गर्भवासीं यातना थोरा । येऊनी पडसी संदेहपुरा । वोळसा थोर मायाजाळीं ॥२॥ पशु काय पापपुण्य जाणती । उत्तम मध्यम भोग भोगिती । काय एक उपजतां मरती । बहिरीं अंध होती पांगुळ मुकीं ॥३॥ नरदेह निधान लागलें हातीं । उत्तम सार उत्तम गती । देवचि होईन म्हणती ते होती । तरि कां चित्तीं न धरावें ॥४॥ क्षण एक मन स्थिर करूनी । सावध होईं डोळे उघडोनी । पाहें वेद बोलिले पुराणीं । तुका विनवणी करीतसे ॥५॥

४०५२. उभा देखिला भीमातीरीं । कर मिरविले कटावरी । पाउलें तरी समचि साजिरीं । नाम तरी अनंत अतिगोड ॥१॥ शंखचक्रांकित भूषणें । जडितमेखळा चिद्रत्नें । पीतांबर उटी शोभे गोरेपणें । लोपलें तेणें रवितेज ॥२॥ श्रवणीं कुंडलें देती ढाळ । दशांगुळीं मुद्रिका माळ । दंत ओळी हिरे झल्लाळ । मुख निर्मळ सुखरासी ॥३॥ कटीं कडदोरा वांकी वेळा । बाहीं बाहुवटे पदक गळां । मृगनाभी रेखिला टिळा । लवती डोळां विद्युल्लता ॥४॥ सुंदरपणाची साम्यता । काय वर्णूं ते पावे आतां । तुकया बंधु म्हणे रे अच्युता । धन्य ते माता पिता प्रसवली ॥५॥

४०५३. दास्य करी दासाचें । उणें न साहे तयाचें । वाढिलें ठायींचें । भाणें टाकोनियां धांवे ॥१॥ ऐसा कृपेचा सागर । विटे उभा कटीं कर । सर्वस्वें उदार । भक्तांलागीं प्रगटे ॥२॥ हृदयीं श्रीवत्सलांछन । मिरवी भक्तांचें भूषण । नाहीं तयाचा सीण । सुख धरिलें लातेचें ॥३॥ सत्यभामा दान करी । उजुर नाहीं अंगीकारी । सेवकाच्या शिरीं । धरूनी चाले पादुका ॥४॥ राखे दारवंटा बळीचा । सारथी झाला अर्जुनाचा । दास सेवकांचा । होय साचा अंकित ॥५॥ भिडा न बोले पुंडलीकाशीं । उभा मर्यादा पाठीशीं । तुका म्हणे ऐसी । कां रे न भजा माउली ॥६॥

४०५४. हरि तैसे हरीचे दास । नाहीं तयां भय मोह चिंता आस । होऊनी राहती उदास । बळकट कांस भक्तीची ॥१॥ धरूनी पाय त्यजिलें जन । न लगे मान मृत्तिका धन । कंठीं

नामामृत पान। न लगे आन ऐसें झालें ॥२॥ वाव तरी उदंडचि पोटीं। धीर सिंधु ऐसे जगजेठी। कामक्रोधा न सुटे मिठी। गिऱ्हे तरी वेठीं राबविती ॥३॥ बळ तरी नागवती काळा। लीन तरी सकळांच्या तळा। उदार तरी देहासी सकळां। जाणोनी कळा सर्व नेणते ॥४॥ संसार तो तयांचा दास। मोक्ष तो पाहातसे वास। रिद्धिसिद्धि देशवटा त्रास। न शिवती यास वैष्णवजन ॥५॥ जन्ममृत्युस्वप्नांसारिखें। आप त्यां न दिसे पारखें। तुका म्हणे अखंडित सुखें। वाणी वदे मुखें प्रेमामृताची ॥६॥

४०५५. बहुत जाचलों संसारीं। वसें गर्भीं मातेच्या उदरीं। लक्ष चौऱ्यांशीं योनिद्वारीं। झालों भिकारी याचक ॥१॥ जिणें पराधीन आणिकां हातीं। दृढ पाशीं बहु बांधलों संचितीं। प्रारब्ध क्रियमाण सांगाती। भोवंडिती सत्ता आपुलिया ॥२॥ न भरे पोट नाहीं विसांवा। नाहीं नेम एक ठाव गांवा। नाहीं सत्ता न फिरे ऐसी देवा। लाही जीवा खापरीं तडफडी ॥३॥ काळ बहुत गेले ऐसिया रीती। आणीक पुढेंही नेणों किती। खंडना नाहीं पुनरावृत्ति। मज कल्पांतीं तरी वेगळें ॥४॥ ऐसें दु:ख कोण हरील माझें। कोणा भार घालूं आपुलें ओझें। भवसिंधुतारक नाम तुझें। धांवसी काजें आडलिया ॥५॥ आतां धांव घालीं नारायणा। मजकारणें रंका दीना। गुण न विचारीं अवगुणा। तुका करुणा भाकीतसे ॥६॥

४०५६. जंव हें सकळ सिद्ध आहे। हात चालावया पाय। तंव तूं आपुलें स्वहित पाहें। तीर्थयात्रे जाय चुकों नको ॥१॥ जंव काळ असे दुरी ठेला। तंव तूं हरिगुण गाय आइक वहिला। मनीं भाव धरूनी भला। न वंचें त्याला चुकों नको ॥२॥ जोडोनी धन न घालीं माती। ब्रह्मवृंदें पूजन यती। सत्य आचरण दया भूतीं। करीं सांगाती चुकों नको ॥३॥ दशा यौवन बाणली अंगीं। पांगिला नव्हें विषयसंगीं। काम क्रोध लोभ मोह त्यागीं। राहें संतसंगीं चुकों नको ॥४॥ मग तेथें न चले कांहीं। सत्ता संपदा राहेल ठायींच्या ठायीं। पुढें संचित जाईल ग्वाही। तुका म्हणे तईं यमआज्ञा ॥५॥

४०५७. चांगलें नाम गोमटें रूप। निवती डोळे हरती ताप। विठ्ठल विठ्ठल हा जप। प्रगट स्वल्प अति सार ॥१॥ शस्त्र हें निर्वाणींचा बाण। निकट समयो अवसान। कोठें योजेल दश दान। खंडी नारायण दु:ख चिंतनें ॥२॥ सकळ श्रेष्ठाचें हें मत। पावे सिद्धि पाववी अनंत। म्हणोनी व्हावें शरणागत। आहे उचित एवढेंचि ॥३॥ म्हणोनी रुसलों संसारा। सर्प हा विखार पांढरा। तुजशीं अंतर रे दातारा। याचि दावेदारानिमित्त ॥४॥ येणें मज भोगविल्या खाणी। नसता छंद लाविला मनीं। माजलों मी माझे भ्रमणीं। झाली बोडणी विटंबना ॥५॥ पावलों केलियाचा दंड। खाणी भोगिल्या याती उदंड। आतां केला पाहिजे खंड। तुका दंडवत घाली देवा ॥६॥

४०५८. तुझिया पार नाहीं गुणां । माझी अल्पमति नारायणा । भवतारका जी सुजाणा । एक विज्ञापना पायांपाशीं ॥१॥ काय जाणावें म्यां दीनें । तुझिये भक्तीचीं लक्षणें । धड तें तोंड धुऊं नेणें । परि चिंतनें काळ सारीं ॥२॥ न लवीं आणीक कांहीं पिसें । माझिया मना वांयां जाय ऐसें । चालवीं आपुल्या प्रकाशें । हातीं सरिसें धरोनियां ॥३॥ तुज हे समर्पिली काया । जीवेंभावें पंढरीराया । सांभाळीं समविषम डाया । करीं छाया कृपेची ॥४॥ चतुर तरी चतुरां राव । जाणता तरी जीवांचा जीव । न्यून तो कोण एक ठाव । आरुष भाव परि माझा ॥५॥ होतें तें माझें भांडवल । पायापें निवेदिलें बोल । आदरा ऐसें पाविजे मोल । तुका म्हणे साच फोल तूं जाणसी ॥६॥

४०५९. कां हो माझा मानियेला भार । ऐसा तव दिसतसे फार । अनंत पावविलीं उद्धार । नव्हेचि थार मज शेवटीं ॥१॥ पाप बळिवंत गाढें । तुजही राहों सकतें पुढें । मागील कांहीं राहिलें ओढें । नवल कोडें देखियेलें ॥२॥ काय मानिती संतजन । तुमचें हीनत्व वचन । कीं वृद्ध झाला नारायण । न चले पण आधील तो ॥३॥ आतां न करावी चोरी । बहुत न धरावें दुरी । पडदा काय घरच्या घरीं । धरिलें दुरी तेव्हा धरिलें ॥४॥ नको चाळवूं अनंता । कायसा होतोसी नेणता । काय तूं नाहीं धरीत सत्ता । तुका म्हणे आतां होई प्रगट ॥५॥

४०६०. तुळसी माळा घालूनि कंठीं । उभा विटेवरी जगजेठी । अवलोकोनी पुंडलिका दृष्टी । असे भीमातटीं पंढरीये ॥१॥ भुक्तिमुक्ति जयाच्या कामारी । रिद्धिसिद्धि वोळगती द्वारीं । सुदर्शन घरटी करी । काळ कांपें दुरी धाकें तया ॥२॥ जगज्जननी असे वाम भागीं । भीमकी शोभली अर्धांगीं । जैसी विद्युल्लता झळके मेघीं । दर्शनें भंगी महा दोष ॥३॥ सुखसागर परमानंदु । गोपी गोपाळां गोधनां छंदु । पक्षिश्वापदां जयाचा वेधु । वाहे गोविंदु पांवा छंदें ॥४॥ मुखमंडित चतुर्भुजा । मनमोहन गरुडध्वजा । तुका म्हणे स्वामी माझा । पावे भक्तकाजा लवलाहीं ॥५॥

४०६१. हातींचें न संडावें देवें । शरण आलों जीवें भावें । आपलें ऐसें म्हणावे । करितों जीवें निंबलोण ॥१॥ बैसतां संतांचे संगती । कळों आलें कमळापती । आपुलीं कोणीच नव्हती । निश्चय चित्तीं दृढ झाला ॥२॥ येती तुझिया भजना आड । दाविती प्रपंचाचें कोड । कनिष्ठीं रुचि ठेवूनी गोड । देखत नाड कळतसे ॥३॥ मरती मेलीं नेणों किती । हाचि लाभ तयाचे संगती । म्हणोनि येतों काकुलती । धीर तो चित्तीं दृढ द्यावा ॥४॥ सुखें निंदोत हे जन । न करीं तयांशीं वचन । आदिपिता तूं नारायण । जोडी चरण तुमचे ते ॥५॥ आपलें आपण न करूं हित । करूं हें प्रमाण संचित । तरी मी नष्टचि पतित । तुका म्हणे मज संत हांसती ॥६॥

४०६२. आतां येणें बळें पंढरिनाथ । जवळी राहिला तिष्ठत । पाहातां न कळे जयाचा अंत । तोचि हृदयांत घालूं आतां ॥१॥ विसरोनि आपला देहपणभाव । नामेंचि भुलविला

पंढरीराव । न विचारी याती कुळ ठाव । लागावया पाव संतांचे ॥२॥ बरें वर्म आलें आमुचिया हातां । हिंडावें धुंडावें न लगतां । होय अविनाश साहाकारी दाता । चतुर्भुज सत्ता परि धाके ॥३॥ होय आवडी साना थोर । रूप सुंदर मनोहर । भक्तिप्रिय लोभापर । करी आदर याचकपणें ॥४॥ तें वर्म आलें आमुच्या हाता । म्हणोनि शरण रिघालों संतां । तुका म्हणे पंढरिनाथा । न सोडीं आता जीवें भावें ॥५॥

४०६३. आइक पांडुरंगा एक मात । कांहीं बोलणें आहे एकांत । आम्हां जरी तारील संचित । तरी उचित काय तुझें ॥१॥ उसणें फेडितां धर्म तो कोण । काय तया मानवेल जन । काय गा मिरवूनी भूषण । वांयां थोरपण जनामध्यें ॥२॥ अन्न जरी न मिळे तयासी देणें । आगांतुक पात्र उचित दान । उपकार तरी धन्वंतरीपणें । जरी देणें घेणें नाहीं आशा ॥३॥ शूर तो तयासी बोलिजे जाणा । पाठीसी घालुनी राखे दीना । पार पुण्या नाहीं त्या भूषणा । ऐक नारायणा वचन हें ॥४॥ आतां पुढें बोलणें तें कांहीं । मज तारिसील तरीच सहि । वचन आपुलें सिद्धी नेई । तुका म्हणे तईं मज कळसी ॥५॥

४०६४. चांगला तरी पूर्ण काम । गोड तरी याचेंचि नाम । दयाळु तरी अवघा धर्म । भला तरी दासां श्रम होऊं नेदी ॥१॥ उदार तरी लक्ष्मीयेसी । जुंजार तरी कळिकाळासी । चतुर तरी गुणांचीच रासी । जाणता तयासी तोचि एक ॥२॥ जुनाट तरी बहुकाळा । न कळे जयाची लीळा । नेणता गोवळीं गोवळा । लाघवी अबळा भुलवणा ॥३॥ गांढ्या तरी भावाचा अंकित । बराडी तरी उच्छिष्टाची प्रीत । ओंगळ तरी कुब्जेशीं रत । भ्याड अनंत बहु पापा ॥४॥ खेळ तो येणेंचि खेळावा । नट तो येणेंचि आवगावा । लपोनि जीवीं न कळे जीवा । धरितां देवा नातुडसी ॥५॥ उंच तरी बहुतचि उंच । नीच तरी बहुतचि नीच । तुका म्हणे बोलिलों साच । नाहीं आहाच पूजा केली ॥६॥

४०६५. काय आम्ही भक्ती करणें कैसी । काय एक वाहावें तुम्हांसी । अवघा भरोनी उरलासी । वाणीं खाणीं रसीं रूपीं गंधीं ॥१॥ कैसें करूं इंद्रियां बंधन । पुण्यपापाचें खंडण । काय व्रत करूं आचरण । काय तुजविण उरलें तें ॥२॥ काय डोळे झांकुनियां पाहो । मंत्र जप काय ध्यावो । कवणें ठायीं धरूनि भाव । काय तें वाव तुजविण ॥३॥ काय हिंडों कवण दिशा । कवणे ठायीं पाय ठेवूं कैसा । काय तूं नव्हेसी नकळे ऐसा । काय मी कैसा पाहों आतां ॥४॥ तुझिया नामाची सकळ । पूजा अर्चन मंत्र माळ । धूप दीप नैवेद्य फळ तांबूल । वाहूं पुष्पांजुळ तुका म्हणे ॥५॥

४०६६. शरीर दुःखाचें कोठार । शरीर रोगाचें भांडार । शरीर दुर्गंधीची थार । नाहीं अपवित्र शरीरा ऐसें ॥१॥ शरीर उत्तम चांगलें । शरीर सुखाचें घोसुलें । शरीरें साध्य

होय केलें । शरीरें साधलें परब्रह्म ॥२॥ शरीर विटाळाचें आळें । मायामोहपाश जाळें । पतन शरीराच्या मुळें । शरीर काळें व्यापिलें ॥३॥ शरीर सकळही शुद्ध । शरीर निधींचाही निध । शरीरें तुटे भवबंध । वसे मध्यभागीं देव शरीरा ॥४॥ शरीर अविद्येचा बांधा । शरीर अवगुणांचा रांधा । शरीरीं वसे बहुत बाधा । नाहीं गुण सुधा एक शरीरीं ॥५॥ शरीरा दुःख नेदावा भोग । न द्यावें सुख न करीं त्याग । शरीर वोखटें ना चांग । तुका म्हणे वेग करीं हरिभजनीं ॥६॥

४०६७. इतुकें करी भलत्या परी । परद्रव्य परनारी । सांडुनी अभिलाश अंतरीं । वर्ते वेव्हारीं सुखरूप ॥१॥ न करीं दंभाचा सायास । शांती राहे बहुवस । जिव्हे सेवीं सुगंधरस । न करीं आळस रामनामीं ॥२॥ जनमित्र होईं सकळांचा । अशुभ न बोलावी वाचा । संग न धरावा दुर्जनाचा । करीं संतांचा सायास ॥३॥ करिसी देवाविण आस । अवघी होईल निरास । तृष्णा वाढविसी बहुवस । कधीं सुखास न पवसी ॥४॥ धरूनी विश्वास करीं धीर । करितां देव हाचि निर्धार । तयाचा वाहे योगक्षेमभार । नाहीं अंतर तुका म्हणे ॥५॥

४०६८. संसारसिंधु हा दुस्तर । नुल्लंघवे उल्लंघितां पार । बहुत वाहाविले दूर । न लगेचि तीर पैल थडी ॥१॥ किती जन्म झाला फेरा । गणित नाहीं जी दातारा । पडिलों आवर्तीं भोंवरा । बहु थोरा वोळसिया ॥२॥ वाढलों परि नेणती बुद्धि । नाहीं परतली धरिली शुद्धि । मग म्यां विचारावें कधीं । ऐसी संधि सांडूनियां ॥३॥ अनेक खाणी आहार निद्रा । भयमैथुनाचाचि थारा । बालत्व तारुण्य जरा । प्रधान पुरा भोग तेथें ॥४॥ ऐसीं उल्लंघूनी आलों स्थळें । बहु या भोवंडिलों काळें । आतां उगवावें जाळें । उजेडावें बळें दिवसाच्या ॥५॥ सांडो या संसाराची वाट । बहु येणें भोगविले कष्ट । दावी सत्या ऐसें नष्ट । तुका म्हणे भ्रष्ट झालों देवद्रोही ॥६॥

४०६९. विठ्ठल भीमातीरवासी । विठ्ठल पंढरीनिवासी । विठ्ठल पुंडलिकापासीं । कृपादानासीं उदार ॥१॥ विठ्ठल स्मरणा कोंवळा । विठ्ठल गौरवी आगळा । आधार ब्रह्मांडा सकळा । विठ्ठल लीळाविग्रही ॥२॥ उभाचि परि न मनी सीण । नाहीं उद्धरितां भिन्न । समर्थाचे घरीं एकचि अन्न । आर्तभूता क्षणोक्षणा सांभाळी ॥३॥ रुचीचे प्रकार । आणिताती आदरें । कोठेंही न पडे अंतर । थोरासी थोर धाकुट्या धाकुटा ॥४॥ करितां बळ धरितां नये । झोंबतां डोळा मनच होय । आपुल्या उद्देशाची सोय । जाणे हृदयनिवासी ॥५॥ पान्हा तरी आल्या अंतर तेथें । तों नाहीं भरिलें रितें । करितों सेवन आइतें । तुका म्हणे चित्तें चित्त मेळवूनी ॥६॥

४०७०. ताप हें हरण श्रीमुख । हरी भवरोगाऐसें दुःख । अवलोकितां उपजे सुख । उभें सन्मुख दृष्टीपुढें ॥१॥ न पुरे डोळियांची धणी । सखोल कृपेचीच खाणी । स्तवितां न पुरे

वेदवाणी । तो हा समचरणी कृपानिधि ॥२॥ रामकृष्ण ध्यान वामननरसिंही । उग्र आणि सौम्य कांहींच नाहीं । सांपडे भरलीये वाही । भाव शुद्ध पाहीं याचें भातुकें ॥३॥ गुणगंभीर चतुर सुजाण । शूर धीर उदार नारायण । व्यापक तरी त्रिभुवन । मनमोहन लावण्य हें ॥४॥ ठाण हें साजिरें सुंदर । अविनाश अविकार । अनंत आणि अपरंपार । तो हा कटीं कर धरिताहे ॥५॥ जयाची वाणी सुमनमाळा । परमामृतजिव्हाळा । अनंता अंगीं अनंत कळा । तुका जवळा चरणसेवक ॥६॥

४०७१. एक मागणें हृषीकेशी । चित्त द्यावें सांगतों वचनासी । मज अंतर तुझ्या चरणासी । न पडे ऐसी कृपा करी ॥१॥ नको दुजी बुद्धि आणीक । रिद्धिसिद्धि परलोक । तूं स्वामी मी सेवक । खंडणा नको करूं ऐसी ॥२॥ मना येईल तो जन्म देईं । भलते कुळीं भलते ठायीं । तें मी सांकडें घालीत नाहीं । हृदयींहूनी तुवां नव जावें ॥३॥ इतुलें करी भलत्या परी । भलत्या भावें तुझे द्वारीं । राहेन दास होऊनी कामारी । वदो वैखरी नित्य नाम ॥४॥ नको विचारूं दुसरें आतां । शरण आलों जी पंढरीनाथा । तुकयाबंधु म्हणे रे अच्युता । आहेसी तूं दाता दानशूर ॥५॥

४०७२. कई देखता होईन डोळीं । सकळांभूतीं मूर्ती सांवळी । जीवा नांव भूमंडळीं । जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं ॥१॥ ऐसी कृपा करील नारायण । जीव जगाचा होईन । प्रेमसागरीं बुडईन । होईल स्नान अनुतापी ॥२॥ ऐसा कईं येईन दैवास । दृश्य हें नासोन जाईल आस । सदा संतचरणीं देहाचा वास । सेवीन शेष धणीवरी ॥३॥ कईं नवसा येतील अंकुर । सुखा नाहींसा होईल पार । अमृत तें पृथ्वीतळ सागर । वाहातील पूर आनंदाचे ॥४॥ प्रसन्न दया क्षमा शांती । कईं नवविधा होईल भक्ती । भोगईन वैराग्य संपत्ती । मनोरथ कळती तईं पुरले ॥५॥ तुकयाबंधु म्हणे सांग । नव्हे तुजविण निरसेना पांग । म्हणोनी घातलें साष्टांग । पांडुरंगावरी चरणा ॥६॥

४०७३. तूं बळिया शिरोमणी । आहेसी माजी ये त्रिभुवनीं । रिघालों पाठीं तुझी म्हणउनी । आतां करी मनीं असेल तें ॥१॥ कृपासिंधु दीनवत्सल । फोडिली देवांची बंदीशाळ । संहारूनी राक्षसदळ । शरणागत राज्यीं स्थापिला ॥२॥ उपक्रम करावा बहुत । तरी तूं जाणसी धर्मनीत । उचित काय ते अनुचित । राखें शरणागत आलों आतां ॥३॥ तूं देवा प्रतापदिनकर । सुरा असुरांचा शूर । महावीरां वीर धनुर्धर । मी तों पामर काय तेथें ॥४॥ किती म्यां काय विनवावें । शरण आलों जीवें भावें । तुकयाबंधु म्हणे करावें । क्षेम आघवें येणें काळें ॥५॥

४०७४. देवा मी चांडाळ चांडाळ । म्हणतां लागताहे वेळ । नसें पाहातां भूमंडळ । ऐसा अमंगळ खळ दुसरा ॥१॥ जन्मा उपजलियापासूनी । असत्य कर्म तें अझूनी । सत्य आचरण नेणें

स्वप्नीं । निखळ खाणी अवगुणांची ॥२॥ भक्ति दया अथवा कथा । कानीं न सहावे वार्ता । अखंड विषयांची व्यथा । अधम पुरता अधमाहुनी ॥३॥ काम क्रोध दंभ अहंकार । गर्व ताठा मद मत्सर । यांचें तरी माहेरघर । परउपकार वैरी जैसा ॥४॥ निंदा द्वेष घातविश्वास । करितां नाहीं केला आळस । करूं नये ते केले संतउपहास । अभक्षभक्ष तेंही भक्षिलें ॥५॥ पाळिलें नाहीं पितृवचन । सदा परद्वारीं परधनीं ध्यान । बोलों नये ऐसें घडलें अन्योन्यविण । दासीगमन आदिकरूनी ॥६॥ कायामनें वाचा इंद्रियांशीं । सकळ पापांचीच राशी । तुकयाबंधु म्हणे ऐसियासी । आलों हृषीकेशी तुज शरण ॥७॥

४०७५. काय काय करितों या मना । परी नाइके नारायणा । करूं नये त्याची करी विवंचना । नेऊं पतना आदरिलें ॥१॥ भलतिया सवें धांवे सैराट । वाट आडवाट दरे दरकुट । न विचारी कांहीं कुडें कपट । घात बळकट मांडियला ॥२॥ न पुरती भ्रमणा दाही दिशा । सप्तही पाताळें आकाशा । घाली उडी बळेंचि देखोनी फांसा । केलों या दोषा पाहुणा ॥३॥ चेतवूनी इंद्रियें सकळ । आशा तृष्णा कल्पना काम क्रोध काळ । दुराविली शुद्ध बुद्धि केली राळ । ऐसें चांडाळ अनिवार हें ॥४॥ आतां काय ऐसें करावें यासी । बहुत जाचिलों केलों कासाविसी । तुकयाबंधु म्हणे हृषीकेशी । धांव मजसी ऐसी परी झाली ॥५॥

४०७६. नोहे आजिकालिचे ऐसे । अनारिसें पालटे ॥१॥ आतां लागवेग करा । ज्याचें धरा ठाके ते ॥२॥ नका सांगो वाउग्या गोष्टी । चाहुल खोटी ये ठायीं ॥३॥ तुका म्हणे मोडा माग । आपुला लाग करूनी ॥४॥

४०७७. खाणोरियांचीं पुसों घरें । जींहीं बरे पाळती ॥१॥ सांगती त्या जावें वाटा । धरोनी पोटामध्यें गोष्टी ॥२॥ आली गेली होती ठाया । सत्य छाया कळली ॥३॥ तुका म्हणे आपुलें बळ । युक्ति काळ कारण ॥४॥

४०७८. बैसो आतां मनीं । आलें तैसेंचि वदनीं ॥१॥ मग अवघेंचि गोड । पुरे सकळहि कोड ॥२॥ बाहेरील भाव । तैसा अंतरींहि वाव ॥३॥ तुका म्हणे मणी । शोभा दाविली कोंदणीं ॥४॥

४०७९. यत्न आतां तुम्ही करा । मज दातारा सत्तेनें ॥१॥ विश्वास तो पायांवरी । ठेवुनि हरि राहिलों ॥२॥ जाणतचि दुजे नाहीं । आणीक कांहीं प्रकार ॥३॥ तुका म्हणे शरण आलों । नेणें बोलों विनवितां ॥४॥

[ आरत्या प्रारंभ ]

४०८०. जगदीश जगदीश तुज म्हणती । परि या जनामाजी असशील युक्ति । पुण्यपापाविरहित सकळां अधिपती । द्रष्टा परी नळणी अलिप्त गती ॥१॥ जय देव जय देव जय पंढरीनाथा, श्रीपंढरीनाथा । नुरे पाप विठ्ठल म्हणतां सर्वथा ॥२॥ आगम निगम तुज नेणती

कोणी। परि तूं भाव भक्ति जवळीच दोन्ही। नेणतां विधियुक्त ईश्वरातें पूजनीं। न माये ब्रह्मांडीं तो संपुष्टासनीं ॥३॥ असुरां काळ भासे विक्राळ पुढें। पसरीं मुख एक चावितो धुडें। भक्ता शरणागता चालतो पुढें। दावी वाट जाऊं नेदी वांकुडें ॥४॥ एकाएकीं बहु विस्तरला सुखें। खेळे त्याची लीला तोचि कवतुकें। तेथें हे नरनारी कवण बाळकें। काय पापपुण्य कवण सुखदु:खें ॥५॥ सकळ वर्मा तूंचि जाणशी एक। बद्ध मोक्ष प्राप्त आणि सुखदु:ख। जाणों म्हणतां तुज ठकलीं बहुतेक। तुका म्हणे शरण आलों मज राख ॥६॥

४०८१. दैत्यभारें पीडिली पृथ्वी बाळा। म्हणोनि तुज येणें झाले गोपाळा। भक्तिप्रतिपाळक उत्साव सोहळा। मंगळें तुज गाती अबळा बाळा ॥१॥ जय देव जय देव जय गरुडध्वजा। आरती ओवाळूं तुज भक्तिकाजा ॥२॥ गुण रूप नाम नाहीं जयासी। चिंतितांची तैसा होसी तयांसी। मत्स्य कूर्म वराह नरसिंह झालासी। असुरां काळ मुनी ठाके ध्यानासी ॥३॥ सहस्त्र रूपें नाम सांवळा ना गोरा। श्रुति नेति म्हणती तुज विश्वंभरा। जीवना जीवन तूंचि होसी दातारा। न कळे पार ब्रह्मादिकां सुरवरां ॥४॥ संतां महंतां घरीं म्हणवी म्हणियारा। शंख चक्रगदा आयुधांचा भारा। सुदर्शन घरटी फिरे अवसरा। सकुमार ना स्थूळ होसी गोजिरा ॥५॥ भावेंविण तुझें न घडे पूजन। सकळही गंगा झाल्या तुजपासून। उत्पत्ति प्रलय तूंचि करिसी पालन। धरूनि राहिला तुका निश्चयें चरण ॥६॥

४०८२. काय तुझा महिमा वर्णूं मी किती। नाममात्रें भवपाश तुटती। पाहातां पाऊलें हे विष्णुमूर्ती। कोटिकुळांसहित जडजीव उद्धरती ॥१॥ जय देव जय देव जय पंढरीराया, श्रीपंढरीराया। करुनियां कुरवंडी सांडीन काया ॥२॥ मंगळआरतीचा थोर महिमा। आणीक द्यावया नाहीं उपमा। श्रीमुखासहित देखे जो कर्मा-। पासुनी सुटे जैसा रवि नासी तमा ॥३॥ धन्य व्रतकाळ हे एकादशी। जागरण उपवास घडे जयांसी। विष्णूचें पूजन एकभावेंसी। नित्यमुक्त पूज्य तिहीं लोकांसी ॥४॥ न वजे वांयां काळ जे तुज ध्याती। आखंड तुझा वास तयांच्या चित्तीं। धाले सुखें सदा प्रेमें डुल्लती। तीर्थें मलीन वास तयांचा पाहाती ॥५॥ देव भक्त तूंचि झालासी दोन्ही। वाढावया सुख भक्ति हे जनीं। जड जीवां उद्धार व्हावया लागोनी। शरण तुका वंदी पाऊलें दोन्ही ॥६॥

४०८३. कंसरायें गर्भ वधियेले सात। म्हणोनि गोकुळासी आले अनंत। घ्यावया अवतार झालें हेंचि निमित्त। असुर संहारूनी तारावे भक्त ॥१॥ जय देव जय देव जय विश्वरूपा। ओंवाळीन तुज देहदीपें बापा ॥२॥ स्थूळरूप होउनि धरितसे सानें। जैसा भाव तैसा तयांकारणें। दैत्यांसी भासला सिंही गजानें। काळासी महाकाळ यशोदेसी तान्हें ॥३॥ अनंत वर्णी कोंणा न कळेचि पार। सगुण कीं निर्गुण हाही निर्धार। पांगलीं साही अठरा करितां

वेव्हार। तो वळितसे गौळियांचें खिल्लार ॥४॥ तेहतीस कोटि तिहीं देवांसी श्रेष्ठ। पाउलें पाताळीं स्वर्गीं मुगुट। गिळिलीं चौदा भुवनें तरि न भरेचि पोट। तो खाउन धाला गौळियांचें उच्छिष्ट ॥५॥ महिमा वर्णूं तरि पांगलिया श्रुति। सिणला शेष चिरल्या जिव्हा करितां स्तुति। भावेंविण कांहीं न चलेचि युक्ति। राखें शरण तुकयाबंधु करी विनंती ॥६॥

४०८४. परमानंदा परमपुरुषोत्तमा रामा। अच्युता अनंता हरि मेघश्यामा। अविनाशा अलक्षा परता परब्रह्मा। अकळकळा कमळापति न कळे महिमा ॥१॥ जय देव जय देव जय श्रीपति। मंगळशुभदायका करीन आरती ॥२॥ गोविंदा गोपाळा गोकुळरक्षणा। गिरिधरकर भवसागरतारक दधिमथना। मधुसूदन मुनिजीवन धरणीश्रमहरणा। दीनवत्सल सकळां मूळ जय जयनिधाना ॥३॥ विश्वंभर सर्वेश्वर जगदोद्धारा। चक्रधर करुणाकर पावन गजेंद्रा। सुखसगर गुणआगर मुगुटमणी शूरा। कल्याणकैवल्यमूर्ती मनोहरा ॥४॥ गरुडासना शेषशयना नरहरी। नारायणा ध्याना सुरवरहरगौरी। नंदा नंदनवंदन त्रिभुवनाभीतरी। अनंतनामें ठसा अवतारांवरी ॥५॥ सगुणनिर्गुणसाक्ष श्रीमंतां संतां। भगवाना भगवंता काळकृतांता। उत्पत्तिपालनापासुन संहारणसत्ता। शरण तुकया बंधु तारीं रिति बहुतां ॥६॥

४०८५. पंढरी पुण्यभूमी भीमा दक्षिणवाहिनी। तीर्थ हे चंद्रभागा महा पातकां धुनी। उतरलें वैकुंठमहासुख मेदिनी ॥१॥ जय देवा पांडुरंगा जय अनाथनाथा। आरती ओंवाळीन तुम्हां लक्ष्मीकांता ॥२॥ नित्य नवा सोहळा हो महावाद्यांचे गजर। सन्मुख गरुडपारीं उभा जोडुनियां कर। मंडितचतुर्भुज कटीं मिरवती कर ॥३॥ हरिनामकीर्तन हो आनंद महाद्वारीं। नाचती प्रेमसुखें नर तेथींच्या नारी। जीवन्मुक्त लोक नित्य पाहाती हरी ॥४॥ आषाढी कार्तिकी हो गुरुडटकयांचे भार। गर्जती नामघोषें महावैष्णववीर। पापासी रीग नाहीं असुर कांपती सुर ॥५॥ हें सुख पुंडलिकें कैसे आणिलें बापें। निर्गुण साकारलें आम्हालागिं हें सोपें। म्हणोनि चरण धरोनी तुका राहिला सुखें ॥६॥

४०८६. अवतार गोकुळीं हो जन तारावयासी। लावण्यरूपडें हें तेज:पुंजाळरासी। उगवतां कोटि बिंबें रवि लोपले शशी। उत्साव सुरवरां मही थोर मानसीं ॥१॥ जय देवा कृष्णनाथा जय रुक्मिणीकांता। आरती ओंवाळीन तुम्हां देवकीसुता। जय देवा कृष्णनाथा ॥२॥ वसुदेवदेवकीची बंद फोडिली शाळ। होउनी विश्वजनिता तया पोटींचे बाळ। दैत्य हे त्रासियेले समूळ कंसासी काळ। राज्यया उग्रसेना केला मथुरापाळ ॥३॥ राखतां गोधनें हो इंद्र कोपला भारी। मेघ जो कडाडिला शिळां वर्षतां धारीं। राखिलें गोकुळ हें नखीं धरूनियां गिरी। निर्भय लोकपाळ अवतरले हरी ॥४॥ कवतुक पहावया माव ब्रह्मयानें केली। वत्सेंही चोरुनियां सत्यलोकासी नेलीं। गोपाळ गाईवत्सें दोहीं ठायीं राखीलीं। सुखाचा प्रेमसिंधु अनाथांची

माउली ॥५॥ तारिलें भक्तजना दैत्य निर्दाळूनि । पांडवा साहाकारी आडल्या निर्वाणीं । गुण मी काय वर्णूं मती येवढी वाणी । विनवितो दास तुका ठाव मागे चरणीं ॥६॥

४०८७. सुंदर अंगकांती मुख भाळ सुरेख । बाणली उटी अंगीं टिळा साजिरा रेख । मस्तकीं मुगुट कानीं कुंडलें तेज फांके । आरक्त दंत हिरे केस शोभले निके ॥१॥ जय देवा चतुर्भुजा जय लावण्य तेजा । आरती ओंवाळीन भवतारि हा वोजा । जय० ॥२॥ उदार जुंझार हा जया वाणिती श्रुति । परतल्या नेति म्हणता तयां न कळे गति । भाट हा चतुर्मुखें अनुवाद करिती । पांगलीं साही अठरा रूप न कळे गति ॥३॥ ऐकोनी रूप ऐसें तुजलागीं धुंडिती । बोडके नग्न एक निराहार यति । साधनें योग नाना तपें दारुण किती । सांडिलें सुख दिलें संसाराची त्या शांती ॥४॥ भरूनि माजी लोकां तिहीं नांदसी एक । कामिनीमनमोहना रूप नाम अनेक । नासती नाममात्रें भवपातकें शोक । पाउलें वंदिताती सिद्ध आणि साधक ॥५॥ उपमा द्यावयासी दुजें काय हें तुज । तत्त्वासी तत्त्वसार मूळ झालासी बीज । खेळसी बाळलीळा अवतार सहज । विनवितो दास तुका कर जोडुनी तुज ॥६॥

४०८८. सुकुमार मुखकमळ निजसार निर्मळ । सांवळी सुनीळ तनु भ्रमरांग कुरळ । झळकति दिव्य तेजें दंत माज पातळ । मिरवती मयूरपत्रें मुकुट कुंडलें माळ ॥१॥ जय देवा जगदीश्वरा । धन्य रखुमाईवरा । आरती करीन काया । ओंवाळीन सुंदरा । जय० ॥२॥ गोजिरें ठाणमान भुजा मंडित चारी । शोभती शंखचक्रगदापद्म मोहरी । हृदयीं ब्रह्मपद बाणलें शृंगारीं । गर्जती चरणीं वांकी कंठ कोकिळस्वरीं ॥३॥ घवघवित उटी अंगीं बावन चंदनाची । लल्लाटीं कस्तूरीचा कास पितांबराची । कटिसूत्र साजिरें प्रभा वर मोतियांची । संगीत सकळ मुद्रा पाउलें कुंकुमाचीं ॥४॥ सौभाग्यसुखसागर गुणलावण्यखाणी । लाघवीं दीनवत्सल विश्व लाविलें ध्यानीं । आश्चर्य देव करिती ऋषी राहिले मुनि । धन्य ते प्रसवली ऐसिया नंदपत्नी ॥५॥ वर्णितां ध्यान महिमा श्रुति राहिल्या नेति । रविकोटि चंद्र तारा प्रकाशा न तुळती । उदार सुर गंभीर पूर्ण आनंदमूर्ति । तुकयाबंधु म्हणे स्तवूं मी काय किती ॥६॥

४०८९. कनकाच्या परियेळीं उजळुनि आरती । रत्नदीपप्रभा कैशा पाजळल्या ज्योती ॥१॥ ओंवाळूं गे माये सबाह्य साजिरा । राहिरखुमाबाई सत्यभामेच्या वरा ॥२॥ मंडितचतुर्भुज दिव्य कानीं कुंडलें । श्रीमुखाची शोभा पाहतां तेज फांकलें ॥३॥ वैजयंती माळ गळां शोभे श्रीमंत । शंखचक्रगदापद्म आयुधें शोभत ॥४॥ सांवळा सकुमार जैसा कर्दळीगाभा । चरणींचीं नेपुरें वांकी गर्जती नभा ॥५॥ ओवाळितां मन हें उभें ठाकलें ठायीं । समदृष्टि समान तुकया लागला पायीं ॥६॥

४०९०. गाऊं नाचूं विठो तुझा करूं अनुवाद । जिकडे पाहें तिकडे सर्वमय गोविंद ॥१॥

आनंद रे विठोबा झाला माझे मनीं । देखिलीं लोचनीं विटेसहित पाउलें ॥२॥ न करीं तपसाधन मुक्तीचे सायास । हाचि जन्मोजन्मीं गोड भक्तीचा रस ॥३॥ तुका म्हणे आम्हां प्रेमा उणें तें काई । पंढरीचा राणा सांठविला हृदयीं ॥४॥

४०९१. धन्य दिवस आजी दर्शन संतांचें । नांदे तया घरीं दैवत पंढरीचें ॥१॥ धन्य पुण्यरूप कैसा झाला संसार । देव आणि भक्त दुजा नाहीं विचार ॥२॥ धन्य पूर्व पुण्य वोढवलें निरुतें । संतांचें दर्शन झालें भाग्यें बहुतें ॥३॥ तुका म्हणे धन्य आम्हां जोडली जोडी । संतांचें चरण आतां जीवें न सोडीं ॥४॥

४०९२. मागणें तें एक तुजप्रति आहे । देशी तरि पाहें पांडुरंगा ॥१॥ या संतांसी निरवीं हेंचि मज देईं । आणिक दुजें कांहीं न मागें तुज ॥२॥ तुका म्हणे आतां उदार तूं होई । मज ठेवी पायीं संतांचिया ॥३॥

[ निळोबारायकृत श्रीतुकोबारायाची आरती ]

प्रपंचरचना सर्वही भोगुनि त्यागिली । अनुतापाचे ज्वाळीं देहबुद्धि हविली । वैराग्याची निष्ठा प्रगटुनि दाखविली । अहंता ममता दवडुनि निजशांती वरिली ॥१॥ जयजयजी सद्गुरु स्वामी तुकया दातारा । तारक तूं सकळांचा जिवलग सोयरा ॥धृ०॥ हरिभक्तीचा महिमा विशेष वाढविला । विरक्ती ज्ञानाचा ठेवा उघडिला । जगदोद्धारालागीं उपाय सुचविला । निंदक दुर्जनांचा संदेह निरसिला ॥२॥ तेरा दिवस वह्या रक्षुनियां उदकीं । कोरड्याचि काढूनि दाखविल्या शेखी । अपार कविता शक्ति मिरवुनि विधि अंकीं । कीर्तन श्रवणें तुमच्या तरिजे जन लोकीं ॥३॥ बाळवेष घेउनि श्रीहरी भेटला । विधिचा जनिता तूंची आठव हा दिधला । तेणें ब्रह्मानंदें प्रेमा रूढविला । न तुके म्हणूनि तुका नामें गौरविला ॥४॥ प्रयाणकाळीं देवें विमान पाठविलें । कलिच्या काळामाजी अद्भुत वर्तलें । मानव देह घेऊनि निजधामा गेले । निळा म्हणे सकळ संतां तोषविलें ॥५॥

[ रामेश्वरकृत श्रीतुकोबारायाची आरती ]

आरती तुकारामा । स्वामी सद्गुरु धामा । सच्चिदानंद मूर्ति । पाय दाखवी आम्हां ॥१॥ राघवें सागरांत । पाषाण तारियेले । तैसे या तुकोबानें अभंग रचियेले ॥२॥ तुकिता तुळनेसी । ब्रह्म तुकासी आलें । म्हणोनि रामेश्वरें । चरणीं मस्तक ठेविलें ॥३॥



